स्वगृहीं आली. ( खरोखर सज्जनांवर कष्टकर प्रसंग फार येतात. त्यांना दुर्जनां इतकें यमाचेंही भय वाटत नाहीं. ) तिनें त्या दुष्टाशीं केलेला आपला संकेत दासीस सांगितला व मोठ्या दुःखानें म्हटलें, "पति दूर गेला असतां कुलस्त्रियांस मरण आलेलें‡ बरें. पण दुर्जनाच्या दृष्टीं पडणें बरें नव्हे." नंतर माझें स्मरण करीत व आपल्या सुंदर शरीराविषयीं शोक करीत तिनें निराहार राहूनच ती रात्र घालविली. प्रातःकालीं 'ब्राह्मणाच्या पूजेकरितां कांहीं धन मागून आण' असें सांगून तिने आपली चेटी हिरण्यगुप्त वैश्याकडे पाठविली. तेव्हां तो वाणी स्वतः तिच्याकडे आला व एकांतांत तिला म्हणतो–तूं जर माझें सेवन केलेंस तर मी तुला तुझ्या पतीची ठेव देईन; नाहीं तर देणार नाहीं. तें ऐकून व आपल्या पतीनें साक्षीवाचून ठेव ठेविली असें जाणून, आणि वाणी पापी आहे, असा निश्चय करून ती खेद व क्रोध यांनीं व्याकुळ झाली व पूर्वी ठरविलेल्या रात्रीच चवथ्या प्रहरीं त्यास यावयास सांगून पुढें काय करावें या विचारांत ती निमग्न झाली.

त्यानंतर तिनें आपल्या चेटींकडून कस्तूरिकादि सुगंधी द्रव्यें घालून एका मोठ्या कुंडींत पुष्कळ तैलमिश्रित काजळ तयार करविलें. त्याच काजळाचा लेप देऊन चार वस्त्रें तयार केलीं. एक मोठी पेटी करविली. तिला बाहेरून कडी व कुलूपही लाविलें होतें. इतक्यांत वसंतोत्सवाचा दिवस उजाडला व त्याच दिवशीं रात्रीं पहिल्या प्रहरीं तो सचिवकुमार उत्तम वेषानें आला. आपल्याला कोणी पाहूं नये म्हणून लपत लपत आंत आलेल्या त्याला माझी उपकोशा म्हणाली, "तूं अस्नात आहेस, यास्तव मी तुला स्पर्श करणार नाहीं. आतां येथें स्नान कर. या आमच्या स्नानगृहांत जा." तें ऐकून तो कामी मूढ स्नानाच्या आशेनें अंतर्गृहांत गेला. तें गृह अंधकारमय होतें. चेटींनीं त्यास एक काळें फाटकें वस्त्र नेसावयास देऊन त्याचीं सर्व वस्त्रें व अलंकार काढून घेतले. त्याच्या सर्व अंगास तें तैलमिश्रित काजळ लाविलें. हा अंगास लावण्याचा सर्व प्रकार एक प्रहरभर चालला होता. इतक्यांत राजपुरोहित आला. तेव्हां 'हा वररुचीचा मित्र राजपुरोहित आला आहे यास्तव तूं आतां या पेटींत

‡ वरं पत्यौ प्रवासस्थे मरणं कुलयोषितः ।

स्नीर ' असें सांगून चेटींनीं त्यास पेटींत घालून तिला बाहेरून कडी लाविली. नंतर पुरोहितालाही स्नानाकरितां काळोखानें काजळाप्रमाणेंच काळ्याकुट्ट झालेल्या त्या खोलींत नेलें. त्याचीही सचिवकुमाराप्रमाणे शुश्रूषा चालविली व दुसरा प्रहर संपतांच न्यायाधीश आला. तेव्हां त्वरेनें त्यासही त्याच मोठ्या पटात घालून पूर्वीप्रमाणेंच बाहेरून कडी लावून घेतलां. नंतर न्यायाधीशालाही स्नानाच्या निमित्तानें त्या स्नानगृहांत नेलें. त्याचींही सर्व वस्त्रें व अलंकार काढून घेऊन त्यास काळें फाटकें वस्त्र नेसावयास दिलें. त्याच्या नखशिखान्त अंगास काजळ फांसल व इतकें होईतो तिसरा प्रहर संपला. त्याबरोबर तो मूर्ख वैश्यही तेथें आला. तेव्हां 'यानें तुम्हास पाहिल्यास तुमची मोठी अपकीर्ति होईल,' असें त्यास भय घालून त्या पेटींत कोंडून ठेविलें. त्यावेळीं ते तिघे जणु काय परस्त्रीचा अभिलाष केल्यामुळे पुढें अवश्य मिळणाऱ्या अंधतामिस्र नरकाचा अभ्यासच करीत होते. त्या पेटींत त्यांस एकमेकांचा अंगस्पर्श होत असे; पण त्यांतील कोणीही कांहीं बोलला नाहीं.

असो; त्यानंतर त्या स्नानगृहांत दीप लावून व तेथें त्या वैश्यास नेऊन उपकोशा म्हणाली, " अरे भल्या गृहस्था, माझ्या भर्त्यानें तुजपाशीं ठेविलेलं माझें धन मला परत दे." त्यावर तो दुष्ट येथें कोणी नाहीं असें जाणून–तुझ्या भर्त्यानें मजपाशीं प्रसंगीं तुला देण्याकरितां धन ठेविलें आहे; हें खरें. पण तूं जर माझा मनोरथ पूर्ण करशील तर मी तें तुला देईन, नाहीं तर देणार नाहीं.–असें म्हणाला. तेव्हां उपकोशा कोंडलेल्या तिघांस उद्देशून–' अहो पेटींतील देवतांनों, हें या हिरण्यगुप्ताचें भाषण तुम्ही ऐकून ठेवा '–असें म्हणाली; आणि दीप घालवून स्नानाच्या मिषानें चेटींकडून त्याचींही वस्त्रादि घेववून त्यास काळा फाटका पंचा नेसावयास दिला, व अंगास काजळ फांसलें. इतक्यांत चांगलें उजाडल्यामुळें, त्याची इच्छा नव्हती तरी चेटींनीं धक्के मारून त्यास घराबाहेर घालविलें. तेव्हां त्याचा विद्रूप वेष पाहून कुत्रे त्याच्या अंगावर भुंकूं लागले. त्यालाही रस्त्यांतून जाण्याची लाज वाटूं लागली; पण लपत छपत तो कसा बसा आपल्या घरीं येऊन पोचला. त्याचे दासजन त्याच्या अंगाचें तें काजळ धुवून टाकूं लागले, पण त्यांना तोंड दाख-

विण्याचीही त्याला लाज वाटू लागली. पापकर्मांत प्रवृत्त होणारांची अशी दुर्दशा होणें योग्यच आहे.

असो; चांगलें उजाडल्यावर आपले नियम व धर्म आटोपून घरांतील मनुष्यांस न कळवितांच उपकोशा चेटीबरोबर नंदराजाच्या मंदिरीं गेली. व त्या पतिव्रतेनें 'हिरण्यगुप्त वैश्य माझ्या पतीनें ठेव म्हणून ठेविलेल्या धनाचा अपहार करण्याची इच्छा करीत आहे,' असें राजास सांगितलें. तेव्हां त्यांतील सत्यार्थ जाणण्याकरितां राजानें हिरण्यगुप्तास बोलावून आणिलें व त्याविषयीं प्रश्न केला. तेव्हां 'महाराज, मजपाशीं हिचें कांहीं एक नाहीं' असें त्यानें शपथ घेऊन सांगितलें. तें ऐकतांच उपकोशा म्हणत, देवा, याविषयीं माझे साक्षी आहेत. त्यांस मी येथें आणवितें. माझ्या पतीनें जातांना गृहदेवता एका पेटींत घालून ठेविल्या आहेत, व त्यांच्या समक्ष यानें माझ्या धनाचा अंगीकार केला आहे. त्यांस आपण विचारून पहावें. असें बोलून विस्मित झालेल्या राजानें आज्ञा दिली असतां, जिच्या मध्यें सचिवपुत्रादि कोंडून ठेविले होते ती पेटी तिनें राजमंदिरांत आणविली. नंतर उपकोशा म्हणाली, 'देवतांनों, तुमच्या समक्ष या वैश्यानें माझ्या धनाविषयीं काय म्हटलें तें सत्य सांगा व आपल्या घरीं जा. नाहींपेक्षां मी तुम्हास जाळीन अथवा या सभेंत तुमचें स्वरूप व्यक्त करीन.'' तें ऐकून पेटींत बसलेले तिघे अतिशय भ्याले व म्हणाले, "खरोखर आमच्या समक्ष या वैश्यानें हिचें देणें मान्य (कबूल) केलें आहे.'' तेव्हां निरुत्तर झालेल्या त्या शठ हिरण्यगुप्तानेंही तिचें देणें राजासमक्ष मान्य केलें.

त्यानंतर राजाला अतिशय आश्चर्य वाटल्या कारणानें त्यानें उपकोशेची प्रार्थना करून ती पेटी सभेमध्यें उघडविली व जणुं काय काजळाच्या पिंडाप्रमाणें दिसणारे ते तिघे पुरुष बाहेर काढिले. राजा व मंत्री यांनीं त्यांस मोठ्या कष्टानें ओळखिलें, आणि सभेंतील सर्व जण हसूं लागले असतां राजानें अति कौतुकानें त्या सतीस त्यांविषयीं प्रश्न केला. तेव्हां पित्याप्रमाणें रक्षण करणाऱ्या त्या प्रजापालकास उपकोशेनें आपल्यावरील सर्व संकट सांगितलें. तें ऐकून 'स्वशीलानेंच सुरक्षित असलेल्या कुलस्त्रियांचें चरित्र अचिंत्य आहे,'$ असें म्हणून सभासदांनीं तिची स्तुति केली व

* कष्टो ह्यविनयक्रमः । $ अचिन्त्यं शीलगुप्तानां चरितं कुलयोषिताम् ।

तिच्या या योग्य कृत्यांचें अभिनंदन केलें. त्यानंतर पर-स्त्रीचा अभिलाष धरणाऱ्या त्या सर्वांचें सर्वस्व हरण करून घेऊन राजानें त्यांस आपल्या राज्यांतून बाहेर घालवून दिलें. उघडच आहे कीं, अशील कोणाचें कल्याण करणार?†

असो; शेवटीं नंदराजानें तूं माझी भगिनी आहेस, असें म्हणून त्या साध्वीस नंतर पुष्कळ धन दिलें व राजाज्ञेनें ती आपल्या गृहीं आली. वर्ष व उपवर्ष यांस हें सर्व वर्तमान समजलें; तेव्हां त्यांनींही तिचें अभिनंदन केलें. त्या नगरांतील सर्व लोक आश्चर्यचकित झाले. इकडे हिमालयपर्वतावर अति तीव्र तप करून मी वरद पार्वती-पतीची आराधना केली. तेव्हां त्या कृपाळु देवानें मला तेंच पाणिनीय-शास्त्र सांगितलें व त्याच्या इच्छेप्रमाणें मी तें वार्तिकांच्या योगानें पूर्ण केलें. त्यानंतर शशिशेखराच्या प्रसादामृतानें अतिशय तृप्त होऊन, मी तपाच्या व प्रवासाच्या श्रमांची गणना न करितां, आपल्या गृहीं परत आलों. आई व गुरु यांस साष्टांग वंदन केलें. इतक्यांत मला ता उप-कोशेचा अद्भुत वृत्तांत कळला त्यामुळें मला मोठा आनंद व विस्मयही वाटला, आणि तिच्या ठिकाणचें स्वाभाविक प्रेम व बहुमान अतिशय वाढला त्यानंतर आमच्या वर्षसंज्ञक गुरूनें माझ्या तोंडून तें नवें व्याक-रण ऐकण्याची इच्छा दर्शविली व तें त्यास स्वामीकुमारानेंच ऐकविलें.

कांहीं दिवस लोटल्यावर व्याडी व इंद्रदत्त यांनीं गुरुदक्षिणा घेण्या-विषयीं गुरूची प्रार्थना केली; तेव्हां त्यानें एक कोटी सुवर्ण दक्षिणा मागितली. ती देण्याचें त्यांनीं मान्य केलें व मला म्हटलें, "मित्रा, चल; आपण नन्दापाशीं याचना करावयास जाऊं या. कारण, एवढी मोठी सुवर्णसंख्या (इतकें धन) दुसऱ्या कोणापासूनही मिळणें शक्य नाहीं पूर्वी त्या राजानें आपल्या तोंडानें उपकोशेस धर्मभगिनी म्हटलें आहे. यास्तव तो तुझा श्याल (पत्नीभ्राता) झाला. तुझ्या या संबंधामुळें आम्हांला धन अवश्य मिळेल." त्यावर 'बरें आहे' असें म्हणून व नंदा-कडे जाण्याचा निश्चय करून आम्ही सर्व सहाध्यायी अयोध्येंत असलेल्या नंदराजाकडे गेलों. पण दुर्दैवामुळें आम्ही तेथें जातों तों तो राजा मरण पावला. त्यामुळें सर्व राष्ट्रांत कोलाहल झाला व आम्हांला वाईट वाटलें.

† अशीलं कस्य भूतये ।

## योगनंदाची कथा.

पण ज्याला योगसिद्धि प्राप्त झाली आहे, असा इंद्रदत्त म्हणाला, " मी या मेलेल्या राजाच्या शरीरांत प्रवेश करितों. वररुचि याचक होऊन मजजवळ द्रव्य मागावयास येऊं दे, म्हणजे मी तें त्यास देईन आणि स्वशरीरांत परत येईन. पण मी त्याचें शरीर सोडून पुनरपि स्वशरीरांत येईतों व्याडीनें या शरीराचें रक्षण करावें." असें सांगून इंद्रदत्तानें राजाच्या शरीरांत प्रवेश केला, आणि त्यामुळें राजा पुनरपि जिवंत झाला. त्याबरोबर त्या राष्ट्रांत मोठा कोलाहल झाला. इकडे व्याडी एका देवगृहांत इंद्रदत्ताच्या शरीराच रक्षण करीत बसला व मी राजकुलांत गेलों. राजाच्या गृहांत प्रवेश करून यथाशास्त्र आशिर्वाद दिल्यावर मी गुरुदक्षिणेकरितां त्या योगनंदापाशीं याचना केली. त्याबरोबर त्या राजानें आपल्या शकटाल-नामक मंत्र्यास 'याला स्वर्ण–कोटी दे' अशी आज्ञा केला. पण मेलेल्या राजाचें जिवंत होणें व लगेंच एका गुरुदक्षिणार्थी याचकाचें येणें यांचा विचार करून त्या मंत्र्यानें त्यांतील रहस्य ओळखलें. बुद्धिमानांस अज्ञेय काय आहे ?

राजाची आज्ञा होतांच 'बरें आहे महाराज, देतों;' असें म्हणून तो मनांत असा विचार करूं लागला, कीं या राजाचा पुत्र अद्यापि बालक आहे व याचें राज्य तर शत्रूंनीं भरलेलें आहे. यास्तव आतां आपल्याला याच्या या शरीराचें रक्षण केलें पाहिजे. असा विचार व निश्चय करून त्यानें राष्ट्रांतील सर्व मृतशरीरें जाळून टाकविलीं. व्याडी ज्याचें रक्षण करीत होता त्या देवगृहांतील इंद्रदत्ताच्या शरीरासही दूतांच्या द्वारा हुडकून काढून त्यानें जाळून सोडलें.

इतक्यांत सुवर्ण कोटी धन देण्याविषयीं त्वरा करणाऱ्या राजास शकटाल म्हणाला " देवा, सर्व सेवकजनांचें चित्त आनंदोत्सवांत निमग्न झालें आहे. यास्तव हा ब्राह्मण थोडा वेळ थांबूं दे. मी याला लवकरच धन देतो " मंत्री इतकें बोलत आहे तों व्याडी 'अब्रह्मण्यं, अब्रह्मण्यं" असा मोठ्यानें घोष करीत व रडत योगनंदाकडे आला व म्हणाला " राजन्, समाधि लावून बसलेल्या व त्यामुळेंच न मेलेल्या एका अनाथ ब्राह्मणाला शकटालानें हें शवच आहे, असें म्हणून बलात्कारानें जाळिलें."

तें ऐकून योगनंद अतिशय दुःखी झाला. पण त्यावरून आतां आपला राजा स्थिर झाला आहे, तो लवकरच मरेल अशी आतां भीति राहिलेली नाहीं असें समजून त्या शकटालानें मला सुवर्ण कोटि धन दिलें.

त्यानंतर योगनंदानें एकांतांत व्याडीस बोलावून मोठ्या दुःखानें म्हटलें. "मित्रा, मी ब्राह्मण असूनही सांप्रतकाळीं शूद्र झालों आहे. त्यामुळें या एवढ्या संपत्तीनेंही माझ्या मनास संतोष होत नाहीं." तें ऐकून व त्या दुःखी राजाचें समाधान करून त्या कालास उचित असलेलें असें भाषण व्याडी करूं लागला.-"मित्रा, शकटालानें तुला ओळखिलें आहे. यास्तव तूं सावध होऊन रहा. हा महामंत्री आपल्या सूक्ष्म व तीक्ष्ण बुद्धीनें लवकरच तुला मारवून पूर्वीच्या नंदाच्या पुत्रास म्हणजे चंद्रगुप्तास राजा करील, असें मला वाटतें. करितां तूं वररुचीस आपला मुख्य मंत्री कर. म्हणजे दिव्यप्रभावानें संपन्न असलेल्या त्याच्या बुद्धीनें राज्य स्थिर होईल." इतकें सांगून व्याडी गुरुदक्षिणा देण्याकरितां गेला, आणि राजानें मला बोलावून नेऊन मंत्रिपदावर स्थापिलें.

तेव्हां मी त्यास म्हटलें "राजन्, हा शकटाल मंत्रिपदावर असेपर्यंत तुझें हें राज्य स्थिर आहे असें मी समजत नाहीं. यास्तव युक्तीनें याचा नाश कर." हें ऐकून योगानंद राजानें 'जिवंत ब्राह्मणास यानें जाळलें' असा शकटालावर आरोप ठेवून शंभर पुत्रांसह त्यास अंधकूपांत टाकिलें; व त्या सर्वांच्या जीवनाकरितां एक मडकेंभर सातू व मडकेंभर जल त्यांस प्रत्यहीं द्यावयास सांगितलें. तेव्हां शकटाल आपल्या पुत्रांस म्हणाला, "बाळांनो, या सातूवर एकाचे प्राणही मोठ्या कष्टानें वांचतील, मग सर्वांचा निर्वाह होण्याची गोष्ट कशाला हवी? यास्तव या योगनंदाचा सूड उगविण्यास जो समर्थ असेल, त्यानेंच हे सातु व जल घ्यावें." आपल्या जनकाचें तें दीन वचन ऐकून ते सर्व म्हणाले, "बाबा, हें मोठें कृत्य करण्यास तुम्हीच समर्थ आहां. यास्तव तुम्हीच हे सातू खा आम्हांला ते नकोत. कारण मानी पुरुषांस शत्रूंचा प्रतिकार प्राणांहूनही प्रिय वाटत असतो.§" पुत्रांचा तो आग्रह पाहून शकटाल मोठ्या कष्टानें पुत्रांस उपाशीं ठेवून त्या सातूंवर व जलावर आपला निर्वाह करीत, सूड उगवण्याकडेच ज्याच्या मनाचा सर्व कल

§ प्राणेभ्योऽपि हि धीराणां प्रिया शत्रुप्रतिक्रिया।

आहे, असा तो आपला काल मोठ्या कष्टानें घालवूं लागला. अरेरे, शत्रूंस जिंकण्याची इच्छा करणारे लोक किती क्रूर असतात हे!!† असो; तेथें अंधकूपांत असतांना असाही विचार त्याच्या मनांत आला. ज्याला आपल्या हिताची इच्छा असेल त्यानें आपल्या प्रभूचें चित्त न जाणतां अविश्वासानें व स्वेच्छेनें व्यवहार करणें चांगलें नव्हे. कारण स्वेच्छ व्यवहार केल्यामुळेंच मजवर हा घोर प्रसंग आला आहे. असो; कांहीं दिवसांनीं त्याचे शंभरही पुत्र त्याच्या समक्ष क्षुधेनें व्याकुळ होऊन मरण पावले, आणि शेवटीं त्यांच्या मृतशरीरांनीं परिवेष्टित झालेला तो महामंत्री एकटाच जिवंत राहिला.

तितक्या अवकाशांत योगनंद साम्राज्यावर बद्धमूल झाला व्याडीही गुरुस दक्षिणा देऊन त्याच्याकडे परत आला व, म्हणाला "भ्राता, तुला दीर्घकाल राज्यसुख प्राप्त होऊं दे. मी आता तप करण्याकरितां कोठें तरी जातो." तें ऐकून योगनंदास रडें कोसळलें. त्याचा कंठ दाटून आला व तो त्यास अश्रु टाळीत म्हणाला, "वा श्रेष्ठा, माझ्या राज्यांत राहून तूं सर्व भोगांचा उपभोग घे. मला येथ सोडून जाऊं नकोस." पण त्यावर व्याडी म्हणाला, "राजन्, हें शरीर क्षणभंगुर आहे. यातील विषयानुभव असार आहेत. त्यामध्यें कोणीही बुद्धिमान् निमग्न होत नाहीं.‡ मृगजळासारखी चंचल असलेली लक्ष्मी प्राज्ञास मोहित करूं शकत नाहीं."¶ असें बोलून तो निश्चयी व्याडी तप करण्याकरिता निघून गेला.

त्यानंतर योगनन्द माझ्या सहवर्तमान सर्व सैन्यानें परिवेष्टित होत्साता आपल्या पाटलिपुत्र नामक नगरास आला. कांणसूत, तेथ पोंचल्यावर मी मंत्र्याच्या कामामध्यें निमग्न होऊन राहिलों. प्रिया उपकोशा माझी सेवा करीत असे आणि याप्रमाणें गुरु व जननी यांसह मोठ्या आनंदाचा अनुभव घेत मी मोठ्या ऐश्वर्यानें काल घालवूं लागलों. प्रत्यहीं मी देवसिंधूची ( गंगेची ) तपाच्या योगानें आराधना करीत असे. त्यामुळें प्रसन्न झालेल्या गंगेनें मला पुष्कळ सुवर्ण दिलें. सरस्वती देवीही सशरीरिणी होऊन माझ्या कर्तव्यांचा मला उपदेश करीत असे.

† कष्ट क्रूरा जिगीषवः । ‡ राजञ्शरीरे क्षणनश्वरे । एवं प्रायेष्वसारेषु धीमान्को नाम मज्जति । ¶ न हि मोहयति प्राज्ञं लक्ष्मीर्मरुमरीचिका ।

# तरंग ५ वा.

## १. योगनंदाची कथा चालू.

इतकें सांगितल्यावर वररुचि पुनः म्हणाला, "काणभूते, पुढें कांहीं काल गेल्यावर योगनंद कामादि व्यसनांच्या अधीन झाला. मत्त गजेंद्राप्रमाणें तो मदांध झाला. कारण उघडच आहे कीं, अकस्मात् प्राप्त झालेली लक्ष्मी कोणाला मोहित करणार नाहीं‡? असो. राज्याची अशी अवस्था पाहून मी मनांत असा विचार करूं लागलों—हा राजा तर आतां उच्छृंखल झाला आहे व याच्या प्रजारक्षणादि कार्यांच्या चिंतेनें माझा धर्म क्षीण होत आहे, यास्तव मी आतां त्या शकटालाला अंधकूपांतून सोडवून आपल्या साह्यास घेतों, म्हणजे तोच पक्षकळशी राजकार्यें पाहील, व तसें झालें असतां माझी धर्महानि होणार नाहीं. मी असतांना तो राजाच्या विरुद्ध कांहीं करूं शकणार नाहीं. असा विचार व निश्चय करून वररुचीनें राजाच्या आज्ञेनें शकटालास अंधकूपांतून वर काढलें. ब्राह्मण स्वभावतःच मृदु असतात,§ असें म्हणतात, तें खोटें नव्हे. असो; हा वररुचि येथें असे पर्यंत योगनंद दुर्जय आहे, यास्तव अनुकूलकाल येईपर्यंत नम्रपणा धरून रहाणेंच श्रेयस्कर आहे असा पोक्त विचार करून मंत्रिपदीं आरूढ झालेला शकटाल माझ्या इच्छेप्रमाणें राजकार्यें करूं लागला.

एकदा असा चमत्कार झाला, कीं योगनंद नगरांतून बाहेर गेला असतां त्याला गंगेमध्यें ज्यांची बोटें एकमेकांस चिकटलीं आहेत, असा एक हात दिसला. त्याबरोबर त्यानें मला बोलावून हें काय, म्हणून विचारिलें. तेव्हां जिकडे तो हात दिसत होता तिकडे मी आपल्या दोन अंगुली दाखविल्या. त्यामुळें तो हात गुप्त झाला. तें पाहून तर राजाला फारच आश्चर्य वाटलें व तो पुनः मला विचारूं लागला. तेव्हां मीं त्यास म्हटलें, "राजन्, या जगांत एकमत झालेल्या पांच जणांस असाध्य काय आहे? अशा अभिप्रायानें या हातानें आपल्या जुळलेल्या पांच अंगुली दाखविल्या; पण एकचित्त झालेल्या दोघांनाही या

‡ अकाण्डपातोपनता कं न लक्ष्मीर्विमोहयेत्। § मृदवो हि द्विजातयः।

सृष्टींत असाध्य कांहीं नाहीं; अशा अभिप्रायानें मी उलट आपल्या दोन अंगुली दाखविल्या, आणि त्यामुळें तो हात गुप्त झाला." हें माझें गूढ विज्ञान पाहून राजाला अतिशय संतोष झाला व माझी बुद्धि दुर्जय आहे, असें पाहून शकटालास फार वाईट वाटलें.

एकदा आपली राणी वातायनां (खिडकी) तून, वर तोंड करून उभ्या असलेल्या एका ब्राह्मणअतिथीस कांहीं विचारीत आहे व त्याच्याकडे पहात आहे, असे योगनंदानें पाहिलें, आणि तेवढ्यानंच क्रोधाविष्ट झालेल्या त्यानें ब्राह्मणास वधदंड करण्याची आज्ञा केली. खरोखर ईर्ष्या (द्वेष) विवेकाचा नाश करणारी आहे.* पण त्या ब्राह्मणास वधस्थानाकडे नेत आहेत, असें पाहून बाजारांत टांगून ठेवलेला एक मांसा निर्जीव होता तरी, हसला. तेव्हां तो चमत्कार पाहून राजानें 'त्या ब्राह्मणास आतांच मारूं नका' अशी आपल्या सेवकास आज्ञा करून मला मत्स्याच्या हसण्याचें कारण विचारिलें. तेव्हां याचें कारण काय आहे, तें विचारपूर्वक पाहून नंतर तुला सांगेन असें बोलून मी एकांतांत गेलों आणि सरस्वतीचें चिंतन केल. त्याबरोबर ती प्रकट होऊन मला म्हणाली "रात्रीं तूं या तालवृक्षावर लपून बैस म्हणजे तुला माशाच्या हसण्याचें कारण समजेल" तें ऐकून रात्रीं मी तालवृक्षावर चढून बसलों. कांहीं वेळान लहान लहान पुत्रांसह तेथें आलेल्या एका घोर राक्षसीस मीं पाहिलें. तिचे पुत्र तिच्या जवळ खावयास मागत होते. पण ती त्यांस म्हणाली: "बाळांनों, कांहीं वेळ धीर धरा, उद्यां सकाळीं ब्राह्मणाचें मांस देईन. आज त्या ब्राह्मणास राजानें मारलें नाहीं.' तें ऐकून "राजानें त्याला आजच कां मारलं नाही?" असा मुलांनीं प्रश्न केला असतां ती म्हणाली "येथें एक मेलेला मासा हंसला, व त्यामुळें चकित झालेल्या राजानें त्याच्या हंसण्याचें कारण समजून घेण्याच्या इच्छेनें त्यास आज मारूं नका. अशी आज्ञा केली.' आईचें तें चमत्कारिक भाषण ऐकून त्या राक्षसबाळांनाहीं मोठें कौतुक वाटलें, व तं म्हणाले, "आई, तो मृत मत्स्य कसा व कां हंसला?' त्यावर राक्षसी म्हणते, "या राजाच्या सर्व राण्या व्यभिचारिणी आहेत. त्यांच्या अंतःपुरांत स्त्रीरूपी पुरुष स्थित आहेत. पण तिकडे लक्ष न देतां हा मूर्ख राजा

* ईर्ष्या हि विवेकपरिपन्थिनी ।

निरपराधी ब्राह्मणास मारीत आहे; असें जाणून तो मृत मत्स्य हसला" निशाचरीचें हें भाषण ऐकून, ती मुलांसह तेथून निघून गेली असतां मीही तालवृक्षावरून उतरून आपल्या घरांत येऊन निजलों. प्रात:काळीं हें मत्स्यहासाचें कारण राजास सांगितलें, व अंत:पुरांत त्या स्त्रीरूपी पुरुषास प्रत्यक्ष पाहून तो मला अतिशय मानूं लागला. त्यानें त्या ब्राह्मणास जिवदान दिलें.

राजाचें हें असलें चमत्कारिक वर्तन पाहून मला फार खेद होऊं लागला. इतक्यांत एक नवा चित्रकार तेथें आला. त्यानें योगनन्द व महादवी यांचीं चित्रें पडद्यावर काढलीं. तें चित्र अगदीं सजीव असल्यासारखें दिसत होतें. केवळ वाणी मात्र नाहीं. त्यामुळें राजाला संतोष वाटला. त्यानें पारितोषिक देऊन चितार्‍यालाही संतुष्ट केलें, आणि तो चित्रपट आपल्या आंतील घराच्या भिंतीवर लावून ठेविला.

एकदां दैववशात् मी त्या राजाच्या अंत:पुरांत गेलों व तेथें टांगून ठेविलेलें तें चित्र पाहून महादेवीची ही प्रति कृति जणुं काय अपर्णेच्या लक्षणांनींच युक्त आहे, असें जाणून आपल्या विलक्षण बुद्धिसामर्थ्यानें तिच्या देहलक्षणांचें पर्यालोचन केलें, आणि तिच्या मेखला घालावयाच्या जागीं एक बारीक तिळ काढून व आतां ती पूर्णपणें अपर्णेच्या लक्षणांनीं युक्त झाली आहे, असें समजून गेलों. कांहीं वेळानें योगनन्द तेथें आला व तो नुकताच दिलेला ताजा तिळ त्यानें पाहिला. त्याबरोबर या चित्राच्या कटिप्रदेशीं हा तिळ कोणी काढला, असें त्यानें अंत:पुरांत रहाणार्‍या सेवकांस विचारिलें, व त्यांनीं माझें नांव सांगितलें.

तें ऐकून राजा आपल्या मनांत अशी कुकल्पना करूं लागला, कीं माझ्या राणीच्या गुह्य प्रदेशीं असलेला बारीक तिळ मजवांचून दुसर्‍या कोणालाही ठाऊक असणें शक्य नाहीं; पण असें असतांनां वररुचीला तो कसा कळला? यावरून तो गुप्तपणें माझ्या अंत:पुरांत येऊन माझ्या स्त्रियांस दूषित करितो, यांत संशय नाहीं. आणि त्यामुळेंच माझ्या अंत:पुरांत स्त्री रूपी पुरुष आहेत हें त्यास कळलें. काणभूते विनाशकाल समीप आला असतां बुद्धि मोहित होते म्हणून म्हणतात तें खोटें नव्हे. असो; असा विचार करून योगनंद मजवर अतिशय रागावला व त्यानें शकटालास एकांतांत बोलावून 'या दुराचरणी वररुचीस

मार ' अशी आज्ञा केली. पण शकटाल ' बरें आहे ' असें म्हणून तेथून बाहेर येऊन विचार करूं लागला.

वररुचि दिव्यप्रभावसंपन्न आहे. यास्तव त्याला मारण्याची शक्ति माझ्याठायीं नाहीं. त्यानेंच मला आपत्तींतून सोडवून पुनः मंत्री केलें. शिवाय तो ब्राह्मण आहे. यास्तव त्याचा वध करण्याचा प्रयत्न न करितां गुप्तपणें रक्षण करून त्याला आपलासा केला पाहिजे. असा विचार करून तो महामंत्री मजकडे आला व म्हणाला " मित्रा, राजा तुजवर निष्कारण रागावला आहे, व त्यानें तुला मारण्याविषयीं मला आज्ञा केली आहे. पण मी तुला न मारतां त्याचें समाधान करण्याकरितां दुसऱ्या कोणाला मारतों. तूं माझ्या घरीं गुप्तपणें रहा. मी तुझें राजापासून रक्षण करीन " तें ऐकून त्याच्या सांगण्याप्रमाणें मी त्याच्या येथें गुप्तपणें राहिलों, व त्यानें रात्रीं कोणा दुष्ट जीवास मारून मलाच मारिलें असें राजास सांगितलें. त्याचें हें धैर्याचें व राजनीतीचें कृत्य पाहून मला आनंद झाला, व मी त्यास एकांतांत म्हटलें, " शकटाला, तूंच एक योग्य मंत्री आहेस. कारण तूं मोठ्या विचारानें मला मारण्यास तयार झाला नाहींस. मला कोणीही मारूं शकणार नाहीं. कारण माझा एक राक्षस मित्र आहे. त्याचें ध्यान करितांच तो मजपुढें प्रकट होतो. माझ्या इच्छेप्रमाणें वागणारा तो या विश्वालाही ग्रासून टाकील. पण हा राजा माझा मित्र आहे, तो इंद्रदत्तनामक ब्राह्मण असून योगसामर्थ्यानें राजशरीरांत प्रविष्ट झाला आहे, यास्तव तो मला अवध्य आहे. त्यानें जरी कृतघ्न होऊन माझा वध करण्याविषयीं तुला सांगितलें तरी मी त्याच्याच क्षुद्र स्वभावाचें अनुकरण करणार नाहीं. " हें माझें उदारतेचें भाषण ऐकून मंत्र्यानें ' तो राक्षस मला दाखवा ' असा आग्रह केला, व मी ध्यान करितांच ती विक्राळ मूर्ति प्रकट झाली. त्यास पहातांच मंत्री भ्याला व विस्मित झाला. पुढें माझ्या आज्ञेनें तो गुप्त झाला असतां मंत्री म्हणाला, " मित्रा, हा भयंकर राक्षस तुझा मित्र कसा झाला ?" तेव्हां मी त्यास पुढील पूर्ववृत्त सांगितलें. ' पूर्वी एकदां असें झालें कीं, नगर रक्षणार्थ रात्रीं फिरणाऱ्या नगराधिपांपैकीं एकेक नगराधिप दररात्रीं नाहींसा होऊं लागला. तेव्हां हें आश्चर्यकारक वर्तमान ऐकून योगनंदानें मला नगराधिप केलें. तेव्हां राजाच्या आज्ञेनें भ्रमण करीत अस-

तांना पहिल्याच रात्रीं मी एका भटकणाऱ्या राक्षसास पाहिलें. तोही त्वरेनें मजपुढें आला व म्हणाला, "या नगरांत अति सुंदर स्त्री कोणती आहे तें सांग." हा त्याचा प्रश्न ऐकून मी हसून म्हटलें, "अरे, ज्याला जी आवडते तीच त्याच्या दृष्टीनें अतिशय सुरूप होय." हें माझें युक्तीचें उत्तर ऐकून त्याला संतोष वाटला व तो म्हणाला, "तूंच एकानें मला जिंकलेंस. आजपर्यंत दुसरा कोणीही मला असें योग्य उत्तर देऊन जिंकण्यास समर्थ झाला नाहीं. असो; प्रश्नाचें उत्तर दिल्यामुळें तुझें मरण टळलें, व मी आतां तुझा सुहृद झालों आहें, तूं माझें जेव्हां जेव्हां स्मरण करशील तेव्हां तेव्हां मी तुजपाशीं येईन व तुझें इष्ट संपादन करीन." असें बोलून तो तेथेंच गुप्त झाला मीही आपल्या मार्गानें परत गेलों. सारांश, याप्रमाणें हा माझा आपत्कालीं साह्यकर्ता झाला आहे. त्यानंतर शकटालानें प्रार्थना केल्यामुळें, ध्यान करितांच साक्षात् पुढें येऊन उभ्या राहिलेल्या गंगेचें दर्शन त्याजकडून करविलें; आणि मी स्तुतीच्या योगानें समाराधना केल्यावर ती देवी गुप्त झाली. हा सर्व चमत्कार पाहून शकटाल माझा अनन्य भक्त व पूर्ण साह्यकर्ता झाला.

एकदां एकांतांत मी खिन्न होऊन बसलों असतां तो मंत्री मला म्हणाला, "मित्रा, तूं सर्वज्ञ असूनही आपल्या चित्तास खिन्न कां करून घेतोस? राजांच्या मती विवेकशून्य असतात हें तुला माहीत नाहीं काय? आतां थोड्याच अवकाशांत तुझी शुद्धि कशी होईल तें मी तुला सांगतों"

## २. आदित्यवर्मा राजाची कथा.

पूर्वी याच नगरांत आदित्यवर्मा या नांवाचा एक राजा होता. त्याचा शिववर्मा म्हणून महामति मंत्री होता. एकदा त्या राजाच्या राण्यांतील एक राणी गर्भवती झाली. तें पाहून राजा अंतःपुरांतील दासींस म्हणाला, "मी दोन वर्षांपूर्वी ह्या अंतःपुरांत आलों होतों, तेव्हांपासून इकडे मुळींच आलों नाहीं. असें असतांना ही राणी गर्भवती कशी झाली?" तेव्हां दासी राजास म्हणाल्या, "राजा, येथें एका शिववर्मामंत्र्यावांचून दुसरा कोणीही येत नाहीं. तो मात्र हवें तेव्हां कोणत्याही प्रकारच्या प्रतिबंधाशिवाय आंत येतो." तें ऐकतांच राजाला वाटलें, कीं तोच माझा द्रोही (शत्रु) आहे; पण 'त्याला जर उघड उघड मारिलें तर माझी मोठी निंदा होईल, करितां गुप्तपणें या कंटकाला

आपल्या मार्गांतून उपटून टाकिलें पाहिजे. असा विचार करून त्यानें त्यास आपल्या भोगवर्मा नामक मित्राकडे पाठविलें, व 'त्याचा तूं वध कर' असाही एक गुप्त लेख दुसऱ्या हेराबरोबर त्याला धाडला. पण शिववर्मा मंत्री जाऊन सात दिवस झाल्यावर राजाच्या भीतीनें पळालेली त्याचा ती गरोदर राणी एका स्त्रीरूपी पुरुषासह नगररक्षकांस सांपडली. व ते सत्य वृत्त ऐकून राजाला 'अरेरे, मी विनाकारण त्या माझ्या उत्तम व निरपराधी मंत्र्यास मारविलें.' असा मोठा पश्चात्ताप झाला.

इकडे शिववर्मा भोगवर्म्याकडे आला. इतक्यांत गुप्त हेरही तो लेख घेऊन आला. तो वाचून दैववशात् भोगवर्म्यानें राजाची आज्ञा शिववर्म्यास सांगितली. ती ऐकून तो महामंत्री म्हणाला, "राजन्, मला सत्वर मार. नाहींतर मी स्वतःच आपल्याला मारून घेईन." हें त्याचें भाषण ऐकून विस्मित झालेला तो सामंत राजा त्यास म्हणाला, 'ब्राह्मणा हें काय ! तू असें कां म्हणतोस ? तुला माझी शपथ आहे, काय असेल तें खरें सांग." त्यावर तो मंत्री म्हणतो, "भूपते, माझा जेथें वध होईल तेथें बारा वर्षें पाऊस पडणार नाहीं." मंत्र्याचे ते शब्द ऐकून भोगवर्मा आपल्या मंत्र्याशीं असा विचार करूं लागला–तो राजा फार दुष्ट आहे. आमच्या देशाचा नाश करण्याची इच्छा करितो. त्याकरितांच त्यानें याला इकडे पाठविलें. नाहीं तर काय त्याच्या राज्यांत गुप्त वध करणारांचा दुष्काळ पडला आहे ? या मंत्र्यास आपण मारूं नये. आपला वध होण्याचा प्रसंग आला तरी याचें रक्षण करावें.—असा विचार करून भोगवर्म्यानें बरोबर पुष्कळ रक्षक देऊन शिववर्म्यास तात्काल त्या देशांतून परत जावयास सांगितलें. याप्रमाणें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें जिवंत राहिलेला तो मंत्री आपल्या जन्मभूमीस परत आला, व त्याची शुद्धि परस्पर झाली. कारण धर्माचा दुष्परिणाम कधींही होत नसतो.

मित्रा, अशीच तुझीही शुद्धि होईल. बा कात्यायना, तूं माझ्या गृहांत स्वस्थ चित्तानें रहा. राजाला अवश्य पश्चात्ताप होईल. कात्यायन म्हणाला, काणभूते, शकटालाच्या या उत्साहजनक भाषणावर विश्वास ठेवून मी अनुकूल कालाची वाट पहात त्याच्याच येथें गुप्तपणें राहिलों.

प्रिय सुद्रदा, एकदां योगनंदाचा हिरण्यगुप्त नामक पुत्र मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला. घोड्याच्या वेगानें अति दूर गेलेल्या त्या राजपुत्रास

वनांतच संध्याकाळ झाली. तेव्हां ती रात्र तेथेंच घालविण्याकरितां तो एका वृक्षावर चढला. इतक्यांत सिंहास भ्यालेला कोणी एक ऋक्ष ( आस्वल ) तेथें आला, व राजपुत्र आपल्याला भ्याला आहे असें पाहून तो त्यास मनुष्यवाणीनें म्हणाला, "तूं माझा मित्र आहेस, भिऊं नकोस." तें ऐकून, आस्वलानें अभय दिल्यामुळें तो विश्वासानें त्या वृक्षावरच निजला, आणि ऋक्ष जागत राहिला. तेव्हां खालीं असलेला सिंह त्यास म्हणतो "ऋक्षा, या मनुष्याला खालीं ढकलून दे. म्हणजे मी त्यास घेऊन जातों" तें ऐकून ऋक्ष उलट म्हणाला "पाप्या मी मित्राचा असा विश्वासघात करणार नाहीं." पुढें कांहीं वेळानें राजपुत्र उठून बसला व ऋक्ष निजला. तेव्हां सिंह पुनः त्या राजपुत्रास म्हणतो "अरे मनुष्या, या ऋक्षास खालीं ढकल म्हणजे मी निघून जाईन." तें ऐकून आपल्या प्राणाच्या लोभानें सिंहास प्रसन्न करण्याकरितां त्यानें आस्वलास खालीं लोटून देण्याचा प्रयत्न केला. पण दैवयोगानें जागा झालेला तो आस्वल खालीं पडला नाहीं; पण त्या राजपुत्राचें हें कपट व कृतघ्नपणा पाहून त्याला फार राग आला, व 'हे मित्र–द्रोहिन् तूं वेडा हो, व हा आमचा वृत्तांत तुला पुनः कोणी सांगेपर्यंत तसाच रहा' असा त्यानें शाप दिला. पुढें प्रातःकाल होऊन सिंह व आस्वल निघून गेल्यावर राजपुत्र वेडा होऊन घरीं परत आला. त्याची ती शोचनीय अवस्था पाहून राजाला फार वाईट वाटलें; व तो भरसभेंत 'यावेळीं माझा वररुचि जर जिवंत असता तर त्यानें याच्या वेडाचें कारण सांगितलें असतें, त्याचा वध करणाऱ्या मला धिक्कार असो' असें म्हणाला, तें ऐकून शकटालानें मनांत असा विचार केला–'कात्यायनास प्रकट होण्याला हा योग्य काल आहे, तो मानी यापुढें येथें राहणार नाहीं, व तो गेल्यावर राजा माझ्यावर विश्वास ठेवील,' असा विचार करून तो राजास म्हणाला. "राजन्, अभय देशील तर विषाद करण्याचें कारण उरणार नाहीं. वररुचि जिवंत आहे." त्याबरोबर त्यास 'सत्वर घेऊन ये' असें राजा म्हणाला.

तेव्हां शकटालानें, माझी इच्छा नव्हती तरी, मला राजापाशीं नेलें. मी वेड लागलेल्या राजपुत्राला पाहिलें व सरस्वतीच्या प्रसादानें 'हे महाराज, यानें मित्रद्रोह केला आहे;' असें म्हणून मी वनांत घडलेला सर्व वृत्तान्त सांगितला. तो ऐकून राजपुत्र शापापासून मुक्त झाला व माझी

स्तुति करूं लागला. तेव्हां राजानें मला विचारलें, कीं वररुचे, हें तुला कसें समजलें ? तेव्हां मी म्हटलें " राजन्, लक्षणें, अनुमान व प्रतिभान यांच्या योगानें बुद्धिमानास न समजण्यासारखें काय आहे ? राणीच्या कंबरेवरील तीळ जसा मला समजला, तसाच हा वृत्तान्तही कळला व असेंच सर्व कळतें, " हें माझें मार्मिक भाषण ऐकून राजाला लज्जा वाटली व पश्चात्ताप झाला. त्यानंतर त्यांनें माझा मोठा सत्कार केला, पण त्याचा स्वीकार न करितां ' मी शुद्ध आहें, असें त्यास कळलें हाच मोठा लाभ झाला, ' असें समजून मी स्वगृहीं गेलों. कारण शील हेंच विद्वानांचें धन आहे.

मी स्वगृहीं पोंचल्यावर सर्व लोक माझ्यापुढें येऊन रडूं लागले. तेव्हां विक्षिप्तचित्त झालेला उपवर्ष मजजवळ येऊन म्हणाला, " राजानें तुला मारलें आहे, असें ऐकून उपकोशेनें आपलें शरीर अग्नींत जाळून घेतलें व शोकानें तुझ्या मातेचें हृदय फुटलें." तें ऐकतांच वायूनें उपटलेल्या वृक्षाप्रमाणें त्या नव्या शोकवेगानें कंपित झालेला मी भूमीवर पडलों, मला मूर्च्छा आली. कांहीं वेळानें सावध होऊन मी पुष्कळ विलाप केला, कारण प्रिय संबंधीजनांच्या विनाशामुळें उत्पन्न झालेला शोकाग्नि कोणाला ताप देणार नाहीं ? असो, पुढें वर्षगुरु मजकडे आले व ' हें जग अनित्य आहे, ही सर्व ईश्वराची माया पसरली आहे, हें सर्व तुला ठाऊक असून तूं मोहित होतोस ? ' इत्यादि मला बोध केला. त्यामुळें मी कसा बसा शुद्धीवर आलों व धैर्य धरिलें, माझें हृदय विरक्त झालें. त्यामुळें मी सर्व बंधनांचा त्याग केला आणि केवळ प्रशमपरायण होऊन तपोवनाचा आश्रय केला.

कांहीं दिवस लोटल्यावर त्या तपोवनांत अयोध्येहून एक ब्राह्मण आला, तेव्हां योगनंदाच्या राज्याची वार्ता विचारिली. त्याबरोबर मला ओळखून तो मोठ्या दुःखानें असें सांगूं लागलाः " कात्यायना, नंदाचें दुःखदायी वर्तमान ऐक. त्याच्या जवळून तूं निघून गेलास आणि शकटालास आपला द्वेष उगविण्यास अवकाश सांपडला; पण तो पुष्कळ दिवस युक्तीनें राजास कसें मारावें याचा विचारच करीत होता. इतक्यांत एके दिवशीं मार्गामध्यें भूमीस खणीत असलेला चाणक्य नांवाचा ब्राह्मण त्यास आढळला. ' भूमीला कां खोदतोस ' असें त्यानें विचारलें असतां

चाणक्य म्हणतो–' मी येथल्या दर्भास खणून काढीत आहें. कारण त्यांच्या योगानें माझ्या पायास क्षत झालें आहे. ' तें ऐकतांच त्या धूर्त मंत्र्यानें हा कोपी व क्रूरनिश्चयी ब्राह्मणच राजाच्या वधाचा उपाय आहे, असें मनांत ताडलें, व त्याचें नांव विचारून घेऊन तो म्हणाला ' ब्राह्मणा, नंदराजाच्या घरीं मी तुला त्रयोदशीच्या दिवशीं श्राद्धास बोलाविणार आहें. तुला लक्ष सुवर्ण दक्षणा मिळेल व सर्व ब्राह्मणांच्या अग्रभागीं तुझी योजना होईल. तर तूं आतां अगोदर माझ्या येथें चल. ' असें बोलून शकटालानें चाणक्यास आपल्या बरोबर नेलें आणि श्राद्धाच्या दिवशीं त्यानें त्यास राजाला भेटविलें. राजाचीही त्याजवर श्रद्धा बसली, चाणक्य श्राद्धास आलेल्या ब्राह्मणांच्या अग्रस्थानीं बसला. पण तेथें एक सुबंधुनामक योग्य ब्राह्मण होता, आज अग्रस्थान आपल्याला मिळावें, अशी त्यानें आपली इच्छा व्यक्त केली. तेव्हां शकटालानें राजाला तसें कळविलें व ' अग्रस्थानीं बसण्यास सुबंधुच योग्य आहे, दुसरा कोणी नाहीं ' असेंही म्हटलें, तेव्हां राजास ती गोष्ट मान्य झाली. नंतर शकटाल भयभीत झाल्यासारखें दाखवीत चाणक्याजवळ आला व ' राजाची अशी अशी आज्ञा झाली आहे, यांत माझा कांहीं अपराध नाहीं, ' इत्यादि मोठ्या नम्रपणें सांगूं लागला, पण तें ऐकून चाणक्यास मोठा क्रोध आला. व आपली शेंडी सोडून ' अग्रस्थानीं बसलेल्या-मला राजा उठवीत आहे काय; बरें आहे, आजपासून सात दिवसांच्या आंत याचा नाश करून क्रोधाग्नि शांत झाल्यावरच मी आपली ही शेंडी बांधीन,' अशी त्यानें प्रतिज्ञा केली; पण तो इतकें बोलत आहे तों राजाही कुपित झाला, तें पाहून चाणक्य तेथून पळाला, तेव्हां शकटालानें गुप्तपणें त्याला आपल्या येथें ठेवून घेतलें, आणि त्यास हवी होती ती अनुष्ठानाची सामग्री पुरविली, नंतर तो कोपी ब्राह्मण दूर कोठें गेला व अभिचार कर्म करून त्यानें कृत्या साध्य केली. त्यामुळें योगनंदास ज्वर आला व तो सातव्या दिवशीं मरण पावला. त्यानंतर शकटालानें त्याच्या हिरण्यनामक पुत्रासही मारविलें, आणि पहिल्या नंदाच्या पुत्रास राज्यलक्ष्मी अर्पण केली. त्याचें नांव चंद्रगुप्त होतें. असो; याप्रमाणें योगनंदाचा पुत्रांसह नाश करून आपण आतां कृतकृत्य झालों आहों, असें समजणाऱ्या त्या शकटालानें बृहस्पतीसारख्या बुद्धिमान्

चाणक्याची प्रार्थना करून मंत्रिपदीं योजना केली, व शंभर पुत्रांच्या मरणाचें स्मरण झाल्यामुळें दुःखी व विरक्त होऊन त्यानें तपोवनांत गमन केलें.

काणभूते, त्या ब्राह्मणच्या तोंडून हा सर्व वृत्तांत ऐकून व हें सर्व क्षणभंगुर आहे, असें जाणून मी अतिशय खिन्न झालों, आणि त्या खेदामुळेंच या विंध्यवसिनीचें दर्शन घेण्याकरितां मी इकडे आलों, तिच्या प्रसादानें तुझें दर्शन झालें, त्यामुळें मला पूर्व जन्माचें स्मरण झालें, दिव्य ज्ञान झालें व त्या ज्ञानसामर्थ्यानेंच मी ही दिव्य कथा सांगितली. आतां माझा शाप क्षीण झाला आहे. यास्तव मी आपल्या या अनित्य देहाचा त्याग करितों, तूं मात्र शिष्यांसह गुणाढ्य द्विज तुजपाशीं येईतों येथें रहा. त्यानें तीन भाषांचा त्याग केला आहे, तोही माझा पक्ष घेणारा माल्यवान् नामक उत्तम गण असून मजप्रमाणेंच त्यालाही देवीनें शाप दिल्यामुळें मनुष्य व्हावें लागलें आहे. महादेवानें सांगितलेली ही कथा तूं त्यास सांगितलीस म्हणजे तुम्ही दोघेंही शापापासून मुक्त व्हाल.

इतकें बोलून वररुचि देहत्याग करण्याकरितां पवित्र बदरिकाश्रमीं जावयास निघाला, मार्गांत गंगेमध्यें असलेल्या शाकाशिन मुनीचें दर्शन त्यास झालें. त्याच्या समक्ष त्या मुनीच्या हातांत दर्भाचें अग्र टोंचलें. त्यामुळें त्याच्या हातांतून रक्त वाहूं लागलें, तेव्हां त्या मुनीच्या दर्पाची परीक्षा करण्याकरितां वररुचीनें कौतुकानें आपल्या प्रभावानें त्या रक्ताचा शाकरस केला, तो चमत्कार पाहून 'वाहवा, मी सिद्ध झालों' असें शाकाशिन मुनि गर्वानें म्हणूं लागला, पण तें ऐकून वररुचि हंसून त्यास म्हणतो–' अरे बा मुने, तुझ्यामध्यें अहंकार किती आहे तें पहाण्याकरितां मीं तुझ्या रक्ताचा शाकरस केला. तुझा दर्प अजून क्षीण झालेला नाहीं, पण बाबारे, ज्ञानमार्गांत अहंकार हा मोटा प्रतिबंध आहे. कितीही जरी व्रतें केलीं, तरी ज्ञानावांचून मोक्ष मिळणार नाहीं, स्वर्ग सुखोपभोगानें क्षीण होणारा आहे. त्यामुळें मुमुक्षूंस तो आवडत नाहीं, तस्मात् मुने, तुला जर जन्म-मरणरहित, नित्य व निरतिशय मोक्ष पाहिजे असेल, तर अहंकाराचा त्याग करून ज्ञान संपादन करण्याविषयीं प्रयत्न कर.'

अशा रीतीनें त्यास बोध करून त्यानें प्रणाम व स्तुति केल्यावर वररुचि अतिशांत बदरिकाश्रमीं गेला, आणि आपल्या मर्त्यभावाचा त्याग करण्याची इच्छा करणारा तो सर्वोत्तम भक्तीनें शरण्य देवीस शरण

गेला. तिनेंही साक्षात् प्रकट होऊन देहांतून मुक्त होण्याकरितां, त्यास एक धारणा सांगितली. ती आळस सोडून अनुष्ठान केल्यासच प्राप्त होणारी होती. असो; त्या धारणेच्या योगानें देहास दग्ध करून तो आपल्या दिव्य गतीस प्राप्त झाला आणि इकडे विंध्यारण्यांत काणभूतिही गुणाढ्याच्या समागमाची वाट पहात राहिला.

## तरंग ६ वा.

महादेवाचा माल्यवान् नांवाचा गण गुणाढ्य या नांवाचा ब्राह्मण होऊन वनांत फिरत राहिला. त्यानें सातवाहनराजाची सेवा केली. शेवटीं त्याच्या समोर संस्कृतादि तीन भाषांचा त्याग करण्याची प्रतिज्ञा करून तो खिन्न मनानें विंध्यवासिनीचें दर्शन घेण्याकरितां आला. तिच्या आज्ञेनें त्यानें काणभूतीचें दर्शन घेतलें. त्याबरोबर एकाएकीं त्यास बोध होऊन पूर्वजन्माचें स्मरण झालें, व पैशाची भाषेचा आश्रय करून आणि आपलें नांव सांगून तो म्हणाला, "मित्रा, पुष्पदंतापासून ऐकलेली कथा मला सांग; म्हणजे तूं व मी असे दोघेही शापापासून मुक्त होऊं." तें ऐकून नम्र व हृष्ट झालेला काणभूति म्हणाला, "गुणाढ्या, मी तुला ती कथा सांगतों; पण अगोदर तुझें जन्मापासूनचें वृत्त ऐकण्याची मला इच्छा झाली आहे, तर तें सांगून मजवर उपकार कर." ही काणभूतीची प्रार्थना ऐकून गुणाढ्य आपला जन्मप्रभृति वृत्तांत सांगूं लागला.

### १. गुणाढ्याचें जन्मवृत्त.

"प्रतिष्ठान प्रांतांत सुप्रतिष्ठित म्हणून एक नगर आहे. तेथें सोमशर्मा नांवाचा कोणी एक उत्तम ब्राह्मण होता. त्यास वत्स व गुल्मक असे दोन पुत्र व श्रुतार्था नांवाची तिसरी कन्या, अशीं तीन अपत्यें होतीं. कांहीं कालानें भार्येसह तो ब्राह्मण मरण पावला. तेव्हां त्या दोघां पुत्रांनीं आपल्या भगिनीचें पालन केलें; पण एकाएकीं ती कन्या गर्भवती झाली, तेव्हां तेथें दुसरा कोणी पुरुष नसल्यामुळें त्या दोघां भावांस परस्परांविषयीं शंका आली. परंतु श्रुतार्था फार शहाणी होती. तिला आपल्या भावांची

वृत्ति साशंक झाली आहे, असें समजलें व त्याबरोबर ती न विचारतांच त्यांस म्हणते–तुम्ही मजविषयीं पापशंका करूं नका. मी तुम्हांस खरा प्रकार सांगतें. कुमार कीर्तिसेन या नांवाचा नागराज वासुकीचा पुतण्या आहे. मी स्नानाला गेलें असतां त्यानें मला एकदां पाहिलें, व त्याचें चित्त कामासक्त झालें. त्यानें कापलें कुल व नांव सांगून गांधर्वविधीनें माझें पाणिग्रहण केलें." पण भगिनीचें तें भाषण ऐकून, 'तूं सांगतेस तें खरें कशावरून' असें त्यांनीं विचारिलें, तेव्हां तिनें त्या नागकुमाराचें स्मरण केलें. त्याबरोबर तो प्रत्यक्ष पुढें आला, आणि वत्स व गुल्म यांस म्हणाला, "मी हिला आपली भार्या केली आहे, व त्यामुळें ही सुरसुंदरी शापापासून मुक्त झाली आहे. हिला पुत्रच होईल व त्याचा जन्म होतांच तुम्ही तिघेंही शापमुक्त व्हाल." असें सांगून तो गुप्त झाला. नंतर कांहीं दिवसांनीं श्रुतार्था प्रसूत झाली व तिला पुत्र झाला. तोच मी आहें असें समज. मी जेव्हां जन्मास आलों तेव्हां हा 'गुणांचा अवतार झाला आहे' असें आकाशवाणीनें सांगितलें. तें ऐकून माझ्या बांधवांनीं माझें गुणाढय असें नांव ठेविलें. माझ्या उत्पत्तीनें माझ्या आईचा व मामांचा शाप क्षीण झाला व तीं तिघेंही भावंडें कांहीं कालानें मरण पावलीं. त्यामुळें मला फार दुःख झालें, व माझें सर्व धैर्य गळालें.

पण प्रसंगच पडला म्हणजे सर्व प्राणी तो सहन करण्यास सज्ज होतात. या न्यायानें मी त्या आपल्या शोकाचा त्याग केला आणि मी जरी लहानच होतों, तरी परमात्म्यावर सर्व विश्वास ठेवून विद्या-संपादन करण्याकरितां दक्षिण देशांत एकटाच गेलों. योग्य गुरूजवळ राहून सर्व विद्या शिकलों. त्यामुळें माझी प्रसिद्धि झाली. पण मित्रा, जन्मभूमीचें प्रेम कांहीं अवर्णनीय असतें. मला त्या परदेशांत बरें वाटेना, म्हणून मी आपल्या देशांत परत आलों. माझे गुण सर्वांच्या अनुभवास येऊं लागले. माझ्या विद्येवर लुब्ध होऊन पुष्कळ शिष्य मजबरोबर आले होते, त्यांच्या सहवर्तमान मी फार दिवसांनीं प्रतिष्ठानांत प्रवेश केला व तेथें मला अवर्णनीय शोभा दिसली.

## २. मूषकवाण्याची गोष्ट.

कोठें सामवेदी छन्दोग साम गायन करीत होते. कोठें वेदार्थाचा निर्णय करण्याकरितां ब्राह्मणांचा वाद चालला होता. कोठें जुगारी लोक

'ज्याला द्यूतकला येते त्याच्या हातांत खजिना असतो' असें म्हणून द्यूताची प्रशंसा करीत होते. कोठें आपलें वाणिज्य, कला कौशल्य इत्यादिकांविषयीं वैश्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. व त्यांतच एक वाणी म्हणाला, "अहो जो व्ययच काटकसरीनें करितो त्याच्याजवळ द्रव्याच्या उलाढालीनेंच द्रव्यसंचय झाला तर त्यांत आश्चर्य कोणतें ? पण माझी स्थिति पहा. मी द्रव्यावांचूनच श्रीमान् झालों आहें. मी आईच्या पोटांत असतांनांच माझा पिता मरण पावला. तेव्हां माझ्या पापी गोत्रजां ( भाऊबंदां ) नीं माझ्या आईचें सर्व धन हरण केलें. तेव्हां त्यांच्या भीतीनें माझी माता गर्भाशयांत असलेल्या माझें रक्षण करण्याकरितां कुमारदत्त नांवाच्या माझ्या पित्याच्या मित्राच्या घरीं जाऊन राहिली. नंतर योग्य समयीं मी तिला झालों. काबाडकष्ट करून माझ्या जननीनें मोठ्या कष्टानें मला वाढविलें. पुढें मी मोठा झालों आहें, असें पाहून दारिद्र्यामुळें दीन झालेल्या माझ्या आईनें कोणा एका उपाध्यायाची प्रार्थना करून मला त्याच्या स्वाधीन केलें. क्रमानें मी लिपी व गणित शिकलों. तेव्हां–'पुत्रा तूं वैश्य आहेस, यास्तव तूं आतां वाणिज्य कर. या देशांत विशाखिल या नांवाचा एक मोठा श्रीमान् वणिक् आहे, तो दरिद्री कुलीन वैश्यांस व्यापाराकरितां भांडवल देत असतो, तर तूं आतां त्याच्याजवळ जाऊन थोडेसें द्रव्य माग'–असें मला आई म्हणाली. तें ऐकून मी त्याच्याकडे गेलों. इतक्यांत माझ्या समक्ष तो क्रोधानें एका वैश्यपुत्रास म्हणाला, "हा जो उंदीर भूमीवर मरून पडला आहे, त्यालाही आपला माल समजून व तो विकून एकादा कुशल वैश्य श्रीमान् होईल; पण मूर्खा, मी तुला आजवर पुष्कळ दीनार ( नाणीं ) दिले. त्यांची वृद्धि तर एकीकडेच राहिली; पण तूं तें माझें मूळ धनही राखलें नाहींस." तें ऐकून मी एकाएकीं त्या विशाखिलास म्हणालों, "भांडवलाकरितां हा मेलेला उंदीरच तुमच्यापासून घेतों." असें बोलून त्या उंदरास हातांत घेऊन व तो आपल्या खातीं मांडावयास सांगून मी तेथून निघालों, तेव्हां तो वैश्य हंसूं लागला.

मी बाजारांत गेलों व एका मोठ्या वैश्याच्या मांजराकरितां दोन मुठी चण्यांस तो विकला. घरीं येऊन ते चणे भाजले व एक पाण्याची घागर आणि ते फुटाणे घेऊन गांवाबाहेर गेलों. आणि रहदारीच्या मार्गा-

वर एका झाडाखालीं सावलींत बसलों. तेथें काष्ठें विकणारे गरीब लोक डोक्यावर लांकडांच्या मोळया घेऊन थकून येत, व विश्रांति घेण्याकरितां लांकडें खालीं ठेवून बसत. त्यांस मी मोठ्या नम्रपणें त्यांतले थोडेसे चणे व थंड पाणी देण्याचा क्रम चालविला. तेव्हां तृप्त झालेल्या त्या मोळक्यांनीं मला दोन दोन काष्ठें दिलीं. संध्याकाळीं मी तीं सर्व लांकडें डोक्यावर घेऊन बाजारांत गेलों. आणि तीं विकून मला जें कांहीं मिळालें त्याचे पुनः चणे घेऊन दुसऱ्या दिवशींही तसाच क्रम चालविला. अर्थातच त्या दिवशीं मला पहिल्या दिवसाहून पुष्कळ लांकडें मिळालीं. तींही सर्व विकून मी चणे घेतले व तिसऱ्या दिवशींही तोच व्यापार चालविला. याप्रमाणें कांहीं दिवस करून थोडेंसें द्रव्य मिळाल्यावर तीन दिवसांचीं त्यांचीं सर्व काष्ठें मी विकत घेतलीं. दैववशात् त्याच वेळीं अतिवृष्टि होऊन दुसऱ्या कोठेंही जळण मिळेनासें झालें. त्यामुळें माझ्या मालाचा भाव वाढला व त्या व्यापारांत मला अतोनात लाभ झाला. नंतर मी एक दुकान घेतलें व त्यावर चातुर्यानें धनाढ्य झालों. पुष्कळ धन मिळाल्यामुळें मी एक सुवर्णाचा उंदीर करून तो विशाखिलास परत दिला. तेव्हां त्याला मोठा आनंद झाला, व त्यानें आपली कन्या मला दिली, एवढ्यासाठींच मला मूषक या नांवानें लोक ओळखतात. याप्रमाणें जन्मतः निर्धन असूनही चातुर्यानें मी लक्ष्मीवान् झालों आहें. हा त्याचा वृत्तान्त ऐकून तेथील सर्व वैश्य विस्मित झाले. कारण आधारावांचून चित्र काढलेलें पाहून चमत्कार कसा वाटणार नाहीं !

## ३. सामवेदी ब्राह्मण व वेश्या.

एकदां एका सामवेदी ब्राह्मणास आठ माशे सुवर्णदक्षिणा मिळाली. तेव्हां त्यास एक विट म्हणतो, "ब्राह्मणा, तुझ्या ब्राह्मण्यवृत्तीनें तुला भोजन तर अनायासानें मिळण्यासारखें आहे. यास्तव हें सुवर्ण खर्च करून लोकयात्रेचें ( व्यवहाराचें ) ज्ञान होण्याकरितां तूं चातुर्य शीक." त्यावर 'मला व्यवहारचातुर्य कोण शिकविणार बाबा ?' असें जेव्हां त्यानें म्हटलें, तेव्हां तो पुनरपि म्हणाला, "ही जी चतुरिका नामक वेश्या आहे तिच्याजवळ जा." 'पण तेथें जाऊन मी काय करूं ?' असें त्यानें विचारिलें असतां तो पुनः म्हणाला, "तिला हें सुवर्ण देऊन

सामाच्या योगानें तिचें चित्तरंजन कर, " तें ऐकून तो ब्राह्मण चतुरिकेच्या घरीं गेला, तेव्हां या, बसा; इत्यादि हंसत बोलून तिनें त्याचा योग्य सत्कार केला, बैठकीवर बसल्यावर 'हें सुवर्ण घे, व मला तूं लोकयात्रा शिकव ' असें बोलून त्यानें तें सोनें तिला दिलें. तें पाहून तेथील सर्व लोक हंसूं लागले, इतक्यांत त्यानें आपले हात गोकर्णाकृति करून उंच स्वरानें सामगानास आरंभ केला. तो अपूर्व शब्द ऐकून त्या वेश्येचे सर्व विट तेथें जमले व पोट धरधरून हंसूं लागले. शेवटीं त्यांतील कित्येक म्हणाले, " अरे हा कोल्हा कोठून आला ! त्याला अर्धचंद्र ( गचांडी ) मारून बाहेर घालवा. " तें ऐकून हे अर्धचंद्र बाण आपल्यावर सोडणार आहेत असें समजून व त्यामुळें आपला शिरश्छेद होईल या भीतीनें 'मी लोकयात्रा शिकलों ' असें म्हणत तो तेथून पळून गेला. नंतर पुनः त्या विटाजवळ जाऊन त्यानें सर्व हकीकत त्यास सांगितली. ती ऐकून ' अरे वेडया, मी तुला ' सामा ' च्या ( सलोख्याच्या ) गोष्टी सांगून तिचें चित्तरंजन करावयास सांगितलें होतें; पण तूं साम या शब्दाचा अर्थ वेद असा समजून तो तेथें म्हणूं लागलास. पण वेदाध्ययनाचा काल कोणता, व अकाल कोणता, हेंही अर्थरहित अक्षरें घोकणाऱ्या तुला कळूं नयेना ! शाबास ! ' असें म्हणून तो त्याला तिच्याकडे घेऊन गेला, व ' या पशूचें सुवर्णतृण फेकून दे ' असें तिला म्हणाला, त्याबरोबर तिनें हंसून तें सुवर्ण परत दिलें, परत दिलेलें तें सुवर्ण घेऊन, तो ब्राह्मण ' आज हें माझ्यानें गिळलेलें माणिकच हातीं लागलें ' असें म्हणत आपल्या घरीं गेला.

काणभूते, पदोपदीं असे अनेक चमत्कार पहात मी शिष्यांसह इंद्रभवनासारख्या राजगृहास पोंचलों. कांहीं शिष्यांनीं पुढें जाऊन माझें आगमन राजास कळविलें, व त्याच्या आज्ञेनें आंत जाऊन सभेंतील रत्नसिंहासनावर बसलेल्या सातवाहन राजास मी पाहिलें, शर्व, वर्म इत्यादि मंत्र्यांनीं तो परिवेष्टित होता, ' स्वस्ति ' इत्यादि आशीर्वाद देऊन राजानें सत्कार केल्यावर मी आसनावर बसलों; इतक्यांत शर्वादि मंत्री माझी स्तुति करूं लागले, " हे देव, हा गुणाढय या यथार्थ नांवानें भूषित व प्रख्यात असलेला पंडित-श्रेष्ठ आहे, हा सर्व विद्यांमध्यें निष्णात आहे, " मंत्र्यांनीं केलेली ही स्तुति ऐकून प्रसन्न झालेल्या राजानें तत्काळ

माझा मोठा सत्कार करून मला मंत्री केलें, तेव्हां मी राजकार्ये पहात, व योग्य समयीं शिष्यांस पढवीत, विवाह करून आनंदानें राहूं लागलों.

## ४. देवीकृति उपवन.

एकदां मी मोठया कौतुकानें गोदावरीच्या तटीं स्वैर हिंडत असतां, तेथें एक 'देवीकृति' या नांवाचें नंदनवनासारखें रम्य उपवन पाहिलें, व 'हें कोणी निर्माण केलें' असें मी त्या पालकास विचारलें असतां तो म्हणाला, "प्रभो, वृद्धांच्या तोंडून याच्या उत्पत्तीविषयीं आम्ही असें ऐकलें आहे.—पूर्वी कोणीएक निराहार व मौनी ब्राह्मण येथें आला व त्यानें देव-मंदिरासह हें उद्यान निर्मिलें तो चमत्कार पाहून आसपासचे सर्व ब्राह्मण त्याच्याजवळ आले—व त्यास मोठया आग्रहानें तुम्ही कोण, कोठून आलां, इत्यादि त्याचें वृत्त विचारूं लागले, तेव्हां त्यानें आपला वृत्तांत असा सांगितला.—

नर्मदेच्या तीरीं भरुकच्छ (भडोच ?) म्हणून एक प्रांत आहे. त्यांत माझा जन्म झाला; पण मी दरिद्री व आळशी असल्यामुळें मला कोणी भिक्षाही घालीना, तेव्हां मी विरक्त झालों व घरदार सोडून तीर्थाटण करीत विंध्यवासिनीचें दर्शन घ्यावयास गेलों, त्या महादेवीच्या पुढें गेल्यावर लोक 'पशूचा बळी देऊन या देवीस प्रसन्न करितात, पण मजजवळ पशु नाहीं, यास्तव मूर्ख असल्यामुळें पशुतुल्य असलेल्या या आपल्या शरीराचाच बळी देऊन मी तिला संतुष्ट करितों,' असें म्हणून आपला शिरश्छेद करण्याकरितां मी शस्त्र घेतलें, त्याबरोबर ती कृपाळु देवी मजवर प्रसन्न होऊन मला म्हणाली; 'वत्सा, तूं सिद्ध आहेस, आपल्याला मारून घेऊं नकोस. मजजवळ सुखानें रहा.' हा वर मिळतांच मी दिव्य पुरुष झालों व माझी क्षुधा व तृषा पार नाहींशी झाली. कांहीं दिवसांनीं देवी म्हणाली, "वत्सा, हें दिव्य बीज घेऊन तूं प्रतिष्ठानसंज्ञक नगराजवळ जा, व गोदेच्या तीरीं एक रम्य उद्यान निर्माण कर.'' ही तिची आज्ञा शिरसामान्य करून मी येथें आलों, व तिच्या प्रभावानें हें दिव्य उद्यान येथें रचिलें, आतां यापुढें तुम्ही त्याचें रक्षण करा असें सांगून तो ब्राह्मण गुप्त झाला, याप्रमाणें देवीच्या प्रभावानें हें उद्यान निर्माण झालें आहे, असें ऐकून मला मोठें आश्चर्य वाटलें व मी आपल्या गृहीं परत आलों.

इतकें वर्तमान ऐकून 'राजाला सातवहान हें नांव कां प्राप्त झालें,' असा काणभूतीनें प्रश्न केला. तेव्हां गुणाढ्य त्याचें कारण सांगूं लागला.

## ५. सातवाहनाची कथा.

पूर्वीं दीपकर्णि या नांवाचा एक प्रख्यात व मोठा पराक्रमी राजा होता. त्याची शक्तिमती या नांवाची प्रिय भार्या होती. एकदां विषयभोग भोगून उद्यानांत निजली असतां तिला साप चावला, त्यामुळें ती साध्वी मरण पावली. तेव्हां तिच्या ठायींच आसक्त असलेल्या राजानें अपत्य नव्हतें तरी ब्रह्मचर्यव्रत धरिलें. पुढें या राज्याचें रक्षण करील असा आपल्याला योग्य पुत्र नाहीं, असें मनांत आणून दुःखित झालेल्या त्या राजास भगवान् शंकरानें स्वप्नांत अशी आज्ञा केली.—" राजा, तूं महा अरण्यांत जाऊन भ्रमण करीत रहा. तेथें जो सिंहावर बसलेला कुमार दिसेल त्याला तूं आपल्या घरीं घेऊन ये. तोच तुझा पुत्र होईल" हा साक्षात्कार पहातांच तो जागा झाला. त्याला मोठा आनंद वाटला व दुसऱ्या दिवशीं मृगयेची तयारी करून तो अरण्यांत गेला. माध्याह्नसमयीं पद्मसरोवराच्या तीरीं सिंहासनावर बसलेला सूर्यासारखा तेजस्वी बालक त्यास दिसला. कांहीं वेळानें तो बालक सिंहाच्या पाठीवरून खालीं उतरला आहे, असें पाहून राजानें जलाची अभिलाषा करणाऱ्या सिंहास एका बाणानें मारिलें. त्यावरोबर सिंहाचें शरीर सोडून तो पुरुषाच्या आकाराचा झाला. तो चमत्कार पाहून 'हें काय आहे' असें राजानें विचारलें. तेव्हां तो म्हणाला, राजा, मी कुबेराचा सात या नांवाचा यक्ष, मित्र आहें. मीं एकदां गंगेंत स्नान करीत असलेल्या एका ऋषिकन्येस पाहिलें. तिचीही दृष्टि मजकडे वळली. एकमेकांस पाहून आम्हीं दोघेंही कामवश झालों. गांधर्वविधीनें मी तिचें पाणिग्रहण केलें. पण तिच्या घरच्या लोकांना जेव्हां हें वर्तमान कळलें तेव्हां, त्यांनीं क्रोधानें 'अरे पाप्यांनों, तुम्हीं दोघेंही स्वेच्छाचारी सिंह व्हा,' असा तिला व मलाही शाप दिला. पुढें पुष्कळ प्रार्थना केल्यावर पुत्र होईपर्यंत तूं सिंही होऊन रहाशील, व दीपकर्णी राजाचा बाण लागेपर्यंत तो यक्ष सिंहयोनींत राहील, असा त्यांनीं उःशाप दिला. पुढें आम्हीं सिंहाचें जोडपें झालों. कांहीं दिवसांनीं या पुत्रास जन्म देऊन ती मरून गेली. तेव्हां मीं या बालकास दुसऱ्या सिंहीचें दूध पाजून वाढविलें. आतां तुझ्या कृपेनें मी शाप-

पासून मुक्त झालों आहें. मी हा बालक तुला देतों. त्याचें तूं रक्षण कर. त्या मुनीनींच मला असें करण्याविषयीं सांगितलें आहे.

इतकें सांगून तो यक्ष गुप्त झाला आणि राजा त्या सुंदर बालकास घेऊन घरीं परत आला व सातनामक यक्षानें त्यास आपल्या पाठीवरून वाहिल्यामुळें त्यानें सातवाहन असें त्याचें नांव ठेविलें. कांहीं दिवस गेल्यावर तो सर्व विद्या व कला यांत निष्णात झाला आहे, असें पाहून दीपकर्णीनें त्यास राज्याभिषेक केला व स्वतः तपश्चर्या करण्याकरितां अरण्यांत गमन केलें. पुढें सातवाहन स्वपुरुषार्थानें सार्वभौम राजा झाला.

असो; काणभूतीनें मध्येंच प्रश्न केल्यामुळें त्यास एवढा हा प्रासंगिक वृत्तान्त सांगून गुणाढ्य चालू कथा पुनः सांगूं लागला. एकदां वसंतोत्सवप्रसंगीं, नंदनवनांत विहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें, सातवाहन स्त्रियांसह त्या देवीकृत उद्यानांत राहून विहार करूं लागला. एके· दिवशीं वापीजलांत उतरून प्रमदांसह तो जलक्रीडा करीत होता. त्याच्या स्त्रियांनीं त्यावेळीं सर्व भूषणें काढून ठेविलीं होतीं. त्यामुळें ज्यांच्या वरील पुष्पें खालीं गळून पडलीं आहेत, अशा जाई, जुई, इत्यादि उद्यानस्थ वेलींप्रमाणें त्या दिसत होत्या. राजा आपल्या हातानें त्यांच्या अंगावर पाणी उडवूं लागला असतां त्याही निर्भयपणें त्याच्या अंगावर पाणी शिंपडूं लागल्या. हस्तीणींनीं परिवेष्टित असलेल्या गजांची जशी मोठ्या सरोवरांत क्रीडा चालते तशीच त्यांची जलक्रीडा चालली होती. इतक्यांत त्याच्या राण्यांतील एक राणी फारच सुकुमार होती. त्यामुळें ती जलक्रीडा करितां करितां थकली. पण राजा तिच्या अंगावर जल शिंपडीतच होता. तें तिला असह्य झालें, व ती म्हणाली:—" मोदकैः परिताडय माम् " तें ऐकून राजानें मोदक आणविले व तो ते तिच्या अंगावर मारूं लागला. तें पाहून राणी हंसून म्हणाली, " राजन्, पाण्यांत मोदकांचा काय उपयोग ? येथें काय ते खातां येणार आहेत ? मी तुला म्हटलें कीं, ' मा उदकैः परिताडय माम् ' म्हणजे मला जलानें ताडन करूं नकोस, मा व उदकैः यांचा व्याकरणाच्या नियमाप्रमाणें ' मोदकैः ' असा संधि होत असतो. पण तोही तुला कळत नाहीं, व तूं प्रकरणही जाणत नाहींस, तूं असा मूर्ख कसा झालास ? त्या शब्दशास्त्रज्ञ राणीनें असें धिक्कारवचन उच्चारिलें असतां त्याचा सर्व परिवार हंसूं लागला व सामान्य

सेवकांनीं लज्जेनें आपल्या माना खालीं घातल्या, त्याबरोबर राजाचा सर्व दर्प गेला, त्याचा अपमान झाला, त्यानें तत्काल जलक्रीडा संपविली व खिन्न मनानें आपल्या मंदिराकडे गमन केलें. तेव्हांपासून तो अत्यंत चिंतेत पडला, कोणतेंही कार्य करण्याचा त्याला उत्साह राहिला नाहीं, फार काय पण भोजनही त्यानें सोडलें, चित्राप्रमाणें स्तब्ध होऊन राहिलेल्या त्या राजाला कोणी कांहीं प्रश्न केल्यास त्याचें उत्तरही तो देईना; पांडित्य किंवा मरण यांतील कांहीं तरी एक मला संपादन केलें पाहिजे, असा निश्चय करून तो शय्येवर संतप्त चित्तानें पडून राहिला,

राजाची अकस्मात् झालेली ती अवस्था पाहून सर्व परिजन घाबरून गेले, शेवटीं ती वार्ता मला व शिववर्म्याला कळली. राजाचा तो सर्व दिवस अशाच अस्वस्थपणांत गेला, तेव्हां आम्ही गजहंसनामक राजाच्या चेटास बोलावून अस्वस्थतेचें कारण विचारिलें, त्यावर तो म्हणाला, " आमच्या स्वामींस आजपर्यंत आम्ही कधीं अशा खिन्न अवस्थेंत पाहिलें नाहीं, पण 'आज आपणास व्यर्थ पंडिता समजणाऱ्या विष्णुशक्तीच्या कन्येनें राजाला असें अस्वस्थ केलें ' असें इतर राण्या क्रोधानें म्हणत होत्या," त्यांच्या तोंडचे हे शब्द ऐकून मीही उद्विग्न झालों, व शिववर्म्यासह असा विचार करूं लागलों.

राजाला जर कांहीं शारीरिक व्यथा होत असती तर त्यानें वैद्यास बोलाविलें असतें, पण तसें कांहीं झालेलें नाहीं, बरें मानसिक व्यथा आहे म्हणून म्हणावें तर तिचें कांहीं कारण दिसत नाहीं, याच्या राज्यांतील सर्व कंटक नष्ट झाले आहेत, याला कोणी शत्रुही नाहीं, सर्व प्रजा अनुरक्त आहे, कोणत्याही प्रकारची हानीही झालेली नाहीं. मग याच्या स्वास्थ्यांत असें अंतर कां पडावें ? असा विचार करीत असतां शिववर्मा म्हणाला, " मला त्याच्या दुःखाचें कारण कधींपासूनच ठाऊक आहे. तो ' मी मूर्ख आहें ' असें समजून सदा संतप्त होत असतो. मला पांडित्य कसें प्राप्त होईल अशी चिंता तो सतत करीत रहातो. आज तर राणीनें त्याचा अपमान केला, असें आतांच चेटानें सांगितलें. तस्मात् त्याच्या चिंतेचें व अस्वस्थतेचें तेंच कारण आहे यांत मुळींच संशय नाहीं. "

असा आपसांत विचार करून व ती रात्र कशीबशी घालवून दुसऱ्या दिवशीं सकाळींच नित्य व अवश्य कर्में केल्यावर आम्हीं दोघे राजगृहास

गेलों, पण आंत कोणालाही सोडूं नये अशी राजाची आज्ञा झालेली असल्यामुळें आम्हांलाही द्वारावर प्रतिबंध झाला. तथापि युक्तिप्रयुक्तीनें अगोदर मी व मागून शिववर्मा अशा क्रमानें हळूहळू आम्ही राजापाशीं जाऊन बसलों. आणि अवसर सांपडतांच मीं म्हटलें, "महाराज आपण विनाकारण असे खिन्न कां बसलांत ?" पण त्यावर त्यानें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. तेव्हां शिववर्म्यानें असें अद्भुत भाषण केलें: "देवा, आपण मला पूर्वी सांगितलें होतें कीं, मला कसें तरी विद्वान् कर. तें लक्षांत धरून आपल्याला विद्वान् करें करितां येईल हें जाणण्याकरितां मी काल रात्रीं एक स्वप्न पडण्याचें कुव्हेडें केलें. त्यामुळें स्वप्नांत आकाशांतून एक कमल पडलें. त्यास कोणाएका दिव्य कुमारानें फुलविलें. त्यांतून एक शुभ्रवस्त्र नेसलेली दिव्य स्त्री निघाली, व ती आपल्या मुखांत शिरली, असें मी पाहिलें; आणि लागलाच जागा झालों. मला वाटतें कीं, ती साक्षात् सरस्वतीच होय." हें अद्भुत स्वप्न ऐकतांच सातवाहनानें मौन सोडलें व 'एकदां पुरुष मोठ्या प्रयत्नानें शिकूं लागल्यास किती दिवसांनीं पंडित होतो ?' असें गूढ अभिप्रायानें मला विचारिलें. 'शिवाय पांडित्य नसल्याकारणानें मला ही लक्ष्मी शोभत नाहीं. कारण काष्ठाला अलंकार घालणें जसें व्यर्थ तसेंच मूर्खाला वैभव मिळणें व्यर्थ आहे.' असेंही तो म्हणाला. तें ऐकून मी उत्तर दिलें " राजन्, व्याकरण सर्व विद्यांचें मुख अथवा द्वार आहे. तें शिकण्यास बारा वर्षें लागतात. पण मी सहा वर्षांत तें तुम्हांला शिकवीन" त्यावर शिववर्मा ईर्षेनें म्हणाला; "सुखांत वाढलेल्या राजाच्या हातून इतके दिवस क्लेश कसे सहन करवतील ! हे महाराज, मी तुम्हांला सहा महिन्यांत तें शिकवीन' हें त्याचें असंभाव्य भाषण ऐकून मला मोठा राग आला, व तूं जर या राजास सहा महिन्यांत व्याकरण शिकविलेस तर मी संस्कृत, प्राकृत व या देशांतील देशीभाषा अशा मनुष्य लोकच्या तिन्ही भाषा सोडीन.' असें त्यास म्हटलें. त्यावर शिववर्मा उलट म्हणाला—'मी जर राजाला सहा महिन्यांत व्याकरण शिकवूं शकलों नाहीं, तर बारा वर्षें तुझ्या पादुका आपल्या मस्तकावर वाहीन. इतकें भाषण झाल्यावर आम्हीं दोघेही आपापल्या घरीं गेलों. राजाही या दोघांच्या कलहांत आपलें कार्य सिद्ध होणार म्हणून आनंदित झाला.

घरीं गेल्यावर आपण केलेली प्रतिज्ञा अत्यंत दुस्तर आहे असें जाणून व्याकुळ झालेल्या त्या शिववर्म्यानें सर्व वृत्तांत आपल्या शहाण्या भार्येला सांगितला. तेव्हां दुःखित झालेली ती साध्वी म्हणाली "स्वामिन्, या संकट समयीं स्वामि कुमारावांचून दुसरी गति दिसत नाहीं" 'तेव्हां तूं म्हणतेस तें अगदीं खरें आहे' असें सांगून, त्याच रात्रीं चवथ्या प्रहरीं शिववर्मा उपाशीं स्वामी कार्तिकाकडे जावयास निघाला. हें वर्तमान मला हेरांच्या द्वारा समजलें. मीही तें राजास कळविलें. तेव्हां 'काय होईल कोण जाणे' असें म्हणून तोही चिंतेंत पडला. पण इतक्यांत सिंहगुप्त नामक एक राजपुत्र म्हणाला, "देव, आपण खिन्न झालां असें पाहून मला फार वाईट वाटलें व आपलें हित व्हावें या उद्देशानें मी या नगराच्या बाहेरील चंडिकेच्या मंदिरांत जाऊन देवीपुढें आपलें मस्तक कापून घेऊं लागलों; तों इतक्यांत 'राजपुत्रा, असें साहस करूं नकोस. राजाचे मनोरथ पूर्ण होतील' अशी आकाशवाणी झाली. तेव्हां मला असें वाटतें, कीं आपली इच्छा सफल होईल. असें सांगून व राजाची आज्ञा घेऊन त्यानें शिववर्म्याच्या मागोमाग दोन हेर पाठविले.

तिकडे शिववर्मा आपल्या घरांतून निघाल्यावर वायु भक्षण करीत, मौन धरून व आपला निश्चय दृढ ठेवून स्वामिकुमाराजवळ येऊन पोंचला. तेथें आपल्या विनाशी शरीराचीही अपेक्षा न करितां तपश्चरणानें त्यानें स्वामीस प्रसन्न करून घेतलें. त्या देवानेंही त्यास प्रसन्न मनानें अभीष्ट वर दिला. हा सर्व प्रकार प्रत्यक्ष पाहून शिववर्म्याच्या पूर्वीच परत आलेल्या हेरांनीं, राजाला–'शिववर्म्यास सिद्धि मिळाली'–असें सांगितलें. तेव्हां मेघदर्शन होतांच हंस व चातक यांस जसा क्रमानें विषाद व आनंद होतो, त्याप्रमाणें तें वर्तमान ऐकून मला व राजाला क्रमानें विषाद व हर्ष झाला, कांहीं वेळानें सिद्ध शिववर्माही परत आला, व चिंतन करतांच पुढें प्रकट झालेल्या सर्व विद्या त्यानें राजास अर्पण केल्या. त्याबरोबर सातवाहनास त्या सर्व प्राप्त झाल्या. दैवीसिद्धिच हातीं आल्यावर दुर्लभ काय असणार? असो; राजाला सर्व विद्यांची प्राप्ति झाली आहे असें ऐकून नगरांतील सर्व लोक संतुष्ट झाले. त्यांनीं महोत्सव केला. नगरभर पताका लाविल्या. तोरणें बांधलीं व राजाचा जयजयकार केला.

इकडे विद्याभारानें नम्र झालेल्या राजानें शिववर्म्यास गुरु समजून राजास योग्य असलेल्या रत्नांनीं त्याची पूजा केली, व नर्मदातीरावरील भरुकच्छ नामक प्रदेशाचें आधिपत्य त्यास दिलें. ज्यानें दूतांच्या द्वारा शिववर्म्याच्या सिद्धीची वार्ता आणविली होती, त्या सिंहगुप्तास संपत्तीच्या योगानें संतुष्ट करून राजानें त्यास आपल्या बरोबरीचा राजा केलें. विष्णुपुत्र-कन्या अर्थात् त्याची राणी विद्याप्राप्तीस कारण झाली, म्हणून त्यानें तिला स्वतः अभिषेक करून सर्व राण्यांत मुख्य राणी केलें.

---

## तरंग ७ वा.

### १. कलाप व्याकरणाच्या प्रादुर्भावाची कथा.

त्यानंतर मी मौन धरून राजाजवळ गेलों. तेथें कोणा एका ब्राह्मणानें स्वतः केलेला श्लोक म्हटला तो ऐकून राजानेंही संस्कृत वाणीनें त्याचा चांगला उच्चार केला, तें पाहून तेथील सर्व लोक आनंदित झाले. नंतर राजा नम्रपणें शिववर्म्यास म्हणाला, 'गुरुराज, आपल्यावर देवानें अनुग्रह कसा केला तें सांगा.' तेव्हां शिववर्मा म्हणालाः—

'राजन्, मी मौन धरून व कांहीं न खातां येथून निघालों व एक-सारखा चालत राहिलों, पण शेवटीं थोडासा मार्ग अवशिष्ट राहिला असतां तीव्र तपाच्या योगानें माझें शरीर व्याकुल झालें. मी अगदीं श्रांत झालों. त्यानें एक पाऊलही पुढें टाकवेना. मला घेरी आली व मूर्च्छित होऊन मी भूमीवर पडलों. तेव्हां ज्याच्या हातांत अद्भुत शक्ति आहे, असा एक पुरुष मजजवळ आला, व 'पुत्रा ऊठ, तुझा मनोरथ परिपूर्ण होईल.' असें मला स्पष्ट वाणीनें म्हणाला. त्याचें तें वचन ऐकून अमृतानें अभिषेक केल्याप्रमाणें मी तत्काल तृप्त, क्षुधा व तृषा यांनीं रहित व स्वस्थ झालों. आणि वर उठून राहिलेला मार्ग चालून गेलों. स्वामींच्या मंदिराजवळ पोंचतांच मोठ्या भक्तीनें स्नान करून मी गर्भागारांत शिरलों, आणि साक्षात् देवाचें दर्शन घेतलें. त्याबरोबर देवी सरस्वती माझ्या तोंडांत शिरली. नंतर त्या कुमारस्वामीनें

सहाही तोंडांनीं ‘ सिद्धो वर्णसमाम्नायः ’ असें सूत्र उच्चारिलें. पण तें ऐकतांच मानवांच्या स्वाभाविक चपलतेस अनुसरून मी तर्कानेंच पुढचें सूत्र म्हटलें. तें ऐकून तो शांत देव म्हणाला, “ तूं जर हें सूत्र स्वतः उच्चारलें नसतेंस तर हें माझें शास्त्र पाणिनीच्या व्याकरणाचा नाश करणारें झालें असतें; पण तूं गडबड करून या शास्त्राची मोठी हानि केली आहेस. असो; आतां हें शास्त्र अल्पतंत्ररूप असल्यामुळें कातन्त्र या नांवानें प्रसिद्ध होईल. तसेंच माझ्या वाहनाच्या नांवानें ( म्हणजे ‘ कालापम् ’ या नांवानें ) ही हें लोकांत प्रसिद्ध होईल. ” इतकें बोलून व नूतन सुलभ व्याकरण मला शिकवून त्या देवानें पुनः असें म्हटलें:—

## २. सातवाहनाच्या पूर्वजन्मीचें वृत्त.

तुमचा राजाही पूर्वजन्मीं कृष्ण म्हणून भारद्वाजमुनींचा शिष्य होता. तो महातपस्वी व ऋषि होता, पण एकदां एका सकाम ऋषिकन्येस पाहून तोही कामवश झाला. त्यामुळें मुनींनीं त्या दोघांनाही शाप दिला असतां तो मर्त्यलोकांत जन्म घेऊन राजा झाला, व ती ऋषिकन्याही मानुषी होऊन त्याची राणी झाली. तात्पर्य सातवाहन राजा ऋषीचा अवतार आहे, यास्तव तुला पहातांच तुझ्या इच्छेनें त्याला सर्व विद्या प्राप्त होतील. कारण जन्मांतरीं संपादन केलेल्या सिद्धि, महात्म्यांस सहज प्राप्त होत असतात.

महाराज, इतकें सांगितल्यावर तो देव गुप्त झाला. मी गर्भागारांतून बाहेर आलों, तेव्हां देवाची पूजा करून निर्वाह करणाऱ्या लोकांनीं मला देवाचा प्रसाद म्हणून तांदूळ दिले. पण काय चमत्कार सांगावा; राजन्, मी परत येतांना मार्गामध्यें प्रत्यहीं त्यांतील तांदळांचा भात शिजवून खात असे, तरी ते कमी झाले नाहींत. त्यांनीं जितके दिले होते तितकेच येथें येईतों ते राहिले.

असो; असा आपला तपोवृत्तांत सांगून शिववर्मा शांतपणें बसला असतां आनंदित झालेला राजा स्नान करण्याकरितां उठला.

## ३. गुणाढ्य व काणभूति यांच्या समागमाचा वृत्तांत.

त्यानंतर मौनाचा अंगीकार केल्यामुळें शब्दव्यवहार करण्यास असमर्थ झालेला असा, मी, राजाची इच्छा नव्हती तरी नुसत्या प्रणामानेंच

त्याचा निरोप घेऊन दोन शिष्यांसह त्या नगरांतून बाहेर पडलों, आणि तप करण्याचा निश्चय करून विंध्यवासिनीचें दर्शन घेण्याकरितां इकडे आलों. पण देवीनें स्वप्नांत आज्ञा करून मला प्रेरणा केल्यामुळें तुझें दर्शन घेण्याकरितां मीं या भयंकर विंध्यारण्यांत प्रवेश केला. पुढें एका भिल्लाच्यां सांगण्यावरून दैववशात् मला एका व्यापाऱ्याच्या समूहाची सोबत मिळाली. येथें येत असतांना मी पुष्कळ पिशाचांस पाहिलें व ते आपसांत बोलत असलेली त्यांची भाषा ऐकून मी ती शिकलों. त्यामुळें माझें मौन मला सोडतां आलें. येथें आल्यावर तूं उज्जयिनीस गेला आहेस असें मला कळलें. पण तूं पुनः येथेंच येशील या आशेनें मी येथेंच तुझी वाट पहात राहिलों. आतां तुझें दर्शन झालें. चवथ्या पिशाच भाषेनें मीं तुझें स्वागत केलें व मला आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें. माझा जन्मवृत्तांत हा असा आहे.

गुणाढ्यानें असा आपला वृत्तांत सांगितला असतां काणभूति त्यास म्हणाला; "तुझें आगमन मला गेल्या रात्रींच कळलें, माझा एक भूतिवर्मा म्हणून दिव्यदृष्टि राक्षस, मित्र आहे. तो उज्जयिनीच्या उद्यानांत रहात असतो. त्याला भेटावयास मी त्याच्या येथें गेलों व 'माझ्या शापाचा अंत केव्हां होणार' असें त्यास विचारिलें. तेव्हां तो म्हणाला, "मित्रा, दिवसा माझा ज्ञानप्रभाव कुंठित झालेला असतो. यास्तव आज रात्रीं तूं येथेंच रहा, म्हणजे तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगेन" तें ऐकून काल मी तेथेंच राहिलों. रात्र होतांच तेथील भूतें आनंदानें मोठा कोलाहल करूं लागलीं. तेव्हां मीं त्यांच्या आनंदाचें कारण विचारिलें असतां, 'पूर्वी ब्रह्मदेवाशीं बोलत असतांना शंकरानें जें सांगितलें तेंच तूं ऐक' असें म्हणून तो सांगूं लागला.

दिवसा सूर्याच्या तेजानें यक्ष, राक्षस व पिशाचें यांचा प्रभाव नष्ट होतो. रात्रीं त्यांचा उत्कर्ष होतो. जेथें देवांची पूजा होत नाहीं, व ब्राह्मणांस अविधीनें भोजन दिलें जातें, तेथें यांचा पराक्रम चालतो. जेथें मांस न खाणारे लोक व साध्वी स्त्रिया असतात, तेथें यांचें सामर्थ्य मुळींच चालत नाही. पवित्र, शूर व ज्ञानी यांस ते पीडा देत नाहींत.

असें बोलून तो पुनः म्हणाला; "मित्रा, तूं आतां परत जा. तुझ्या शापाच्या अंतास कारण होणारा गुणाढ्य तुझ्या येथें आला आहे." तें

ऐकतांच मी येथें आलों, व तुझें दर्शन घेतलें. प्रभो, मी आतां तुला पुष्पदंतानें सांगितलेली कथा सांगतों. पण त्यापूर्वी पुष्पदन्त व माल्यवान् अशीं नांवें तुम्हां दोघांस कां प्राप्त झालीं, तें मला ऐकावयाचें आहे.

## ४. पुष्पदंत हें नांव प्राप्त होण्याचें कारण.

काणभूतीचा हा प्रश्न ऐकून गुणाढ्य म्हणाला, " गंगेच्या तीरावर बहुसुवर्णक म्हणून एक ग्राम आहे. तेथें गोविंददत्त या नांवाचा एक बहुश्रुत ब्राह्मण रहात असे. त्याची अग्निदत्ता म्हणून पतिव्रता भार्या होती. त्यांना योग्य समयीं क्रमानें पांच पुत्र झाले; पण ते सर्व मूर्ख, सुस्वरूप व अभिमानी होते. एकदां गोविंददत्ताच्या येथें अग्नीसारखा तेजस्वी वैश्वानराख्य ब्राह्मण अतिथिरूपानें आला. त्यावेळीं गोविंददत्त कांहीं कामाकरितां बाहेर गेला होता. म्हणून त्या अतिथीनें घरांत येऊन त्याच्या पुत्रास नमस्कार केला; पण त्यास उलट नमस्कार करावयाचा सोडून ते मूर्ख खदखदां हंसूं लागले. तें पाहून तो ब्राह्मण रागानें परत निघाला; पण इतक्यांत त्या मूर्ख पोरांचा बाप आला, व त्यानें हात जोडून प्रार्थनापूर्वक परतण्याचें कारण विचारिलें. तेव्हां तो बोलला " तुझे पुत्र पतित आहेत, व त्यांच्या संपर्कानें तूंही पतित झाला आहेस. यास्तव मी तुझ्या घरचें अन्न खाणार नाहीं. तें खाल्यास मला प्रायश्चित्त घ्यावें लागेल. " हें ऐकून गोविंददत्तानें व त्याच्या भार्येनें शपथ वाहून सांगितलें कीं, आम्ही त्या कुपुत्रांस स्पर्शही करीत नाहीं. तेव्हां वैश्वानरानें मोठ्या कष्टानें त्यांचें आतिथ्य स्वीकारिलें.

हा सर्व प्रकार पाहून त्या पांचांतील देवदत्त म्हणून जो एक पुत्र होता, त्याला पश्चात्ताप झाला. आई, बाप व अतिथि यांनीं दूषित ठरविलेलें हें माझें जीवित व्यर्थ आहे, असें त्यास वाटलें, आणि विरक्त होऊन तो तपश्चर्या करण्याकरितां बदरिकाश्रमास गेला. तेथें तो प्रथम कांहीं दिवस पर्णाशन करून व नंतर धूम्रपान करून तपाच्या योगानें शंकराची आराधना करीत दीर्घकाल राहिला. पुष्कळ दिवसांनीं त्याच्या स्तोत्राच्या योगानें व तपानें अतिशय प्रसन्न झालेल्या शंकरानें त्यास दर्शन दिलें. तेव्हां 'मी तुझा अनुचर होईन, असा वर मला दे' अशी त्यानें प्रार्थना केली. तेव्हां प्रसन्न झालेल्या शंकरानें ' अगोदर विद्या

संपादन कर व भूलोकीं भोगांचा अनुभव घे, नंतर तुझ्या इच्छेप्रमाणें होईल,' असा वर दिला. त्यानंतर तो विद्येच्या इच्छेनें पाटलिपुत्र नगरास गेला व वेदकुंभ नामक उपाध्यायाची सेवा करूं लागला. पण तरुण गुरुपत्नीचें मन त्याच्यावर गेलें. स्त्रियांच्या स्वाभाविक चांचल्यास अनुसरून तिनें आपला मनोरथ त्याला कळविला. त्यामुळें त्या सात्त्विक शिष्यास फार दुःख झालें व तिच्या त्या निंद्य संकेतास अनुमोदन न देतां तो त्या सुखकर स्थानाचाही त्याग करून प्रतिष्ठानास गेला. तेथें त्यानें मंत्रस्वामी नामक वृद्ध उपाध्यायास त्याची भार्याही वृद्ध आहे असें पाहून, आपला विद्यागुरु केलें, व त्याच्यापासून सर्व विद्या उत्तम प्रकारें संपादन केल्या. एकदां त्या विद्वान् व सुस्वरूप देवदत्तास सुशर्मा राजाच्या श्रीनामक कन्येनें पाहिलें. त्याचीही वर खिडकींत असलेल्या राजकन्येकडे दृष्टि गेली. एकमेकांस पहातांच प्रेमरज्जूनें बांधल्याप्रमाणें तीं दोघें तेथून हालण्यास समर्थ झालीं नाहींत.

राजकन्येनें आपल्या अंगुलीनें जवळ येण्याविषयीं त्यास खूण केली. त्याबरोबर तो खिडकीखालीं गेला. तेव्हां तिनें दातांत फूल धरून त्याच्याकडे फेकलें, पण तिनें केलेली ती सांकेतिक खूण त्याला कळली नाहीं, व काय करावें हें न कळल्या कारणानें बावरल्यासारखा होऊन तो गुरूच्या घरीं परत आला, आणि कोणाला कांहीं न सांगतां भूमीवर लोळूं लागला. पण त्याच्या चाणाक्ष उपाध्यायानें हा सर्व कामदेवाचा प्रभाव आहे, असें जाणून त्याला स्पष्ट विचारिलें, व देवदत्तानेंही झालेला वृत्तान्त त्यास सांगितला. तो ऐकून त्या उपाध्यायानें शहाणपणानें व युक्तीनें त्या खुणेचा अर्थ ओळखला आणि बाळा, दंतानें पुष्प टाकणाऱ्या राजकन्येनें तुला पुष्पदंत नामक देवमंदिरांत येऊन आपली वाट पहात रहाण्याविषयीं सुचविलें आहे, यास्तव तूं आतां तेथें जाऊन रहा. गुरूची ही आज्ञा ऐकून राजकन्येच्या खुणेचा अर्थ समजल्यामुळें आनंदित झालेला तो तरुण देवमंदिरांत गुप्तपणें जाऊन राहिला. कांहीं वेळानें ती राजकन्या एकटीच देवदर्शनार्थ आली. देवालयांत शिरत असतांनाच द्वाराच्या मागें असलेल्या त्या आपल्या प्रियकरास तिनें पाहिलें, व त्यानेंही पुढें येऊन तिला आलिंगन दिलें. पण मी केलेली खूण तुला कशी समजली, असें तिनें विचारलें असतां त्या भोळ्या

ब्राह्मणानें 'मला तिचा भावार्थ कळला नाहीं; पण माझ्या गुरूनें तो ताडला, व त्याच्या सांगण्यावरून मी येथें आलों.' असें खरें सांगितलें. तें ऐकून 'मला सोड, तूं चतुर नाहींस, मी मूर्खाची गृहिणी होऊं इच्छित नाहीं.' असें बोलून राजकन्या क्रोधानें त्यास तेथेंच सोडून स्वगृहीं गेली.

तेव्हां तो देवदत्त, एकांतांत एकदां दिसून लागलीच अदृश्य झालेल्या त्या प्रियेचें स्मरण करून वियोगाग्नीनें अतिशय दुःखी झाला. ती त्याची कष्टकर अवस्था पाहून पूर्वीच प्रसन्न झालेल्या शंभूनें त्याचें इष्ट संपादन करून देण्याकरितां आपल्या पंचशिख नामक गणास आज्ञा केली. त्यामुळें तो पंचशिख देवदत्ताजवळ आला. त्यानें त्याचें समाधान केलें. त्याला स्त्रीवेषधारी केलें व आपण स्वतः ब्राह्मणरूपी बनला. आणि सुशर्माराजाकडे म्हणजे त्या राजकन्येच्या पित्याकडे स्त्रीरूपी देवदत्तासह जाऊन नेत्रांत पाणी आणून म्हणाला, " राजन्, माझा एकुलता एक पुत्र कोठें नाहींसा झाला आहे. त्याला हुडकण्याकरितां मी जातों; पण या तरुण सुकुमार स्नुषेला बरोबर नेणें मला प्रशस्त वाटत नाहीं. तूं आबालवृद्धांचा रक्षक आहेस, यास्तव ही माझी ठेव मी तुझ्या येथें ठेवून जातों. माझा प्रियपुत्र सांपडला म्हणजे मी तिला घेऊन जाईन." हे त्याचें भाषण ऐकून शापास भिणाऱ्या राजानें त्या ब्राह्मणाचें म्हणणें मान्य केलें, व आपल्या कन्येच्या अंतःपुरांत त्या स्त्रीवेषधारी तरुणास ठेविलें.

पंचशिख गेल्यावर थोड्याच दिवसांत तो स्त्रीवेषधारी तरुण श्रीच्या परम विश्वासास पात्र झाला. एका रात्रीं पतीविषयीं उत्सुक झालेल्या राजकन्येला त्यानें आपलें खरें स्वरूप दाखवून गांधर्वविधीनें तिचें पाणिग्रहण केलें. पुढें सृष्टिनियमाप्रमाणें ती गर्भवती झाली. तेव्हां देवदत्तानें त्या उत्तम गणाचें स्मरण केलें. त्याबरोबर तेथें येऊन त्या शक्तिमानानें देवदत्तास आकाशमार्गानें रात्रीं कोणास न कळतां तेथून नेलें. दुसऱ्या दिवशी प्रातःकाळीं पूर्वीप्रमाणेंच वृद्ध ब्राह्मणाचा वेष घेऊन तो पंचशिख स्त्रीवेष सोडून पुरुषरूप झालेल्य देवदत्तास बरोबर घेऊन राजाकडे आला व मोठ्या हर्षानें म्हणाला, " राजा, हा माझा पुत्र सांपडला. आतां माझी स्नुषा मला परत दे." तें ऐकतांच राजानें तिला आणण्याकरितां प्रतीहारीस धाडलें. पण कांहीं वेळानें तिनें परत येऊन रात्रीपासून ती स्त्री कोठें नाहींशी झाली आहे, असें राजास कळविलें. तें

आश्चर्यकारक वर्तमान ऐकून ब्राह्मणाच्या शापास भ्यालेला तो राजा मंत्र्यांस म्हणाला, "हा ब्राह्मण नव्हे, कोणी तरी देव आहे. माझें सत्त्व पहाण्याकरितां तो येथें आला असावा, असें मला वाटतें. कारण देव नेहमीं असले उद्योग करीत असतात. पूर्वी शिबि म्हणून एक तपस्वी, दयाळु, अतिधीर, दाता, सर्वांस अभय देणारा व मोठा सात्त्विक राजा होता. एकदां त्याचें सत्त्व पहाण्याकरितां श्येनरूपी इंद्र, मायेनें कपोत झालेल्या धर्माचा पाठलाग करीत त्याच्याजवळ आला. कपोतानें प्राण-नाशाच्या भयानें शिबीच्या मांडीचा आश्रय केला. तें पाहून श्येन मनुष्य-वाणीनें राजास म्हणाला, " महाराज, हा कपोत माझें भक्ष्य आहे. मला फार क्षुधा लागली आहे, यास्तव त्याला सत्वर सोड. नाहींपेक्षां मी मरेन व तुला अधर्म लागेल." तें ऐकून शिबि म्हणाला, " श्येना, हा कपोत प्राणरक्षणाच्या आशेनें मला शरण आला आहे, यास्तव मी त्याचा त्याग करणार नाहीं. तुला मान्य असेल तर सांगशील त्याचें दुसरें मांस मी तुला देईन." त्यावर श्येन म्हणतो-बरें तर, याच्या भारंभार तूं आपलें मांस दे. राजानें त्याचें म्हणणें आनंदानें मान्य केलें; व तराजूच्या एका पारड्यांत कपोतास बसवून, तो दुसऱ्या परड्यांत आपल्या अंगाचें मांस तोडतोडून घालूं लागला; पण कपोताच्या भारंभार मांस भरेना. तेव्हां शेवटीं त्यानें आपलें सर्व शरीरच तागडींत घातलें. त्याबरोबर वाहवा, वाहवा, शाबास शाबास, अशी आकाशवाणी झाली. इंद्र व धर्म यांनीं क्रमानें श्येनाच व कपोताचें रूप सोडून, शिबीचें शरीर पहिल्याप्रमाणें अक्षत (धडधाकड) केलें. त्याची स्तुति केली. त्यास सम्राट् केलें. त्यास इष्ट वर दिला. व शेवटीं ते दोघे गुप्त झाले. अशीं आणखीं अनेक उदाहरणें आहेत. यास्तव मला वाटतें कीं हा सामान्य मानव नव्हे.

प्रधानांस असें सांगून तो भयभीत झालेला राजा त्या श्रेष्ठगणास म्हणाला, " ब्रह्मन् मला अभय दे. आम्हीं अहर्निश रक्षण करीत असतां-नाहीं, तुझी स्नुषा कालच रात्रीं कोठें नाहींशी झाली. आतां मी काय करूं तें सांग." तें ऐकून व्याकुळ झालेला तो विप्र धैर्य करून दयेनें म्हणाला, राजा, आतां मी तुला काय सांगूं! माझी सर्वस्वी हानि झाली आहे, पण तूंही फार सज्जन आहेस, म्हणून माझ्यानें अधिक कांहीं बोलवत नाहीं. आतां आपली कन्या या माझ्या पुत्राला दे." तें ऐकून

राजानें तसें केलें; व जामातास आपल्याच येथें ठेवून घेतलें. आपल्या पुत्राची सर्व व्यवस्था नीट लागली आहे, असें पाहून तो वृद्ध ब्राह्मण, तप करण्याकरितां म्हणून तेथून निघून गेला. इकडे देवदत्तही तीच आपली प्रिया प्राप्त झाल्यामुळें व राजाला पुत्र नसल्या कारणानें त्याच्या ऐश्वर्याचा उपभोग घेत सुखानें काळ घालवूं लागला. बरेच दिवस गेल्यावर सुशर्माराजानें देवदत्ताच्या पुत्रास म्हणजे आपल्या दौहित्रास राज्यावर बसवून स्वतः तपोवनांत गमन केलें. कांहीं दिवसांनीं देवदत्तही पुत्राचें ऐश्वर्य पाहून कृतार्थ होत्साता त्याच पत्नीसह वनांत गेला. तेथें पुनः शंकराची आराधना करून व मर्त्यदेह सोडून शंभूच्या प्रसादानें त्याचा गण झाला. प्रियेनें दांतानें फेंकलेल्या पुष्पाची खूण त्याला कळली नाहीं, म्हणून गणांमध्यें पुष्पदन्त या नांवानें त्याची ख्याति झाली. त्याची श्री नांवाची भार्या भगवती देवीची जया म्हणून चेटी झाली. सारांश, या कारणास्तव त्याला पुष्पदन्त हें नांव प्राप्त झालें. आतां माझ्या नांवाचें कारण ऐक.

## ५. माल्यवान्–संज्ञेचें निमित्त.

काणभूते, गोविंददत्ताला सोमदत्त म्हणून दुसरा पुत्र होता. तोच मी, देवदत्ताप्रमाणेंच पित्याच्या क्रोधानें विरक्त झालों. व घर सोडून तप करण्याकरितां हिमालयावर गेलों. पुष्कळ माल्यें ( पुष्पें ) वाहून शंकरास मीं संतुष्ट केलें. पुढें प्रसन्न झालेल्या शंकरापाशीं मीं त्याचें गणत्व मागितलें; कारण मी इतर सर्व सुखांविषयीं निस्पृह होतों. माझी सर्व वरप्रार्थना ऐकून उमापति म्हणाला, " ज्याच्या अर्थी तूं या अगदीं दुर्गम वनांतून स्वतः आणलेल्या माल्यांनीं माझी दीर्घकाल पूजा केली आहेस, त्या अर्थी तूं माझा माल्यवान् या नांवाचा उत्तम गण होशील. " हें वरवचन ऐकतांच मी आपला मर्त्य-देह सोडून त्याचा गण झालों. मला माल्यवान् असें नांव प्राप्त होण्याचें कारण हें असें आहे. सांप्रतकालीं शैलकन्येच्या शापानें मी पुनः मनुष्यभावास प्राप्त झालों आहें. असो; आतां तूं मला शंकरानें सांगितलेली कथा सांग. म्हणजे आम्हीं दोघेही शापापासून मुक्त होऊं.

# तरंग ८ वा.

## १. गुणाढ्यानें पैशाची भाषेंत लिहिलेल्या सात कथा.

गुणाढ्याचें तें भाषण ऐकून काणभूतीनें सात दिव्य कथांनीं युक्त असलेली उपन्यासपरंपरा आपल्या भाषेनें त्यास सांगितली. गुणाढयानें सात वर्षांत पैशाच भाषेनें सात लक्ष श्लोक करून त्या सातही कथांचें निबन्धन केलें; आणि विद्याधरांनीं तिला हिरावून नेऊं नये म्हणून त्या महा अरण्यांत शाई नसल्यामुळें आपल्या रक्तानें ते सात लक्ष श्लोक लिहून काढले. नंतर गुणाढय वाचूं लागला असतां कथा ऐकण्याकरितां विद्याधर, सिद्ध, इत्यादि आकाशचरांची आकाशांत मोठी गर्दी झाली. गुणाढयानें लिहिलेली ती कथा पाहून काणभूति शापापासून मुक्त होऊन आपल्या योग्य गतीस गेला. त्याच्या सहवासास रहाणारे जे पिशाच तेथें होते तेही ती कथा ऐकून तत्क्षणी स्वर्गलोकीं गेले. नंतर 'उःशाप देते-वेळीं देवीनें सांगितल्याप्रमाणें मला आतां ही कथा या लोकांमध्यें प्रतिष्ठित केली पाहिजे, पण हें असाध्य कार्य कसें घडून येणार?' या विवंचनेंत गुणाढय कवि पडला.

इतक्यांत त्या उपाध्यायाचे गुणदेव व नंदिदेव नामक शिष्य त्यास म्हणाले, "गुरुवर्य, हें काव्य अर्पण करण्यास एक सातवाहन राजाच योग्य आहे. वायु जसा पुष्पांच्या सुगंधास धारण करितो, त्याप्रमाणें तो रसिक, या काव्याचें धारण करील" तें त्यांचें म्हणणें ऐकून तो 'ठीक आहे' असें म्हणाला; व त्या दोघां शिष्यांना बरोबर घेऊन प्रतिष्ठानास गेला. तेथें पोंचल्यावर गुणाढय देवीकृति उद्यानांत राहिला; व त्याचे ते दोघे शिष्य गुरूच्या आज्ञेनें पुस्तक घेऊन राजाकडे गेले. सातवाहना-पाशीं गेल्यावर 'ही गुणाढय कवीची कृति आहे' असें म्हणून शिष्यांनीं तो ग्रंथ त्यास दाखविला. पण त्या विद्यामदानें मत्त झालेल्या राजानें त्या काव्याची पैशाची भाषा आहे व ते दोघे शिष्यही पिशाचाकृति आहेत, असें पाहून दोषदृष्टीनें म्हणाला, "या काव्याची ग्रंथसंख्या सात लक्ष आहे खरी; पण त्याची ही पैशाची भाषा अगदीं नीरस आहे. शिवाय हें काव्य रक्तानें लिहिलें आहे. यास्तव या पैशाची कथेस धिक्कार असो.

## २. सहा कथांचा दाह व बृहत्कथेचा संग्रह.

राजानें केलेला हा अपूर्व सत्कार पाहून शिष्य चकित व दुःखित झाले. पुस्तक घेऊन गुणाढ्याकडे परत आल्यावर झालेला वृत्तांत त्यांनीं गुरूस कळविला. तो ऐकून धीर गुणाढ्यही अत्यंत खिन्न झाला. कारण उघडच आहे कीं, तत्त्वज्ञानें अनादर केल्यास विद्वानाला दुःख झाल्यावांचून कसें *राहील ? असो; त्यानंतर तो शिष्यांसह निघून जवळच्याच एका टेंकडीवर गेला. तो प्रदेश रम्य व निर्जन होता. तेथें एक त्यानें कुंड पेटविलें व त्या ग्रंथाचें एकेक पत्र, तेथील पशु–पक्ष्यांस वाचून दाखवून दुःखानें व्याकुळ झालेल्या शिष्यांसमक्ष, त्यांत टाकिलें. शेवटीं त्या दोघां शिष्यांनीं फारच आग्रह केल्यामुळें त्या दयाळु गुणाढ्यानें नरवाहनदत्ताचें चरित्र मात्र जाळलें नाहीं. त्याची ग्रंथसंख्या एक लक्ष होती. पण तो ती दिव्यकथा वाचून दाखवीत असतां सर्व वनपशू, आहारादि सोडून व डोळ्यांत पाणी आणून, ती ऐकत त्याच्या सभोंवार उभे राहिले.

इकडे हा असा प्रकार चालला असतां तिकडे राजा सातवाहन अस्वस्थ झाला. तेव्हां वैद्यांनीं त्याच्या अस्वास्थ्याचें निदान करून ‘ शुष्क मांस खाल्यामुळे आपली प्रकृति बिघडली आहे ’ असे त्यास सांगितलें. तेव्हां राजाने स्वयंपाक्यांस शुष्क मांस-भोजन देण्याचें कारण विचारिलें असता–‘ राजन्, त्यांत आमचा कांही अपराध नाहीं. मांस आणण्याकरितां नेमलेले व्याध आम्हांला अलीकडे अगदीं शुष्क मांस आणून देतात ’–असें त्यांनीं सांगितलें. तें ऐकून सातवाहनानें अरण्यांत शिकारीस जाणाऱ्या व्याधांस बोलावून आणून शुष्क मांस आणण्याचे कारण विचारिलें. तेव्हां त्यांनीं पुढील वृत्तांत सांगितला–राजन्, या जवळच्या पर्वतावर एक द्विज होमकुंड पेटवून बसला आहे. तो कोणत्याशा एका पुस्तकाचें एकेक पान वाचून तें त्या कुंडांत टाकीत असतो. तें त्याचें वाचन ऐकण्याकरितां त्या अरण्यांतील सर्व पशू आहारादि सोडून त्याच्या सभोंवार जमून उभे राहिले आहेत. त्यामुळें त्यांचें मांस शुष्क झालें असावें, असें वाटतें.

* तत्त्वज्ञेन कृतावज्ञः को नामान्तर्न तप्यते

हा चमत्कार ऐकून आश्चर्यचकित झालेला राजा त्या लुब्धकांसच बरोबर घेऊन पर्वतावर गेला. तेथें खरोखरच मोठ्या कष्टानें आपली कृति जाळीत असलेला जटाधारी गुणाढ्य राजाच्या दृष्टीस पडला. वनवासांतील अतर्क्य दुःखामुळें त्याच्या आकारांत जरी पुष्कळ फरक पडला होता, तरी ज्यांच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा वहात आहेत अशा पशूंच्या मंडळामध्यें स्थित असलेल्या गुणाढ्याला राजानें ओळखलें; प्रणाम केला, व सर्व वृत्तांत विचारिला. तेव्हां त्यानेंही राजास, पुष्पदन्तास व माल्यवानास जिच्याकरितां शाप झाला त्या कथेचा सर्व वृत्तांत पैशाची भाषेनें सांगितला. तेव्हां हा गणाचा अवतार आहे, असें जाणून राजानें त्याच्या चरणांवर मस्तक ठेविलें, व शंकराच्या तोंडून ऐकलेली ती दिव्य कथा सांगण्याविषयीं मोठ्या नम्रपणें प्रार्थना केली. पण त्यावर गुणाढ्य म्हणाला, " राजा, तूं मोठा विद्वान् व गुणग्राही आहेस, असें जाणून मी सात वर्षें कष्ट करून लिहिलेल्या सात कथा तुझ्याकडे पाठविल्या होत्या; पण दैववशात् तूं त्यांचा स्वीकार केला नाहींस, त्यामुळें माझें मन अतिशय खिन्न झालें, व येथें येऊन या होमकुंडांत आजवर एकेक लक्ष ग्रंथाची एकेक अशा सहा कथा मी जाळिल्या. आतां ही एकलक्षग्रंथात्मक एक कथा राहिली आहे. ही एवढी तूं घे. हे माझे शिष्य संस्कृत भाषेमध्यें तुला याचा अर्थ सांगतील."

इतकें सांगून, राजाचा निरोप घेऊन व योगानें देहत्याग करून तत्काल शापापासून मुक्त झालेला तो आपल्या गतीस गेला. नंतर गुणाढ्यानें दिलेली ती नरवाहन दत्त-चरितरूप बृहत्कथानामक कथा घेऊन राजा सातवाहन आपल्या नगरास गेला. स्वगृहीं पोंचल्यावर गुणदेव व नंदिदेव या गुणाढ्य शिष्यांची-वस्त्रें, वाहनें, व पुष्कळ धन इत्यादिकांच्या योगानें—पूजा करून, राजानें त्या कथेच्या अवतरणार्थ कथापीठ केलें. ही कथा विचित्र रसानें भरलेली आहे. ही ऐकत असतांना देवांच्या कथेचाही विसर पडतो. हिच्यामध्यें असा अपूर्व गुण असल्यामुळें हिचा त्रिभुवनांत प्रसार झाला आहे, व ती सर्वांस एकसारखीच आनंदित करिते.

**कथापीठ नामक प्रथम लम्बक समाप्त.**

# २. कथामुखलंबक.

## तरंग १ ला.

कैलास पर्वतावर भगवान् शंकराच्या तोंडून पुष्पदन्तानें ऐकलेली, भूलोकीं शापामुळें वररुचि झालेल्या त्याच्या तोंडून काणभूतीस प्राप्त झालेली, काणभूतीपासून गुणाढयास मिळालेली व गुणाढयापासून सातवाहनानें प्रार्थना करून मागून घेतलेली ही दिव्य व अद्भुत कथा ऐका.

### १. सहस्रानीकाची कथा.

वत्स म्हणून एक देश आहे. विधात्यानें स्वर्गाचा दर्प शमविण्याकरितां जणुंकाय तो त्याचा प्रतिस्पर्धीच निर्माण केला होता. त्यामध्यें लक्ष्मीचें जणुंकाय विलासभुवनच, अशी कौशाम्बी म्हणून एक नगरी होती. त्यांत शतानीक या नांवाचा पांडवांच्या वंशांत झालेला परीक्षित्-राजाचा नातु व जनमेजयाचा पुत्र, राजा होता. त्याला दोन भार्या होत्या. एक पृथ्वी व दुसरी विष्णुमती. त्यांतील पहिली अनेक रत्नांत प्रसवली; पण दुसरीला एकही पुत्र झाला नाहीं. एकदां वनांत मृगया करीत भटकत असलेल्या राजाचा शांडिल्य मुनीशीं परिचय झाला. राजानें पुष्कळ प्रार्थना केल्यामुळें तो मुनि कौशाम्बीस आला व त्यानें पवित्र केलेला चरु, राणीकडून प्राशन करविला. त्यामुळें त्यास सहस्रानीक म्हणन पुत्र झाला. कांहीं दिवसांनीं शतानीकानें त्यास युवराज करून आपल्यावरील भूभार कमी केला, आणि केवल सुखसंभोगानें आपला काल घालविण्यास आरंभ केला.

पुढें स्वर्गांत देव व राक्षस यांची लढाई जुंपली. तेव्हां इंद्रानें आपल्याला साहाय्य करण्याकरितां मातलि-सारथीस पाठवून त्यास बोलाविलें. तेव्हां युगंधर नामक श्रेष्ठ मंत्री व सुप्रतीक नामक सेनापति यांच्या हातीं पुत्र व राज्य समर्पण करून, शतानीक मातलीबरोबर असुरांस मारण्याकरितां इंद्राकडे गेला. इंद्राच्या समक्ष यमदंष्ट्रादिक पुष्कळ असुरांस मारून तो स्वतःही त्या संग्रामांत मरण पावला. त्यानंतर मातलीनें

परत आणलेल्या त्याच्या मृतदेहाबरोबर विष्णुमतीनें सहगमन केलें. त्यामुळें तिच्या सहस्रानीकास सर्व राज्यलक्ष्मी प्राप्त झाली. तो आपल्या पैत्र्य सिंहासनावर आरूढ झाला असतां सर्व राजे नम्र झाले. इतक्यांत देवांचा विजय होऊन स्वर्गांतील युद्ध संपलें. तेव्हां विजयोत्सवाचे वेळीं आपल्याकरितां रणांत मेलेल्या मित्राच्या त्या पुत्रास मातलि-सारथीच्या द्वाराच सुरलोकीं आणविलें. तेथें नंदनवनांत कामिनींसह क्रीडा करणाऱ्या देवांस पाहून अनुरूप कांतेची इच्छा करणारा तो राजपुत्र दुःखी झाला. तें जाणून इंद्र त्याचें आश्वासन करीत म्हणाला "राजन्, तूं दुःखी होऊं नकोस. भूलोकीं तुझी भार्या उत्पन्न झाली आहे. थोड्याच दिवसांत ती तुला मिळेल. त्याविषयींची पूर्व कथा अशी आहे कीं, पूर्वी मी एकदां पितामहाचें दर्शन घेण्याकरितां गेलों होतों. त्याच वेळीं तेथें विधूम म्हणून कोणीएक वसु आला. आम्ही तेथें असतांना अलंबुषा म्हणून एक देवपत्नी त्या महात्म्याचें दर्शन घेण्याकरितां आली; पण वाऱ्यानें तिचा पदर उडाला, तेव्हां तिला तशा अवस्थेंत पाहून ब्रह्मसभेंत बसलेला तो वसु दुर्दैवानें कामवश झाला. ती अप्सराही त्याच वेळीं त्याचें रूप पाहून मोहित झाली. तें पाहून कमलयोनि माझ्या तोंडाकडे पाहूं लागली. त्याबरोबर मी त्यांचा अभिप्राय ओळखून 'या स्थानीही उन्मत्त होणारीं तुम्हीं दोघेंजणें मर्त्य लोकास जा, व पति-पत्नी व्हा' असा क्रोधानें शाप दिला. अशी पूर्व कथा सांगून इंद्र म्हणाला; 'राजा, तो वसुच तूं शशिकुलभूषण व शतानीकाचा पुत्र झाला आहेस. ती अप्सराही अयोध्येंत कृतवर्म–राजाची मृगावती कन्या झाली आहे. ती तुझी भार्या होईल'

इंद्राच्या या वचनानें त्याचें समाधान झालें. नंतर इंद्राचा त्यानें व त्याचा इंद्रानें असा परस्पर सत्कार करून, देवराजाच्या आज्ञेनें तो मातलीनें चालविलेल्या रथांतून आपल्या नगरीस जाऊं लागला. मार्गांत तिलोत्तमा नामक देवपत्नी त्यास प्रेमानें–'राजन्, जरा थांब, मी काय म्हणतें तें ऐक,'–असें म्हणाली. पण राजाच्या मनांत मृगावतीविषयींच विचार चालले होते, त्यामुळें त्यानें ऐकलें नाहीं. तें पाहून त्या अप्सरेला लज्जा वाटली व क्रोधानें तिने 'भूपाला, जिच्या ध्यानांत निमग्न झाल्यामुळें तूं माझें वचन ऐकत नाहींस तिच्याशीं तुझा चवदा वर्षें

वियोग होईल'–असा शाप दिला. तो मातलीनें ऐकिला, पण सहस्रानीक मृगावतीचेंच मोठ्या उत्सुकतेनें चिंतन करीत आपल्या राजधानीस पोंचला.

स्वराज्यांत आल्यावर मृगावतीविषयीं इंद्रानें सांगितलेलें वर्तमान त्यानें युगंधरादिकांस सांगितलें, व कालक्षेप असह्य झाल्यामुळें त्यानें याचना करण्याकरितां आपला दूत तिच्या पित्याकडे पाठविला.

## २. मृगावतीशीं विवाह् व वियोग.

दूतमुखानें सर्व वृत्तांत ऐकून आनंदित झालेल्या कृतवर्म्यानें देवी कलावतीस तो सांगितला. तीही राजास म्हणाली, "सहस्रानीकालाच कन्या द्यावी. कारण काल पहांटे स्वप्नांत एक ब्राह्मण मजकडे आला व त्यानें मला हीच गोष्ट सांगितली." तें ऐकून तर राजाच्या आनंदास पार नाहींसा झाला. त्यानें त्या दूतास मृगावतीचें नृत्यगीतादि कौशल्य व अप्रतिम रूप दाखविलें. त्यानंतर सहस्रानीकास आणवून त्याचें यथा-विधि पूजन करून, त्याला चंद्रकलेप्रमाणें नेत्रांस अल्हाद देणारी व सर्व कलांमध्यें निपुण असलेली मृगावती दिली. एकमेकांच्या गुणांवर लुब्ध झालेल्या त्या दोघांचा अति रमणीय समागम झाला. इतक्यांत त्याच्या युगंधर, सुप्रतीक व नर्मसुहृत् या तीन मंत्र्यांस क्रमानें यौगंधरायण, रुमण्वान् व वसंतक असे तीन पुत्र झाले. कांहीं दिवसांनीं मृगावती राणीही गर्भ-वती झाली. तिचें मुखपांडुरवर्ण झालें व तें एक गर्भचिन्ह असल्यामुळें तें पाहून राजाला मोटा आनंद झाला. गर्भिणीचे दोहद (डोहाळे) पूर्ण करावे, असें शास्त्रांत विधान असल्यामुळें राजानें तिची काय इच्छा आहे, असें ती स्वत: सांगण्यास लाजत असल्याकारणानें, तिच्या सख्यांस विचारलें. तेंव्हां तिनें रक्तानें भरलेल्या विहिरींत स्नान करण्याची इच्छा दर्शविली; पण राजा मोठा धार्मिक होता, त्यामुळें प्राण्यांची व्यर्थ हिंसा करून त्यांच्या रक्तानें विहिर भरावयाचें सोडून, त्यानें लाल रंग घालून एका विहिरीचें जल रक्तासारखें लाल केलें त्यांत स्नान करीत असतां वापींतील रक्तवर्ण जलानें तिचें अंग लाल झालें आहे, अशा त्या राणीला गरुडाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या एका पक्ष्यानें हें मांसच आहे असें जाणून उचलून नेलें. आपल्या प्रियतमेला त्या दुष्ट पक्ष्यानें कोठल्या कोंठें नेलें आहे, असें पाहून राजाचें चित्त व्याकुल झालें. तो मूर्छित होऊन भूमीवर पडला; पण कांहीं वेळानें अनुचरांच्या प्रयत्नानें सावध

झाला. इतक्यांत त्याच्याकडे मातलि आला. त्याला दिव्यदृष्टीनें राजाची ही अवस्था कळली होती. तिलोत्तमेच्या शापामुळें हा असा प्रकार घडला आहे, असें सांगून व राजाचें सांत्वन करून देवसारथि देवलोकीं गेला. पण तो राजा, 'प्रिये कोठें आहेस, त्या पापी तिलोत्तमेचे मनोरथ पूर्ण झाले, आतां मी आपलें जीवित कसें राखूं?' इत्यादि अनेक विलाप करीत शोकवश झाला. इतक्यांत शापाचा वृत्तांत मंत्र्यांस कळला. त्यांनांही राजाची पुष्कळ समजूत घातली. तेव्हां पुनरपि तिचा समागम होईल या आशेनें त्यानें कसें बसें आपलें जीवित धारण केलें.

## ३. वियुक्त मृगावतीचा वृत्तान्त.

इकडे त्या गरुडवंशज पक्ष्यानें मृगावती राणी जिवंत आहे, असें पाहून तिला उदयपर्वतावर टाकिलें. कांहीं वेळानें सावध झालेली ती, मी या वेळीं एका दुर्गम पर्वतावर आहें, माझें रक्षण करणारा येथें कोणी नाहीं, असें पाहून शोकग्रस्त व भयभीत झाली. इतक्यांत त्या रडणाऱ्या, एकाच वस्त्रानें युक्त असलेल्या अशा त्या राणीस एक अजगर गिळूं लागला; पण काय चमत्कार सांगावा, त्या दीनवाणीनें आक्रोश करणाऱ्या पण पुढें मोठ्या भाग्यास चढणाऱ्या राणीला त्या अजगराच्या तोंडांतून सोडविण्याकरितां साक्षात् नारायणासारखा एक दयाळु दिव्यपुरुष अकस्मात् आला; व त्या अजगरास मारून आणि तिला निर्भय करून तो गुप्त झाला; पण शोकाग्नीनें संतप्त झालेल्या तिला आपलें जीवित व्यर्थ आहे असें वाटलें. तिनें आत्महत्या करण्याचा निश्चय केला; व एका मत्त वनगजाच्या पुढें जाऊन ती उभी राहिली. पण त्या गजानें तिला मारलें नाहीं; त्याला तिची दया आली. खरोखर दैवाची गति विचित्र आहे. तिचें आयुष्य संपलेलें नसल्यामुळें श्वापदांसही सन्मुख असलेल्या तिला मारण्याची बुद्धि झाली नाहीं. कांहीं दिवसांनीं तिचे दिवस भरले. गर्भाची पूर्ण वाढ झाली. गर्भभरानें तिची गति मंद झाली; एकदां तर ती आपल्या पतीस आठवून मोठ्यानें हेल काढून रडूं लागली.

तिचा तो रडण्याचा ध्वनि ऐकून, फळें व मुळें आणण्याकरितां तेथें आलेला एक मुनितनय तिच्यापाशीं आला. तिची दीन अवस्था पाहून दयेनें त्याचें चित्त द्रवलें आणि तिचा सर्व वृत्तांत ऐकून घेऊन व

तिचें सान्त्वन करून तिला जमदग्नीच्या आश्रमास घेऊन गेला. तेथें तिनें जमदग्नीस पाहिलें. तो मुनि म्हणजे मूर्तिमान् विश्वासच होता. त्याचें तेज बालसूर्यासारखें होतें. राणीनें त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. तेव्हां आश्रितांवर प्रेम करणारा तो मुनि दिव्यदृष्टीनें दुःखानें व्याकुळ झालेल्या राणीस म्हणाला, " वत्से, शोक करूं नकोस. येथें तुझ्या पतीचा वंशधर पुत्र होईल, व पतीशीं तुझा समागम होईल." तें मुनिवचन ऐकून जिच्या चित्तास थोडें समाधान वाटलें आहे, अशी ती साध्वी मृगावती, त्याच आश्रमांत प्रियसंगमाची वाट पहात राहिली. सत्संगति जशी सदाचारास प्रसवते, त्याप्रमाणें योग्य समयीं ती स्तुत्य पुत्ररत्नास प्रसवली. त्याबरोबर हा बुद्धिमान् राजपुत्र उदयन या नांवानें प्रख्यात, महा यशस्वी, सर्व विद्यापारंगत व सार्वभौम होईल, अशी आकाशवाणी झाली. समवयस्क बालकांप्रमाणें, सद्गुणांसहवर्तमान तोही क्रमानें प्रत्यहीं वाढूं लागला. सर्व क्षत्रोचित संस्कार करून त्या मुनीनें त्यास सर्व विद्या व धनुर्वेद शिकविला. त्याच्या आईनें राजापासून प्रेमचिन्ह म्हणून मिळालेलें व ज्याच्यावर राजाचें नांव आहे, असें एक कंकण आपल्या हातांतून काढून त्याच्या हातांत घातलें.

## ४. उदयनाचें औदार्य.

एकदा मृगया करीत फिरत असतां, उदयनानें महारण्यांत एका शबरानें एका सुंदर सर्पास धरलें आहे, असें पाहिलें. व सर्पाची दया आल्यामुळें ' अरे बा भिल्ला, तूं मी सांगत आहें, म्हणून या सर्पास सोड. ' असें त्यास म्हटलें. पण तो शबर उलट म्हणाला, " महाराज, मी दरिद्री आहे, व हेंच माझें उपजीविकेचें साधन आहे. मी सापांस खेळवून पोटास मिळवितों. मजजवळ आजपर्यंत जो सर्प होता तो नुक्ताच मेला. म्हणून मी दुसरा साप या अरण्यांत शोधूं लागलों. बराच वेळ हुडकल्यावर मला हा सांपडला आहे. तेव्हां याला सोडून मी काय करूं ? " त्याचें ते योग्य भाषण ऐकून त्या सुज्ञ व उदार राजपुत्रानें, मातेनें आपल्यास दिलेलें कडें, त्या शबरास दऊन सर्पास सोडविलें.

तें मूल्यवान् कडें मिळतांच लुब्धक तेथून निघून गेला. नंतर संतुष्ट झालेला तो सर्प प्रणाम करून म्हणतो-राजपुत्रा, मी वासुकीचा वडील

भाऊ आहे. माझें नांव वसुनेमी. तूं माझें रक्षण केलें आहेस. यास्तव मी ही वीणा तुला देतों. हिच्या तारा फार रमणीय ध्वनि करितात. ही तांबुलीही अम्लानमाला तिलकयुक्तीसह तूं घे. ही त्याची प्रार्थना ऐकून उदयनानें त्या तिन्ही दिव्य वस्तु घेतल्या व त्या नागानेंच ज्याला उचलून आणलें आहे, असा तो तत्क्षणीं जमदग्नीच्या आश्रमास येऊन पोंचला. त्या आपल्या लाडक्याला पाहतांच मृगावतीचे नेत्र अमृत-प्राशन केल्याप्रमाणें तृप्त झाले.

## ५ राजाला पत्नीचा शोध लागला.

इतक्यांत तो शबर ज्याच्यावर राजाचें नांव घातलें आहे, असें तें कडें विकण्याकरितां बाजारांत गेला. तेथें मोठमोठ्या व्यापाऱ्यांस त्यानें तें दाखविलें. पण त्यावर राजाचें नांव पाहून कोणी तें विकत घेईना. शेवटीं राजपुरुषांनीं त्यास धरलें व राजाकडे नेलें. प्रियेला दिलेलें तें आपलें कडें दृष्टीस पडतांच राजाला रडूं कोसळलें व तो दुःखी सहस्रानीक त्या शबरास ' तुला हें काठें सांपडलें ' म्हणून ममतेनें विचारूं लागला. तेव्हां त्या अरण्यवासी भोळ्या भिल्लानें राजास सर्व खरा वृत्तांत सांगितला. तो ऐकून राजा ' माझ्या प्रियेच्या हातांत असलेलें हें कंकण या भिल्लास कसें बरें मिळालें असेल ? हा सांगत आहे तसाच खरा प्रकार असेल काय ?' असा विचार करूं लागला. तों–' राजन्, तुझा शाप क्षीण झाला आहे. उदयाद्रीवर जमदग्नीच्या आश्रमांत तुझी प्रिया मृगावती पुत्रासह आहे '-अशी आकाशवाणी झाली. ती ऐकून राजाला अत्यानंद वाटला. तो दिवस कसाबसा घालवून दुसऱ्या दिवशीं प्रियेच्या दर्शना-विषयीं अति उत्सुक झालेला सहस्रानीक त्या शबरास पुढें करून त्याच्या मागोमाग उदयपर्वताकडे ससैन्य चालला.

---

# तरंग २ रा.

त्या दिवशीं मोठी मजल मारून एका अरण्यांतील सरोवराच्या तीरीं तो राजा सायंकाळीं वस्तीस राहिला. दिवसभर प्रवास केल्यामुळें थकून

गेलेला तो श्रीमान् सायंकाळचीं अवश्य कर्मे करून उपाहारानंतर मृदु शय्येवर पहुडला. तेव्हां त्याचें अंग रगडण्याकरितां, संगतक म्हणून एक अनुचर त्याजपाशीं आला व त्याचें पादसंवाहन करूं लागला. तो गोष्टी सांगण्यांतही फार निपुण असे. तेव्हां राजा त्यास म्हणाला, "प्रिय संगतका, मी प्राणवल्लभा मृगावतीस केव्हां भेटेन असें मला झालें आहे. कांहीं सुचत नाहीं; माझें चित्त विक्षिप्त झालें आहे. यास्तव ममाचें रंजन होईल अशी एकादी गोष्ट सांग." त्यावर संगतक म्हणतो,—महाराज आपण व्यर्थ कां संतप्त होतां? शाप क्षीण झाल्यामुळें आतां आपला देवीशीं लवकरच समागम होईल. संयोग व वियोग यांचा अनुभव प्रायः सर्वांनांच घ्यावा लागतो. याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.

## १. श्रीदत्त ब्राह्मणाची कथा.

पूर्वी मालव देशांत यज्ञसोम म्हणून एक ब्राह्मण होता. त्याला दोन पुत्र झाले. त्यांतील एकाचें नांव कालनेमि व दुसऱ्याचें नांव विगतभय. कांहीं दिवसांनीं त्यांचा पिता परलोकवासी झाला. त्यांचेंही बालपण संपलें व ते दोघे विद्यार्जनाकरितां पाटलिपुत्र नगरास गेले. तेथें देवशर्मा या नांवाच्या कोणा एका उपाध्यायानें विद्या संपादन केलेल्या त्या दोघांस साक्षात् दुसऱ्या विद्यांप्रमाणेंच दोन कन्या यथाविधि दिल्या.

एकदां, शेजारचे दुसरे गृहस्थ धनसंपन्न आहेत, असें पाहून ज्याला मत्सर उत्पन्न झाला आहे, अशा कालनेमीनें व्रत धारण करून होमांच्या योगानें श्रीस प्रसन्न केलें. तेव्हां ती देवी साक्षात् पुढें येऊन त्याला म्हणाली, "तुला पुष्कळ वित्त मिळेल, व पुढें राजा होणारा पुत्र होईल. पण ज्याअर्थी तूं ईर्षायुक्त चित्तानें अग्नीमध्यें हवन केलें आहेस, त्याअर्थी शेवटीं चोराप्रमाणें तुला मरण येईल." असें सांगून ती लक्ष्मी गुप्त झाली असतां थोड्याच अवकाशांत कालनेमि मोठा धनवान झाला व कांहीं दिवसांनीं त्याला पुत्रही झाला. श्रीनें वर दिल्यामुळें झालेल्या पुत्राचें नांव कालनेमीनें श्रीदत्त असेंच ठेविलें. तो ब्राह्मण होता, तरी क्रमानें वृद्धिंगत होत असतांना अस्त्रें व बाहुयुद्ध यांत अप्रतिम झाला. याच सुमारास कालनेमीचा विगतभय नामक भ्राता, आपली प्रिया सर्पदंशानें मेली आहे, असें पाहून विरक्तमनानें तीर्थाटन करण्याच्या उद्देशानें देशान्तरास गेला.

त्या देशाचा वल्लभशक्ति म्हणून एक गुणज्ञ राजा होता. त्यानें या श्रीदत्तास आपल्या विक्रमशक्ति नामक पुत्राचा मित्र केलें. त्यामुळें त्या अभिमानी राजपुत्राशीं या वेगवान् श्रीदत्ताचा बालपणींच दुर्योधन व भीम यांच्याप्रमाणें सहवास झाला. त्यानंतर या श्रीदत्त ब्राह्मणाचा अवन्ती देशांतील बाहुशाली व वज्रमुष्टी या नांवांच्या क्षत्रियांशीं मैत्री जमली. त्यानें बाहुयुद्धानें ज्यांचा पराभव केला आहे, असे दुसरेही चार गुणप्रिय दाक्षिणात्य मंत्रिपुत्र त्याजवर प्रेम करून त्याचाच आश्रय धरून राहूं लागले महाबल, व्याघ्रभट, उपेंद्रबल व निष्ठुरक या नांवाच्या त्या चार वीरांनीं श्रीदत्ताची मैत्री संपादिली.

एकदां वर्षार्तूंत राजपुत्राचा मित्र श्रीदत्त त्या सर्व मित्रांसह जाह्नवीच्या तीरीं विहार करण्याकरितां गेला. तेव्हां खेळांमध्यें राजाच्या भृत्यांनीं विक्रमशक्ति-राजपुत्रास आपला राजा केलें. तें पाहून श्रीदत्ताच्या मित्रांनीं त्यास आपला राजा केलें. पण त्यामुळें अभिमानी राजपुत्रास मोठा क्रोध आला व त्यानें त्या ब्राह्मणास बाहुयुद्धार्थ आह्वान केलें. दैववशात् श्रीदत्तानें राजपुत्रास जिंकलें. त्यामुळें विक्रमशक्तीस आपला मोठा अपमान झाला असें वाटलें, व प्रत्यहीं वृद्धि पावणाऱ्या त्या ब्राह्मणपुत्राचा वध करण्याची इच्छा त्यास झाली. पण त्याचा तो अभिप्राय जाणून, त्याच्याविषयीं साशंक झालेला श्रीदत्त, आपल्या मित्रांसह त्याच्यापासून दूर जाऊं लागला. गंगेच्या तीरावरून जातां जातां सागरामध्यें असलेल्या लक्ष्मी-प्रमाणें गंगेच्या प्रवाहांत वाहून जात असलेल्या एका कामिनीस त्यानें पाहिलें. त्याबरोबर त्या बाहुशालिप्रभृति सुहृदांस तीरावरच ठेवून तो एकटाच तिला जलप्रवाहांतून वर काढण्याकरितां गंगेच्या मोठ्या ओघांत शिरला. आणि पोहत जवळ येऊन त्यानें केंस धरिले असतां, ती रमणी खोल पाण्यांत बुडाली; तिच्या मागोमाग त्यानेंही बुडी मारली. पण काय चमत्कार सांगावा! एका क्षणांत त्याला एक शिवालय मात्र दिसलें. ती स्त्री किंवा जलप्रवाह यांतील कांहीं दिसलें नाहीं. हें मोठेंच आश्चर्य आहे, असें जाणून त्यानें मंदिरांत प्रवेश करून शंकरास साष्टांग नमस्कार घातला, व ती रात्र त्या मंदिराजवळच्या उद्यानांतच घालविली. प्रातः-कालीं शंकराची आराधना करण्याकरितां आलेली ती रमणी साक्षात् श्रीप्रमाणेंच त्याला दिसली.

ईश्वराची पूजा करून ती चंद्रमुखी आपल्या मंदिरीं जावयास निघाली. तेव्हां तोही तिच्या मागून गेला. शिवमंदिरापासून कांहीं दूर गेल्यावर देवपुराप्रमाणें एक उत्तम गृह त्याला दिसलें. ती मानिनी स्त्री त्याच गृहांत शिरली. अंत:पुरांत गेल्यावरही सहस्र स्त्रिया जिची सेवा करीत आहेत, अशी ती कांहीं एक न बोलतां पर्यंकावर बसली. श्रीदत्तही तिच्या समीप भूमीवर बसला. इतक्यांत ती एकाएकीं रडूं लागली. तिच्या नेत्रांतून स्थूल अश्रुबिंदु तिच्या हृदयप्रदेशीं पडूं लागले. तें पाहून श्रीदत्ताचें चित्त दयेनें आर्द्र झालें. तो तिला म्हणाला, "सुंदरि, तूं कोण आहेस व अशी रडतेस कां? दु:खाचें कारण जर मला कळलें, तर माझ्या हातून त्याचें निवारण होईल कीं नाहीं, तें मी पाहीन" तें ऐकून मोठ्या प्रयत्नानें आपले अश्रु आवरून ती उलट बोलली, "साधो, आम्हीं या हजारजणी दैत्यराज बलीच्या नाती आहोंत. यांतील विद्युत्प्रभा नांवाची मी जेष्ठ भगिनी आहें. आमच्या पितामहास विष्णूनें दृढ बद्ध करून सोडिलें आहे. आमच्या पित्यास मारून त्या शौरीनें आम्हां सर्वजणींस नगरांतून बाहेर घालविलें, आणि आम्ही पुन: आंत जाऊं नये, म्हणून त्या दीर्घदर्शी देवानें नगराच्या द्वारावर एका सिंहाची स्थापना केली आहे. सिंहाच्या योगानें जसें द्वार, तसेंच दु:खाच्या योगानें आमचें हृदयही रुद्ध झालें आहे. तो सिंह मूळचा एक यक्ष असून कुबेराच्या शापानें सिंह झाला आहे. आम्ही दीनमुख करून जेव्हां नगरांत जाऊं देण्याविषयीं त्या भगवानाची प्रार्थना केली, तेव्हां 'एका मानवाच्या हातून याचा पराभव झाला, म्हणजे हा यक्ष शापापासून मुक्त होईल व तुम्हींही आपल्या नगरांत जाऊं शकाल,' असें तो आम्हांस म्हणाला. यास्तव हे वीरा तूं त्या आमच्या शत्रूस जिंक. या महाकार्याकरितांच मी तुला येथें आणलें आहे. तूं त्याला जिंकलेंस म्हणजे पराभूत झालेल्या सिंहरूपी यक्षापासून मृगाङ्क नामक खड्ग (तरवार) तुला मिळेल, त्याच्या प्रभावानें पृथ्वीस जिंकून तूं राजा होशील."

हें तिचें आनंददायक भाषण ऐकून त्यानें तो दिवस तेथेंच मोठ्या कष्टानें घालविला. दुसरा दिवस उजाडतांच त्या कन्यांच्या मागोमाग श्रीदत्त त्या नगराकडे गेला. त्यानें बाहुयुद्धानें त्या उद्धत सिंहास जिंकलें, त्यामुळें तोही शापापासून मुक्त झाला. त्याला त्याच्या पूर्व शरीराची

प्राप्ति झाली, आणि शापमुक्त करणाऱ्या श्रीदत्तास आपलें खड्ग देऊन तो यक्ष तात्काल गुप्त झाला.

त्यानंतर श्रीदत्त त्या कन्यांसह त्या उत्तम नगरांत गेला. विद्युत्प्रभेनें त्याला विषनाशक आंगठी (मुद्रिका) दिली. पण इतक्यांत तो तिच्या प्रेमाविषयीं अतिशय उत्सुक झाला, तेव्हां ती श्रीदत्ताला युक्तीनें म्हणाली "वीरा, आपली आंगठी व खड्ग घेऊन तूं या वापीमध्यें स्नान कर." तें ऐकून 'बरें आहे' असें म्हणून तो कामी श्रीदत्त त्या वापींत बुडाला. आणि पुनः वर जों निघत आहे तों, ज्या गंगातीरावरून तो गंगाप्रवाहांत शिरला होता तेथें येऊन पोंचला. आंगठी व खड्ग यांसह पाताळांतून सुरक्षितपणें व मोठ्या चमत्कारानें पूर्वस्थळीं आल्याचें पाहून त्याला आश्चर्य व खेदही वाटला. त्या दैत्यकन्येनें आपल्याशीं प्रतारणा केली, असें तो समजूं लागला.

नंतर आपल्या सुहृदास शोधीत श्रीदत्त आपल्या गृहाकडे चालला असतां, मार्गामध्येंच त्याला निष्ठुरक भेटला. तेव्हां त्याच्याजवळ जाऊन, त्यास नमस्कार करून व एकांतीं नेऊन, श्रीदत्त आपल्या लोकांची वार्ता विचारूं लागला. तेव्हां निष्ठुरक म्हणालाः-मित्रा, गंगेमध्यें तूं बुडाल्यानंतर तुझा पुष्कळ दिवस शोध करून आम्ही अतिशय निराश व कष्टी झालों. तूं जिवंत नाहींस असें आमच्या मनानें घेतलें. व दुःखानें संतप्त होऊन आम्हीं आपापला शिरच्छेद करण्यास आरंभ केला. पण इतक्यांत 'वत्सांनों, असें साहस करूं नका, श्रीदत्त जीवंत आहे. तो लवकरच तुम्हांस भेटेल,' असें सांगून आकाशवाणीनें आमचें त्या साहसापासून निवारण केलें. त्यानंतर आम्हीं तुझ्या पित्याकडे जात असतांना आमच्याजवळ एक सज्जन पुरुष त्वरेनें आला, व म्हणाला "बाबांनों, तुम्हीं यावेळीं नगरांत जाऊं नका; कारण राजा वल्लभशक्ति मरण पावला, व सर्व मंत्र्यांनीं मिळून त्याच्या राज्यावर त्याच्या विक्रमशक्ति-पुत्रास बसविलें आहे. पण राज्य मिळतांच तो दुसऱ्या दिवशीं कालनेमीच्या घरीं गेला, व 'तुझा श्रीदत्त पुत्र कोठें आहे' असें त्यास विचारूं लागला. तेव्हां 'मला ठाऊक नाहीं' असें त्यानें खरें सांगितलें. पण त्या दुष्टाला तें खोटें वाटलें. 'तूं त्याला लपवून ठेविलें आहेस' असें म्हणून त्या निष्ठुर राजानें चोराप्रमाणें त्याला सुळावर चढविलें. आपला पति मेला

आहे, असें ऐकतांच शोकसंतप्त झालेल्या तुझ्या आईचें हृदय विदीर्ण झालें व तीही मरण पावली. क्रूरकर्मी पुरुषांच्या एका पापापासून अनेक पापें निपजत असतात. आतां तो नूतन राजा श्रीदत्तास व तुम्हांस मारण्याकरितां हुडकीत आहे. यास्तव तुम्हीं येथून सत्वर जा.'' तें ऐकून आम्हीं सर्व शोकानें आर्त झालों. पण तात्काल चांगला विचार करून बाहुशालिप्रभृति पांच मित्र उज्जयिनीस गेले, व मी तुजकरितां येथेंच गुप्तपणें राहिलों आहे. सुदैवानें आज आपली भेट झाली आहे. आतां आपण उभयतां आपल्या मित्रांकडे जाऊं या, चल.

निष्ठुरकाच्या तोंडून हें वर्तमान ऐकून श्रीदत्तास आपल्या आईबापां-विषयीं फार दुःख झालें, आणि सूड घेण्याच्या बुद्धीनें त्यानें आपली दृष्टि वारंवार आपल्या खड्गाकडे लाविली. पण योग्य कालाची वाट पहाण्याकरितां तो निष्ठुरकासह आपल्या इतर मित्रांस भेटण्याच्या इच्छेनें उज्जयिनीकडे निघाला.

मार्गानें जात असतांना त्यानें आपल्या मित्राला गंगाजलांत बुडाल्या-पासून वर निघेपर्यंत झालेला सर्व वृत्तांत सांगितला. इतक्यांत मार्गामध्यें रडत असलेली एक स्त्री त्याला भेटली. रडण्याचें कारण विचारल्यावर 'मी एक अबला असून मला माळव्यास जावयाचें आहे, पण मार्ग चुक-ल्यामुळें मी येथें रडत बसलें आहें' असें तिनें सांगितलें. तें ऐकून त्या दयाळु श्रीदत्तानें तिला आपल्याबरोबर घेतलें. तिला माळव्याच्या मार्गास लावण्याचा त्याचा विचार होता; पण एकदा ती स्त्री व निष्ठुरक यांसह तो एका शून्य ग्रामांत वस्तीस राहिला असतां, रात्रीं अकस्मात् जागा झालेल्या श्रीदत्तानें, ती स्त्री निष्ठुरकास मारून हर्षानें त्याचें मांस खात आहे, असें पाहिलें. मग काय विचारतां! त्या शक्तिमानास अतिशय क्रोध आला व लागलीच आपली मृगाङ्क तरवार उपसून तो तिला मारावयास धांवला. तिनें घोर राक्षसीचें रूप धरिलें; पण शूर पुरुष असल्या चेष्टांना थोडीच भीक घालणार आहेत? त्यानें जवळ जाऊन तिचा शिरच्छेद करण्याकरितां तिच्या केंसट्या धरिल्या. त्याबरोबर दिव्यरूप धरून ती म्हणाली, "हे उदारा, मला मारूं नको. मी मूळची राक्षसी नव्हे. कौशिकाच्या शापामुळें माझी अशी दशा झाली. पूर्वी तो मुनि घोर तप करीत असतां, माझें पद घेण्याकरितांच हा तप करीत आहे, अशी

शंका आल्यामुळें कुबेरानें, मला त्याच्या तपामध्यें विघ्न करण्याकरितां पाठविलें. मी अगोदर रमणीय रूपानें त्याला मोहित करण्याचा प्रयत्न केला; पण तो व्यर्थ झालेला पाहून शेवटीं त्याला भिवविण्याकरितां मीं घोर रूप धारण केलें. तें पाहून,-'पापे, तूं मनुष्यास खाणारी घोररूपिणी राक्षसीच हो'-असा त्यांनें मला शाप दिला. पुढें मी हातांपायां पडून पुष्कळ विनवण्या केल्यावर 'श्रीदत्तानें केंस धरिले म्हणजे शापान्त होईल' असा त्यानें उःशाप दिला. याप्रमाणें ज्यांत पुष्कळ क्लेश आहेत, अशा राक्षसीभावास मी प्राप्त झालें होतें. मीच या गांवांतील सर्व लोकांना खाऊन टाकलें आहे; पण आज मोठ्या भाग्यानें तुझें दर्शन होऊन, तूं माझे केंस धरल्यामुळें, मी शापमुक्त झालें. आतां मी तुला वर देतें. तें ऐकून श्रीदत्त क्रोधानें म्हणाला, " जळो तुझा तो वर, माझा हा जिवलग मित्र उठूं दे, म्हणजे झालें." त्यावर 'तथास्तु' असें म्हणून ती देवी गुप्त झाली. निष्ठुरकही पूर्वीप्रमाणेंच अक्षत शरीरानें युक्त व जिवंत होऊन उठला. नंतर प्रातःकाळ झाल्यावर विस्मित व हृष्ट झालेला श्रीदत्त आपल्या मित्रासह मार्ग क्रमूं लागला आणि योग्यसमयीं उज्जयिनीस येऊन पोंचला. तेथें पोंचतांच मेघ आपल्या दर्शनानें मयूरांस जसा आनंदित करितो, त्याप्रमाणें त्यानें आपल्या दर्शनानें आपल्या प्रिय मित्रांस आनंद दिला. त्याचा सर्व वृत्तांत ऐकून घेतल्यावर बाहुशालीनें त्यास आपल्या घरीं नेलें. बाहुशालीच्या आईबापांनीं त्याची उत्तम व्यवस्था ठेविल्यामुळें तो आपल्या घराप्रमाणेंच तेथें मित्रांसह पुष्कळ दिवस राहिला.

कोणे एके वेळीं वसंतोत्सव चालू असतां, श्रीदत्त मित्रांसह उपवनांत यात्रा पहाण्याकरितां गेला. तेथें श्रीबिंबकी राजाची मृगांकवती नामक कन्या आली होती, ती त्याच्या दृष्टीस पडली. ती सुंदरी साक्षात् वसंत-लक्ष्मीच आहे कीं काय, असा त्यास भास झाला. जणुंकाय त्याच्या विकसित दृष्टीनेंच मार्ग दिल्यामुळें, ती राजकन्या तात्काल त्याच्या हृदयांत शिरली. त्या मृगनयनेचीही स्निग्ध दृष्टि वारंवार त्याच्या मुखाकडे येऊन परत जाऊं लागली; पण इतक्यांत ती वृक्षाच्या आड झाल्यामुळें श्रीदत्त खिन्न झाला. तिचें दर्शन झाल्याकारणानें तो आपल्याला सर्वतः शून्य समजूं लागला. त्याची ती अवस्था पाहून व अभिप्राय ओळखून अति-

चतुर बाहुशाली त्यास म्हणतो–मित्रा, मला तुझें इंगित समजलें आहे, आतां नाहीं म्हणूं नकोस. चल; जेथें ती राजकन्या गेली आहे तेथें आपण जाऊं. प्रियमित्राचें तें खरें भाषण ऐकून 'बरें आहे' असें म्हणून तो त्याच्याबरोबर राजकन्येपाशीं गेला. पण इतक्यांत 'अरेरे घात झाला. कोण हा अनर्थ! राजकन्येस साप चावला' असा आक्रोश झाला. तो ऐकून श्रीदत्ताचें हृदय पोळलें.

इतक्यांत बाहुशाली कंचुकीजवळ गेला, व 'माझ्या मित्रापाशीं विष-नाशक मुद्रिका व मंत्र आहे' असें त्यास म्हणाला. त्याबरोबर कंचुकी श्रीदत्ताजवळ आला, व त्याच्या पायां पडून आणि आर्जवें करून त्यानें त्यास राजकन्येपाशीं नेलें. तेव्हां तिच्या ज्या बोटास सर्पानें दंश केला होता, त्या बोटांत ती आंगठी घालून श्रीदत्त मंत्र जपूं लागला. कांहीं वेळानें ती मूर्छित होऊन पडलेली सुंदरी सावध होऊन उठली. तें पाहून सर्व लोक आनंदित झाले, व श्रीदत्ताची स्तुति करूं लागले. राजा श्रीबिंबकीही हा वृत्तांत कळतांच तेथें आला; पण श्रीदत्त, तो राजा आप-ल्याला कांहीं देऊं लागेल, या भीतीनें आपल्या मित्रांसह राजकन्येच्या बोटांत घातलेली मुद्रिकाही न घेतां, बाहुशालीच्या घरीं निघून गेला. निःस्पृह लोकांस धनवानांच्या पुढें जाण्याचा नेहमींच कंटाळा असतो. असो; राजानें सुवर्णादि जें पारितोषिक त्याच्याकडे पाठविलें होतें, तें त्यानें बाहु-शालीच्या बापास देऊन टाकिलें. त्यानें आपल्याकरितां जर कांहीं ठेवून घेतलें असेल, तर 'ती सुंदरी कशी प्राप्त होईल' हा ध्यास होय. त्याला तिच्याविषयीं इतकी चिंता लागली कीं, त्याचे सर्व मित्र, आतां पुढें काय करावें, हें न सुचल्यामुळें व्याकूल झाले.

पण इतक्यांत भाग्ययोगानें भावनिका नांवाची त्या राजकन्येची प्रिय सखी आंगठी परत देण्याच्या बाहण्यानें श्रीदत्ताकडे आली; व म्हणाली: "हे सुभगा, माझ्या सखीचा असा निश्चय झाला आहे कीं, एक तर तूं प्राणप्रद पति व्हावेंस अथवा मला मरण यावें." तिनें असें सांगितलें, तेव्हां श्रीदत्त, भावनिका व आपले मित्र यांसह एकत्र बसून विचार करूं लागला. त्या सुंदरीला राजगृहांतून काढून गुप्त रीतीनें रहाण्याकरितां आपण मथुरेस जावें, असें त्या सर्वांनीं मिळून ठरविलें. नंतर भावनिका आपल्या घरीं गेली. दुसऱ्याच दिवशीं बाहुशाली तिघां मित्रांसह व्यापा-

राज्या मिषानें मथुरेस जावयास निघाला. जातां जातां मार्गांत राजकन्येस सत्वर नेतां यावें, म्हणून चपळ वाहनांची योजना करीत तो गेला. इकडे श्रीदत्तानें त्याच सायकाळीं राजकन्येच्या अंत:पुरांत एक गरीब स्त्री व तिची कन्या अशा दोघींस मद्य पाजवून निजविलें, व रात्रीं दिवा लावीत असतांना भावनिकेनें त्या गृहास अग्नि लावून राजकन्येसह ती तेथून बाहेर पडली. त्याबरोबर श्रीदत्तानें भावनिका व आपले दोन मित्र यांसह पूर्वीं निघालेल्या बाहुशालीच्या मार्गानेंच आपल्या प्रियेला मथुरेस रवाना केलें. इकडे राजकन्येच्या गृहांत ती मत्त स्त्री व तिची कन्या जळून मेली; पण त्यांचे ते दोन दग्ध देह पाहून राजपुत्री व तिची भावनिका सखीच जळून मेली आहे, असें समजून राजगृहांतील सर्व लोक कोलाहल करूं लागले. श्रीदत्त दुसऱ्या दिवशीं पूर्वीप्रमाणेंच लोकांच्या दृष्टीस पडला; आणि त्याच रात्रीं आपलें मृगांक घेऊन पूर्वीच निघून गेलेल्या आपल्या प्रियेच्या मागून चालला. दोन रात्रींत पुष्कळ मार्ग चालून गेल्यावर तिसऱ्या दिवशीं सकाळीं प्रहर दिवसाच्या सुमारास त्याला विंध्यारण्य लागलें. मार्गांत जात असतां त्यास अशुभ चिन्हें झालीं. इतक्यांत भावनिकेसह तीक्ष्ण शस्त्रप्रहारानें जर्जर झालेले आपले मित्र दिसले. त्यांची ती अवस्था पाहून श्रीदत्तास फार दु:ख झालें, व 'हें काय? तुमची अशी दशा कोणी केली?' असें त्यांस तो विचारूं लागला. तेव्हां ते म्हणाले: "मित्रा काय सांगूं? अनेक घोडेस्वारांनीं आम्हांवर हल्ला करून आम्हांस आतांच लुटलें, आणि आम्हीं असे जर्जर झालों आहों, असें पाहून त्यांतील मुख्य घोडेस्वारानें राजकन्येला आपल्याच घोड्यावर बसवून नेलें. ते फार दूर गेले नसावेत. तूं अशा या मार्गानें गेलास तर आतां त्यांनां गाठशील. यावेळीं तूं आमच्याजवळ बसूं नकोस. आम्हीं कांहीं झालें तरी राजकन्येला सोडीव." मित्राचें हें वचन ऐकून श्रीदत्त मोठ्या विवंचनेंत पडला. मित्रांनां अशा अवस्थेंत टाकून जावें असेंही त्यास वाटेना, व आपल्या प्रियेला चोरांच्या हातीं लागूं द्यावें, हेंही त्याला आवडेना. पुष्कळ विचार केल्यावर मित्रांस धीर देऊन तो वेगानें चोरांचा पाटलाग करीत गेला. पुष्कळ दूर गेल्यावर त्यास ती टोळी भेटली. त्या स्वारांमध्यें एक तरुण क्षत्रिय होता, व त्यानेंच राजकन्येला हरण करून आणलें होतें. प्रथम ब्राह्मणस्वभावास अनुसरून श्रीदत्त त्या तरुणाजवळ गेला,

व आपल्या प्रियेस सोडण्याविषयीं शांतपणें सांगूं लागला; पण क्षत्रियांच्या आग्रही स्वभावानुरूप त्यास ती गोष्ट पटली नाहीं. तेव्हां श्रीदत्तानें त्याला घोड्यावरून खालीं ओढून दगडावर अशा वेगानें झापटलें कीं, तो लागलाच मरण पावला. नंतर त्याच्याच घोड्यावर स्वार होऊन आपल्या प्रियेस जवळ घेतलें, आणि अंगावर धांवून येणाऱ्या अनेक स्वारांस त्यानें लोळविलें. तें त्याचें अलौकिक शौर्य पाहून बाकीचे स्वार भयभीत होऊन पळून गेले.

याप्रमाणें मृगाङ्काच्या सहायानें विजयी झालेला श्रीदत्त मृगांकवतीसह घोड्यावर बसून आपल्या मित्राकडे यावयास निघाला. पण थोडेंसें दूर जातांच, युद्धांत प्रहारांनीं जर्जर झालेला तो घोडा एकाएकीं भूमीवर पडला व मेला. त्यावेळीं श्रीदत्ताच्या कुशलतेमुळें मृगांकवतीस कांहीं इजा झाली नाहीं; पण प्रवासादिकांच्या त्रासानें त्या सुंदरीला तृषा लागली. जलावांचून तिचे प्राण कासावीस झाले. तेव्हां तिला तेथेंच ठेवून तो त्या निबिड अरण्यांत जल हुडकूं लागला. पण दूरवरही जाऊन त्याला जलप्राप्ति झाली नाहीं. इतक्यांत सूर्यास्त होऊन अंधार पडला व शेवटीं जलही मिळालें; पण पुनः परत येण्याचा मार्ग सांपडेना. तेव्हां प्रियेस हुडकणाऱ्या चक्रवाकाप्रमाणें आक्रोश करीत तो इतस्ततः भटकूं लागला. त्याची ती रात्र त्या वनांत, तशा कष्टकर दशेंतच कशीतरी गेली. उजाडतांच तो पुनः तिला शोधूं लागला.

कांहीं वेळानें आदल्या दिवशीं प्रियेला जेथें ठेविलें होतें तेथें तो आला. मरून पडलेला घोडा तेथें तसाच पडला होता; पण त्याची प्रिया मात्र तेथें नव्हती. तेव्हां तो फार घाबरला, व झाडावर चढून ती कोठें दिसली तर पहावें, असा विचार करून व अविचारानें आपलें तें दिव्य खड्ग एका वृक्षाखालीं ठेवून, तो झाडावर चढला. इतक्यांत त्या मार्गानें कोणी एक शबरांचा नायक आला, व वृक्षाखालीं पडलेली ती सुंदर तरवार त्यानें उचलली. आर्त झालेल्या श्रीदत्तानेंही वृक्षावरून खालीं उतरून त्यालाच आपल्या प्रियेविषयीं प्रश्न केला. तेव्हां त्या शठानें ' तूं माझ्या झोपड्याकडे जा, मला वाटतें कीं, ती तेथें गेली आहे. मीही कांहीं वेळानें तेथें येऊन हें तुझें खड्ग तुला परत देईन. ' असें सांगून आपल्या भृत्यांबरोबर त्याची तिकडे रवानगी केली. त्या

शबराधिपतीच्या घरीं पोंचल्यावर श्रांत झालेल्या श्रीदत्तास झोंप आली, व तेथील लोकांनींही–' महाराज आपण स्वस्थ झोंप घ्या, येथें कोणत्याही प्रकारची भीति नाहीं,'–असें सांगितल्यामुळें तो स्वस्थपणें निजला. कांहीं वेळानें तो जागा झाला, व पहातो तों आपले दोन्ही पाय खोड्यांत अडकविले आहेत असें त्यास समजलें. झालें! त्याचा सर्व उद्यमच खुंटला. क्षणांत सुख व क्षणांत दुःख देणाऱ्या दैवगतीप्रमाणें शोक करीत बसण्यावांचून त्या वेळीं त्याच्या हातून कांहींएक होण्यासारखें नव्हतें.

इतक्यांत कोणीएक मोचनिका नामक चेटी त्याच्याजवळ येऊन म्हणाली, "अरे वेड्या, येथें मृत्यूच्या दाढेंत कसा येऊन पडलास ? तो शबर कांहीं कामाकरितां कोठें बाहेर गेला आहे; पण परत आला म्हणजे चंडिकेला तुझा बळी देईल. त्यासाठींच त्यानें विंध्याटवींतून तुला येथें पाठवून, आतां बांधवून ठेविलें आहे. त्या भगवतीच्या उपहारार्थ तुझी योजना झाल्यामुळेंच अन्न, वस्त्र इत्यादिकांच्या योगानें तुझें येथें पोषण होत आहे. येथून सुटावयाचें असल्यास एकच उपाय आहे. आणि तो उपाय हाच कीं, शंबरनायकाची सुंदरी म्हणून एक कन्या आहे, ती तुला पाहून कामातुर झाली आहे. यास्तव तूं माझ्या सखीचा परिग्रह कर, म्हणजे तुझें हित होईल." त्यावर 'बरें आहे' असें म्हणून श्रीदत्तानें गांधर्व विधीनें तिच्याशीं विवाह केला. ती प्रतिरात्रीं त्याचीं बंधनें सोडून त्याच्याशीं विहार करीत असे. थोड्याच दिवसांनीं ती गर्भवती झाली. पुढें तो सर्व वृत्तांत मोचनिकेच्या तोंडून ऐकल्यावर जामातृप्रेमानें परवश झालेली सुंदरीची माता त्याच्याजवळ आली, व–" वत्सा, सुंदरीचा पिता श्रीचंड तुला क्षमा करणार नाहीं. यास्तव तूं सत्वर येथून जा; पण माझ्या मुलीला विसरूं नको"–असें सांगून तिनें त्याला बंधमुक्त केलें. तेव्हां 'आपलें सुंदर व अप्रतिम खड्ग श्रीचंडाच्या हातीं लागलें आहे व त्यामुळेंच मी असा हतवीर्य झालों आहें' असें सुंदरीस सांगून तो तेथून निघाला, व पुनः मृगांकवतीच्या चिंतेनें व्याकूळ होऊन तिला शोधण्याकरितां तो विंध्यारण्यांत शिरला. पण यावेळीं त्याला शुभ चिन्हें होऊं लागलीं. तीं पाहून मोठ्या आशेनें तो पुनः जेथें घोडा मरून पडला होता व ती प्रियतमा नाहींशी झाली होती, तेथें आला. इतक्यांत त्याच्याच जवळ येत असलेल्या एका लुब्धकास त्यानें पाहिलें, व आपल्या प्रिये-

विषयीं प्रश्न केला. तेव्हां 'श्रीदत्त तुम्हींच काय ?' असें त्यानें एकदम विचारलें. 'होय तोच मी मंदभाग्यवान्' असें श्रीदत्तानेंही उत्तर दिलें. तें ऐकून तो वृद्ध शबर म्हणाला, "मित्रा, मी तुला सर्व वृत्तांत थोडक्यांत सांगतों. तुझी प्रिया अक्रोश करीत इतस्ततः ह्या अरण्यांत भटकत असतां तिची ती दीन अवस्था पाहून मला दया आली व तिचें समाधान करून मी तिला आपल्या घरीं घेऊन गेलों. पण माझ्या पहाडी गांवांतील झोंपड्यांत रहाणाऱ्या आडदांड व क्रूर तरुण भिल्लांस पाहून ती सुकुमारी अतिशय भ्याली. तेव्हां ती माझीच मुलगी आहे, असें सांगून मी तिला मथुरेजवळच्या नागस्थल ग्रामांत नेऊन विश्वदत्त नामक एका वृद्ध ब्राह्मणाच्या येथें ठेविली, व तुझ्या शोधाकरितां पुनः येथें आलों आहें. तुझें नांव मी तिच्या तोंडूनच ऐकलें. तूं भेटलास हें फार चांगलें झालें. आतां तूं सत्वर नागस्थलास जा."

लुब्धकाचें हें आशाजनक भाषण ऐकून आनंदित झालेला श्रीदत्त तात्काल नागस्थलाकडे निघाला. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं त्या इष्ट ग्रामीं पोंचल्यावर तो विश्वदत्ताच्या घरीं गेला, व 'लुब्धकानें येथें ठेवलेली माझी भार्या माझ्या स्वाधीन कर' अशी त्याची तो प्रार्थना करूं लागला. तेव्हां विश्वदत्त म्हणाला, 'बाळा, मथुरेंत माझा एक अतिशय गुणी ब्राह्मण मित्र आहे. तो शूरसेन राजाचा उपाध्याय व मंत्रीही आहे. त्याच्या येथें मी तुझ्या भार्येला ठेविलें आहे; कारण या ग्रामांत तिचें रक्षण होण्यासारखें नव्हतें. यास्तव प्रातःकाळीं तूं तेथें जा. आतां आज रात्रभर येथेंच रहा.'

त्या सात्विक ब्राह्मणाचें तें भाषण ऐकून श्रीदत्त मोठ्या कष्टानें तेथें राहिला. चिंतेमुळें दीर्घ झालेली ती रात्र संपतां संपेना. पुढें एकदाचें उजाडलें व तो मथुरेस गेला. गांवाबाहेर त्याला एक सुंदर व निर्मलजलयुक्त वापी आढळली. तेव्हां स्नान संध्या करण्याच्या इच्छेनें तो त्या वापीच्या तीरीं उतरला. वस्त्रें कांठावर ठेवून स्नान करण्याकरितां वापींत बुडी मारतांच त्याला एक चोरीचें वस्त्र सांपडलें. त्यांत एक अमूल्य हार बांधलेला होता. पण प्रियेकडे त्याचें सर्व लक्ष लागल्यामुळें धोतरांत काय बांधलें आहे तेंही न पहातां दैववशात् तें वस्त्र घेऊन तो गांवांत शिरला. इतक्यांत नगररक्षकांनीं त्याच्या हातांत असलेलें तें वस्त्र ओळखून त्यास धरलें. चोरीस गेलेला हारही त्या वस्त्रांत होताच. मग

काय विचारतां! हाच चोर आहे, असें ठरवून त्यांनीं बलात्कारानें त्यास राजापुढें उभें केलें. श्रीदत्तानें आपला खरा वृत्तांत राजास सांगितला; पण तिकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. राजानें त्यास मारण्याची शिक्षा दिली.

त्यानंतर राजाज्ञेप्रमाणें ढोल वाजवीत व लोकांस मोठ्यानें ओरडून कळवीत वधस्थानाकडे नेत असतां मृगांकवतीनें त्याला ओळखलें, व ज्याच्या येथें ती राहिली होती, त्या मुख्य मंत्र्यास-'हा माझा पति असून राजपुरुष त्याला वधस्थानाकडे नेत आहेत; '-असें दीनवाणीनें हाता-पायांपडून तिनें सांगितलें. तेव्हां मंत्र्यानें त्या घातकांस 'याला मारूं नका' असें सांगून राजाला सर्व वृत्तांत कळविला; आणि श्रीदत्तास सोडवून आपल्या येथें आणिलें. ज्यानें मला सोडविलें तो विगतभय नामक माझा पितृव्य (चुलता) आहे. देशदेशांतरांत पर्यटन करीत क्रमानें मथुरेस येऊन त्यानें राजमंत्रित्व संपादन केलें,- असें वर्तमान ऐकून व त्याला ओळखून श्रीदत्त त्या आपल्या पितृसोदरा ( चुलत्या ) च्या पायां पडला. तेव्हां त्यानेंही हा आपला पुतण्या आहे, असें ओळखून व आश्चर्यचकित होऊन प्रेमानें त्यास आलिंगन दिलें. त्यानंतर विगतभयानें गृहवृत्तांत विचारला असतां, श्रीदत्तानें पितृवधापासून पुढचा आपला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून त्याच्या काकाला फार दुःख झालें. पण धैर्यानें त्याचा निग्रह करून तो एकांतांत आपल्या पुतण्यास म्हणाला, "बाळा, तूं भिऊं नकोस. धैर्य धर, एकदां मजवर एक यक्षिणी प्रसन्न झाली, व तिनें मला पांच सहस्र घोडे व सात कोटी सुवर्णाचीं नाणीं दिलीं आहेत. पण मला पुत्र नाहीं, तेव्हां हें सर्व तुझेंच आहे." असें सांगून त्यानें मृगांकवती त्याला दिली. श्रीदत्तही तें सर्व धन घेऊन व यथाशास्त्र तिच्याशीं विवाह करून तिच्यासह आनंदांत राहिला. पण इतकें झालें तरी बाहुशालिप्रभृति मित्रांविषयींची चिंता त्याच्या चित्तास जाळूं लागली.

एकदा श्रीदत्ताचा चुलता त्याला एकांतांत म्हणाला, "पुत्रा, या शूरसेन राजाची एक कन्या आहे. राजाच्या आज्ञेनें मला अवंती देशांत तिला देण्याकरितां न्यावयाचें आहे; पण माझ्या मनांत असें आलें आहे कीं, त्यानिमित्तानें तिला राजवाड्यांतून बाहेर काढून तुझ्या स्वाधीन करावी, म्हणजे तिच्या संरक्षणाकरितां मिळालेलें सैन्य व माझें सैन्य याच्या योगानें तुला वराप्रमाणें प्राप्त होणारें, राज्य लवकर आणि सहज मिळवितां

येईल." श्रीदत्ताला हें त्याचें म्हणणें रुचलें, आणि आपल्या पितृव्याबरोबर तो पुष्कळ सैन्यानें परिवेष्टित होऊन त्या कन्येला घेऊन निघाला. पण विंध्यारण्यांत येतांच एकाएकीं सन्मुख आलेल्या चोरांच्या फार मोठ्या सेनेनें शरवर्षाव करून त्यास प्रतिबंध केला. कांहीं वेळ झटापट होऊन श्रीदत्तास असह्य प्रहार झाल्यामुळें मूर्च्छा आली, व त्याची सेना सैरावैरा पळत सुटली. तेव्हां सर्व द्रव्यासह त्या मूर्च्छित श्रीदत्तास शबरांनीं आपल्या घोषाकडे नेलें; व त्या (मूर्च्छित) अवस्थेंतच त्याचा बळी देण्याकरितां त्या क्रूरांनीं भयंकर चंडिकालयांत त्याला पोंचविलें. देवीच्या मंदिरांत त्याचा प्रवेश होतांच घंटांचा मोठा ध्वनि सुरू झाला. तो ऐकून आपल्या बाळाला कडेवर घेऊन शबरपतीची कन्या सुंदरी देवीच्या दर्शनाकरितां तेथें आली. तिनें आपल्या प्राणनाथाला ओळखलें व आपल्या दासाना त्याचा बळी न देण्याविषयीं आज्ञा केली. कांहीं वेळानें सावध होऊन त्यानेंही तिला ओळखलें. फार दिवसांनीं दोनदां प्राण वांचविणाऱ्या स्त्रीचें दर्शन पुत्रासह झाल्यामुळें त्याला अत्यानंद झाला. व तिच्या सहवर्तमान तो घरीं गेला. स्वर्गवासी झालेल्या श्रीचण्डानें, पुत्र नसल्याकारणानें मरतांना सुंदरीस दिलेलें त्याचें राज्यही श्रीदत्तास प्राप्त झालें. त्यामुळें चोरांनीं बंदिवान करून आणलेला त्याचा चुलता, मृगावती, शूरसेनाची कन्या, मृगांकखड्ग व सर्व धन असें त्याला परत मिळालें. त्यानें तेथेंच शूरसेनाच्या कन्येशीं विवाह केला, व तो महाराजा झाला. त्यानंतर श्रीबिंबकी व शूरसेन या दोघां श्वशुरांकडे त्यानें दूत पाठविले. तेव्हां कन्येवर अति प्रेम करणारे ते दोघेही मोठ्या सैन्यासह श्रीदत्ताकडे आले. बाहुशालि-प्रभृति सर्व मित्रही श्रीदत्ताचा पत्ता लागतांच आनंदित होऊन त्याच्याकडे आले. त्यानंतर सैन्यासह दोघे श्वशुर, सहा मित्र, पितृव्य अनेक क्रूर शबर यांच्यांसह तो सूड उगवण्याकरितां विक्रमशक्तीवर चालून गेला, आणि संग्रामांत त्यानें त्या पितृघातक्यास ठार मारिलें. नंतर सागरांतील द्वीपांसह सर्व पृथ्वीचा राजा होऊन तो शांत झाला. त्याच्या तिन्ही प्रिय भार्या एकमतानें त्याची शुश्रूषा करूं लागल्या, आणि त्या कारणानें त्या भाग्यवानानें आपलें उत्तर आयुष्य सुखी मित्रांसह मोठ्या आनंदानें घालविलें. राजन्, व्यग्रचित्त न होणारे धीर पुरुष दीर्घवियोगरूपी संकटसागर, अशा रीतीनें तरून जातात व त्यांचें कल्याण होतें."

## २. सहस्रानिकाची पुढील कथा.

संगतकानें सांगितलेली ही कथा ऐकून प्रियेच्या वियोगामुळें व्याकुल झालेल्या सहस्रानिकानें मार्गांतील ती रात्र कशीबशी काढली. प्रातःकाल होतांच आपल्या मनाला मनोरथावर बसवून ज्यानें प्रियेकडे पुढें पाठविलें आहे, असा तो कांहीं दिवसांनीं जमदग्नीच्या आश्रमास पोंचला. शांत तपोनिधि-जमदग्नीचें दर्शन घेऊन त्यानें साष्टांग प्रणाम केला, नन्तर त्या मुनीनें त्याची सपुत्र कांता परत दिली. शाप समाप्त होऊन त्या दोघां दंपतींचें परस्पर दर्शन होतांच त्यांच्या आनंदाश्रूंनीं भरलेल्या नेत्रांतून जणुंकाय अमृताचाच वर्षाव झाला. आपल्या उदयन-पुत्रास त्यानें आज प्रथमतःच पाहिलें व प्रेमानें दृढ आलिंगन दिलें.

नंतर एकदोन दिवस त्या अति शांत अशा आश्रमांत राहून तपोधनाच्या आज्ञेनें तो राजा, पत्नी व पुत्र यांसह तेथून निघाला. त्यावेळीं राणी व उदयन यांच्या परिचयाचीं हरिणें, आपल्या स्वभावतःच पाणीदार नेत्रांत अश्रु आणून, तपोवनापर्यंत त्यांच्या मागोमाग आलीं. कौशाम्बीस परत जात असतांना मार्गामध्यें राजा व राणी यांनीं आपापली विरहव्यथा परस्परांस सांगितली. कांहीं दिवसांनीं जिच्यामध्यें गुढ्या उभारून तोरणें लाविलीं आहेत, अशा आपल्या राजधानीस पत्नीपुत्रांसह राजा पोंचला. नगरांतून राजमंदिराकडे जात असतां, पौरजनांनीं त्यांचें स्वागत केलें.

कांहीं वर्षें लोटल्यावर उदयनाच्या गुणांनीं जणुंकाय प्रेरणा केल्यामुळें सहस्रानिकानें त्याची यौवराज्यावर स्थापना केली. त्याच्या राज्याभिषेक-समयींच वसन्तक, रुमण्वंत व यौगंधरायण यांचीही, त्याच्या मंत्रिपदावर योजना केली. त्यावेळीं 'हा या श्रेष्ठ मंत्र्यांसह सर्व मेदिनीचा उपभोग घेईल' अशी आकाशवाणी व अंतरिक्षांतून पुष्पवृष्टि झाली. याप्रमाणें सर्व राज्यभार पुत्रावर टाकून राजा त्या प्रिय मृगांकवतीसह फार दिवसांपासून इच्छिलेलें ऐहिक सुख यथेच्छ भोगून शेवटीं वृद्ध झाला. तेव्हां हें सर्व असार आहे, असें जाणून आपलें राजपदही पूर्णपणें पुत्राच्या स्वाधीन करून आपले वृद्ध मंत्री व प्रिया यांसह सहस्रानीक हिमालयावर गेला.

---

# तरंग ३ रा.

## १. उदयनाची व्यसनशीलता.

त्या नंतर पित्यानें दिलेलें वत्स देशाचें राज्य प्राप्त झालें असतां, कौशाम्बींतच राहून उदयन प्रजेचें उत्तम प्रकारें रक्षण करूं लागला. पण पुढें कांहीं दिवसांनीं यौगंधरायणादि मंत्र्यांवर राज्यभार टाकून हळू हळू तो ऐहिक सुखांत गुंग झाला. तो सदा मृगयेस जाई व अहोरात्र सर्पानें दिलेली घोषवती वीणा वाजवीत बसे. जणुं काय महामंत्रानेंच वश केल्याप्रमाणें त्या वीणेच्या मंजुळ ध्वनीनें अरण्यांत वश केलेल्या वन्य मत्त हत्तीस धरून तो आपल्या राजधानींत आणीत असे. त्या वत्सराजास मद्याचाहि अतिशय नाद लागला. 'कुल व रूप यांनीं अनुरूप असलेली भार्या मला कशी प्राप्त होईल? मला योग्य अशी एक वासवदत्ताच आहे; पण ती माझ्या शत्रूची कन्या असल्यामुळें मला मिळणें शक्य नाहीं.' इत्यादि चिंतेनेंही त्याला अगदीं व्याकूल करून सोडलें. तिकडे उज्जयिनीचा राजा चंडमहासेनही—'माझ्या वासवदत्तेला एक उदयनच योग्य वर आहे; पण तो विरुद्ध पक्षाचा असल्या कारणानें माझ्या अधीन होऊन रहाणार नाहीं; तो जामात व्हावा अशी तर माझी इच्छा आहे; याला एकच उपाय दिसतो. त्याला मृगयेचा फार नाद आहे, अरण्यांत हत्तींना धरण्याकरितां तो एकटाच फिरत असतो, तेव्हां त्याच्या पाळतीवर राहून युक्तीनें त्याला पकडून येथें आणवावें, आणि येथें आल्यावर युक्तिप्रयुक्तीनें वासवदत्तेची व त्याची गायनाच्या निमित्तानें ओळख करवून द्यावी, म्हणजे आपला मनोरथ अवश्य पूर्ण होईल. या वांचून दुसरा उपाय दिसत नाहीं,' असा विचार करूं लागला. एकदा चंडिकेच्या मंदिरांत जाऊन देवीची पूजा व स्तुति केल्यावर आपला एवढा हा मनोरथ सफल व्हावा, अशी तो देवीची प्रार्थना करूं लागला. तेव्हां 'राजा, तुझें इष्ट लवकरच सिद्ध होईल,' अशी तेथें झालेली आकाशवाणी त्यानें ऐकिली. त्यानंतर देवीच्या या वरानें संतुष्ट झालेला चंडमहासेन बुद्धदत्त-मंत्र्याशीं त्याविषयीं संकेत करूं लागला. तेव्हां मंत्री म्हणाला, "मानी, निर्लोभ, स्नेहयुक्त भृत्यांनीं संपन्न व महाबलाढ्य राजाशीं प्रथम सामाचा उपयोग करावा;

कारण सामानें कार्यसिद्धि सहज होणार आहे. मंत्र्याचा हा पोक्त विचार ऐकून राजानें एका हुषार दूतास जवळ बोलाविलें, व तूं–' कौशाम्बीस जा, आणि माझी कन्या गायनकला शिकण्याकरितां तुझी शिष्या होण्याची इच्छा करीत आहे, यास्तव तुझें जर आम्हांवर प्रेम असेल, तर तूं येथें ये, व तिला गायनकला शिकीव, असा माझा निरोप वत्सराजास सांग '–अशी आज्ञा करून त्यास रवाना केलें. दूतानेंही आज्ञेप्रमाणें निरोप कळविला. पण तें अनुचित वचन ऐकून मानी वत्सराजास क्रोध आला, व तो यौगंधरायणास म्हणाला, "चंडमहासेन राजानें गर्वानें मला असा अनुचित निरोप काय म्हणून पाठविला ? त्यांत त्या दुरात्म्याचा अभिप्राय तरी काय आहे ?" राजाचें हें भाषण ऐकून स्वामीच्या हिता-मध्यें रत असलेला तो महामंत्री म्हणाला:–'महाराज, चांगल्या भूमीवर जशी एकादी लता पसरावी, त्याप्रमाणें तुमच्या व्यसनित्वाची ख्याति जगभर पसरली आहे, व त्याचेंच हें कडु फल होय. आपण व्यसनी आहां, असें समजून व आपल्या कन्येचा लोभ दाखवून तो तुम्हांला वश करण्याच्या विचारांत आहे. यास्तव कृपा करून व्यसनांचा त्याग करा. खड्ड्यांतील हत्तींप्रमाणें व्यसनासक्त राजे शत्रूंच्या हातांत सहज सांपडतात.'

ऐकतांना अगदीं कडु, पण परिणामीं अमृततुल्य मधुर वाटणारें असें तें त्या निःस्पृह मंत्र्याचें भाषण ऐकून उदयनानें 'तुझ्या कन्येला जर माझी शिष्या व्हावयाचें असेल, तर तिला येथें येऊं दे.' असा आपल्या दूताबरोबर चंडमहासेनास उलट निरोप पाठविला, व पुनरपि तो मंत्र्यांस म्हणाला: " अथवा मीच स्वतः जाऊन त्या मत्त राजास येथें बांधून आणतों." राजाचें हें साहसाचें भाषण ऐकून यौगंधरायण पुनः म्हणाला, 'प्रभो, असें करणें युक्त व शक्यही नाहीं; कारण तो राजा मोठा प्रभाव-वान् आहे. त्याचें पूर्ववृत्त मी सांगतों तें ऐका.'

## २. चंडमहासेनाची कथा.

उज्जयिनी म्हणून एक महानगरी आहे. ती या लोकाचें एक प्रधान-भूषणच आहे, असें म्हटलें तरी चालेल. चुनेगच्ची केलेल्या उंच उंच शुभ्र प्रासादांच्या योगानें ती जणुंकाय देवांच्या अमरावतीस हंसतच असते. कैलासवासाचें सुख सोडून स्वतः शंकरही त्या नगरींत महाकाल

या नावानें येऊन राहिला आहे. तेथें महेंद्रवर्मा म्हणून एक राजाधिराज होता. त्याला त्याच्याच सारखा जयसेन नांवाचा पुत्र झाला. त्याचाच हा अप्रतिम पराक्रमी महासेन पुत्र होय. तो पित्याच्या मागें प्रजापालन करीत असतांना, 'मजजवळ चांगलेंसें एकादें खड्ग व कुलानुरूप भार्या नाहीं' असें त्याच्या मनांत आलें, आणि त्या दोन्ही अप्रतिम वस्तूंकरितां तो महासेन चंडिकेच्या मंदिरांत गेला. तेथें निराहार राहून पुष्कळ दिवस त्यानें चंडिकेची आराधना केली; पण असल्या सौम्य आराधनेनें देवी प्रसन्न होत नाहीं, असें जेव्हां त्याला वाटलें, तेव्हां आपल्या अंगाचें मांस तोडून काढून, त्याचा होम करण्यास महासेनानें आरंभ केला. तेव्हां चंडिका प्रसन्न होऊन साक्षात् त्यास म्हणाली, "वत्सा, तुझ्या या साहसानें मी संतुष्ट झालें आहें. हें माझेंच उत्तम खड्ग तूं घे. याच्या प्रभावानें तूं शत्रूस अजिंक्य होशील; व अंगारकासुराची अतिसुंदर अंगारवती कन्या तुला शीघ्र प्राप्त होईल. मला संतुष्ट करण्याकरितां ज्याअर्थी तूं हें अतिशय चंडकर्म केलें आहेस, त्याअर्थी चंडमहासेन असें तुझें नांव प्रसिद्ध होईल." असें सांगून खड्ग दिल्यावर ती देवी गुप्त झाली. देवीनें दिलेल्या या खड्गाप्रमाणेंच नडागिरि या नांवाचा एक अपूर्व हत्तीही त्याच्यापाशीं आहे. या दोन सर्वोत्तम वस्तूंमुळें, तो राजा वज्र व ऐरावत यांनी युक्त असलेल्या इंद्राप्रमाणें अजिंक्य झाला आहे."

"त्या दोन अलौकिक वस्तूंमुळें सर्वप्रकारें सुखी झालेला तो नरपति एकदा मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला असतां, दिवसा एकांत स्थळीं बसलेला एक मोठा धिप्पाड व काळाकुट्ट रानडुकर त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां, तो सामान्य डुक्कर आहे, असें समजून राजानें त्याच्यावर तीक्ष्ण बाण फेकिले. पण त्यांस न जुमानतां तो वराह राजाच्या रथास धक्का देऊन एका बिळांत शिरला. तेव्हां राजाही क्रोधानें धनुष्य घेऊन रथांतून खालीं उतरला व त्याच्या मागें लागला. बिळांत शिरून पुष्कळ दूरवर गेला, तों त्याला एक रम्य नगर दिसलें. तें पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें; पण पुष्कळ चालून आल्यामुळें थकलेला चंडमहासेन एका वापीच्या तीरावर बसला. इतक्यांत त्याला एक सुंदर कन्या दिसली. ती शंभर स्त्रियांसह फिरत होती. रतीसारख्या त्या रमणीय कन्येचीही या मदना-सारख्या तरुण राजाकडे दृष्टि गेली. त्याबरोबर प्रेमवश झालेली, ती सुंदरी

राजाजवळ येऊन–' बा सुभगा तूं कोण, व येथें कसा आलास?'–असें विचारूं लागली. तेव्हां राजानें सर्व वृत्तांत तिला सांगितला. तो ऐकून ती मृगनयना शतधैर्य होऊन नेत्रांतून अश्रु ढाळूं लागली.

तो चमत्कार पाहून चंडमहासेनानें 'तूं कोण, कोणाची व रडतेस कां?' असें तिला विचारलें. तेव्हां ती म्हणाली, "अरे महाउदारा, तुझ्या रथास धक्का देऊन बिळांत शिरलेला वराह खरा जंगली वराह नव्हे. तर तो माझा पिता अंगारकाख्य दैत्य आहे. माझें नांव अंगारवती. माझ्या पित्याचें अंग वज्रासारखें सदृढ आहे. शस्त्रांचाही त्याच्यावर परिणाम होत नाहीं. मजबरोबर असलेल्या या सर्व सख्या राजकन्या आहेत. माझ्या बापानें राजगृहांतून त्यांना आणून माझ्या परिचर्येकरितां मजजवळ ठेविलें आहे. शापामुळें हा या योनींत आला आहे. आज तो फार थकला होता व त्याला तहानही लागली होती, म्हणून त्यानें तुला जिवंत सोडलें. आतां वराहरूप सोडून तो जरासा निजला आहे, पण उठला म्हणजे खचित तुला मारील; हें मनांत आल्यामुळें मला रडूं आलें."

त्या ममतालु दैत्यकन्येचें तें प्रेमळ भाषण ऐकून राजा म्हणाला, "सुंदरि, तुझा जर मजवर अनुग्रह असला, तर तूं माझें एवढें हें काम कर. तुझा पिता जागा झाला म्हणजे तूं त्याजपाशीं जाऊन रडूं लाग, व तो तुला रडण्याचें कारण विचारूं लागला कीं–'तुला जर कोणीं मारलें तर मग माझी काय वाट होईल? हें मनांत आल्यामुळें मी रडत आहें, असें त्याला सांग.' तूं एवढें माझें कार्य केलेंस कीं, आपले उभयतांचेही मनोरथ पूर्ण होतील." राजाचें तें म्हणणें तिनें मान्य केलें; व आपल्या प्रियतमाचें कांहीं अनिष्ट होऊं नये, म्हणून त्याला जवळच लपवून ठेवून ती बापापाशीं रडत बसली. तिच्या रडण्याचा ध्वनि ऐकून दैत्य खडबडून जागा झाला, व अगदीं कळवळून–"बाळे, कांग रडतेस?"–म्हणून विचारूं लागला. तेव्हां वर सांगितल्याप्रमाणें तिनें रडण्याचें कारण सांगितलें. तें ऐकून तो दैत्यराज मोठ्यानें हंसला; व 'अग खुळे, मला कोण मारणार? माझा सर्व देह वज्रमय आहे. माझें मर्मस्थान माझ्या या डाव्या तळहातांत आहे; पण आपल्या धनुष्याच्या योगानें मी त्याचें सदा रक्षण करीत असतों.' असें म्हणून तो तिचें समाधान करूं लागला. तेव्हां तें सर्व गुह्य भाषण राजानें ऐकलें. आपल्या प्रिय कन्येचें

समाधान झालें आहे, असें पाहून दैत्यही तात्काळ उठला. त्यानें स्नान केलें व मौन धारण करून तो शंकराची आराधना करूं लागला.

ती संधि साधून राजानें धनुष्य सज्ज केलें व त्याला युद्धास बोलाविलें; पण दैत्यास बोलावयाचें नसल्यामुळें तो डावा हात उचलून क्षणभर थांब, अशी खूण करूं लागला. पण राजानें तिकडे लक्ष न देतां लगबगीनें त्याच्या डाव्या हातांत मर्म-भेदक बाण मारिला. त्या बरोबर घोर ध्वनि होऊन तो दैत्य भूमीवर पडला. व मरतां मरतां ' तहानलेल्या मला ज्यानें मारलें आहे, त्यानें मला जर प्रतिवर्षी जल देऊन तृप्त न केलें, तर त्याचे पांच मंत्री मरतील. ' असें म्हणून त्यानें प्राण सोडिले. नंतर त्याच्या अंगारवती कन्येस घेऊन राजा उज्जयिनीस आला.

आपल्या राजधानींत आल्यावर त्याने तिच्याशीं यथाशास्त्र विवाह केला. पुढें त्याला तिच्या ठायीं गोपालक व पालक असे दोन पुत्र झाले. त्यांच्या जन्माचे वेळी राजानें इंद्रमहोत्सव केला, त्यामुळें इंद्र संतुष्ट झाला व स्वप्नांत त्याला म्हणाला,—" राजन्, माझ्या प्रसादानें तुला एक निरुपम कन्या होईल."

त्याप्रमाणें कांहीं दिवसांनीं राजाला एक कन्या झाली. तिच्या जन्माच्या वेळीं—'हिला कामदेवाचा अवतार व विद्याधरचक्रवर्ती असा एक पुत्र होणार आहे '—अशी आकाशवाणी झाली. संतुष्ट झालेल्या वासवानें वररूपानें ती दिलेली असल्यामुळें, तिच्या बापानें तिचें नांव वासवदत्ता असेंच ठेविलें. सांप्रतकाळीं चंडमहासेन त्या अलौकिक कन्येच्या विवाहाचा विचार करीत आहे व त्याला आपणच एक अनुरूप पति अहां, हेंही त्याला माहीत आहे. ती सुंदरी सागरांत रहाणाऱ्या लक्ष्मीप्रमाणें, या वेळीं पित्याच्या घरीं सुखानें राहिली आहे. सारांश हे प्रभो, त्या राजाचा असा प्रभाव आहे. किल्ल्यांत सुरक्षित राहिलेल्या राजाप्रमाणेंच तो अजिंक्य आहे. तो मानी स्वपक्षाचा महोदय व्हावा, अशी इच्छा करीत असून, ती कन्या तुम्हालाच द्यावी, असाही त्याचा दृढ संकल्प झाला आहे आणि ती देखील आपल्यालाच वरणार हेंही निश्चित आहे.

यौगंधरायण मंत्र्याचें हें हित, मित व सत्य भाषण ऐकून वत्सराजाचे मन वासवदत्तेविषयीं अधिकच उत्सुक झालें.

---

# तरंग ४ था.

## १. वत्सराजाची कैद.

इतक्यांत वत्सराजानें पाठविलेला दूत उज्जयिनीस पोंचला. त्यानें आपल्या राजाचा निरोप चंडमहासेनास कळविला. तो ऐकून चंडमहासेन विचारांत पडला.–वत्सराज मोठा मानी आहे, तो येथें येत नाहीं, कन्येला त्याच्याकडे पाठविणेंही योग्य नाहीं, कारण तसें केल्यास आपल्याकडे लघुता ( हलकेपणा ) येईल, यास्तव आतां युक्तीनेंच त्याला पकडून आणलें पाहिजे – असा विचार करून व आपल्या मंत्र्यांची संमति घेऊन, त्यानें आपल्या हत्तीसारखा एक यंत्रहत्ती करविला. त्या लांकडी खोट्या हत्तीच्या पोटांत सशस्त्र शूर पुरुष गुप्तरीतीनें ठेविले. आणि त्याला विंध्यारण्यांत सोडलें. यंत्राच्या कळीवर तो मायावी हत्ती इतस्ततः फिरत असे. वत्सराजानें हत्तीच्या पाळतीवर रहाण्याकरितां त्या अरण्यांत ठेविलेल्या हेरांनीं दुरूनच त्या भयंकर हत्तीस पाहिलें व लागलेंच ते राजाकडे येऊन, 'महाराज, सत्वर चला, विंध्यारण्यांत एक फार मोठा हत्ती आला आहे, तो चालणारा विंध्याद्रीच आहे कीं काय असें वाटतें.' इत्यादि सांगूं लागले. ते ऐकून हत्तीचें ज्याला व्यसनच लागलें आहे, असा तो उदयनराजा फार आनंदित झाला, आणि तें वर्तमान सांगणाऱ्या हेरांस त्यानें एकलक्ष सुवर्ण पारितोषिक दिलें. हा हत्ती जर आपल्याला मिळाला, तर चंडमहासेनाच्या नडागिरीचा तो प्रतिमल्ल असल्यामुळें मला त्याला सहज वश करून घेतां येईल व त्यानंतर तो आपली वासवदत्ता मला आपोआप देईल. इत्यादि विचार करीत, त्यानें ती रात्र कशीतरी घालविली. दुसरा दिवस उजाडतांच मंत्र्याच्या हितकर वचनाचा अनादर करून, व 'राजन्, हें प्रस्थानलग्न कन्यालाभ करून देणारें आहे खरें; पण तें बंधन देणारेंही आहे' असें ज्योतिष्यांनीं सांगितलें होतें, तरी तिकडे लक्ष न देतां त्या चारांस बरोबर घेऊन तो विंध्यारण्यांत गेला. त्यानें आपल्याबरोबर निवडक सैन्यही नेलें होतें, पण इतक्या लोकांस पाहून तो पशु कदाचित् भिऊन पळून जाईल, या शंकेनें त्या सर्वांस दूर ठेवून राजा आपल्या प्रिय

वीणेला व एका हेराला घेऊन अरण्यांत शिरला. बरेंच आंत गेल्यावर विंध्याद्रीच्या दक्षिणभागीं तो खऱ्या गजासारखा दिसणारा मायागज हेरानें राजास दाखविला. त्या अपूर्व गजेंद्रास पहातांच हेरालाही पुढें न येण्याविषयीं सांगून, राजा वीणा वाजवीत व मंजुळ ध्वनीनें सुस्वर गात त्याच्याकडे जाऊं लागला. तो गंधर्वासारखा गायक अगदीं हळु हळु हत्तीपाशीं पोंचला, त्यावेळीं त्याचें मन गायनांत तल्लीन झालें होतें व सायंकाल झाल्यामुळें अंधकारही पसरूं लागला होता. त्या कारणानें तो हत्ती खरा आहे कीं खोटा याचा त्याला निर्णय करितां आला नाहीं. तो खराच आहे असें त्याला वाटलें. तो हत्तीही आपले कान उठवून गीतरसामध्यें आसक्त झाल्यासारखें दाखवूं लागला. त्यानें हळु हळु राजाला दूर नेलें आणि ठरलेल्या सुरक्षित जागीं जातांच त्याच्या पोटांतील सशस्त्र शूर बाहेर पडले. त्यांनीं त्या राजास चोहोंबाजूंनीं घेरलें. तें पाहून ' मंत्र्याच्या सदुपदेशाचा अव्हेर केल्यामुळें हा प्रसंग ओढवला, असें मनांत म्हणून तो राजा आपलें खड्ग उपसून समोरच्या लोकांशीं त्वेषानें लढूं लागला; पण दैव अनुकूळ नसल्यामुळें पाठीमागच्या लोकांनीं मागून येऊन त्याला धरलें. इतक्यांत आसपास लपून बसलेले दुसरेही त्यांच्या साह्यास आले, आणि अशा युक्तीनें त्याला धरून त्यांनीं चंडमहासेनाकडे नेलें. तो जवळच तेथें येऊन राहिला होता. वत्सराजास धरून आणलें आहे, असें कळतांच तो राजा मोठ्या आनंदानें त्याच्या पुढें गेला आणि त्याचें समाधान करून त्यासहवर्तमान आपल्या राजधानीकडे चालला.

आपला हा मोठाच अपमान झाला आहे, असें वाटल्यामुळें वत्सराजाचें मुख कलकयुक्त चंद्राप्रमाणें जरी किंचित् मलिन झालें होतें, तरी उज्जयिनींत प्रवेश करितांना तेथील पौरांना त्यानें नूतन चंद्राप्रमाणेंच आल्हाद दिला. हा आपला राजा कदाचित् याला मारील अशी भीति वाटल्यामुळें पौरजनांनीं ' या सर्व गुणसंपन्न शूरास आपण जर जीवानिशीं मारणार असलांत तर आम्हीही आपले प्राण ठेवणार नाहीं ' असा आपला निश्चय राजास कळविला. तेव्हां ' मी याला मारण्याकरितां कपटानें धरून आणलेलें नसून याच्याशीं सख्य करण्याकरितां, या मानी व सर्वोत्तम राजास येथें आणविलें आहे,' असा खरा वृत्तान्त सांगून राजानें क्षुब्ध पौरांस शांत करून सर्व प्रजाजनांचें प्रेम संपादन केलें. स्वमंदिरीं

आल्यावर राजानें आपली कन्या वासवदत्ता, गायन शिकविण्याकरितां वत्सराजाच्या स्वाधीन केली, व त्या उदयनास तो म्हणाला, "प्रभो, तूं या माझ्या कन्येला गांधर्वविद्या शिकीव; म्हणजे तुझें हित होईल, झाल्या गोष्टीबद्दल विषाद करूं नकोस."

त्या कन्येस पहातांच वत्सराजाचा सर्व क्रोध नष्ट झाला, व त्याच्या हृदयास स्नेहरसाचें भरतें आलें. वासवदत्तेचे नेत्र व मन हीं दोन्हीं एकाच वेळीं त्याच्याकडे गेलीं; त्यांतील नेत्र मात्र लज्जेनें परत फिरले, परंतु मन कांहीं केल्या परतेना. त्यानंतर वत्सराज तिला गाणें शिकवीत त्याच गांधर्वशाळेंत राहूं लागला. मांडीवर ती घोषवती वीणा, कंठांत गायनाचा स्वर व पुढें बसलेली वासवदत्ता या त्रिकानें त्याच्या मनास फार आनंद दिला. वासवदत्ताही अक्षय लक्ष्मीप्रमाणें, प्रतिबद्ध होऊन राहिलेल्या वत्सराजाची अनन्य भक्तीनें परिचर्या करूं लागली.

## २. वत्सराजाला बंधमुक्त करण्याचा मंत्र्यांचा प्रयत्न.

इकडे वत्सराजाच्या बरोबर गेलेलें निवडक वीरांचें सैन्य कौशांबीस परत आलें, व त्यांनीं आपल्या राजास बांधून नेल्याची वार्ता प्रधानांस कळविली. थोडयाच अवकाशांत ती घोर वार्ता राष्ट्रभर पसरली, त्यामुळें तें सर्व राष्ट्र क्षुब्ध झालें. आपल्या स्वामीकरितां प्राण देण्यास तयार असलेले ते वीर चिडून गेले, व सत्वर जाऊन उज्जयिनीस वेढा द्यावा, असें सर्व राष्ट्रानें ठरविलें. पण महामति रुमण्वानानें सज्ज झालेल्या त्या असंख्य लोकांचें निवारण करून म्हटलें; "वीरांनों, चंडमहासेन नुस्त्या सामर्थ्यानें साध्य होण्यासारखा नाही. तो फार मोठा राजा आहे. शिवाय आम्हीं त्याला आतांच चिडविल्यास वत्सराजाचें शरीर सुरक्षित रहाणार नाहीं, यास्तव एकाएकीं त्यावर चालून जाणें बरें नव्हे. बुद्धि व युक्ति यांच्या योगानें अगोदर आपल्या राजाला सोडवून आणलें पाहिजे."

त्या महामंत्र्याच्या या विचारपूर्ण भाषणानें वीर-जन शांत झाले असतां, धीरस्वभाव यौगंधरायण तें सर्व राष्ट्र राजावर अनुरक्त व व अनन्यवृत्ति आहे, असें जाणून रुमण्वानादिकांस म्हणाला,—"तुम्ही सर्व सतत उद्योगशील व सज्ज होऊन येथेंच रहा; कारण प्रथम राष्ट्राचें संरक्षण करावें, व नंतर योग्यसमयीं पराक्रम गाजवावा, अशी नीति

आहे. मी वसंतकासह उज्जयिनीस जाऊन बुद्धि व युक्ति यांच्या योगानें वत्सेशास सोडवून आणतों. जलाचा वर्षाव होत असतांना विजेची ज्योति जशी विशेषेंकरून पेटते, त्याप्रमाणें विपत्तींत ज्याची बुद्धि विकास पावते तोच धीर होय.* मी मोठाल्या कोटांस फोडण्याचे, शृंखलांस तोडण्याचे व गुप्त करण्याचे प्रयोग जाणतों. त्यांचा योग्यसमयीं उपयोग करून आपल्या स्वामीस सोडवीन"—असें बोलून व सैन्यादिकांसह सर्व राष्ट्र रुमण्वानाच्या स्वाधीन करून वसंतकासह तो (यौगंधरायण) कौशांबींतून निघाला व आपल्या नीतिप्रमाणेंच दुर्गम असलेल्या विंध्याटवींत शिरला. तेथें विंध्यपर्वताच्या पूर्व पायथ्याशीं वत्सराजाचा मित्र पुलिंद नामक शबरांचा राजा रहात होता. त्यास भेटून व हें सर्व वर्तमान सांगून त्याच मार्गानें येणाऱ्या वत्सेश्वराचें रक्षण करण्याकरितां ससैन्य सज्ज रहाण्याविषयीं विनंति केल्यावर तो महामंत्री वसंतकासह उज्जयिनीजवळच्या महाकालसंज्ञक श्मशानांत गेला. तें स्थान जणुं काय चालते-बोलतें चिताधूमच, अशा काळ्याकुट्ट वेताळांनींच भरलेलें होतें. तेथें योगेश्वर म्हणून एक ब्रह्मराक्षस होता. त्याला यौगंधरायणाचें दर्शन होतांच आनंद झाला, व त्यानें त्याचें मित्रत्व संपादिलें. त्यानें सांगितलेल्या युक्तीनें त्या मंत्र्यानें तात्काल आपलें रूप बदललें. त्यामुळें तो कुरूप, कुबडा, वृद्ध, उन्मत्त-वेषधारी, डोक्यास टक्कल पडलेला व त्याच्याकडे पहातांच लोकांना हंसूं येईल असा झाला. त्याच युक्तीनें त्यानें वसंतकालाही मोठ्या पोटाचा, दांताळ, दुर्मुख, कुरूप व ज्याच्या अंगांतील जाड शिरा स्पष्ट दिसत आहेत असें बनविलें. नंतर वसंतकाला अगोदर राजद्वारीं पाठवून मागून तो स्वत: नगरींत शिरला. आंत जातांच तो नाचत, गात, पोरांच्या घोळक्यांनीं परिवेष्टित होऊन नगरांतील लोक कौतुकानें पहात असतां, राजवाड्याकडे चालला. त्याचा हास्यजनक वेष व विचित्र नृत्यादिक यांच्याकडे पाहून अंत:पुरांतील स्त्रीवर्गाचेंही चांगलें मनोरंजन झालें. शेवटीं ती वार्ता वासवदत्तेच्या कानावर गेली. तेव्हां तिलाही त्याला पहावेंसें वाटलें व चेटीला पाठवून तिनें त्या सोंगाड्याला गांधर्वशाळेंत आणविलें. कारण नूतन वय थट्टामस्करीविषयीं मोठें उत्सुक असतें. ‡

*जलाहतौ विशेषेण वैद्युताग्नेरिव द्युतिः। आपदि स्फुरति प्रज्ञा यस्य धीरः स एव हि॥

‡ नर्मैकसादरं हि नवं वयः।

त्यावेळीं यौगंधरायणानें जरी वेड्याचा वेष घेतला होता, तरी आपला स्वामी प्रतिबंधांत पडला आहे, असें पाहून त्याच्या नेत्रांतून अश्रु गळूं लागले; पण विवेकानें अश्रूंचें निवारण करून त्यानें वत्सराजास खूण केली. त्याबरोबर हा आपला महाप्राज्ञ मुख्य मंत्री वेष बदलून आपल्याकरितां आला आहे, असें राजानें ओळखिलें. कांहीं वेळ गेल्यावर युक्तिसामर्थ्यानें त्या मंत्र्यानें वासवदत्ता व तिच्या सर्व दासी यांस आपण दिसूं नये असें केलें. तो चमत्कार पाहून विस्मित झालेल्या त्या सर्वजणी 'तो वेडा इतक्यांत कोठें गेला ?' असें म्हणूं लागल्या. तें ऐकून व यौगंधरायण तर येथेंच आहे असें पाहून, आणि हें सर्व योगसामर्थ्यानें यानें केलें आहे, असें जाणून, राजा वासवदत्तेस म्हणाला, "सुंदरि, तूं आतां येथून जा, व सरस्वती पूजेचें साहित्य घेऊन ये."

आज्ञेप्रमाणें ती आपल्या सख्यांसह तेथून गेली. योग्य अवसर मिळतांच यौगंधरायणानें राजास शृंखला तोडण्याचा उपाय सांगितला. वासवदत्तेच्या वीणेच्या तारांमध्यें दुसरे वशीकरणयोग योजिले, व म्हटलें, "राजन्, येथें आपला वसंतकही आला आहे. तो आपलें रूप बदलून राजद्वारीं उभा आहे. त्या ब्राह्मणाला येथें आपल्यापाशीं आणा. वासवदत्ता जेव्हां तुम्हांवर पूर्ण विश्वास ठेवील; तेव्हां मी सांगेन तसें करा. तोंपर्यंत आपण येथेंच रहावें." असें सांगून तो त्या गायनशाळेंतून निघून गेला. इतक्यांत वासवदत्ताही पूजासाहित्य घेऊन आली. तिला वत्सराज म्हणतो,—"बाळे, बाहेर द्वारावर कोणी ब्राह्मण उभा असला, तर त्याला या सरस्वतीपूजनाची दक्षिणा देण्याकरितां आंत बोलावून आणीव." ते ऐकून 'बरें आहे' असें म्हटल्यावर तिनें तात्काल त्या विद्रूप वसंतकाला आंत आणविलें. आंत येतांच आपला प्रभु कैद्याप्रमाणें बद्ध होऊन राहिला आहे, असें पाहून वसंतक शोकानें रडूं लागला; पण ती त्याची अवस्था पाहून आपली ही युक्ति फसूं नये म्हणून "ब्राह्मणा, तुझें हें रोगवैरूप्य मी औषधानें हटवीन, तूं रडूं नकोस, तूं येथेंच मजजवळ रहा." असें म्हटलें. तेव्हां 'महाराज, मजवर आपला हा मोठाच प्रसाद झाला.' असें तोही मोठ्या संतोषानें म्हणाला.

वसंतकाची ती विलक्षण विरूपता पाहून राजा स्मितमुख झाला, व त्याचें कारण ओळखून वसंतकही अधिकच विरूपता दाखवून हंसूं ला-

गला. वासवदत्ताही त्या हसणाऱ्या व एकाद्या चमत्कारिक सोंगासारख्या दिसणाऱ्या ब्राह्मणास पाहून हंसूं लागली. तिला संतोष झाला, व कौतुकानें ती म्हणाली, "भटजी, तुम्ही कांहीं शास्त्रादि शिकलां आहां काय? एकादी चांगलीशी विद्या अवगत असल्यास ती आम्हांलाही आपल्यापासून शिकतां येईल." तें ऐकून तो म्हणतो,—देवि, मी फारसें कांहीं शिकलों नाहीं; पण मला कथा सांगतां येतात.–'तर मग मला एकादी गोष्ट सांगा पाहूं.' असें तिनें पुनः म्हटलें. तेव्हां, तो ब्राह्मण हास्य व वैचित्र्य यांनीं रमणीय वाटणारी अशी पुढील कथा सांगूं लागला.

## ३. लोहजंघाची कथा.

मथुरा म्हणून नगरी आहे. त्या नगरींतच कंसाला मारण्याकरितां भगवान् नारायणानें अवतार घेतला. तेथें रूपणिका म्हणून कोणीएक प्रख्यात वेश्या होती. नांवा प्रमाणेंच ती सुस्वरूप असे. मकरदंष्ट्रा या नांवाची तिची वृद्ध माताच तिची कुंटिण होऊन राहिली होती. एकदां पूजेच्या वेळीं देवगृहास गेलेल्या रूपणिकेनें एका तरुण व सुंदर पुरुषास पाहिलें. त्याचें दर्शन होतांच तो तिच्या हृदयांत शिरला व तिच्या आईनें केलेले सर्व उपदेश त्यांतून निघून गेले. ती आपल्या चेटीस म्हणाली, "तूं या पुरुषाजवळ जा, व–आपण आज माझ्या येथें यावें–अशी त्यास प्रार्थना कर." चेटीनें आज्ञेप्रमाणें केलें. तेव्हां थोडासा विचार करून तो तरुण ब्राह्मण चेटीस म्हणाला: "भद्रे, लोहजंघ म्हणून मी निर्धन ब्राह्मण आहें. तेव्हां श्रीमानानांच जाण्यास योग्य असलेल्या रूपिणीच्या येथें माझी काय दाद लागणार?" त्यावर 'आमची स्वामिनी तुजपासून धनाची इच्छा करीत नाहीं' असें चेटीनें सांगितलें. तेव्हां लोहजंघानें तिचें म्हणणें मान्य केलें, व चेटी स्वामिनीकडे परत गेली.

नंतर दासीनें सांगितलेला वृत्तांत ऐकून अतिशय उत्सुक झालेली रूपिणी आपल्या घरीं गेली, व त्याच्या मार्गाकडे दृष्टि लावून बसली. कांहीं वेळानें लोहजंघ तिच्या येथें आला. तेव्हां 'हा कोण?' असें म्हणून कुंटिण वक्रदृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली; पण रूपिणी त्याला पहातांच स्वतः उठून आणि मोठ्या आदरानें व आनंदानें आलिंगन देऊन अंतर्गृहांत घेऊन गेली. तेथें तो उपभोग घेऊं लागला असतां, ती वेश्या

आपल्या जन्माचें साफल्य मानून त्याच्या अगदीं अधीन होऊन राहिली. व तो तरुणही दुसऱ्या सर्व आसक्ती सोडून व तत्परायण होऊन तिच्याच येथें राहूं लागला.

हा सर्व अनिष्ट प्रकार पाहून तिची माता मकरदंष्ट्रा खिन्न झाली. तिचे सर्व मनोरथ विफल झाले, व ती एकदां मोठ्या दुःखानें म्हणाली, " पुत्रि, तूं या निर्धन पुरुषाचें सेवन कसें करीत राहिली आहेस ! साधु पुरुष शठाला जसा स्पर्श करीत नाहींत, तशाच गणिका निर्धनास स्पर्श करीत नाहींत. कर्मठ ब्राह्मण शवाला अपवित्र समजूनही शिवतात; पण वेश्या निर्धनास केवळ अस्पृश्य समजूनच रहात नाहींत; तर त्याला स्पर्शही करीत नाहींत. अग वेडे, प्रेम कोठें व वेश्यात्व कोठें? मी तुला आजपर्यंत इतकें शिकविलें; पण तूं तें सर्व विसरलीस ! मुलि, सध्या समयाप्रमाणें वेश्या ही किंचित् काल रागिणी ( लाल रंग युक्त व प्रेमयुक्त ) असते. नटीप्रमाणें वेश्येनेंही द्रव्याकरितां कृत्रिम प्रेम दाखवावें, अशी नीति आहे. यास्तव या निर्धनाचा त्याग कर, व आपला नाश करून घेऊं नकोस."

आईचें हें भाषण ऐकून रूपिणीला फार राग आला. ती म्हणाली, "आई तूं असें बोलूं नकोस. तो मला प्राणाहूनही प्रिय आहे. माझ्या पाशीं पुष्कळ धन आहे. आणखी अधिक मिळवून काय करावयाचें आहे? तूं पुनरपि मला ही गोष्ट सांगूं नकोस." तें ऐकून ती दुष्ट कुंटीण अतिशय रागावली व त्याला घरांतून घालवून देण्याचा उपाय शोधूं लागली.

एकदा त्या मकरदंष्ट्रेनें मार्गानें सशस्त्र पुरुषांसह जात असलेल्या एका राजपुत्रास पाहिलें, व त्याच्याजवळ येऊन ती म्हणाली, "राजपुत्रा, कोणी एक निर्धन पुरुष माझ्या येथें येऊन राहिला आहे. तो कांहीं केल्या जात नाहीं. यास्तव तूं माझ्या घरीं चल व तो जाईल असें कर, आणि माझ्या रूपिणिकेचा उपभोग घे." हें तिचें इष्ट म्हणणें ऐकून 'ठीक आहे' असें म्हणून तो तिच्या बरोबर तिच्या येथें गेला. त्यावेळीं रूपिणिका देवालयास गेली होती व लोहजंघ कोठें बाहेर गेला होता. कांहीं वेळानें तो तरुण ब्राह्मण परत आला, व रोजच्याप्रमाणें निःशंकपणानें घरांत जाऊं लागला. तों इतक्यांत राजपुत्राच्या अनुचरांनीं पाद-प्रहारादिकांनीं त्यास अंगभर मारलें, व कोठें तरी अशुद्ध खड्ड्यांत नेऊन टाकलें;

पण आयुष्य संपलें नसल्यामुळें तो कसा तरी त्यांतून निघून प्राण वांचविण्याकरितां पळून गेला.

इतक्यांत इकडे रूपिणिका आपल्या घरीं परत आली, व तो सर्व वृत्तान्त ऐकून अतिशय दुःखी झाली. तें पाहून निराश झालेला राजपुत्रही आल्या मार्गानें परत गेला. तिकडे लोहजंघ मकरदंष्ट्रेनें केलेला हा अपमान व रूपिणीचा वियोग असह्य झाल्यामुळें प्राणत्याग करण्याचा निश्चय करून तीर्थास जावयास निघाला. अरण्यांतून जात असतांना आंतून कुंटिणीच्या रागानें व बरून सूर्याच्या प्रखर उन्हानें तो संतप्त झाला, आणि विश्रांति व छाया यांची इच्छा करूं लागला; पण त्याला चांगलासा वृक्ष आढळेना. कांहीं वेळानें त्याला एक पोकळ हत्तीचें शरीर दिसलें. पश्चिमद्वारांतून प्रवेश करून कोल्ह्यांनीं आंतील सर्व मांस खावून टाकल्यामुळें तें चामड्याच्या विस्तृत पिशवीप्रमाणें झालें होतें. त्यांत क्षणभर विश्रांति घेण्यासारखी छायायुक्त जागा आहे, असें पाहून तो ब्राह्मणहि त्याच्या पश्चिमद्वारानेंच आंत शिरला व त्या शीतलस्थानीं निजला. मार्ग चालून थकल्यामुळें त्याला तात्काल झोंपही लागली.

इतक्यांत एकाएकीं उद्भवलेल्या मेघसमूहानें गगनमंडल आच्छादित करून सोडलें, व मोठी वृष्टि होऊं लागली. सतत जल पडल्यामुळें तें हत्तीचें पोकळ शरीर फुगलें व त्याचें छिद्र बंद झालें. इतक्यांत वरून मोठा पूर आला. त्याबरोबर तें चर्ममय गजशरीर वाहून जाऊं लागलें. कांहीं कालानें गंगेस जाऊन मिळणाऱ्या त्या ओहोळाबरोबर तेंही गंगेंत गेलें. गंगाप्रवाहांतून जोरानें वहात जाऊन तें समुद्राच्या अगाध जलांत तरंगूं लागलें. तों आकाशांतून जात असलेल्या एका गरुडवंशज पक्ष्याची दृष्टि त्याच्याकडे गेली व मांसाच्या आशेनें त्याच्यावर झडप घालून, तो त्याला चोंचीनें समुद्राच्या पार घेऊन गेला. पण त्या गजशरीरास फाडून पहातांच त्यांत मांसाचा लेशही नसून केवल एक जिवंत मनुष्य आहे, असें त्यास आढळलें. मनुष्यास पहातांच भीतीनें तें हत्तीचें शरीर तेथेंच टाकून तो पक्षी उडून गेला.

गजशरीर भूमीवर पडल्यामुळें जो धक्का बसला, त्यानें लोहजंघ जागा झाला व त्या पक्ष्यानें केलेल्या छिद्रांतून बाहेर आल्यावर आपण समुद्राच्या पार अगदीं अपरिचित स्थानीं येऊन पडलों आहों, असें त्यास कळलें. तें

गौडबंगाल अथवा जागेपणचें स्वप्न पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत एकाएकीं तेथें आलेल्या दोघां राक्षसांस पाहून तो भयभीत झाला. राक्षसांनींही त्याला दुरून आश्चर्यचकित होऊनच पाहिलें; कारण त्यांस रामाच्या पराक्रमाची अजून आठवण होती. त्यामुळें त्याच्यासारखाच हा एकटा मानुष समुद्राच्या पार आलेला पाहून त्यांस भीति वाटणें साहजिक होतें. असो; पुढें आपल्याशींच विचार करून त्यांतील एक राक्षस बिभीषण राजाकडे गेला व त्यानें हा पाहिलेला वृत्तांत त्यास कळविला. तेव्हां रामाचा प्रभाव जाणणाऱ्या विभीषणालाही मनुष्य आला आहे, असें कळतांच भय वाटलें, व तो त्याच राक्षसास म्हणाला; "बा अनुचरा, माझ्या आज्ञेनें तूं जा व-कृपाकरून आमच्या येथें या.-असें प्रेमानें त्याला सांगून येथें घेऊन ये."

त्याबरोबर 'ठीक आहे' असें म्हणून तो राक्षस लोहजंघाकडे आला, व त्याला आपल्या राजाची प्रार्थना कळविली. त्यानें, शांत चित्तानें येण्याचें मान्य केल्यावर ते दोघेही राक्षस त्यास घेऊन गेले. लंकेंतील सुवर्णमय मोठालीं गृहें पाहून आश्चर्यचकित झालेला तो लोहजंघ राजभवनास येऊन पोंचला, व आंत जाऊन त्यानें लंकापति विभीषणास पाहिलें. राजानेंही त्याचें उत्तम आतिथ्य केलें, व आशीर्वाद देऊन योग्य आसनावर बसविलें. आणि 'महाराज, आपण येथें कसे आलां?' असा प्रश्न केला. तेव्हां तो धूर्त लोहजंघ म्हणाला:—

'राजन्, मी मथुरेंत रहाणारा लोहजंघ नामक दरिद्री ब्राह्मण आहें. दारिद्र्यदुःखानें पीडल्यामुळें मी नुक्ताच देवालयांत नारायणासमीप जाऊन कांहीं आहार न करितां घोर तप करीत बसलों, पण कांहीं वेळापूर्वीं 'तूं बिभीषणाकडे जा, तो माझा भक्त तुला विपुल धन देईल.' अशी त्या संतुष्ट झालेल्या भगवानानें मला स्वप्नांत आज्ञा केली; पण 'भगवन्, मी कोठें व राजा बिभीषण कोठें?' असें जेव्हां मी म्हटलें, तेव्हां 'जा; आजच तूं त्याला भेटशील,' असें त्यानें मला सांगितलें. तें ऐकून मी जागा होऊन जों पहातों, तों समुद्राच्या पार येऊन पोंचलों आहें, असें मला दिसलें. पण येथें मला कोणी व कसें आणलें हें कांहीं कळलें नाहीं.

लोहजंघाचें हें भाषण ऐकून व सामान्य मानवाचा लंकेंत प्रवेश होणें अशक्य आहे हें जाणून, तें सर्व खरें असावें; असें त्या राक्षस-राजास

वाटलें. व 'बरें आहे; कांहीं दिवस तूं येथें रहा, मी तुला पुष्कळ धन देतों.' असें सांगितलें, व मनुष्य-भक्षक राक्षसांच्या दृष्टीं तो न पडेल, अशा ठिकाणीं गुप्त रीतीनें त्यास बिभीषणानें ठेविलें. राक्षसांकडून लंकाद्वीपांतील स्वर्णमूल नामक पर्वतावरून त्यानें एक गरुडवंशज पक्षी आणविला, व त्याला आपल्या संवयीचा करण्याकरितां मथुरेस जाणाऱ्या त्या ब्राह्मणाच्या स्वाधीन केलें. लोहजंघानेंही त्याला आपल्या संवयीचा केला, व तो पूर्णपणें वश झाल्यावर त्या (पक्ष्या) वर बसून लंकेंत इतःस्ततः फिरण्याचा क्रम चालविला; आणि अशा रीतीनें, बिभीषण उत्तम सत्कार करीत असल्या कारणानें, कांहीं काल तो तेथें सुखानें राहिला.

एकदा तो मोठ्या कौतुकानें राक्षसेंद्रास म्हणाला, 'प्रभो, तुमच्या या लंकेची भूमि सर्वतः काष्ठमय कशी?' तें ऐकून 'ब्राह्मणवर्य, त्याचें चमत्कारिक कारण मी तुम्हांस सांगतों' असें म्हणून बिभीषण पुढील वृत्तान्त त्यास सांगूं लागला—

पूर्वी गरुडमाता विनता व नागांची माता कद्रू या कश्यपाच्या भार्यांमध्यें कांहीं कारणानें पैज लागली, व त्यांत विनतेचा पराभव होऊन ती नागांची दासी झाली. तेव्हां नागांच्याच सांगण्यावरून अमृत आणून देऊन आपल्या जननीला दास्यांतून सोडवावयास गरुड तयार झाला; पण मार्गांत बल येण्याकरितां कांहींतरी भक्ष्य मिळावें म्हणून, तो आपल्या पित्यापाशीं जाऊन प्रार्थना करूं लागला असतां, कश्यप म्हणाला, "पुत्रा, जा; शापामुळें भ्रष्ट होऊन समुद्रांत हत्ती व कांसव होऊन राहिलेल्या दोघां यक्षांस तूं खा." ही आज्ञा ऐकतांच समुद्रजलांत लढत असलेल्या त्या दोघांनाही उचलून, गरुड एका मोठ्या कल्पवृक्षाच्या शाखेवर येऊन बसला. तों त्या तिघांच्या भारानें ती शाखा मोडली; पण त्या शाखेवर वालखिल्य ऋषि लोंबत आहेत, असें पाहून गरुडानें तिला खालीं पडूं दिलें नाहीं. उलट तिलाही आपल्या चोंचींत धरून तो पुनः पित्याकडे गेला. तेव्हां 'हिच्या योगानें लोकांचा नाश न होईल, अशा ठिकाणीं हिला टाक' अशी पित्याची आज्ञा ऐकून वालखिल्य मुनी तिला सोडून गेले असतां, त्यानें ती अति विस्तृत शाखा या निर्जन प्रदेशीं फेंकली. पुढें त्या शाखेच्याच पाठीवर ही लंकानगरी निर्माण केली. त्यामुळें हिची भूमि काष्ठमय आहे.

हा वृत्तांत ऐकून लोहजंघास फार संतोष वाटला. नंतर मथुरेस परत जाण्याची इच्छा करणाऱ्या त्याला बिभीषणानें मोठ्या किंमतीचीं अनेक रत्नें दिलीं. आणि निःसीम भक्तीनें नारायणास समर्पण करण्याकरितां सुवर्णाचीं शंख, चक्र, गदा व पद्म—हीं आयुधेंही दिलीं. तें सर्व घेऊन व रोज शंभर योजनें चालणाऱ्या गरुडावर बसून आकाशमार्गानें समुद्राचें उल्लंघन केल्यावर तो थोड्याच अवकाशांत मथुरेस येऊन पोंचला. तेथें नगराबाहेर एका शून्य गृहांत उतरल्यानंतर त्यानें आपल्या गरुडवंशज वाहनास बांधून ठेविलें, व त्या अनेक रत्नांतील एक रत्न बाजारांत नेऊन विकलें. आणि उत्तम वस्त्रें, अलंकार व भोजनाचे पदार्थ घेऊन तो त्या शून्य स्थानीं परत आला. त्यानें स्वतः भोजन केलें, त्या गरुडास खाऊं घातलें व वस्त्रालंकारांनीं आपल्याला भूषित केलें.

सायंकाळीं त्या पक्ष्यावर बसून व शंखचक्रादि आयुधें घेऊन तो रूपिणीच्या घरीं गेला; पण भूमीवर न उतरतां गरुडावरूनच एकांतांत बसलेल्या त्या प्रियेला हाक मारून तो गंभीर वाणीनें म्हणाला, "मी हरि तुजकरितां येथें आलों आहें." तें ऐकून रुपिणीनें त्यास प्रणाम केला, व 'देवानें मजवर दया करून खालीं यावें' अशी त्याची प्रार्थना केली. याबरोबर तो लोहजंघ खालीं उतरला, पक्ष्याला बांधून ठेविलें. व आपण तिच्या अंतर्गृहांत गेला. रात्रीं यथेच्छ उपभोग घेतल्यानंतर पहांट होतांच तो त्या पक्ष्यावर बसून आकाशमार्गानें निघून गेला.

प्रातःकाळीं ती रूपिणी मी देवता व विष्णुभार्या आहें; यास्तव मानवांशीं भाषण करणेंही मला उचित नाहीं, असें समजून मौन धरून बसली. तें पाहून—'ही आज अशी कां?'—असें म्हणून तिची आई तिला मौनाचें कारण विचारूं लागली. तिचा फारच आग्रह पाहून रूपिणीनें तिच्या आणि आपल्यामध्यें एक पडदा बांधला, व रात्रींचा अद्भुत वृत्तांत तिला सांगितला. तो ऐकून मकरदंष्ट्रेला संशय आला व तिनें त्याच रात्रीं लपून बसून गरुडावर स्वार होऊन आलेल्या विष्णुवेषधारी लोहजंघास पाहिलें. नंतर सकाळीं, आपल्या मुलीनें सांगितलेला सर्व वृत्तांत सत्य आहे, असें जाणून ती कुंटिण पडद्यांत बसलेल्या आपल्या मुलीजवळ जाऊन तिच्या पायां पडली, आणि म्हणाली, "पुत्रि, देवाच्या अनुग्रहामुळें तूं देवी माझी कन्या झाली आहेस. तूं माझा उद्धार कर.

मी आतां वृद्ध झालें आहें. यास्तव याच शरीरानें मी स्वर्गास जाईन असें कर. मजवर अनुग्रह करणें हा तुझा धर्म आहे."

आपल्या आईची ही प्रार्थना रूपिणीनें त्या कपट रूपधारी विष्णूस त्याच रात्रीं कळविली. तेव्हां तो हंसून म्हणाला—प्रिये, तुझी आई अतिशय पापिणी आहे, त्यामुळें हिला स्वर्गास जातां येणार नाहीं; पण दर एकादशीस प्रातःकाळीं स्वर्गाचें द्वार उघडतें, व त्यावेळीं अनेक शिवदूत स्वर्गांत शिरतात. त्यांच्या मधून त्यांच्याच वेषानें हिला मी स्वर्गांत घालवीन. तर आतां तूं हिला शिवदूताचा वेष दे. तिच्या सर्व मस्तकाचें वस्तऱ्यानें मुंडन करवून पांच शेंड्या ठेवीव. गळ्यांत हाडांच्या माळा घाल, एक बाजू काजळानें व दुसरी शेंदुरानें लिप्त कर, व हिचें वस्त्र सोडून घे. असें केल्यानें तिचा वेष अगदीं हुबेहुब गणासारखा होईल, आणि त्यामुळें गणांत मिसळून तिला याच शरीरानें स्वर्गांत जातां येईल.

त्या कपटी विष्णूचें हें भाषण त्या खुळ्या म्हातारीस खरें वाटलें व प्रातः-काळीं तसाच वेष घेऊन स्वर्गास जाण्यास ती तयार होऊन बसली. कारण त्याच दिवशीं दशमी होती. रात्रीं तो भगवान् आला. रूपिणीनें ती आपली माता सकाळीं जातांना त्याच्या स्वाधीन केली, व तोही गरुडवाहन त्या नग्न कुंट्टिणीला गरुडावर बसवून वेगानें आकाशांत गेला. अंतरिक्षांतून त्यानें एका देवालयापुढें एक उंच स्तंभ आहे, व त्याच्यावर एक चक्र बसविलें आहे, असें पाहून त्यावर तिला बसविलें; व 'म्हातारे, जराशी येथें बैस, मी एका माझ्या भक्तावर अनुग्रह करून आतां परत येतों.' असें सांगून तो एका क्षणांत दिसेनासा झाला. व आकाशांत राहूनच रात्रीं यात्रोत्सव पहाण्याकरितां देवाच्या अग्रभागीं जमलेल्या लोकांस म्हणाला, "अहो नगरांतील लोकांनो, आज तुमच्या अंगावर सर्व संहार करणारी एक हडळ पडणार आहे, यास्तव तुम्ही सावध रहा. हरीला शरण जा."

आकाशांतून उद्भवलेली ही वाणी ऐकून मथुरेंतील सर्व लोक भयभीत झाले व देवालयांत जाऊन भक्तिपूर्वक त्यांनीं शांतिकर्म आरंभिलें. लोह-जंघही खालीं उतरून आपला देवाचा वेष टाकून देऊन व गुप्त रीतीनें येऊन तेथेंच मुकाट्यानें बसला. इकडे कुंट्टिण 'अजून देव कां येत नाहीं' म्हणून चिंता करीत स्तंभावरच बसली होती. इतक्यांत खालीं दृष्टि गेल्या-

मुळें तिला घेरी आल्यासारखी झाली, व 'हाय हाय मी पडलें. आतां माझ्यानें येथें बसवत नाहीं.' असें ती मोठमोठ्यानें ओरडूं लागली. तें ऐकून 'देवि पडूं नको, तेथेंच रहा.' असें देवालयांतील लोक तिला उलट मोठ्यानें म्हणाले, आणि त्या आबालवृद्धांनीं ती रात्र अतिशय उद्विग्न चित्तानें घालविली.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं राजासह सर्व नागरिकजन तेथें जमले. त्यांनीं त्या कुंटिणीला ओळखिलें. रूपिणीलाही हा वृत्तांत कळला. तिची ती अवस्था पाहून, वरून पडणारी हडळ कोण आहे तें कळल्यामुळें लोक हंसत खिदळत असतांना रूपिणी तेथें आली. तिनें तेथें जमलेल्या लोकांक-डून आपल्या आईला खालीं उतरविलें; व लोकांनीं विचारलें असतां, त्या मकरदंष्ट्रेनेंही त्यांस इत्थंभूत वर्तमान सांगितलें. तें ऐकून व तिचें तें स्वरूप पाहून राजासह सर्वलोक पोट धरधरून हंसूं लागले. हा सर्व अद्भुत व हास्यकर प्रकार कोणीतरी सिद्धानें केला असावा असें त्यांस वाटलें. राजाच्या संमतीनें लोकांनीं असें जाहीर केलें, कीं–'ज्यानें अनेक कामुकांस फसविणाऱ्या या कुंटिणीस अशा चमत्कारिक रीतीनें फस-विलें आहे, त्यानें निर्भयपणें प्रकट व्हावें. आम्ही त्याचा योग्य सत्कार करूं.

हें ऐकतांच तेथें जवळ असलेला लोहजंघ पुढें झाला, व राजाकडून अभय घेऊन त्यानें अगदीं पहिल्यापासून सर्व वर्तमान राजास सांगितलें. बिभीषणानें देवाकरितां दिलेलीं सोन्याचीं आयुधें देवास अर्पण केलीं. गरुडपक्षीही सर्वांना दाखविला व लंकेंतील रत्नेंही त्यानें परी-क्षकांपुढें ठेविलीं. तें सर्व पाहून व ऐकून मथुरेंतील लोकांना अतिशय आश्चर्य वाटलें. राजाच्या आज्ञेनें सर्व लोकांनीं त्याचा मोठा सत्कार केला; व ती रूपिणी त्याला अर्पण केली. कुंटिणीनें केलेल्या अप-मानाचा आपण बराच चांगला बदला घेतला आहे, असें समजून लोह-जंघही आनंदित झाला. नंतर पुष्कळ द्रव्य व सुंदर आणि आवडती स्त्री यांचा लाभ केवळ भाग्यवशात् झाल्याकारणानें ब्राह्मणपुत्र त्या रम्य नगरांत सुखानें राहूं लागला.

बद्ध करून ठेविलेल्या वत्सराजाच्या समीप बसून विदूषक वसंतकाच्या तोंडची ती कथा ऐकल्यावर वासवदत्तेस फार संतोष वाटला.

---

# तरंग ५ वा.

## १. वासवदत्तेचें हरण व पुढचा वृत्तांत.

### सिद्धिकरी, समुद्रदत्त व त्याची पत्नी यांची कथा.

कांहीं दिवसांनीं वासवदत्ता पितृपक्षापासून विमुख होऊन वत्सराजावर अतिशय प्रेम करूं लागली. त्यानंतर यौगंधरायण गुप्त रीतीनें कोणाला न दिसतां आपल्या राजाजवळ आला, व वसन्तकासमक्ष त्यानें राजाला अशी विनंति केली-महाराज, चंडमहासेनानें आपल्याला कपटानें धरून बांधून ठेविलें आहे, व तो ही कन्या देऊन आणि मोठा सत्कार करून आपल्याला सोडूं इच्छित आहे; पण त्यांत आमचा पुरुषार्थ कांहींच नाहीं; त्याच्या कृपेचेंच तें सर्व फळ, असें होणार आहे. यास्तव या त्याच्या कन्येला आपण हरण करून नेऊं या. म्हणजे या मत्त राजाची चांगलीच खोड मोडल्यासारखें होईल. राजन्, वासवदत्तेच्या पित्यानें हिला दिलेली एक भद्रवती म्हणून हत्तीण आहे. एका नडागिरीवांचून दुसरा कोणताही हत्ती तिच्याबरोबर वेगानें चालूं शकत नाहीं. नडागिरीही तिला पाहून युद्ध करीत नाहीं. त्या हत्तिणीचा आषाढक म्हणून एक माहात आहे. त्याला पुष्कळ धन देऊन मी आपलासा करून ठेविलें आहे. यास्तव रात्रीं वासवदत्तेसह त्या हत्तिणीवर सशस्त्र बसून येथून आपण निघावें. या राजाच्या पदरचा मुख्य माहात हत्तींचा अभिप्राय जाणत असतो; पण त्याला मद्य पाजवून बेशुद्ध करून पाडण्याचा उपाय मी योजिला आहे. त्यामुळें हत्तिणीचा अभिप्राय व प्रस्थान त्याला कळणार नाहीं. मी आतांच पुढें जातों व आपल्या पुलिंद मित्राला मार्गरक्षणार्थ सज्ज करितों.

इतकें सांगून तो महामंत्री गेला. वत्सराजानेंही काय काय करावयाचें त्याचा मनांत चांगला निश्चय केला. इतक्यांत वासवदत्ता आली. तिच्याशीं नाना प्रकारच्या प्रेमाच्या व विश्वासाच्या गोष्टी बोलतां बोलतां त्यानें हा आपला संकेत कळविला, तेव्हां तीही त्याच्याबरोबर जावयास तयार झाली. कारण असल्या योग्य भावी पतीचें मन कोणती सुज्ञ स्त्री दुखवील ? तिनें आपल्या हत्तिणीच्या माहातास बोलावून नियमित वेळीं

सज्ज रहावयास सांगितलें. देवपूजेच्या निमित्तानें मुख्य माहातांसह इतर सर्वांस मद्य पाजवून मत्त करून पाडलें. त्यामुळें रात्रीं त्या हत्तिणीस तिचा पालक सज्ज करूं लागला असतां, 'मी आज त्रेसष्ट योजनें चालून जाईन' असें जें तिनें म्हटलें, तें मुख्य माहातानें ऐकलें, व 'ही असें म्हणत आहे' असेंही जरी तो मोठ्यानें ओरडून बोलला, तरी इतर मत्त-हस्तिपांनीं तें ऐकलें नाहीं.

इकडे वत्सराजानेंही यौगंधरायणानें सांगितलेल्या युक्तीनें आपल्या बंधन-शृंखला तोडल्या. सर्व शस्त्रें घेतलीं, वीणा उचलली व वसंतका-सह गायनशाळेजवळ आलेल्या हत्तिणीवर तो आरूढ झाला. इतक्यांत कांचनमाला-दासीसह वासवदत्ताही आपल्या प्रिय हत्तिणीवर आपल्या प्रियापाशीं येऊन बसली; व तीं चौघेंजणें चांगल्या रीतीनें स्थिर झालीं असतां हस्त्यारोहानें तिला हाकललें. मत्त हत्तीनें एके जागीं उज्जयिनीचा कोट पाडला होता, त्या मार्गानें तिला तो बाहेर नेऊं लागला; पण इतक्यांत वीरबाहु व तालभट या क्षत्रियपुत्रांनीं त्याला प्रतिबंध केला. तें पाहून सशस्त्र राजानें त्या दोघांनाही मारून मार्ग मोकळा केला; आणि बाहेर आल्यावर राजाच्या सांगण्यावरून माहातानें त्या दिव्य हत्तिणीला वेगानें चालविलें.

इतक्यांत पूर्वोक्त क्षत्रियपुत्र मरून पडले आहेत, असें पाहून सर्व नगर-रक्षक क्षुब्ध झाले. त्यांनीं लागलीच ती वार्ता राजास कळविली. चंड-महासेनानेंही बराच शोध करून वत्सराजाचेंच हें कृत्य आहे व तो वासव-दत्तेलाही घेऊन गेला आहे, असें निश्चित ठरविलें. नगरांतील कोलाहल ऐकून जागा झालेला पालक-राजपुत्र नडागिरीवर बसून वत्सेशाचा पाठ-लाग करूं लागला. वत्सेश्वरानेंही मागून येणाऱ्या त्याच्याशीं युद्ध केलें. त्या करेणुला समोर पाहिल्यामुळें नडागिरीनें त्याच्या अंगावर चाल केली नाहीं. इतक्यांत पित्याच्या कार्याकडे लक्ष देणाऱ्या पालक राजपुत्राच्या त्या गोपालक भ्रात्यानें मागून येऊन पालकाला परत नेलें. तेव्हां वत्सराजही निर्भयपणें पुढील मार्ग क्रमूं लागला.

हळु हळु जात असतांना त्याची ती रात्र अरण्यांतच संपली. प्रातः-काळ झाल्यावर राजा मार्ग चालत राहिला. माध्याह्नसमयीं त्रेसष्ट योजनें चालून विंध्यारण्यांत आलेली ती हत्तीण तृषित झाली. तें पाहून राजा

भार्येसह खालीं उतरला. व ती हत्तीण पाणी पिऊन, त्याच दोषानें तत्काल मरून पडली. तो अवचित झालेला घात पाहून भार्येसह राजा जों खिन्न होत आहे. तोंच त्यानें पुढीलप्रमाणें आकाशवाणी ऐकली– “राजन्, मी मायावती–नामक विद्याधरी असून शापदोषामुळें इतके दिवस हत्तीण होऊन राहिलें होतें, वत्सराजा, मीं आज तुजवर उपकार केला आहे. पुनः तुझ्या भावी पुत्रावरही करीन. ही तुझी पत्नी वासवदत्ता मानुषी नसून देवसुंदरी आहे. तीही शापामुळेंच भूलोकीं जन्मास आली आहे.”

हें ऐकून आनंदित झालेल्या राजानें आपण आल्याचें वर्तमान पुलिंदास कळविण्याकरितां वसंतकाला पुढें पाठविलें, आणि आपण स्त्रीसह पायांनींच हळु हळु जाऊं लागला. इतक्यांत त्या घोर अरण्यांतून निघालेल्या चोरांनीं त्यांस घेरलें. पण राजाही अद्वितीय शूर होता. त्यानें आपल्या भार्येसमक्ष धनुष्याच्या सहायानें हां हां म्हणतां एकशेंपांच चोरांना लोळविलें. तों इतक्यांत त्याचा मित्र शबरराज पुलिंदही यौगंधरायण व वसंतक यांसह आला. त्यानें सर्व चोरांचें निवारण केलें व वत्सराजास प्रणाम करून आपल्या घोषास नेलें. तेथें पोंचल्यावर अरण्यांत कांहीं वेळ चालल्यामुळें जिच्या पायांस दर्भाग्रें टोंचलीं आहेत, अशा प्रिय भार्येसह त्यानें ती रात्र घालविली.

दुसऱ्याच दिवशीं सकाळीं यौगंधरायणानें पाठविलेल्या दूताच्या मुखानें ज्यास राजाचा वृत्तांत कळला आहे, असा सेनापति रुमण्वान् सज्ज सैन्यासह येऊन मिळाला. तेव्हां फारच संतुष्ट झालेला वत्सराजा त्या विंध्यारण्यभूमींतच सैन्याचा तळ देऊन, उज्जयिनीकडील वार्ता कळावी म्हणून अत्यंत उत्सुक होऊन राहिला. इतक्यांत उजयिनीकडून एक वैश्य आला. तो यौगंधरायणाचा मित्र होता. तो राजास म्हणाला, “आमचा राजा आपल्यावर फार प्रसन्न झाला आहे. आपल्याला शूर जामात समजून त्यानें आपल्याकडे दूतहि पाठविला आहे. तो मागून येत असून, मी हें आनंदाचें वर्तमान सांगण्याकरितां त्वरेनें पुढें आलों आहे.” हें त्याचें भाषण ऐकून वत्सराजा आनंदित झाला, व त्यानें तें सर्व वर्तमान आपल्या प्रियेलाही कळविलें. आप्तांचा त्याग केल्यामुळें ‘आतां काय होईल कोण जाणे; बाबा, आई व भाऊ काय म्हणतील ! इत्यादि

चिंतेनें व्याकूळ झालेल्या वासवदत्तेलाही तें ऐकून समाधान वाटलें. नंतर समीपच असलेल्या वसंतकास बोलावून ' ब्राह्मणा, एखादी मनोहर गोष्ट सांग ' असें ती म्हणाली; तेव्हां त्यानें त्या सुंदरीला पतिभक्ति वाढविणारी अशी पुढील कथा सांगितली:—

## २. देवस्मितेची कथा.

ताम्रलिप्ता म्हणून एक नगरी आहे. तिच्यामध्यें धनदत्त नांवाचा एक मोटा श्रीमान् वैश्य होता. त्याला पुत्र नव्हता म्हणून त्यानें अनेक विद्वान् ब्राह्मणांस बोलावून आणून व त्यांस नमस्कार करून–' विप्रवर्य मला सत्वर पुत्र होईल असें करा,'–अशी त्यांची प्रार्थना केली. तेव्हां ब्राह्मण म्हणाले, " शेटजी, यांत कांहीं अशक्य नाहीं. ब्राह्मण श्रौतकर्मानें सर्व साधीत असतात. पूर्वी असाच एक पुत्ररहित राजा होता, त्याच्या एकशेंपांच स्त्रिया होत्या; पण एकीलाही पुत्र झाला नाहीं. तेव्हां ब्राह्मणांकडून पुत्रेष्टि करविल्यानंतर त्याला जंतुनामक पुत्र झाला. एकदां रांगत असलेल्या त्या पुत्राला मुंगी चावली. तेव्हां तो अगदीं कळवळून रडूं लागला. तें पाहून त्या राजाच्या अंतःपुरांतील सर्व स्त्रियाही आक्रोश करीत सुटल्या. व एकच कोलाहल झाला. राजाही पुत्रा, पुत्रा, तुला काय झालें?' असें म्हणून एकाद्या प्राकृत पुरुषाप्रमाणें रडूं लागला. कांहीं वेळानें मुंगीच्या चावण्याच्या वेदना कमी झाल्या असतां तो पुत्र पहिल्याप्रमाणेंच आनंदानें खेळूं लागला. पण त्यापासून ' एक पुत्र असणें हें चांगलें नव्हे. तें दुःखाचें निदान आहे ' हा सिद्धान्त राजानें काढिला, आणि ' मला पुष्कळ पुत्र होतील असा कांहीं उपाय आहे का?' म्हणून तो ब्राह्मणांस विचारूं लागला. तेव्हां ते म्हणाले " राजा, त्याला असा उपाय आहे.–या तुझ्या पुत्राला मारून त्याच्या मांसाचें हवन केल्यास व त्याचा वास तुझ्या राण्यांनीं घेतल्यास त्या सर्वजणींना एकेक पुत्र होईल " तें ऐकून राजानें तें घोर कर्मही करविलें, व त्यामुळें त्याला जितक्या राण्या होत्या, तितके पुत्र झाले. यास्तव बा वैश्या, आम्हींही यज्ञाच्या योगानें तुला पुत्र होईल असें करूं."

तें ऐकतांच त्यांस पुष्कळ दक्षिणा देऊन वैश्यानें यज्ञ करविला, व त्याला पुत्र झाला. गुहसेन असें त्याचें नांव ठेविलें. तो उत्तरोत्तर वाढूं लागला. विद्या शिकला. त्याचें शिशुत्व संपून तारुण्यास आरंभ झाला. तेव्हां धनदत्त

त्याच्याकरितां भार्या शोधूं लागला; पण जवळपास कोठें चांगली कन्या आढळेना, म्हणून तो पुत्रासह व्यापाराच्या निमित्तानें चांगली स्नुषा पहाण्याकरितां द्वीपांतरीं गेला. तेथें धर्मगुप्त वैश्याची देवस्मिता नांवाची कन्या त्यास आढळली. ती रूपादि सर्व गुण व लक्षणें यांनीं युक्त असल्या-मुळें त्यानें धर्मगुप्ताची प्रार्थना केली. पण ती धर्मगुप्ताची फार लाडकी कन्या असल्यामुळें तिला इतक्या दूर द्यावें, असें त्यास वाटेना. म्हणून त्यानें ती गोष्ट मान्य केली नाहीं. पण देवस्मितेनें त्या गुणवान् गुहसेनास पहातांच 'हाच आपला पति' असा मनांत निश्चय केला आणि सखीच्या द्वारा संकेत करून व आपल्या प्रिय आप्तांसही सोडून, ती रात्रीं गुहसेना-बरोबर तेथून निघाली. तिचा सासराही बरोबर होताच. कांहीं अवका-शानें तीं सर्व सुरक्षितपणें ताम्रलिप्तेस पोंचलीं. तेथें मोठ्या थाटानें त्यांचा विवाह झाला, व उभयतांचें प्रेम उत्तरोत्तर वाढूं लागलें.

कांहीं दिवसांनीं धनदत्त परलोकवासी झाला, तेव्हां गुहसेनाची माता व इतर आप्त त्यास वाणिज्याकरितां कटाहद्वीपांत जाण्याविषयीं आग्रह करूं लागले. त्याला तर प्रिय भार्येला सोडावेंसें वाटेना. अन्य द्वीपांत गेल्यावर हा अन्य स्त्रीशीं समागम करील, या भीतीनें त्याची भार्याही त्याला जाण्याविषयीं अनुमोदन देईना. तेव्हां एकीकडे मान्य आप्तांचा आग्रह व दुसरीकडे प्रियेचा वियोग आणि तिनें केलेला निषेध. अशा पेंचांत तो पडला. काय करावें हें त्याला सुचेना. तेव्हां देवगृहांत जाऊन देवच मला योग्य उपाय सुचवील, अशा आशेनें तो निराहार-व्रत धरून बसला. देवस्मितेनेंही पतीसह तसेंच व्रत आरंभिलें. तेव्हां त्यांच्या चित्तैकाग्र्यानें प्रसन्न झालेला देव स्वप्नांत येऊन, त्यांस दर्शन व दोन लाल कमळें देऊन म्हणाला—"तुम्हीं दोघेंही त्यांतील एकेक कमळ नेहमीं आपल्या हातांत ठेवा. जर तुमच्यांतील कोणीही एक दूर रहात असल्यामुळें शीलत्याग करील, तर दुसऱ्याच्या हातांतील कमळ म्लान होईल; पण तुमच्यापैकीं कोणीच शीलत्याग न केल्यास दोघांच्याही हातांतील हीं दोन्ही कमळें अशींच टवटवीत रहातील." देवाचा हा साक्षात्कार पाहून तीं दोघेंही जागीं झालीं. व हातांतील कमळें म्हणजे परस्परांचें परस्परांच्या हातांत आलेलें हृदयच आहे, असें समजूं लागलीं. त्यानंतर प्रियेनें आनंदानें अनुमोदन दिलें असतां गुहसेन तें लाल

कमल घेऊन द्वीपांतरास गेला, आणि देवस्मिता अहोरात्र त्या कमळाकडे पहात घरीं राहिली.

गुहसेन कटाहद्वीपास पोंचल्यावर रत्नांची देव-घेव करूं लागला. एकदां त्याच्या सतत हातांत असलेलें अम्लान कमळ पाहून चौघां वैश्यपुत्रांस विस्मय वाटला; व त्यांनीं युक्तीनें त्याला आपल्या घरीं नेऊन आणि मद्य पाजवून कमळाचा वृत्तांत विचारिला. तेव्हां मद्याच्या धुंदींत त्यानेंही सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून ते पापी, त्याच्या भार्येचें शील भ्रष्ट करण्याकरितां ताम्रलिप्तेस गेले. तेथें पोंचल्यावर " आपला मनोरथ कसा सिद्ध होईल." इत्यादि विचार करीत ते दुरात्मे बौद्धांच्या मंदिरांत रहात असलेल्या योगकरंडिका नामक एका जोगिणीकडे गेले, व म्हणाले, " भगवति, आमचा मनोरथ जर पूर्ण झाला, तर आम्ही तुला पुष्कळ धन देऊं." तें ऐकून ती म्हणाली, " तुम्हीं तरुण आहां, त्याअर्थी येथील एकादी रमणी तुम्हांला पाहिजे असेल, असें मला वाटतें. तर तुमचा अभिलाष कोणत्या स्त्रीविषयीं आहे तें मला सांगा. म्हणजे मी तुमचे काम साधून देईन. मला धन मिळविण्याची मुळींच इच्छा नाहीं; कारण माझी सिद्धिकरी म्हणून एक अति चतुर प्रिय शिष्या आहे. तिच्या प्रसादानें मला पुष्कळ धन मिळालें आहे."

तें तिचें भाषण ऐकून 'शिष्येच्या प्रसादानें तुला विपुल धन कसें मिळालें?' असा त्यांनीं प्रश्न केला असतां ती म्हणते-तुमची फारच इच्छा असल्यास सांगतें; ऐका.

## ३. सिद्धिकरीची उपकथा.

"मागे येथें एक उत्तरेकडील वैश्य आला होता. तेव्हां माझ्या शिष्येने रूप बदलून त्याच्या येथें दासी होऊन रहाण्याचा निश्चय केला. त्या श्रीमानालाही घरचें काम करण्याकरितां दासी हवीच होती. कांहीं दिवस त्याच्या येथें राहून सिद्धिकरीनें त्याचा पूर्ण विश्वास संपादन केला. आणि एकदां पहाटेस त्याचा सर्व सुवर्णसंचय घेऊन ती तेथून निघाली. तों तिची ती कावरीबावरी मुद्रा व त्वरेनें नगरांतून बाहेर जाण्याचा प्रयत्न पाहून व ही कोणी चोर-स्त्री आहे, असें जाणून एक भिक्षेवर निर्वाह करणारा डोंब धनाच्या आशेनें तिच्या मागें लागला. तो मृदंग वाजवून

गाणें म्हणत रोज दारोदार भीक मागत असे. त्यामुळें त्या वेळींही त्याच्या हातांत मृदंग होताच. पळतां पळतां थकलेली ती माझी शिष्या गांवाबाहेरील एका मोठ्या वडाच्या झाडाखालीं जाऊन बसली, तों तो डोंबही तेथें पोंचला. तें पाहून ती धूर्त स्त्री दीन होऊन म्हणाली, "बाबा, तूं आलास, बरें झालें. मजवर कृपा करण्याकरितां तूं ईश्वरच आलास असें मी समजतें. मी आपल्या नवऱ्याशीं भांडून जीव देण्याकरितां येथें आलें आहे, तर कृपा करून मला या दोरीचा फांस येथें टांगून दे."–तें ऐकून 'स्वतः फांस अडकवून घेऊन मरणाऱ्या हिला मी कशाला मारूं?' असें मनांत म्हणून त्या मूर्खानें तिला फांस बांधून दिला. तें पाहून ती लबाड स्त्री म्हणते–बाबा, यांत मान कशी अडकवायची तें मला ठाऊक नाहीं. दया करून फांस कसा लावावयाचा तें मला दाखीव पाहूं. हें तिचें कपट–भाषण ऐकून व तें खरेंच समजून, मृदंग उभा करून त्याच्यावर तो उभा राहिला व असा फांस लावावा, असें म्हणून त्यानें तो सज्ज केलेला फांस आपल्या गळ्यांत घातला. तें पहातांच माझ्या सिद्धिकरीनें त्याच्या पायांखालच्या मृदंगावर जोरानें लाथ मारली. त्याबरोबर तो मृदंग दूर उडून गेला व डोंब तिच्याकरितां तयार केलेल्या फांसांत मान अडकल्यामुळें तडफडूं लागला, व थोड्याच अवकाशांत मरण पावला. इतक्यांत तिला शोधीत तो वैश्यही नोकरांसह गांवाबाहेर आला. वडाच्या झाडाखालीं कोणसें आहे, असें त्याला दुरून वाटलें व त्यामुळें तीच कदाचित् येथें असेल, असें समजून तो वेगानें तिकडे येऊं लागला; पण हें दुसरें विघ्न आलेलें पाहून सिद्धिकरी त्या सुवर्णासह वडाच्या झाडावर चढली व पानांच्या आड लपून राहिली. वृक्षाखालीं आल्यावर त्या वैश्यास फांस लावून मेलेला डोंब दिसला; पण ती कोठेंच दिसेना. कदाचित् या वृक्षावर बसली असेल, असें समजून त्याच्या चाकरांपैकीं एकजण वर चढला. तो जवळ आला आहे, असें पाहून–'सख्या, प्रिया, ये. तूंच माझा प्राणनाथ आहेत. धनासह हें सर्व शरीर तुझें आहे'–असें म्हणून व त्यास आलिंगन देऊन चुंबनाच्या भरांत तिनें त्याची अर्धी जीभ दांतानें तोडली. त्याबरोबर तो विचारा लल्लल् करीत खालीं पडला. त्याचें तोंड रक्तबंबाळ झालें आहे, असें पाहून येथें कोणी हडळ आहे, असें त्या वैश्यास वाटलें व लागलाच

तो भिऊन गांवांत पळून आला. नंतर त्या मोठ्या वृक्षावरून खालीं उतरून भ्यालेली ती बिचारी तें सर्व धन घेऊन मजकडे आली. तात्पर्य, अशी माझी ती शिष्या मोठी गुणी आहे."

ती जोगीण इतकें सांगत आहे तों सिद्धिकरीही कोठें गेली होती ती आली. त्यांची परस्पर ओळख करून दिल्यावर जोगीण म्हणते-बाळांनो, आतां तुम्ही आपला अभिलाष मला सांगा. तुम्हाला जिची इच्छा असेल ती मी मिळवून देईन. हें ऐकून त्या दुष्ट वैश्यांनीं 'गुहसेन पत्नी देवस्मिता आम्हांस हवी आहे. तूं तिचा आमच्याशीं समागम करीव.' असें प्रार्थनापूर्वक म्हटलें. त्यावर बरें आहे, असें सांगून त्यांस रहाण्याकरितां तिनें आपल्याच घरांत जागा दिली.

त्यानंतर भोजनादिकांच्या योगानें त्या सर्वांस संतुष्ट करून ती तापसी आपल्या शिष्येसह गुहसेनाच्या घरीं गेली; पण दारांत बांधलेली कुत्री त्या अपरिचित जोगिणीच्या अंगावर भुंकूं लागली. तेव्हां कोण आलें आहे तें पहाण्याकरितां देवस्मितेनें पाठविलेल्या चेटीनें तिच्या वेषाकडे पाहून तिला आंत नेलें. आशीर्वाद देऊन आसनावर बसल्यावर ती ढोंगी स्त्री म्हणते-वत्से, तुला भेटावें, असें फार दिवसांपासून वाटत होतें. गेल्या रात्रीं तर मी तुला स्वप्नांत पाहिलें, व तेव्हांपासून तुला पाहिल्यावांचून माझ्यानें राहवेना. तूं पतिविरहित आहेस असें पाहून माझें मन फार खिन्न होत आहे. प्रियपतीच्या उपभोगावांचून असलेलें रूप व यौवन व्यर्थ होत असतें.-इत्यादि गोड गोड गोष्टी बोलून व तिला संतुष्ट करून ती त्या दिवशीं आपल्या घरीं परत गेली.

दुसऱ्या दिवशीं येतांना तिनें मिरच्यांची भुकी पेरलेला एक मांसाचा तुकडा बरोबर आणला व दारांत येतांच तो त्या कुत्रीपुढें टाकला, तेव्हां मांस खाण्यास संवकलेल्या कुत्रीनें तत्काल तो खाल्ला, पण त्याच्यावर तिखट घातलेलें असल्यामुळें तिच्या डोळ्यांतून अश्रू व नाकांतून पाणी एकसारखें गळूं लागलें. तें पाहून ती दुष्ट तापसी देवस्मितेकडे गेली व योग्य आतिथ्य करून त्या वैश्य स्त्रीनें तिला बसविलें असतां, ती धूर्त जोगीण रडूं लागली. तेव्हां अर्थात्च देवस्मितेनें तिला रडण्याचें कारण विचारिलें. तेव्हां ती मोठ्या कष्टानें म्हणाली, "वत्से, तुझ्या दारांत

असलेली कुत्रीही रडत आहे, पहा जा, हवी तर. पूर्वजन्मीं आम्हीं दोघी एके ठिकाणीं होतों, व त्याचें आज दोघींनांही स्मरण झाल्यामुळें आम्हांला रडें कोसळलें."

तें ऐकून देवस्मिता बाहेर आली व खरोखरच रडत असलेल्या आपल्या कुत्रीला पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. याचें काय बरें कारण असावें? असें जों ती मनांत चिंतन करीत आहे, तोंच जोगीण म्हणते- मागच्या जन्मी आम्ही एका ब्राह्मणाच्या दोघी स्त्रिया होतों. आमच्या पतीला राजानें दूत नेमलेलें असल्यामुळें कामाकरितां तो वारंवार प्रवास करावयास जात असे. तो घरीं नसला म्हणजे मी स्वेच्छेनें परपुरुषसमागम करीत असे. कारण प्राण्यांची इच्छा पूर्ण करणें व इंद्रियांस अतृप्त न ठेवणें हा मोटा धर्म आहे. त्यामुळेंच या जन्मी मी अशा उत्तम अवस्थेंत आहें. तिनें केवल आपलें शील राखलें; पण तिला हा परम धर्म कळला नाही. त्यामुळें ती कुत्री झाली. हिला सुद्धां पूर्वजन्मीचें स्मरण आहे व म्हणूनच ती मला ओळखून रडत आहे."

हें तिचें भाषण ऐकून, 'हा धर्म कसला? ही धूर्त-रचना आहे,' असें समजून ती शहाणी देवस्मिता तिला म्हणते-भगवति इतके दिवस मला हा धर्म ठाऊक नव्हता. आज तूं सांगितलास म्हणून बरें झालें. आतां कृपा करून तूंच माझा कोणातरी परपुरुषाशीं समागम करीव. हें ऐकून ती संन्यासीण म्हणाली, "पुत्रि, द्वीपांतरांतून दोन-चार तरुण व सुंदर वैश्यपुत्र आले आहेत. त्यांना मी तुजकडे आणीन." इतकें बोलून ती आनंदानें स्वगृहीं गेली.

इकडे देवस्मिता आपल्या चेटींस म्हणाली, "चेटींनों, माझ्या पतीच्या हातांत तें म्लान न होणारें लाल कमळ पाहून व त्याला मद्यादि पानानें स्ववश करून घेऊन, कमळाचा वृत्तांत समजून घेतल्यावर माझ्या शीलाचा विध्वंस करण्याकरितां द्वीपांतरांतून आलेले हे पापी पुरुष असावेत, व त्यांच्याशीं ही धूर्त बाई मिळालेली असावी. तर आतां तुम्हीं धोतऱ्याच्या बिया घातलेलें मद्य घेऊन या, व लोखंडाचा एक कुत्र्याचा पाय करवा." ही आज्ञा होतांच चेटींनीं त्याप्रमाणें सर्व केलें. त्यांतील एक चेटी आपल्या स्वामिनीच्या आज्ञेनें स्वामिनीचें रूप घेऊन बसली. तों इतक्यांत 'मी अगोदर जाणार, मी अगोदर जाणार' असें म्हणणाऱ्या

त्या चौघांतील एकाला घेऊन ती जोगीणही आली व सायंकाळीं आपल्या शिष्येचा वेष दिलेल्या त्याला देवस्मितेच्या दारांत सोडून आपण कोणाच्या दृष्टीस न पडतां स्वगृहीं निघून गेली.

त्यानंतर देवस्मितेचा वेष घेतलेल्या चेटीनें हंसत हंसत भाषण करून त्याला तें धोतऱ्याच्या बिया घातलेलें मद्य पाजलें, व तो बेशुद्ध झाला असतां त्याच्या कपाळावर पूर्वींच तयार करून ठेवलेल्या लोखंडी कुत्र्याच्या पायानें डाग दिला. त्याचीं सर्व वस्त्रें काढून घेतलीं व अगदीं दिगंबर करून त्याला घाण-जलादिकांनीं भरलेल्या गटारांत फेंकून दिलें. पहांट होईतों तो तेथेंच पडून होता. उजाडतां उजाडतां कैफ उतरून तो शुद्धीवर आला व पहातो तों आपण अमंगल गटारांत पडलों आहों, असें त्याला दिसलें. आपल्या दुष्कर्माचें हें फल आहे, असें समजून तो तेथून उठला, व त्यानें स्नान केलें. तों त्याला ललाटावरील चुरचुरणारा डाग आढळला. नंतर तो उघडा-बोडकाच त्या जोगिणीच्या घरीं तसाच परत आला; पण-माझी एकट्याचीच अशी दुर्दशा झाली हें बरें नव्हे, यांनाही साध्वीच्या छळाचें फल मिळालें पाहिजे-असें मनांत आणून त्यानें आपल्या सोबत्यांस 'मला मार्गानें येत असतांना चोरांनीं लुटलें' असें सांगितलें; व रात्रीच्या जागरणादिकांमुळें डोकें दुखत आहे असा बहाणा करून तो मस्तक बांधून निजून राहिला. त्यामुळें त्याचा डाग कोणाला दिसला नाहीं.

त्यानंतर सायंकाळीं दुसरा तरुण वैश्यही तसाच देवस्मितेच्या येथे गेला. त्याचीही तशीच संभावना झाली. तोही तिसऱ्या दिवशीं नागवाच घरीं येऊन, तशीच लुटीची वार्ता सांगून मस्तक बांधून राहिला. तिसरा व चवथा यांचीही क्रमानें तीच अवस्था झाली. पण-आमच्यासारखी या जोगिणीचीही दुर्दशा होऊं दे-असा विचार करून तिला खरा वृत्तांत न सांगतां ते तेथून परत निघाले, व आपल्या नगरांत आल्यावर गुहसेनास तोंड दाखविण्याचीही त्यांना फार लाज वाटली.

इकडे अतिशय आनंदित झालेली ती संन्याशीण आपल्या शिष्येसह देवस्मितेच्या घरीं गेली. तेव्हां त्या साध्वीनेंही अत्यंत संतुष्ट झाल्याप्रमाणें दाखवून तिला व सिद्धिकरीला धोतऱ्यासह मद्य पाजलें. त्यामुळें त्या

दोघीही मत्त व बेशुद्ध झाल्या. तेव्हां त्यांचीं नाकें व कान कापवून तिनें त्यांस गटारांत फेंकविलें.

याप्रमाणें त्या सहाही दुष्टांना चांगलीच शिक्षा दिली; पण 'हे क्षुद्र, वैश्य आपल्या घरीं गेल्यावर कदाचित् माझ्या पतीचा नाश करवितील' या भीतीनें त्या सतीनें तें सर्व वर्तमान आपल्या सासूला कळविलें. तेव्हां 'मुक्ति, तूं केलेंस तें बरें केलेंस; पण त्यामुळें माझ्या पुत्राला तर कांहीं त्रास होणार नाहींना?' असें ती म्हणाली. तें ऐकून देवस्मिता म्हणते,– सासूबाई, शक्तिमती नांवाच्या एका स्त्रीनें बुद्धिसामर्थ्यानें आपल्या पतीचें जसें रक्षण केलें, तसेंच मीही माझ्या जिवलगाचें रक्षण करीन. त्यावर 'तिनें आपल्या पतीचें रक्षण कसें केलें?' असा सासूनें प्रश्न केला. तेव्हां तिनें पुढील कथा सांगितली.

## ४. शक्तिमतीची उपकथा.

'बाई, आमच्या देशांत पूर्वजांनीं मणिभद्र म्हणून ज्याचें नांव ठेविलें आहे, असा एक मोठा प्रभावशाली यक्ष आहे. लोक त्याला अनेक नवस करितात, व तोही त्यांना पावतो; पण त्याचें देऊळ गांवाच्या बाहेर असल्यामुळें पापी पुरुष व बायका आपली व्यभिचाराची हौस तेथें जाऊन भागवून घेत असतात. म्हणून–कोणी पुरुष रात्रीं परस्त्रीसह तेथें आढळल्यास ग्रामरक्षकानें त्या दोघांना त्याच मंदिरांत कोंडून ठेवावें, म्हणजे दुसऱ्या दिवशीं राजसभेंत नेऊन त्यांना दंड करितां येईल.–अशी राजानें आज्ञा केली होती. एकदा समुद्रदत्त वैश्य परस्त्रीसह तेथें असतांना नगररक्षकास दिसला. तेव्हां राजाज्ञेप्रमाणें फौजदारानें त्या दोघांना तेथेंच कोंडून ठेविलें. तों हा वृत्तांत समुद्रदत्ताच्या शक्तिमती–भार्येला कळला. त्याबरोबर रूप बदलून सख्यांसह ती शहाणी स्त्री त्याच रात्रीं पूजा करण्याकरितां यक्षमंदिरांत गेली. यक्षपूजकानेंही दक्षिणेच्या लोभानें तिला गाभाऱ्याचें दार उघडून दिलें. ती आंत गेली, तेव्हां परस्त्रीसह आंत असलेल्या तिच्या पतीनें तिला ओळखलें; व त्यामुळें त्याचें तोंड उतरलें; पण त्या साध्वीनें पतीला कांहीं न बोलतां त्याच्या प्रियेला आपलीं वस्त्रें देऊन बाहेर घालविलें, व तिचीं वस्त्रें नेसून ती स्वतः तेथें राहिली. बाहेर आल्यावर ती परस्त्री शक्तिमतीच्या सख्यांसह घरीं गेली. प्रातःकाळीं राजपुरुष येऊन जों पहातात तों समुद्रदत्त आपल्या भार्येसह तेथें आहे,

असें त्यांस आढळलें. त्याबरोबर राजानें मृत्युमुखाप्रमाणें असलेल्या त्या यक्षभवनांतून त्या सपत्नीक वैश्याला सोडलें, व नगराध्यक्षाला दंड केला. याप्रमाणें तिनें आपल्या पतीचें रक्षण केवल स्वबुद्धीनें केलें.'

असो; आपल्या सासूला असें सांगून, तिच्या आज्ञेनें, देवस्मितेनें आपल्या चेटींसह व्यापाऱ्यांचा वेष घेतला, आणि जेथें तिचा पति व्यापार करीत होता, त्याच द्वीपांत व्यापाराच्या मिषानें गमन केलें. कटाह-द्वीपांत पोंचल्यावर जणुं काय मूर्तिमान् बहिःस्थित प्राणच, अशा त्या गुह-सेनास तिनें त्या वैश्यांमध्यें पाहिलें. पुरुषवेष घेतलेल्या तिच्याकडेही दुरू-नच त्याची दृष्टि गेली, व 'माझ्या प्रियेसारखा हा कोण' असें त्यालाही वाटलें. पुढें ती राजाकडे गेली व मोठ्या आदरानें हात जोडून म्हणाली, "प्रभो, माझी एक विनंति आहे; पण ती ऐकण्याकरितां सर्व प्रजाजनांला एकत्र जमवा." ती प्रार्थना मोठ्या उत्सुकतेनें मान्य करून राजानें सर्व प्रजाजनांस बोलाविलें; व ते सर्व जमल्यावर–'तुझी काय विनंति आहे?' असा त्यानें प्रश्न केला. तेव्हां–'सरकार, माझे चार दास येथें पळून आले आहेत; त्यांस आपण माझ्या स्वाधीन करावें.'–असें वैश्यवेषधारी देवस्मिता नम्रपणें म्हणाली. तें ऐकून–माझे सर्व प्रजाजन येथें आले आहेत. त्यांतून तूं आपल्या दासांस ओळखून घे,–अशी राजानें आज्ञा केली. तेव्हां मस्तकावर डागलेल्या अशा त्या चौघांस तिनें हुडकून काढलें. तेव्हां तेथील वैश्य रागावून म्हणाले:–'हे तर येथील सार्थवाहाचे पुत्र आहेत. ते तुझे दास कसे होतील?' तेव्हां तो वेषधारी वैश्य म्हणाला; "यांच्या ललाटावर मीं छाप मारला आहे, तो पहा. म्हणजे तुम्हांला माझें म्हणणें खरें वाटेल." तें ऐकून त्या सभेंतील वैश्यांनीं त्यांच्या डोक्यावरील आच्छादनें काढून पाहिलीं, तों कुत्र्याच्या पायाचा छाप त्यांच्या ललाटावर दिसला, व त्याबरोबर त्या चौघां दुर्जनांचीं तोंडेंही काळीं ठिक्कर पडलीं.

हा सर्वच चमत्कार पाहून राजा फार विस्मित झाला, व हें सर्व कसें घडलें, असें त्यानें विचारलें. तेव्हां तिनें इत्थंभूत वर्तमान सांगितलें. तें ऐकून सर्व हंसूं लागले व म्हणाले; "हे तुझे न्याय्य दास आहेत." राजा-नेंही त्यांच्या म्हणण्यास अनुमोदन दिलें. त्यानंतर तेथील वैश्यांनीं त्या चौघांना दास्यांतून सोडविण्याकरितां, त्या साध्वीला पुष्कळ धन दिलें, व

राजदंडही भरला. तेव्हां तें धन घेऊन व आपल्या पतीस आनंदानें आणि अति प्रेमानें भेटून, सर्व सज्जनांनीं अतिशय सत्कार केला असतां, ती महापतिव्रता पतीसह आपल्या नगरीस परत आली. त्यानंतर पुनः कधीं त्यांचा वियोग झाला नाहीं."

हे देवि ! महाकुलांत उत्पन्न झालेल्या व शुद्ध आचारसंपन्न भर्त्याची सेवा साध्वी स्त्रिया अनन्य चित्तानें करीत असतात. सतीचें पति हेंच परम* दैवत आहे. वसंतकाच्या तोंडची ही उत्तम कथा ऐकून वासवदत्तेनें आपल्या पतीवर दृढ प्रेम व अनन्यभक्ति ठेवली.

---

## तरंग ६ वा.

### १. वत्सराजाचें कौशांबीस परत येणें.

कांहीं वेळानें विंध्याटवींत सेनाशिबिर स्थापून राहिलेल्या वत्स राजाकडे चंडमहासेनाचा प्रतीहारी आला. प्रणाम केल्यावर तो राजास म्हणाला, "प्रभो, आमच्या महाराजांनीं आपल्याकडे असा निरोप कळविण्याकरितां मला पाठविलें आहे.-वासवदत्तेला तुम्हीं स्वतःच हरण केलेंत हें फार चांगलें झालें. त्याकरितांच मी तुम्हाला येथें आणलें होतें; पण तुमचा अपमान केल्यासारखें तुम्हांला वाटेल, म्हणून मी प्रतिबंधांत ठेवलेल्या तुम्हाला ती येथेंच अर्पण केली नाहीं. आतां स्वपौरुषानें तुम्हीं तिला नेलें हेंच योग्य झालें; पण माझ्या कन्येचा विधिहीन विवाह होऊं नये म्हणून कांहीं काल धीर धरावा. माझा पुत्र गोपालक लवकरच तेथें येईल व आपल्या भगिनीचा यथाशास्त्र विवाहविधि करवील." याप्रमाणें राजास सांगून प्रतीहारीनें वासवदत्तेलाही तें सर्व निवेदन केलें. त्यानंतर आनंदित झालेला वत्सराज आपल्या आनंदित वासवदत्तेसह कौशांबीस जाण्याचें ठरवून, 'गोपालक येईपर्यंत तुम्हीं दोघे येथेंच रहा, व त्याच्या बरोबर कौशांबीला या' असें प्रतीहारी व आपला मित्र पुलिंद यांस सांगून, सैन्य व अमात्य यांसहवर्तमान आपल्या राजधानीकडे निघाला.

---

* पतिः सतीनां परमं हि दैवतम् ।

दोन-तीन दिवसांनीं आपल्या देशांत येऊन पोंचल्यावर रुमण्वानाच्या येथें एक रात्र विश्रांति घेऊन, दुसऱ्या दिवशीं वत्सराज प्रियेसह आपल्या नगरींत गेला. त्यावेळीं ती विस्तृत राजधानी पताकादिकांनीं शृंगारून नागरिक राजदर्शनार्थ अत्यंत उत्सुक झाले होते. सर्वत्र महोत्सव पसरला होता. ज्यांचा शोक शांत झाला आहे, अशा उत्सुक पौरजनांनीं वासवदत्तेसह नगरांत प्रवेश करणाऱ्या राजाला, मयूर जसे विद्युद्युक्त मेघांस पहातात, त्याप्रमाणें आनंदानें पाहूं लागले. भाट स्तुतिपाठ करीत असतांना आपल्या प्रिय भार्येसह वत्सराजानें निजून उठल्याप्रमाणें दिसणाऱ्या व सेवा करण्याकरितां आलेल्या राजपुत्रांनीं भरलेल्या राजमंदिरांत प्रवेश केला.

थोड्याच दिवसांत वासवदत्तेचा भ्राता गोपालक, प्रतीहारी व पुलिंद यांसह कौशांबीस येऊन पोंचला. आपला तो श्यालक आला आहे, असें कळतांच वत्सराजानें-सामोरें जाणें, आदरानें त्याचें स्वागत करणें, इत्यादि उपायांनीं त्याचा उचित सत्कार केला. जिचे नेत्र हर्षानें विकसित झाले आहेत, अशी वासवदत्ता त्या आपल्या भावाला पहाण्याकरितां जों प्रवृत्त होत आहे, तोंच तिला लाज वाटूं नये, म्हणून अश्रूंनीं तिच्या दृष्टीस प्रतिबंध केला; पण ती तिची अवस्था पाहून गोपालकानें पित्याचा निरोप सांगून तिला प्रोत्साहन दिलें. त्यायोगें ती आपल्याला कृतार्थ मानूं लागली.

कांहीं दिवसांनीं गोपालकानें सर्व तयारी केल्यावर वत्सराजानें शुभ दिवशीं वासवदत्तेचा कोमल करपल्लव आपल्या हातांत धरिला. पतीच्या हाताचा स्पर्श होतांच वासवदत्तेलाही अवर्णनीय आनंद झाला. तिच्या अंगावर तत्क्षणीं कंप, स्वेद, रोमांच इत्यादि सात्त्विक भाव स्पष्ट दिसूं लागले. त्यामुळें मदनानें आपल्या संमोहनास्त्रानें तिला वेधच केला आहे, असा स्पष्ट भास झाला. गोपालकानें वर-दक्षिणा म्हणून दिलेलीं रत्नें व इतर राजांच्या आलेल्या भेटी, यांच्या योगानें वत्सराजाचा कोष भरून गेला. असो; याप्रमाणें विवाहमंगल झाल्यावर वधू व वर अशीं तीं दोघें, प्रथम लोकांच्या अंतःकरणांत व नंतर अंतःपुरांत गेलीं. स्वतः राजानें गोपालक व मित्र पुलिंदक यांचा सत्कार करण्याकरितां यौगंधरायण व रुमण्वान् यांस नियुक्त केलें; पण राजानें या कठीण कामांत आपली योजना केली आहे, असें पाहून तो महामंत्री रुमण्वानास म्हणाला, " मित्रा, राजानें आम्हाला या बिकट कामांत योजिलें आहे; पण लोकरंजन करणें फार

कठिण आहे. असंतुष्ट झालेला बालकही आम्हांला दोष देईल. याविषयीं मी तुला एक बालविनष्टाची गोष्ट सांगतों, ती ऐक."

## २. बालविनष्टाची कथा.

पूर्वी रुद्रशर्मा म्हणून एक ब्राह्मण होता. त्याला दोन भार्या होत्या. त्यांतील एक प्रसूत होऊन लागलीच मेली. तेव्हां तिचा पुत्र, तिच्या पतीनें आपल्या दुसऱ्या पत्नीच्या स्वाधीन केला; पण तो जसा जसा मोठा होऊं लागला, तशी तशी ती त्याला रुक्ष अन्न देऊं लागली. त्यामुळें त्या बालकाचें पोट मोठें झालें व सर्व अंग पिंवळें झालें. तें पाहून 'अगे या मातृहीन बालकाची तूं अशी उपेक्षा कां करतेस ? ' असें जेव्हां रुद्रशर्म्यानें विचारलें, तेव्हां ती त्याची दुसरी पत्नी म्हणाली, "मी तर बाई आपल्याकडून त्याचें मोठ्या प्रेमानें पोषण करतें,' पण तो दिवसेंदिवस खंगतच चालला आहे, त्याला मी तरी काय करूं ?" तें ऐकून 'हा पोरगाच रोगी आहे, असें समजून रुद्रशर्मा उगीच बसला. स्त्रियांच्या असत्य पण मधुर वचनावर कोणाचा विश्वास बसत नाहीं* ! !'

बाल असतांनाच हा नष्ट झाला आहे, असें मनांत आणून पित्यानें त्याचें बालविनष्ट असें नांव ठेविलें. कांहीं दिवस लोटल्यावर तो बालविनष्ट,–'ही माझी सावत्र माता मला नेहमीं कदन्न देऊन असा निर्बल करीत आहे, असें जाणून आतां ह्या तिच्या कौटिल्याचा बदला कसा बरें घ्यावा,'–म्हणून विचार करूं लागला. त्याचें वय पांच वर्षांचें होतें, तरी त्याला परमेश्वरानें विलक्षण बुद्धि दिली होती. त्यामुळें रुद्रशर्मा राजकुलांतून परत आल्यावर, 'बाबा, माझे दोन बाप आहेत' असें तो नित्य अस्पष्ट वाणीनें एकांतांत त्याला सांगूं लागला. 'हा आपला अज्ञ बालक मला रोज हें काय सांगतो ? असें मनांत आणून पुष्कळ विचार करूं लागला, तेव्हां आपली भार्या व्यभिचारिणी आहे, असा त्याचा दृढ निश्चय झाला, व त्यानें तिचा स्पर्शही वर्ज केला.

तेव्हां ती स्त्रीही माझा पति निष्कारण मजवर कां बरें रागावला ! बालविनष्टानें कांहीं तरी सांगून त्याचें मन कलुषित तर केलें नसावें, असें तिला वाटलें. तिनें त्याला मोठ्या आनंदानें न्हाऊं व जेऊं घालून

---

* स्त्रीणामलीकमुग्धं हि वचः को मन्यते मृषा ।

त्याला प्रेमानें आपल्या मांडीवर बसविलें. आणि 'बाळा तूं आपल्या बापाला मजविषयीं काय सांगितलेंस?' असें ती विचारूं लागली. तेव्हां तो म्हणाला, आई, "तूं जर मला आपल्या पुत्राप्रमाणें अन्नादिकांच्या योगानें संतुष्ट केलें नाहींस, तर अजून काय झालें आहे ? याहीपेक्षां मी तुझी अधिक दुर्दशा करीन." तेव्हां ती म्हणाली; 'बाळा, मी आजपासून तुला काडीभरही दुःख देणार नाहीं; पण तुझा बाप मजवर सुप्रसन्न होईल असें कर.' तें तिचें दीनवाणीचें भाषण ऐकून संतुष्ट झालेला तो बालक म्हणाला, "बरें तर आज बाबा आले म्हणजे तुझ्या दासीला, त्याला आरसा दाखवावयास सांग. तिनें त्याच्यापुढें आरसा धरला, म्हणजे मग मला काय करावयाचें तें मी करीन." हा त्याच्या युक्तीप्रमाणें रुद्रशर्मा राजगृहांतून परत आल्यावर बालविनष्टाच्या सापत्न आईनें दासीकडून त्याच्यापुढें आरसा धरविला. त्याबरोबर त्यांतील प्रतिबिंबाकडे पाहून—'बाबा हाच तो माझा दुसरा पिता'—असें तो मोठ्या आनंदानें वारंवार म्हणूं लागला. तें ऐकून रुद्रशर्मा मनांत म्हणाला; 'या पुत्राच्या म्हणण्याचा अर्थ न समजून आपण उगीच आपल्या प्रियेवर रागावलों.' आणि तेव्हांपासून तो तिच्याशीं पूर्ववत् व्यवहार करूं लागला. अर्थात् त्या शहाण्या बालकावरही त्याची सावत्र माता आपल्या पुत्राप्रमाणें प्रेम करूं लागली.

यास्तव, हे मित्रा, एकाद्या बालकाचेंही मन जर आपल्या हातून दुखवलें, तर तो सुद्धां आपली हानि करील, हें मनांत ठेवून आबालवृद्धांचें अनुरंजन केलें पाहिजे. याप्रमाणें विचार करून त्या दोघा मंत्र्यांनीं त्या वत्सराजाच्या विवाहोत्सवप्रसंगीं राष्ट्रांतील सर्व लोकांस अतिशय संतुष्ट केलें. त्यानंतर वत्सराजानें स्वतः त्या मंत्र्यांचा व वसंतकाचा सत्कार केला. त्यांस उत्तम अन्नाचें भोजन दिलें, त्यांच्या अंगास स्वतः उटी लाविली, व त्यांच्या नांवानें अनेक ग्राम करून दिले. याप्रमाणें विवाहमंगल निर्विघ्नपणें आटोपल्यावर तो उत्तम राजा सर्व प्रजाजनांस परम आनंद देत व वासवदत्तेसह स्वतःही आनंदित होत, आपला पुढचा काल घालवूं लागला. गोपालक कांहीं दिवस तेथें राहून पित्याची आज्ञा व वत्सराजाचा आग्रह या दोघांनाही मान देऊन आपल्या विवाहाकरितां आपल्या नगरीस परत गेला.

वत्सराज इंद्रियांच्या चापल्यामुळें विरचिता नामक पूर्वपरिचित अंतःपुरचारिणीशीं अद्यापि स्नेहसंबंध करीत असल्याकारणानें एकदां मद्याच्या धुंदींत वासवदत्तेलाच तिच्या नांवानें हाक मारूं लागला. तेव्हां ती मानी देवी अतिशय रागावली; पण त्याविषयीं राजानें तिच्या पायां पडून तिला प्रसन्न केलें. कांहीं दिवसांनीं गोपालकानें आपल्या भगिनीकडे, एक बंधुमती नामक, लढाईत आपल्या भुजबलानें मिळविलेली राजपुत्री पाठविली. ती लावण्यसागरांतून निघालेली जणुं काय साक्षात् लक्ष्मीच आहे, असें तिच्याकडे पहाणारांस वाटे. वासवदत्तेनें मंजुळका असें तिचें नांव ठेविलें; व ही सुंदरी राजाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून तिला गुप्त स्थळीं रहावयास सांगितलें; पण दैवयोगानें वसंतकासह फिरत असलेल्या राजानें तिला उद्यानांतील लतागृहांत पाहिलें. तिच्या अवर्णनीय रूपाचें दर्शन होतांच राजा अधीर झाला, व वसंतकाच्या मध्यस्तीनें वत्सराजाची ती दुसरी भार्या झाली. राजानें त्या उद्यानांतच गांधर्वविधीनें तिचें पाणिग्रहण केलें. कांहीं दिवसांनीं वासवदत्तेला संशय येऊन ती त्यांच्या पाळतीवर राहिली. एकदां तीं दोघें एकांतांत असतांना तिला दिसलीं. मग काय विचारतां! मानी वासवदत्तेला अनिवार्य क्रोध आला. 'या सर्व अनर्थाचें कारण वसंतक आहे;' असें मंजुळकेच्या तोंडून ऐकल्यावर वासवदत्तेनें त्या राज-सचिवास बांधून आणविलें. आपल्या फजितीला आतां पारावार नाहीं, असें समजून राजा वासवदत्तेच्या सांकृत्यायनी सखीस शरण गेला. ती संन्याशीण असून राणीच्या माहेरून तिच्याकडे आली होती. तिनें वासवदत्तेला दोन उपदेशपर गोष्टी सांगून संतुष्ट केलें, व तिच्या अनुमोदनानेंच त्या संन्याशिणीनें ती बंधुमती राजास दिली. त्यानंतर रागाचें कारणच नाहीसें झाल्यावर देवी वासवदत्तेनें वसंतकास बंधमुक्त केलें. तेव्हां तो आनंदानें देवीजवळ जाऊन हंसत म्हणाला, "देवि, अपराध बंधुमतीचा व दंड मला, हा चांगला न्याय. तुम्ही थोर लोक सदां असेच सर्पावर रागावून आधेल्यावर प्रहार करीत सुटतां." हें त्याचें मार्मिक भाषण ऐकून 'ब्राह्मणा, हा दृष्टांत मला चांगलासा समजला नाहीं. तो समजावा अशी माझी इच्छा आहे,' असें तिनें म्हटलें; तेव्हां वसंतक पुढील कथा सांगूं लागला.

## ३. रुरु व प्रमद्वरा यांची कथा.

देवि, पूर्वी रुरु नामक कोणी एक महर्षिपुत्र यदृच्छेनें परिभ्रमण करीत होता. तों एक अद्भुतरूपसंपन्न कन्या त्याच्या दृष्टीस पडली. ती विद्याधरापासून मेनकेच्या ठायीं उत्पन्न झालेली असून, स्थूलकेश मुनीनें आपल्या आश्रमांत तिचें पालनपोषण केलें होतें. प्रमद्वरा या नांवाच्या त्या कन्येनें केवल आपल्या दर्शनानेंच रुरूचें मन हरण केलें, त्यामुळें त्यानें स्थूल केशापाशीं तिची याचना केली. त्या उदार मुनीनेंही तिला देण्याचें अभिवचन दिलें; पण विवाहकाल समीप आला असतां, अकस्मात् सर्पदंश झाल्यामुळें ती सुंदरी मरण पावली. तेव्हां तिच्यां आकस्मिक मृत्यूनें रुरूचें मन अतिशय खिन्न झालें. पण इतक्यांत त्या महर्षिपुत्रानें ' ब्राह्मणा, या अल्पायषी स्त्रीला आपलें अर्धें आयुष्य देऊन तूं जिवंत कर.' अशी अंतरिक्षांतून झालेली आकाशवाणी ऐकली, व आपल्या अर्ध्या आयुष्याच्या दानाचा संकल्प करितांच ती रमणी तत्कील उठून बसली. लागलाच त्या दोघांचा विवाह झाला. पण रुरु त्या दिवसापासून जो जो साप दिसेल त्याला त्याला, यानें माझ्या प्रियेला दंश केला, असें समजून रागानें मारूं लागला. एकदा त्याला एक आधेला* भेटला, तेव्हां तो ब्राह्मण काठी घेऊन त्याच्या मागें लागला. तें पाहून तो डुंडुभ मनुष्यवाणीनें म्हणाला, " ब्राह्मणवर्या, सर्पावर रागावून तूं आह्मां डुंडुभांनाही कां मारतोस ? तुझ्या भार्येला सर्पदंश झाला, पण सर्प व डुंडुभ अगदीं भिन्न प्राणी आहेत. सर्प सविष असतात, व माझ्या जातीचे डुंडुभ निर्विष असतात." तें ऐकून 'मित्रा, तूं कोण आहेस ?' असें रुरूनें विचारलें असतां-' ब्राह्मणा मी शापभ्रष्ट मुनि आहें. तुझ्याशीं संवाद होईतों माझ्या शापाचा काल होता, आतां मी पुनः आपल्या स्वरूपास जाऊन मिळतों '-असें सांगून तो गुप्त झाला, व रुरूनें त्या दिवसापासून आधेल्यास मारिलें नाहीं.

असो; ' देवि, या न्यायानें तूं मला दंड केलास,' असें हंसत बोलून वसंतक मुकाट्यानें बसला असतां वासवदत्ता संतुष्ट झाली. वत्सराजा उदय-

* आधेल्याची आकृति सर्पाप्रमाणेंच असते, पण त्याला विष नसतें. त्याला डुंडुभ असें संस्कृतांत म्हणतात.

नानेंही रागावलेल्या क्रियेबद्दल स्वतः क्षमा मागितली व वसंतकाच्या तोंडून अशा अनेक उत्तमोत्तम कथा तिच्याकडून ऐकवीत तो विलासी राजा विहार करीत राहिला. त्या सुखी राजाची रसना मद्यरसामध्यें, कर्ण सुंदर वीणारवामध्यें व दृष्टि प्रियेच्या रमणीय मुखामध्यें सदा आसक्त होऊन राहिली.

कथामुखनामक द्वितीय लंबक समाप्त.

---

# ३. लावाणक-लंबक.

## तरंग १ ला.

### १ वत्स राजाच्या द्वितीय विवाहाचा उद्योग.

मागच्या लंबकांत वर्णन केल्याप्रमाणें वासवदत्तेसह वत्सराज केवळ सुखोपभोग घेत राहिला. महामंत्री यौगंधरायण, सेनापति रुमण्वानाच्या साह्यानें राज्यभार वहात होता. एके दिवशीं रात्रीं त्या शूर सेनापतीस आपल्या येथें बोलावून आणून तो विचारी व राजाविषयीं अतिशय कळकळ बाळगणारा मंत्री पुढील विचार करूं लागला.—

मित्रा, हा राजा पांडवांच्या वंशांत उत्पन्न झालेला असून ह्याची ही सर्व कुलक्रमप्राप्त पृथ्वी आहे. याची मूळ राजधानी हस्तिनापुर; पण याला विजयाची मुळीं इच्छाच नसल्यामुळें; यानें त्या सर्वांचा त्याग केला आहे, त्यामुळें येथेंच काय तें याचें राज्य राहिलें आहे. आमच्यावर सर्व राज्यकारभार टाकून हा केवळ व्यसनासक्त होऊन राहिला आहे. यास्तव याची सर्व पृथ्वी पुनः याच्या अधिकारांत येईल, असा प्रयत्न आम्हांला केला पाहिजे. आळस करितां कामा नये. हें महत्कार्य केल्यासच आम्ही योग्य प्रभुभक्ति केली असें होईल. उत्कृष्ट बुद्धीच्या योगानें सर्व साध्य होतें, याविषयीं मी एक कथा तुला सांगतों, ती ऐक.

## २. महासेनाची उपकथा.

पूर्वी महासेन म्हणून कोणी एक राजा होता. त्याचा कोणा एका बलाढ्य राजाशीं संग्राम होण्याचा प्रसंग आला. तेव्हां आपल्या इष्ट-कार्याचा भ्रंश होऊं नये, म्हणून अमात्यांनीं राजाकडून त्या शत्रूस दंड देवविला; पण त्यामुळें महासेनास फार दुःख झालें. 'मी आपल्या शत्रूला प्रणाम केला हें माझ्या मानी स्वभावास शोभेसें झालें नाहीं,' असें वाटून त्याला त्याच शोकानें गुल्मरोग झाला. कांहीं दिवसांनीं तो अगदीं मरणोन्मुख होऊन पडला आहे असें पाहून, व हा गुल्मरोग औषधानें बरा होण्यासारखा नाहीं असें जाणून, शहाण्या, राजवैद्यानें एकाएकीं त्याच्या जवळ जाऊन 'तुझी महाराणी मेली' असें सांगितलें. तें ऐकतांच राजा मूर्च्छित होऊन धाडकन् भूमीवर पडला. पण त्या आघातानें त्याच्या उदरांतील गुल्म फुटून एक-दोन दिवसांतच त्याला बरें वाटलें. राजाचा प्राण घेण्याकरितां उद्भवलेला गुल्म फुटला आहे, असें पहातांच राजवैद्यानें राणीच्या मृत्यूची वार्ता खोटी आहे व गुल्मनाशाकरितांच मीं तिचा उपयोग केला होता, असें त्यास सांगून त्याचें समाधान केलें. पुढें तो अगदीं बरा होऊन त्याच राणीसह इष्ट भोग भोगूं लागला; आणि त्यानें स्वपराक्रमानें सर्व शत्रूंस जिंकलें.

यास्तव या कथेंतील वैद्यानें चातुर्यानें राजाचे प्राण जसे वांचविले, त्याचप्रमाणें आम्हांलाही राजाचें हित केलें पाहिजे. मगधेश्वर प्रद्योत हा प्रबल शत्रु आहे. आम्ही पृथ्वीचा विजय करण्याकरितां गेलों म्हणजे मागून येऊन तो आपल्या देशांत क्षोभ उत्पन्न केल्यावांचून रहाणार नाहीं. यास्तव सर्व पृथ्वी वत्सराजाच्या ताब्यांत घेण्याच्या प्रयत्नास लागण्यापूर्वी त्या मगधेश्वराला अनुकूल करून घेतलें पाहिजे. पद्मावती म्हणून त्याची एक उत्कृष्ट कन्या आहे. तिच्याकरितां मी मागें एकदां त्याची प्रार्थना केली होती; पण तो म्हणाला, कीं मला प्राणाहूनही प्रिय असलेली ही कन्या मी वत्सराजाला देणार नाहीं व तोही तिला वरणार नाहीं; कारण त्याचा वासवदत्तेवर अतिशय स्नेह आहे. यास्तव, कांहीं तरी युक्ति करूनच ती कन्या मिळविली पाहिजे. त्यावांचून आपला कार्यभाग सिद्ध होणार नाहीं. मला असें वाटतें कीं, देवी वासवदत्तेला कोठें तरी गुप्त रीतीनें ठेवून, तिच्या गृहाला अग्नि लावून द्यावा व ती जळली

अशी हाकाटी करावी, म्हणजे आपलें कार्य साधेल. पद्मावती एकदा मिळाली म्हणजे मगधेश्वर आपल्या जामाताच्या विरुद्ध जाणार नाहीं. उलट सहाय्यच करील, आणि हा डाव साधला कीं, मग आम्ही या राजास घेऊन क्रमानें पूर्वादि दिशांचा विजय करूं. आम्हीं उद्योग केल्यास याला सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त होईल, अशी पूर्वी आकाशवाणीही झाली आहे." मुख्य मंत्र्याचें हें भाषण ऐकून, रुमण्वान् हंसून म्हणाला, "आपण म्हणतां तें सर्व ठीक आहे; पण पद्मावतीकरितां केलेलें कपट आमच्याच हानीस कारण होणार नाहीं म्हणून कशावरून?" याविषयीं मी एक गोष्ट सांगतों ती ऐका.

३. मौनी संन्याशाची उपकथा.

जान्हवीच्या तीरीं माकंदिका म्हणून एक नगरी आहे. तिच्यामध्यें मागें एक मौनव्रती संन्यासी रहात असे. अनेक संन्याशांच्या परिवारानें युक्त असलेला तो संन्यासी आपल्या आश्रमधर्माप्रमाणें माधुकरी मागून आपला निर्वाह करीत असे व एका देवालयाजवळ मठांत राही. एकदां दोनप्रहरीं भिक्षा मागण्याकरितां गावांत आला असतां, एका वैश्याची अतिसुंदर व तरुण कन्या त्याला भिक्षा घालण्याकरितां पुढें आली. तिला पहातांच तो संन्यासी कामवश झाला, व त्या शठानें आपलें मौनव्रत सोडून 'अरे अरे, फार वाईट' असें तिच्या बापासमक्ष म्हटलें. नंतर भिक्षा घेऊन तो जाऊं लागला असतां, वैश्यही त्याच्या मागून जाऊन व प्रमाण करून म्हणाला, "भिक्षो, आपण आज मौन सोडून एकाएकीं हें असें काय म्हटलेंत?" त्यावर तो संन्यासी म्हणतो–बाबारे, तुझी ही कन्या दुर्लक्षणा आहे. हिचा जेव्हां विवाह होईल, तेव्हां हिचा पिता, आई, भाऊ इत्यादि सर्वांचा नाश होईल. बाहेरून सुंदर दिसणाऱ्या तुझ्या कन्येचें हें दुर्लक्षण पाहून मला दुःख झालें व त्या वेगांत मी तसें बोलून गेलों. तूं माझा अतिशय भक्त आहेस, म्हणून मौन सोडूनही मी तुला हें गुह्य सांगितलें. आतां याला एक उपाय आहे. तो हा कीं,– या अभद्र कन्येला रात्रीं एका पेटींत घाल, व तिचें तोंड बंद करून, तिच्यावर एक दिवा ठेव, आणि ती पेटी गंगेमध्यें सोडून दे. म्हणजे तुमच्या घराण्याचें सर्व प्रकारें कल्याण होईल–हें त्या धूर्ताचें भाषण ऐकून त्या भोळ्या वैश्यानें रात्रीं त्याप्रमाणें केलें. इकडे संन्याशानेंही

त्याच सुमारास अनुचरांस सांगितलें कीं, तुम्ही गंगेवर जा व तिच्या प्रवाहांतून जिच्यावर दिवा ठेविला आहे, अशी एक पेटी वहात जात आहे, असें आढळल्यास ती काढून मजकडे घेऊन या. त्यांत कोणी रडत आहे असें तुम्हांला वाटेल; पण तुम्ही तिचें झांकण उघडूं नका. लबाड संन्याशाची ही गोष्ट ऐकून केवळ सांगकामे शिष्य गंगेवर गेले. पण इतक्यांत राजपुत्रानें गंगेतून वहात असलेल्या त्या दीपयुक्त मंजूषेस पाहून आपल्या भृत्यांकडून तिला वर काढून आणविलें व तिचें झांकण उघडून जों तो आंत पहातो तों तिला ती रमणी दिसली. तिच्याच तोंडून तिचा सर्व वृत्तांत ऐकल्यावर त्या भाग्यवानानें तात्काळ तिच्याशीं गांधर्व विधीनें विवाह केला, व ज्यानें निर्दयपणाचें कृत्य करविलें होतें, त्याला योग्य बक्षिस मिळावें म्हणून त्या सुज्ञ राजपुत्रानें त्या पेटींत एक मोठा थोरला वानर बसविला; व तिचें झांकण बंद करून पूर्वीप्रमाणेंच वर जळता दीप ठेविला आणि पुन: तिला गंगाप्रवाहांत सोडविलें. कांहीं वेळानें ती पेटी संन्याशाच्या शिष्यांस दिसली. त्यांनीं तिला वर काढून मठांत आणलें. त्याबरोबर त्यांच्या गुरूला परम आनंद झाला. 'मी एकटाच हिला वर नेऊन मंत्र सिद्ध करितों, तुम्ही खालींच स्वस्थ निजा' असें सांगून त्या दुष्टानें ती पेटी स्वत: मठाच्या माडीवर नेली व त्यांतील सुंदर वैश्यकन्येच्या आशेनें त्यानें तिचें झांकण उघडिलें. पण त्याबरोबर तो भयंकर वानर त्यांतून बाहेर पडला, व त्यानें क्रोधानें दांत व नखें यांच्या योगानें त्याचें नाक व कान तोडले. आपल्या गुरूची ती अवस्था पाहून, शिष्यांना हंसूं आलें; पण त्यांनीं मोठ्या प्रयत्नानें तें आवरून धरून तोंडें खालीं घातलीं. प्रात:काळीं तो वृत्तांत सर्व नगरभर झाला व सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुष हंसूं लागले. आपल्या कन्येचें परम कल्याण अनायासानें झालें आहे, असें पाहून वैश्यास परम आनंद झाला.

रुमण्वान् म्हणाला—कपटाचरणामुळें संन्याशाची जशी फजिती झाली तशीच आमचीही कदाचित् होईल. शिवाय वासवदत्तेचा वियोग राजाला मुळींच सहन होणार नाहीं हें वेगळेंच.

रुमण्वानाचें हें भाषण ऐकून यौगंधरायण म्हणतो—मित्रा, उद्योगावांचून इष्टसिद्धि होणार नाहीं. उद्योगच न केल्यास, राजा व्यसनासक्त असल्यामुळें आपले सर्व मनोरथ विफल होतील. आम्ही आपल्या चातुर्यानें राजाची

जर उन्नति न केली, तर 'हे महाबुद्धिमान् मंत्री आहेत' अशी जी ख्याति झाली आहे, ती व्यर्थ ठरेल. राजा जेव्हां स्वतः चतुर, सामर्थ्यवान् व जितेंद्रिय असतो, तेव्हां त्याचे मंत्री केवळ त्याच्या बुद्धीचीं उपकरणें होऊन रहातात. त्यामुळें राजकार्य सिद्ध किंवा असिद्ध झालें तरी सचिवांची स्तुति किंवा निंदा होत नाहीं. पण राजा निष्काळजी, व्यसनासक्त व अजितेंद्रिय झाल्याकारणानें सर्व राज्यभार मंत्र्यांवरच जेव्हां येऊन पडतो, तेव्हां त्यांची बुद्धीच कार्यसिद्धीचें साधन होऊन रहातें. त्यामुळें अशा प्रसंगीं ते जर निरुत्साह व निष्प्रयत्न झाले, तर राज्यलक्ष्मीचा नाश झाल्यावांचून कसा राहील ? वासवदत्तादेवीचा पिता चंडमहासेन, तिचे भाऊ व स्वतः देवी यांना भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तीं सर्व माझें म्हणणें मान्य करतील.

महाबुद्धिमान् यौगंधरायणाचें हें म्हणणें ऐकून, या युक्तीचा भलताच कांहीं परिणाम होईल, अशी शंका आल्यामुळें रुमण्वान् पुनरपि म्हणाला. "मित्रा, आवडत्या प्रियेच्या विरहव्यथेनें अतिधीर पुरुषही व्याकुल होतो, मग अत्यंत स्त्रीपरायण वत्सराजाविषयीं काय सांगावें ? याविषयीं मी एक गोष्ट सांगतों ती ऐक."

## ४. देवसेनाची उपकथा.

पूर्वी देवसेन म्हणून एक महामति नरपति होता. श्रावस्ती नगरी त्याची राजधानी होती. त्या नगरींत एक मोठा श्रीमान् वैश्य रहात असे. त्याला एक निरुपम कन्या झाली. तिचें स्वरूप पाहून प्रत्येक पुरुष उन्मत्त होत असे. म्हणून उन्मादिनी असें तिला म्हणत. 'ही कन्या राजाला कळविल्यावांचून दुसऱ्या कोणाला देऊं नये; कारण मागाहून त्याला कळल्यास तो आपल्यावर रागावेल.' असा पोक्त विचार करून तिच्या पित्यानें 'माझी एक सुंदर कन्या आहे, आपल्याला बरी वाटल्यास तिच्याशीं विवाह करावा,' अशी राजाची प्रार्थना केली. ती ऐकून राजानें अतिविश्वासु ब्राह्मणांस म्हटलें कीं, आपण जा, व ती सुलक्षणा आहे कीं दुर्लक्षणा आहे, तें पाहून मला सांगा. राजाज्ञेप्रमाणें ते द्विज वैश्याचे घरीं गेले, व तिला पहातांच उन्मत्त झाले. त्यांच्या चित्तांत कामविकार उद्भवला; पण कांहीं वेळानें सावध होऊन त्यांनीं असा विचार केला कीं, राजानें हिच्याशीं विवाह केल्यास तो हिच्याच

ठिकाणीं लुब्ध होऊन राहील व राजकार्याकडे दुर्लक्ष करील. त्यामुळें मोठा अनर्थ ओढेल. यास्तव ही कुलक्षणा आहे, असेंच त्यास सांगावें, हें बरें. असा हितकर संकेत करून त्यांनीं राजालाही तसेंच कळविलें. तें ऐकून राजानें तिचा नाद सोडला. तेव्हां वैश्यानें ती सेनापतीला दिली. पुढें एकदा सेनापतीच्या घरावरून जात असतांना ती सुंदरी राजाच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर राजा उन्मत्त झाला. सर्व जगाला मोह पाडणारी ही एक दिव्य औषधीच आहे, असें त्याला वाटलें. आपल्या मंदिरांत गेल्यावर, पूर्वी 'आम्हांला नको' म्हणून सांगितलेली तीच ही वैश्यकन्या आहे, असें त्याला समजलें. त्याचें चित्त अतिशय उद्विग्न झालें. त्याला भयंकर व्यथा होऊं लागली. आपल्या स्वामीची ती दुरवस्था पाहून सेनापति म्हणाला, "प्रभो, ती आपलीच दासी आहे. परस्त्री नव्हे, आपण तिचा खुशाल स्वीकार करावा. किंवा मी तिला देवालयांत नेऊन सोडतों व त्यानंतर त्या अनाथ स्त्रीचें आपण ग्रहण करावें." पण त्या धार्मिक व सुशील राजानें सेनापतीच्या म्हणण्याचें अभिनंदन केलें नाहीं. उलट 'मी परस्त्रीला स्पर्शही करणार नाहीं, व तिचा त्याग केल्यास तूं मोठा अपराधी होशील, आणि त्याकरितां मी तुला दंड करीन' असें तो बोलला. तें ऐकून तो व इतर मंत्री मुकाट्यानें बसले. व राजाही त्याच कामज्वरानें संतप्त होऊन थोड्या दिवसांनीं मरण पावला.

या कथेंतील राजा किती गंभीर व धीर होता, पण तोही उन्मादिनीच्या व्यथेनें मेला. मग आमच्या या स्वभावतःच कामी राजाची वासवदत्तेच्या अभावीं काय अवस्था होईल ?

रुमण्वानाचें हे विचार करण्यासारखें भाषण ऐकून यौगंधरायण पुनः म्हणाला, "मित्रा, आपल्या इष्ट कार्याकडे दृष्टि देऊन राजे क्लेशही सहन करितात. रावणाच्या वधाकरितां देवांनीं युक्तीनें सीता व राम यांचा वियोग करविला; पण तो रामानें सहन केला कीं नाहीं ?" त्यावर रुमण्वान् पुनः म्हणतो-महामते, ते रामादिक देव होते. त्यांचें मन सर्व सहन करण्यास समर्थ होतें; पण मनुष्याचें मन तसें नसतें. याविषयीं आणखी एक कथा सांगतों ती ऐक.

## ५. यड्लक वैश्यपुत्राची उपकथा.

महारत्नांनीं संपन्न अशी एक मथुरा नामक नगरी आहे. तेथें यड्लक म्हणून एक वणिक्पुत्र असे. त्याची एक प्रिय व त्याच्यावरच अतिशय आसक्त असलेली भार्या होती. तिच्यासह तो तेथें पुष्कळ दिवस रहात होता; पण एकदा फार मोठ्या कामाकरितां त्याला देशांतरास जाण्याची इच्छा झाली. तेव्हां 'मीही तुमच्याबरोबर येतें' असा त्याच्या भार्येनें हट्ट धरिला. कारण स्त्रियांचें भोगासक्त मन विरह सहन करण्यास समर्थ नसतें* पुढें वणिक्पुत्रानें शुभ दिवशीं प्रस्थान केलें; पण निघण्यास सज्ज झालेल्या आपल्या प्रियेला बरोबर नेलें नाहीं. तो जेव्हां निघाला, तेव्हां डोळ्यांत पाणी आणून त्याच्याकडे पहात ती साध्वी अंगणाच्या द्वारांत उभी होती, आणि प्राणनाथ दृष्टीआड होतांच तिचे प्राण त्या नेत्रांतूनच निघून गेले. ही दुःखकर वार्ता त्याच्या अनुचरांनीं पळत जाऊन त्याला कळविली, त्याबरोबर तो परतला. भूमीवर प्रेत होऊन पडलेल्या त्या आनंददायिनी सुंदरीस पाहून यड्लक अतिशय विव्हल झाला. शेवटीं आपल्या प्रियेला मांडीवर घेऊन आक्रोश करीत असतां त्या वैश्याचेही प्राण गेले. तिच्या शोकानें अतिशय संतप्त झालेल्या वैश्याच्या देहांत ते प्राण राहूं शकले नाहींत. म्हणून मी म्हणतों, कीं एकमेकांच्या वियोगामुळें त्या दंपतीचा जसा नाश झाला, तसें या राजदंपतीचेंही अकल्याण न होवो.

इतकें सांगून रुमण्वान् साशंक मनानें गप्प बसला असतां, धैर्यसागर धीमान् यौगंधरायण पुनः म्हणाला, "मीं या सर्व गोष्टींचा विचार केला आहे. राजांचीं कार्यें हीं अशींच असतात. याविषयीं मोही तुला एक कथा सांगतों, ती ऐक.

## ६. पुण्यसेनाची उपकथा.

पूर्वी उज्जयिनींत पुण्यसेन म्हणून राजा होता. त्याच्यावर एकदां एका मोठ्या बलाढ्य राजानें स्वारी केली. तेव्हां तो शत्रु अजिंक्य आहे, असें पाहून पुण्यसेनाच्या महामतिमान् मंत्र्यांनीं आमचा राजा मेला, अशी खोटीच गप्प सर्व राष्ट्रभर पसरविली, व पुण्यसेनाला लपवून ठेवून दुसऱ्याच कोणाच्या मृत देहाला राजाच्या देहाप्रमाणें मोठ्या समारंभानें

---

* स्त्रीणां भावानुरक्तं हि विरहासहनं मनः ।

जाळलें. नंतर–राजा गेल्यामुळें अराजक झालेल्या आमचा तूंच राजा हो, –अशी त्यांनीं दूताच्या द्वारा शत्रूची प्रार्थना केली. तेव्हां त्या लोभी राजानें मोठ्या आनंदानें 'बरें आहे' असें म्हणून राज्याभिषेकाची तयारी करावयास सांगितलें. इतक्यांत ते महामंत्री त्याच्या सैन्यामध्यें शिरून मोठमोठ्या लोकांशीं स्नेहसंपादन करूं लागले. त्यांतील अर्ध्या अधिक शूरांना द्रव्यादि देऊन त्यांनीं आपलेंसें करून घेतलें, आणि अशा रीतीनें शत्रुसैन्यांत पूर्ण भेद पाडल्यावर, पुण्यसेन राजास प्रकट करून स्वसामर्थ्यानें त्यांनीं शत्रूस मारलें.

तात्पर्य राजकार्यें अशा कुटिल नीतीनेंच पार पाडावीं लागतात. यास्तव देवी वासवदत्ता जळली, अशी वार्ता लोकांत पसरून धैर्यानें आपण हें कार्य साधूं या. तें ऐकून रुमण्वान् म्हणतो–तुमचा जर हा निश्चयच झाला असेल, तर देवीच्या गोपालक भ्रात्यास आणवून व त्याची पूर्ण संमति घेऊन विचारपूर्वक कार्यास आरंभ करावा. त्यावर यौगंधरायणानेंही ठीक आहे, असें म्हणून या कामीं रुमण्वानाचें पूर्ण सहाय मागितलें व त्या शूर सेनापतीनेंही तें देण्याचें मान्य करून सर्व कर्तव्याचा निश्चय केला. दुसऱ्याच दिवशीं त्या उत्तम मंत्र्यांनीं कांहीं निमित्त करून गोपालकास आणण्याकरितां दूत पाठविला. दूताच्या तोंडचा निरोप ऐकून गोपालकही, मूर्तिमान् उत्सवाप्रमाणें सत्वर आला. लागलेंच रुमण्वानासह त्या मंत्र्यानें गोपालकाला एकांतस्थळीं नेलें व आपला संकेत सांगितला. तेव्हां राजाचें हित व्हावें या इच्छेनें गोपालकानें आपल्या प्रिय भगिनीला अनिष्ट असलेल्याही त्या दुःखावह कामास आपलें अनुमोदन दिलें. विचारी लोकांची दृष्टि नेहमीं कार्याकडे असते.

इतकें सर्व झालें तरी रुमण्वानाला धैर्य येईना. 'हें सर्व ठीक झालें; पण देवी वासवदत्ता जळली, हें ऐकून प्राण देण्यास तयार होणाऱ्या राजाचें रक्षण कसें करितां येईल, याचा अगोदर विचार करा; कारण उपाय कितीही जरी योजले तरी अपायांस प्रतिबंध कसा करितां येईल, याचाही विचार करून ठेवणें हेंच मंत्राचें मुख्य अंग आहे.'* असें तो पुनः म्हणाला. तेव्हां ज्यानें सर्व इष्टानिष्ट गोष्टींचा पूर्वींच चांगला

*सदुपायादिसामग्रीसंभवे किल सत्यपि। मुख्यमङ्गं हि मन्त्रस्य विनिपातप्रतिक्रिया॥

विचार करून ठेवला आहे, असा यौगंधरायण म्हणाला–त्याविषयीं चिंता करावयास नको; कारण गोपालकास त्याची धाकटी बहीण प्राणाहूनही प्रिय असतांना तिच्याकरितां तो फारसा शोक करीत नाहीं, असें पाहून कदाचित् देवी जिवंत असेल असें जाणून राजा धैर्य धरील. तो मोठा धीरवान् आहे. लवकरच पद्मावतीशीं त्याचा विवाह होईल, व त्यानंतर लागलीच देवी त्याच्या दृष्टीस पडेल.

याप्रमाणें पूर्वसंकेत करून ते तिघेही उत्तर संकेत करूं लागले. आपण आतां युक्तीनें देवी व राजा यांस घेऊन लावाणकास जाऊं या. तो आमच्या राष्ट्राच्या हद्दीवरील प्रदेश असून मगधदेशाच्या अगदीं समीप-वर्ती आहे. तेथें मृगया अगदीं सुलभ असल्यामुळें तो प्रांत राजाला फार आवडतो. तेथें गेल्यावर राजा मृगयेंत आसक्त होऊन सदा बाहे-रच भटकत रहाणार, हें उघड आहे. तो जवळपास नाहीं असें पाहून आपण अंत:पुरास आग लावून देऊं या, व युक्तीनें देवीला पद्मावतीच्या येथेंच ठेवूं. गुप्त रीतीनें राहिलेल्या देवीचें शील पद्मावती उत्तम प्रकारें राखील. असो; रात्रीं तिघांच्या संमतीनें असा कर्तव्यनिश्चय करून दुसऱ्या दिवशीं सकाळींच राजगृहांत गेल्यावर रुमण्वान् राजास म्हणाला, "देव, आपल्याला लावाणक देशास जावयाचें आहे व तेथें पुष्कळ दिवस-पर्यंत रहावेंही लागेल ! कारण; तो देश मगधेश्वराच्या अगदीं समीप असल्यामुळें तो राजा निरंतर पीडा देत असतो. तो देश मृगयेस फार अनुकूल व रमणीय आहे. घोड्यांचें गवतही तेथें विपुल आहे. यास्तव आपल्या देशाच्या रक्षणाकरितां व विनोदाकरितां आपणही तेथें चलावें."

हें ऐकून क्रीडापरायण वत्सराजानें वासवदत्तेसह तेथें जाण्याचा निश्चय केला. गमननिश्चय होऊन प्रस्थानाचा शुभ मुहूर्तही ठरला, पण इतक्यांत आपल्या कांतीनें त्या प्रदेशास दीपित करीत, नारदमुनि राजापाशीं आला. राजानें त्याचें उत्तम आतिथ्य केलें, त्यामुळें नारदमुनि अति संतुष्ट झाला, व त्यानें त्या नम्र राजास पारिजातक पुष्पांची माळ दिली. वासवदत्तेच्या सत्कारानें आनंदित होऊन त्या मुनीनें तिला विद्याधरांचा राजा कामदेवांश तुझा पुत्र होईल, असा वर दिला, आणि पुनरपि तो म्हणाला,—राजन्, हिला पाहून मला आठवण झाली. पूर्वीं युधिष्ठिरादि पांच भ्राते तुझे पूर्वज होते. त्या पांचांची मिळून एक द्रौपदी भार्या होती.

ती या वासवदत्तेप्रमाणेंच रूपानें अप्रतिम आहे, असें पाहून व त्याचा कांहीं वाईट परिणाम होईल असें जाणून, मी त्यांस म्हटलें; तुम्हीं आपसांत स्त्रीवैर ठेवूं नये. कारण तेंच सर्व आपत्तीचें बीज असतें. याविषयीं मी एक कथा सांगतों, ती ऐका.—

## ६. सुंदोपसुंदांची उपकथा.

पूर्वी सुंद व उपसुंद या नांवाचे दोन भ्राते होते. पराक्रमानें ते त्रैलोक्यविजयी झाले; तेव्हां त्यांच्या नाशाकरितां विधात्यानें विश्वकर्म्याकडून तिलोत्तमा नामक दिव्य नारीस उत्पन्न करविलें. चारी दिशांस फांकणारें असें तिचें रूप पहाण्याकरितां हरही चतुर्मुख झाला. एकदा ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें कैलासावरील उपवनांत असलेल्या सुन्दोपसुन्दांजवळ ती स्त्री गेली. तिचें सर्वोत्तम रूप पाहून ते दोघेही तिला आलिंगन देऊं लागले. त्यांतील प्रत्येक–ही माझी प्रिया, ही माझी प्रिया–असें म्हणून दुसऱ्याशीं भांडूं लागला. त्यांनीं परस्परांवर शस्त्रांचे प्रहार केले, व शेवटीं एकमेकांच्या हातून मेले. सारांश, हा स्त्रीविषय असा आपत्तिजनक आहे. तुम्हां पांचांची एक द्रौपदी प्रिया आहे, यास्तव हिच्याकरितां तुमचा परस्पर विद्वेष होणार नाहीं, असा कांहीं उपाय योजा. मी सांगतों तो नियम तुम्ही अक्षरशः पाळा. जेव्हां ही ज्येष्ठ भ्रात्याची स्त्री असेल, तेव्हां तुमच्यांतील सर्व कनिष्ठांनीं हिला माता समजावें व कनिष्ठाची स्त्री असेल, तेव्हां सर्व वडील भ्रात्यांनीं हिला स्नुषा (सून) समजावें. हे राजा, तुझ्या त्या सर्वोत्तम पूर्वजांनीं हें माझें सांगणें मान्य केलें. ते माझे मोठे स्नेही होते, व त्यांच्यावरील प्रेमामुळेंच मी तुजकडे आलों आहें. मी काय सांगतों तें ऐक. त्यांनीं जसें माझें हितकर वचन मान्य केलें, तसें तूंही या आपल्या मंत्र्यांचें वचन ऐक. त्यांच्या सांगण्याप्रमाणें चालल्यास तुला थोडयाच कालांत फार मोठी संपत्ति मिळेल. कांहीं काल तुला थोडेसें दुःख अनुभवावें लागेल; पण त्यावेळीं तूं अति मोहांत पडूं नकोस. त्या दुःखाचाही परिणाम सुखकरच होईल.

असें सांगून मुनिवर्य गुप्त झाला असतां; त्याच्या वचनावर पूर्ण विश्वास असल्यामुळें, यौगंधरायणादिकांस मोठें धैर्य आलें, व ते दृढनिश्चयानें स्वकार्यसिद्ध्यर्थ प्रयत्न करूं लागले.

---

## तरंग २ रा.

### १. वासवदत्ता जळाली अशी वदंता.

### पद्मावतीशीं विवाह करून परत आल्यावर वत्सराजाचा पूर्व प्रियेशीं समागम.

त्यानंतर यौगंधरायणादि मंत्र्यांनीं वासवदत्तेसह वत्सराजास लावाणक देशास नेलें. सैन्याच्या कोलाहलानें दश दिशांस व्यापीत तो तेथें पोंचला असतां, मगधेश्वर साशंक व भयभीत झाला, व त्यानें महामति यौगंधरायणाकडे आपला दूत पाठविला. तेव्हां त्या महामंत्र्यानें आलेल्या दूताचें अभिनंदन केलें. वत्सेश्वर दूरदूरच्या अरण्यांतही मृगया करीत रानोमाळ भटकूं लागला. एकदा राजा शिकारीस गेला असतां, सर्व मंत्री गोपालकाशीं संकेत करून एकांतांत असलेल्या वासवदत्तेकडे गेले. तिला तिच्या भ्रात्यानें पूर्वींच थोडासा बोध करून ठेविला होता; पण पुनः ते सर्व युक्तीनें राजकार्यांत सहाय करण्याविषयीं तिची प्रार्थना करूं लागले. तेव्हां विरहदुःख देणाऱ्या अशाही त्या त्यांच्या म्हणण्यास तिनें मोठ्या कष्टानें अनुमोदन दिलें. कारण आपल्या स्वामीवर अनुरक्त असलेल्या कुलस्त्रिया स्वामीच्या हिताकरितां कोणतें संकट सहन करीत नाहींत !† त्यानंतर यौगंधरायणानें तिला आपलें रूप पालटण्याचा उपाय सांगितला, व तात्काल ब्राह्मणी बनविलें, वसंतकाला काणा बटु केलें, आणि तो स्वतः वृद्ध ब्राह्मण झाला. नंतर तो महामति यौगंधरायण बटुरूपी वसंतकास व ब्राह्मणी वासवदत्तेस बरोबर घेऊन मगधदेशास जाण्यास निघाला. वासवदत्तेस पतीचें गृह सोडतांना फार दुःख झालें व ती चित्तानें पतीकडे व देहानें मगधदेशाकडे चालली. इकडे रुमण्वानानें अंतःपुरास आग लावून दिली, व 'हाय हाय आमची देवी वसंतकासह जळली' अशी एकच हाकाटी केली. त्याबरोबर अग्निज्वाला व लोकांचा हाहाकार यांनीं अंतरिक्षास व्यापून सोडलें. पुढें क्रमानें अग्नि शांत झाला, तरी हाहाकार व आक्रोश कमी होईना. तिकडे यौगंधरायण, वासवदत्ता व वसंतक यांसह

---

† किं नाम न सहन्ते हि भर्तृभक्ताः कुलाङ्गनाः ।

मगधनगरीस पोंचला व उद्यानांत असलेल्या पद्मावती-राजकन्येकडे आला. ब्राह्मणाचें रूप घेतलेल्या त्या वासवदत्तेस पाहून पद्मावतीच्या नेत्रांस अत्यंत आल्हाद झाला, व तिनें त्यांस आपणाकडे बोलाविलें. व ‘ आपण येथें कां आलां ? ’ असा प्रश्न केला. तों यौगंधरायण म्हणाला— राजकन्ये, ही आवंतिका नामक माझी कन्या आहे. हिचा भर्ता व्यसनी असून तो हिला टाकून कोठें गेला आहे. यास्तव मी त्याला हुडकून आणीपर्यंत ही येथेंच असूं दे. हिचा हा काणा भाऊ हिच्यापाशींच राहील. याच्या सहवासानें ‘ मी एकटीच कोठें येऊन पडलें, असें हिला वाटणार नाहीं.

ब्राह्मणाचें हें म्हणणें त्या दयाळु पद्मावतीनें मान्य केलें असतां, त्या दोघांस तेथें सोडून व पद्मावतीला [illegible] मोठें कौतुक वाटलें आहे, अशी ती पद्मावती त्या दोघांचाही सत्कार करून मोठ्या प्रेमानें व आदरानें त्यांस राजभवनांत घेऊन गेली. त्या सौजन्य-संपन्न राजकन्येच्या अंतःपुरांत राहून तेथील भिंतीवरील रामाच्या चित्र-पटांतील सीतेकडे पहात वासवदत्तेनें भर्तृविरहव्यथा सहन केली. तिची आकृति, सौकुमार्य, निजणें, बसणें, इत्यादि क्रिया, व नीलकमलासारखा शरीराचा सुगंध, या सर्वांचा अनुभव घेऊन ही कोणी तरी दिव्य स्त्री आहे, असा पद्मावतीचा ग्रह झाला, व आपल्यासारख्याच उपचारांनीं ती तिची परिचर्या करूं लागली. विराटाच्या येथें राहिलेल्या द्रौपदीप्रमाणें प्रसंगा-मुळें गुप्त वेष घेतलेली ही कोणी मोठी स्त्री आहे, असेंहि तिला वाटलें. एकदां वत्सेश्वरानें शिकविलेली व म्लान न होणारी माळ व तिलक तिनें पद्मावतीला दिला. तेव्हां तसल्या अद्भुत माळेनें व तिलकानें अलंकृत झालेल्या आपल्या प्रिय कन्येला पाहून राजपत्नी म्हणाली; ‘ बाळे, तुला ही माळ व तिलक कोणीं दिला ?” तेव्हां राजकन्या म्हणाली; ‘आई, आवंतिका म्हणून एक ब्राह्मणी माझ्या येथें येऊन राहिली आहे, तिनें हें रचिलें ’ तेव्हां राजपत्नी म्हणाली—‘ तर मग ती मानुषी नव्हे, कोणी देवी आहे. मनुष्यस्त्रीला असें विज्ञान असणें शक्य नाहीं. देवता व मुनि सज्जनांचें सत्त्व पहाण्याकरितां त्यांच्या घरीं वेष पालटून केव्हां केव्हां असेच येऊन रहात असतात.’

## २. कुंती व दुर्वास यांची कथा.

मागें कुंतिभोज म्हणून एक राजा होता. सत्त्व पहाण्याचें ज्याचें शीलच आहे असा दुर्वासमुनी त्याच्या येथें येऊन राहिला. तेव्हां राजानें कुंतीला त्याची परिचर्या करावयास सांगितलें. तीही राजकन्या मोठ्या यत्नानें त्या मुनीची सेवा करीत असे. तेव्हां तिची परीक्षा पहाण्याकरितां ' कन्ये, मी आतां स्नान करून येतों माझ्याकरितां परमान्न ( पायस, भाताची खीर ) शिजवून तयार कर.' असें सांगून तो मुनि सत्वर गेला व स्नान करून येऊन भोजनार्थ बसला. तेव्हां कुंतीनें परमान्नानें भरलेली स्थाली त्याच्यापुढें ठेविली. पण तें पायसान्न फार ऊन आहे, व त्यामुळें तें पात्र हातांत घेतां येत नाहीं, असें पाहून मुनीनें तें आपल्या पाठीवर ठेवून घेण्याविषयीं कुंतीला नेत्रानें खूण केली त्या सहनशील कन्येनेंही मुनीचें भोजन होईतों ती स्थाली आपल्या पाठीवर ठेवून घेतली. तेव्हां मुनीनें सविकाश भोजन केलें; पण इकडे कुंतीची पाठ भाजली. तथापि ती साध्वी पाठ जळत असतांनाही अगदीं शांतपणें उभी होती. तें पाहून मुनि प्रसन्न झाला, व त्यानें भोजनोत्तर तिला उत्तम वर दिला. तशीच ही आवन्तिकाही तुझ्या घरांत कोणी देवी येऊन राहिली आहे असें समज, व तिची मोठ्या प्रयत्नानें आराधना कर. आपल्या आईचें हें हितकर वचन ऐकून पद्मावती, ब्राह्मणी वासवदत्तेस अधिकच मान देऊं लागली. आपल्या भर्त्यापासून दूर झालेली वासवदत्ता सूर्यास्तानंतर म्लान झालेल्या पद्मिनीप्रमाणें निस्तेज झाली होती; पण तिच्या चित्तरंजनाकरितां वसंतकानें केलेले वेडेवांकडे मुखविकार तिला मधून मधून गालांतल्या गालांत हंसावयास लावीत.

इकडे वत्सराज शिकार करण्याकरितां फार दूरवर जाऊन सायंकाळीं थकून लावाणक देशांतील आपल्या शिबिरास परत आला. तेथें येतांच अंतःपुर अग्नीनें दग्ध करून सोडलें आहे, असें त्याला दिसलें, व मंत्र्यांच्या तोंडून वसंतकासह देवी आंतल्याआंत जळाली, असें त्यानें ऐकलें. त्याबरोबर तो राजा मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. कांहीं वेळानें सावध झाल्यावर त्यानें विलाप करितां करितां देहत्यागाचा निश्चय केला; पण इतक्यांत त्याच्या मनांत असा विचार आला, कीं–नारदानें देवीला विद्याधराधिप पुत्र होईल असें सांगितलें आहे, तें खोटें होणार

नाहीं. 'तुला थोडेसें दुःख होईल' असेंही त्यानें मला अगोदरच सुचवून ठेविलें आहे. गोपालकही फारसा दुःखी झालेला नाहीं. यौगंधरायणादिकही विशेष दुःखित दिसत नाहींत. त्यावरून मला असें वाटतें कीं, ती देवी कशी तरी जिवंत आहे. मंत्र्यांनीं ही कांहींतरी नीति रचलेली असावी. त्यांचा कार्यभाग झाल्यावर देवी मला पुन्हा भेटेल, असा विचार करून व मंत्र्यांनीं केलेला बोध लक्षांत घेऊन राजानें कसें बसें धैर्य धरिलें. गोपालकानें दूतांस योग्य निरोप देऊन गुप्तरीतीनें मगधराजाकडे पाठविलें, आणि त्यांनींही राजाला तो वृत्तांत कळविला तेव्हां त्या कालज्ञ राजानें देवी वासवदत्ता जळाली, हें ऐकतांच यौगंधरायणानें जिच्याविषयीं पूर्वींच प्रार्थना केली होती, अशा त्या पद्मावतीला वत्सराजास देण्याचें ठरविलें, आणि दूतमुखानें त्यानें तो आपला निश्चय वत्सराज व यौगंधरायण यांस कळविला. वत्सराजानें, यौगंधरायणाच्या विचारानें त्या गोष्टीस संमति दिली. तेव्हां त्या महामंत्र्यानें शुभ लग्नाचा निश्चय ठरवून मगधराजाकडे उलट दूत पाठविला. त्यानें त्याच्याबरोबर 'आपली इच्छा आम्हांस मान्य आहे, आजपासून सातव्या दिवशीं आमचा स्वामी तेथें येईल, आणि सत्वर विवाह झाला म्हणजे त्याला प्रिय वासवदत्तेचेंहि विस्मरण पडेल,' असा उलट निरोप पाठविला होता. दूतानें अक्षरशः तसेंच मगधराजास कळविलें. तें ऐकून अर्थातच राजाला अतिशय आनंद झाला व त्यानें कन्येवरील स्नेहास शोभेल, असा तिच्या विवाहसंस्काराचा संभार जमविला. आपल्याला अति उत्तम व मान्य पतीची प्राप्ति होणार, हें पाहून पद्मावतीच्या आनंदास पार नाहींसा झाला; पण त्याच वेळीं वासवदत्तेच्या शोकालाही अंत राहिला नाहीं. ती वार्ता ऐकतांच तिचें मुख इतकें विवर्ण ( निस्तेज ) झालें कीं, तें त्या गुप्तवासांतील वेषाला जणुं काय सहायच करूं लागलें; पण विवाहाच्या द्वारा या शत्रूला मित्र करण्याकरितां हा सर्व खटाटोप आहे, वत्सराजाचा दुसरा विवाह झाला तरी तो तुजवरील प्रेम यत्किंचित् न्यून करणार नाहीं, असें वसंतकानें तिला सांगितलें. तेव्हां त्याची ती वाणी एकाद्या सखीप्रमाणेंच तिला धैर्य देऊं लागली.

## ३. पद्मावतीशीं विवाह व प्रियासमागम.

असो; विवाहविधीच्या पूर्वीं त्या सुंदरीनें पद्मावतीला पुनः माळ व तिलक दिला. ठरल्यावेळीं वत्सेश्वर, मंत्री व सैन्य यांसह मगधनगरींत आला. तेव्हां प्रजेच्या नेत्रांस आनंद देत उदय पावणाऱ्या चंद्रापुढें जसा सागर जातो, त्याप्रमाणें मगधेश्वर त्याला आनंदानें सामोरा गेला. पौरांच्या मनांत प्रवेश करणाऱ्या महोत्सवाप्रमाणें वत्सराज त्या नगरींत शिरला. वासवदत्तेच्या विरहव्यथेनें कृश झालेल्या, व प्रत्येक कामिनीच्या मनांत क्षोभ उत्पन्न करणाऱ्या वत्सराजाला, तेथील स्त्रियांनीं रतिविरहित मदनाप्रमाणेंच पाहिलें. शेवटीं वत्सराज मगधेश्वराच्या गृहास जाऊन पोंचला. त्याला राजानें पतिव्रती स्त्रियांनीं भरलेल्या गृहांत नेलें. तेथें सर्व मंगलाभरणांनीं भूषित व चंद्रमुखी पद्मावती त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या शरीरावर आपली दिव्य माला व तिलक पाहून हे हिला कसे व कोठून प्राप्त झाले? असें तो मनांत म्हणूं लागला. त्यानंतर विवाहवेदीवर जाऊन राजानें पद्मावतीचा पाणिग्रह केला. तोंच त्याच्या पृथ्वीग्रहाचा आरंभ झाला. वासवदत्ता ज्याला अतिशय प्रिय आहे, अशा वत्सराजाला हें सर्व पहाणेंही उचित नाहीं, असेंच जाणून, जणुं काय वेदीवरील धूमानें त्याचे नेत्र आच्छादित केले. त्यावेळीं अग्नीस प्रदक्षिणा करणाऱ्या पद्मावतीचें मुख लाल झालें होतें, तें जणुं काय पतीचा अभिप्राय जाणून, क्रोधानेंच लाल झालें आहे, असें भासलें. विवाह–विधि आटोपल्यावर वत्सराजानें पद्मावतीचा हात सोडला; पण वासवदत्तेला आपल्या हृदयांतून एक क्षणभरही दूर केलें नाहीं. त्यानंतर पद्मावतीला मगधेश्वरानें एवढा मोठा रत्नांचा समूह स्त्रीधन रूपानें दिला, कीं, त्यावेळीं पृथ्वींतील सर्व रत्नें काढून घेऊन तिला रिकामी करून सोडल्याचाच लोकांना भ्रम झाला. यौगंधरायणानें त्याच वेळीं अग्नीसमक्ष मगधाकडून, वत्सराजाशीं मी इत:पर वैर करणार नाहीं, अशी शपथ घेवविली. नंतर त्या नगरांत मोठा थाटाचा महोत्सव सुरू झाला. वारांगना नाचूं लागल्या, चारण गाऊं लागले, व राजा ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें वस्त्रें व आभरणें वांटूं लागला. पतीच्या उदयाची इच्छा करणारी वासवदत्ता, दिवसा चंद्रकांति जशी गुप्त रहाते, त्याप्रमाणें एकीकडे लपून राहिली होती. नंतर वत्सेश्वर अंत:पुरांत गेला असतां, कदाचित् देवी त्याच्या दृष्टीस पडेल व आपला सर्व बेत फसेल, या

भीतीनें यौगंधरायण मगधेशास म्हणालाः-" राजन्, आमचा स्वामी आजच या नगरांतून आपल्या देशांत परत जाणार आहे." मगधेशानें ती गोष्ट मान्य केली. वत्सेशालाही तें कळविलें; व सर्व परिजनांचें खान-पान झालें असतां, नूतन विवाहित पद्मावतीस घेऊन तो राजा तेथून निघाला. पद्मावतीनें पाठविलेल्या उत्तम वाहनावर बसून सैन्याच्या मागून गुप्त रीतीनें, वासवदत्ताही वसंतकासह निघाली. कांहीं वेळानें लावाण-कास पोंचल्यावर वत्सेश आपल्या प्रिय व नूतन भार्येसह आपल्या वसति-स्थानीं गेला. वासवदत्ता आपल्या गोपालक भ्रात्याच्या येथें गेली. तेथें ज्यानें मोठा आदर केला आहे, अशा भ्रात्यास पहातांच वासवदत्तेला रडूं आलें. डोळ्यांत पाणी आणून तिनें आपल्या भ्रात्यास आलिंगन दिलें, तोंच ज्यांनीं पूर्वींच संकेत केला होता, असे यौगंधरायण व रुमण्वान् तेथें आले; व ते महामंत्री इकडे वासवदत्तेचें जों समाधान करीत आहेत तों तिला आणणारे अनुचर पद्मावतीकडे जाऊन-' देवि, तुझ्या आज्ञेप्रमाणें आम्ही आवंतिकेला येथपर्यंत सुरक्षितपणें आणलें, पण ती येथें येतांच आम्हांस सोडून गोपालकाच्या घरीं गेली;'-असें सांगू लागले. तें ऐकून वत्सेश्वरासमक्ष साशंक झालेली पद्मावती त्यांस म्हणाली,-" तुम्ही जाऊन आवन्तिकेस सांगा कीं, तूं मजजवळ ठेव म्हणून ठेविलेली आहेस. मग तूं तिकडे कां गेलीस ? जेथें मी असेन तेथेंच तुला येणें उचित आहे."-तें ऐकन ते अनुचर वासवदत्तेकडे गेले. इकडे राजानें 'ही म्लान न होणारी माळ व तिलक तुला कोणी दिला' म्हणून पद्मावतीला एकांतांत विचारिलें. तेव्हां ती म्हणाली,-"सात-आठ दिवसां-पूर्वी कोणा एका वृद्ध ब्राह्मणानें आपली आवन्तिका नांवाची कन्या माझ्या येथें आणून ठेविली आहे. तिचें हें कौशल्य आहे."-पद्मावतीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच, खचित ती वासवदत्ता असेल असें त्याला वाटलें, व लागलाच तो गोपालकाच्या येथें गेला. आंत देवी, गोपालक, दोन मंत्री व वसंतक असतांनाच वत्सेश तेथें पोंचला. त्यानें राहूच्या ग्रासांतून सुटलेल्या चंद्रमूर्तीप्रमाणें संकटांतून सुटलेल्या वासवदत्तेस पाहिलें. त्या-बरोबर तो मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. जिचें हृदय थरथर कांपत आहे, व गात्र विरहामुळें पांडुरवर्ण झालें आहे, अशी वासवदत्ताही मूर्च्छित झाली. कांहीं वेळानें सावध होऊन स्वचरिताची निंदा करीत ती फार

विलाप करूं लागली. सारांश याप्रमाणें तीं दोघें शोकानें दीन होऊन इतकीं रडलीं कीं, सर्व सत्य प्रकार जाणणाऱ्या यौगंधरायणाच्या नेत्रांतूनही पाणी आलें. अकालीं झालेला तो कोलाहल ऐकून घाबरलेली पद्मावतीही तेथें आली, व सर्व वृत्तांत ऐकल्यावर राजा व वासवदत्ता यांच्यासारखीच तिची अवस्था झाली. खरेंच कुलीन स्त्रिया स्निग्ध व मुग्ध असतात.* वासवदत्ता रडत असतांना, भर्त्यास दुःखदायक होणाऱ्या जीविताचा मला काय उपयोग? असें ती अनेकदां बोलली. तेव्हां धीर यौगंधरायण म्हणाला:—देवा, मगधेशाच्या कन्येचा लाभ झाला असतां, आपल्याला साम्राज्य प्राप्त होईल, असें जाणून मीच हें सर्व केलें. यांत देवीचा कांहीं दोष नाहीं. प्रवासदशेंतील हिच्या शीलाची साक्षी ही देवी पद्मावतीच देईल.

मंत्र्याचें हें भाषण ऐकून मत्सरशून्य पद्मावती राजाला म्हणाली:—ही अतिशुद्ध आहे, हें प्रकट करण्याकरितां मी हवी तर सीतेसारखें अग्नींत प्रवेश करून, दिव्यही करीन. त्यावर—' ज्याच्याकरितां देवीनें एवढा मोठा क्लेश सहन केला, तो मीच अपराधी आहे '—असें राजा म्हणाला. तें राजवचन ऐकून ' शरीरशुद्ध्यर्थ निश्चयपूर्वक मलाच अग्निप्रवेश केला पाहिजे ' असें वासवदत्ता म्हणाली. तेव्हां बुद्धिमान् व कुशल यौगंधरायण पूर्वेकडे तोंड करून, आचमन केल्यावर, पुढीलप्रमाणें शुद्ध वाणी बोलला—मी जर या राजाचा खरा हितकर्ता असेन व देवी अति शुद्ध असेल, तर हे लोकपालांनो, तुम्हीं साक्ष द्या, नाहीं तर मी देहत्याग करीन.—इतकें बोलून तो थांबला असतां एकाएकीं पुढीलप्रमाणें आकाशवाणी झाली. 'राजन्, ज्या तुझा मंत्री यौगंधरायण व भार्या वासवदत्ता आहे, तो तूंच एक धन्य आहेस. मागच्या जन्मीं वासवदत्ता देवी होती, व ती निर्दोष आहे." ही दिव्य वाणी ऐकतांच सर्वांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. गोपालकासह राजा हर्षपूर्ण चित्तानें यौगंधरायणाच्या या कृत्याची स्तुति करूं लागला, व पृथ्वी हस्तगत झालीच आहे, असें तो मानूं लागला. नंतर आनंदित झालेला राजा साक्षात् रति व शांति यांसारख्या त्या दोघी भार्यांसह प्रत्यहीं परम महोत्सवानें काल घालवूं लागला.

---

* स्निग्धमुग्धा हि सत्स्त्रियः ।

# तरंग ३ रा.

एकदां सतत मद्यपान करणारा वत्सराज, प्रिया वासवदत्ता व पद्मावती यांसह एकांतांत बसला असतां, गोपालक, यौगंधरायण, रुमण्वान् व वसंतक यांस तेथेंच बोलावून आणवून, तो त्यांच्याशीं अगदीं हितगुजाच्या गोष्टी बोलूं लागला. तेव्हां सहज आपल्या विरहाचा प्रसंग निघाला असतां, तो पुढील कथा सांगूं लागला.—

## १. उर्वशी व पुरूरवा यांची कथा.

पूर्वी पुरूरवा म्हणून एक परम विष्णुभक्त राजा होता. त्याची स्वर्गलोकांतही भूलोकाप्रमाणें अप्रतिहत गति होत असे. एकदां तो नंदनवनांत विहार करीत असतां, त्याला उर्वशीनें पाहिलें. त्याबरोबर ती अप्सरा इतकी व्याकुल झाली कीं, तिच्या रंभादि सख्या भयभीत झाल्या. इकडे तो राजाही जणुं काय लावण्यरसाची नदीच, अशा त्या उर्वशीला पाहून तात्काल दृढ आलिंगन देण्याविषयीं लोलुप झाला; पण ती प्राप्त न झाल्यामुळें तो मोहित होऊन पडला.

इतक्यांत क्षीरसागरनिवासी भगवान् नारायणानें दर्शनार्थ आलेल्या नारदास म्हटलें, कीं,—देवर्षे नंदनवनांत असलेला राजा पुरूरवा उर्वशीवर अति आसक्त झाला आहे, यास्तव तूं माझ्या आज्ञेनें इंद्रास सांगून ती सुंदरी त्याला देवीव,—अशी आज्ञा होतांच तो मुनि सत्वर नंदनवनांत राजाकडे आला, व म्हणाला;—'राजन् ऊठ. तुजकरितां विष्णूनें मला पाठविलें आहे; कारण तो भगवान् निष्कपट भक्तांच्या आपत्तीची उपेक्षा करीत नाहीं.'‡—असें सांगून व त्याचें सांत्वन करून नारद राजाबरोबर इंद्राकडे गेला, व त्यानें उर्वशी राजाला देवविली. तें उर्वशीचें दान स्वर्गलोकाला निर्जीव करणारें असें जरी होतें, तरी पुरूरवा व उर्वशी यांस मृतसंजीवनासारखें झालें. नंतर पुरूरवा उर्वशीला घेऊन भूलोकीं आला. पुढें तीं दोघेंही एकमेकांवर इतकीं आसक्त झालीं कीं, त्यांस परस्पर विरह एक क्षणभरही सहन होईना.

‡ स हि निर्व्याजभक्तानां नैवापदमुपेक्षते ।

एकदां देव व दानव यांचा संग्राम उपस्थित झाला. तेव्हां इंद्रानें आपल्या साह्याकीरतां पूरूरवाराजाला बोलाविलें. तो शूर राजाही देवलोकीं गेला. युद्धांत राक्षसांचा पराभव होऊन, असुराधिप–मायाधर मरण पावला, त्यामुळें स्वर्गांत विजयोत्सव सुरू होऊन अप्सरांचें नृत्य चाललें असतां रंभा नाचतां नाचतां चुकली. तें पाहून तुंबुरु–आचार्यांच्या समक्ष राजा–पुरूरवा हंसला. तेव्हां–' दिव्य नृत्य मीच जाणतें. तुला मानवाला तें काय ठाऊक ?'–असें रंभा क्रोधानें त्याला म्हणाली. तें ऐकून तो राजाही दुर्दैवानें ' मी उर्वशीच्या सहवासानें तुमच्या तुंबुरु गुरूलाही ठाऊक नाहीं, असें सर्व जाणतों.' असें अहंकारानें बोलला. पण राजाच्या तोंडचीं हीं अक्षरें कानीं पडतांच तुंबुरूला अतिशय क्रोध आला, व–'कृष्णाचें आराधन करीपर्यंत तुम्हां उभयतांचा वियोग होवो'–असा त्यानें पुरूरवा व उर्वशी या उभयतांना शाप दिला. त्यानंतर शापामुळें खिन्न झालेला राजा मर्त्यलोकीं आला, व वज्रपातासारखा घोर शाप त्यानें उर्वशीला सांगितला. कांहीं दिवसांनीं राजाच्या न कळत येऊन गंधर्वांनीं उर्वशीला उचलून नेलें. तेव्हां तिच्या वियोगानें अतिशय व्याकूल झालेल्या राजानें बदरिकाश्रमीं जाऊन, शापाची शांति होण्याकरितां कृष्णाची आराधना केली; पण तिकडे वियोगामुळें आर्त झालेली उर्वशी गंधर्वांच्या गृहांत मेल्यासारखी, निजल्यासारखी अथवा चित्रासारखी निश्चेष्ट होऊन राहिली. शापाचा अंत होणार आहे, एवढी आशा असल्यामुळेंच तिचे प्राण वांचले. असो; पुरूरवा–राजानें भगवान् अच्युताची अशी अनन्य भक्तीनें आराधना केली कीं, त्याच्या प्रसादानें गंधर्वांनीं आपण होऊनच उर्वशी त्याला परत आणून दिली. नंतर शाप संपल्यावर पुनः प्राप्त झालेल्या त्या अप्सरेबरोबर राजा दिव्य भोग भोगूं लागला.

इतकें सांगून राजा थांबला असतां, उर्वशीचा वृत्तांत ऐकून ' आपण वियोग सहन केला ' असें वाटल्यामुळें वासवदत्ता लज्जित झाली. तेव्हां मोठ्या कौशल्यानें राजानें जिची निंदा केली आहे, व त्यामुळें जिची मुद्रा खिन्न झाली आहे, अशा देवीकडे पाहून तिच्या मनाला उल्हास वाटावा म्हणून यौगंधरायण राजास म्हणाला,–"महाराज, आपण ही पुढील कथा ऐकीली नसेल.—

## २. विहितसेन व तेजोवती यांची कथा.

लक्ष्मीचें जणुं काय निवास स्थानच, अशी तिमिरानामक नगरी आहे. त्या नगरींत विहितसेन नांवाचा राजा होता. त्याची तेजोवती म्हणून भार्या असे. ती भूलोकाची अप्सराच होती असें म्हटलें तरी चालेल. तिच्या स्पर्शाविषयीं तो इतका लोलुप होता कीं, तिनें चोळी घातलेलीही त्याला खपत नसे. एकदां त्या राजाला जीर्णज्वर जडला. तेव्हां वैद्यांनीं देवीचा संग वर्ज करावयास सांगितलें; पण त्यामुळें त्याच्या हृदयांत दुसराच रोग उद्भवला. तो कोणत्याही औषधानें साध्य होण्यासारखा नव्हता. तेव्हां वैद्य एकांतांत मंत्र्यांस म्हणाले,—" भीतीनें अथवा शोकाच्या आकस्मिक आघातानें याचा हा रोग जर फुटेल, तरच याला बरें वाटेल. नाहीं तर मोठी कठीण अवस्था आहे; पण याला भय कोणाचें वाटणार ? हा इतका धीट आहे कीं, एकदां याच्या पाठीवर मोठा भुजंग पडला, तरी त्याला कांहीं वाटलें नाहीं. एकदां तर शत्रूच्या सैन्यानें याच्या अंतःपुरालाही वेढा दिला; पण त्यामुळेंही याला क्षोभ आला नाहीं, तेव्हां आतां काय करावें?" —अशा मोठ्या विवंचनेंत ते पडले असतां, मंत्र्यांनीं देवीची संमति घेऊन तिला गुप्त ठेविलें; व राजाजवळ जाऊन—' तुमच्या या रोगामुळें राणी दुःखी होऊन मरण पावली '—असें अकस्मात् सांगितलें. तें ऐकतांच राजाला असह्य दुःखवेदना झाल्या, व त्यामुळें त्याची हृदयव्याधि फुटली. कांहीं दिवसांनीं त्याला बरें वाटलें, तेव्हां रोगरूपी विपत्तींतून सुटलेल्या राजाला, मंत्र्यांनीं साक्षात् सुखसंपत्तीप्रमाणेंच असलेली, ती महादेवी अर्पण केली. तेव्हां तो मतिमान् राजा, प्राणदान करणाऱ्या त्या आपल्या प्रियेवर अधिकच प्रेम करूं लागला. 'तूं लपून कां राहिलीस,' असें म्हणून तो तिच्यावर रागावला नाहीं.

"पतीच्या हिताची इच्छा करणारी जी राणी तीच देवी या पदवीस योग्य असते. केवळ राजाचें प्रिय करणें हें कांहीं देवीत्वाचें चिह्न नव्हे. केवळ राज्यकार्यभाराचें चिंतन करणें हीच मंत्रिता असून, केवळ राजाच्या मनाप्रमाणें वागणें, हें अनुचराचें लक्षण *आहे. आपण सर्व पृथ्वीचा

---

* सा मंत्रिता च यद्राज्यकार्यभारैकचिन्तनम् ।
चित्तानुवर्तनं यत्तदुपजीवक लक्षणम् ॥

राजा व्हावें, अशी आमची इच्छा आहे; पण मगधराज त्यास प्रतिकूल असल्यामुळें त्याच्याशीं मैत्री संपादन करण्याकरितां आम्हीं हा सर्व प्रयत्न केला. देव, या देवीला तुमचा वियोग अगदीं असह्य वाटत होता; पण आपल्या स्वामीचा अभ्युदय व्हावा, या इच्छेनें तिनें तो सहन केला. त्यांत तिचा स्वल्पही अपराध नसून उलट सर्व उपकारच आहे." असो; त्या मुख्य मंत्र्याचें हें यथार्थ भाषण ऐकून वत्सेश संतुष्ट झाला व वासवदत्तेला दुःख देण्याकरितां उर्वशीची गोष्ट सांगणें हा आपला–अपराध आहे, असें मानूं लागला. तो म्हणालाः-मला माहीत आहे, कीं तुमच्या प्रेरणेनेंच साक्षात् नीतीप्रमाणें असलेल्या या देवीनें माझ्या हातांत सर्व पृथ्वी दिली आहे; पण अतिप्रेमामुळें मीं तिची अशी युक्तीनें निंदा केली. तें माझें करणें उचित नव्हे; परंतु प्रेमानें अंध झालेल्या मनामध्यें विचारसामर्थ्य कोठून असणार‡ ? असो; अशा प्रेमळ शब्दांनीं उदयनानें त्या दिवशीं देवीची खिन्नता घालविली.

एके दिवशीं ज्याला सर्व सत्य वृत्तांत कळला आहे, अशा मगधेश्वरानें पाठविलेला दूत येऊन वत्सेश्वरास, असा निरोप सांगूं लागला.–"पुत्रा, तुझ्या मंत्र्यांनीं आम्हाला ठकविलें. आतां तूं इतकें तरी कर कीं, आम्हांला हा जीवलोक शोकमय होणार नाहीं,–" तें ऐकून वत्सेश्वरानें त्या दूताचा सन्मान करून उलट निरोप नेण्याकरितां त्याला पद्मावतीकडे जावयास सांगितलें. वासवदत्तेच्या आज्ञेंत रहाणारी पद्मावती तिच्या समक्षच दूताला भेटली. तेव्हां त्या दूतानें–'मुली, कपटानें तूं वत्सराजाची पत्नी झालीस. तुझा पति तर अन्य स्त्रीवर आसक्त आहे, तेव्हां कन्येला जन्म दिल्याचें फल मला मिळालें, असेंच ह्मटलें पाहिजे. दुसरें काय ? '–असा तिच्या बापाचा निरोप सांगितला. तो ऐकून पद्मावती म्हणाली,–"भद्र, तूं माझ्या सांगण्या-वरून बाबांना माझी अशी विनंति कळीव, कीं आपण उगीच कष्टी कशाला होतां ? आर्यपुत्राचें मजवर अतिशय प्रेम आहे. देवी वासव-दत्ताही मजवर फार प्रेम करिते, व मजशीं बहिणीसारखी वागते, यास्तव आपल्या सत्याप्रमाणें माझें जीवितही जर तुम्हांला अत्याज्य वाटत असेल, तर तुम्ही आर्यपुत्रावर रागावूं नये"–पद्मावतीनें असा अगदीं योग्य निरोप सांगितला असतां, वासवदत्तेनें त्या दूताचा सत्कार

‡ अनुरागान्धमनसां विचारसहता कुतः ।

केला व त्याची रवानगी केली. तो गेल्यावर एकदां पद्मावतीला माहेरची आठवण येऊन जरासें वाईट वाटलें. तेव्हां तिच्या चित्तास बरें वाटावें म्हणून वासवदत्तेनें वसंतकास एक गोष्ट सांगावयास सांगितलें, व तोही त्या नूतन स्वामिनीच्या चित्तरंजनार्थ पुढील कथा सांगूं लागला.

### ३. सोमप्रभा व गुहचंद्र यांची कथा.

जणुं काय पृथ्वीचें भूषणच असें पाटलीपुत्र नामक नगर आहे. तेथें धर्मगुप्त म्हणून एक मोठा वैश्य रहात होता. त्याची चंद्रप्रभा म्हणून भार्या होती. सृष्टिनियमाप्रमाणें ती एकदां गर्भवती झाली, व योग्य समयीं प्रसूत होऊन तिला सर्वांगसुंदर अशी कन्या झाली. आपल्या कांतीनें पितृगृहास देदीप्यमान करून तिनें त्याच वेळीं अगदीं स्पष्ट भाषण केलें, व ती उठून बसली. तें पाहून तेथील सर्व स्त्रीवर्ग विस्मयानें चकित झाला. धर्मगुप्तही तें ऐकून भयभीत झाला व तेथें येऊन प्रणाम केल्यावर हळुच तिला म्हणाला,-" भगवति, माझ्या येथें तूं कोण उत्पन्न झाली आहेस ?-" तें ऐकून ती म्हणाली-"तूं मला कोणालाही अर्पण करूं नकोस; कारण तुझ्या येथें राहूनच मी तुझें शुभ करीन. यापेक्षां अधिक कांहीं तूं मला विचारूं नकोस.-" हें तिचें भाषण ऐकून भयभीत झालेल्या राजानें तिला आपल्या घरींच गुप्त रीतीनें ठेविलें, व ती मेली, असें लोकांना सांगितलें. त्यानंतर ती सोमप्रभानामक कन्या क्रमानें मनुष्यशरीरानें व दिव्य कांतीनें वाढूं लागली.

एकदां गुहचंद्र या नांवाच्या वैश्यपुत्रानें माडीवर असलेल्या त्या सुंदरीला पाहिलें, व तत्काल कामशरपीडित झालेला तो तरुणवणिक् मोहित झाला. कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन तो मोठ्या कष्टानें घरीं गेला, तेव्हां आईबाप त्याच्या अस्वास्थ्याचें कारण अतिशय आग्रहानें विचारूं लागले असतां, मित्रांच्या द्वारा गुहचंद्रानें सर्व त्यांस कळविलें. तेव्हां त्याचा पिता गुहसेन पुत्रस्नेहवशात् त्या कन्येविषयीं प्रार्थना करण्याकरितां धर्मगुप्ताच्या येथें गेला; पण माझी कन्या मेली, असें त्यानें सुनेची इच्छा करणाऱ्या गुहसेनास सांगितलें, तथापि त्याला तें खरें वाटलें नाहीं. इकडे पुत्रही कामज्वरानें अधिक व्याकुल झाला. तेव्हां आपण आतां जाऊन राजाची प्रार्थना करावी. त्याची मीं मागें सेवाही केली आहे. तो ती कन्या माझ्या पुत्राला देववील.

असा निश्चय करून गुहसेन राजाकडे गेला. त्यानें राजाला एका सर्वोत्तम रत्नाची भेट दिली, व आपला मनोरथ कळविला. तेव्हां राजानेंही मोठ्या आनंदानें नगराधिपास त्याचें साह्य करावयास सांगितलें. तो वैश्य नराधिपाच्या बरोबर धर्मगुप्ताच्या येथें गेला, व राजसैन्याकडून त्याच्या घराला वेढा देवविला. तें पाहून सोमप्रभा आपल्या पित्यास म्हणाली,–" बाबा, तूं मला देऊन टाक. माझ्याकरितां तुजवर संकट यावयाला नको; पण तूं त्यांच्याशीं एक करार करून ठेव, कीं हिच्या पतीनें ग्राम्य व्यवहाराकरितां हिला शय्येवर घेऊं नये."–तें ऐकून धर्मगुप्तानें तसा नियम करण्याविषयीं प्रार्थना करून कन्यादान करण्याचें मान्य केलें. गुहसेनानेंही -' मनांतल्या मनांत हंसून व माझ्या पुत्राचा विवाह तर अगोदर होऊं दे, असें म्हणून 'बरें आहे,'–असें त्यास उत्तर दिलें.

पुढें विवाह झाला; व गुहचंद्र विवाहित सोमप्रभेला घेऊन आपल्या घरीं गेला. तेव्हां सायंकाळीं त्याचा पिता त्यास म्हणाला,–" बाळा, या आपल्या विवाहित पत्नीला तूं खुशाल स्वशय्येवर घे." तें ऐकून क्रोधयुक्त झालेल्या सोमप्रभेनें श्वशुराकडे पाहून यमाच्या आज्ञेप्रमाणें, आपली तर्जनी ( हाताच्या आंगठ्याजवळचें बोट ) फिरविली. तेव्हां स्नुषेच्या फिरत्या तर्जनीकडे पहातांच तत्क्षणीं त्या वैश्याचे प्राण निघून गेले, व इतर सर्व भयभीत झाले. आपला पिता अकस्मात् मरण पावला आहे, असें पाहून गुहचंद्र,–ही महामारी भार्यारूपानें माझ्या घरांत शिरली आहे, असें समजूं लागला. नंतर घरांत असलेल्या त्या भार्येचा भोग न घेतां तो जणुंकाय असिधाराव्रत करूं लागला. अनेक व्रतें व नियम धरून, भोगविहीन असल्याकारणानें, ज्याला अत्यंत मानसदुःख होत आहे, असा तो प्रत्यहीं अनेक ब्राह्मणांस भोजन घालूं लागला. सोमप्रभाही मौनव्रत धारण करून भोजन करीत असलेल्या ब्राह्मणांस प्रत्यहीं दक्षिणा देत असे. एकदां कोणी एक वृद्ध ब्राह्मण भोजनाकरितां तेथें आला. त्यानें त्या आश्चर्यकारक स्वरूपानें युक्त असलेल्या स्त्रीला पाहून गुहचंद्रास कौतुकानें एकांतांत विचारलें, कीं ही स्त्री तुझी कोण ? तेव्हां तो प्रथम त्याचें उत्तरच देईना; पण त्या ब्राह्मणानें पुष्कळ आग्रह केल्यावर अतिशय दुःखित होऊन, गुहचद्रानें तिची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून ब्राह्मणास फार दया आली, व त्यानें इष्ट मनोरथ सफल होण्या-

करितां त्याला अग्नीच्या आराधनेचा मंत्र दिला. गुहचंद्र त्या मंत्राचा जप करीत असतां, त्याच्या समक्ष अग्नींतून एक ब्राह्मणरूपी पुरुष उत्पन्न झाला व चरणांवर मस्तक ठेवणाऱ्या त्या वैश्यास तो म्हणाला,– "मी आज तुझ्या येथें भोजन करीन, व रात्रीं तुझ्या येथेंच राहीन, आणि खरा प्रकार तुला दाखवून तुझा मनोरथ परिपूर्ण करीन."–असें सांगून तो ब्राह्मणरूपी अग्नि इतर ब्राह्मणांप्रमाणें त्याच्या येथें भोजन करून रात्रीं त्याच्या येथेंच एक प्रहरभर निजला. इतक्यांत घरांतील सर्व लोक गाढ झोंपेंत निमग्न झालेले आहेत, असें पाहून सोमप्रभा तेथून निघाली. तें पाहून ब्राह्मणानें गुहचंद्रास जागें केलें, व 'चल ये; आपल्या भार्येचा वृत्तांत पहा.' असें सांगून आपल्या योगसामर्थ्यानें आपलें व त्या वैश्याचें रूप बदलून त्यांनीं भ्रमररूप घेतलें. नंतर ते दोघेही घराच्या छिद्रांतून निघाले तों मार्गानें जात असलेली ती सुंदरी त्यांना दिसली. ती गांवाच्या बाहेर फार दूर गेली. हेही दोघे तिच्या मागून जात होते. बऱ्याच अंतरावर गेल्यावर गुहचंद्रानें समोर एक मोठा वटवृक्ष पाहिला. त्याच्याखालीं वीणा व वेणु यांच्या ध्वनीसह दिव्य व मधुर गायन चाललेलें त्यास ऐकूं आलें. त्या वृक्षाच्या बुंध्यावरील आसनावर बसलेली दिव्य स्त्री त्याला दिसली. तिची आकृति सोमप्रभेसारखीच अगदीं हुबेहुब होती. ते दोघे भ्रमर त्या वृक्षावर जाऊन बसले. गुहचंद्राची भार्याही त्या दिव्य स्त्रीच्या अर्ध्या आसनावर येऊन बसली. ज्यांची प्रभा अगदीं एकसारखी आहे, अशा त्या दोघींस पाहून गुहचंद्रास रात्र तीन चंद्रांनीं युक्त आहे कीं काय, असा भास झाला. व आश्चर्यचकित होऊन तो मनांत विचार करूं लागला, कीं हें काय ? मी स्वप्न पहात आहें, कीं मला भ्रम झाला आहे, कीं हें आहे तरी काय ? तो असा विचार करीत आहे, तों त्या दिव्य कन्यांनीं आपल्याला उचित असलेलें दिव्य भोज्य खाऊन आसव प्यालें. नंतर सोमप्रभा आपल्या त्या भगिनीस म्हणाली,–" ताई, आज माझ्या येथें कोणीएक महातेजस्वी ब्राह्मण आला आहे. त्याचें मला मोठें भय वाटतें. यास्तव मी आतां अगोदर जातें."–असें बोलून ती त्या वृक्षावरून खालीं उतरली. तेव्हां ते भृंगीरूपी दोघेजण त्वरेनें तिच्यापुढें घरीं येऊन निजले. मागून तीही गुप्तरीतीनें येऊन आपल्या मंदिरांत गेली. त्यानंतर

तो ब्राह्मण गुप्तचंद्रास उघड म्हणाला, " कां पाहिलेंस कीं नाहीं ? ही तुझी भार्या दिव्य स्त्री आहे. मानुषी नव्हे, हिची दुसरी बहीणही तूं आज पाहिलीस. दिव्य स्त्री मनुष्याच्या संगाची इच्छा कशी करील ? पण तुझा हेतु पूर्ण होण्याकरितां द्वारावर लिहून ठेवावयाचा एक मंत्र मी तुला देतों, व त्याला पुष्ट करणारी एक बाह्य युक्तिही सांगून ठेवितों; कारण अग्नि एकटाही जर जाळतो, तर वायूचा संयोग झाल्यावर तो वेगानें जाळील हें काय *सांगावें ? त्याचप्रमाणें एकट्या मंत्रानेंही सिद्धि होईल, पण त्याला युक्तीचें सहाय्य मिळालें म्हणजे अधिक जोर येईल." असो; असें बोलून व युक्तीसह मंत्रोपदेश करून प्रातःकाळीं तो गुप्त झाला.

गुहचंद्रानें आपल्या भार्येच्या द्वारावर तो श्लोक लिहिला, व सायंकाळीं उत्तम प्रकारें भूषित होऊन तो तिच्या समक्ष एका सुंदर स्त्रीशीं हळुहळु कांहीं बोलूं लागला. तें पाहून मंत्राचा जिच्यावर परिणाम झाला आहे, अशी ती दिव्य सोमप्रभा त्याला बोलावून ' ही रमणी कोण ' असें विचारूं लागली. तेव्हां ' ही एक सुंदर स्त्री असून ती मजवर प्रेम करण्याची इच्छा करीत आहे, यास्तव मी आज तिच्या येथें जाईन.' असें खोटेंच सांगूं लागला. तें ऐकून ती रागावली, व कपाळाला आंठ्या घालून व वांकड्या दृष्टीनें पाहून त्यास म्हणाली,–"हूं, त्याकरितांच हा उत्तम वेष केला असेल, पण आंता तिकडे जाऊं नकोस. तिला घेऊन काय करावयाचें आहे.' मी तुझी पत्नी आहें. यास्तव मजकडेच ये."–हें तिचें भाषण ऐकून त्याच्या अंगावर रोमांच उठले व त्याचें शरीर थरथर कांपूं लागलें. मंत्रप्रभावानें तिचें चित्तही क्षुब्ध झालें, आणि त्याबरोबर अंतर्गृहांत जाऊन त्या वैश्यानें दिव्य सुखसंभोग घेतला. त्या दिवसापासून मंत्राच्या योगानें वश करून घेतलेल्या व त्यामुळेंच प्रेम करणाऱ्या त्या दिव्य स्त्रीसहवर्तमान गुहचंद्र अतिसुखानें काल घालवूं लागला.

याप्रमाणें याग, दानें इत्यादि सुकृतांच्या योगानें शापच्युत झालेल्या दिव्य स्त्रिया पुण्यवानांच्या अंकित होतात. देव व द्विज यांची पूजा हीच कामधेनु आहे, असें संतांचें मत आहे.§ तिच्या योगानें साध्य होत

* विशुद्धोऽपि ज्वलत्यग्निर्वात्यायोगे तु का कथा।

§ देवद्विजसपर्या हि कामधेनुर्मता सताम्।

नाहीं असें कांहीं नाहीं. पुष्पांच्या पतनास वायु जसा कारण होतो. त्याप्रमाणें अत्युच्चपदीं आरूढ झालेल्याही दिव्य स्त्रीपुरुषांच्या अधःपातास दुष्कर्म कारण होतें. राजपुत्रि, याविषयीं मी अहल्येचा वृत्तांत सांगतों तो एक.

## ४. इंद्र व अहल्या यांची कथा.

पूर्वी गौतमनामक त्रिकालज्ञ महामुनि होता. अहल्या ही त्याचीच भार्या असून ती अतिरूपवती व आपल्या सौंदर्यानें अप्सरांनाही तुच्छ करून सोडणारी होती. एकदां तिच्या रूपावर अतिशय लुब्ध झालेला इंद्र तिच्या जवळ येऊन प्रार्थना करूं लागला. ऐश्वर्यमदानें मत्त झालेल्या पुरुषांची मति अशीच कुमार्ग-गामिनी होते.‡ त्या मूर्ख ऋषि-पत्नीनेंही त्याला अनुमोदन दिलें; पण तपःप्रभावानें तें त्यांचें पाप समजल्यामुळें मुनि तेथें आला. त्याबरोबर इंद्र भयानें मार्जार झाला; पण गौतमानें जेव्हां येथें कोण आहे, म्हणून अहल्येस विचारलें, तेव्हां ती अपभ्रष्ट बाल भाषेनें-'एसो ठिओ खु मजार' म्हणजे हें येथें मजार (मांजर) बसलें आहे-असें म्हणाली. त्यावर 'सत्यं त्वज्जारः' म्हणजे खरेंच, तुझा जारच आहे हा, असें तो मुनि हंसून बोलला व त्या दोघांनाही पापकर्माचें फल मिळावें म्हणून त्यानें क्रमानें शाप दिले. पापशीले, वनांत फिरणाऱ्या राघवाचें दर्शन होईतों तूं शिला होऊन पड. व हे पापी इंद्रा, योनीवर लुब्ध होणाऱ्या तुझ्या अंगावर एक सहस्र योनीभगें पडतील, पण विश्वकर्मा दिव्यस्त्री तिलोत्तमा जेव्हां निर्मील, तेव्हां तिला पाहून त्या भगांच्या जागीं सहस्र नेत्र होतील. असो; असे शाप देऊन मुनि, इच्छेप्रमाणें तप करण्याकरितां निघून गेला. इकडे अहल्या शिला होऊन पडली, व इंद्राच्या अंगास सहस्र छिद्रें पडलीं. उघडच आहे, दुःशीलता दुःखाचें कारण कसें बरें होणार नाहीं.*

प्रत्येक प्राण्याचें दुष्कर्म सदा दुःख देतें. जो जसें बीज पेरितो, तसें त्याला फल मिळतें. वास्तव महात्मे पुरुष दुसऱ्याचें अनिष्ट करण्यास

‡ प्रभूणां हि विभूत्यन्धा धावत्यविषये मतिः ।

* अशीलं कस्य नाम स्यान्न खलीकारकारणम् ।

कधींही प्रवृत्त होत नाहींत. हेंच महात्म्याचें प्रकृति सिद्ध व्रत आहे.§ तुम्ही दोघीजणी पूर्वी देवी व भगिनी होतां. त्याच तुम्हीं सांप्रतकाळीं शापामुळें या लोकीं आला आहां. त्यामुळेंच तुमचें हृदय निर्वैर व परस्पर हितकर दिसतें. वसंतकाचें हें भाषण ऐकून वासवदत्ता व पद्मावती यांनीं एकमेकींविषयींची ईर्षा सोडिली. देवी वासवदत्ता आपल्या प्रमाणेंच पद्मावतीचेंही हित व्हावें, अशी इच्छा धरून पतीचें प्रिय करूं लागली. पद्मावतीनें पाठविलेल्या दूताच्या तोंडून वासवदत्ता व वत्सराज यांचे हें सर्वोत्तम सौजन्य ऐकून मगधेश्वर अतिशय संतुष्ट झाला.

नंतर एके दिवशीं महामति यौगंधरायण वत्सेश्वराकडे आला. व देवीच्या समक्ष दुसरेही सर्व बसले असतांना म्हणाला–" देव, आतां आपण कौशांबीस जाऊं या. मगधेश्वरांशीं जरी आम्हीं कपट केलें आहे, तरी त्याची आतां भीति बाळगावयास नको; कारण कन्या प्रदान केल्यामुळें तो आतां अगदीं बद्ध झाला आहे. आमच्याशीं विरोध करून तो आपल्या प्राणांहून प्रिय असलेल्या कन्येस सोडण्यास तयार होणार नाहीं. त्याचें सत्यही त्याला पाळावयाचें आहे, शिवाय त्याला आपण कांहीं फसविलें नाहीं. मी स्वतः ठकविलें आहे, यास्तव तो तुमच्यावर कधींही रागावणार नाहीं. दूतांच्या द्वाराही ' त्याला राग आलेला नाहीं.' हें मी ऐकलें आहे. आणि त्याकरितांच आम्हीं इतके दिवस येथें राहिलों."– ज्यानें आपलें कार्य उरकून घेतलें आहे असा मुख्य मंत्री–यौगंधरायण इतकें जों बोलत आहे तों ' मगधेश्वराकडून कोणीएक दूत आला आहे, असें प्रतीहारीनें येऊन सांगितलें. त्याबरोबर त्यास आंत आणावयास सांगितलें. त्यानें येऊन प्रणाम केला, व तो राजास म्हणाला,– " राजन्, देवी पद्मावतीनें पाठविलेला निरोप ऐकून तुझा श्वशुर अतिशय संतुष्ट झाला आहे, व त्यानें–' वत्स, मला सर्व कळून चुकलें आहे आतां उगीच अधिक बोलण्यांत काय अर्थ आहे. मी तुजवर प्रसन्न आहे.

---

§ एवं कुकर्म सर्वस्य फलत्यात्मनि सर्वदा ।
यो यद्वपति बीजं हि लभते सोऽपि तत्फलम् ।
तस्मात्परविरुद्धेषु नोत्सहन्ते महाशयाः ।
एतदुत्तमसत्त्वानां विधिसिद्धं हि सद्व्रतम् ॥

आतां ज्याकरितां हा एवढा खटाटोप केलात, त्या कार्याला आरंभ करा. आम्ही तुम्हांला अनुकूल आहों;'-असें सांगण्याकरितां मला आज मुद्दाम पाठविलें आहे.

दूताचें हें वचन ऐकून वत्सेशाला अतिशय आनंद झाला. त्याच्या दोघी भार्यांसही तो वृत्तांत ऐकून परम आल्हाद वाटला. त्या दूताला पारितोषिक देऊन व त्याचा सन्मान करून राजानें परत पाठविलें. तों इतक्यांत चंडमहासेनाचा दूतही येऊन पोंचला, व प्रणाम करून राजास म्हणाला-" देव, कार्यज्ञ चंडमहासेन, हा सर्व वृत्तांत ऐकून प्रसन्नचित्त झाला व त्यानें मला असें कळवावयास इकडे पाठविलें आहे. वत्स, तुझा मंत्री यौगंधरायण आहे, एवढ्यावरूनच तुझें उत्तमत्व सिद्ध होत आहे. उगीच अधिक बोलण्यांत काय अर्थ आहे ? वासवदत्ता धन्य आहे; कारण तिनें तुझ्यावरील भक्तीनें असें कृत्य केलें आहे कीं, त्याच्यामुळें आमचें मस्तक वर उचललें आहे. पद्मावती वासवदत्तेहून भिन्न आहे असें मला वाटतच नाहीं. त्या दोघींचे हृदय एक आहे, असें आम्ही ऐकलें आहे. तर आतां तुम्ही सत्वर उद्योगास लागा."

श्वशुराचा हा निरोप ऐकून वत्सेश्वर, वासवदत्ता, पद्मावती व मुख्य मंत्री या सर्वांसच अत्यानंद झाला. असो; देवीकडून त्या दूताचा सन्मान करवून, त्यास सतुष्ट करून परत पाठविल्यावर मंत्र्यांच्या संमतीनें सत्वर उद्योगास आरंभ करण्याचा निश्चय ठरवून, त्या राजानें कौशांबीस परत जाण्याचें मनांत आणिलें.

---

## तरंग ४ था.

### १. वत्सराजाचें कौशांबीस परत येणें.

त्यानंतर दुसऱ्याच दिवशीं तो नरपति, सचिव व स्वसैन्य यांसह आपल्या दोघी प्रियांना बरोबर घेऊन कौशांबीस यावयास निघाला. भूतलास भरून सोडणाऱ्या व कोलाहल करणाऱ्या त्याच्या सैन्याचा गमनोद्योग पाहून, अकालीं क्षुब्ध होऊन सर्वतः पसरणाऱ्या समुद्राची कल्पना मनांत येत असे. सूर्य गगनांतून उदय-पर्वतासहवर्तमान जर

जाता, तर गजेंद्रावरून जाणाऱ्या त्या राजाचें साम्य त्याला येतें. शुभ्र छत्र त्याच्या मस्तकावर चमकत असून त्याची छाया राजाच्या अंगावर पडत होती; पण तें पाहून, ज्यानें सूर्याच्या तेजास जिंकलें आहे, अशा त्या वत्सराजाची, प्रसन्न झालेला चंद्रच सेवा करीत आहे कीं काय, असें मनांत येई. त्या तेजस्वी राजास मांडलिक राजे, ध्रुवाला ग्रह परिवेष्टित करितात त्याचप्रमाणें, सर्व बाजूंनीं परिवेष्टित करून राहिले होते. त्याच्या मागोमाग एकाच हत्तीणीवर बसलेल्या व परस्पर प्रेम करणाऱ्या दोघी देवी चालल्या होत्या; त्या साक्षात् श्री व भू यांप्रमाणें शोभूं लागल्या. असो; याप्रमाणें मोठ्या थाटानें व व्यवस्थित रीतीनें प्रवास करून तो भाग्यशाली राजा कांहीं दिवसांनीं कौशांबीस येऊन पोंचला. बंदीजन त्याची स्तुति करूं लागले, व राजा आला म्हणून त्या नगरांत मोठा उत्सव सुरू झाला. त्यामुळें आपला पति प्रवासांतून परत आला असतां, ती नगरीरूपी स्त्री ध्वज हेंच तिचें रक्त-वस्त्र आहे, गवाक्ष हेच जिचे विकसित नेत्र आहेत, पुढच्या वेशींत भरून ठेविलेले कलश हेच जिचे स्तन आहेत, कोलाहल हेंच जिचें आनंदाचें भाषण आहे, व चुनेगची केलेल्या माड्या हेंच जिचें सुंदर हास्य आहे, अशी ती नगरी तत्काल शोभूं लागली. दोन देवी ज्याच्या मागून येत आहेत, असा वत्स-राजा पौरांस परम आनंद देत, त्या नगरांत प्रविष्ट झाला. त्यावेळीं दोघीं देवींस पहाण्याची इच्छा करणाऱ्या व माड्यांवरून उभ्या असलेल्या नगर-स्त्रियांच्या मुखचंद्रांनीं नभस्तल भरून गेलें. माडीवरील खिडक्यांत उभ्या राहून कांहीं स्त्रिया डोळ्यांच्या पापण्याही न हालवितां त्या दोघींस पहात होत्या; पण त्यामुळें कौतुक पहाण्याकरितां आलेल्या त्या अप्सराच आहेत असा भास झाला. कांहीं जणी तर कटाक्षांच्या द्वारा मदनाचे बाणच सोडीत आहेत, असें वाटलें. एक पौरस्त्री राजाच्या दर्शनाकरितां मोठ्या उत्सुकतेनें आली; पण तिची अति उत्सुक झालेली दृष्टि नेत्राच्या कोनांत शिरल्यामुळें, राजाला न पहाणाऱ्या कानाकडे येऊन त्यालाही राजा कसा आहे तो पहा, असें सांगतच आहे, असें वाटलें. कोणी एक स्त्री राजदर्शनाकरितां पळत पळत आली; पण त्यामुळें श्वास लागून तिचें उरस्थळ जोरानें हलूं लागलें. तें पाहून तिचे स्तन राजदर्शनाकरितां बाहेर येण्याचीच इच्छा करीत आहेत, असें मनांत

आलें. गडबडीनें खिडकीजवळ येत असतांना एकीच्या गळ्यांतील हार तुटून मोत्यें गळूं लागलीं, तेव्हां ते तिच्या हृदयांतून गळणारे हर्षबाष्प बिंदुच आहेत, अशी कल्पना झाली. वासवदत्तेला पाहून, त्यांना तिच्या जळण्याची खोटी बातमी आठवली, व 'लावाणकांत अग्नीनें जर हिला खरोखरीच जाळलें असतें, तर प्रकाश देणाऱ्याही त्यानें जगांत अंधकार पसरिला, असें झालें असतें' इत्यादि प्रकारें त्या परस्पर मोठ्या उत्कंठेनें बोलूं लागल्या. एकजण आपल्या सखीला मोठ्या आनंदानें म्हणाली–बहिणीसारखी सवत मिळाल्यामुळें वासवदत्तेला लज्जित होण्याचा प्रसंग आला नाहीं, हें बरें झालें बाई ! हर व हरि यांनीं या दोघांना खचित पाहिलें नसावें, नाहींतर उमा व लक्ष्मी यानीं आपल्या रूपाविषयीं गर्व कसा वाहिला असता ? सारांश दोघीं देवींना पाहून पौरस्त्रिया आपसांत अशा अनेक कल्पना व भाषणें करूं लागल्या.

शेवटीं वत्सराज आपल्या शुभ भार्यांसह जनसमूहांच्या नेत्रांस तृप्त करीत, मंगलाचरण करून, स्वमंदिरांत गेला. प्रभातसमयीं पद्मसरोवराची व चंद्रोदयसमयीं सागराची जशी अवर्णनीय शोभा होते, त्या प्रमाणें त्या वेळीं राजभवनाची शोभा कांहीं विचित्र झाली. तें एका क्षणांत सामंतराजांच्या भेटींनीं भरून गेलें. त्यानंतर नरपति उदयन, उत्सव व सर्व राजेलोकांचा सन्मान करून, सर्व लोकांच्या चित्तांत व अंत:पुरांत गेला, आणि रति व प्रीति यांसारख्या त्या दोघीं देवींसह त्यानें मद्यपानादि लीलेंत राहिलेला दिवस घालविला.

## २. गोपालांची कथा.

नंतर एके दिवशीं राजा मंत्र्यांसह सभेंत बसला असतां द्वारावर एक ब्राह्मण येऊन 'अब्रह्मण्यं अब्रह्मण्य' असें ओरडूं लागला. तेव्हां त्याला आंत बोलावून ओरडण्याचें कारण विचारलें असतां,–'प्रभो, अरण्यांत दुष्ट गोपालांनीं माझ्या पुत्राचा विनाकारण पाय तोडला,–असें तो म्हणाला. त्याबरोबर अरण्यांतील दोघां तिघां गोपालांस आणवून राजानें ब्राह्मणपुत्राचा पाय तोडण्याचें कारण विचारिलें, तेव्हां ते म्हणाले–"देवा, आम्ही गायींस राखीत अरण्यांतून फिरत असतों. आमच्यामध्यें देवसेन म्हणून एक गोप आहे, तो अरण्यांतील एका शिळेवर बसतो, व

मी तुमचा राजा आहें, असें म्हणून आम्हांला आज्ञा करितो. तो जें जें सांगतो तें तें करावें, अशी आमची दृढ मति होते. त्याच्या आज्ञेचें उल्लंघन करावें असें आमच्या मनांतही येत नाहीं, व आलें तरी तसें करण्याचें धैर्य आमच्यामध्यें नसतें. तात्पर्य याप्रमाणें तो अरण्यांत राज्य करीत असतो. आज ह्या ब्राह्मणाचा पुत्र त्या मार्गानें जात होता. त्यानें त्या गोपालराजास प्रणाम केला नाहीं. 'राजाला प्रणाम केल्यावांचून तूं जाऊं नकोस' असें राजाज्ञेनें आम्हीं सांगत असतानांही आमचा तिरस्कार करून तो बटु हंसत पुढें चालला. तें पाहून–'या उद्धट पोराला पादच्छेदरूप दंड करा'–असें गोपालराजानें आम्हांस सांगितलें, व त्याबरोबर आम्हींही धांवत जाऊन आज्ञेप्रमाणें त्याचा पाय तोडला; कारण आमच्या राजाची आज्ञा मोडण्यास कोण समर्थ होणार आहे ?"

## ३. निधान व सिंहासन यांची प्राप्ति.

गोपालांचें तें भाषण ऐकून व त्याविषयीं पूर्ण विचार करून मतिमान् यौगंधरायण एकांतांत राजास म्हणाला,—"देव, खचित तें स्थान मोठ्या निधीनें व दुसऱ्याही अमूल्य वस्तूंनीं युक्त असावें, आणि त्यामुळेंच सामान्य गवळीही इतका समर्थ झाला असावा. तर आतां आपण तेथें जाऊन खरा प्रकार काय आहे, तो प्रत्यक्ष पाहूं या."—या मंत्र्याच्या सांगण्याप्रमाणें उदयन, सैन्य व मंत्रिवर्ग यांसह त्या गोपवृद्धांस पुढें घालून तेथें जावयास निघाला. इष्ट स्थानीं पोंचल्यावर यौगंधरायणानें स्थानांची परीक्षा केली व राजाच्या आज्ञेनें एके जागीं खणावयास सांगितलें. खणणाऱ्या मजुरांनीं बराच मोठा खळगा खणतांच त्यांतून एक मोठा यक्ष निघाला. तो राजास म्हणाला–'राजन्, तुझ्या पितामहानें येथें पुरून ठेविलेलें व मीं इतके दिवस रक्षिलेलें हें निधान तूं घे.' त्यानंतर राजानें त्याचा मोठा आदर केला असतां, तो गुप्त झाला, व लागलाच खणलेल्या जागीं मोठा निधि प्रकट झाला. त्याच्या खालीं एक मोठें व सर्वोत्तम सिंहासन सांपडलें. संपत्तीच्या मागून संपत्ति धांवत येते, व एकदां विपत्ति आली कीं, तिचाच सुकाळ होतो. उदयकाल आला असतां सत्कल्याणांची परंपराच लागते* असो त्यानंतर तें सर्व निधान घेऊन आणि त्या गोपालास शिक्षा देऊन राजा आनंदानें आपल्या नगरास परत आला

* भवत्युदयकाले हि सत्कल्याणपरंपरा ।

राजानें आणलेलें तें सुवर्णाचें सुंदर सिंहासन व तो भव्य खजिना पाहून नगरवासी जन नगारे वाजवून मोठा आनंदोत्सव करूं लागले. मंत्री, राजाचा खचित जय होणार असा निश्चय करून फार प्रसन्न झाले; कारण अकस्मात् चालून आलेलें कल्याण पुढची कार्यसिद्धि सुचवीत असतें.$ त्यानंतर पताकारूपी विद्युल्लतांनीं गगनमंडल भरून सोडलें असतां, राजरूपी मेघानें अनुजीवीं ( नोकरां )वर सुवर्णाची वृष्टि केली.

उत्सवाचे दिवस निघून गेल्यावर एकदां श्रेष्ठ मंत्री–यौगंधरायण, राजाचें चित्त कसें आहे, तें पहाण्याच्या इच्छेनें त्यास म्हणाला,–" देव, आपल्या कुलक्रमानें प्राप्त झालेलें हें सिंहासन आहे, यास्तव त्याच्यावर आरूढ होऊन आपण त्यास अलंकृत करावें; पण तुमचे पूर्वज सर्व पृथ्वीस जिंकल्यावर ज्याच्यावर बसत होते, त्याच्यावर सर्व दिशांस जिंकून जर आपण बसाल, तर कुलाच्या कीर्तीचें अनुसरण केल्यासारखें होईल."– तें ऐकून 'मीही अगोदर सागरांतील द्वीपांसह सर्व पृथ्वी जिंकून मगच या महासिंहासनावर बसेन.' असें राजा म्हणाला. कुलीनांचा अभिमान स्वाभाविक असतो.‡ राजाचें तें उत्साह वाढविणारें भाषण ऐकून यौगंधरायण लागलेंच त्यास म्हणाला–" तर मग महाराज आतां अगोदर पूर्व दिशेकडे चला; कारण उत्तर दिशा जरी समृद्ध आहे, तरी ती म्लेच्छांच्या संसर्गानें दूषित झाली आहे. पश्चिम दिशेंत सूर्यादि तेजांचा अस्त होत असल्यामुळें, तेजस्वी राजे तिचा आदर करीत नाहींत. दक्षिणेंत राक्षस असतात व यमराज तिचा अधिपति आहे, म्हणून राजांच्या प्रवासाला ती योग्य नाहीं. पूर्व दिशेचा अधिपति इंद्र आहे. सूर्याचा उदयही त्या दिशेंत होतो. गंगाही तिकडेच वहात जाते, म्हणून विजयार्थ गमन करावयाचें झाल्यास, प्राची दिशाच प्रशस्त मानलेली आहे. हिमालय व विंध्य यांच्या मधला प्रदेश गंगेच्या जलानें पवित्र झाला आहे, यास्तव सर्व देशांत तो अधिक प्रशस्त आहे. मंगलाची इच्छा करणारे सर्व राजे प्रथम त्या दिशेलाच जातात, व देव-नदीनें पवित्र केलेल्या मध्यदेशांत निवास करितात. राजन्, आपल्या पूर्वजांनीं या पूर्वदिशेपासूनच पृथ्वीविजयास आरंभ केला

$ आमुखापातिकल्याणं कार्यसिद्धिं हि शंसति ।

‡ संभवत्यभिजातानामभिमानो ह्यकृत्रिमः ।

होता. त्यांनीं भागीरथीच्या तीरीं हस्तिनापुरांत वास्तव्य केलें; पण शतानीक महाराजांनीं कौशांबी रमणीय नगरी आहे, असें पाहून व साम्राज्य पौरुषाच्या अधीन आहे, देशाशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं, असें जाणून, येथेंच आपलें राजगृह केलें."

इतकें सांगून मुख्य मंत्री थांबला असतां, पुरुषाचा प्रयत्न हेंच सर्व इष्टानिष्ट सिद्धींचें परम कारण आहे, असें निश्चयपूर्वक जाणणारा राजा उदयन म्हणाला—मंत्रिवर्य, तुम्ही खरें सांगितलेंत. देश साम्राज्याचें कारण नव्हे. केवल पौरुषच त्याचें कारण आहे. पौरुषसंपन्न पुरुष आश्रयहीन व एकटा जरी असला, तरी त्याला लक्ष्मी मिळते. धैर्यवान् विदूषकाची कथा तुम्ही ऐकली नाहींसें वाटतें! त्यावर सचिवांनीं ती अद्भुत कथा सांगण्याविषयीं आग्रह केला असतां, वत्सराज आपल्या दोघीजणी देवींसमक्ष पुढील कथा सांगूं लागला.

## ४. विदूषकाची कथा.

पूर्वी प्रसिद्ध उज्जयिनी नगरींत आदित्यसेन नांवाचा एक राजा होता. तेजोनिधि सूर्याप्रमाणें त्याचाही रथ कोठें कुंठित होत नसे. त्याचें, शीतकिरण—चंद्रासारखें शुभ्र छत्र, अंतरिक्षांत उज्ज्वल होऊन दिसूं लागलें, म्हणजे दुसऱ्या सर्व दर्परहित राजांची छत्रें बंद होत असत. सागराप्रमाणें तोही एकटाच भूतलावरील सर्व खाणींतून निघणाऱ्या रत्नाचा आधार होता. एकदां कांहीं कारणानें तो राजा या जान्हवीच्या तीरावर आपल्या सैन्याचा तळ देऊन बसला. तेव्हां तेथील गुणवर्मा म्हणून कोणीएक, उत्कृष्ट कन्या भेटीच्या रूपानें बरोबर घेऊन, त्याच्याकडे आला. व 'देव, त्रिभुवनांतील जणुं काय रत्नच, अशी ही कन्या माझ्या घरीं झाली. ही दुसऱ्या कोणाला देणें योग्य नव्हे; कारण आपण सर्व रत्नांचें पात्र आहां,'—असें प्रतीहारीच्या द्वारा त्यास कळवून, व अनुज्ञा झाली तेव्हां स्वतः राजाजवळ जाऊन गुणवर्म्यानें ती कन्या राजाला अर्पण केली. तेजस्विनी, असें तिचें यथार्थ नांव होतें. ती आपल्या कांतीनें दिगंतरास प्रकाशित करीत होती. तिला पहातांच राजा मोहित झाला, व ही महादेवी या पदास उचित आहे, असें समजून राजानें तिचा स्वीकार केला. गुणवर्म्यालाही पुष्कळ धन देऊन त्यानें संतुष्ट केलें. त्यानंतर शुभ दिवशीं तिच्याशीं विवाह करून आपल्याला कृतार्थ समजणारा तो राजा

तजोस्विनीसह उज्जयिनीस परत आला. तेथें आल्यावर राजा तिच्या सुंदर मुखावर इतका आसक्त झाला कीं, मोठमोठीं राजकार्येंही तो पाहीना. तिच्या मधुर आलापांनीं त्याचे कान इतके बधिर झाले कीं, प्रजाजनांचे आक्रोश त्याला ऐकूं येईनात. अंतःपुरांत प्रवेश करून फार दिवस झाले, तरी तो त्यांतून बाहेर येईना. केवळ शत्रुवर्गाच्या हृदयांतील संतापज्वर मात्र बाहेर निघाला.

कांहीं दिवसांनीं त्या राजास तेजस्विनीच्या ठायीं एक कन्या झाली, व त्याच्या हृदयांत विजयेच्छाही उद्भवली. ती कन्या परम आश्चर्यमय असून, त्रिभुवनास तुच्छ करून राजास तिनें हर्षयुक्त केलें, व विजयेच्छेनें संतप्त केलें. एकदां तो राजा दुसऱ्या एका सामंत राजावर स्वारी करण्याकरितां उज्जयिनींतून निघाला. सैन्याच्या व्यूहाची जणु काय अधिदेवताच अशा तेजस्विनीलाही त्यानें हत्तीणीवर बसवून आपल्याबरोबर घेतलें. स्वतः राजा एका उंच व चपल घोड्यावर बसला होता. राजधानीपासून कांहींसें दूर गेल्यावर सपाट भूमि लागली. तेव्हां तेजस्विनीला आपला पुरुषार्थ दाखविण्याकरितां त्यानें घोड्यास पिटाळलें. चाबकाची दोरी चमकन पाठीवर लागली असतां, तो घोडा, धनुष्यापासून वेगानें सुटलेल्या बाणाप्रमाणें अतिवेगानें पळूं लागला. हां हां म्हणतां तो लोकांच्या दृष्टीआड झाला. मागून सावकाश चालत असलेल्या राणीला अथवा सैन्यांतील लोकांना आपला स्वामी कोणीकडे गेला, व त्याचें काय झालें, हें कांहींच समजेना. त्यामुळें सर्वजण किंकर्तव्यता—मूढ झाले. तें पाहून सहस्रावधि घोडेस्वार निरनिराळ्या दिशांस आपले घोडे पळवून राजाचा शोध करूं लागले; पण त्यांतील कोणालाही त्याचा थांग लागला नाहीं. तेव्हां हा मोठाच अपशकुन झाला आहे, असें जाणून मंत्री, भयानें व्याकुल झालेल्या व पतीकरितां आक्रोश करणाऱ्या राणीला घेऊन उज्जयिनीस परत आले. त्यांनीं राजाच्या शोधाकरितां चारी दिशांस दूत रवाना केले; प्रजेस धीर दिला व वेशीचें दार बंद करून किल्ल्याचें रक्षण करीत ते सर्व सावध राहिले.

इकडे त्या वेगवान् घोड्यानें प्रचंड श्वापदांनीं भरलेल्या अति दुर्गम विंध्यारण्यांत त्या राजास नेलें, व तेथें तो एकदम उभा राहिला; पण तें महत् अरण्य पाहून राजाला मोह पडला. त्याला दिशाही

कळेनात. त्याचीं सर्व इंद्रियें विकल झालीं. एक क्षणभर तो तसाच राहिला; पण आतां अन्य उपाय नाहीं, असें जाणून तो अश्वजातिज्ञ राजा घोड्यावरून खालीं उतरला, व त्यास प्रणाम करून म्हणाला,–" हे श्रेष्ठ अश्वा, तूं देव आहेस. तुझ्या सारखे मोठे प्राणी प्रभुद्रोह कधीं करीत नसतात. या वेळीं तूंच माझा आधार आहेस, या अरण्यांतून कुशल मार्गानें तूं मला राजधानीस पोंचीव."–ही राजाची प्रार्थना ऐकून ज्याला पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे, अशा त्या घोड्यानें 'आपल्याला पश्चात्ताप झाला आहे, व तें प्रभुवाक्य मान्य आहे,' असें खुणेनें राजास कळविलें. त्याबरोबर राजा पुनः त्या घोड्यावर आरूढ झाला. व तो घोडाही मोठ्या वेगानें शीत, मंद व सुगंधित वायूच्या योगानें सुखकर झालेल्या मार्गानें परत निघाला. उज्जयिनी तेथून शंभर योजनें दूर होती; पण सायंकाळ होत आहे, तोंच तो राजाला घेऊन त्याच्या राजधानीजवळ आला. या भूलोकाच्या घोड्यानें आपल्या साती घोड्यांस जिंकलें आहे, असें पाहून जणुं काय लज्जित होऊनच सूर्य अस्ताचलाच्या पलीकडे जाऊन लपला असतां, व चोहोंकडे अंधकार पसरला असतां, उज्जयिनीचीं द्वारें बंद केलेलीं आहेत, असें पाहून त्या घोड्यानें राजाला नगराबाहेरील भयंकर स्मशानांत नेलें. तेथें घोड्यावरून उतरून तो राजा ती रात्र घालविण्यास योग्य असें एकादें स्थान पाहूं लागला. तों त्या स्मशानाच्या एका कोपऱ्यांत असलेला एक ब्राह्मणांचा मठ त्याला आढळला. तेव्हां ही रात्र घालविण्यास हें योग्य स्थान आहे, असें जाणून, घोडा अतिशय थकलेला असल्यामुळें, तो राजा त्यालाही घेऊन आंत जाऊं लागला; पण त्या मठांत रहाणाऱ्या ब्राह्मणांनीं हा स्मशान–पालक आहे, कीं कोणीं चोर आहे, असें म्हणून त्यास आंत येण्यास प्रतिबंध केला. व ते सर्व वेदपाठी ब्राह्मण मोठा कोलाहल करीत; " जा; जा, आंत कोठें येतोस " इत्यादि बडबडत व हातवारे करीत मठाच्या बाहेर आले; पण ते अशी गर्दी करून बडबड करीत आहेत, तोंच आंतून एक विदूषक नांवाचा गुणी व महाधैर्यशाली ब्राह्मण बाहेर निघाला. त्या तरुण व शूर ब्राह्मणानें आराधनेनें संतुष्ट झालेल्या अग्नीपासून, स्मरण करतांच समीप येणारें, असें एक उत्तम खड्ग संपादन केलें होतें. त्यानें बाहेर येऊन राजाची भव्य मूर्ति पाहिली, व तत्काल हा कोणी गुप्त वेषधारी

देव अथवा असामान्य पुरुष असावा, असें अनुमान केलें. लागलेंच त्या उगीच बडबडणाऱ्या भटांचें निवारण करून, त्यानें त्या उत्तम पुरुषास मठांत नेलें. तो फार थकला आहे, असें जाणून त्यानें आपल्या दासीं-कडून त्याची उत्तम परिचर्या करविली, व त्याचे मार्ग–क्लेश जरा कमी झाल्यावर त्याला उचित आहार दिला. त्याच्या थकलेल्या घोड्या-वरील सामान उतरवून, व तोंडांतील लगाम काढवून त्यालाही दाणा पाणी देऊन तृप्त केलें. दीडप्रहर रात्र झाली तेव्हां उत्तम शय्या सज्ज करवून तो विदूषक-विप्र राजास म्हणाला,—" प्रभो, आपण स्वस्थ शयन करा. मी स्वतः आपल्या शरीराचें रक्षण करीत बसतों "—त्याचें हें प्रिय–भाषण ऐकून राजानेंही त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवून शयन केलें, व त्याला गाढ निद्रा लागल्यावर, तो गुणी ब्राह्मण, स्मरण करतांच जवळ आलेलें खड्ग, हातांत घेऊन द्वारावर उभा राहिला. त्यानें ती सर्व रात्र जागून काढली. प्रातःकाल होतांच आपोआप उठलेल्या राजाचा घोडा त्यानें, राजाच्या सांगण्यावांचूनच, सज्ज केला. राजाही शय्येवरून उठून, अवश्य-कृत्यें केल्यावर, त्या मोठ्या उपकारी ब्राह्मणाचा निरोप घेऊन घोड्यावर बसला, व पौरजनांस हर्षवीत उज्जयिनींत शिरला. त्याबरोबर सर्व प्रजा, आनंदानें मोठा कोलाहल करीत त्याच्या जवळ आली. शेवटीं तो आपल्या सचिवांसह राजभवनांत गेला; पण काय सांगावें, तो आला आहे, असें कळतांच तेजस्विनीचा मनोज्वर पळून गेला. उज्जयिनींत आनंद व्यक्त करण्याकरितां घरोघर पताका लाविल्या होत्या, व त्यांचीं वस्त्रें वाऱ्यानें जोरानें हालत होतीं. तें पाहून पताका त्या नगरींतील शोकालाच झाडून काढीत आहेत कीं काय, असा भास झाला. देवीनें त्या दिवशीं सायंकालपर्यंत इतका उत्सव करविला, कीं त्यामुळें सूर्या बरो-बर सर्व पौरजनही केशररेणूंनीं रक्तवर्ण झाले.

नंतर दुसऱ्या दिवशीं कृतज्ञ आदित्यसेन-राजानें त्या विदूषकास इतर सर्व ब्राह्मणांसह मठांतून आणविलें, व रात्रीचा वृत्तांत राजसभेंत सांगून, त्यानें त्या उपकार करणाऱ्या विदूषकास तत्काल एक सहस्र गांव दिले, आणि छत्र वाहन देऊन आपला पुरोहित केलें. त्यामुळें तो विदूषक एका घटिकेंत सामन्त राजासारखा झाला. मोठ्या लोकांवर केलेले उपकार

व्यर्थ कसे बरें होतील ?* पण त्या महात्म्याला राजानें जे गांव दिले होते, ते त्यानेंही मठांतील सर्व ब्राह्मणांस सारखे वांटून दिले. इतरांच्या बरोबर त्यानेंही आपला एक वांटा घेतला, आणि राजाची सेवा करीत व इतर ब्राह्मणांसह त्या राजदत्त ग्रामांचा उपभोग घेत तो राहिला.

कांहीं काल लोटत आहे तों, ते सर्व द्विज धनमदानें अंध झाले. फार काय; पण त्यांतील प्रत्येकजण मोठेपणाची इच्छा करून विदूषकालाही मोजीनासा झाला. ते सातजण होते, पण प्रत्येकाचें मत निराळें. अशी स्थिति झाल्यामुळें, एका स्थानाचा आश्रय करून राहिलेल्या व परस्पर द्वेष करणाऱ्या ब्राह्मणांच्या योगानें, सात दुष्ट ग्रहांप्रमाणेंच, ग्रामांना अतिशय पीडा झाली, पण ते असे उच्छृंखल झाले असतांही बुद्धिमान् विदूषक उदासीन होऊनच राहिला. श्रेष्ठ पुरुषांना मूर्खांकडे दुर्लक्ष करणेंच उचित होय.†

एकदां ते सर्व ब्राह्मण कलहांत निमग्न झाले आहेत, असे पाहून चक्रधर नांवाचा कोणी एक स्वभावतःच न्यायनिष्ठुर असलेला ब्राह्मण तेथें आला. तो एका डोळ्यानें काणा होता, तरी दुसऱ्यांच्या द्रव्यसंबंधी वादांतील तथ्य तेव्हांच पहात असे. तो कुबडा होता, पण त्याची वाणी अगदीं स्पष्ट व सरळ असे. असो; तो ब्राह्मण त्यांस म्हणाला,—"अरे शठांनो तुम्हीं मूळचे भिक्षुक. दैवयोगानें तुम्हांला ही लक्ष्मी मिळाली. तिचा आनंदानें उपभोग घ्या. एकमेकांशीं भांडून या ग्रामांचा नाश कां करितां ? तुमची उपेक्षा करणाऱ्या विदूषकाचाच हा सर्व दोष आहे. पण संभाळा, थोड्याच दिवसांत तुम्ही पुनः भिकेस लागाल. नाहीं तर तुमच्यांतील कोणा तरी एका शहाण्याला नायक करा. कारण केवल दैवाधीन असलेल्या एकाद्या वृद्धिस्थानाचा मुळींच नायक नसलेला पतकरतो; पण 'हा' असला अनेक नायकांच्या निरनिराळ्या मतींनीं लवकरच नाश पावणारा कारभार पतकरत नाहीं."‡ चक्रधराचें तें भाषण ऐकून त्यांतील प्रत्येकजण नायक होण्याची इच्छा करूं लागला. तें पाहून

---

* मोघा हि नाम जायेत महत्सूपकृतिः कुतः ।

† अल्पभावेषु मूढानामवज्ञैव हि शोभते.

‡ वरं हि दैवायत्तैकवृद्धिस्थानमनायकम् । न तु विलुप्तसर्वार्थं विभिन्नबहुनायकम् ॥

चक्रधर पुनः त्या मूढांस म्हणाला, तुम्ही मत्सरी आहां. यास्तव मी एक तुम्हाला नियम करून देतों. आज या स्मशानांत तिघां चोरांस सुळावर चढविलें आहे. त्यांचीं नाकें जो कापून आणील, तो तुमच्यांतील नायक होईल; कारण वीर पुरुषच नायक होण्यास योग्य† असतो. विदूषक तेथेंच होता. तो म्हणाला,—"काय हरकत आहे! जा आणा त्यांचीं नाकें कापून!" पण त्या सात भांडखोर ब्राह्मणांतील एकासही धैर्य होईना. ते म्हणाले,—"छे बाबा आमच्या हातून कांहीं हें होणार नाहीं. जो हें करण्यास समर्थ असेल, त्यानें खुशाल करावें. आम्ही त्याच्या आज्ञेंत राहूं."—त्यावर विदूषक म्हणाला,—"बरें तर; मी हें कृत्य करितों. स्मशानांतून मी त्यांचीं नाकें कापून आणितों."-तेव्हां हें दुष्कर आहे, असें समजून ते मूर्ख म्हणाले,—"तुझ्या हातून हें कृत्य घडल्यास आमचा स्वामी तूंच होशील, हा पण आम्हाला मान्य आहे."—इतकें ठरल्यावर विदूषक रात्रीं त्या सर्वांस सांगून स्मशानांत जावयास निघाला. स्मरण करतांच आलेलें खड्ग त्यानें आपल्या हातांत घेतलें व डाकिनींच्या आणि गृध्र वायसादि पक्ष्यांच्या नादानें नादित झालेल्या आणि भालूंच्या मुखांतील अग्नीच्या योगानें ज्यांतील चिताग्नि अधिकच विस्तृत झाले आहेत, अशा स्मशानांत तो शिरला. तेथें शूलावर चढविलेले ते तीन चोर त्यास दिसले. आपलीं नाकें कोणी कापतील या भीतीनेंच जणुंकाय, त्यांनीं आपलीं तोंडें वर केलीं होतीं; पण तो ब्राह्मण त्यांच्याजवळ जों जात आहे, तों वेताळांनीं ज्यांच्या शरीरांत प्रवेश केला आहे, असे तिघेही त्यास ठोंसे मारूं लागले. तथापि तो धीर पुरुष भ्याला नाहीं. त्यानें आपल्या तीक्ष्ण खड्गानें त्यांस मारून पाडलें.

त्याबरोबर त्यांच्या शरीरांतील वेताळांचा विकार बंद पडला. तेव्हां विदूषकानें त्यांचीं नाकें कापून एका फडक्यांत बांधून घेतलीं, आणि तो परतला; पण येत असतांना त्यानें शवावर स्थित होऊन जप करीत असलेल्या एका संन्याशास पाहिलें, व हा काय करितो तें पहावें, असें मनांत आणून तो त्याच्या मागें लपून राहिला. इतक्यांत शवानें संन्याशाच्या खालीं फुंकर मारला. त्याबरोबर त्याच्या तोंडांतून अग्निज्वाला व नाभींतून मोहऱ्या निघाल्या. तेव्हां तांत्रिकानें त्या मोहऱ्या घेऊन व

† वीरो हि स्वाम्यमर्हति ।

शवावरून उतरून त्यास चपराक मारली. ती तळहाताची थप्पड लागतांच वेताळानें ज्याच्यामध्यें संचार केला आहे, असा तो मृत देह उठला, व संन्याशी त्याच्या खांद्यावर बसून कोठेंसा जाऊं लागला. तेव्हां विदूषकही गुपचुप त्याच्या मागोमाग निघाला. बऱ्याच अंतरावर गेल्यावर त्याला एक कात्यायनीचें शून्य मंदिर दिसलें. त्यांत शिरतांच तांत्रिक शवाच्या खांद्यावरून खालीं उतरला, व तें शव भूमीवर पडलें. विदूषकही गुप्त राहून त्याचा सर्व व्यापार पाहूं लागला.

देवीच्या गाभाऱ्यांत शिरल्यावर संन्याशानें तिची पूजा करून अशी प्रार्थना केली कीं, "देवि तूं जर मजवर प्रसन्न झाली असशील, तर मला इष्ट वर दे. नाहीं तर मी आपल्या देहाचा बळी देऊन तुला प्रसन्न करीन." तो इतकें बोलत आहे, तोंच त्या गाभाऱ्यांत त्यास उद्देशून अशी वाणी झाली–'वत्सा, तूं आदित्यसेन राजाच्या कन्येला येथें आणून बळी दे. म्हणजे तुझें कल्याण होईल.'–तें ऐकून तो गाभाऱ्यांतून बाहेर आला. आणि शवाला पुन: ताडन करून त्यानें वेताळशक्तियुक्त केलें, व त्याच्यावर बसून तो आकाशमार्गानें राजकन्येला आणण्याकरितां गेला. तें सर्व पाहून व ऐकून विदूषक मनांत म्हणाला–"काय मी जीवंत असतांना हा दुरात्मा राजकन्येला मारणार ! बरें आहे. तो तिला आणीपर्यंत मी येथेंच रहातों"–असें म्हणून तो तेथेंच लपून राहिला. इतक्यांत तो तांत्रिकही आकाशमार्गानें जाऊन खिडकींतून अंत:पुरांत शिरला, व निजलेल्या राजकन्येला घेऊन तेथून परतला. राहु जसा चंद्रकलेचें हरण करितो, त्याप्रमाणें आपल्या कांतीनें दशदिशांस प्रकाशित करणाऱ्या त्या सुकुमारीला, तो दुष्ट जेव्हां नेऊं लागला तेव्हां ती जागी झाली व 'हा तात, हा मात:' असें म्हणून आक्रोश करूं लागली; पण त्या निर्दयाला दया आली नाहीं. अशा दुरात्म्यांनाही जर दया येऊं लागली, तर या सृष्टींत क्रूर कर्में कशीं होणार ! असो; खाटिक दीन स्वरानें ओरडणाऱ्या व जीव वांचविण्याकरितां धडपड करणाऱ्या पशूची जशी बलात्कारानें मान चिरतो, त्याप्रमाणें त्या अबलेलाही बळी देण्याकरितां, तिच्या दीन आक्रोशाकडे दुर्लक्ष करून, तो राक्षसहृदयी संन्यासी त्या देवीच्या मंदिरांत तिला घेऊन आला. नन्तर शवावरून उतरून व तिला घेऊन तो गर्भागारांत शिरला. आणि कात्यायनीच्या समोर तिचा बळी देण्यास

जों तो तयार होत आहे, तोंच आपलें खड्ग उपसून विदूषक पुढें झाला. व 'अरे पाप्या, या सुंदरीला तूं येथें मारण्याकरितां आणलें आहेस काय ? पण जाईच्या वेलावर मोठा थोरला दगड टाकण्यासारखें हें तुझें अकृत्य मी सहन करणार नाहीं ' असें म्हणून त्यानें केंस धरून त्याचा शिरच्छेद केला. आणि भयानें व्याकुळ झालेल्या राजकन्येला धीर दिला. नंतर 'आतां हिला राजाच्या अंतःपुरांत कसें बरें नेऊं' असा तो विचार करूं लागला इतक्यांत पुढीलप्रमाणें आकाशवाणी झाली–'अरे वीरश्रेष्ठा विदूषका, तूं मारलेल्या ह्या संन्याशाला हा वेताळ वश झाला होता. त्या दुरात्म्याला पृथ्वीचें राज्य व राजांच्या कन्या यांविषयीं इच्छा झाली होती; पण त्याच्या दुर्दैवानें त्याला ठकविलें; तर आतां तूं ह्याच्या छाटींतील मोहऱ्या घे, म्हणजे आजची एक रात्र तुझी आकाशांतून गति होईल.'

हें ऐकतांच त्याला फार आनंद झाला. त्यानें संन्याशाच्या वस्त्राच्या पदरांत बांधलेल्या मोहऱ्या सोडून घेतल्या, व त्या राजकन्येला उचलून घेऊन तो बाहेर आला. इतक्यांत–" वीरा, महिन्याच्या शेवटीं तूं पुनः या देवीच्या मंदिरांत ये. विसरूं नकोस.'–अशी पुनरपि आकाशवाणी झाली. त्यानंतर वेताळावर बसून विदूषक कन्येसह आकाशमार्गानें अंतः-पुरांत आला, व तेथें पोंचल्यावर त्या राजकन्येला तो म्हणाला–राजपुत्रि, प्रातःकाळीं माझी गति आकाशमार्गानें होणार नाहीं. आणि त्यामुळें मी येथून जाऊं लागलों म्हणजे सर्व मला पहातील. म्हणून मी आतांच जातों. पण त्यावर ती भितरी कन्या म्हणाली,–" वीरा, तूं येथून गेलास म्हणजे माझे भयभीत झालेले प्राण रहाणार नाहींत. तूं जाऊं नकोस. येथेंच राहून मला जीवदान दे.–" तिचा हा आग्रह पाहून तो अत्यंत दयाळु व मोठा उदार ब्राह्मण–' मी हिला सोडून गेल्यास ही भयानें मरेल, आणि राजभक्ति दाखविण्याकरितां केलेले माझे प्रयत्न व्यर्थ जातील.'–असा विचार करून त्या अंतःपुरांतच राहिला. कांहीं वेळानें श्रम व जागरण यांच्या योगानें थकल्यामुळें त्याला गाढ झोंप लागली. भय वाटत असल्यामुळें राजकन्येला मात्र रात्रभर निद्रा आली नाहीं. पुढें पहांट झाली तरी तिनें त्याला जागें केलें नाहीं; कारण त्या बिचाऱ्याला गाढ झोंप लागली आहे, इतक्यांत कशाला उठवूं असें प्रेमानें ती म्हणाली.

पण चांगलें उजाडल्यावर राजाच्या अंतःपुर–रक्षकांनीं आंत येऊन त्याला तेथें पाहिलें व लागलेंच तें वर्तमान राजाला कळविलें. आदित्य सेनानेंही खरा प्रकार जाणण्याकरितां आपल्या प्रतीहारीस पाठविलें. त्यानें तेथें जाऊन विदूषकाला पाहिलें, व राजकन्येच्या तोंडून रात्रीं घडलेला सर्व वृत्तांत ऐकून राजाला कळविला. राजाला विदूषकाच्या प्रभावाचा अनुभव पूर्वीच आला होता, पण तो अद्भुत प्रकार ऐकून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें विदूषकाला अंतःपुरांत आणवून मोठ्या स्नेहानें सर्व इतिहास विचारला, व त्या ब्राह्मणानें तो पहिल्यापासून सांगितला. फडक्यांत बांधून घेतलेलीं चोरांचीं तीन नाकें व मोहऱ्याही त्यास दाखविल्या. तेव्हां हें सर्व खरें आहे, असें समजून पुनः पूर्ण निश्चय करण्याकरितां, राजानें चक्रधरासह मठांतील ब्राह्मणांस आणवून सर्व वृत्तांत विचारला. त्यांनींही विदूषक तेथून निघेपर्यंत घडलेली हकीकत पहिल्यापासून सांगितली. नंतर ते सर्व श्मशानांत गेले. तों तेथें आदल्या दिवशीं सुळीं दिलेल्या तिघां चोरांचीं नाकें कापलेलीं आहेत, व तीं हींच होत असें त्यांना कळलें. देवीच्या देवालयांत जाऊन पहातात, तों ज्याचा कंठ कापला आहे, असा एक मरून पडलेला संन्यासी त्यांना दिसला. विदूषकाच्या सांगण्याप्रमाणें सर्व अगदीं बरोबर आहे, असें पाहून व जाणून, त्याच्या त्या परम उपकारांविषयीं, व सच्छीलतेविषयीं राजाच्या मनाचा पूर्ण निश्चय झाला. नंतर संतुष्ट होऊन राजानें प्राणदान देणाऱ्या त्या उत्तम ब्राह्मणाला, तीच आपली कन्या अर्पण केली. उदार पुरुष संतुष्ट झाले असतां, त्यांच्यावर उपकार करणारांस न देण्यासारखें, असें त्यांना काय असणार ?* खरोखर हें कमलच आहे, अशा भ्रांतीनें लक्ष्मी त्या राजकन्येच्या हातावर निवास करीत असावी; कारण त्यावांचून तिचें पाणिग्रहण करितांच विदूषकास एवढी मोठी लक्ष्मी प्राप्त झाली नसती. असो; विवाहानंतर तो महायशस्वी ब्राह्मण श्वशुराच्याच येथें रमणीसह राजोपभोग भोगीत राहिला.

कांहीं दिवस गेल्यावर एकदां रात्रीं दैवानें मोहित झालेली, ती राजपुत्री विदूषकास म्हणाली–" स्वामिन्, त्या देवीच्या गाभाऱ्यांतून जेव्हां आपण बाहेर आलों, तेव्हां ह्या महिन्याच्या शेवटीं पुनः येथें येण्याविषयीं

* किमदेयमुदाराणामुपकारिषु तुष्यताम् ।

देवीनें सांगितलें होतें, तें आपण विसरलां कीं काय ? त्या गोष्टीला तर आज महिना झाला, असें मला वाटतें,"-हें आपल्या प्रियेचें भाषण ऐकून विदूषकाला मोठा आनंद झाला, व तो उलट म्हणाला,-"प्रिये, तूं बरी मला आठवण केलीस. मी तर तें अगदीं विसरलोंच होतों. मन एका सुखमय विषयांत गुंतलें, म्हणजे तें दुसऱ्या सर्व कर्तव्यास विसरतें "-असें बोलून व दृढ आलिंगन देऊन त्यानें तिला सतुष्ट केलें. नंतर तिला गाढ झोंप लागली असतां, रात्रीं तो धीट व शूर पुरुष त्या अंत:पुरांतून बाहेर पडला, व आपलें खड्ग हातांत घेऊन त्या देवालयांत गेला. तेथें पोंचल्यावर-हा मी विदूषक आलों आहे,-असें म्हणून बाहेरच तो उभा राहिला तेव्हां, 'आंत ये' असें कोणीसें म्हटलेलें त्यानें ऐकलें. आंत प्रवेश करतांच त्याला दिव्य मंदिर, त्यांतील दिव्य वस्तु व एक दिव्य कन्या दिसली. तेव्हां हा काय चमत्कार आहे, असें म्हणून विस्मित झालेल्या विदूषकाचें त्या आनंदित कुमारीनें स्नेहानें व आदरानें स्वागत केलें. तो तिनें दाखविलेल्या आसनावर बसला. आणि 'ही कोण, कोणाची' इत्यादि प्रश्न विदूषकाच्या मनांत घोळत आहेत, असें जाणून ती म्हणाली,-"हे महाभागा, मी भद्रा नांवाची महाकुलीन विद्याधरी आहें. सहज फिरत असतांना मी तुला त्या दिवशीं येथें पाहिलें, व तुझ्या गुणांनीं तत्काल माझें चित्त आकर्षण करून घेतलें. मीच तें तुला पुन: येथें येण्याविषयीं सांगितलें. मी आज विद्याप्रयोगानें राजकन्येला मोह पाडाल्यमुळें, तिनें तुला माझ्या त्या वाणीची आठवण केली. हे उत्तम पुरुषा, मी तुजकरितां येथें येऊन राहिलें आहें. मी हें शरीर तुला अर्पण केलें आहे. माझें पाणिग्रहण कर."-हें तिचें अतिप्रिय भाषण ऐकून त्यानें गांधर्वविधीनें तिचें पाणिग्रहण केलें, व तिच्यासह तो दिव्य भोगांचा उपभोग स्वेच्छेनें घेत तेथेंच राहिला.

इकडे प्रात:काळीं ती राजपुत्री जागी झाली, व पति न दिसल्यामुळें अतिशय विव्हल होऊन रडत आपल्या आईकडे गेली, आणि म्हणाली-"आई, माझा पति रात्रीं कोठें गेला."-तें ऐकून तिची आईही कष्टी झाली. शेवटीं ती बातमी राजापर्यंत पोंचली. राजाही खिन्न झाला. 'तो कदाचित् कात्यायनीच्या देवालयांत गेला असेल,' असे कन्येच्या तोंडचे शब्द ऐकून तो स्वत: तेथें गेला; पण विद्याधरीनें विद्यासामर्थ्यानें

विदूषकाला गुप्त करून ठेवल्यामुळें राजा पाहूं शकला नाहीं. आपला पिता निराश होऊन परत आला, असें कळतांच राजकन्या देहत्याग करण्यास तयार झाली, तेव्हां तिला एक ज्ञानी म्हणाला,–" भद्रे, तूं उगीच आपल्या पतीविषयीं अशी अनिष्ट शंका कां घेतेस ? तुझा पति जिवंत आहे. हल्लीं दिव्य भोगांमध्यें तो गुंग झाला आहे; पण थोड्याच दिवसांत पुनः परत येईल,"–तें ऐकून हृदयांत उद्भवलेल्या आशेनें तिच्या बाहेर जाणाऱ्या जीवास अडवून धरिलें.

तिकडे विदूषकही आनंदांत असतां, एकदां एक योगेश्वरी नामक विद्याधरी भद्रेकडे आली, व तिला एकांतांत म्हणाली,–" सखे तुझ्या या मनुष्यसंसर्गामुळें विद्याधर तुजवर रागावले आहेत. ते तुझें कांहीं अनिष्ट करतील, यास्तव तूं येथून जा. पूर्वसमुद्राच्या पलीकडे कर्कोटक म्हणून एक नगर आहे. त्याच्या पलीकडे शीतोदा नामक नदी आहे. तिच्या पार गेलीस, म्हणजे तुला उदयगिरि लागेल. त्या पर्वतावर एक सिद्धक्षेत्र आहे. तेथें विद्याधर येऊं शकत नाहींत. यास्तव तूं आतांच तेथें जा. या आपल्या मानुष प्रियपतीची चिंता करूं नकोस. हें सर्व त्याला सांगून तूं गेलीस म्हणजे हाही तुझ्या मागून लवकरच तेथें येईल. "–प्रियसखीचें हें हितकर भाषण ऐकून विदूषकावर अतिशय अनुरक्त असलेली ती स्त्री तेथून जावयास तयार झाली, आणि आपल्या प्राणनाथाला तें सर्व सांगून व त्यास एक आंगठी देऊन प्रातःकाळीं गुप्त झाली. विदूषक जों जागा होऊन पहातो, तों ती विद्याधरी नाहीं व तें सुंदर मंदिरही नाहीं. तर आपण एका शून्य देवालयांत आहों असें त्याला वाटलें. त्याच्या हातांत प्रियेनें दिलेली आंगठी मात्र होती. स्वप्नासारखा तो चमत्कार पाहून, त्याच्या चित्तांत विषाद व विस्मय या दोन्ही रसांचा एकदांच प्रादुर्भाव झाला.–' ती आपली भद्रा, मला सर्व वृत्तांत सांगून खचित उदय पर्वतावर गेली आहे; यास्तव मलाही आतां तेथेंच गेलें पाहिजे; पण येथून जातांना लोक मला पहातील व बक्षिसाच्या लोभानें ते लागलेच जाऊन राजाला सांगतील. मग तो मला सोडणार नाहीं; यास्तव तो मला सोडील अशी युक्ति केली पाहिजे '–असा विचार करून त्या सुज्ञानें वेड्याचें सोंग घेतलें. अंगभर धूळ माखून चिंध्या पांघरला व ' हा भद्रे कोठें आहेस ' असें म्हणत तेथून निघाला. त्याला पहातांच,

अरे हा विदूषक आला, असें म्हणून तेथल्या लोकांनीं एकच गोंगाट केला. तें राजाला समजतांच वेड्याचें सोंग घेतलेल्या त्याला त्यानें धरून राजवाड्यांत नेलें. तेथें गेल्यावर प्रेमळ आप्त व भृत्यवर्ग यांतील कोणी कांहीं जरी विचारलें, तरी तो 'हा भद्रे' इतकेंच उत्तर देई. वैद्यांनीं सांगितल्यावर भृत्यांनीं त्याला एकदां चांगलें अभ्यंग स्नान घातलें; पण त्या सोंगाड्यानें पुनः आपलें अंग धुळीनें भरून घेतलें. राजपुत्रानें प्रेमानें आपल्या हातानें दिलेला आहारही तो पायानें उडवून देत असे, व नवीं वस्त्रें फाडून टाकी. अशा उन्मत्त अवस्थेंत तो कांहीं दिवस तेथें राहिला. शेवटीं राजा कंटाळला व याला प्रतीकार करणें अशक्य आहे, कदाचित् हा प्राण सुद्धां देईल व मला ब्रह्महत्या लागेल. यास्तव याला वाटेल तिकडे जाऊं दे, व हवें तें करूं दे. कदाचित् कांहीं दिवसांनीं हा शुद्धीवरही येईल–असा विचार करून राजानें त्याला वाटेल तिकडे जाऊं दिलें.

याप्रमाणें मोठ्या युक्तीनें तेथून सुटलेला तो ब्राह्मण, भद्रेनें दिलेल्या आंगठीसह स्वच्छंदचित्तानें उदय पर्वताकडे निघाला, कारण त्याचें सर्व चित्त भद्रेकडे लागलें होतें. जातां जातां कांहीं दिवसांनीं तो पौंड्रवर्धन नगरास पोंचला. तेथें एका घराजवळ जाऊन 'आई, मी आजची एक रात्र तुझ्या येथें राहूं का? असें त्या घरांतील बाईला विचारूं लागला. ती वृद्ध ब्राह्मणी त्यावेळीं मोठ्या संकटांत होती, व अशा प्रसंगीं कोणीही झालें तरी परोपकाराकडे दुर्लक्ष करीत नसतें. तिनें त्याचें चांगलें आतिथ्य केलें, व त्याला रहावयास जागा देऊन, ती आंतल्याआंत दीन झालेली दुःखी बाई त्याला म्हणाली–" पुत्रा तुलाच मी हें सर्व घर दिलें आहे, तूं तें घे; कारण मी आतां फार दिवस जिवंत रहाणार नाहीं. "–त्यावर विदूषक म्हणाला–आई, तूं असें काय म्हणतेस? त्यावर ती म्हणाली–" काय सांगूं बाबा, या नगरांत देवसेन नामक राजा आहे. त्याला भूलोकांतील रत्नच अशी एक कन्या झाली. राजाला मोठ्या प्रयासानें (पुष्कळ नवस–सायास केल्यावर) ती झालेली असल्यामुळें, त्यानें तिचें नांव दुःखलब्धिका असें ठेविलें आहे. कांहीं दिवसांनीं ती वयांत आल्यावर, कच्छप नांवाच्या राजास आपल्या येथें आणून देवसेनानें ती त्याला दिली; पण तिच्यासहवर्तमान तो अंतःपुरांत जातांच त्याचा

रात्रीं मरण पावला. नंतर खिन्न झालेल्या राजानें दुसऱ्या एका राजपुत्रास आणून त्याला ती देण्याचा निश्चय केला; पण तोही मरण पावला. तेव्हां मरणाच्या भीतीनें तिची कोणीच इच्छा करीनासा झाला. तेव्हां राजानें आपल्या सेनापतीस म्हटलें,—"आपल्या या देशांतून रोज एकेक ब्राह्मण किंवा क्षत्रिय तरुण पुरुष क्रमानें एकेका गृहांतून आणून माझ्या कन्येच्या अंतःपुरांत सोड. पाहूं या तर खरें, येथें किती पुरुष मरतात ते! जो ह्या पणांतून तरेल तोच हिचा पति होईल. दैवगति कोणालाहि कळत नाहीं"—या राजाज्ञेप्रमाणें सेनापति प्रत्यहीं एकेका गृहांतून एकेक पुरुष नेतो, व तो परत येत नाहीं. आजपर्यंत असे अनेक पुरुष तेथें मेले आहेत. बाबा, काय सांगूं? मला म्हातारीला एकुलता एकच पुत्र आहे व त्याची आज पाळी आहे. तो रात्रीं मेला म्हणजे मी उद्यां सकाळींच अग्नींत प्रवेश करण्याचा निश्चय केला आहे. त्यासाठीं मी जिवंत असतांनांच तुज गुणवानाला हें सर्व देऊन टाकितें. म्हणजे पुढच्या जन्मीं मी पुनः अशी दुःखी होणार नाहीं—" अशी आपली दुःखकारक कहाणी त्या स्त्रियेनें सांगितली असतां, तिला धीर देत विदूषक म्हणाला,—"बाई, असें जर असेल तर तूं कांहीं काळजी करूं नकोस. मी आज तेथें जातों. तुझा पुत्र जिवंत असूं दे. या पाहुण्याला मी कसें मारवूं-अशी भीति तूं मनांत बाळगूं नकोस मजजवळ अशी एक सिद्धि आहे कीं, तेथें गेल्यानें मला कांहीं होणार नाहीं."

त्यावर ती ब्राह्मणी हात जोडून म्हणाली,—"तर मग बाळा, माझ्या भाग्यानेंच तूं येथें आला आहेस."—इतक्यांत रात्र झाली व सेनापतीनें नियुक्त केलेला मनुष्य म्हातारीच्या मुलाला न्यावयास आला. तेव्हां त्याच्या बरोबर हा शूर आनंदानें निघाला. अंतःपुरांत गेल्यावर त्यानें त्या लोकोत्तर कन्येस पाहिलें, तेव्हां कोणी कधीं न तोडलेल्या पुष्पांच्या योगानें नम्र झालेल्या वेली प्रमाणेंच ती त्याला दिसली. त्या रात्रीं राजकन्येनें आश्रय केला आहे, अशा शय्येवर,-(ध्यान करतांच समीप आलेलें खड्ग हातांत घेऊन)—विदूषक जागत राहिला. मध्यरात्रीच्या सुमारास आसपासचे सर्व लोक स्वस्थ निजले असतां, एकाएकीं अंतःपुराचा दरवाजा उघडला व त्यांतून येत असलेला एक घोर राक्षस या ब्राह्मणाला दिसला. राक्षसानें त्या द्वारांतच राहून आपला शेंकडों लोकांस मारणारा आकस्मिक यमदंडासारखा हात अंतःपुरांत घातला. त्याबरोबर

विदूषकानें क्रोधानें धांवत जाऊन एकाच खड्गप्रहारानें तो त्याचा हात तोडला. तेव्हां हा कोणी मोठा बलवान् आहे, असें समजून राक्षस मुकाट्यानें तेथून पळून गेला. इतक्यांत राजकन्या जागी झाली व तो राक्षसाचा तुटून पडलेला हात पाहून भयभीत, आनंदित व विस्मित झाली. राजानेंही प्रातःकाळीं येऊन तो काळरूपी हस्त पाहिला. व त्याला मोठा आनंद झाला. तेव्हां त्या राजानें लागलाच योग्य सुमुहूर्तावर त्या दिव्यप्रभावसंपन्न विदूषकाला पुष्कळ वैभवासह ती कन्या दिली. तेव्हां विदूषक साक्षात् सपत्तीच अशा त्या कांतेकडून सेवा करून घेत तेथेंच कांहीं दिवस राहिला. पुढें एके दिवशीं रात्रीं स्वस्थ निजलेल्या त्या राजकन्येला तेथेंच सोडून, भद्रेविषयीं अतिशय उत्सुक झालेला तो विदूषक पुढें जावयास निघाला. प्रातःकाळीं तो कोठें गेला आहे, असें पाहून राजकन्या अतिशय दुःखित झाली. पण राजा व मंत्री यांना त्याचा स्वभाव कळलेला असल्यामुळें तो अवश्य पुनः येईल, असें सांगून त्यांनीं तिचें सांत्वन केलें.

तिकडे तो विदूषकही प्रत्यहीं मार्ग क्रमित पूर्व सागराच्या तीरीं असलेल्या ताम्रलिप्तिका नामक नगरीस आला, व तेथें समुद्राच्या पार जाण्याची इच्छा करणाऱ्या एका स्कंददास नामक वाण्याशीं मैत्री करून, त्याच्या धनानें भरलेल्या नौकेंतून तो जलमार्गानें पुढें चालला; पण समुद्राच्या मध्यभागीं येतांच ती नौका अडकून राहिली. ती पुढें सरेना व मागें जाईना. तिच्या धन्यानें होते तितके उपाय करून पाहिले; पण व्यर्थ. कोणी धरून ठेविल्याप्रमाणें ती एके जागीं अचल होऊन राहिली. तेव्हां अतिशय दुःखित झालेला तो वैश्य म्हणाला,–' ही माझी नौका जो सोडवील, त्याला मी आपल्या धनांतील अर्धें धन व आपली सुंदर कन्या देईन "–तें ऐकतांच धीर–चित्त विदूषक म्हणाला–मी समुद्रांत उतरून ही नौका कशाला अडकली आहे तें पहातों. तुम्हीं माझ्या दंडाला दोऱ्या बांधून मला धरून बसा, व नौका सुटून चालू झाली म्हणजे मला वर ओढून घ्या. वाण्याला तें म्हणणें मान्य झालें. नावाड्यानें त्याच्या खाकेंत दोऱ्या बांधल्या व तो आपलें प्रिय खड्ग घेऊन समुद्राच्या अगाध जलांत उतरला. प्रसंग आला असतां धीर पुरुष मागें सरत नाहींत.‡ नौकेच्या खालीं पाण्यांत बुडी मारून तो

‡ न जात्ववसरे प्राप्ते सत्त्ववानवसीदति ।

पाहूं लागला, तों तेथें निजलेला एक धिप्पाड पुरुष त्याला दिसला. त्याच्या मांडीला ती नांव अडकून राहिली आहे, असें कळतांच त्या वीरानें त्याची मांडी खड्गप्रहारानें तोडली. त्याबरोबर नौका पुनः पर्ववत् चालू झाली; पण आपली नाव चालूं लागली आहे, असें पाहून बोल-ल्याप्रमाणें धनाचा अर्धा भाग द्यावा लागेल, म्हणून भ्यालेला तो पापात्मा वाणी लोभवश झाला. लोभच सर्व पापांचें कारण आहे.$ त्यानें कृतघ्नपणानें त्याच्या दोऱ्या कापविल्या व आपली नाव वेगानें चालवून तो पार निघून गेला.

पण तिकडे परोपकारी विदूषक दोऱ्या तुटल्यामुळें निराधार होऊन, त्या भयंकर समुद्रांत गटकळ्या खाऊं लागला. त्यानें मोठ्या कष्टानें वर उठून नौकेकडे पाहिलें, तों ती मोठ्या वेगानें जात आहे व आपल्या-पासून पुष्कळ दूर गेली आहे, असें त्याला कळलें. वैश्याच्या स्वाभाविक कपटी स्वभावाचा त्याला त्यावेळीं चांगलाच अनुभव आला; पण-कृतघ्न व धनलोभानें अंध झालेले लोक उपकारांकडे दृष्टि पोंचविण्यास समर्थ नसतात.* आतां ही अधैर्याची वेळ नव्हे; कारण अधैर्यानें एखाद्या क्षुद्र आपत्तीचेंही उल्लंघन करवत नाहीं.† असा विचार करून तो सत्त्वशाली वीर-त्या तोडलेल्या व पाण्यावर तरंगत असलेल्या मांडीवर बसून समुद्राच्या पार तरून गेला. खरोखरच धैर्यवानास दैवच सहाय करीत असतें.§ असो; रामदूत मारुतीप्रमाणें समुद्राच्या पार गेलेल्या त्या बलवान् विदूषकास आकाशवाणी म्हणाली—"शाबास! शाबास!! विदूषका शाबास! तुझ्यासारखा सत्त्ववान् पुरुष दुर्लभ होय. तुझ्या या धैर्यानें मी संतुष्ट झालें आहे. तूं आता नग्नदेशास आला आहेस. येथून कर्कोटक नगर सात दिवसांच्या रस्त्यावर आहे, तेथें तूं सातव्या दिवशीं पोंचशील. त्यानंतर धैर्य धरून तूं पुढें गेलास म्हणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील. तूं ज्याची पूर्वी आराधना केली होतीस तोच मी अग्नि आहें.

---

$ लोभः पापस्य कारणम् ।

* कृतघ्ना धनलोभान्धा नोपकारेक्षणक्षमाः ।

† न हि सत्त्वावसादेन स्वल्पाप्यापद्विलंघ्यते ।

§ दैवमेव हि साहाय्यं कुरुते सत्त्वशालिनाम् ।

माझ्या प्रभावानें आतां या पुढें तुला क्षुधा व तृषा लागणार नाहीं. तूं आतां खुशाल पुढें जा."

तें ऐकून आनंदित झालेल्या विदूषकानें अग्नीस प्रणाम करून तेथून प्रस्थान केलें. सातव्या दिवशीं तो कर्कोटक नगरास पोंचला. तेथें तो एका मठांत गेला. आर्यवर्म नांवाच्या तेथल्या राजानें तो मठ स्थापिला होता. त्याच्या जवळच एक सुवर्णाचें मनोहर देवालय होतें. मठांतील अधिकारी ब्राह्मण फार दयाळु व अतिथिप्रिय होते. त्यांतील एकानें अभ्यागत विदूषकाला आंत नेऊन स्नान, भोजन इत्यादिकांच्या योगानें संतुष्ट केलें. संध्याकाळीं मठांत इतस्ततः फिरणाऱ्या विदूषकानें ढोल वाजवून एक मनुष्य नगरांत डांगोरा पिटीत आहे, असें ऐकलें. तो कशाची द्वाही फिरवीत आहे तें ऐकावें, असें म्हणून तो ब्राह्मण बाहेर आला. तों–' जो कोणी ब्राह्मण किंवा क्षत्रिय राजकन्येशीं विवाह करण्याची इच्छा करीत असेल, त्यानें आज रात्रीं अंतःपुरांत जाऊन रहावें,'–असें त्यानें ऐकलें, व लागलीच तो साहसी तिकडे जावयास उद्युक्त झाला. तें पाहून मठांतील लोक त्याला म्हणाले—" ब्राह्मणा, असें साहस करूं नकोस. तें राजकन्येचें अंतःपुर नव्हे; मृत्यूचें द्वार आहे. जो तेथें जातो, तो जिवंत परत येत नाहीं. आजपर्यंत तुझ्यासारखे पुष्कळ साहसी तेथें जाऊन मेले आहेत."– पण त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून तो वीर राजपुरुषांसह राजकन्येच्या येथें गेला. राजानें त्याचें अभिनंदन केलें. तेथें निराशेनें दुःखित होऊन रडत असलेल्या सुंदर राजकन्येस त्यानें पाहिलें. तो धीर पुरुष रात्रीं अग्नीनें दिलेलें खड्ग हातांत घेऊन जागत बसला. मध्यरात्रींच्या सुमारास ज्याचा उजवा हात तुटला आहे, असा एक घोर राक्षस डावा हात पसरून आंत येत आहे, असें त्यानें पाहिलें. 'पौंड्रवर्धन नगरांत मी ज्याचा हात तोडला तोच हा राक्षस आहे, आतां याचा नुसता हातच तोडून उपयोगी नाहीं. कारण तो पुनः दुसरीकडे पळून जाऊन, उपद्रव देऊं लागेल. यास्तव याला आतां येथें मारलेंच पाहिजे,' असा विचार करून त्यानें वेगानें जाऊन त्याचे केंस धरिले, आणि शिरच्छेद करण्यास हातांतील खड्ग वर उचलिलें. तेव्हां तो राक्षस दीनस्वरानें म्हणाला,–" हे महाबलवाना, मला मारूं नकोस. मजवर कृपा कर."–तेव्हां विदूषक म्हणाला–अरे दुष्टा, तू कोण आहेस व हें असें काय करतोस?

तुझें नांव काय ? त्यावर तो राक्षस म्हणाला,–" मी यमदंष्ट्र या नांवाचा राक्षस आहें. ही एक व पौंड्रवर्धन नगरांतील राजकन्या दुसरी, अशा या माझ्या दोन कन्या आहेत. अवीर पुरुषाशीं यांचा समागम होऊं नये, म्हणून शंकराच्या आज्ञेनें मी हें असें घातुक कर्म करीत होतों. एका वीरानें माझा हा उजवा हात पौंड्रवर्धन नगरांत तोडला व आज तूं मला जिंकलें आहेस. आतां माझें हें व्रत संपलें."–हें त्याचें भाषण ऐकून विदूषक हंसून म्हणाला, " पौंड्रवर्धनांत मींच तो तुझा हात तोडला." तेव्हां राक्षस म्हणाला–तर मग तूं देवांश आहेस. मनुष्य नव्हेस. मला वाटतें, कीं तुझ्यासाठींच शंकरानें हा मजवर आज्ञानुग्रह केला होता. तूं आतां माझा मित्र झाला आहेस. तूं जेव्हां माझें स्मरण करशील, तेव्हां मी संकटसमयींही तुझ्याजवळ येईन. असें सांगून व विदूषकाशीं मैत्री करून, तो राक्षस त्याच्या आज्ञेनें तेथेंच गुप्त झाला. त्यानंतर विदूषकानें राजकन्येसह आनदानें ती रात्र घालविली. प्रातःकाळीं राजाला तो वृत्तांत कळला; तेव्हां आनदित होऊन राजानें विदूषकाचा मोठा सत्कार केला, व त्याला, जणुं काय त्याच्या शौर्याची मुख्य ध्वजाच, अशी ती आपली कन्या पुष्कळ वैभवासह दिली. ती आपल्या पतीला सोडून एक पाऊलभरही दूर होत नसे. त्याच्या गुणांनींच जिचें आकर्षण केलें आहे, अशा साक्षात् लक्ष्मीसारख्या त्या राजकन्येशीं विलास करीत तो तेथेंच कांहीं दिवस राहिला. पण भद्रेचें प्रेम त्याला तेथें फार दिवस राहूं देईना. तेव्हां एकदां रात्रीं तो तेथून निसटला. ज्याला दिव्य रसाची गोडी लागली आहे, तो दुसऱ्या लौकिक रसांनीं कसा तृप्त होणार ?। असो; त्या नगरांतून बाहेर पडतांच त्यानें नुक्तीच मैत्री संपादन केलेल्या राक्षसाचें स्मरण केलें, त्याबरोबर हात जोडून पुढें आलेल्या राक्षसाला विदूषक म्हणाला,—"मित्रा, माझ्या प्रिय भद्रेला भेटण्याकरितां मला उदयाचलावरील सिद्धक्षेत्रांत जावयाचें आहे. तर तू मला तेथें घेऊन चल" तेव्हां 'बरें आहे' असें म्हणून व त्याला खांद्यावर बसवून तो राक्षस रातोरात साठ योजनें चालून गेला. तों त्यांना तेथें दुर्गम शीतोदा नदी लागली. उजाडल्यावर मनुष्यांस अलंघ्य असलेल्या त्या नदींतून राक्षस त्याला पार घेऊन गेला, व उदयपर्वतावर

। लब्धदिव्यरसास्वादः को हि रज्येद्रसान्तरे ।

पाचतांच ' वीरा, हाच समोरचा उदयपर्वत होय. याच्यावरील सिद्ध-ग्रामांत मला जातां येत नाहीं.'–असें सांगून तो त्याच्या आज्ञेनें गुप्त झाला. तेव्हां विदूषक एकटाच पुढें चालला. तों त्याला एक सुंदर सरोवर लागलें. तें जणुं काय भ्रमण करणाऱ्या भ्रमरांच्या गुंजारवानें आपलें स्वागतच करीत आहे, असें त्याला वाटलें. प्रफुल्लित कमलांच्या योगानें विराजमान झालेल्या त्या सरोवराच्या तीरीं तो बसला. तेथें त्याला स्त्रियांच्या पावलांची स्पष्ट उमटलेली लांबच लांब पंक्ति दिसली. ती जणुं काय, हा पहा तुझ्या प्रियेच्या गृहाचा मार्ग, असेंच त्याला सुचवीत होती. असो;–' मनुष्यांना हा पर्वत अलंघ्य आहे, यास्तव मी आतां अगोदर येथेंच कांहीं वेळ बसून रहातों. हीं पावलें कोणाचीं आहेत, हें तर आपण पाहूं या.'–असा विचार करून तो धीर पुरुष तेथेंच कांहीं वेळ बसला. तों तेथें दोघी चौघी अतिरम्य स्त्रिया पाणी नेण्याकरितां आल्या. सरोवरांत घागरी बुडवून त्या जाण्याच्या विचारांत आहेत, असें पाहून तो महाभाग विदूषक त्यांस मोठ्या नम्रतेनें म्हणाला,—"बायांनों, तुम्ही हें जल कोणाकरितां नेत आहां?" त्यावर त्या म्हणतात–बाबा, येथें या पर्वतावर भद्रा नांवाची एक विद्याधरी रहात असते. तिच्या स्नानाकरितां आम्ही हें जल नेत आहों· त्यांतील एक स्त्री म्हणाली,—" बाबा, मला एवढी घागर उचलायला लाग पाहू."–तें ऐकून त्या बुद्धिमानानें घागर उचलून देतांना आपली आंगठी त्यांत टाकली, व ती तिच्या खांद्यावर ठेविली. नंतर त्या सर्वजणी गेल्यावर तो पूर्वींप्रमाणें तेथेंच बसून राहिला. खरोखरच साहसी कर्मास आरंभ करणाऱ्या धीरांना विधाताच संतुष्ट होऊन साहाय्य करतो.*

इकडे त्या स्त्रिया जल आणून भद्रेला स्नान घालूं लागल्या. तों त्या घागरींतील मुद्रिका तिच्या मांडीवर पडली. मुद्रिका पहातांच भद्रेनें आपला प्रिय आला असावा, असें अनुमान करून ' तुम्हीं कोणी एकादा परका पुरुष आज पाहिला का ?' असें त्यांना विचारलें. तेव्हां त्यांतील एक स्त्री 'होय, आम्हीं आज एक तरुण मनुष्य सरोवराच्या कांठीं पाहिला खरा. त्यानेंच ही घागर उचलून दिली '–असें म्हणाली. तें ऐकतांच

* चित्रं धातैव धीराणामारब्धोद्दामकर्मणाम् ।
परितुष्येव सामग्रीं घटयत्युपयोगिनीम् ॥

आनंदित झालेल्या भद्रेनें—'स्नान घालून व वस्त्रभूषणें देऊन त्याला सत्वर येथेंच आणा, तोच माझा भर्ता होय,'—असें सांगितलें. त्याबरोबर त्या सर्व स्त्रिया सरोवराच्या कांठीं गेल्या. त्यांनीं त्याला तो वृत्तांत सांगितला. स्नान-भूषणादिकांच्या योगानें अलंकृत केलें, आणि त्याच्या प्रियेकडे आणिलें. सिद्धक्षेत्रांत जातांच जणु काय आपल्या धैर्यतरूची पक्व फलश्रीच, अशा त्या भद्रेला त्यानें डोळे भरून पाहिलें. तीही त्याच्या करितां अतिशय उत्कंठित झाली होती. आपला प्राणनाथ फार दुरून आला आहे, असें पहातांच तीही उठली. आनंदाश्रूंचें अर्घ्य देऊन, तिनें आपली भुजलतारूपी माळ त्याच्या गळ्यांत घातली. त्या दोघांनीं परस्परांस दृढ आलिंगन दिल्यामुळें, त्यांचा स्नेहच घामाच्या रूपानें बाहेर गळूं लागला. एकमेकांच्या अगदीं जवळ बसून जरी तीं एकमेकांस डोळ्यांचें पातें न हालवितां पहात होतीं, तरी त्यांची तृप्ति होईना. त्यांचो परस्परांविषयींची उत्कंठा अतिशय वाढली. असो; 'प्रिया, तुम्हीं इतके दूर कसे आलांत,' असें भद्रेनें विचारिलें असतां, 'प्रिये, काय सांगू ? तुझ्या स्नेहाचा आश्रय करून व अनेक प्राणसंकटांवर आरूढ होऊन मीं येथें आलों, दुसरें काय ?' असें तो म्हणाला. तें ऐकून व त्याचें तें निःसीम प्रेम पाहून ती म्हणाली—प्राणनाथ, तुम्हीं माझ्याकरितां आपल्या जीविताकडेही दुर्लक्ष केलेंत हें पाहून, मला या सख्या व येथील सिद्धीही तुच्छ वाटूं लागल्या आहेत. हे प्रभो, तुम्हीच माझे प्राण आहां. गुणांनीं विकत घेतलेली मी आपली दासी आहें.

भद्रेचें तें भाषण ऐकून विदूषक म्हणाला-प्रिये, असें जर असेल तर तूं हे सर्व दिव्यभोग सोडून उज्जयिनींत रहाण्याकरितां मजबरोबर चल. भद्रेनें तें त्याचें म्हणणें मान्य केलें, व सर्व दिव्यविद्या तृणाप्रमाणें सोडल्या. तेव्हां आनंदित झालेल्या विदूषकानें तिच्यासह ती रात्र तेथें काढून, प्रातःकाळीं प्रियेसह तो उदयाद्रीवरून खालीं आला. यमदंष्ट्राचें स्मरण करतांच तो जवळ आला. तेव्हां आपल्याला उज्जयिनीस कोणत्या मार्गानें जावयाचें आहे, हें त्याला सांगून व त्याच्या खांद्यावर प्रियेसह बसून विदूषक परत निघाला. प्रेमवश झालेल्या भद्रेनें तें अत्युग्र राक्षसस्कंधारोहणही सहन केलें. स्नेहपरवश झाल्यावर स्त्रिया काय न करतील!*

---

* अनुरागपरायत्ताः कुर्वते किं न योषितः ।

विदूषक मार्गक्रमानें कर्कोटक पुरांत आला. तेथें त्यानें आर्यवर्मराजापाशीं आपली भार्या मागितली. तेव्हां त्या राजानें आपल्या कन्येला आनंदानें त्याच्या स्वाधीन केलें. तिला घेऊन पूर्वीप्रमाणेंच राक्षसाच्या खांद्यावर बसून तो पुढें निघाला. समुद्राच्या तीरापर्यंत जाऊन पोंचल्यावर, समुद्रांत नौका सोडविण्याकरितां आपण उतरलों असतां, कृतघ्न वैश्यानें दोऱ्या तोडून आपला घात करण्याचा दुष्ट संकल्प कसा केला होता, तें त्याला आठवलें. त्याबरोबर त्या वैश्याकडे जाऊन त्यानें त्याच्या कन्येसह धनाचें हरण केलें. त्याचें धन घेणें हाच त्याचा वध आहे, असें वाटल्यामुळें त्या समर्थानें त्याला जिवंत सोडिलें; कारण कंजूष लोकांचें धनच प्राय: त्यांचे प्राण असतात.* त्यानंतर पुन: राक्षसावर बसून तो, भद्रा, राजकन्या व वैश्य-कन्या यांसह आकाशमार्गानें समुद्र तरून पौंड्रवर्धन नगरास आला, व त्या नगरांतील लोक मोठ्या आश्चर्यानें त्याच्याकडे पहात असतां राजगृहांत गेला. व आपल्या दीर्घ विरहानें अति उत्सुक झालेल्या भार्येचें त्यानें सांत्वन केलें. तिचा पिता देवसेन राजा आग्रह करीत होता, तरी उज्जयिनीस जाण्याविषयीं उत्सुक झालेला, तो विदूषक त्याच्या कन्येला घेऊन तेथून पुढें निघाला. शेवटीं अनेक देश ओलांडून तो धीरवीर राक्षसाच्या वेगानें लवकरच उज्जयिनीस पोंचला. राक्षसावर बसून चार स्त्रियांसह येत असलेल्या विदूषकाला पाहून, तेथील लोक विस्मित व भयभीत झाले. राजा आदित्यसेनाला हें वर्तमान कळतांच तो त्याला सामोरा आला. आपला श्वशुर, आपला सत्कार करण्याकरितां समोर येत आहे, असें पाहून विदूषक राक्षसावरून खालीं उतरला, व प्रणाम करून राजाजवळ गेला. राजानेंही त्याचें अभिनंदन केलें. नंतर त्या सर्व पत्नींस खालीं उतरून घेऊन व राक्षसास वाटेल तिकडे जावयास सांगून, तो विदूषक भार्यांसह श्वशुराबरोबर राजमंदिरांत गेला. लगलेंच अंत:पुरांत जाऊन त्यानें आपल्या पहिल्या प्रियेला आनंदित केलें. ती तर फार दिवसांपासून विरहदु:ख भोगीत होती.

पुढें एकदां या सर्व भार्या तुला कशा मिळाल्या व राक्षस कसा अनुकूल झाला, असें आदित्यसेनानें विचारिलें असतां, विदूषकानें त्याला पहिल्यापासून सर्व वर्तमान सांगितलें. त्याचा अद्भुत प्रभाव पाहून संतुष्ट

* कदर्याणां परे प्राणा: प्रायेण ह्यर्थसंचया: ।

झालेल्या त्या महीपालानें त्याला आपलें अर्धें राज्य दिलें. त्यामुळें तो विदूषक-ब्राह्मण, आपल्या अगाध शौर्यानें छत्र-चामर युक्त राजा झाला. त्यावेळीं उज्जयिनींत मोठा आनंदोत्सव होऊन, मंगलवाद्यादिकांचा एकच कोलाहल झाला. त्यानंतर आपल्या प्रभावानें सर्व पृथ्वी जिंकून, सर्व राजांस पूज्य झालेला तो, अतिप्रिय व परस्पर स्पर्धा न करणाऱ्या अशा आपल्या स्त्रियांशीं मोठ्या हर्षानें दीर्घ काल रममाण झाला. दैव अनुकूल असलें म्हणजे धीर पुरुषांचें धैर्यच लक्ष्मीस आकर्षण करून घेणारा मंत्र होतो.*

असो; वत्सराजानें सांगितलेली ही विचित्र कथा ऐकून तेथें बसलेले मंत्री व त्याच्या दोघी भार्या फार संतुष्ट झाल्या.

---

## तरंग ५ वा.

### १. वत्सराजाचें शंकराराधन.

एकदां यौगंधरायण वत्सेश्वरास म्हणाला,–"प्रभो, आपल्या पौरुषास दैव अनुकूल आहे; व आम्हीही नीतिशास्त्रास अनुसरून कांहीं थोडे श्रम केले आहेत. यास्तव आतां यथेच्छ दिग्विजयाविषयीं प्रयत्न करावा."–तें ऐकून राजा म्हणाला,–"खरें आहे, पण कल्याणकारक सिद्धी अनेक विघ्नांनीं भरलेल्या असतात.§ शुभ कार्यांत विघ्नें फार. यास्तव त्यांच्या निवारणार्थ मी अगोदर तप करून शंभूची आराधना करितों. त्याच्या प्रसादावांचून इष्टार्थसिद्धि होणार नाहीं."–हें त्याचें उत्तम भाषण ऐकून मंत्र्यांनीं त्यास आपली संमति दिली. त्यानंतर दोघी देवी व मंत्री यांसह तीन अहोरात्र उपोषण करून, अनन्य भक्तीनें चिंतन करणाऱ्या वत्सराजाला शंकरानें स्वप्नांत दर्शन दिलें, व म्हटलें, "वत्सा, मी संतुष्ट झालों आहें. तूं ऊठ, तुला निर्विघ्नपणें जय मिळेल. थोड्याच दिवसांत सर्व विद्याधरांचा ईश तुझा पुत्र होईल."–हा साक्षात्कार पहातांच तपाचे सर्व

---

* इत्यनुकूले दैवे भजति निजं सत्त्वमेव धीराणाम् ।
लक्ष्मीरभसाकर्षणसिद्धिमहामोहमन्त्रत्वम् ॥

§ अस्त्वेतद्बहुविघ्नास्तु सदा कल्याणसिद्धयः ।

क्लेश विसरून, राजा जागा झाला. प्रातःकाळीं स्वप्नवृत्तांत सांगून राजानें व्रतोपवास-क्लेशानें फुलाप्रमाणें कोमेजून गेलेल्या सुकुमार देवींस व मंत्र्यांस आनंदित केलें. त्याच दिवशीं व्रताची समाप्ति झाली. नंतर पूर्वजांप्रमाणेंच प्रभावशाली अशा त्या राजास यौगंधरायण म्हणाला,—"देव, आपण धन्य आहां; कारण आपल्यावर भगवान् शंकर प्रसन्न झाला आहे, यास्तव आतां पृथ्वीस जिंकून कुलक्रमानेंच प्राप्त झालेल्या लक्ष्मीचा उपभोग घ्या."-स्वधर्मानें संपादन केलेल्या लक्ष्मीचा* विनाश होत नाहीं. ती राजांच्या वंशांत स्थिर रहाते. फार दिवस भूमींत असलेलाही पूर्वजांचा धनसंचय आपल्याला एकाएकीं मिळाला कीं नाहीं? याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.

## २. देवदास वैश्याची कथा.

पूर्वी पाटलीपुत्र नगरांत देवदास नांवाचा एक महा श्रीमान् व महाकुलीन वैश्यपुत्र होता. त्यानें पौंड्रवर्धन नगरांतील कोणाएका समृद्ध वैश्याच्या कन्येशीं विवाह केला. कांहीं दिवसांनीं त्याचा बाप मेला, व स्वतंत्र झालेल्या देवदासानें व्यसनासक्त होऊन, आपलें सर्व धन जुगारींत गमावलें. तेव्हां त्याची भार्या दुःख व दारिद्र्य यांनीं पीडिली आहे, असें ऐकून तिच्या बापानें तिला आपल्या येथें नेलें. कांहीं दिवसांनीं विपत्तीनें ग्रासलेल्या देवदासालाही मोठा पश्चात्ताप होऊन, त्यानें आपला व्यापाराचा धंदा करण्याचें मनांत आणिलें; पण त्याच्याजवळ भांडवल नव्हतें. तें मागण्याकरितां तो आपल्या श्वशुराकडे गेला सायंकाळीं पौंड्रवर्धन नगरास पोंचल्यावर, आपलें शरीर धुळीनें लिप्त झालें आहे व आपलीं वस्त्रेंही मळकट आहेत, असें पाहून तो मनांत म्हणाला,—"मी असाच सासऱ्याच्या येथें कसा जाऊं? मानी पुरुषाला मरणही पतकरतें; पण आप्तापुढें दीन होणें पतकरत नाहीं."§ असो. असा विचार करून तो बाजारांत गेला, व तेथें एका दुकानाच्या बाहेर कमलाप्रमाणें संकुचित होऊन राहिला. कांहीं वेळानें त्याच दुकानांत कोणी एक तरुण पुरुष शिरला व त्याच्या मागोमाग पाय न वाजवितां आलेली एक स्त्री आंत गेली, असें

* निजधर्मार्जितानां हि विनाशो नास्ति संपदाम् ।

§ वरं हि मानिनो मृत्युर्न दैन्यं स्वजनाग्रतः ।

त्यानें पाहिलें. पण पुढें तो जों आंत डोकावून पहात आहे, तों तेथें मोठा दिवा तेवत असल्यामुळें, ती स्त्री आपलीच भार्या आहे, असें त्याला कळलें. मग काय विचारता; दुःख व संताप यांच्या योगानें त्याचें भान नाहींसें झालें. त्या दोघांचे आतांच प्राण घ्यावे असेंही त्याला वाटलें; पण यावेळीं आपण धनहीन आहों, तेव्हां असा अविचार करणें बरें नव्हे; कारण पुष्कळसें फुकट मिळालेलें धन असलें, म्हणजे खुनासारखे अपराधही पचवितां येतात. धनवानाला देवही वश होतात. धन हें एक मोठें बल आहे. धनहीन पुरुष आपल्या देहालाही संभाळूं शकत नाहीं. मग स्वभावतःच चंचल व केवल धनसाध्य भार्येला तो कसा संभाळणार!* इत्यादि अनेक विचार करीत तो बाहेर उभा राहिला. तों त्या दोघां तरुणांनीं आंत आपल्या दुष्ट कामनेस पूर्ण करून घेतलें, व त्यानंतर ती जारिणी आपल्या उपपतींशीं कांहीं बोलत आहे, असा त्याला भास झाला. म्हणून तो कान देऊन ऐकूं लागला. तेव्हां तिचे पुढील शब्द त्याच्या कानीं आले. प्रिया, मी आज एक रहस्य तुम्हाला सांगतें तें ऐका. मागें माझ्या पतीचा वीरवर्मा म्हणून एक पणजा होता. त्यानें आपल्या घराच्या अंगणाच्या चार कोपऱ्यांत चार सोन्यानें भरलेले घट पुरून ठेविले. व ती गुप्तवार्ता केवळ आपल्या भार्येला मात्र सांगून ठेविली. तिनें मरतांना आपल्या सुनेला ती गुप्त गोष्ट सांगितली. तिनेंही मरतांना आपल्या सुनेला म्हणजे माझ्या सासूला तें सांगून ठेविलें. माझी सासूही दोन तीन वर्षांपूर्वी मेली. तेव्हां तिनें ती गुह्य गोष्ट मला सांगून ठेविली आहे; पण मी ती वार्ता माझ्या व्यसनी व दरिद्री पतीला सांगितली नाहीं; कारण तो मला आवडत नाहीं. तूं माझा प्राणप्रिय आहेस, यास्तव तूं तेथें जा. माझ्या पतीपासून तें घर तो मागेल ती किंमत देऊन, विकत घे. तें विपुल द्रव्य खणून काढ व येथें ये, आणि सुखानें माझा उपभोग घे.

हें तिचें भाषण ऐकून तो पापी वैश्य फार संतुष्ट झाला, व तो निधि प्रयत्नावांचूनच आपल्या हातीं लागला आहे, असें समजूं लागला; पण बाहेरून ऐकत असलेल्या देवदासाच्या हृदयास त्या पापीणीचे ते शब्द शल्यासारखे टोंचूं लागले. पण सुदैवानें वडिलार्जित धन मिळण्याची

---

* धनहीनेन देहोऽपि हार्यते स्त्रीषु का कथा ।

आशा वाटल्यामुळें, तो तसाच रातोरात तेथून परतला. पाटलीपुत्र नगरास पोचतांच आपल्या घरीं जाऊन त्यानें तें धन काढून घेतलें.

कांहीं दिवसांनीं तो जार वैश्यही व्यापाराच्या मिषानें तेथें आला. धनलुब्धानें देवदासापाशीं त्याचें घर विकत मागितलें. तेव्हां त्यानेंही पुष्कळ किंमतीला तें वडिलार्जित घर विकून आपल्यासाठीं दुसरें नवें घर बांधलें, व सासऱ्याच्या येथून भार्येला आणिलें. तिकडे जारानें त्या गृहाचीं सर्व अंगणें खणून पाहिलीं; पण निधि मिळेना तेव्हां मोठ्या दु:खानें त्यानें देवदासाकडे येऊन म्हटलें,–" हें तुझें घर फार जुनें आहे तें मला आवडत नाहीं. यास्तव माझें द्रव्य परत देऊन तूं तें आपलें घर घे "–पण देवदास त्या गोष्टीस कबूल होईना. तेव्हां दोघांचा मोठा कलह लागला. तो न्याय, राजापर्यंत गेला. तेव्हां देवदासानें विषासारखा दु:सह असलेला तो आपल्या भार्येचा वृत्तांत राजाला सांगितला, तेव्हां राजानें त्याच्या भार्येला आणून, सत्यार्थ समजून घेऊन, त्या परस्त्रीगामी वैश्याला कडक शिक्षा केली, व त्याचें सर्वस्व हरण केलें. देवदासानेंही त्या भार्येचें नाक कापून दुसरा विवाह केला, आणि पैतृक धन मिळाल्यामुळें व व्यसनें सोडून नीतिमान् झाल्यामुळें त्याचा काल सुखानें गेला.

सारांश धर्मानें मिळविलेली संपत्ति याप्रमाणें पिढ्यान पिढ्या टिकते; पण अधर्मानें मिळविलेलें वित्त थोड्या दिवसांतच नष्ट होतें.* यास्तव धर्मानें धनार्जन करण्याचा प्रयत्न करावा. राजानें तर हें तत्त्व विशेषें करून ध्यानांत ठेविलें पाहिजे; कारण धनच राज्यवृक्षाचें मूळ आहे. यास्तव प्रभो, "सर्व मंत्रिमंडळास संतुष्ट करून, सिद्धीकरितां त्यांचा यथाविधि सन्मान करून धर्मानें संपत्ति मिळविण्याकरितां दिग्विजय करा. दोन श्वशुर अनुकूल असल्यामुळें पुष्कळसे राजे तुम्हाला आपोआप वश होतील; पण वाराणसीचा जो हा ब्रह्मदत्त नामक राजा आहे, तो आमचा नित्य शत्रु आहे. त्यालाच अगोदर जिंकलें पाहिजे. त्याला एकदां जिंकल्यावर पूर्व, दक्षिण इत्यादि इतर दिशा सहज जिंकतां येतील. अशा रीतीनें दिग्विजय केल्यास पांडूचें यश:कमल पुन: उज्ज्वल केल्याप्रमाणें होईल." यौगंधरायणाचें तें भाषण ऐकून वत्सराजानें प्रयाणाची तयारी करावयास सांगितलें. त्या मुनी-

* इत्थं धर्मार्जिता लक्ष्मीरासंतत्यनपायिनी। इतरा तु जलापाततुषारकणनश्वरी ॥

तिश राजानें श्वशुरपुत्र गोपालकास, त्याच्या सन्मानाकरितां वैदेहराज्य दिलें. आपल्या सर्व सैन्यासह सहाय करण्याकरितां आलेल्या पद्मावतीच्या सिंहवर्म भ्रात्यास त्याच्या सत्कार्याकरितां चेदिराज्य दिलें. त्यानंतर पावसाळा जसा मेघांच्या योगानें दिशांस व्यापून सोडतो, त्याप्रमाणें आपल्या सैन्याच्या योगानें दिशांस व्यापणाऱ्या आपल्या पुलिंद नामक भिल्लराज मित्रास त्यानें आणविलें. त्याच्या राष्ट्रांत प्रयाणाकरितां अशी मोठी गडबड उडाली आहे, असें ऐकून शत्रूंचीं हृदयें थरथर कांपूं लागलीं. यौगंधरायणानें ब्रह्मदत्ताची हालचाल जाणण्याच्या इच्छेनें वाराणसीस अगोदरच हेर पाठविले. नंतर वत्सराज शुभ दिवशीं जयसुचविणारीं शुभ चिन्हें होत आहेत, असें पाहून आनंदानें निघाला. ज्यांच्यावरील एकच वृक्ष प्रफुल्लित झाला आहे, अशा पर्वताप्रमाणें शुभ्र-छत्रयुक्त विजय गजावर आरूढ होऊन, मदोन्मत्त गजेंद्रासारखा तो राजा, प्रथम पूर्व दिशेंतील ब्रह्मदत्तावर चालून जाऊं लागला. तेव्हां जणुंकाय सिद्धीची दूतीच अशा *शरदेनें अतिसुंदर व थोडया पाण्याचा मार्ग त्याला दाखविला. त्याच्या घोष करणाऱ्या सैन्याच्या योगानें भूतल वर्षकाला-प्रमाणें व्याकुल झालें. सैन्य-घोषाच्या प्रतिध्वनीनें नादित झालेल्या दिशा जणुं काय एकमेकींस तें ओढवलेलें भयच सांगत होत्या. सैन्याच्या अलंकारांनीं भूषित केलेले व त्यामुळेंच सूर्यासारखे चमकणारे त्याचे घोडे नीराजनविधीनें संतुष्ट झालेल्या अग्नीचें अनुकरण करीत असल्याप्रमाणें चालूं लागले. शुभ्र चामरांच्या योगानें ज्यांचे कर्ण अलंकृत केले आहेत, व गंडस्थलावरील गळणाऱ्या शेंदूराच्या योगानें ज्यांचें मदजल लाल झालें आहे, असे त्याचे हत्ती, भयभीत झालेल्या पर्वतांनीं वत्सराजाच्या या यात्रेबरोबर जाण्याकरितां पाठविलेल्या ज्यांच्या शिखरांवर शरदृतूंतील पांढरे मेघ येऊन राहिले आहेत, व त्यांच्या अंगावरून गेरूचा रस वहात आहे, अशा त्यांच्या अपत्यांप्रमाणेंच दिसत होते. या राजाला दुसऱ्याचें उर्जित तेज सहन होत नसतें, हें जाणूनच जणुं काय सूर्यानें आपलें तेज भूमीवरील रेणूंनीं झांकून घेतलें. राजाबरोबर जाणाऱ्या त्या दोघी देवी नीति व गुण यांच्या योगानें आकर्षण करून घेतलेल्या साक्षात् कीर्ति व जयश्री यांप्रमाणेंच दिसल्या. वायूच्या योगानें खालीं व वर फड-

*शरत् हा ऋतुवाची शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी आहे.

फडकणाऱ्या त्याच्या सैन्यपताकांनीं 'याच्या पुढें नम्र व्हा, किंवा पळा' असें शत्रूंना सुचविलें. याप्रमाणें तो राजा चतुरंग सैन्यासह चोहोंकडे शरत्कालीन फुललेल्या शुभ्र कमलांनीं व्याप्त असलेल्या दिग्भागांस, जणुं काय आपल्या यशानेंच व्याप्त असल्याप्रमाणें पहात, वेगानें चालला.

इतक्यांत यौगंधरायणानें पाठविलेले हेर, कापालिक-व्रत व वेष धरून वाराणशीस येऊन पोंचले. त्यांतील एक मोठा सोंगाड्या होता. तो, आपण मोठे ज्ञानी आहों असें दाखवून गुरु झाला, व बाकीचे त्याचे चेले होऊन त्याच्या सांगण्याप्रमाणें चालूं लागले. शिष्यांनीं, भिक्षा मागून निर्वाह करणाऱ्या त्या गुरूची मोठी प्रसिद्धि करण्याचा क्रम चालविला. 'हा आमचा आचार्य मोठा ज्ञानी आहे, तो तिन्ही काळच्या गोष्टी सांगतो,' इत्यादि सांगून त्यांनीं पुष्कळ नास्तिकांनाही त्याच्या नादीं लाविलें.' तो ज्ञानी जें जें कांहीं—' तुझें घर जळेल; तुझें शेत चोर कापून नेतील, अमुक अमुक दिवशीं घर फोडतील '—इत्यादि सांगत असे, तें तें सर्व तसेंच त्याचे शिष्य घडवून आणीत. त्यामुळें त्या महंताची मोठी ख्याति झाली. असें होतां होतां त्या कपटाचार्यानें क्षुद्र सिद्धीनें एका राजपुत्राचें चित्त रंजन करून, त्याला आपला भक्त केलें. त्यामुळें वत्स राजाशीं संग्राम करण्याचा प्रसंग आला असतां, शुभाशुभ विचारणाऱ्या ब्रह्मदत्त राजाचा तो रहस्यज्ञ झाला. त्या राजाचा योगकरंडक म्हणून एक मंत्री होता. त्यानें चाल करून येत असलेल्या वत्सेश्वराच्या मार्गांत अनेक कपटप्रयोग केले. विषादि द्रव्यांची योजना करून वृक्ष, वेली, जलाशय व तृण यांस त्यानें दूषित करविलें. सैन्यामध्यें विषप्रयोग करणाऱ्या वेश्या पाठविल्या, व रात्रीं मोठमोठ्या लोकांस मारण्याकरितां मारेकरी धाडले; पण तें सर्व त्या ज्ञानी महंतानें आपल्या शिष्यांच्या द्वारा लागलेंच यौगंधरायणास कळविलें. त्याबरोबर त्या महामंत्र्यानें प्रत्येक ठिकाणचें दूषित तृणादि उलट उपायांनीं शुद्ध केलें. सैन्यांतील कोणीही वीरानें अनोळखी स्त्रीशीं भाषणही करूं नये, अशी सर्वांस ताकीद केली, आणि रुमण्वानाच्या सहायानें त्यानें त्या मारेकऱ्यांस पकडून मारिलें. तेव्हां वत्सराजानें आपल्या सर्व कपटउपायांचा प्रतीकार केला आहे, असें जाणून व त्याच्या सैन्यानें सर्व दिशा भरून टाकल्या आहेत असें ऐकून, ब्रह्मदत्तास तो शत्रु दुर्जय आहेसें वाटलें. तेव्हां

आपल्या मंत्र्याशीं चांगला मंत्र करून व पुढें दूत पाठवून, मागून तो स्वतः हात जोडून वत्सेश्वराजवळ गेला. तेव्हां योग्य भेट (नजराणा) देऊन व नम्र होऊन, समीप आलेल्या ब्रह्मदत्ताचा वत्सराजानें मोठ्या प्रेमानें सत्कार केला. शूर नेहमीं प्रणामप्रिय असतात.*

याप्रमाणें त्या मुख्य विरोधी राजास जिंकून तो शूर वायूप्रमाणें, मृदु राजांस नमवीत व कठिनांचें उन्मूलन करीत, वंगदेशास जिंकल्यामुळें भयभीत झाल्याप्रमाणें, तरंगाच्या योगानें कांपत असलेल्या पूर्व सागरास येऊन पोंचला. त्याच्या तटावर त्यानें पाताळांतून अभय मागण्याकरितां आलेल्या नागराजासारखाच विजयस्तंभ उभारला. त्यानंतर कलिंग देशांतील राजांनीं नम्र होऊन व पुढें जाऊन त्याला कर दिला असतां, त्या यशस्वी राजाचें यश महेंद्र पर्वतावर आरूढ झालें. तेथील राजांनीं भेटीखातर दिलेले गज, भिऊन आलेल्या विंध्याद्रीच्या कूटाप्रमाणेंच त्याच्या मागून चालले असतां, तो दक्षिण दिशेस गेला. तेथें शरत्काल, जसा मेघांस जल रहित व त्यामुळेंच शुभ्रवर्ण, गर्जना रहित व पर्वतांचा आश्रय धरून रहाणारे करितो, त्याप्रमाणें त्यानें शत्रूंस द्रव्यरहित व त्यामुळेंच निस्तेज, 'मी असें करीन तसें करीन' इत्यादि गर्जनारहित व पर्वताचा आश्रय करणारे केलें. त्याचें चतुरंग सैन्य अस्ताव्यस्त रीतीनें कावेरीचें उल्लंघन जेव्हां करूं लागलें, तेव्हां त्या नदीचें जल व तेथील चोल राजाचें यश हीं दोन्हीं मलिन झालीं. वत्सराजास मुरला नदीच्या कांठच्या लोकांचें मस्तक थोडेसेंही वर उचललेलें सहन झालें नाहीं. त्याच्या गजांनीं सात मार्गांनीं पृथक् होऊन वहाणारें गोदावरीचें जें जल प्यालें होतें, तें मदाच्या मिषानें त्यांनीं जणुं काय सात मार्गांनींच सोडलें. असो, या प्रमाणें दक्षिण देशाचा विजय करून वत्सेश रेवा (नर्मदा) नदीचें उल्लंघन केल्यावर उज्जयिनीस गेला, व चंडमहासेनानें सत्कार केला असतां तो राजा त्या नगरींत शिरला. त्यावेळीं त्याला पहाण्याकरितां वेगानें आल्याकारणानें ज्यांचे बुचडे सैल होऊन शोभा दुप्पट आली आहे, अशा मालव देशांतील तरुण स्त्रियांच्या कटाक्षाचें तो एकच लक्ष्य झाला. तेथें श्वशुरानें मोठा सत्कार केल्यामुळें तो इतक्या आनंदानें राहिला, कीं त्याला स्वदेशांतील अत्यंत इष्ट भोगांचेंही विसरण पडलें.

* शूरा हि प्रणतिप्रियाः ।

वासवदत्ता त्यावेळीं परम सुख भोगीत होती, व ती आपल्या पित्याच्या जवळच होती. तथापि बाळपणाची आठवण झाल्यामुळें थोडीशी उद्विग्न झाली. राजा चंडमहासेन त्या आपल्या प्रिय कन्येप्रमाणेंच पद्मावतीच्या सहवासानें अतिशय संतुष्ट झाला. असो, अशा आनंदावस्थेंत कांहीं दिवस तेथें राहून तो प्रसन्न मनानें श्वशुराच्या सैन्यासह पश्चिमेस निघाला. खरोखर त्याची असिलता ( तरवार ) म्हणजे प्रतापाग्नीचा धूमच होय. कारण तिनें लाट देशांतील स्त्रियांच्या नेत्रांस लाल व साश्रु केलें. हा राजा खचित मला उपटून पुनः समुद्रमंथन करणार, असें समजून त्याच्या गजांनीं वनांस हालविलें असतां, मंदर पर्वत थरथर कापूं लागला. खरोखर सूर्य व चंद्र यांहून निराळा असा हा तिसराच कोणी तेजस्वी उदयन पश्चिमेंत उगवला आहे, असें तेथील लोक समजूं लागले. त्या दिशेंतील राजांना पूर्णपणें जिंकल्यावर तो उत्तर दिशेस गेला. तेथें सिंधु देशच्या राजास जिंकल्यावर राघवानें वानरांच्या साहाय्यानें जसें राक्षसांस जिंकलें. त्याप्रमाणें त्यानें पुलिंदांच्या भिल्लांच्या साह्यानें म्लेच्छांस स्ववश केलें. त्यामुळें क्षुब्ध सागराच्या मोठाल्या लाटांप्रमाणें तुर्की घोड्यांचे समूह त्याच्या प्रत्येक सैन्यांत दिसूं लागले. त्यानंतर ज्यानें शत्रूंपासून कर घेतला आहे, अशा श्रीमान् वत्सराजानें, पुरुषोत्तमानें जसा पापी राहूचा, त्याप्रमाणें पापी पारसीक राजाचा शिरच्छेद केला. पुढें हूणांस जिंकणाऱ्या त्या राजाची चारी दिशांत आबालवृद्धांच्या तोंडीं झालेली कीर्ति हिमालयावर गंगेप्रमाणें संचार करूं लागली. त्याची सेना सिंहनाद करूं लागली असतां, शत्रु भयभीत होत असत. त्यामुळें त्यांचा प्रतिसिंहनाद आजवर कधीं ऐकूं आला नाहीं. पण हिमालयाच्या गुहांतून निघणारा प्रतिध्वनि त्यानें तेथें प्रथमच प्रतिसिंहनादासारखा ऐकला. कामरूपेश्वर, मस्तकावरील छत्र काढून नम्र झाला, व त्या लज्जावह कर्मामुळें निस्तेज दिसूं लागला; पण त्यांत आश्चर्य मुळींच नाहीं. त्यानें दिलेल्या हत्तीसह वत्सराज तेथून परतला. याप्रमाणें सर्व पृथ्वीस जिंकून चतुरंग सेनेसह वत्सराज पद्मावतीच्या पित्याच्या म्हणजे मगध राजाच्या नगरास आला. तेव्हां तो राजाही दोघी देवींसह आलेल्या त्या आपल्या विजयी जामातास पाहून अतिशय संतुष्ट झाला. पूर्वीं एकदां गुप्तपणें राहून गेलेल्या व आतां आपल्या येथें उघड उघड

येऊन राहिलेल्या वासवदत्तेला तो अधिक विश्वासपात्र समजूं लागला. शेवटीं मगधराजानें ज्याची उत्तम पूजा केली आहे, असा तो सार्वभौम राजा वत्सेश्वर, प्रेमानें भेटावयास आलेल्या आपल्या नागरिकांसह सैन्य-भरानें पृथ्वीस कांपवीत, आपल्या लावाणक देशास गेला.

---

## तरंग ६ वा.

---

त्यानंतर तो राजा सैन्यास विश्रांति मिळावी म्हणून लावाणक देशांतच कांहीं दिवस राहिला असतां, एकदां एकांतांत यौगंधरायणास म्हणाला "प्रिय मंत्रिवर्य, तुझ्या बुद्धिसामर्थ्यानेंच मी पृथ्वीतील सर्व राजे जिंकले. त्यांतील ब्रह्मदत्तावांचून दुसरा कोणी बदलेल किंवा आपल्यावर उलटेल असें वाटत नाहीं. हा वाराणसीपति मात्र दुरात्मा आहे. कुटिलांचा काय विश्वास!"—तें ऐकून यौगंधरायण म्हणाला—राजन्, ब्रह्मदत्त आतां आपल्याशीं वैर करणार नाहीं; कारण आक्रमण करून शरण आलेल्या त्याचा आपण फार मोठा सत्कार केला आहे. तेव्हां कोणता शहाणा शुभ आचरण करणाराशीं अशुभ वर्तन करील? व अशांशींही जर कोणी दुष्ट विरोध करूं लागला, तर त्याचें अकल्याण आपोआपच होईल. याविषयीं मी एक गोष्ट सांगतों.—

### १. फलभूतीची कथा.

पूर्वी पद्माख्य देशांत अग्निदत्त नामक कोणी एक ख्यातिमान् द्विजोत्तम होता. तो राजानें दिलेल्या अग्रहारावर आपला निर्वाह करीत असे. त्याला दोन पुत्र होते. त्यांतील वडील पुत्राचें नांव सोमदत्त व धाकट्याचें वैश्वानर. सोमदत्त देखणा होता खरा, पण मूर्ख व उद्धट होता. त्याचा धाकटा भाऊ विद्वान् व नम्र असे. त्यांचे विवाह झाले. नंतर पिता परलोकवासी झाला. तेव्हां त्यांनीं त्यांची मालमत्ता अर्धी अर्धी वांटून घेतली. कनिष्ठ भ्राता विद्वत्तेमुळें राजमान्य झाला, व चपल सोमदत्त शेती करूं लागला. एकदां तो शूद्राशीं गोष्टी सांगत बसला असतां त्याला त्याच्या बापाच्या एका आप्तानें पाहिलें. तेव्हां तो म्हणाला—अरे मूर्खा, अग्निदत्ताचा पुत्र होऊन तू असा शूद्रासारखा कां वागतोस?

तुझ्या कनिष्ठ भ्रात्याचा राजा केवढा सत्कार करीत असतो, पण त्याचीही तुला लाज वाटत नाहीं! तें हितकर पण कटु वचन ऐकून रागावलेला सोमदत्त मर्यादा सोडून, त्या ब्राह्मणाच्या अंगावर धांवून गेला व त्यानें त्याला लाथही मारली. तेव्हां तेथल्याच इतर ब्राह्मणांस साक्षी ठेवून तो अपमान पावलेला ब्राह्मण राजाकडे फिर्याद घेऊन गेला. राजानें त्याचें गाऱ्हाणें ऐकून सोमदत्तास बांधून आणण्याकरितां आपले लोक पाठविले. पण सोमदत्ताच्या सशस्त्र मित्रांनीं राजपुरुषांस मारलें. तें ऐकून तर राजाला फारच कोप आला. त्यानें कांहीं सशस्त्र लोक पाठवून व त्याला धरून आणवून सुळावर चढविण्याची आज्ञा दिली. पण राजाचे मांग त्याला सुळीं देत असतांना, कोणी ढकलून दिल्याप्रमाणें तो भूमीवर पडला. दैव अनुकूल असल्यास प्राणी महामृत्यूच्या दाढेंतूनही सुटतो, म्हणून म्हणतात ते खोटें नव्हे. कारण ते मारेकरी त्याला पुन: सुळावर चढवूं लागले असतां आंधळे झाले. इतक्यांत भ्रातृशोकानें व्याकुळ झालेल्या वैश्वानरानें राजाची प्रार्थना करून त्याला जीवदान देवविलें; पण याप्रमाणें राजानें ज्याचा अपमान केला आहे, असा तो सोमदत्त अत्यंत संतप्त होऊन आपल्या आप्तांसह देशांतरास जाण्याचें मनांत आणूं लागला. परंतु इतर लोक त्या गोष्टीस अनुकूल होईनात. तेव्हां राजाच्या अग्रहाराची अर्धी वृत्ति सोडून देऊन तो तेथेंच राहिला.

पण निर्वाहाचें साधनच नाहींसें झाल्यामुळें त्याला शेती करण्यावांचून गत्यंतर नव्हतें. म्हणून शुभ दिवशीं तो योग्य भूमि पहाण्याकरितां अरण्यांत गेला. तेथें त्यानें धान्य चांगलें उगविण्यासारखी एक शुभ भूमि पाहिली. तिच्या मध्यभागीं एक मोठा अश्वत्थ वृक्ष होता. त्याच्या छायेंत गेल्यावर सूर्यही शीतल भासूं लागल्यामुळें शेताची इच्छा करणाऱ्या त्याला तो वृक्ष वर्षाकालप्रमाणें मोठा आनंददायी वाटला. या वृक्षाचा जो अधिष्ठाता असेल त्याचाच मी भक्त आहें, असें म्हणून त्यानें त्या पिंपळास प्रदक्षिणा घालून नमस्कार केला, स्वस्त्ययन केलें, त्या झाडाखालीं बळि ठेविला, व नांगर जोडून भूमि नांगरूं लागला. तो अहोरात्र त्या झाडाखालींच राहूं लागला. त्याची भार्या त्याला भोजनादिक तेथेंच पोंचवीत असे. पण तें त्याचें शेत चांगलें पिकलें असतां, एकदां दैववशात् परराष्ट्रांतील लोकांनीं येऊन तें निःशंकपणें लुटलें.

तेव्हां प्रायः सर्व धान्य नष्ट झालें असतां, कपाळाला हात लावून रडत बसलेल्या भार्येला, अवशिष्ट धान्य देऊन व तिचें समाधान करून तो धीर पुरुष पुनः पूर्ववत् झाडाखालीं बळि ठेवून तेथेंच शेती करूं लागला. आपत्कालीं अधिक दृढ होणें हा धीरांचा स्वभावच आहे.*

एकदां तो एकटाच चिंतेमुळें झोंपेवांचून झाडाखालीं तळमळत पडला असतां, पुढीलप्रमाणें आकाशवाणी झाली.—"सोमदत्ता, तुझ्या निश्चयानें मी संतुष्ट झालों आहें. तूं आदित्यप्रभ नामक राजाच्या श्रीकंठ देशास जा. त्या राजाच्या द्वारांत तू संध्या–अग्निहोत्र-मंत्र म्हणून असें बोल—मी फल-भूति नामक ब्राह्मण आहें. माझें वचन ऐका. शुभ आचरण करणाराचें शुभ होतें व अशुभ करणाराचें अशुभ होतें.† असें बोललास म्हणजे तुला तेथें पुष्कळ धन मिळेल. संध्या व अग्निहोत्र यांचे मंत्र तूं मजपासूनच आतां शीख. मी येथें रहाणारा एक यक्ष आहें."—असें सांगून त्यानें त्याला स्वप्रभावानें मंत्र शिकविले. त्यानंतर यक्षानें दिलेलें फलभूति हें नांव धारण करणारा तो भार्येसह तेथून निघाला. मार्गानें जातां जातां वारंवार येणाऱ्या दुर्दशांप्रमाणें कठिण अरण्याचें उल्लंघन करून तो श्रीकंठ-देशास पोंचला. तेथें राजद्वारांत यक्षानें सांगितल्याप्रमाणें संध्या-अग्निहोत्रमंत्र म्हणून व आपलें फलभूति, असें नांव सांगून—शुभ करणारांचें शुभ होतें व अशुभ करणारांचें अशुभ होतें,—हें लोकांच्या मनांत कौतुक उत्पन्न करणारें वाक्य वारंवार बोलूं लागला. तेव्हां राजालाही आश्चर्य वाटलें, व त्यानें त्याला आपल्याजवळ बोलाविलें. तेथेंही तो वारंवार तसेंच बोलूं लागला, तेव्हां राजा आपल्या अनुचरांसह हंसूं लागला. त्यानें त्याला वस्त्रें आभरणें व ग्राम दिले. कारण मोठे लोक व्यर्थ संतुष्ट होत नसतात.‡ सारांश याप्रमाणें तो फलभूति यक्षप्रसादानें श्रीमान् झाला. राजानें दिलेल्या ऐश्वर्यामुळें त्याचें दारिद्र्य-दुःख नाहींसें झालें. वर सांगितल्याप्रमाणें वाक्य वारंवार म्हणणारा तो राजास प्रिय झाला. कारण प्रभूंचें मन विनोदरसिक§ असतें. पुढें

* निसर्गः स हि धीराणां यदापद्यधिकं दृढाः ।

† भद्रकृत्प्राप्नुयाद्भद्रमभद्रं चाप्यभद्रकृत् ।

‡ न तोषो महतां मृषा ।

§ ... ईश्वराणां हि विनोदरसिकं मनः ।

त्या राजगृहांत, अंत:पुरांत व राष्ट्रांत तो राजवल्लभ आहे, अशी त्याची कीर्ति झाली, व त्याला मोठा मान मिळूं लागला.

एकदां तो आदित्यप्रभ राजा मृगयेहून एकाएकीं परत आला व अंत:पुरांत शिरला. तेव्हां द्वारपालांची गडबड उडाली. ती पाहून राजाला शंका आली आणि तो आंत जाऊन पाहूं लागला, तों त्याला आपपली राणी कुवलयावली देवपूजनांत व्यग्र आहे, असें त्याला आढळलें. त्यावेळीं ती दिगंबर होती. तिचे केंस वर उंच उभारले होते. तिनें आपले नेत्र अर्धे मिटले होते. शेंदुराचा स्थूल तिलक लाविला होता. जप करीत असल्यामुळें तिचा अधर-ओष्ठ हालत होता. विचित्र रंगांनीं काढलेल्या मंडलामध्यें ती उभी होती. रक्त, नरमांस व मद्य यांचा तिनें उग्र बलि तयार केला होता. पण राजा आला आहे, असें पहातांच झटकन तिनें आपलें वस्त्र नेसलें व 'हें काय आहे,' असें राजानें डोळे वटारून विचारलें असतां, 'अभय द्या' अशी हात जोडून, प्रार्थना करून ती म्हणाली, "प्रभो, आपल्याच अभ्युदयाकरितां मी हें व्रत करीत आहें. हें व्रत मला कसें मिळालें व याची फलसिद्धि कोणती होणार आहे, तें मी सांगतें; ऐका."

## २. कालरात्रीची उपकथा.

पूर्वी मी कन्या-दशेंत पित्याच्या येथें असतांना एकदां वसंतोत्सव प्रसंगीं उद्यानांत गेलें. तेव्हां माझ्या सख्या मला म्हणाल्या,-"भर्तृदारिके, या उद्यानांतील वृक्षमंडळामध्यें वरद विनायक देव आहे. त्याचा प्रभाव साक्षात् दिसतो. यास्तव त्याच्याजवळ जाऊन इष्ट फल देणाऱ्या त्याची तूं भक्तीनें पूजा कर. म्हणजे लवकरच तुला योग्य पति मिळेल."-तें ऐकून मी भोळेपणानें त्यांस विचारलें, "सख्यानों, काय म्हणतां, विनायकाच्या पूजनानें कन्यांना योग्य पति मिळतो" तेव्हां त्या म्हणाल्या,-"अग हो, त्याची पूजा केल्यावांचून कोणाला कोणतीच सिद्धि मिळत नाहीं. त्याचा प्रभाव आम्हीं सांगतों तो ऐक."-असें बोलून त्यांनीं मला पुढील कथा सांगितली.

## विनायकाचें माहात्म्य.

पूर्वी तारकासुरानें इंद्राला मोठा उपद्रव दिला असतां, इंद्र, शंकराचा पुत्र आपला सेनापति कसा होईल, या विचारांत पडला. त्याच प्रसंगीं

काम देवाला शंकरानें जाळलें व तो उर्ध्वरेता उग्र तप करीत राहिला; पण गौरीनेंही दीर्घतप करून त्याला प्राप्त करून घेतलें, व आपल्याला पुत्र व्हावा आणि मदनाला देह मिळावा, अशी प्रार्थना केली. पण तो आपला मनोरथ पूर्ण व्हावा म्हणून तिनें विघ्नेश्वराचें पूजन केलें नाहीं. आपलें इष्ट सिद्ध व्हावें, अशी इच्छा करणाऱ्या गौरीला हर म्हणाला,-"प्रिये, हा काम पूर्वी प्रजापतीच्या मानसापासून उत्पन्न झाला; पण उत्पन्न होतांच तो मदानें 'कं दर्पयामि म्ह० मी कोणाला दर्पयुक्त करूं?' असें म्हणूं लागला. म्हणून प्रजापतीनें कंदर्प असेंच त्याचें नांव ठेविलें. तो त्यास म्हणाला-" पुत्रा तूं फार दृप्त ( मस्त ) आहेस, पण सभाळ, शंकरापासून आपलें रक्षण कर, नाहीं तर तो तुला मारून टाकील.'' त्याच्या पित्यानें पूर्वीच त्याला असें बजावून ठेविलें असतां, तो दुरात्मा मला पराभूत करावयास आला व मी त्याला जाळलें. तेव्हां आतां त्याचा पुनः उद्भव कसा होणार? मी आपल्या प्रभावानेंच तुझ्या पुत्राला उत्पन्न करितों. सामान्य जनां-प्रमाणेंच मदनोत्साह-जनित प्रजा मला होणार नाहीं."-शंकर इतकें सांगत आहेत तोंच ब्रह्मदेव इंद्रासह तेथें आला. त्या दोघांनीं त्याची पुष्कळ स्तुति केली, तेव्हां प्रसन्न झालेल्या भगवान् भवानें तारकासुर ना-शार्थ देवीच्या ठायीं पुत्र उत्पन्न करण्याकरितां, कामानें देहधारी प्राण्याच्या मनांत उत्पन्न व्हावें, असें आपलें अनुमोदन दिलें; व त्यानें आपल्या चित्तांतही त्याला अवकाश दिला. त्यामुळें इंद्रासह ब्रह्मा संतुष्ट होऊन स्वलोकीं गेला, व देवीही आनंदित झाली.

कांहीं कालानें शंकर उमेशीं सुरत क्रीडा करूं लागला. शेंकडों वर्षे गेलीं तरी त्यांची क्रीडा संपेना. त्यांच्या उपमर्दानें त्रिभुवन कांपूं लागलें. तेव्हां जगाच्या शांतीकरितां ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें देव शंकराच्या रतांत विघ्न करण्यास्तव वैश्वानराचें स्मरण करूं लागले. तेव्हां स्मरण करतांच देवांकडे आलेल्या अग्नीनें मदनांतक दुर्धर्ष आहे, असा विचार करून, त्याच्याकडे न जाण्याचें ठरविलें, व देवांनीं पुनः त्रास देऊं नये म्हणून तो जलांत जाऊन लपला. पण जलचर बेडकांस अग्नीचें तेज असह्य झालें, व त्यांनीं हुडकणाऱ्या देवांस-' हा पहा अग्नि येथें आहे '-असें सांगितलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या अग्नीनें त्यांस शाप देऊन त्यांची वाणी अव्यक्त केली, व तो तेथून गुप्त होऊन मंदरपर्वतावरील वृक्षाच्या

ढोलींत जाऊन राहिला. देव त्यास इतस्ततः शोधीत तेथें येऊन पोंचले. तेथें हत्ती व पोपट यांनीं त्याचा पत्ता सांगितला. तेव्हां देवांनीं त्याला नेमका जाऊन धरिलें, व त्यानेंही त्यांस निरुपायानें दर्शन दिलें. पण चहाडखोर हत्तींच्या व पोपटांच्या जिव्हेचा विपर्यास होवो, असा शाप देऊन जरा शांत झालेल्या अग्नीची देवांनीं जेव्हां पुष्कळ स्तुति केली, तेव्हां त्यानें त्यांचें कार्य करण्याचें कबूल केलें.

नंतर भीत भीत तो शंकराकडे चालला. त्याच्या जवळ जातांच प्रणाम करून व देवकार्याची आठवण देऊन, त्यानें महादेवाला सुरत क्रीडे-पासून निवृत्त केलें. तेव्हां ज्याचा वेग अतिशय वाढला आहे, अशा शंकरानेंही आपलें वीर्य अग्नीमध्यें स्थापिलें. कारण अग्नि किंवा उमा यांवाचून तें वीर्य धारण करण्यास कोणी समर्थ नव्हतें. पण मला तुज-पासून पुत्र प्राप्त झाला नाहीं, असें म्हणून खिन्न झालेल्या उमेला शंकर म्हणाला,–" देवि, तूं विघ्नराजाचें पूजन केलें नाहींस, म्हणून असें विघ्न आलें. यास्तव आतां तरी लवकर पूजा कर, म्हणजे अग्नीमध्यें आमचा पुत्र होईल. "–तें ऐकून पार्वतीनें सत्वर विनायकपूजन केलें. गर्भयुक्त शंकराचें वीर्य धारण करणारा अग्नीहि, त्याच्यामध्यें सूर्यानें प्रवेश केला आहे कीं काय, असा भासूं लागला. कांहीं कालानें त्यानें तो गर्भ गंगेंत काढून टाकला; पण तीही त्याला धारण करण्यास समर्थ नव्हती. म्हणून शंकराच्या आज्ञेनें तिनें तो गर्भ मेरुपर्वतावरील अग्निकुंडांत टाकला. तेथें शांभवगण ज्याचें रक्षण करीत आहेत असा तो गर्भ सहस्र वर्षांनीं परिपूर्ण होऊन षडानन कुमार झाला. तेव्हां गौरीनें कृत्तिकांस प्रेरणा केली असतां, तो बालक सहा मुखांनीं त्यांचें दूध पिऊन थोडक्याच दिवसांत वाढला.

इतक्यांत तारकासुराच्या हातून पराभूत झालेला इंद्र संग्राम सोडून मेरु शिखरावर आला. देव, ऋषींसह त्या कुमारास शरण आले. तेव्हां तोही त्यांचें संरक्षण करीत त्यांच्यासह तेथें राहिला. पण त्या षण्मुखानें आपलें सर्व महत्त्व नाहींसें केलें आहे असें जाणून, क्षुब्ध व समत्सर झालेला इंद्र त्या कुमारापाशीं लढूं लागला. इंद्राच्या वज्राचा आघात झाल्यामुळें षण्मुखाच्या शरीरापासून शाख व विशाख असे दोन पुत्र झाले. तेव्हां इंद्राहून बलाढ्य असलेल्या त्या पुत्रयुक्त कुमाराजवळ स्वतः शंकर आला, व त्यांचें युद्धापासून निवारण करून म्हणाला,–" पुत्रा,

तूं तारकासुराला मारण्याकरितां व इंद्राचें राज्य रक्षण करण्याकरितां झाला आहेस. यास्तव आपलें कर्तव्य कर.''-तें पाहून व ऐकून इंद्रानेंही प्रणामपूर्वक त्याची स्तुति केली. पण त्याला आपल्या सेनापतीच्या पदावर अभिषेक करण्याकरितां जेव्हां इंद्रानें कलश उचलला, तेव्हां त्याचा हात स्तब्ध होऊन राहिला. त्यामुळें दुःखित झालेल्या देवेंद्रास शंकर म्हणाला, 'शक्रा, सेनापतीची इच्छा करणाऱ्या तूं गजाननाची पूजा केली नाहींस, म्हणून हें असें विघ्न आलें आहे.' तें ऐकतांच इंद्रानें विनायकाची पूजा केली, व त्याबरोबर त्याचा हात मोकळा होऊन त्यानें षडाननास अभिषेक केला. राजकन्ये, याप्रमाणें देवांनाही विघ्नराजाची पूजा केल्यावांचून सिद्धि मिळत नाहीं. यास्तव योग्य वराची शुभ इच्छा धरून तूंही त्याची पूजा कर.

आर्यपुत्र, त्या माझ्या सख्यांनीं असें सांगून माझें मन वळविलें असतां, मी त्या उद्यानांतील विघ्नराजापाशीं गेलें व त्याचें पूजन केलें. पूजेच्या शेवटीं त्या माझ्या सख्या आपल्या सिद्धीच्या योगानें गगनांगणांत विहार करीत आहेत, असें मीं पाहिलें. तें पहातांच कौतुकानें मी त्यांना हाक मारून खालीं उतरावयास लावून प्रश्न केला असतां त्या म्हणाल्या, "नरमांस भक्षण केल्यामुळें प्राप्त झालेल्या ह्या डाकिनी मंत्राच्या सिद्धी आहेत. कालरात्री या नांवाची कोणी एक ब्राह्मणी आमची गुरु आहे. सख्यांनीं असें सांगितलें असतां मी आकाशगमन सिद्धीविषयीं तर लोलुप पण नरमांस भक्षणाविषयीं भयभीत होऊन कांहीं वेळ स्तब्ध राहिलें, तथापि शेवटीं सिद्धीच्या लोभानें पापाच्या भीतीस पार नाहींसें करून टाकल्यावर, मी मंत्रोपदेशाविषयीं त्यांची प्रार्थना केली. तेव्हां त्यांनीं तत्काल जाऊन कालरात्रीस आणिलें. तिची मूर्ति मोठी विक्राळ होती. तिच्या भुंवया एकमेकींस लागल्या होत्या. नाक नकटें असून नाकपुड्या मात्र रुंद होत्या. डोळे बारीक होते, गाल फुगरे होते, ओष्ठ लांब व जाड होते, दांत पुढें आले होते, मान उंच होती, स्तन लांब व पोट मोठें होतें व पाय फुटलेले होते. सारांश, ब्रह्मदेवानें तिच्या आकृतींत आपलें कुरूप निर्माण करण्याचें चातुर्यच प्रकट केलें होतें, असें म्हटलें तरी चालेल. तिनें, पायांवर मस्तक ठेवलेल्या, स्नान केलेल्या, विघ्नेशाची पूजा केलेल्या व वस्त्ररहित झालेल्या मला मंडलामध्यें उभी करून मजकडून भयंकर भैरवपूजा करविली. तिनें त्या त्या आपल्या निरनिराळ्या

मंत्रांनीं मला अभिषेक करून देवपूजेंत समर्पण केलेलें मनुष्यमांस खावयास दिलें; पण काय चमत्कार सांगावा! मंत्र ग्रहण करून नरमांस खातांच, मी तशी नग्नच सख्यांसह आकाशांत उडून गेलें. कांहीं वेळ तेथेंच क्रीडा केल्यावर गुरूच्या आज्ञेनें पुनः भूमीवर उतरलें, व सख्यांसह आपल्या अंतःपुरांत गेलें. याप्रमाणें मी बाल्यावस्थेंत डाकिनी-मंडलवर्तिनी झालें. त्या मंडलांत आम्ही सर्वजणींनीं मिळून आजवर पुष्कळ नरमांस खाल्लें आहे. याविषयीं मी आणखी एक कथा सांगतें; ती ऐका.

## २. सुंदरकाची कथा.

त्या कालरात्रीचा विष्णुस्वामी म्हणून कोणीएक ब्राह्मण पति होता. तो वेदपारंगत असल्यामुळें देशोदेशींचे ब्राह्मणपुत्र त्याच्याकडे शिकावयास येत व तो त्यांस प्रेमानें अध्ययन शिकवी. त्याच्या शिष्यांमध्यें सुंदरक नांवाचा एक तरुण व शीलसंपन्न शिष्य होता. एकदां त्याची ती गुरुपत्नी, कालरात्री पति कोठें परगावीं गेला असतां, रतीची इच्छा झाल्यामुळें, त्याची प्रार्थना करूं लागली; पण तो धर्मभक्त पापकर्मास प्रवृत्त होईना. कारण, सज्जनांचें मन सदा निष्कंप असतें.† पण त्यामुळें कालरात्रीला मोठा क्रोध आला. तिनें स्वतःच आपल्या नखांनीं आपलें अंग ओरबडून घेतलें, आणि आपला पति घरीं येईपर्यंत केंस, वस्त्र व शरीर अस्ताव्यस्त स्थितींत टाकून ती रडत बसली. विष्णुस्वामी घरांत येतांच-' मजवर बलात्कार करण्याच्या इच्छेनें सुंदरकानें माझी कशी अवस्था केली आहे ती पहा,'-असें ती त्यास म्हणाली. तें ऐकतांच तो उपाध्याय क्रोधसंतप्त झाला. स्त्रियांवरील विश्वास विद्वानांनाही विवेकभ्रष्ट *करितो. सायंकाळीं घरीं आलेल्या सुंदरकास पहातांच आचार्य त्याच्या अंगावर धावून गेला व शिष्यांसह त्यानें त्याला काठ्यांनीं व मुष्टींनीं अतोनात मारिलें. त्यामुळें तो निश्चेष्ट होऊन पडला. तेव्हां हा मेलाच आहे, असें समजून विष्णुस्वामीच्या शिष्यांनीं त्याला मोठ्या रस्त्यावर नेऊन टाकिलें.

† निष्कम्पं तु सतां मनः

*प्रत्ययः स्त्रीषु मुष्णाति विमर्शं विदुषामपि ।

कांहीं वेळानें रात्रींच्या मंद व शीतल वायूनें तो हळु हळु सावध झाला, व आपली ती शोचनीय दशा पाहून मनांत म्हणाला,–" वाहवारे स्त्रियांचें चरित्र, कीं ज्यानें तसल्या महात्म्यालाही कलुषित केलें. पहा हा आमचा आचार्य, वृद्ध व विवेकी असूनही त्यानें क्रोधवश होऊन अविवेकानें मला निष्कारण मरे-मरेतों मारलें. अथवा काम-क्रोधांचाच हा असा महिमा आहे. त्या दोन दोषांमुळें पूर्वी मुनीही स्वस्त्रियांच्या व्यभिचाराविषयीं साशंक होऊन देवदारुवनांत देवाधिदेव शंकरावर रागावले. पण जैन मुनीचा वेष घेऊन उभेला ऋषींचीही अशांति दाखवीत असलेल्या शंकराला त्यांनीं ओळखिलें नाहीं. ते अतिशय क्षुब्ध झाले. त्यानीं शाप दिला आणि नंतर देवानें त्यांनां आपला प्रभाव दाखविला असतां, तो जगाचा प्रलय करणारा शंकर आहे, असें जाणून ते सर्व त्यास शरण गेले. तात्पर्य काम-क्रोधादि दोषांच्या आधीन झाल्यानें ऋषीही जर असे मोहित होतात, तर या गृहस्थांची काय कथा ? असें चिंतन करून चोरांस भ्यालेला तो सुंदरक जवळच असलेल्या गायींच्या गोठ्याच्या माळावर जाऊन बसला. त्यावेळीं त्यांत गुरें बांधीत नसत. इतक्यांत त्याच गोठ्यांत कालरात्री आली. तिनें त्यावेळीं आपले केंस मोकळे सोडले होते, हातांत नग्न तरवार घेतली होती, तोंडानें फूत्कार सोडित असल्यामुळें ती भयंकर दिसत होती व तिच्या नेत्रांतून व तोंडांतून ज्वाला निघत होत्या. तिच्या बरोबर तशाच आणखी अनेक स्त्रिया असून त्या डाकिनीच्या मंडलामध्यें ती उभी होती. तिला पहातांच सुंदरकाचे धाबें दणाणलें. पण तो रक्षोघ्न मंत्राचा जप करूं लागला. तेव्हां त्या मंत्रांनीं मोहित झालेल्या कालरात्रीला भयानें संकुचित अंग करून कोपऱ्यांत बसलेला सुंदरक दिसला नाहीं.

कांहीं वेळानें वर उडून जाण्याचा मंत्र म्हणून तिच्या सख्या व ती त्या गोठ्यासह गगनात गेली सुंदरकानें तो मंत्र ऐकून तत्काल पाठ केला. कालरात्री त्या गृहासह तत्काल उज्जयिनीस गेली. तेथील एका भाजीच्या शेतांत मंत्रसामर्थ्यानें उतरून डाकिनींसह ती स्मशानांत पुष्कळ वेळ क्रीडा करीत राहिली. तेव्हां क्षुधित झालेला सुंदरकही त्या शाकवाटिकेंत हळुच उतरून तेथील मूळें उपटून गोठ्यांत खात बसला. त्याचें खाणें होत आहे तों, तो डाकिनींचा समूह तेथें आला, व कालरात्रि गोठ्यासह पुनः रातोरात आकाशमार्गानें आपल्या गांवीं परत आली. घराजवळ येतांच

तिनें तो गोठा पूर्वीप्रमाणें होता तेथें ठेविला, व मुकाट्यानें घरांत गेली. तिच्या सख्याही आपापल्या घरीं गेल्या. सुंदरकाला हा सर्व चमत्कार पाहून मोठा विस्मय वाटला. राहिलेली रात्र त्यानें तेथेंच घालविली व प्रभात होतांच गोठ्यांतून निघून तो आपल्या मित्रांकडे गेला. त्यांस आपला दुःखकर वृत्तांत सांगून तो देशांतरास जावयास निघाला; पण त्याच्या मित्रांनीं त्याला जाऊं दिलें नाहीं. म्हणून तो तेथेंच राहिला, व रोज सत्रांत भोजन करून तो आपला काल विद्याभ्यासांत घालवूं लागला.

एकदां कालरात्रि कांहीं सामान घेण्याकरितां बाजारांत गेली असतां, सुंदरक तिच्या दृष्टीस पडला. तेव्हां पुनः कामार्त झालेली ती त्याच्याजवळ येऊन म्हणाली.—" सुंदरका, अजून तरी माझे मनोरथ पूर्ण कर. माझे प्राण तुझ्या अधीन आहेत. "—पण त्यावर सुंदरक म्हणाला—" माते, असें बोलूं नकोस. हा धर्म नव्हे. तूं माझी गुरुपत्नी, मला आईसारखी पूज्य आहेस. "—त्यावर कालरात्रि पुनः बोलली, " तूं जर धर्माचीच अपेक्षा करीत असलास तर माझे प्राण वांचीव प्राणरक्षणाहून अधिक धर्म कोणता आहे ? "—' आई, असें बोलूंही नकोस. गुरुपत्नीगमन हा धर्म आहे, असें कोठें सांगितलें आहे ?' असें बोलून त्यानें तिचा निषेध केला असतां ती दुष्ट स्त्री—' असे काय ? बरें आहे '—असें म्हणून व आपलें उत्तरीय वस्त्र फाडून रडत घरीं गेली. व—' पहा सुंदरकानें पुनः धांवून येऊन माझें हे उत्तरीय फाडलें '—असें म्हणून पतीला दाखवूं लागली. तेव्हां उपाध्यायाला पुनः मोठा कोप आला, व हा दुष्ट शिष्य वध्य आहे, असें म्हणून त्यानें त्याचें सत्रांतील भोजन बंद करविलें. तेव्हां सुंदरकाला मोठा खेद वाटला, व देशांतरास जाण्याचें त्यानें मनांत आणिलें. पण गायीच्या गोठ्यांत ऐकून पाठ केलेला वर जाण्याचा मंत्र आठवत असून खालीं उतरण्याचा मंत्र आठवत नाहीं, असें पाहून तो त्याच गोठ्यांत रात्रीं जाऊन बसला. नेहमींप्रमाणें कालरात्रि सख्यांसह तेथें आली, व मंत्रसामर्थ्यानें गोठ्यासह आकाशमार्गानें उज्जयिनीस चालली. नियत जागीं गेल्यावर मंत्रानें गोठा खालीं उतरला, व त्याला शाकवाटिकेंत ठेऊन त्या सर्व डाकिनी श्मशानांत गेल्या.

पण सुंदरकाला पुनः लक्ष्यपूर्वक ऐकूनही तो मंत्र पाठ झाला नाहीं; पण गुरूपदेशावांचून पूर्ण मंत्रसिद्धि कोठून होणार ? त्यानंतर भाजी-

मळ्यांत उतरून, कांहीं मुळे खाऊन व कांहीं बरोबर नेण्याकरितां गोठ्यांत ठेवून, तो पुनः लपून बसला. कांहीं वेळानें क्रीडा आटोपून कालरात्रीही सख्यांसह तेथें आली, व आकाशमार्गानें पूर्ववत् स्वस्थानीं पोंचली. सुंदरकही प्रातःकाळीं मुळे घेऊन गोठ्यांतून निघाला व भोजनापुरतें द्रव्य मिळविण्याकरितां ते विकण्याच्या हेतूनें बाजारांत गेला. पण ते मुळे विकीत हिंडणाऱ्या त्याला मालव देशांतील राजपुरुषांनीं पाहिलें. व मूल्य न देतांच त्यांनीं ते त्याच्यापासून हिसकावून घेतले. आणि तो मुळ्याचे दाम मागत असतां ते दुष्ट राजपुरुष 'हा आम्हांला दगडांनीं मारतो' असा खोटाच आरोप करून राजाकडे घेऊन गेले; व 'मालव-देशांतून आणून तूं हे मुळे येथें कान्यकुब्जांत कसे विकीत आहेस? असें विचारूं लागलों असतां हा आम्हांस दगड मारतो' असें त्यांनीं राजाला सांगितलें. तेव्हां 'हें काय, तूं असें कां करतोस?' असें राजानें विचारलें; तेव्हां त्याचे मित्र म्हणाले,-" राजन् आमच्यासह याला जर आपण एका मोठ्या माडीवर न्याल तर हा सर्व अद्भुत प्रकार सांगेल "-तें ऐकून राजानें त्याला त्याच्या मित्रांसह जवळच्याच मोठ्या राजमहालांत पाठविलें. तेथें पोंचतांच तो सुंदरक राजमंदिरासह मंत्रबलानें राजासमक्ष उडून गेला. त्याचे मित्र त्याच्याबरोबरच होते. प्रयागास पोंचल्यावर त्याला आपण श्रांत झालों आहों, असें वाटलें. इतक्यांत त्यानें खालीं राजा स्नान करीत आहे असें पाहिलें, व आकाशांतच त्या राजगृहाला स्थिर करून गंगेच्या प्रवाहांत उडी टाकली. पण आकाशांतून पडलेल्या त्याला पाहून बरोबरच्या अनुचरांसह राजा विस्मित झाला. सुंदरकही पोहत वेगानें राजाजवळ गेला. तेव्हां-तूं कोण आहेस, व आकाशांतून कसा उतरलास-असें राजानें नम्रपणें विचारलें असतां तो म्हणाला,-" मी मुरजक या नांवाचा शंभुगण आहें. मानुषभोगाची इच्छा झाल्यामुळें मी शंभूच्याच आज्ञेनें येथें तुजकडे आलों आहे. "-तें ऐकून व त्याचें सांगणें सत्य आहे, असें समजून राजानें धान्यानें, रत्नांनीं व इतर उ[illegible] रणांनीं परिपूर्ण असलेलें एक पुर स्त्रियांसह त्यास दिलें. तेव्ह[illegible] मित्रांसह त्या नगरांत राहूं लागला. मनास ये[illegible] तेव्हां आ[illegible] विहार करावयास जात असे. त्या न[illegible] [illegible]

कानीं वारा घालून सोन्याच्या रत्नजडित पर्यंकावर शयन केलेल्या त्याची सेवा करूं लागल्या असतां, त्याला इंद्राचें दिव्य सुख येथेंच मिळत असे.

एकदां एका आकाशचारी योग्यांशीं त्याचा परिचय झाला, तेव्हां त्यानें त्याला आकाशांतून खालीं उतरण्याचा मंत्र यथाविधि दिला. त्यानंतर ज्याला मंत्र प्राप्त झाला आहे, असा तो आपल्या कान्यकुब्ज देशांत आकाशमार्गानें उतरला. तेव्हां लक्ष्मीनें परिपूर्ण असलेल्या नगरासह अंतरिक्षांतून खालीं उतरलेल्या त्याला पाहून राजा मोठ्या आश्चर्यानें स्वतः त्याच्याकडे आला, आणि त्यानें मोठ्या आग्रहानें प्रश्न केला असतां, त्या कालवेत्त्या सुंदरकानें कालरात्रीचा सर्व वृत्तांत त्याला सांगितला. तो ऐकतांच राजानें कालरात्रीला आणविलें, व प्रश्न केला. तेव्हां त्या निर्भय स्त्रीनें तें सर्व कबूल केलें. पण राजा कुपित होऊन तिचे कान कापण्यास उद्युक्त झाला असतां, राजपुरुषांनीं तिला धरिलें होतें तरी, ती पहातां पहातां नाहींशी झाली. त्यानंतर तिनें आपल्या राष्ट्रांत राहूं नये असा राजानें ठराव केला. सुंदरकही राजानें केलेला सत्कार घेऊन आकाशमार्गानें गेला.

राणीनें आपल्या आदित्यप्रभपतीस अशी कथा सांगून म्हटलें,—" देव, डाकिणींच्या अशा मंत्रसिद्धी असतात. माझ्या पित्याच्या राज्यांत त्या सर्व प्रसिद्ध आहेत. मी कालरात्रीची शिष्या आहें, हें पूर्वीच सांगितलें आहे. पण मी पतिव्रता असल्यामुळें माझी सिद्धि तिच्यापेक्षां अधिक आहे. आज आपण मला पाहिलेंत, पण मी तुमच्या कल्याणाकरितां हें पूजन करीत होतें. मंत्राच्या योगानें बळि द्यावयाचा पुरुष ओढून आणण्याच्या खटपटींत मी होतें, यास्तव आपणही या आमच्या पंथांत या. म्हणजे सिद्धीच्या योगानें पराभूत केलेल्या राजांच्या मस्तकांवर आपल्याला पाय ठेवितां येईल. "—तेव्हां राजा म्हणाला,—" जळो तो तुमचा पंथ. नरमांस भक्षण करावयास लावणारा तो पंथ आणि त्या सिद्धि, त्यांस दुरूनच नमस्कार असो. "—राजा आपल्या म्हणण्यास ...न नाहीं, हें चांगलें नव्हे, असें समजून ती त्याच्या समक्ष प्राण ...यार झाली. तेव्हां अपकीर्तीला भिऊन कामांध राजानें तिचें केलें. कारण ...यासक्त पुरुष सुमार्गात कसे रहाणार ! १

...म ।

असो; त्याबरोबर आपल्या पतीला त्या पूर्वी पूजिलेल्या मंडलांतच घेऊन ती म्हणाली–नाथ, तुमच्यापाशीं जो हा फलभूति नांवाचा ब्राह्मण असतो, त्यालाच बळी देण्याकरितां आणण्याचें मी आज योजिलें आहे; पण तो विद्वान् व पुण्यवान् असल्यामुळें इतर सामान्य जीवांप्रमाणें त्याचें आकर्षण करितां येत नाहीं. यास्तव कोणा आचाऱ्यास या कामाकरितां नियुक्त केलें पाहिजे. म्हणजे तो त्यास मारून व शिजवून देईल. याविषयीं मनांत कांहीं किंतु आणण्याचें कारण नाहीं; कारण त्याच्या मांसाचा नैवेद्य दाखवून खाल्ला असतां, पूजनसमाप्तीनंतर, पूर्णसिद्धि मिळेल. कारण हा उत्तम पक्ष आहे.

प्रियेचें हें भाषण ऐकून त्या पापभीरू राजानेंही त्या कर्मास आपली संमति दिली. हर, हर! स्त्रियांच्या अनुरोधानें चालणें मोठें कष्टकर असतें.§ त्यानंतर साहसिक नांवाच्या स्वयंपाक्यास बोलावून व त्याला विश्वास दाखवून तीं दोघें म्हणालीं–'राजा देवीसह आज भोजन करणार आहे, यास्तव लवकर चांगला स्वयंपाक कर.' असें तुला जो कोणी येऊन सांगेल, त्यालाच तत्काल मारून तूं शिजीव. ही त्या दोघांची आज्ञा शिरसा मान्य करून तो आपल्या घरीं गेला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं रोजच्याप्रमाणें फलभूति आला असतां, राजानें त्याला तो निरोप घेऊन साहसिकाकडे जावयास सांगितलें. तेव्हां बरें आहे, असें म्हणून तो जों बाहेर पडत आहे, तों राजपुत्र चंद्रप्रभ त्याच्याकडे आला व म्हणाला, 'ब्राह्मणा, हें सुवर्ण घेऊन आतांच्या आतां जा व बाबांच्या कुंडलांसारखीं सुंदर कुंडलें माझ्याकरितां करून आण." पण फलभूतीनें 'मी कामाकरितां साहसिकाकडे जात आहें' असें त्याला सांगितलें. तेव्हां तुझा निरोप मी आतांच स्वतः जाऊन त्याला कळवितों, तूं माझ्या कामाला जा, असा पुष्कळ आग्रह केल्यामुळें फलभूति सोनाराकडे गेला, व राजपुत्र एकटाच स्वयपाक्याकडे गेला. त्याच्या तोंडचा तो ठरलेला निरोप ऐकतांच त्या निर्दय आचाऱ्यानें, कांहीं विचार न करितां, आपली तीक्ष्ण सुरी त्या सुकुमार बालकाच्या गळ्यावर चालविली व थोड्याच अवकाशांत त्याचें मांस शिजवून तयार केलें. राजा व राणी यांनींही पूजन करून व पुत्राच्या मांसाचा बळी देऊन प्रसाद यथेच्छ भक्षण केला.

§ ...धिगहो कष्टं स्त्रीष्वनुरोधिताम् ।

पण त्यानंतर आज आपण एका ब्राह्मणाचा व्यर्थ वध केला, असें वाटून राजाला मोठा पश्चात्ताप झाला. त्याला रात्रभर झोंप आली नाहीं. पण उजाडतांच, आदल्या दिवशीं प्रहर रात्र होईतों, सोनाराच्या घरीं स्वत: बसून करविलेलीं राजपुत्राचीं सुंदर कुंडलें घेऊन फलभूति राजवाड्यांत आला. हातांत चकचकीत कुंडलें घेतलेल्या फलभूतीस पहातांच राजानें 'कुंडलें कोणाचीं' असा त्यास प्रश्न केला. तेव्हां त्या सत्यनिष्ठ ब्राह्मणानें इत्थभूत वृत्तांत त्याला सांगितला. तो ऐकून 'हा पुत्र' असें म्हणून राजा भूमीवर निश्चेष्ट होऊन पडला, आणि अनुचरांच्या प्रयत्नानें सावध झाल्यावर तो आपल्या राणीची अतिशय निंदा करूं लागला.

सचिवांना ती वार्ता कळली. तेव्हां त्यांनीं राजाजवळ येऊन सर्व वृत्तांत विचारिला असतां, त्यानेंही तो अक्षरश: त्यांना सांगितला व पुन: म्हटलें, "फलभूतीचें-'शुभ करणारांचें शुभ होतें व अशुभ करणारांचें अशुभ होते'-हें वचन सत्य झालें. भिंतीवर जोरानें मारलेला चेंडू जसा आपल्याच आंगावर उलट येतो. त्याचप्रमाणें दुसऱ्याचें वाईट करण्याची इच्छा केली म्हणजे आपलें स्वत:चेंच वाईट होते.* ब्राह्मणाची हत्या करण्याची इच्छा करणारे आम्ही, आपल्या पुत्राचाच नाश करवून त्याचें मांस खालें."-इतकें बोलून व दु:खानें आणि लज्जेने त्यानें खालीं मान घातली. शेवटीं त्या दु:खी राजानें फलभूतीलाच आपलें राज्य दिलें, आणि दुसरें अपत्यच नसल्यामुळें त्यानें आपली खासगी संपत्तीही सत्पात्रीं अर्पण केली. नंतर त्या महापातकाच्या शुद्धीकरितां तो भार्येसह, पश्चात्तापरूपी अग्नीनें अगोदरच पोळला होता तरी, पुन: लौकिक अग्नींत प्रविष्ट झाला. फलभूतीही अनायासानें प्राप्त झालेलें राज्य करीत सुखानें राहिला. तात्पर्य दुसऱ्याशीं केलेलें शुभ अथवा अशुभ आचरण आपल्याठायीं तसेंच फलद्रूप होत §असतें.

यास्तव हे राजन्, वाराणसीचा राजा ब्रह्मदत्त, आपण त्याच्याशीं शुभ वर्तन करीत असतांनाही जर आपल्याशीं अशुभ व्यवहार करील, तर

---

* कन्दुको भित्तिनिक्षिप्त इव प्रतिफलन्मुहु: ।
आपतत्यात्मनि प्रायो दोषोऽन्यस्य चिकीर्षित: ॥

§ एवं भद्रमभद्रं वा कृतमात्मनि कल्प्यते ।

त्याचें फल भोगील. यौगंधरायणाचें हें धर्मप्रधान वचन ऐकून वत्सराजाला मोठें समाधान वाटलें. तो त्याच्या भाषणाचें अभिनंदन करून उठला व त्या दिवसाचें सर्व अवशिष्ट कर्तव्य संपवून, दुसऱ्याच दिवशीं लावाणक देशांतून निघून, दिग्विजयी सैन्य व परिवार यांसह आपल्या कौशांबी नगरीस जावयास निघाला. हळु हळु मार्ग चालून योग्य काळीं जिच्यामध्यें उंच पताका उभारल्या आहेत व त्यामुळें जी महोत्सवानें जणुंकाय नाचतच आहे, अशा आपल्या राजधानीस पोंचला. तेथील पौरजनांच्या नयनांस आनंद देत, भाट यश गात असतां, व राजे प्रणाम करीत असतां, तो आपल्या राजमंदिरांत शिरला. याप्रमाणें नम्र झालेल्या राजांवर आपलें शासन (अंमल) बसवून तो वत्सेश पूर्वी मिळालेल्या कुलोचित सिंहासनावर बसला. त्यावेळीं दशदिशांस दणाणून सोडणारा मंगलवाद्यांचा ध्वनि ऐकूं येऊं लागला. त्याचा प्रतिध्वनि ऐकून कांहीं कल्पक लोकांस-यौगंधरायणाची नीतियोजना पाहून अतिशय संतुष्ट झालेले लोकपालच धन्यवाद देत आहेत,—असें वाटलें. नंतर मोठा महोत्सव करून त्या निर्लोभी राजानें दिग्विजयांत मिळविलेलें धन आपल्या राष्ट्रांतील योग्य लोकांस वांटून टाकलें. मंत्र्यांचा सर्वोत्तम सत्कार केला. त्यांस कृतार्थ करून सोडलें. याप्रमाणें तो राजा द्रव्याचा यथायोग्य रीतीनें वर्षाव करूं लागला असतां, गर्जना करणाऱ्या मेघांसारख्या मृदंगांच्या नादानें ती नगरी भरून गेली. तेव्हां त्या नगरींत पुढें मोठें फल उद्भवणार आहे, असें जाणून नगरींतील सर्व लोक घरोघर आनंद करूं लागले. याप्रमाणें सर्व पृथ्वीस जिंकून आणि यौगंधरायण व रुमण्वान् यांच्यावर सर्व राज्यकारभार टाकून तो भाग्यशाली राजा वासवदत्ता व पद्मावती यांसह यथेच्छ विलास करूं लागला. कीर्ति व श्री यांप्रमाणें असलेल्या त्या दोघी देवींच्या मध्यें बसून श्रेष्ठ स्तुतिपाठकांनीं ज्याचें यश गायलें आहे, असा तो आपल्या धवल चंद्रोदयाचें सेवन करून शत्रुप्रतापाप्रमाणें सतत मद्यपान करीत राहिला.

येथें लावाणक नांवाचा तिसरा लंबक समाप्त झाला.

---

# ४. नरवाहनदत्तजननलंबक.

## तरंग १ ला.

### १. वत्सराजाच्या मद्यादि–व्यसनांचें संक्षिप्त वर्णन.

त्यानंतर कौशांबींत रहाणारा उदन, जिंकलेल्या पृथ्वीच्या एकछत्री राज्याचा उपभोग घेऊं लागला. त्यानें आपल्या योग्य मंत्र्यांवर सर्व राज्यकारभार टाकिला, व वासवदत्ता आणि पद्मावती यांसह विहार करण्यांत आणि वीणा वाजवून गाण्यांत आपला काल सुखानें घालविला. सुंदर स्त्रियांनीं आणून दिलेलें मद्य प्राशन करण्याचा सपाटा त्यानें एकसारखा चालविला होता. त्याच्या दोघी भार्यांचा परस्पर अतिशय स्नेह असल्यामुळें त्यांच्या चित्तांत ईर्षा व क्रोध यांचा जरी कधीं प्रादुर्भाव होत नव्हता, तरी स्वभावतःच वक्र असलेल्या भुंवया व आरक्तवर्ण नेत्र यांच्याकडे पहात असतांना त्याची कधीं तृप्ति झाली नाहीं. त्याच्या अंतःपुरांत बरेच स्फटिकाचे घट मद्यानें सदा भरलेले असत. मधून मधून तो आपल्या अंगांत हिरवें कवच चढवून व हातांत धनुष्यबाण घेऊन व्याधांसह शिकार करावयास जात असे. जंगली पशूंनीं भरलेल्या घोर अरण्यांत जाऊन तो आपल्या बाणांनीं, चिखलांनीं भरलेल्या अनेक वनवराहांस मारून भयभीत झालेल्या हरणांच्या मागें लागत असे. तेव्हां त्यांच्या अतिचंचल नेत्रांकडे पाहून हे पूर्वीं जिंकलेल्या दिशांचे कटाक्षच आहेत कीं काय, असा भास होई. अनेक जंगली रेड्यांचीं शिंगें तोडून त्यांस तो मारून टाकीत असे. तोंडें पसरून धांवत येणाऱ्या व्याघ्रांच्या व सिंहांच्या घशांत भाले टोंचून तो त्यांस व्याकुळ करून पाडीत असे, आणि मोठमोठ्यानें अस्पष्ट गर्जना करून ते धडपड करीत भूमीवर पडले आहेत, असें पाहून त्याला मोठें समाधान वाटत असे. असो, याप्रमाणें स्त्री, मद्य व मृगया या तीन व्यसनांत आसक्त झालेल्या त्या राजाकडे एकदां नारदमुनि आले. त्यावेळीं तो राजा आपल्या मंदिरांतील सभास्थानीं बसला होता. त्यानें मुनींचें उत्कृष्ट आतिथ्य केलें. प्रणामपूर्वक

त्यानें केलेल्या पूजेचा स्वीकार करून व क्षणभर विसावा घेऊन, संतुष्ट झालेले मुनि त्यास म्हणाले,—"वत्सेश्वरा, मी थोडक्यांत तुला काय सांगत आहें तें ऐक."—

## २. पांडुराजावरील अनर्थ.

पूर्वी पांडु या नांवाचा तुझा वृद्धप्रपितामह राजा झाला. तुझ्यासारख्या त्याच्याही दोन सुंदर भार्या होत्या. एक कुंती व दुसरी माद्री; या सागरवलयांकित पृथ्वीला जिंकून तोही तुझ्यासारखाच सुखपरायण व मृगयाव्यसनी झाला. एकदां तो शिकारीकरितां वनांत गेला असतां, मृगरूपानें मृगीशीं संयोग करीत असलेल्या अरविंद नांवाच्या मुनीला त्यानें एकाच बाणानें मारलें. त्याबरोबर मृगरूप सोडून प्राण कंठांत आले असतां, त्या मुनीनें,—आपल्या हांतून मोठा अपराध झाला, असें जाणून खिन्न झालेल्या—त्याला शाप दिला कीं, राजा तूं विवेकशून्य होऊन मला अशा अवस्थेंत मारलें आहेस, त्याअर्थी यापुढें तूं जेव्हां भार्यासमागम करशील तेव्हां मरशील.—हा शाप म्हणजे त्याच्यावर झालेला अकल्पित वज्रप्रहारच होता. त्यामुळें पांडु अतिशय दुःखित झाला. त्यानें मरणाच्या भीतीनें सर्व भोग सोडले; व तो दोघी भार्यासह शांत तपोवनांत जाऊन राहिला; पण कोठेंही गेलें म्हणून काय? मानसिक विकार थोडेच सोडीत आहेत. त्या शांत स्थळींही शापानें प्रेरित होऊन तो एकदां माद्रीशीं समागम करावयास प्रवृत्त झाला असतां, तत्काल मरण पावला. यास्तव राजा, मृगया हें राजांचें मोठें व्यसन, त्यांच्यावर ओढवणाऱ्या मोठ्या अनर्थांचें द्वार व मोठा प्रमाद आहे. हिनें दुसऱ्याही अनेक राजांस हरणाप्रमाणेंच धुळीस मिळविलें आहे. ती एक मोठी राक्षसीच आहे. लोकांचा कोलाहल हीच तिची गर्जना, उडणारी धूळ हाच तिचा धूम्र वर्ण व वीरांचे भाले हेच तिचे चकचकीत दांत होत. तिला मांसाचा मोठा लोभ असतो. तेव्हां अशा प्रकारची ती राक्षसी शुभ कसें करील? तूं व्यर्थ आयास देणाऱ्या तिचा नाद सोड. तुझ्या पूर्वजांच्या प्रेमामुळें मी मुद्दाम येऊन तुला हें सांगत आहें. तुला कामाच्या अंशापासून पुत्र होणार आहे. कारण पूर्वी रतीनें कामास शरीर देण्याविषयीं जेव्हां शंकराची प्रार्थना केली, तेव्हां तो देव म्हणाला,—'गौरी स्वतः आपल्या अंशानें भूलोकीं अवतार घेऊन पुत्राच्या इच्छेनें माझी आराधना करील, व

त्यामुळें तिला काम हा मुलगा होईल.' शंकराच्या त्या संकेताप्रमाणें ती देवी चंडमहासेनाची कन्या होऊन तुझी भार्या झाली आहे. आतां लवकरच ती शंकराची आराधना करून पुत्रवती होईल, आणि तिचा पुत्र सर्व विद्याधरांचा चक्रवर्ती होईल. इतकें सांगून राजानें पूजन केलें असतां ते देवर्षी तत्काल गुप्त झाले. नंतर उदयन, जिला पुत्राची इच्छा झाली आहे, अशा वासवदत्तेसह पुत्रचिंतेनें दिवस घालवूं लागला.

### ३. दरिद्री ब्राह्मणीचें राजाकडे येणें.

एकदां राजा आपल्या नेहमींच्या बसावयाच्या स्थानीं स्वस्थ चित्तानें बसला असतां, नित्योदित नामक प्रतीहारी त्याच्याजवळ येऊन म्हणाला,– " देव, कोणीएक, दारिद्र्यानें पीडलेली स्त्री दोन्ही कडांवर दोघां बालकांस घेऊन द्वारावर उभी आहे. आपल्याला भेटण्याची तिची इच्छा आहे." तें ऐकून दयाळु उदयनानें तिला आंत आणावयास सांगितलें. तेव्हां क्षणार्धांतच एक कृश, निस्तेज व मळकट बाई त्याच्यासमोर आली. जर्जरित मानाप्रमाणेंच फाटक्या वस्त्रानें तिनें आपले अवयव झांकून घेतले होते. अगदीं जवळ आल्यावर ती डोळ्यांत पाणी आणून म्हणाली,–" देवा, मी कुलीन ब्राह्मणी आहें, पण दुर्दैवामुळें अशा दुर्गतींत पडलें आहें. मला नुक्तींच हीं दोन जुळीं मुलें झालीं, पण माझ्या पोटांत अन्न नसल्यामुळें यांना अंगावर कांहीं मिळत नाहीं. हीं माझ्याबरोबरच कशीं मरणोन्मुख झालीं आहेत तें पहा. मी अनाथ व दीन झालें आहें. तूं सर्वांचा पोशिंदा बाप आहेस, असें समजून तुझ्या पायांपाशीं आलें आहें."

तिचे हे शब्द ऐकून राजाचें मन कळवळलें व त्यानें लागलीच–हिला देवी वासवदत्तेकडे ने, अशी प्रतीहारीस आज्ञा केली. त्याबरोबर त्यानेंही तिला आपल्या स्वामिनीकडे पोंचविलें. राजानें हिला आपल्याकडे पाठविलें आहे, असें प्रतीहारीच्या तोंडून ऐकल्यामुळें राणीनें तिला मोठ्या आदरानें ठेवून घेतलें, आणि तिला जुळीं मुलें झालीं आहेत, असें पाहून ती मनांत म्हणाली,—" पहा विधात्याचा व्यवहार कसा विपरीत आहे! योग्य वस्तूंशीं त्याचा द्वेष व अयोग्य वस्तूंवर प्रेम, काय चमत्कार आहे! मला अजून एकही पुत्र नाहीं, व हिला एकदम दोन झाले!" असो; असा विचार करून आपल्या चेटीला, तिला स्नानादि घालावयास सांगून,

ती स्वतः स्नानादि करावयास उठली. आज्ञेप्रमाणें दासींनीं तिला स्नान घालून चांगलें वस्त्र नेसावयास दिलें. व सुग्रास अन्नाचें भोजन दिलें. तेव्हां ग्रीष्मर्तूंत अगदीं प्रथमच जलवृष्टीनें भिजलेल्या भूमीप्रमाणें ती तृप्त झाली. नंतर ब्राह्मणी प्रसन्न झाली आहे असें पाहून, भाषणादिकांच्या योगानें तिची परीक्षा करण्याकरितां वासवदत्ता म्हणाली, 'बाई मला एकादी गोष्ट सांगा!' तें ऐकून ती पुढील कथा सांगूं लागली.

## ४. देवदत्त राजपुत्राची कथा.

पूर्वीं जयदत्त म्हणून कोणीएक सामान्य राजा होता. त्याला देवदत्त म्हणून पुत्र झाला. तो तरुण झाला आहे असें पाहून त्याच्या विवाहाची इच्छा करणारा राजा मनांत, असा विचार करूं लागला, कीं—राजलक्ष्मी अतिशय चंचल व वेश्येप्रमाणें बलाढ्यांस भोग घेतां येण्यासारखी असून, वैश्यांची लक्ष्मी कुलस्त्रीप्रमाणें अनन्यगामिनी असते. यास्तव माझ्या पुत्राचा मी वैश्यकुलांतील कन्येशीं विवाह करितों. म्हणजे पुष्कळ शत्रूंनीं भरलेल्याही त्याच्या राज्यांत आपत्ती संभवणार नाहीं. असा विचार करून त्यानें पाटलीपुत्रांतील वसुदत्त नांवाच्या वैश्याची कन्या केली. स्तुत्य संबंध पाहून वसुदत्तानेंही दूर देशाचा फारसा विचार न करितां ती त्याच्या पुत्राला दिली. जामातास अपरिमित धन देऊन त्यानें प्रसन्न केलें. त्यामुळें जयदत्तालाही परमानंद झाला.

एकदां वसुदत्त आपल्या संबंधी राजाच्या येथें कांहीं कार्याच्या निमित्तानें येऊन, व कांहीं दिवस राहून आपल्या कन्येला घेऊन गेला. त्यानंतर एकाएकीं राजा जयदत्त मरण पावला. त्याच्या वंशांतील लोकांनीं देवदत्ताचा पराभव करून त्याचें राज्य घेतलें. ते आपल्याला जिवानिशीं मारतील, या भीतीनें तो आईला घेऊन तेथून पळून गेला, तेव्हां त्याची दुःखित माता त्याला म्हणाली,—"बाळा, तूं आपल्या सम्राट्कडे जा. पूर्वदिगीश्वर आपला प्रभु आहे. त्याच्याकडे जाऊन तूं जर आपली खरी हकीगत सांगितलीस, तर तो तुला राज्य देववील."—तें ऐकून तो पुत्र म्हणाला,—"आई, तूं म्हणतेस तें खरें, पण निर्धन व त्यामुळेंच राजाच्या सामग्रीनें रहित असलेल्या मला कोण विचारितो!"—तेव्हां ती म्हणाली—'बाळा, तूं अगोदर आपल्या श्वशुराच्या येथें जा. त्याच्यापासून धन घेऊन राजाला शोभेल असा वेष व सेवक संपादन कर, आणि मग

चक्रवर्ती राजाची भेट घे."-आईनें मोठ्या आग्रहानें असें सांगितलें असतां तो सत्पुत्र, त्याला मोठी लज्जा वाटत होती तरी, श्वशुराच्या घरीं जावयास निघाला. संध्याकाळीं त्याच्या घराजवळ जाऊन पोंचला; पण पिता मेल्यामुळें झालेलें दुःख व राज्य गेल्यामुळें वाटणारी लज्जा यांच्या योगानें तो एकाएकीं आंत जाऊं शकला नाहीं. तो त्या घराजवळच एका सत्राच्या बाहेरच्या जागेंत रात्र घालविण्याच्या इच्छेनें राहिला. दीडप्रहर रात्रीच्या सुमारास श्वशुराच्या घरांतून दोरीवरून कोणी खालीं उतरत आहे असें त्याला दिसलें. पण अधिक बारकाईनें पाहूं लागतांच आकाशांतून पडलेल्या ज्योतीप्रमाणें, रत्नजडित भूषणांनीं उज्वल झालेली ती आपलीच भार्या आहे, असें त्याला समजलें, व त्यामुळें त्याच्या अंगाचा संताप झाला. तिनें त्या मलिन व कृश पतीला पाहिलें, पण न ओळखल्यामुळें, 'कोण आहे?' असा प्रश्न केला. 'मी वाटसरू आहें' असें त्यानें हळुच सांगितलें असतां, त्याच सत्रशाळेच्या आंत ती शिरली. तेथें पूर्वींच एक परपुरुष येऊन बसला होता. त्याच्या जवळ जातांच 'उशीर कां केलास' असें म्हणून त्यानें तिला लाथांनीं यथेच्छ मारलें; पण त्या पापिणीनें एक अक्षरही न बोलतां त्याला अधिक प्रेम दाखवून तृप्त केलें. हा सर्व नीच व्यवहार पाहून सुज्ञ देवदत्ताला अतिशय क्रोध आला होता, तरी त्यानें असा विचार केला, कीं हा कोप करण्याचा काल नव्हे. यावेळीं मला निराळेंच कार्य साधावयाचें आहे. शत्रूंच्या योग्य असलेलें हें माझें खड्ग या दोघांवर कसें पडेल? पण जाऊं दे. या कुलटेशीं मला काय करावयाचें आहे? हा सर्व माझ्या दुर्भाग्याचा परिणाम आहे. यांत इचा कांहीं अपराध नाहीं. असमान कुलसंबंधाचें हें कटु फल आहे. अथवा कावळी, बळी खाऊन जिवंत रहाणाऱ्या कावळ्याला सोडून, कोकिलाशीं कशी रममाण होईल? असा विचार करून त्यानें त्या दोघां नीचांची त्यावेळीं उपेक्षा केली. ज्यांच्या मध्यें मोठी थोरली विजयेच्छा आहे, अशा सज्जनांच्या मनाला स्त्री तृणासारखी वाटत असते.* असो; त्या दोघां व्यभिचारी स्त्रीपुरुषांचा विलास चालला असतां, त्या भरांत तिच्या कानांतील एक महामूल्यवान् रत्नजडित कुंडल खालीं पडलें. तें अर्थात्च वर तोंड केलेल्या तिला दिसलें

* सतां गुरुजिगीषे हि चेतसि स्त्रीतृणं कियत्।

नाहीं. संभोगानंतर ती गडबडीनें आपल्या जारास विचारून वस्त्र सांवरीत निघून गेली. तो पापी पुरुषही कोणी आपल्याला पाहूं नये म्हणून लपत छपत तेथून गेला. पण ज्याच्यावरील रत्नांच्या ज्वाला पसरत आहेत असें तें रत्नभूषण, हरवलेल्या राजलक्ष्मीला शोधावयाकरितां जणुं काय हस्तदीपच जसा सांपडावा, तसें त्याच्या हातीं लागलें. तें घेऊन व आपलें इष्ट कार्य अवश्य होणार, असें जाणून तो तत्काल तेथून निघून कान्यकुब्जास गेला. तेथें तें कुंडल गहाण टाकून व एक लक्ष सुवर्ण–मुद्रा कर्ज काढून त्या राजपुत्रानें हत्ती, घोडे, वस्त्रें इत्यादि सामग्री जमविली, आणि मोठ्या थाटानें चक्रवर्ती राजाचें दर्शन घ्यावयास तो गेला. त्यानेंही त्याचा योग्य सत्कार करून, येण्याचें कारण विचारिलें. आणि त्याचें न्याय्य वचन ऐकून घेऊन, त्याच्या पित्याचें राज्य त्यास मिळवून देण्याकरितां आपलें शूर सैन्य त्याच्याबरोबर दिलें. तेव्हां वेगानें व त्वेषानें आपल्या राजधानींत येऊन त्यानें शत्रूंचा संहार केला, व आपलें राज्य स्वाधीन करून घेऊन, राजाचें सैन्य सत्कारपूर्वक परत पाठविलें; आपल्या मातेला राजमंदिरांत परत आणलें; व गहाण ठेवलेलें कुंडल सोडवून दुष्ट भार्येचें गुप्त पापकर्म प्रकट करण्याकरितां तें श्वशुराकडे पाठविलें तेव्हां राजाकडून आलेलें तें आपल्या कन्येचें कुंडल पाहून तो वैश्य घाबरला. त्यानें तें आपल्या कन्येला दाखविलें. तेव्हां आपल्या आचरणाप्रमाणेंच पूर्वीं भ्रष्ट झालेलें - गळून पडलेलें– तें आपलें कुंडल पाहून व तें आपल्या पतीनेंच धाडलें आहे, असें ऐकून ती फार घाबरली. पापकर्म फार दिवस झांकून रहात नाहीं, म्हणून म्हणतात तें खरें, असें तिला वाटलें. ज्या रात्रीं सत्रशाळेत मला एक वाटसरू आढळला, त्याच रात्रीं तें तेथें गळून पडलें, व माझें शील पहाण्याकरितां गुप्तपणें आलेला माझा पतीच तो वाटसरू होय. पण मी त्याला ओळखिलें नाहीं. त्यावेळीं त्याचा वेषही निराळाच होता. त्याला हें भूषण सांपडलें. इत्यादि मनांतल्या मनांत विचार करणाऱ्या त्या पापिणीचें हृदय आंतल्याआंत फुटलें. तिच्या मुखावर काळिमा आलेली पाहून, तिच्या पित्यालाही संशय आला. त्यानें युक्तीनें तिचें रहस्य जाणणाऱ्या चेटीस प्रश्न कर-करून सत्यार्थ ओळखला, व दैवाला दोष देत तो स्वस्थ बसला. तिकडे राजपुत्रानेंही चक्रवर्तिराजाच्या सुंदर व शील-

संपन्न कन्येशीं विवाह केला. ती साक्षात् लक्ष्मीसारखी भार्या प्राप्त झाल्यामुळें त्याला परम सुख झालें.

सारांश, याप्रमाणें साहसप्रसंगीं स्त्रियांचें हृदय वज्रासारखें कठोर व भयभीत होण्याचा प्रसंग आला असतां पुष्पासारखें कोमल होतें.* उत्तम जातीच्या बांबूमध्यें जशीं मोत्यें, त्याप्रमाणें उत्तम कुलांत उत्पन्न झालेल्या कांहीं थोड्याशा स्त्रियाच सदाचरणानें स्वच्छहृदय व भूलोकाला भूषणभूत अशा निपजतात. राजलक्ष्मी हरिणीप्रमाणें सदा पळपुटी असते. सुज्ञ लोकच धैर्यरज्जूनें तिला कसें बांधावयाचें तें जाणतात. यास्तव संपत्तीची इच्छा करणारांनीं आपत्कालींही मानसिक धैर्य सोडूं नये. याविषयीं हा माझा वृत्तांतच साक्षात् उदाहरण आहे. मी अशा दुर्दशेंतही आपलें शील राखलें, व त्याचें फल तुमच्यासारख्या थोर लोकांची संगति मिळाल्यामुळें आज मला लाधलें.

याप्रमाणें त्या ब्राह्मणीच्या मुखांतून निघालेली कथा ऐकून देवी वासवदत्तेनें मोठ्या आदरानें मनांत असा विचार केला.—खरोखर ही बाई मोठी कुलीन दिसते. हिची चालरीत, आपल्या शीलाविषयीं प्रौढी व वाणीची उदारता यांवरूनच हिची प्रवीणता व्यक्त होते. असा विचार करून, ती देवी पुनः तिला म्हणाली,—"बाई तूं कोणाची पत्नी, व तुझा वृत्तांत काय आहे, तो मला सांग."–तेव्हां ती स्ववृत्त सांगूं लागली.

## ५. ब्राह्मणीचा वृत्तांत.

देवि, मालवदेशांत अग्निदत्त म्हणून एक लक्ष्मी–सरस्वतींचा आधारभूत ब्राह्मण होता. पुष्कळ याचक त्याच्यापासून धन नेत असत. त्याला त्याच्या सारखेच दोन पुत्र झाले. त्यांतील ज्येष्ठ शंकरदत्त व दुसरा शांतिकर. हे यशस्विनि, शांतिकर बालपणींच विद्येच्या इच्छेनें कोठें निघून गेला. त्याच्या ज्येष्ठ भावाचा माझ्याशीं विवाह झाला. मी यज्ञदत्ताची मुलगी. कांहीं दिवसांनीं माझा वृद्ध सासरा मरण पावला, व सासू सती गेली. तेव्हां आईबापांच्या शोकानें संतप्त झालेला माझा भर्ता मज गर्भवतीला घरांत ठेवून तीर्थयात्रेस गेला. सरस्वतीच्या तीरीं शो-

---

* तदित्थं साहसे स्त्रीणां हृदयं वज्रकर्कशम् ।
तदेव साध्वसावेगसंपाते पुष्पपेलवम् ॥

कानें पोळलेल्या त्याचेंही देहावसान झालें. तो माझ्या काळजाला झोंब-णारा वृत्तांत, त्याच्या बरोबर गेलेल्या लोकांनीं परत आल्यावर मला सांगि-तला. त्याबरोबर मी देहत्याग करणार होतें; पण गर्भवतीनें सहगमन करूं नये, असें शास्त्रवचन सांगून माझ्या आप्तांनीं मला तसें करूं दिलें नाहीं. मी त्या नवीन पतिवियोगानें व्याकुल झालें असतां, एकाएकीं चोरांनीं तो गांव व माझें घर लुटलें. फुटकी कवडीही घरांत राहूं दिली नाहीं. तेव्हां त्या चोरांच्या हातीं सांपडून शील भ्रष्ट होण्याचा प्रसंग येऊं नये, म्हणून मी, एका वस्त्रानिशीं तिघी ब्राह्मणींसह तेथून जीव घेऊन पळालें. दूर देशास जाऊन, त्या तिघीजणींसह एक महिनाभर मी मोलमजुरी करून जीव वांचविला. इतक्यांत वत्सराज अनाथांचा नाथ आहे, त्याच्याकडे गेल्यास तो तुमची योग्य संभावना करील, असें लोकांच्या तोंडून ऐकून मी त्या आपल्या सोबतिणींसह येथें आलें; पण इतक्यांत प्रसूत होऊन एकाच वेळीं मला हे दोन पुत्र झाले. महादेवि, माझ्या कपाळाची कहाणी कशी विचित्र आहे पहा. पतिशोक, देश-त्याग, दारिद्र्य, व हीं जुळीं पोरें; अशी दुःखपरंपराच भोगावी लागल्या-कारणानें, विधात्यानें माझ्या आपत्तींचे द्वारच उघडून दिलें आहे, असें वाटतें.* पण या बालकांच्या पोषणाला अन्य गतिच नाहीं, असें पाहून मी स्त्रियांचें भूषण अशी ही लज्जा सोडून, राजद्वारांत आलें व सभेंत जाऊन राजाची प्रार्थना केली. माझ्यासारख्या अतिलहान बालकांसह आपत्तींत पडलेल्या दुर्दैवी बाईला पाहून कोणाचें हृदय द्रवणार नाहीं? त्या दयाळु राजाच्या आज्ञेनें मी तुमच्यापाशीं आलें, व माझ्या सर्व विपत्ती नष्ट झाल्या. हा माझा वृत्तांत आहे. लहानपणापासून होमाच्या धुरानें माझे नेत्र लाल होऊं लागले, म्हणून पिंगलिका असें माझें नांव पडलें. देवि, बापाच्या घरांतून निघून परदेशांत गेलेला माझा दीर शांतिकर कोठें आहे, हें अद्यापि कळत नाहीं.

त्या ब्राह्मणीनें असा आपला वृत्तांत सांगितला असतां, देवी वासव-दत्ता, ती कुलीन व साध्वी आहे, असें समजूं लागली. ती त्या अनाथ स्त्रीवर प्रेम करूं लागली. आपला पुरोहितच हिचा दीर असावा, असा

---

* शोको विदेशो दारिद्र्यं द्विगुणः प्रसवोऽप्ययम् ।
अहो अपावृतं द्वारमापदां मम वेधसा ॥

तर्क करून ती म्हणाली,-" आमच्या येथें शांतिकर या नांवाचा एक विदेशी पुरोहित आहे. मला वाटतें, कीं तो तुमचा दीर असावा."- असो; त्या उत्सुक ब्राह्मणीला असें सांगून व ती रात्र घालवून, त्या देवीनें दुसऱ्या दिवशीं सकाळींच शांतिकराला आपल्या महालांत आणविलें; व त्याचा वंश विचारून त्यानेंही ब्राह्मणीनें सांगितलेलाच आपला वंश सांगितला असतां, राणीनें पुत्रवती भावजयीची व त्याची भेट करून दिली. तिच्या तोंडून सर्व वृत्तांत ऐकल्यावर आई, बाप, भ्राता, धन, इत्यादिकांच्या नाशामुळें आर्त झालेला शांतिकर, आपल्या मातृतुल्य वडील भावजयीस आपल्या येथें घेऊन गेला. सर्व मृतांस उद्देशून त्यांचें उचित और्ध्वदैहिक केल्यावर, दुःखित शांतिकरानें दोघां अल्प बालकांसह असलेल्या भातृपत्नीचें समाधान केलें. देवी वासवदत्तेनें त्या दोघां पुत्रांस आपल्या भावी पुत्राचे पुरोहित करण्याचा मनांत निश्चय केला. पुष्कळ द्रव्य खर्च करून वासवदत्तेनें त्या बालकांचें नामकरण स्वतः केलें. त्यांतील वडिल भावाचें नांव शांतिसोम व धाकट्याचें वैश्वानर ठेविलें. पूर्व कर्मच ज्याला पुढें होऊन आंधळ्याप्रमाणें, फलभूमीकडे नेत असतात, अशा प्राण्याचा प्रयत्न केवल निमित्त होत असतो.‡ असो; त्यानंतर राणीपासून ज्यांना पुष्कळ द्रव्य मिळालें आहे, अशी ती पुत्रवती ब्राह्मणी व शांतिकर तेथें सुखानें दिवस घालवूं लागले.

## ६. पुत्राकरितां आराधना व वरप्राप्ति.

कांहीं दिवसांनीं लहान लहान पांच पुत्रांसह मातीचीं भांडीं घेऊन आलेल्या एका कुंभारणीला पाहून, देवी वासवदत्ता जवळच असलेल्या, त्या ब्राह्मणीस म्हणाली,-" सखे पिंगलके, पहा, या बाईला पांच पुत्र आहेत; पण मला एकही नाहीं. त्यावरून मला असें वाटतें कीं, अशा प्रकारची ही पुण्यपात्र होय. माझ्यासारखी खचित पुण्यवती नव्हे."- त्यावर पिंगलका म्हणते,-देवि, असें म्हणूं नकोस. दरिद्री लोकांना पुष्कळ पापी संतती दुःख देण्याकरितांच होत असते. तुमच्यासारख्यांच्या उदरीं जो जन्म घेणार तो तसाच महापुण्यवान् असला पाहिजे. यास्तव

‡ अन्धस्येवास्य लोकस्य फलभूमिं स्वकर्मभिः ।
पुरोगैर्नीयमानस्य हेतुमात्रं स्वपौरुषम् ॥

उतावीळ होऊं नको, व खेदही करण्याचें कांहीं कारण नाहीं. तुला लवकरच योग्य पुत्ररत्न होईल. पिंगलकेनें असें सांगितलें तरी ती पुत्राविषयीं अतिशय उत्सुक झाली. तेव्हां राजा अंतःपुरांत येऊन म्हणाला,–" देवि, शंकराच्या आराधनेवांचून तुला पुत्र होणार नाहीं, असें नारदानें सांगितलें आहे. यास्तव सत्वर वर देणाऱ्या त्या प्रभूची तूं आराधना कर. "–त्याबरोबर तिनें व्रताचा संकल्प केला. तिनें व्रत धरतांच मंत्री, व त्यांचे आश्रित अशा सर्वांनीं शंकराची आराधना चालविली.

तीन अहोरात्र उपोषित राहिलेल्या त्या दंपतीस विभु शंकर प्रसन्न होऊन स्वप्नांत म्हणाला,–" तुम्ही आतां व्रत सोडून आपापल्या नित्य व्यवहाराला लागा. तुम्हांला लवकरच पुत्र होईल व माझ्या कृपेनें तो विद्याधरांचा राजा होईल."–असें सांगून चंद्रमौलि तत्काल गुप्त झाला असतां, तीं दोघेंही जागीं झालीं; एकमेकांस स्वप्नवृत्तांत सांगून कृतार्थ झालीं, व वरप्राप्तीमुळें त्यांस अतिशय आनंद वाटला. सकाळीं तो स्वप्नवृत्तांत मंत्र्यांस सांगून राजानें पारणें सोडलें. कांहीं दिवसांनीं कोणा जटिल पुरुषानें देवीच्या स्वप्नांत येऊन तिला एक फल दिलें. दुसऱ्या दिवशीं देवीच्या तोंडून तो वृत्तांत ऐकल्यावर, मंत्र्यांना सांगून, त्यांनींही त्याचें अभिनंदन केलें असतां, आपला मनोरथ आतां लवकरच सफल होणार असें वत्सराज समजूं लागला.

---

## तरंग २ रा.

### १. वासवदत्तेचें गर्भधारण.

थोड्याच दिवसांनीं वासवदत्ता गर्भवती झाल्याचीं चिह्नें दिसूं लागलीं. चंचल नेत्र व पांडुरवर्ण यांनीं युक्त असलेलें तिचें मुख गर्भस्थ कामाच्या प्रेमानें तिच्यापाशीं आलेल्या चंद्रासारखेंच भासूं लागलें. पुढें होणाऱ्या गर्भस्थ, विद्याधरांच्या ईश्वराची सेवा करण्याकरितां शरीरें धारण करून, आलेल्या साक्षात् विद्यांप्रमाणेंच सख्या तिची सेवा करूं लागल्या. ती जणुं काय गर्भस्थ पुत्राच्या अभिषेकाकरितांच पल्लवांनीं ज्यांचीं मुखें आच्छादित केलीं आहेत, अशा दोन कलशांप्रमाणें श्याममुख पयोधर

धारण करूं लागली. सुंदर गायन करणाऱ्या विद्याधरी आकाशांत उभ्या राहून आपली परिचर्या करीत आहेत, असें तिला स्वप्नांत दिसे. जागी झाल्यावरही स्वप्नांत पाहिलेलें तेंच संगीत पुनः पहावें, व ऐकावें अशी तिला इच्छा होई. यौगंधरायणही तिचा प्रत्येक हेतु (डोहाळा) राजापासून समजून घेऊन तो तिची इच्छा पुरी करीत असे. विमानादिकांच्या योगानें ती भाग्यवती राणी नगरवासी स्त्रियांना कौतुक वाटेल, अशा रीतीनें अंतराळीं विहार करीत असे. एकदां अंतर्गृहांत बसलेल्या तिला विद्याधरांच्या उत्तम कथा ऐकण्याची इच्छा झाली, तेव्हां त्या देवीनें प्रार्थना केली असतां, सर्वांच्या समक्ष मंत्री यौगंधरायण तिला पुढील कथा सांगूं लागला.

## २. जीमूतवाहनाची कथा.

देवि, हिमवान्-नामक गौरीला जन्म देणारा पर्वतराज आहे. त्यावर विद्याधरांच्या निवासस्थानीं, जीमूतकेतु नामक विद्याधरांचा राजा रहात असे त्याच्या येथें एक वडिलार्जित कल्पवृक्ष होता. त्याच्या घरांतील जो कोणी जें जें कांहीं इच्छीत असे, तें तें त्याला तत्काल त्याच्यापासून प्राप्त होई. एकदां तो राजा उद्यानांतील त्या देवरूपी वृक्षाजवळ जाऊन अशी प्रार्थना करूं लागला. हे देवा, तुझ्यापासून आम्हांला सर्व इष्ट प्राप्त होतें. यास्तव मज अपुत्राला एक गुणवान् पुत्र दे. तें ऐकून कल्पतरु म्हणाला, "राजन् पूर्वजन्माला आठवणारा (जातिस्मर) दानशूर, व सर्व लोकांचें हित करणारा असा एक पुत्र तुला होईल"–तें ऐकून तो राजा आनंदित होऊन व त्याला नमस्कार करून घरीं गेला, व आपल्या प्रियेलाही तें सांगून संतुष्ट झालेल्या तिच्यासह सुखानें राहूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याला पुत्र झाला. राजानें त्याचें नांव जीमूतवाहन ठेविलें. नंतर तो महाधीर जीमूतवाहन आपल्या स्वाभाविक भूतदयेसह वृद्धि पावला. क्रमानें तरुण झालेल्या त्याला यौवराज्य मिळालें. एकदां सेवेच्या योगानें संतुष्ट झालेल्या आपल्या पित्याला, तो एकांतात नम्रपणानें म्हणाला,–"बाबा, या संसारांतील सर्व पदार्थ नाशवंत आहेत. केवल महात्म्यांचें निर्मल यश कल्पपर्यंत स्थिर रहाणारें आहे, असें मी समजतों. परोपकारामुळें प्राप्त होणारें तें जर मिळालें, तर आणखी अधिक काय मिळावयाचें रहाणार? संपत्ती तर विजेप्रमाणें केवल लोकांच्या नेत्रांना

पीडा देते. त्यांच्यावर उपकार करीत नाहीं. यास्तव आपला जो हा कामना पूर्ण करणारा कल्पवृक्ष आहे, त्याचा जर दुसऱ्यांच्या कल्याणाकडे विनियोग केला, तर मोठें फल मिळेल. याच्या समृद्धीनें सर्व याचक श्रीमान् होतील, असें करण्याची माझी इच्छा आहे."—याप्रमाणें पित्याची प्रार्थना करून त्यानें अनुज्ञा दिली असतां, जीमूतवाहन कल्पवृक्षाजवळ जाऊन म्हणाला,–"देवा, तूं आम्हांला सतत अभीष्ट देणारा आहेस, यास्तव माझा आतां एवढा एकच मनोरथ पूर्ण कर. ही सर्व पृथ्वी दारिद्र्यरहित करून सोड. तुझें कल्याण होवो; जा, धनार्थी लोकांस मीं तुझें दान केलें आहे."–त्या धीरानें असें सांगितलें असतां कल्पवृक्षानें भूलोकीं अतिशय सुवर्णवृष्टि केली. त्यामुळें सर्व लोक श्रीमान् होऊन आनंद भोगूं लागले. कल्पवृक्षही याचकांस देऊन टाकणाऱ्या जीमूतवाहनासारखा दयाळु दुसरा कोण असणार? असें सर्व दिशा व उपदिशा यांमध्यें त्याचें निर्मल यश पसरलें. तेव्हां त्याच्या गोत्रजांना फार वाईट वाटलें. त्यांचा मत्सर वाढला व कल्पवृक्षाचा आधार नाहींसा झाल्यामुळें, त्याच्या पित्याचा पराभव सहज होईल असें वाटून ते सर्व युद्धास सज्ज झाले. तेव्हां उदार जीमूतवाहन पित्यास म्हणाला,–"बाबा, हें शरीर जलावरील बुडबुड्यांप्रमाणें आहे, व संपत्ती वाऱ्यांतील दिव्याच्या ज्योतीप्रमाणें आहे. हें जर आपल्याला ठाऊक आहे, तर त्यांच्याकरितां एकमेकांचा प्राण घ्यावयास कोणता सुज्ञ तयार होईल? मी तर या आपल्या गोत्रजांशीं कधींही लढणार नाहीं. उलट राज्य सोडून वनांत जाईन. हे कृपण लोक तरी सुखानें राहोत; कोणीकडून आपल्या कुलाचा क्षय न होवो"–असें बोलणाऱ्या पुत्राला जीमूतकेतु म्हणाला, "तूं जर वनांत जाणार तर मला वृद्धाला राज्य काय करावयाचें आहे? पित्याचें हें वचन ऐकून त्या दयाळु तरुण विद्याधरपुत्रानें तृणाप्रमाणें राज्य सोडून आईबापांसह मलयाचलावर गमन केलें. तेथें सिद्धांचें निवासस्थान असून, तेथील झरे चंदनवृक्षांनीं आच्छादित झाले होते. तेथें जाऊन तो आपल्या पूज्य मातापित्यांची सेवा करीत राहिला.

एकदां सिद्धांच्या विश्वावसुनामक राजाच्या मित्रावसु-पुत्राशीं त्याची मैत्री जमली. ज्ञानी जीमूतवाहनानें त्याच्या बहिणीला म्हणजे पूर्वजन्मींच्या आपल्या प्रियेला एकांतांत पाहिलें. तिनेंही त्याला पाहिलें.

त्याबरोबर जाळ्यांत सांपडलेल्या हरिणांच्या जोडप्याप्रमाणें त्या तरुणांचीं मनें परस्पर संबद्ध झालीं. एकदां संतुष्ट झालेला मित्रावसु, त्या त्रिजगत्पूज्य जीमूतवाहनाकडे येऊन एकाएकीं म्हणाला-" मित्रा, मलयवती म्हणून माझी धाकटी बहिण आहे, ती तुला द्यावी अशी माझी इच्छा आहे. तर तूं नाहीं म्हणूं नकोस."-तें ऐकून तो म्हणाला,-" मित्रा ती मागच्या जन्मींही माझीच भार्या होती, व तूंही माझ्या दुसऱ्या हृदयाप्रमाणें माझा मित्र होतास. मला पूर्वजन्माचें स्मरण आहे." त्यावर मित्रावसु म्हणाला- असें जर आहे तर मला आपल्या पूर्वजन्माचें वर्तमान सांग पाहूं. तें ऐकण्याची मला फार इच्छा आहे. तेव्हां त्याच्या म्हणण्यास मान देऊन जीमूतवाहन पुढील पूर्वकथा सांगूं लागला.

## ३. जीमूतवाहनाची पूर्वकथा.

पूर्वी मी आकाशचारी विद्याधर होतों. एकदां हिमालयाच्या शिखरावरून आकाशमार्गानें जात असलेल्या मला, खालीं गौरीसह क्रीडा करीत असलेल्या व उल्लंघन केल्यामुळें रागावलेल्या शंकरानें 'मानवयोनींत पड. तेथें हीच विद्याधरी तुझी भार्या होईल. तिच्या उदरीं झालेल्या पुत्रावर संसारभार टाकून, आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झाल्यावर, तूं पुनः विद्याधरांच्या वंशांत उत्पन्न होशील' असा उःशापासह शाप दिला. पुढें कांहीं दिवसांनीं मी भूलोकीं वलभीनामक नगरींतील श्रीमान् वैश्यांचा पुत्र झालों. माझ्या पित्यानें माझें नांव वसुदत्त ठेविलें. क्रमानें मी तरुण झालों. तेव्हां बाबांनीं सर्व सामग्री देऊन, मला व्यापार करण्याकरितां द्वीपांतरीं पाठविलें. पण अरण्यांतून जात असतांनां चोरांनीं हल्ला करून माझें सर्व धन लुटलें व मला बांधून आपल्या भिल्लवाडींत नेलें. तेथें एक चंडिकेचें मंदिर होतें. त्यांत त्यांचा नायक पुलिंदक देवीची पूजा करीत होता. तेथें बली देण्याकरितां ते मला घेऊन गेले; पण मला पहातांच पुलिंदकाच्या मनाला दयेचा पाझर फुटला. निष्कारण स्नेह करणारें मन पूर्वजन्मींचें प्रेम सुचवित असतें.§ त्या शबराधिपानें मला बंधमुक्त केलें व आपला बळी देऊन पूजा संपविण्याचें मनांत आणिलें. तेव्हां-" असें

§ वक्ति जन्मान्तरप्रीतिं मनः स्निग्धदकारणम् ।

साहस करूं नकोस, मी प्रसन्न झालें आहें, इष्ट वर माग"–अशी आकाशवाणी झाली. ती ऐकून तो म्हणाला,–"देवि, तूं प्रसन्न झाली आहेस, आतां याहून आणखीं अधिक काय मागूं? तथापि दुसऱ्या जन्मींही या वैश्यपुत्राशीं माझी मैत्री व्हावी; एवढी इच्छा आहे"–त्यावर 'तथास्तु' असें म्हणून ती वाणी शांत झाली असतां भिल्लराजानें, चोरांनीं लुटून आणलेल्या माझ्या धनांत आणखीं भर घालून तें मला परत दिलें, आणि मला आपल्या घरीं पोंचविलें. तेव्हां केवल प्रवासांतूनच नव्हे; तर मृत्यूच्या मुखांतूनही परत आलेल्या मला पाहून व सर्व वृत्तांत ऐकून माझ्या पित्यानें मोठा उत्सव केला.

कांहीं दिवसांनीं आमच्या राजानें प्रवाशांस उपद्रव देणाऱ्या पुष्कळशा भिल्लांस धरून आणविलें. त्यांत मला जीवदान देणारा, तो पुलिंदकही होता. त्यास पहातांच मी आपल्या पित्याची प्रार्थना केली, व राजाला एक लक्ष सुवर्ण-मुद्रिका देऊन त्याला सोडवून आणिलें. याप्रमाणें प्राण-दानरूपी उपकार करणाऱ्या त्याच्यावर तसेच प्रत्युपकार करून व मोठ्या प्रेमानें त्यास आपल्या घरीं आणून, पुष्कळ दिवस मी त्याचा उत्तम सत्कार केला व सेवा केली. त्यानंतर मोठा आदर करून त्याची रवानगी केली असतां, आपलें प्रेमळ चित्त मजपाशींच ठेवून तो भिल्लवाडीस गेला. तेथें पोंचल्यावर माझ्यावर प्रत्युपकार कसा करावा, या विचारांत तो पडला. मोत्यें, कस्तूरी इत्यादि जितके म्हणून मूल्यवान् पदार्थ त्याच्या-पाशीं होते, ते सर्व हलके व भेट देण्यास अयोग्य आहेत असें जाणून, हत्तींस मारून महामूल्यवान् मोत्यांचा हार आणण्याकरितां तो धनुष्य घेऊन एकटाच हिमालयावर गेला. तेथें भटकत असतांना त्याला एक पाण्यानें तुडुंब भरलेलें तळें आढळलें. त्याच्या कांठीं एक लहानसें रमणीय देवालय होतें. त्या तळ्याचें निर्मल व गोड पाणी पिण्याकरितां वनांतील हत्ती येण्याचा संभव आहे असें जाणून, त्यांस मारून त्यांच्या गंडस्थळांतील अमूल्य मोत्यें काढून घेण्याच्या इच्छेनें, तो धनुष्य सज्ज करून तेथें बसला. इतक्यांत त्या तीरस्थ मंदिरांतील शंकराची पूजा करण्याकरितां एक साक्षात् गौरीसारखीच अतिसुंदर कन्या सिंहावर बसून येत आहे, असें त्याला दिसलें. तिला पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तो आपणाशींच म्हणाला,–"ही कोण? कोणी मानुषी आहे म्हणून

म्हणावें, तर ही सिंहावर कशी बसूं शकली? बरें कोणी दिव्य स्त्री आहे म्हणून म्हणावें, तर माझ्यासारख्या पाप्याच्या दृष्टीस कशी पडली? अथवा माझ्या पूर्वपुण्याचा हा परिणाम असेल. मी जर माझ्या मित्राला ही दिव्य कन्या मिळवून देऊं शकलों, तर खरोखरच त्याच्यावर अकल्पित प्रत्युपकार केल्यासारखें होईल. आतां आपण अगोदर हिच्याजवळ जाऊन हिचा आशय समजून घेऊं या."–असें म्हणून तो माझा शबर मित्र हळु हळु तिच्याजवळ जाऊं लागला, तो समीप जाईपर्यंत ती सुंदरी सिंहावरून उतरून तळ्यांतील कमळें तोडूं लागली होती. जवळ येऊन प्रणाम केलेल्या त्या शबर अतिथीचें तिनें हंसत स्वागत केलें, व 'तूं कोण आणि या दुर्गम स्थळीं कसा आलास' असा प्रश्न केला. तेव्हां शबर म्हणाला–देवि, मी भवानीच्या चरणाचा दास एक शबराधिप आहें. हत्तींच्या गंडस्थळांतील मोत्यांकरितां मी या वनांत आलों आहें; कारण आशावानाला दुर्गम स्थल कोणचें असणार? पण तुला पाहून मला जीवदान देणाऱ्या माझ्या वसुदत्त नामक वैश्यपुत्र-मित्राची आठवण झाली. सुंदरि, तो तुझ्याप्रमाणेंच रूप व यौवन यांच्या योगानें सर्व विश्वाच्या नेत्रांस अद्वितीय आनंद देणारा आहे. मैत्री, दान, दया, धैर्य इत्यादि गुणांचा मुख्य आधारच असा तो, जिचा कंकणयुक्त हस्त ग्रहण करील, तीच कन्या त्रिभुवनांत धन्य होय. ह्या तुझ्या आकृतीचा त्याच्याशीं समागम न झाल्यास मदन आपलें धनुष्य व्यर्थ वहातो, असें मी समजेन.

व्याधाच्या या भाषणानें लागलेंच तिचें मन त्याच्याकडे वेधलें. ती कुमारी तत्क्षणीं मदनवश झाली, व त्याला म्हणाली,–"तुझा तो मित्र कोठें आहे? त्याला येथें आणून भेटीव."–तिचें हें आनंददायक वचन ऐकून आपल्याला कृतार्थ समजणारा तो शबर 'बरें आहे; थोडयाच दिवसांत त्याला येथें आणतों'–असें तिला सांगून व तिचा निरोप घेऊन तेथून निघाला. आपल्या शबरवाडयास येऊन पुष्कळ धन, अमूल्य रत्नें आणि कस्तूरी घेऊन तो माझ्या येथें आला. त्यानें बरोबर आणलेली लक्षावधि रुपयांची देणगी माझ्या बापाला समर्पण केली. तेव्हां माझी आई, बाप इत्यादि सर्वांनीं त्याचा मोठा सत्कार केला. द्रव्यासारखी अतिप्रिय वस्तु देणारा मनुष्य कोणाला अप्रिय होणार आहे? तो दिवस

आम्ही मोठ्या उत्साहानें घालविला. रात्रीं मी एका स्वतंत्र जागेंत त्या माझ्या मित्रासह निजावयास गेलों असतां, तेथें दुसरें कोणी नाहीं, असें पाहून त्यानें मला त्या कन्येचा सर्व वृत्तांत सांगितला, व 'चल, आपण तिच्याकडे जाऊं या' असें म्हणून अति उत्सुक झालेला तो माझा मित्र मला घेऊन रातोरात निघाला. आम्हीं दूर निघून गेल्यावर प्रातःकाळीं मी शबर मित्रासह घरांतून कोठें गेलों आहें, असें माझ्या पित्याला व इतर संबंधी लोकांना कळलें; पण त्यांचा आम्हां दोघांवरही मोठा विश्वास असल्यामुळें, त्यांनीं आमच्याविषयीं फारशी चिंता केली नाहीं. पुढें आम्ही त्वरेनें हिमालयास जाऊन पोंचलों. तेथील तळ्यापर्यंत जात आहोंत तों सूर्यास्त झाला. तेव्हां त्यांत स्नान-संध्यादि कर्मे आटोपून व तेथलींच मधुर फळें व मुळें खाऊन, आम्हीं ती रात्र त्या वनांत घालविली. मित्रा, उत्कंठेमुळें ती रात्र किती लांब झाल्यासारखी वाटली म्हणून सांगूं? पण, उजाडल्यावर तर कांहीं विचारूंच नकोस. माझें मन वारंवार त्या माझ्या मित्रानें दाखविलेल्या मार्गाकडे धावूं लागलें. तिची आतां येण्याची वेळ झाली आहे, असें शबरानें जेव्हां सांगितलें, तेव्हां तर तें अगदीं तिकडेच लागून राहिलें. डोळे आपली उघडझांप विसरून त्या दिव्य स्त्रीला हाही दिव्य पुरुष आहे, असें वाटावें म्हणूनच जणुंकाय स्थिर झाले. कांहीं वेळानें 'हां सावध हो, ती आली बरें!' असें सुचविण्याकरितांच जणुंकाय माझा उजवा डोळा फडफडूं लागला, व समोर भव्य आयाळानें युक्त असलेल्या सिंहावर बसून येत असलेली ती सुंदरी शरदृतूंतील मेघांशीं संबद्ध झालेल्या चंद्रकले-प्रमाणें दिसली. विस्मय, औत्सुक्य व भय यांचा एकाच वेळीं उद्रेक झाल्या कारणानें त्या क्षणीं माझें हृदय कसें झालें होतें, हें कांहीं मला सांगतां येत नाहीं. असो, त्या तळ्याच्या कांठीं पोंचल्यावर ती कन्या सिंहावरून उतरली. पुष्पें वेंचून व स्नान करून तिनें तेथल्या शंकराचें पूजन केलें. तो माझा मित्र तिच्या समोर गेला. त्यानें तिला प्रणाम केला, व तिनें त्याचें स्मितमुखानें स्वागत केलें. नंतर तो म्हणाला,— "देवि, माझ्या मित्राला मी येथें आणलें आहे, तूं सांगशील तर तुला भेटवितों." त्यावर मोठ्या उत्सुकतेनें 'जा, त्यानां घेऊन ये.' असें तिनें म्हटलें असतां, तो मला तिच्याजवळ घेऊन गेला. मला पहातांच तिचे

नेत्र प्रेमानें आर्द्र व लज्जेनें संकुचित झाले. मजकडे वांकड्या दृष्टीनें मनमुराद पाहून ती शबरास म्हणाली,—"हा तुझा मित्र खरोखरच मनुष्य आहे, की मला टकविण्याकरितां आलेला कोणी देव आहे? कारण मनुष्याची आकृति इतकी रमणीय नसते."—तें ऐकून मीच पुढें सरून म्हटलें, "सुंदरि, मी खराच मनुष्य आहें. तुझ्यासारख्या सरळ मनाच्या स्त्रीशीं कपट करून आम्हांला काय घ्यावयाचें आहे? मी वलभी नगरांतील महाधन नामक श्रीमान् वैश्याचा शंकराच्या वरामुळें झालेला, पुत्र आहें. माझ्या पित्यानें पुत्राच्या इच्छेनें उग्र उपस्या करून त्या भक्तानुकंपी ईशाची आराधना केली; तेव्हां—'वत्सा, ऊठ, तुला कोणी महात्मा पुत्र होईल'—असें त्या प्रसन्न झालेल्या देवानें माझ्या बापाच्या स्वप्नांत येऊन सांगितलें. त्यावर पूर्ण श्रद्धा ठेवून व तपाची समाप्ति करून, माझा पिता आपला व्यापार-धंदा पाहूं लागला. कांहीं दिवसांनीं मी वसुदत्त नांवाचा पुत्र त्याला झालों. हा शबरपति, मी मोठा होऊन व्यापाराकरितां देशांतरास जातांना मजवर प्राणान्त संकट आलें असतां, त्यांतून मला सोडवून माझा मित्र झाला."—असा खरा वृत्तांत सांगून मी मुकाट्यानें बसलों असतां, लज्जेनें जिनें आपलें मुख खालीं घातलें आहे, अशी ती कन्या मला म्हणाली—"तुमचा वृत्तांत अगदीं खरा आहे. मलाही गेल्या रात्रीं शंकरानें 'उद्यां सकाळीं तुला पति मिळेल,' असें स्वप्नांत सांगितलें होतें. यास्तव आपण माझे प्राणनाथ व हा शबरपति माझा भ्राता होय,"—असें म्हणून वागमृतानें मला तृप्त केल्यावर ती गप बसली. त्यानंतर माझ्या मित्रानें तिच्याशीं विवाहाविषयीं संकेत करून, माझ्या घरी जाण्याचें ठरविलें. त्याबरोबर तिनें खुणेनें आपल्या सिंहासनाजवळ बोलावून "प्राणनाथ, यावर बसा;" असें मला म्हटलें. तें ऐकतांच माझ्या मित्राला विचारून मी त्या केसरीवर बसलों व त्या प्रियेला मांडीवर घेऊन आपल्या घराकडे जावयास निघालों. माझा मित्र आमच्या पुढें पायीं चालला होता. त्या दिवशीं दुपारीं व रात्रीं त्या भिल्लांच्या राजानें आपल्या बाणानीं मारलेल्या हरिणाच्या मांसावरच आम्हांला निर्वाह करावा लागला. दुसऱ्या दिवशीं आम्ही वलभीला पोंचलों. मी सिंहावर बसून सस्त्रीक येत आहें व माझा मित्रही पुढें आहे, असें पाहून विस्मित झालेल्या लोकांनीं पळत जाऊन, तो वृत्तांत माझ्या बापाला

सांगितला. तेव्हां तोही त्वरेनें मला पहावयास पुढें आला. त्याबरोबर मी सिंहावरून उतरलों, व त्याला नमस्कार केला. त्यानें माझें अभिनंदन केलें व मला योग्य असलेल्या त्या कन्येनें वंदन केलें असतां, तिचाही उचित सत्कार केला. नंतर आम्हांला घरीं नेऊन व सर्व वृत्तांत ऐकून, शबराधीशाच्या स्नेहाची अतिशय प्रशंसा केल्यावर, पित्यानें मोठा उत्सव केला. त्यानंतर जोशांनीं सांगितलेल्या शुभ दिवशीं सर्व आप्त व इष्ट यांच्या समक्ष मी यथाविधि तिच्याशीं विवाह केला. तेव्हां सर्वांच्या समक्ष तो सिंह एकाएकीं पुरुषाच्या आकाराचा झाला; व हा काय चमत्कार आहे, असें म्हणून सर्व पहात आहेत तों, दिव्य वस्त्रें आभरणें यांनीं युक्त असलेला तो पुरुष मला असें म्हणाला,–" मी चित्रांगद नांवाचा विद्याधर व ही मला प्राणांहून अधिक प्रिय असलेली माझी कन्या मनोवती, हिला खांद्यावर घेऊन मी अरण्यांतून फिरत असतांनां, एकदां जिच्या तीरीं पुष्कळ तपोवनें आहेत अशा गंगेवर आलों. तपस्यांचें उल्लंघन घडूं नये, म्हणून मी तिच्या मधूनच अंतराळीं जात होतों; पण दैव प्रतिकूळ झालें म्हणजे प्रयत्नाचें कांहीं चालत नाहीं, या न्यायानें माझी पुष्पमाळाच गंगाजलांत पडली. तेथें नारदमुनि पाण्यांत उभा राहून तपश्चर्या करीत होता. एकाएकीं पाठीवर पडलेल्या माळेला पाहून त्या शांत ऋषीलाही कोप आला; व 'अरे पाप्या, तूं इतका उद्धट झाला आहेस काय? बरें आहे. सिंह होऊन याच आपल्या कन्येला पाठीवरून वहात हिमालयावर फिरत रहा. जेव्हां कोणी प्रभावशाली मनुष्य हिला वरील, तेव्हां हिचा विवाहविधि पाहूनच तूं पुनः विद्याधर होशील.' असा शाप देऊन पुनः ध्यान करूं लागला. त्या दिवसापासून मी हिमालयावर शंकर पूजनांत तत्पर असलेल्या या कन्येचें संरक्षण करीत राहिलों होतों. आज या शबराधिपतीच्या यत्नानें हें कल्याण कसें झालें आहे हें तुला ठाऊकच आहे. तर आतां मी जातों. तुझें कल्याण होवो. आज माझा शाप निवृत्त झाला आहे. असें म्हणून तो आकाशांत उडून गेला. त्याचें तें अद्भुत वृत्त ऐकून स्तुत्य संबंधामुळें आनंदित झालेल्या माझ्या बाबांनीं मोठा उत्सव केला. सहज मित्रांचें चरित्र अचिंत्य असतें. ते प्राणदान करूनही मित्रांवर उपकार करितात

व इतकें करूनही तृप्त होत नाहींत.* आमच्या त्या नगरांतील सर्व लोक व राजाही त्याच्या या श्लाघ्य वर्तनानें व आमच्या मैत्रीनें परम संतुष्ट झाला. माझ्या पित्याच्या प्रशंसेनें व आग्रहामुळें राजानें रत्नांची मोठी भेट देणाऱ्या त्याला सर्व अरण्याचें राज्य समर्पण केलें.

त्यानंतर मनोवती भार्या व शबरराज मित्र यांसह मी सुखानें काल घालवूं लागलों. शबरराज स्वदेशावरील प्रेम कमी करून बहुशः आमच्या येथेंच रहात असे. त्यामुळें आम्हां दोघां मित्रांचा काल आम्हांला न समजतां जाई. पुढें मनोवतीच्या ठायीं मला सर्व जनांच्या हृदयास आनंद देणारा पुत्र झाला. त्याचें नांव हिरण्यदत्त. तो क्रमानें मोठा व विद्वान् झाला. त्याचा विवाह केला व तो संसार करूं लागला आहे, असें पाहून माझ्या वृद्ध आईबापांनीं आपलें जीवित सफल झालें आहे, असा मनांत विचार करून देहत्याग करण्याकरितां भागीरथीच्या कांठीं गमन केलें. त्यामुळें मला फार दुःख झालें. पण आप्तांनीं धैर्य दिल्यामुळें मी गृहकृत्यांत मन घालूं लागलों. एकीकडे मनोवतीच्या मोहक मुखचंद्राचें दर्शन व दुसरीकडे शबरराजाची संगति, मला सहजच अत्यानंद देत असत.

अशा अवस्थेंत बराच काल गेला. आमच्या शरीराला जरेनें जर्जर केलें. तेव्हां आपला पुत्र कुटुंबपोषणास समर्थ आहे, असें पाहून व त्याच्यावर सर्व भार टाकून स्त्रीसह मी कालिंजर पर्वतावर गेलों. माझा मित्रही राज्य व स्वजन यांचा त्याग करून माझ्या मागून तेथेंच आला. तेथें जातांच मला शंकराचा शाप व आपली विद्याधरांची जाति आठवली. तेव्हां माझ्या त्या जिवलगांनांही तें वृत्त सांगून व अन्य जन्मींही त्यांचा समागम व्हावा अशी दृढ इच्छा धरून, मनांत शंकराचें स्मरण करीत, त्या पर्वतशिखरावरून पत्नी व मित्र यांसह मी देहपात केला. तोच हा मी आतां पूर्वजन्माला स्मरणारा जीमूतवाहन विद्याधर झालों आहें. तूंच तो शबरपति व ही मृगनयना मलयवतीच माझी प्रिया मनोवती होय. असा खरा पूर्व वृत्तांत असल्यामुळें मला तिच्याशीं विवाह करणें इष्टच आहे.

---

* को हि निर्व्याजमित्राणां चरितं चिन्तयिष्यति ।
सुहृत्सु नैव तृप्यन्ति प्राणैरप्युपकृत्य ये ॥

पण आधीं तूं माझ्या आईबापांना सांगून त्यांची संमति घे. त्यांच्या आज्ञेनेंच आम्हांला हें कार्य साधलें पाहिजे.

### ४. परोपकारार्थ जीमूतवाहनाचें आत्मनिवेदन.

जीमूतवाहनाच्या तोंडचा हा सर्व इतिहास ऐकून मित्रावसूला मोठा आनंद वाटला. त्यानें जीमूतकेतूला आपला मनोरथ कळविला व त्याचें अनुमोदन घेऊन, आपल्या आईबापांच्या आज्ञेनें भगिनीच्या विवाहाची तयारी चालविली. योग्यसमयीं विवाह झाला. त्याप्रसंगीं सिद्ध व विद्याधर यांनीं मोठा उत्सव केला. विवाहानंतर महावैभवसंपन्न जीमूतवाहन आपल्या प्रियपत्नीसह त्या मलयाद्रीवर आनंद भोगीत राहिला असतां, एकदां तो श्वशुरपुत्र-मित्रावसूसह समुद्रतीरावरील वनें पहावयास गेला. तेव्हां तेथें त्याला एक तरुण पुरुष दिसला. तो स्वतः अतिशय उद्विग्न असून 'हा पुत्रा' असें म्हणून आक्रोश करणाऱ्या आपल्या आईला परतवीत होता त्याच्याबरोबर एक शिपायीही होता. त्यानें त्याला एका उंच शिलातलावर आणून सोडलें. त्या दीनाला पाहून जीमूतवाहन म्हणाला,-"अरे बा पुरुषा, तूं कोण आहेस? तुझी माता तुझ्याकरितां शोक कां करीत आहे?"-हा त्याचा करुण प्रश्न ऐकून तो पुरुष आपला सर्व वृत्तांत सांगूं लागला.

### ५. शंखचूड नागाची दुःखप्रद उपकथा.

मागें कश्यपाच्या कद्रू व विनता अशा दोन भार्या होत्या. एकदां एकमेकींशीं गोष्टी बोलत असतांना, सूर्याच्या घोड्यांच्या रंगाविषयीं त्या वाद करूं लागल्या. कद्रू म्हणाली, कीं त्यांचा रंग काळा आहे व विनता म्हणाली, कीं नाहीं, त्यांचा वर्ण पांढरा आहे. त्यांनीं पैज मारली. जिचें म्हणणें खोटें ठरेल तिनें दुसरीची दासी व्हावें, असें ठरलें. त्यानंतर कद्रूनें विजयाच्या इच्छेनें आपल्या विषारी नागांच्या (पुत्राच्या) विषयुक्त फुस्करण्याच्या योगानें सूर्याच्या घोड्यांस श्यामकर्ण करविलें, व जवळ नेऊन तिला दाखवून कपटानें आपली दासी केलें. खरोखर स्त्रियांची असहिष्णुता मोठी कष्टकर असते.‡ गरुडाला जेव्हां हा वृत्तांत कळला, तेव्हां सौम्यपणानेंच त्यानें आपल्या सावत्र मातेची प्रार्थना करून आपल्या आईला दास्यांतून मुक्त करावयास सांगितलें. तेव्हां कद्रूच्या

‡ कष्टा हि स्त्रीणामन्यासहिष्णुता ।

पुत्रांनीं पुष्कळ विचार करून त्याला म्हटलें,—" विनतापुत्रा, देवांनीं समुद्रमंथन चालविलें आहे. त्यांतून निघणारें अमृत जर तूं आम्हांला आणून देशील, तर आम्ही तुझ्या आईला तत्काल दास्यमुक्त करूं"–हें त्यांचें म्हणणें मान्य करून गरुड क्षीरसागरापाशीं गेला. तेथें मोठा पराक्रम करून त्यानें अमृताचा घट हरण केला. तें त्याचें वीर्य पाहून अतिशय प्रसन्न झालेला भगवान् नारायण त्याला म्हणाला–खगेश्वरा, इष्ट वर माग. तें ऐकतांच आपल्या आईला दासी केल्यामुळें नागांवर अतिशय रागावलेला गरुड, नागांनीं माझें भक्ष्य व्हावें, असा वर मागूं लागला. तेव्हां 'तथास्तु' असें म्हणून हरीनें त्याचे मनोरथ पूर्ण केले. नंतर त्याचा दुःखदायक वृत्तांत ऐकून घेऊन स्वपराक्रमानें अमृतघट जिंकून घेतलेल्या त्याला इंद्र म्हणाला,–" पक्षींद्रा, पण तूं अशी कांहीं युक्ति कर, कीं त्या मूढांना हें अमृत पितां येणार नाहीं. कारण बाबारे, दुर्जनांप्रमाणें असलेल्या त्यांना अमृत जरी पाजलें, तरी त्याचें विषच होणार हें ध्यानांत धर. मीही सत्वर तुझ्या मागोमाग येऊन हा सुधाकलश त्यांच्यापासून हिरावून घेतों."

हें इंद्राचें इष्ट वचन ऐकून, व 'ठीक आहे' असें म्हणून गरुड अमृतकलश घेऊन नागांकडे गेला, व वरप्रभावानें गरुडास भिऊं लागलेल्या नागांना तो पक्षींद्र म्हणाला,–" हें अमृत मीं आणलें आहे; पण आधीं माझ्या मातेला दास्यांतून मुक्त करून नंतर तुम्ही तें घ्या. तुम्हांला माझा विश्वास येत नसला, तर मी हे दर्भ हांतरून त्यावर ठेवितों. मी आपल्या आईला घेऊन गेलों म्हणजे तुम्ही त्यांचा यथेच्छ उपभोग घ्या."–असें सांगून, त्यांच्याच संमतीनें, गरुडानें तो घट दर्भाच्छादित–भूमीवर ठेविला. त्यांनीं त्याच्या आईला सोडलें. तो तिला घेऊन तेथून निघाला व ते मूर्ख नाग अमृत–पान करण्यास तयार झाले. पण इतक्यांत इंद्रानें झडप घालून तो घट लांबविला. तेव्हां दुर्दैवी पुरुषाप्रमाणें 'हें काय झालें,' असें म्हणून तोंडें वांसून बसण्यापलीकडे त्यांना कांहींच करितां येण्यासारखें नव्हतें. कपटाचा परिणाम शुभ कसा होईल? पण लोभ मोठा कठीण आहे. अमृताचें निधान जरी गेलें, तरी त्याचा अंश खालीं सांडला असेल, अशा भ्रमानें ते खुळे नाग दर्भांनाच चाटूं लागले. त्यामुळें अमृत तर लाधलें नाहींच, पण उलट सगळ्यांच्या जिभा मधोमध

उभ्या कापून, त्यांना त्या दिवसापासून द्विजिह्व हें यथार्थ नांव प्राप्त झालें. जगांत छीः थूः, होणें यावांचून लोभ्यांना आणखी कोणतें फल मिळणार ?*

तेव्हांपासून हरीनें ज्याला वर दिला आहे, असा गरुड पूर्ववैर आठवून अमृताचा लेशही न मिळालेल्या नागांवर वारंवार झडप घालून त्यांस खाऊं लागला. तो जेव्हां जेव्हां भराऱ्या मारीत येत असे, तेव्हां तेव्हां सर्व पाताललोक भयानेंच निर्जीव होई. गर्भिणींचे गर्भपात होत व सर्पांचा भयंकर उच्छेद होई. प्रत्यहीं होत असलेला हा अनर्थ पाहून, सर्व नागलोकच नष्ट होतो कीं काय, असें समजणारा वासुकी, नागांच्या जीवनाकरितां कोणता उपाय योजावा, म्हणून विचार करूं लागला; पण गरुडाचें वीर्य अनिवार्य आहे, असें जाणून त्याचीच प्रार्थना करणें त्याला भाग पडलें. 'पक्षींद्रा, तुझ्या आहाराकरितां प्रतिदिवशीं एक एक नाग मी समुद्रतीरावरील एका विस्तीर्ण शिलेवर पाठवीत जाईन. त्याला खाऊन तूं आपला निर्वाह करावास व पाताळांत येऊं नयेस. यांत दोघांचेंही हित आहे; कारण तूं एकदमच जर सर्वांना खाशील तर पुढें तुला भक्ष्य कोठून मिळेल ? व प्रजाच जर नाहीं, तर मी राजा तरी कोणाचा ? यास्तव ही माझी प्रार्थना तूं मान्य कर.'-असें वासुकीनें मोठ्या नम्रपणानें सांगितलें असतां, गरुडानेंही 'तथास्तु' असें म्हणून त्याला आपलें अनुमोदन दिलें. त्या दिवसापासून वासुकीनें पाठविलेल्या एकाच नागाला खाऊन गरुड रहात असतो. हा क्रम आज पुष्कळ दिवस चालला आहे. आज माझा वार आला आहे. माझें नांव शंखचूड. वासुकीच्या आज्ञेने मी या शिलेपाशीं गरुडाचा आहार होण्याकरितां त्याच्या सेवकांबरोबर आलों आहें, व ही माझी माता माझ्याकरितां रडत आहे.

ही कथा ऐकून दुःखित झालेला जीमूतवाहन म्हणाला,-"वा; वासुकी किती तरी निःसत्त्व राजा आहे ! तो आपल्या हातानें आपल्या प्रजेला शत्रूच्या तोंडीं देतो, हें आश्चर्य नव्हे का ? यापेक्षां त्यानें आपल्यालाच अगोदर गरुडाच्या स्वाधीन कां नाहीं केलें. ? गरुड तरी कश्यप मुनीचा पुत्र होऊन हें पाप कां करितो ! हर हर ! देहाकरितां मोठमोठ्यांनाही कसा मोह पडतो, तो पहा.† असो; शंखचूडा, मी आपलें

* हास्यादते किमन्यत्स्यादतिलौल्यवतां फलम् ।

† देहमात्रकृते मोहः कीदृशो महतामपि ।

शरीर देऊन तुला आज गरुडापासून सोडवितों. तूं खेद करूं नकोस."–तें ऐकून शंखचूडही मोठ्या धैर्यानें म्हणाला, "छे, छे; महाराज, आपण असें अभद्र भाषण करण्याचें मनांतही आणूं नये. कांचेकरितां महामणि गमावणें कधींही युक्त नव्हे.* माझी अपकीर्ति झालेली ऐकणें मलाही इष्ट नाहीं."–असें म्हणून जीमूतवाहनाचा त्यानें निषेध केला. व आतां गरुडाची यावयाची वेळ झाली आहे, असें जाणून तो–अंतसमयीं समुद्रतीरीं असलेल्या गोकर्णसंज्ञक शिवास नमस्कार करावा, अशा उद्देशानें तिकडे गेला. तो निघून गेला असतां त्याच्या रक्षणाकरितां आत्मदान करण्यास हा चांगला अवसर मिळाला आहे, असें जाणून करुणासागर जीमूतवाहनानें, शंखचूडाची गोष्ट विसरल्यासारखें करून, युक्तीनें मित्रावसूला कांहीं कामाकरितां घरीं परत पाठविलें. तों गरुडाच्या पंखांच्या वाऱ्यानें तें सर्व अरण्य हालूं लागलें. तेव्हां त्याचें धैर्यरूपी आश्चर्य पाहून भूदेवीच कांपत आहे, असा भास झाला. तीं चिन्हें पाहून गरुड येत आहे, असें जीमूतवाहनालाही वाटलें, व तत्काल तो परोपकारी विद्याधर नेमलेल्या शिलेवर चढून उभा राहिला. इतक्यांत गरुडानेंही झडप घालून त्याला चोंचींत धरून नेलें. चंचूप्रहारामुळें त्याच्या शरीरांतून रक्तधारा वाहूं लागली. तिच्या योगानें ती शिला व ज्या मार्गानें गरुड गेला तो मार्ग, रक्तचिन्हित झाला. असो; शेवटीं त्याला पर्वतशिखरावर नेऊन विनतानंदन खाऊं लागला असतां आकाशांतून पुष्पवृष्टि झाली, व तिला पाहून गरुड विस्मित झाला.

इकडे शंखचूडही गोकर्णास नमस्कार करून भगवच्चिंतन करीत त्या शिलेजवळ आला. पण ती रक्तानें भरली आहे, असें पहातांच "अरेरे, धिक्कार असो; मोठाच प्रमाद घडला. त्या महात्म्यानें मजकरितां स्वशरीर गरुडाला खचित अर्पण केलें असावें.' असें मनांत म्हणून व अजून तरी त्याला शक्य असल्यास त्या साहसापासून सोडवावें. असा विचार करून तो गरुडाच्या मागोमाग ती रक्तधारा पहात त्वरेनें निघाला.

गरुडानेंही आपण ज्याला आज खाण्याकरितां उचलून आणिलें, तो तर मोठ्या आनंदांत असल्यासारखा दिसत आहे, याचें कारण काय?

---

* न काचस्य कृते जातु युक्ता मुक्तामणेः क्षतिः।

हा कोणी दुसराच तर नसेल ? पण मी खात असतांनाही हा दुःखित न होतां आनंदच मानीत आहे, याचें कारण काय ?, असा विचार करीत त्याला सोडलें तें पाहून जीमूतवाहन, अंग क्षतयुक्त होऊन त्यांतून रक्त वहात असतांनांच, आपला मनोरथ सिद्ध व्हावा म्हणून त्याला म्हणाला,-" पक्षिराज, माझ्या शरीरांत अजून पुष्कळ रक्त व मांस आहे. आणि तुझी तृप्ति झाली आहे, असेंही दिसत नाहीं. मग अकस्मात् मला भक्षण करावयाचें सोडून तूं असा स्वस्थ कां बसतोस."-त्यावर आश्चर्य-चकित झालेला नागशत्रु त्याला म्हणाला-हे महासाधो, तूं कोण आहेस ? नाग तर खचित नव्हेस. तेव्हां जीमूतवाहन म्हणाला-मी नागच आहें; तूं मला सत्वर खाऊन टाक. धीर पुरुष आरंभलेलें कार्य समाप्त केल्या-वांचूनच कधीं तरी सोडतात काय ?* हें दुरूनच ऐकून त्वरेनें येत असलेला शंखचूड म्हणाला-नको, नको, गरुडा, त्याला खाऊं नकोस. तो नाग नव्हे. हा मी नाग तुझ्या आहाराकरितां आलों आहें. त्याला सोड. तुला आज हा असा भ्रम कसा झाला ?

तें ऐकून पक्षिराजाला मोठाच अचंबा वाटला, व जीमूतवाहन आपला हेतु तडीस जात नाहीं, म्हणून अतिशय खिन्न झाला. नंतर नागाला विचारल्यावर सर्व गोष्टींचा उलगडा होऊन गरुडाला मोठा पश्चात्ताप झाला. तो म्हणाला,-" माझ्या हातून आज हा मोठाच प्रमाद घडला. अथवा उन्मार्गगामी लोकांच्या हातून असलीं घोर पातकें होणें साहजिकच† आहे, दुसऱ्याकरितां प्राण देऊन, या मोहानें अंध झालेल्या जगाला तुच्छ करून सोडणारा, हा महात्मा मात्र अत्यंत स्तुत्य आहे."-असें म्हणून पापशुद्ध्यर्थ अग्नींत प्रवेश करण्यास तो तयार झाला त्याला जीमूतवाहन म्हणाला,-" पक्षिराज असा खेद कशाला करतोस ? तूं जर खरोखरच पापाला भीत असशील, तर आजपासून भुजंगांना खाऊं नकोस. व आजपर्यंत खालेल्याविषयीं पश्चात्ताप कर. हेंच उत्तम प्रायश्चित्त असून बाकी सर्व व्यर्थ आहे."-सर्व भूतांवर दया करणाऱ्या विद्याधरानें असें सांगितलें असतां, संतुष्ट झालेल्या गरुडानें गुरुवचनाप्रमाणें त्याच्या त्या हितोपदेशाचा अंगीकार केला; आणि त्याचें क्षतयुक्त अंग व्रणरहित

---

* आरब्धा त्यसमाप्तैव किं धीरैस्त्यज्यते क्रिया ।

† किं वा सुलभपापा हि भवन्त्युन्मार्गवृत्तयः

करण्याकरितां व आजपर्यंत खाल्लेल्या सर्पांस जिवंत करण्याकरितां अमृत आणण्याचे उद्देशानें तो स्वर्गलोकीं गेला. तों इतक्यांत मलयवतीच्या भक्तीनें संतुष्ट होऊन आलेल्या गौरीनें, आपल्या हातानें जीमूतवाहनावर अमृतवर्षाव केला. तेव्हां अर्थातूच त्याचें शरीर पूर्वीपेक्षांहि सुंदर झालें. देव आकाशांत दुंदुभी वाजवूं लागले. गरुडही अमृत घेऊन आला व विद्याधर अगोदरच अक्षतशरीर झाला आहे, असें पाहून त्यानें समुद्राच्या तीरावर अमृतवृष्टि केली. त्यामुळें मेलेले सर्व नाग पुन: जिवंत झाले, व आपल्यावर अवर्णनीय उपकार करणाऱ्या जीमूतवाहनास भेटण्याकरितां आलेल्या असंख्य नागांनीं भरलेलें तें स्थान प्रतिपातालासारखें दिसू लागलें. त्यानंतर जीमूतवाहन, अक्षत-शरीर व यश यांनीं विराजित झाला आहे, असें ऐकून त्याच्या आप्तांना व विशेषत: आई, बाप आणि भार्या, यांना फार आनंद झाला. सुखपरिणामीं दुःखानें कोण हृष्ट होणार नाहीं.* असो; जीमूतवाहनानें अनुज्ञा दिली असतां, शंखचूड पातालांत गेला, गरुड वैकुंठास गेला व जीमूतवाहनाचें यश त्रिभुवनांत पसरलें. त्यामुळें भयभीत झालेले त्याचे राज्यहारक बांधव देव, गरुड व पार्वती यांच्याही प्रीतीस पात्र झालेल्या त्याच्याकडे आले. हा महाप्रभावशाली आहे, असें जाणून त्यांनीं त्याचें राज्य त्यास परत दिलें; व त्याच्या आज्ञेंत रहाण्याची प्रतिज्ञा करून त्यांनीं पुनरपि त्याच्याशीं विरोध केला नाहीं. त्यानंतर कृतकृत्य व महापुण्यात्मा जीमूतवाहन मलयाचलावरून आपल्या हिमालयावरील घरीं आला, आणि आई, बाप, मित्रावसु व मलयवती यांसह चक्रवर्तिपदाचा उपभोग घेऊं लागला. सारांश; देवि, ज्यांचें चरित्र त्रिभुवनांतील लोकांच्या हृदयांत चमत्कार उत्पन्न करणारें असतें, त्यांच्याकडे कल्याणपरंपरा आपोआप धांवत येतात.‡

यौगंधरायणानें सांगितलेली ही विद्याधरेंद्रपुत्राची कथा आपल्या प्रियपतिजवळ बसून ऐकल्यावर, गर्भिणी वासवदत्ता अतिशय संतुष्ट झाली व त्यांतच तिचा तो सर्व दिवस गेला.

* को न प्रहृष्येद्दुःखेन सुखत्वपरिवर्तिना ।

‡ एवं सकलजगत्त्रयहृदयचमत्कारकारिचरितानाम् ।
स्वयमनुधावन्ति सदा कल्याणपरम्पराः पदवीम् ॥

# तरंग ३ रा.

## १. वासवदत्तेचें स्वप्न व त्याचा प्रत्यय.

नंतर एके दिवशीं वासवदत्ता सचिवांसह समीप येऊन, बसलेल्या आपल्या उदार पतीस म्हणाली,-" आर्यपुत्र, हा गर्भ धारण केल्या दिवसापासून त्याचें रक्षण करितां करितां मला पुरेसें झालें आहे. आज रात्रीं स्वप्नांत एक पुरुष आलेला मीं पाहिला. त्याच्या जटा पिंगटवर्ण असून हातांत शूल होता. तो मजवर मोठी दया करून म्हणाला,-" बाळे, तूं गर्भाकरितां कांहीं चिंता करूं नकोस. मीच तो तुला दिला आहे; व मीच त्याचें रक्षण करीन. आतां खुणेकरितां आणखी एक गोष्ट सांगतों ती ऐकून ठेव. सकाळीं एक स्त्री पांच पुत्र व आप्तजन यांसह आपल्या पतीवर खोटाच आरोप करून, फिर्याद घेऊन तुमच्याकडे येईल; पण ती दुराचरणी स्त्री आपल्या आप्तांच्या बलावर पतीचा घात करण्याची इच्छा करीत आहे, असें जाणून तिच्या साधुवृत्ती पतीला सोडून द्यावयास तूं आपल्या नाथाला सांग."-इतकें सांगून तो गुप्त झाला. इतक्यांत, मीं जागी झालें व रात्रही संपली. राणीनें सांगितलेलें हें ऐकून तो शंकराचा प्रसाद आहे, असें जाणून सर्वजण जों विस्मय व्यक्त करीत आहेत, तों मुख्य द्वारपाल अकस्मात् येऊन पीडितांवर दया करणाऱ्या वत्सराजास म्हणाला,-" महाराज, कोणी एक स्त्री पांच पुत्र व बांधव यांसह, व्याकुल झालेल्या पतीला घेऊन आली आहे. तिची कांहीं फिर्याद सांगावयाची आहे, असें ती म्हणते."-तें ऐकून वासवदत्तेचें स्वप्न खरें ठरलें, असें पाहून विस्मित झालेल्या राजानें 'तिला येथेंच आण' अशी त्याला आज्ञा केली. आपलें स्वप्न खरें ठरलेलें पाहून आपला पुत्रही मोठा सत्पुरुष होणार, असा दृढ निश्चय करून वासवदत्ताही मनांतल्या मनांत अतिशय संतुष्ट झाली. सर्वांचे नेत्र, कोलाहल करीत बाहेरून येणाऱ्या त्या घोळक्याकडे लागले असतां, द्वारपालांच्या मागून येऊन राणी व मंत्री यांसह बसलेल्या राजाला, दीन मुखानें वंदन करून, ती दुष्ट स्त्री म्हणाली,-"महाराज, हा माझा पति निरपराधी व अनाथ अशा मला अन्नवस्त्र देत नाहीं."-तिचें हें मिथ्या भाषण संपल्यावर लागलाच तिचा पति म्हणाला,-" देव, ही आपल्या

बांधवांसह खोटें बोलत आहे. मी एक वर्षाचें अन्न-वस्त्र हिला पूर्वींच देऊन ठेविलें आहे. याविषयीं माझे बांधव साक्षी आहेत. त्यांना पाहिजे तर विचारून पहा.''-याप्रमाणें दोघांचेंही म्हणणें ऐकून घेऊन न्यायी राजा वासवदत्तेला म्हणाला,-'' देवि, या पुरुषाची साक्षी तुझ्या स्वप्नांत शंकरदेवानेंही दिली आहे. तेव्हां आतां अधिक साक्षी काय करावयाचे आहेत ? बांधवांसह या स्त्रीला शिक्षा दिली म्हणजे झालें.''-पण इतक्यांत बुद्धिमान् यौगंधरायण म्हणाला,-'' देव, तथापि लोकांच्या समजुतीकरितां लौकिकसाक्षी बोलवावेत हें चांगलें; कारण स्वप्नवृत्तांत ठाऊक नसलेल्या लोकांना, त्यावांचून, आम्ही न्याय केला, असें वाटणार नाहीं.''-मंत्र्याची ही योग्य मसलत ऐकून राजानें त्याच्या साक्षीदारांस बोलाविलें व प्रश्न केला. तेव्हां ते सर्व म्हणाले,-'' राजन्, ही स्त्री फार वाईट असून आपल्या सज्जन पतीला व्यर्थ छळीत असते. तिचें सर्व सांगणें खोटें आहे.''-तेव्हां रागावलेल्या वत्सेशानें पुत्र व बांधव यांसह तिला आपल्या देशांतून घालवून दिलें; आणि दुसऱ्या विवाहास पुरेल, इतकें धन देऊन त्या सत्पुरुषास घरीं जावयास सांगितलें. नंतर ' क्रूरबुद्धीनें युक्त असलेली असाध्वी एकाद्या कावळीप्रमाणें, दुर्दशेस पोंचलेल्या पतीला जिवंतपणींच जशी कांहीं सोलीत असते; पण मार्गांतील वृक्षच्छायेप्रमाणें संताप नाहीसा करणारी, स्नेहसंपन्न व कुलीन स्त्री एकाद्या महापुण्यवानालाच लाधते.'$ असें त्या प्रसंगास उद्देशून वत्सराजानें म्हटलें असतां, जवळच असलेला कथा-निपुण वसंतक म्हणाला,-'' देव, प्राण्यांचा परस्पर स्नेह किंवा विरोध पूर्वजन्मांतील वासनेप्रमाणें होत असतो. याविषयीं मी एक गोष्ट सांगतो ती ऐका.

## २. सिंहपराक्रमाची कथा.

वाराणसींत विक्रमचंड या नांवाचा एक राजा होता. त्याचा सिंहपराक्रम म्हणून एक प्रिय, व रण आणि द्यूत यांत अद्वितीय विजयी भृत्य होता. त्याची कलहकरी या यथार्थ नांवाची पत्नी शरीरतः विक्राळ व

---

$ पुमांसमाकुलं क्रूरा पतितं दुर्दशावटे ।
जीवन्तमेव कुष्णाति काकीव कुकुटुंबिनी ॥
स्निग्धा कुलीना महती गृहिणी तापहारिणी ।
तरुच्छायेव मार्गस्था पुण्यैः कस्यापि जायते ॥

मनानें क्रूर होती. तो द्यूत करून व राजापासून सतत पुष्कळ धन मिळवून तें सर्व तिला देत असे. त्याच्यापासून तिला तीन पुत्रही झाले होते. पण स्वभावतःच ती शठ असल्यामुळें कलह केल्यावांचून एक दिवसही रहात नसे. तूं बाहेरच्या बाहेर काय हवें तें खातोस पितोस आणि आम्हांला कांहींएक देत नाहींस, असें म्हणून ती त्याला रोज छळीत असे. तो बिचारा तिला प्रसन्न करण्याकरितां प्रत्यहीं विचित्र खाद्य व पेय पदार्थ आणून देई; पण त्यामुळें तिची तृष्णा अधिकाधिक वाढत असे. तेव्हां शेवटीं अतिशय खिन्न झालेला तो सिंहपराक्रम, घर सोडून विंध्यवासिनीचें दर्शन घ्यावयास गेला. तेथें पोंचल्यावर निराहार राहून देवीची सेवा करणाऱ्या त्याला, ती करुणाप्रधान देवी स्वप्नांत म्हणाली,–"पुत्रा, ऊठ. वाराणसीस जा. तेथें एक फार मोठा वटवृक्ष आहे. त्याच्या मूळांशीं खण, म्हणजे तुला निधि सांपडेल त्यांत एक गारुत्मत्–रत्नांचें चकचकीत पात्र आहे. त्यांत तूं पाहिलेंस म्हणजे पाहिजे त्याचा पूर्वजन्म प्रतिबिंबित झालेला तुला दिसेल. त्यामुळें तुझा व तुझ्या भार्येचाही पूर्वजन्म समजल्यानें तुला सुख होईल."–हा साक्षात्कार पाहून तो जागा झाला. व उजाडतांच पारणें सोडून वाराणसीकडे जावयास निघाला. तेथें गेल्यावर देवीच्या सांगण्याप्रमाणें वडाच्या खालीं त्याला निधि सांपडला. त्यांत तें रत्नांचें पात्रही होतें. त्यांत त्यानें आपली व भार्येची पूर्वजाति पाहिली. तेव्हां आपण पूर्वी सिंह असून ती घोर आस्वली होती, असें त्याला कळलें. त्यामुळें तिचें आपल्याशीं पूर्वजन्मींचेंच घोर वैर आहे, असें समजून त्यानें तिच्याविषयींचा खेद सोडला. नंतर त्या पात्राच्या प्रभावानें अनेक कन्यांचे पूर्वजन्म जाणून त्यानें मागच्या जन्मीं आपल्याप्रमाणें सिंही असलेल्या त्यांतील एका कन्येशीं विवाह केला, आणि त्या भांडखोर स्त्रीला केवल अन्न-वस्त्र देऊन निराळें ठेविलें. त्या वेळेपासून पुष्कळ द्रव्य व अनुकूल भार्या यांच्या योगानें तो सुखी होऊन राहिला. राजन्, याप्रमाणें पूर्व संस्काराला अनुसरून स्त्रीपुरुषादिकांचा परस्पर स्नेह अथवा वैर असतें.

### ३. मंत्री व राजा यांच्या पुत्रांचें जनन.

ही विचित्र कथा ऐकून राजा-राणीला फार संतोष वाटला. कांहीं दिवसांनीं त्या राजाच्या मंत्र्यांना भाविकल्याणसूचक लक्षणांनीं युक्त पुत्र

झाले. यौगंधरायणाच्या पुत्राचें नांव मरुभूमि, रुमण्वानाच्या पुत्राचें हरिशिख, वसंतकाच्या तनयाचें तपन्तक व इत्यक अथवा नित्योदित-नामक प्रतीहाराध्यक्षाच्या पुत्राचें नांव गोमुख असें होतें. 'हेच पुढें वैरि-वंशनामक वत्सराजपुत्राचे समर्थ मंत्री होतील' अशी आकाशवाणी, त्यांच्या जन्मकाळीं नगरभर महोत्सव चालला असतां झाली. दहाव्या महिन्यांत प्रसूतिसमय समीप आला असतां, वासवदत्ता सूतिकागृहांत गेली. तें गृह नानाप्रकारचीं मंगलें व रक्षा यांनीं मंडित केलें होतें, तेथें ती साध्वी सुखरूपपणें प्रसूत होऊन चंद्रासारखा सुंदर वत्सराजपुत्र जन्मास आला. त्यानें भूमीवर पडतांच आपल्या आईचें हृदय व राजाची राज-धानी या दोन्ही जागीं आनंद खचून भरला. अंतःपुरांतील विश्वासु अनुचरानें राजाला जेव्हां तें अपूर्व वृत्त कळविलें. तेव्हां अतिशय संतुष्ट झालेल्या राजानें त्याला आपलें राज्यही दिलें असतें; पण तें रक्षण कर-ण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें नसल्यामुळें तसें केलें नाहीं. असो; लागलाच तो मोठ्या उत्सुकतेनें अंतःपुरांत गेला. फार दिवसांनीं पूर्ण मनोरथ झालेल्या राजानें, साम्राज्य लक्ष्मीच्या हातांतील लीलाकमलासारखें अति-रमणीय असलेलें पुत्रमुख पाहिलें. त्याच्या दोन्हीं पायांवर छत्रचामरादि सम्राट् चिन्हें होतीं. इतक्यांत अतिशय आनंदित झालेले यौगंधरायणा-दिक मंत्रीही तेथें आले. त्याच वेळीं अशी आकाशवाणी झाली— "राजन्, हा तुझा पुत्र कामदेवाचा अवतार आहे. याचें तूं नरवाहन-दत्त असें नांव ठेव. हा देवांच्या एक कल्पभर विद्याधरांचा राजा होईल"-त्यानंतर आकाशांतून पुष्पवृष्टि झाली व देवदुंदुभी वाजूं लागल्या. देवांनीं आनंदोत्सवास आपल्या पूर्वी आरभ केला, असें जाणून जणुं काय मत्सरानेंच, राजानें त्याहून अधिक उत्सव सुरू केला, मंगलवाद्यांनीं भूमि व अंतरिक्ष दुमदुमलें. पताकांची गांवभर गर्दी झाली. अप्सरांसारख्या नर्तकी स्त्रिया नाचूं लागल्या, गायन सुरू झालें, राजा आपल्या सर्व प्रकारच्या संबंधी-जनांस आपल्या हातानें देणग्या देऊं लागला, त्यामुळें त्याच्या एका कोशा ( खजिन्या ) वांचून बाकीचे सर्व संपन्न झाले; कोश मात्र रिता झाला. सामंतराजांच्या अंतःपुरस्त्रिया उंची भेटी व मंगलकारक वस्तू घेऊन साक्षात् दशदिशांप्रमाणें त्या बाल, काकडे आल्या. त्यावेळीं त्या आनंदमय नगरींत सर्व चेष्टा नृत्यमयी-

वचन पूर्णपात्रमय, व्यवहार महादानमय, ध्वनि मंगलवाद्यमय, लोकांचीं अंगें गुलाल, बुका इत्यादि परिमलद्रव्यमय व पृथ्वी स्तुतिपाठकमय झाली. याप्रमाणें पुष्कळ दिवसपर्यंत तेथें चाललेला महोत्सव पौरजनांच्या पूर्ण मनोरथांसह निवृत्त झाला. ज्याचें नांव नरदत्तवाहन असें ठेविलें आहे, असा तो राजपुत्र शुक्लप्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें प्रत्यहीं वाढूं लागला. मन्त्र्यांनीं राजाच्या हृदयास आनंद देणाऱ्या आपल्या पुत्रांना आणून, त्या राजपुत्राच्या सहवासास ठेविलें. शांतिकर नांवाच्या पुरोहितानेंही आपल्या शांतिसोम व वैश्वानर नांवाच्या पुतण्यांस त्यांच्या संगतीला लावलें. बरोबरीच्या बालकांचा तो मोठा संघ पाहून, राजा व राणी यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. बालपणींही तो सुभग राजपुत्र चार मंत्रिपुत्र व दोन पुरोहितपुत्र यांच्यासह, जणुंकाय महाफल देणाऱ्या सहा गुणांशींच संगत झाल्याप्रमाणें, क्रीडा करूं लागला. अव्यक्त व मधुर भाषण करीत असलेल्या त्या सुंदरमुख बालकास पहाण्यांत, त्याचें कौतुक करण्यांत व त्याला वारंवार प्रेमानें आलिंगन देण्यांतच राजा, राणी, मंत्री व पौरजन यांचा प्रत्यहीं बराच काल जात असे.

येथें नरवाहनदत्तजनन नामक चवथा लंबक समाप्त झाला.

# ५. चतुर्दारिकालंबक.

## तरंग १ ला.

### १. वत्सराजाच्यासभेंत शक्तिवेगविद्याधराचें आगमन.

वत्सराज देवीसह आपल्या एकुलत्या एक रमणीय बालकाचें लालन करीत मोठ्या आनंदानें काल घालवीत असतां, त्याच्या संरक्षणाविषयीं अतिचिंतातुर होणाऱ्या त्याला, मंत्री यौगंधरायण एकदां एकान्तांत म्हणाला,-" राजन्, पुत्राच्या रक्षणाविषयीं अतिचिंतातुर होऊं नका; कारण भगवान् शंकरानेंच तुमच्या येथें या विद्याधरांच्या चक्रवर्ती राजाला उत्पन्न केलें आहे. पण दिव्यप्रभावानें हें जाणून पापाशय

विद्याधराधीश क्षुब्ध झाले आहेत, व बालपणींच या बालकाला पीडा देण्याकरितां ते टपून बसले आहेत, असें कळतांच त्या चंद्रमौलीनें, याच्या रक्षणाकरितां आपल्या स्तंभक नांवाच्या गणाची योजना करून ठेविली आहे. तो गण कोणाला न दिसतां याचें एकसारखें रक्षण करीत असतो. नारदानें आजच हें मला सांगितलें."—मंत्री इतकें बोलत आहे तों आकाशमंडलांतून किरीट, कुंडलें व खड्ग यांनीं मंडित झालेला एक दिव्य पुरुष उतरला. त्याला प्रणाम करून योग्य सत्कारपूर्वक आसनावर बसविल्यावर, वत्सराज मोठ्या कौतुकानें 'आपण कोण, कोठून आलांत, व तुमचें येथें काय काम आहे?' असें विचारूं लागला. तेव्हां तो म्हणाला—मी मर्त्य असूनही शशिवेग या नांवाचा, विद्याधरांचा ईश झालों आहें. मला शत्रु पुष्कळ आहेत. राजन्, तुझा पुत्र कांहीं दिवसांनीं आमचा चक्रवर्ती होणार आहे, असें विद्याप्रभावानें जाणून मी त्याला पहाण्याकरितां आलों आहें.

हें त्याचें भाषण ऐकून राजानें आपला पुत्र त्याला दाखविला. तेव्हां त्या आपल्या भावी चक्रवर्तीस पाहून तो विद्याधर प्रसन्न झाला असतां, राजा म्हणाला,—"विद्याधरत्व कसें प्राप्त होतें, तें कशाप्रकारचें असतें, व आपल्याला तें कसें प्राप्त झालें?"—राजाचे हे प्रश्न ऐकून विनयानें नम्र झालेला तो शक्तिवेग म्हणाला,—"राजन्, या किंवा पूर्वजन्मीं शंकराची आराधना करून त्याचा अनुग्रह संपादन केला असतां, धीर पुरुषांस विद्याधरपद प्राप्त होतें. विद्या, खड्ग, माला, इत्यादि साधनांनीं युक्त असलेलें तें विद्याधरत्व अनेक प्रकारचें असतें. मला त्याची प्राप्ति कशी झाली ती सांगतों, ऐका."—असें बोलून शक्तिवेगानें वासवदत्तेच्या समक्ष पुढील कथा सांगितली—

## २. कनकरेखेची कथा व शक्तिदेवाची लबाडी.

वर्धमान या नांवाचें एक रमणीय पुर आहे. तेथें परंतप या नांवाचा एक शूर राजा होता. मेघांची जशी विद्युत् तशी त्या उन्नतिमान् राजाची कनकप्रभा म्हणून चापल्यरहित कांता होती. तिला एक सुंदर कन्या झाली. विधात्यानें लक्ष्मीचा रूपाविषयींचा दर्प घालविण्याकरितांच जणुंकाय तिला निर्मिलें होतें. पित्यानें कनकरेखा म्हणून जिचें नांव ठेविलें आहे, अशी ती लोकांच्या नेत्रांस आनंद देणारी कन्या उत्तरोत्तर

वृद्धिंगत झाली. एकदां ती तरुण झाली आहे, असें पाहून राजा एकांतांत देवी कनकप्रभेला म्हणाला,—"प्रिये हिला योग्य वर कसा मिळेल, या माझ्या चिंतेसह ही कन्या दिवसेंदिवस वाढत असून, माझ्या हृदयाला पीडा देत आहे. गायनाप्रमाणेंच योग्य स्थान न मिळाल्यास, कुलकन्यका, ऐकणाऱ्या दुसऱ्यांच्याही कर्णास उद्वेग देत असतात. विद्येप्रमाणेंच अपात्रीं अर्पण केलेली कन्या, यश व धर्म यांतील एकालाही कारण होत नाहीं, तर पश्चात्तापाला मात्र ती कारण होते. मी आतां ही कोणत्या राजपुत्राला देऊं ? हिला योग्य वर कसा व कोठें मिळेल ?"—तें ऐकून राणी हंसून म्हणाली—कनकरेखा तर विवाहाची मुळीं इच्छाच करीत नाहीं. आज तिनें बाहुल्या केल्या होत्या. त्या पाहून मी थट्टेनें म्हटलें, कीं बाळे, तुझा विवाह कधी होईल तें मी यावर पहातें हो. पण तें ऐकतांच ती रागावून म्हणाली,—" नको, नको; आई, माझा विवाह करूं नको. मला कोणाला देऊं नको. मी आपली कन्या आहें, तेंच बरें आहे. नाहींतर मी मेलेंच म्हणून समजा. मी असें म्हणतें याला कांहीं कारण आहे."—तें ऐकून माझें मन खिन्न झालें, व मी इकडे आलें. यास्तव आपण उगीच वरचिंता करूं नका.

आपल्या प्रियेचें हें आश्चर्यकारक भाषण ऐकून अतिशय घाबरलेला तो राजा, कन्यान्तःपुरांत जाऊन कनकरेखेला म्हणाला,—' वत्से, देव व दैत्य यांच्या कन्याही तप करून ज्याची इच्छा करितात, तो वर व विवाह तूं नको कां म्हणतेस ?"—तें ऐकून व आपली दृष्टि भूमीकडे लावून ती म्हणाली,—" बाबा, यावेळीं मला विवाह जर इष्टच वाटत नाहीं, तर तुम्हांला तरी त्याचें एवढें काय लागलें आहे, व एवढा आग्रह कां ?"—कन्येचें हें चमत्कारिक व जरा तिरसटपणाचें बोलणें ऐकून तो परोपकारी राजा म्हणाला—"बाळे, कन्यादानावांचून पापशांति कशी होईल ? वडिल मनुष्याच्या आधीन असलेल्या मुलींनीं असें स्वतंत्र होणें चांगलें नव्हे. गृहस्थ जन्माला आल्या दिवसापासून कन्येला दुसऱ्याकरितांच पोसतात. बाळपणींच काय तें तिला पित्याच्या घरीं रहावयास सांपडतें. ती मोटी झाली, कीं पतीच्या येथें निघाली. शिवाय ती विवाहापूर्वी ऋतुमती झाल्यास तिचे पालक अधोगतीला जातात; तिला वृषली म्हणतात, व तिच्या पतीला वृषलीपति म्हणतात."—पित्यानें असें

म्हटलें असतां, ती राजपुत्री-कनकरेखा तत्काल आपल्या मनांतली गोष्ट बोलली.-" बाबा, असें जर असेल, तर ज्या धन्य ब्राह्मणानें अथवा क्षत्रियानें कनकपुरी पाहिली असेल, त्यालाच माझें दान करा. तोच माझा भर्ता होईल; कारण दुसऱ्या कोणाला देणें म्हणजे माझी विटंबना करणेंच आहे."-हें ऐकून राजाच्या मनाला समाधान वाटलें. 'हिनें विवाह करण्याचें मान्य केलें, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. 'खरोखर ही कोणी देवीच माझ्या येथें जन्माला आली आहे; नाहींतर एवढ्याशा वयांत हिला हें सर्व कसें कळतें !' असा विचार करून व 'बरें आहे; बाळे, तुझ्या इच्छेप्रमाणें करीन' असें सांगून राजा दिनकृत्यें करावयास गेला. दुसऱ्या दिवशीं सभागृहांत बसलेला तो आपल्या जवळच्या लोकांस म्हणाला,-" तुमच्यांतील कोणी कनकपुरी पाहिली आहे का ? ज्यानें ती पाहिली असेल त्याला मी आपली कनकरेखा कन्या व यावराज्य देणार आहें."-राजाचा हा प्रश्न ऐकून ते सर्व म्हणाले,-" महाराज, आम्हीं ती ऐकलीही नाहीं, मग पहाण्याचें दूरच राहिलें."-तें ऐकतांच राजानें प्रतीहारास बोलावून आपल्या सर्व राष्ट्रांत डांगोरा पिटून, तसा कोणी ब्राह्मण अथवा क्षत्रिय पुरुष आढळल्यास आपल्याकडे आणावयास सांगितलें, व प्रतीहारानें त्याप्रमाणें सर्वत्र द्वाही फिरविण्याची व्यवस्था केली. ती ऐकून राष्ट्रांतील सर्व लोक विस्मित झाले ! 'आमच्यांतील अतिवृद्धांनींही तिचें नांव कधीं ऐकलें नाहीं. मग तरुणांनां ती कोठून ठाऊक असणार ?' असें म्हणून कोणी एकानेंही 'मी ती पाहिली आहे' असें बोलून राजास आनंद दिला नाहीं. तों इतक्यांत त्या राष्ट्रांत शक्तिदेव म्हणून एक ब्राह्मणपुत्र होता. त्यानें ती घोषणा ऐकली. तो तरुण, व्यसनी असून द्यूतामुळें दरिद्री झाला होता. राजकन्येच्या प्राप्तीची वार्ता ऐकून उत्सुक झालेला तो, मनांत विचार करूं लागला कीं, द्यूतामध्यें सर्वस्व गमावल्यामुळें, मला आतां पित्याच्या येथें किंवा वेश्येच्या येथेंही जातां येत नाहीं. तेव्हां कसें करावें ? अन्य उपायच नसल्यामुळें खोटेंच सांगावें झालें. या घोष करणारांस मी कनकपुरी पाहिली आहे, असें सांगितल्यास त्यांत कोणती हानि आहे ? मी तीं पाहिली कीं नाहीं, हें यांना कसें समजणार ? या युक्तीनें राजकन्येशीं समागम होऊन शिवाय यौवराज्यही हातीं येईल. असा विचार करून

तो राजपुरुषांकडे गेला, आणि म्हणाला,-"मी ती नगरी पाहिली आहे." तेव्हां ते म्हणाले,-"बरें तर, मोठीच आनंदाची गोष्ट आहे. चल, आमच्या प्रतीहाराकडे ये"-तेव्हां 'चला' असें म्हणून तो लबाड मनुष्य त्यांबरोबर चालला. त्यानें राजाच्या प्रतीहारालाही तसेंच खोटें सांगितलें. तेव्हां त्यानेंही मोठा सत्कार करून, त्या ब्राह्मणाला राजाकडे आणिलें. त्याला प्रश्न केला असतां त्याच्यापुढेंही त्या शठानें निःशंकपणें असेंच सांगितलें; कारण जुगारांत प्रवीण असलेल्या ठगाला असत्य भाषण करतांना कसलें भय वाटणार ?* तेव्हां राजानेंही निश्चय करण्याकरितां त्या ब्राह्मणाला आपल्या कन्येकडे न्यावयास सांगितलें. तेव्हां प्रतीहाराबरोबर आलेल्या त्याला कनकरेखा म्हणाली,-"कायरे बा ब्राह्मणा, तूं कनकपुरी पाहिली आहेस काय ?"-त्यावर तो,-म्हणतो होय, मी विद्यार्थिदशेंत पृथ्वी-पर्यटन करीत असतांना ती रमणीय नगरी पाहिली आहे. तें ऐकून कनकरेखा म्हणते-तूं कोणत्या मार्गानें तेथें गेलास, व ती कशी आहे ? त्यावर तो पुनः म्हणाला,-"येथून मी हरपुर नामक नगरास गेलों. तेथून पुढें हळुहळु वाराणसीस पोंचलों. वाराणसीहून कांहीं दिवसांनीं पौंड्रवर्धन नगरास व तेथून थेट कनकपुरीस गेलों, व पुण्यवानांची ऐहिक भोगभूमिच अशी ती नगरी मीं पाहिली. इंद्राच्या अमरावतीप्रमाणें असलेल्या तिची शोभा पहात असतांना डोळ्याचें पातेंही लवत नाहीं. तेथें सर्व विद्या संपादन करून मी पुनः येथें परत आलों."-अशा रीतीनें खोटेंच रचून तो धूर्त ब्राम्हण सांगूं लागला असतां, कनकरेखा हंसत म्हणाली,-"खरेंच महाब्राह्मणा तूं त्या उत्तम नगरीला पाहिलें आहेस यांत संशय नाहीं. सांग सांग बरें, तूं कोणत्या मार्गानें गेलास, तें पुनः सांग."-तें ऐकून तो लबाड पुनः तसेंच खोटें बोलण्याचें साहस करूं लागला तें पाहून राजकन्येनें चेटींकडून त्याला घालवून दिलें, व लागलीच राजाजवळ गेली राजानें प्रश्न केला असतां ती म्हणाली,— बाबा, तुम्हीं राजपदीं असूनही हें असें अविचाराचें काम झालें कसें ? धूर्त पुरुष सरळ स्वभावाच्या माणसांस असेच नेहमीं ठकवीत असतात, हें तुम्हांला कसें समजत नाहीं ? तो लबाड ब्राह्मण खोटेंच कांहींतरी सांगून मला फसवायाला पहात होता. त्यानें ती नगरी मुळींच पाहिलेली

* द्यूततान्तस्य किं नाम कितवस्य हि दुष्करम् ।

नाहीं. धूर्त लोक पृथ्वीवर अशाच अनेक लबाड्या प्रतिक्षणीं करीत असतील. याविषयीं मी तुम्हांला शिव-माधवांचा वृत्तांत सांगतें, तो ऐका. असें बोलून ती राजकन्या पुढील कथा सांगूं लागली–

### ३. शिव-माधवांचा वृत्तान्त.

रत्नपुर नामक नगरांत शिव व माधव या नांवाचे दोन धूर्त होते. त्यांनीं ठगांचा मोठा परिवार आपल्यापाशीं जमविला, व थोड्याच अवकाशांत तें सर्व नगर कपटप्रयोग करून लुटलें. सर्व श्रीमानांच्या येथें त्यांनीं मोठमोठे दरोडे घातले व आतां नगरांतील लोकांपाशीं फारसें कांहीं राहिलें नाहीं, असें जाणून त्यांनीं उज्जयिनीस रहावयास जाण्याचा निश्चय केला. ते आपसांत म्हणाले,–" तेथें एक महाधनाढ्य राजपुरोहित आहे, असें ऐकतों. त्याचें नांव शंकरस्वामी. युक्तीनें त्याचें धन हरण करून मालव विलासिनीच्या सहवासाचें सुख आपण येऊं या. तो प्रत्येक ब्राह्मणाच्या दक्षिणेंतील अर्धाभाग घेत असतो. त्यानें द्रव्याचे सात कुंभ भरून ठेविले आहेत. तो महारागीट ब्राह्मण साक्षात् यमच आहे, असें ब्राह्मण म्हणत असतात. त्या ब्राह्मणाला एक कन्यारत्न आहे. धन हरण करतांना तें रत्नही हातीं लागण्याचा संभव आहे."–असें बोलून व त्याविषयीं संकेत करून ते दोघे धूर्त त्या नगरांतून निघाले. माधव उज्जयिनीस पोंचला, व राजपुत्राच्या वेषानें सर्व योग्य सरजामासह गांवाबाहेरच उतरला आणि अनेक कपटांमध्यें कुशल असलेला, शिव अगदीं हुबेहुब ब्राह्मणाचा वेष घेऊन एकटाच पुढें गांवांत गेला; तेथें नगरास लागूनच सिप्रेच्या कांठीं एक उत्तम मठ होता, त्यांत येणाऱ्या–जाणाऱ्या लोकांना सहज दिसतील, अशा बेतानें दर्भ, मृत्तिका, भिक्षा व अजिन ठेवून तोही राहिला. प्रातःकाळीं उठून दैहिक दिन कर्में केल्यावर, या दुष्कर्मामुळें मरणोत्तर नरकांत पडल्यावर तेथील मलाचा लेप कसा होणार आहे, तें दाखविण्याकरितांच जणुंकाय, त्यानें आपल्या अंगास मृत्तिकेचा दाट लेप केला. नदीच्या निर्मल जलांत पुष्कळ वेळ स्नान केल्यावर, तो कुकर्मामुळें प्राप्त होणाऱ्या अधोगतीचाच जणुं विचार करीत अधोमुख होऊन राहिला. स्नानानंतर पाण्यांतून वर येऊन पुष्कळ वेळ, मी शूलावर चढविण्याच्या योग्यतेचा आहें, असेंच जणुंकाय सुचवीत, सूर्याभिमुख होऊन राहिला. त्यानंतर देवाच्या पुढें जाऊन,

दर्भांचा कूर्च हातांत घेऊन व पद्मासन घालून तो जप करीत बसला. मध्येंच एकदां कपटानें साधूंचीं हृदयें जशीं हरण करावींत तशींच पांढरीं पुष्पें आणून त्यानें शंकराचें पूजन केलें. पूजेनंतर नरकाचेंच अनुसंधान करीत असल्याप्रमाणें तो पुनः जपपरायण झाला. त्यानें ध्यान केलें. अपराह्णसमयीं मृगचर्म नेसून तो भिक्षेकरितां गावांत फिरूं लागला. मौन धरून त्यानें उत्तम श्रोत्रिय ब्राह्मणांच्या तीन घरची भिक्षा घेतली. मठांत परत आल्यावर त्या दंभ धारण करणारानें मिळालेल्या भिक्षान्नाचे तीन सारखे भाग केले. त्यांतील एक कावळ्यांनां घातला; दुसरा अभ्यागताला दिला व तिसऱ्या भागानें आपली जीविका केली. पुन सायंकाळीं जणुं काय आपलीं पापेंच मोजीत असल्याप्रमाणें हातांत स्मरणी घेऊन तो जप करीत बसला, व रात्रीं त्या मठांत एकटाच लोकांच्या सूक्ष्म तर्कस्थानांचा विचार करीत राहिला. याप्रमाणें प्रतिदिनीं कष्टकर तप करणाऱ्या त्यानें नगरांतील सर्व लोकांचीं चित्तें आपणाकडे ओढून घेतलीं. या दांभिकापुढें सर्व जनसमूह भक्तीनें नम्र झाला व 'केवढाहो हा शांत महा तपस्वी' अशी त्याची सर्व नगरभर ख्याति झाली. तेव्हां आपल्या हेरांच्या द्वारा त्याची ही कीर्ति ऐकून, त्याचा जोडीदार माधवही नगरांत आला. त्या मठापासून बऱ्याच अंतरावर घर घेऊन तो राहूं लागला. व एके दिवशीं राजपुत्राच्याच वेषानें स्नान करून मठांत देवदर्शनाकरितां गेला, आणि त्यानें देवापुढें जप करण्यांत तत्पर असलेल्या त्या भोंदूला पाहिलें. त्याबरोबर अतिशय नम्र होऊन त्यानें त्या शिवाच्या पायांवर मस्तक टेंविलें, व सर्व लोकांसमक्ष म्हणाला,—"असला तापसी दृष्टीस पडणेंही अशक्य आहे. मीं तीर्थाटन करणाऱ्या याला पुष्कळदां पाहिलें आहे."—शिवानें त्या आपल्या माधव मित्राला पाहिलें; पण दांभिक जशाचा तसाच दंभानें मान ताठ करून जपांत निमग्न होऊन राहिला होता. तें पाहून माधवही आपल्या वसतिस्थानीं गेला. माधव नगरांत येऊन राहिल्यापासून तो धूर्त, रोज रात्रीं त्याला भेटून व यथेच्छ खान-पान करून पुढें काय काय करावयाचें याचा विचार करीत असे. असो; याप्रमाणें एके दिवशीं कर्तव्य निश्चय करून, शिव पहांटे मठांत परत आला असतां माधवानें आपल्या जवळच्या एका धूर्ताला अशी आज्ञा केली—

मित्रा, तूं ही धोतरजोड्याची भेट घेऊन शंकरस्वामी नांवाच्या राज-पुरोहिताकडे जा. व 'भाऊबंदांनीं पराभव केल्यामुळें माधव या नांवाचा एक राजपुत्र पित्याचें पुष्कळ धन घेऊन दक्षिणेंतून येथें आला आहे. त्याच्याबरोबर पळून आलेले आणखीही चारपांच राजपुत्र आहेत. तो तुमच्या येथल्या राजाची सेवा करणार आहे. त्यानें पाठविल्यावरून मी ही अल्पभेट घेऊन तुमच्याकडे आलों आहें,' असें त्याला सांग.

आपल्या महाठगाची ही आज्ञा ऐकून त्या अल्प ठगानेंही त्याप्रमाणें केलें. व लोभी पुरोहिताचाही त्याच्या म्हणण्यावर विश्वास बसला. कारण कांहीं तरी देणें हेंच लोभ्यांचें मन आकर्षण करून घेण्याचें उत्तम औषध आहे.* असो; धोतरजोडा देऊन तो ठग परत आला असतां, दुसऱ्या दिवशीं माधव उत्तम वेष, सशस्त्र रक्षक, छडीदार इत्यादि राजवैभवानें मंडित होऊन, स्वतः त्याला भेटावयास गेला. मार्ग–दर्शकानें पळत पुढें जाऊन पुरोहिताला राजपुत्राचें आगमन कळविलें, व मागून तो खोटा राजपुत्र त्याच्या गृहद्वारापर्यंत गेला. तेव्हां लोभरूपी भुताचा संचार झाल्या-प्रमाणेंच तो राजपुरोहित एकदम उठला; व पुढें जाऊन आनंदानें त्याचें स्वागत करूं लागला. तेव्हां त्याबरोबर घरांत जाऊन व कांहीं वेळ इकड-च्यातिकडच्या गप्पा मारून, त्याची अनुज्ञा घेतल्यावर माधव आपल्या बिऱ्हाडीं परत आला. दुसऱ्या दिवशीं पुनः धोतरजोड्याची भेट पाठवून कांहीं वेळानें तो पुनः पुरोहिताकडे आला; आणि त्याला म्हणाला,—"महाराज, आमच्या परिवाराची इच्छा असल्यामुळें, आम्हांला नोकरी करावयाची आहे. त्याकरितांच आम्हीं तुमचा आश्रय केला आहे. बाकी आम्हांला द्रव्याची कांहीं गरज नाहीं. तें आमच्यापाशीं हवें तितकें आहे." हें त्याचें भाषण ऐकून–'आपल्याला याच्यापासून पुष्कळ धन मिळण्याचा संभव आहे,'–असें मनांत आणून त्यानें तें त्याचें म्हणणें मान्य केलें. लागलीच तो राजाजवळ जाऊन त्याविषयीं प्रार्थना करूं लागला. राजानेंही पुरोहिताच्या वचनास मान देऊन माधवाला नोक-रीस ठेवण्याचें कबूल केलें. दुसऱ्या दिवशीं सर्व राजमंडनांनीं मंडित झालेल्या माधवास नेऊन शंकरस्वामीनें राजाला दाखविलें. राजानेंही राजपुत्राच्या आकारानें पुढें आलेल्या त्याला आदरपूर्वक योग्य वृत्ति

* उपप्रदानं लिप्सूनामेकं ह्याकर्षणौषधम् ।

लावून दिली. याप्रमाणें कपटानेंच कां होईना; पण उत्तम राजसेवा मिळवून तो दिवसा आपलें नेमलेलें काम केल्यावर, रात्रीं शिवाला भेटून पुढील कर्तव्याचा संकेत करीत असे. कांहीं दिवसांनीं हांजी हांजी करूनच संपन्न झालेला पुरोहित माधवास म्हणाला,-“ महाराज, आपण माझ्या येथेंच येऊन रहा. हें आपलेंच घर आहे,”-तेव्हां माधवानेंही प्रथम नको नको म्हणून; त्यानें पुष्कळच आग्रह केल्यावर ‘ बरें आहे ’ असें त्याला सांगून, लागलेंच सहचरांसह त्याच्या येथें बिऱ्हाड आणिलें. खोट्या रत्नजडित अलंकारांनीं भरलेलें एक मोटें भांडें त्यानें पुरोहिताच्या धनसंचयाच्या जागींच नेऊन ठेविलें. मधून मधून तें उघडून व अलंकारांची चकाकी थोडीशीच त्या लोभी ब्राह्मणाच्या दृष्टीस पाडून, कोवळ्या गवताच्या योगानें पशूचें चित्त जसें आकर्षण करून घ्यावें, तसें त्याचें मन त्यानें स्ववश करून घेतलें. पुरोहिताचा पूर्ण विश्वास बसल्यावर त्या धूर्तानें आपला आहार कमी करून व मला अपचन झालें आहे, असें दाखवून शरीर कृश व पांडुरवर्ण करून घेतलें. कांहीं दिवसांनीं तर तो मरणोन्मुख झाल्यासारखा दिसूं लागला. तेव्हां त्याच्या शय्येजवळ पुरोहित येऊन बसला. हा धनी राजपुत्र मेल्यास त्याचें धन आपल्याच खोलींत कसें राहील, या विवंचनेंत तो होता. इतक्यांत तो धूर्तराज त्याला बारीक स्वरानें म्हणाला,-महाराज, माझ्या या शरीराची अवस्था चांगली दिसत नाहीं; यास्तव एकाद्या उत्तम ब्राह्मणाला आणा. म्हणजे ऐहिक व पारलौकिक कल्याणाकरितां मी हें सर्व धन त्याला देऊन टाकितों. जीवित अस्थिर झाल्यावर विचारी पुरुषाची आस्था धनावर कशी रहाणार*? तें ऐकून दानांवर निर्वाह करणाऱ्या पुरोहितानें ‘ बरें आहे ’ असें म्हटलें,-व त्यामुळें संतुष्ट झालेल्या माधवानेंही त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. त्यानंतर पुरोहितानें ज्या ज्या ब्राह्मणाला आणिलें, तो तो त्याला सत्पात्र वाटला नाहीं. तेव्हां त्याच्यापाशीं सेवक भावानें असलेला एक धूर्त, पुरोहितास हळुच म्हणाला,-महाराज, आमच्या प्रभूला बहुतकरून सामान्य ब्राह्मण सर्वस्व दानाचें पात्र आहे, असें वाटत नसावें. यास्तव नर्मदेच्या तीरावरील मठांत शिव या नांवाचा जो महातपस्वी ब्राह्मण आहे, तो यांना आव-

* अस्थिरे जीविते ह्यास्था का धनेषु मनस्विनः ।

डतो कीं काय, तें पहा. त्यावर माधव म्हणाला,-" पहा बुवा, तो आला तर मोठें भाग्यच समजायचें; पण तो येईल असें वाटत नाहीं. या पुरोहित-महाराजांनींच कृपाकरून त्याची प्रार्थना केल्यास तो कदाचित् येईल. पण तसला ब्राह्मण दानाला दुर्लभच होय."-हें ऐकून पुरोहित शिवापाशीं गेला, तों तो धूर्त ध्यान लावून व निश्चल होऊन बसला होता. त्याला प्रदक्षिणा करून पुरोहित त्याच्यापुढें भूमीवरच बसला. कांहीं वेळानें त्या ठगानें आपले नेत्र उघडले. त्याबरोबर साष्टांग प्रमाण करून व हात जोडून, पुरोहित नम्रपणें म्हणतो-प्रभो राग न येईल तर कांहीं प्रार्थना करावयाची आहे. तें ऐकून त्यानें खुणेनें बोलावयास सांगितल. तेव्हां, शंकरस्वामी पुनः म्हणाला-आमच्या येथें एक दाक्षिणात्य राजपुत्र राहिला आहे. तो मोठा श्रीमान् असून सांप्रतकालीं अस्वस्थ झाल्याकारणानें आपलें सर्वस्व देण्यास तयार झाला आहे. त्याचें नांव माधव. आपली इच्छा असेल तर त्याचा आपण प्रतिग्रह करावा. तें त्याचें धन नानाप्रकारच्या अमूल्य रत्नांच्या अलंकारांनीं भरलेलें आहे. त्यावर तो मौनी आपलें मौन सोडून म्हणाला,-" भिक्षेवर निर्वाह करणाऱ्या मज ब्रह्मचाऱ्याला अनेक दोषांनीं परिपूर्ण असलेलें धन घेऊन काय करावयाचें आहे ?-" तें ऐकून पुरोहित म्हणाला-" महाब्राह्मणा, असें काय बोलावें ?"-आश्रमांचा क्रम आपल्याला माहीत आहेच. या धनाचा संग्रह करून ब्रह्मचर्याचा त्याग करावा, व गृहस्थाश्रमाचा स्वीकार करून त्रिवर्गाचें संपादन करावे. सुखोपभोग व परोपकार यांनीं युक्त असलेल्या या मध्यम आश्रमासारखा दुसरा कोणताही आश्रम नाहीं. देवक्रिया, पितृक्रिया व अतिथिक्रिया अशा तिन्ही सर्वोत्तम क्रिया याच आश्रमांत घडतात.

धूर्त शिव पुनः निःस्पृहतेचा डौल आणून म्हणतो, तें खरें. पण मला विवाह करून तरी काय करावयाचें आहे? धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गांतील एकाही अनित्य पुरुषार्थाची मला इच्छा नाहीं. मोक्ष तर केवल ज्ञान, ध्यान व समाधि यांच्या योगानेंच प्राप्त होत असतो. त्याला स्त्रीचें सहाय मुळींच लागत नाहीं. शिवाय तुमच्या संतोषाकरितां विवाह करावयाचा असें जरी क्षणभर म्हटलें, तरी मला या परदेशांत कन्या देतो कोण ? भलत्या सलत्या कुळांतील कन्येशीं विवाह

करून, आपल्या नर जन्माचें मातेरें करण्यापेक्षां या सर्वोत्तम आश्रमात राहून यालोकींच स्वर्गसुख घेणें काय वाईट ?

त्या लबाडाचें तें वचन ऐकून लोभी पुरोहित-' याचें धन या युक्तीनें आपल्याच हातीं लागण्याचा बराच संभव आहे ' असें समजून त्याला म्हणतो-स्वामिन्, माझी एक विनयस्वामिनी या नांवाची अतिरूपवती कन्या आहे. ती मी आपल्या चरणीं अर्पण करीन; मग तर झालें ? माधवापासून प्रतिग्रहानें मिळविलेलें धनही मीच सुरक्षित ठेवीन. आपल्याला त्याविषयीं काडीइतकीही चिंता करावयास नको. याप्रमाणें जें हवें होतें तेंच त्याच्या तोंडून बाहेर पडतांच, आंतल्या आंत हंसणारा तो शिव त्याला म्हणाला,-" ब्राह्मणा, तुझा अत्याग्रहच असला, तर मी तुझ्या इच्छेप्रमाणें करीन; पण सोनें व रत्नें कशीं असतात व त्यांचे गुण काय काय आहेत तें मला कांहींच समजत नाहीं. मी आपला व्यवहार न जाणणारा एक भोळा मनुष्य आहें, हें जाणून काय करायचें असेल तें कर. मी तुझ्या सांगण्याप्रमाणें चालेन."

शिवाचें हें गोड भाषण ऐकून मनांत अतिशय आनंदित झालेला, तो मूर्ख त्याला आपल्या घरीं घेऊन गेला, व त्याला आपल्या घरांत बसवून माधवालाही तो आल्याचें व त्याच्याशीं झालेल्या संकेताचें सर्व वर्तमान त्यानें सांगितलें. त्या पुरोहितानें शिवाला आपली क्लेशानें वाढविलेली कन्या दिली. आणि त्या कन्येबरोबर, मूर्खपणामुळें, त्याची संपत्तीही त्याच्याकडेच जावयास तयार झाली. विवाह झाल्यावर तिसऱ्या दिवशीं प्रतिग्रह घेण्याकरितां शंकरस्वामी आपल्या जांवयास माधवाजवळ घेऊन गेला. त्याला पहातांच ' अहाहा महात्मन्, माझा उद्धार केलास. प्रभो, तुझा प्रभाव किती अतर्क्य व तुझें तप किती अचिंत्य आहे म्हणून सांगूं?' असें बोलून माधव त्याच्या पायांवर मस्तक ठेवून तसाच कांहीं वेळ राहिला. तेव्हां सद्गदीत स्वरानें आशीर्वाद देऊन त्या दांभिकानें त्याला उठवून बसविलें. नंतर कोशगृहांतून तें अनेक मूल्यवान् रत्नजडित अलंकारांनीं भरलेलें पात्र आणवून त्याचें त्यास यथाविधि दान केलें. तें घेऊन शिवानेंही त्या पुरोहिताच्याच स्वाधीन केलें, व म्हटलें-" मला कांहीं ठाऊक नाहीं. याचें तुम्हींच काय तें करा."-त्यावर तो पुरोहितही आनंदानें म्हणाला-बरें आहे. मी तर तें पूर्वीच कबूल केलें आहे. तुम्हांला

त्याची कांहीं चिंता नको. इतकें बोलून पुरोहितानें तें सर्व घेतलें असतां, शिव आपल्या रहावयाच्या स्थानीं ( म्हणजे त्या पुरोहितानें कन्येसह त्याला रहाण्याकरितां दिलेल्या जागीं ) गेला. शंकरस्वामीनेंही तें खोट्या अलंकारांचें भांडें आपल्या द्रव्यसंचय ठेवावयाच्या जागीं नेऊन ठेविलें. माधवही दुसऱ्या दिवशीं, 'आज आपल्याला जरासें बरें वाटत आहे. कदाचित् त्या महादानाचा व त्या सत्पुरुषाच्या आशीर्वादाचा हा प्रभाव असेल' असें सांगून हळु हळु आपलें मांद्य कमी करूं लागला. दोन चार दिवसांनीं पुरोहित जवळ आला असतां, 'तुज कृपासागराच्या सहाय्यानें मी या प्राणान्त करणाऱ्या व्याधींतून मुक्त झालों, आतां मला पुष्कळ बरें वाटत आहे,' असें म्हणून त्यानें त्याची फार प्रशंसा केली. व 'या महात्म्याच्या प्रभावानें माझें हें शरीर टिकलें आहे,' असें म्हणून त्यानें शिवाशीं उघड उघड मैत्री केली.

कांहीं दिवसांनीं माधवाच्या संमतीनें शिव आपल्या श्वशुरास म्हणाला,– "मामा मी तुमचें अन्न असेंच आणखी किती दिवस खात राहूं ? मला तर त्याची मोठी लाज वाटते. यास्तव तुम्हींच तें माझें अलंकारांचें भांडें घेऊन, तुम्हांलाच योग्य वाटेल तें त्याचें मूल्य मला द्या. म्हणजे मी आपल्या पत्नीसह गृहस्थाश्रमाचे धर्म निर्विघ्नपणें व स्वतंत्रपणें आचरीन."–

जामाताचें हें वरून न्याय्य वाटणारें भाषण ऐकून व त्याचें तें धन फार मोठें आहे, असें जाणून पुरोहितानें आपलें सर्वस्व देऊन तें त्याच्यापासून विकत घेतलें. त्याविषयींचे परस्परांनीं परस्परांस लेख करून दिले. आणि या व्यवहारांत माझा मोठाच लाभ झाला आहे, असें समजून तो पुरोहित अतिशय आनंदित झाला. त्यानें आपण होऊन जांवयाला निराळें घर करून दिलें. त्यांत शिव व माधव मोठ्या प्रेमानें पुरोहिताच्या धनाचा यथेच्छ उपभोग घेत राहिले.

कांहीं काल लोटल्यावर त्या पुरोहिताला एकदां द्रव्याची गरज लागली म्हणून, तो त्या खोट्या भूषणांतील एक लहानसें भूषण घेऊन बाजारांत गेला. तेथें रत्नपारख्यांनीं त्याची पारख केली, व 'हीं रत्नें नव्हेत आणि हें सोनेंही नव्हे. तर कोणी मोठ्या कुशल कारागिरानें काचेलाच नानाप्रकारें रंग देऊन हे खोटे हिरे, व पितळेलाच मुलामा देऊन हें खोटें सोनें बनविलें आहे.' असें ठरविलें. तें ऐकतांच अतिशय विव्हल

झालेला तो पुरोहित घरीं गेला, आणि त्यानें तें सर्व भांडेंच आणून त्यांना दाखविलें. त्यांतील अनेक सुंदर भूषणांचें परीक्षण करून त्यांनीं तीं सर्व भूषणें खोटीं आहेत असें सांगितलें. तेव्हां त्या लोभ्याला वज्र-प्रहार झाल्यासारखें वाटलें. आणि मनांतल्या मनांत अतिशय कष्टी झालेला तो दानें घेणारा ब्राह्मण, तत्काल शिवाजवळ जाऊन–' आपलें हें धन घेऊन माझें परत दे.'–असें म्हणूं लागला.

पण तें ऐकून शिव हसून म्हणाला,–" मामा, तें धन अजून कसें रहाणार ! आम्ही तें कधींच संपवून टाकिलें."–तेव्हां त्या दोघांचा मोठा कलह सुरू झाला. भांडत भांडत ते राजाजवळ गेले. त्यावेळीं धूर्त माधव, राजाच्या शेजारींच बसला होता. पुरोहित राजाला म्हणाला,–" महारज, या शिवानें काच व स्फटिक मणी यांस नानाप्रकारचे रंग देऊन खोटीं रत्नें, व पितळेचें खोटें सोनें बनवून व त्यांचे अनेक खोटे रत्नजडित अलंकार करवून मला दिले व त्यांबद्दल माझें सर्वस्व घेतलें, आणि तें सर्व खर्चेही करून सोडलें."

त्यावर शिव म्हणतो–प्रभो, लहानपणापासून मी तापसी होतों; पण या ब्राह्मणानें माझ्या हातांपायांपडून व मला आपली कन्याही देऊन, मजकडून त्या अलंकारांचा प्रतिग्रह करविला. मी आपला भोळा असून मला कांही इतकाही व्यवहार कळत नाहीं. रत्नें कशीं असतात व सोनें कशाला म्हणतात, हेंही मला ठाऊक नाहीं. तेव्हां 'तूं जें मला सांगशील तें मी केवळ तुझ्या संतोषाकरितां करीन ' असें मी त्याला तेव्हांच सांगितलें होतें, व यानेंही ' आपण कांहीं चिंता करूं नका, मी सर्व व्यवस्था करीन ' असें म्हटलें होतें. प्रतिग्रह घेतल्यावरही मीं तें सर्व याच्याच स्वाधीन केलें. कांहीं दिवसांनीं आपल्याच इच्छेप्रमाणें मला किंमत देऊन, यानें तें माझें दानाचें सर्व पात्र विकत घेतलें. त्याविषयीं आम्हीं एकमेकांना आपल्या हातांनीं लिहूनही दिलें आहे. आपल्याला मी सांगतों तें खोटें वाटत असल्यास, या युवराज माधवाला विचारा. हें सर्व वर्तमान त्याला ठाऊक आहे; कारण त्यानेंच मला हें दान दिलें होतें

शिवाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच माधव म्हणतो–ब्राह्मणा, असें भलतेंच कांहीं बोलूं नकोस. तूं मला अतिशय मान्य आहेस. पण या बाबतींत मी तुझें किंवा पुरोहिताचेंही कांहीं लागत नाहीं. माझें पितृसं-

बंधी धन, मी या पुरोहिताच्या हवालीं करून ठेविलें होतें, व तें तसेंच त्याच्याकडून आणवून तुला दिलें. इकडे येण्याच्या पूर्वीही मी तें असेंच एका मित्राच्या घरीं पुष्कळ दिवस ठेविलें होतें. येतांना तें त्यानें जसें दिलें तसेंच मी आणिलें, व याच्या स्वाधीन केलें. जर तें खरें नसतें तर अशा त्या खोट्या भूषणांचें दान देऊन मला एकदम बरें वाटणें, हें फल कसें मिळालें असतें ? माझ्या मनांत कपटाचा लेशही नसून मी तें महाधन शुद्ध भावानें सत्पात्रीं अर्पण केल्यामुळेंच माझा हा पुनर्जन्म झाला, असें मी समजतों; नाहींतर तसल्या दुस्तर रोगांतून उठण्याची मला तरी निदान आशा नव्हती. असें मुखचर्या अगदीं गंभीर ठेवून माधव बोलत असतां, मंत्र्यांसह राजा हसूं लागला, व त्याचा विलक्षण धूर्तपणा पाहून संतुष्ट झाला. 'यांत माधव व शिव यांचा काडीभरही अपराध नाहीं' असें मनांतल्यामनांत हंसणाऱ्या सभासदांनीं न्याय सांगितला असतां, ज्याचें सर्व धन गेलें आहे असा तो पुरोहित अतिशय लज्जित होऊन घरीं गेला. अतिलोभांधबुद्धि कोणत्या आपत्तींना कारण होत नाहीं ?* त्यानंतर संतुष्ट झालेल्या राजापासून ज्यांस उत्तम बक्षिस मिळालें आहे, असे ते दोघे धूर्त शिव-माधव तेथें पुष्कळ दिवस सुखानें राहिले.

बाबा, जाळ्यांवर उपजीविका करणाऱ्या कोळ्यांप्रमाणें, धूर्त लोक या-प्रमाणें सूत्रें बांधून जिव्हाजाल पसरतात. हा धूर्तही मी कनकपुरी पाहिली, असें खोटेंच सांगून व तुला फसवून माझी प्राप्ति करून घेण्याची इच्छा करीत होता. यास्तव माझ्या विवाहाची त्वरा करूं नका. मी कन्याच राहीन. याविषयीं भवितव्यता कशी आहे, ती तर पाहूं या !

कनकरेखेनें असें सांगितलें असतां, तो परोपकारी तिला म्हणाला,— "बाळे, तारुण्यांत फार दिवस अविवाहित रहाणें चांगलें नव्हे; कारण गुणांचा द्वेष करणारे दुर्जन खोटेच आरोप करूं लागतात. विशेषत: उत्तमाला कलंक लावण्यास लोक तयार असतात.§ याविषयीं मी तुला हरस्वामीची कथा सांगतों ती ऐक.

* कासां हि नापदां हेतुरतिलोभान्धबुद्धिता ।

§ मिथ्या वदन्ति दोषं हि दुर्जना गुणमत्सराः ।
उत्तमस्य विशेषेण कलङ्कोत्पादको जनः ॥

## ४. हरस्वामीची कथा.

गंगातीरीं कुसुमपुर असून त्यांत हरस्वामी म्हणून एक, तीर्थाची इच्छा करणारा तापसी होता. भिक्षा मागून खाणाऱ्या त्यानें गंगातीरीं आपली पर्णकुटी बांधली होती. तपाच्या अत्युत्कर्षामुळें तो लोकांच्या विशेष आदरास पात्र झाला होता. एकदां भिक्षा मागावयास निघालेल्या त्याला दुरून पाहून, त्याचे गुण सहन न झालेला एक खल सर्व लोकांस म्हणाला,–" अहो हा कसा ढोंगी तापसी आहे तें तुम्हाला माहीत आहे का ? यानेंच या नगरांतील सर्व बालकांस खाऊन टाकलें आहे. "–त्याचें हें दुर्वचन संपतांच दुसराही एक खल ' खरेंच मीही असेंच ऐकलें आहे ' असें बोलला. तिसराही एकजण ' तें अगदीं खरें आहे ' असें म्हणाला. अशा तऱ्हेची दुर्जनांच्या संवादाची शृंखलाच श्रेष्ठांच्या निंदेस उत्पन्न करिते,‡ हें तुलाही ठाऊक आहेच. पुढें तीच त्यांची निंदा गांवभर पसरली. हरस्वामी बालकांस खातो, असें म्हणणारे पौरजन आपापल्या मुलांस बाहेर कोठें जाऊं देईनातसे झाले. त्यानंतर सर्व ब्राह्मण आपल्या संततीचा क्षय होईल, या भीतीनें एकत्र जमून हरस्वामीस तेथून घालवून देण्याचा विचार करूं लागले, व एकमतानें ठरल्यावर रागावून तो कदाचित् आम्हांलाही खाईल, या भीतीनें स्वतः त्याच्यापाशीं न जातां त्यांनीं दूत पाठविले. ते गंगातीरीं जाऊन दुरूनच त्याला म्हणाले,– " ब्राह्मणा, तूं या नगरांतून जा, असें येथले सर्व द्विज तुला सांगत आहेत."

तें ऐकून विस्मित झालेला तो त्यांस विचारूं लागला, कीं कां रे बाबांनो, त्यांनीं मला जावयास सांगितलें आहे ? तेव्हां ते म्हणाले,– तूं लहान लहान बालकांनां पहातांच, खाऊन टाकतोस म्हणून"–तें ऐकून हरस्वामी त्यांच्या मनाचा संशय घालविण्याकरितां दूतांबरोबरच ब्राह्मणांकडे आला. पण त्याला पहातांच ब्राह्मण भयानें घरांवर चढून बसले; कारण एकदां एकाद्याविषयीं मन कलुषित झालें, म्हणजे विचार पार नाहींसा होऊन, त्याचें प्रत्येक शुभ कृत्यही अशुभ वाटूं लागतें.* असो;

---

‡ बध्नात्यार्यपरीवादं खलसंवादशृंखला ।

* प्रवादमोहितः प्रायो न विचारक्षमो जनः । याचा अक्षरशः अर्थ असाः– निंदेनें मोहित झालेला जन प्रायः विचार करण्यास समर्थ नसतो.

त्यांचा तो मूर्खपणा पाहून हरस्वामी मनांतल्या मनांत हंसूं लागला, व मार्गातच उभा राहून तो मोठ्यानें त्यांस म्हणाला—अरे वेड्यांनों, केवढें हें तुमचें अज्ञान! कांहीं विचार करा, मी आजपर्यंत कोणा-कोणाचीं पोरें खाल्लीं आहेत, तें तर मला सांगा?

तें ऐकून त्या ब्राह्मणांत जे विचारी व अनुभवी होते, ते 'कोणाकोणाचीं मुलें आजपर्यंत नाहींशीं झालीं आहेत रे बाबा' म्हणून चवकशी करूं लागले. तेव्हां सर्वांचीं मुलें जिवंत आहेत, असें त्यांना कळलें. नंतर त्यांनीं जेव्हां सर्व ब्राह्मणांचा मोह दूर केला, तेव्हां 'आपण उगीच या साधूवर दोषारोप केला होता,' असें प्रत्येकास वाटलें. सर्व ब्राह्मणांना मोठा पश्चात्ताप झाला. शेवटीं सर्वांचीं मुलें जिवंत आहेत. कोणीही कोणाला खाल्लेलें नाहीं, असें ठरून व आपल्यावरील मिथ्या आरोप निघून गेला आहे असें पाहून, हरस्वामी तें स्थान सोडून जावयास तयार झाला; कारण अविवेकी जनांनीं भरलेल्या दुर्देशांत सज्जनांची प्रीति कशी रहाणार!‡ पण वैश्य व विद्वान् ब्राह्मण यांनीं त्याच्या चरणांवर मस्तक ठेवून क्षमा मागितली असतां, मोठ्या कष्टानें त्यानें तेथें रहाण्याचें मान्य केलें.

मुलि, याप्रमाणें एकाद्याचें सच्चरित पाहून, ज्यांना द्वेष वाटूं लागला आहे, असे दुर्जन प्रायः सज्जनांवर मिथ्या आरोप करीत असतात. यास्तव मला निश्चित करण्याची जर तुझी इच्छा असेल, तर तूं तारुण्याच्या आरंभींच अशी स्वेच्छ वागूं नकोस.''

पित्याचा हा आग्रह पाहून निश्चयवती कनकरेखा पुनः म्हणाली,— "बाबा, मी तुम्हांला सांगितलेंच आहे, कीं ज्या ब्राह्मणानें अथवा क्षत्रियानें कनकपुरी पाहिली असेल, त्याच्याशीं मी विवाह करीन.—" तो तिचा दृढ निश्चय पाहून, ही पूर्व जन्माला जाणणारी कोणी पुण्यवती कन्या आहे, असें जाणून व दुसरा मार्गच नाहीं, असें समजून राजानें पुनः सर्व राष्ट्रभर वर सांगितल्याप्रमाणेंच वारंवार घोष करविण्याचा क्रम चालविला; पण कनकपुरी पाहिलेला एकही तरुण त्याला आढळला नाहीं.

‡ अविवेकिनि दुर्देशे रतिः का हि मनस्विनः ।

# तरंग २ रा.

## १. शक्तिदेवाचा कनकपुरी पहाण्याकरितां प्रवास.

त्यानंतर राजकन्येनें अपमान केल्यामुळें अतिशय खिन्न झालेला शक्तिदेव मनांत म्हणाला,-कीं मी कनकपुरी पाहिली आहे, असें खोटेंच बोललों व त्यामुळें राजकन्येच्या येथें माझा अपमान झाला, तर आतां मी कनकपुरी दिसेपर्यंत या पृथ्वीवर फिरत रहाणार. या कामांत प्राण गेले तरी पतकरेल; पण मी आतां ती नगरी पाहिल्यावांचून परत फिरणार नाहीं. कारण ती सुंदरी न मिळाल्यास हें माझें जीवित व्यर्थ आहे, असें मी समजतों. अशी प्रतिज्ञा करून तो त्या वर्धमान नगराच्या दक्षिणेस निघाला. यथाशक्ति पायानेंच मार्गक्रमण करीत असतांना त्याला विंध्यारण्य लागलें. त्यांतील अतिकठिण प्रदेशांतून हळु हळु जात असतांना कांहीं दिवसांनीं पुष्कळ दूर गेल्यावर एका अगदीं निर्जन प्रदेशीं त्याला एक मोठें व सुंदर सरोवर आढळलें. त्याचें जल शीतल व मधुर होतें. तें या भूलोकच्या इतर सरोवरांचें चक्रवर्तीच होतें. त्यांतील फुललेलीं पांढरीं कमळें छत्रासारखीं व विहार करणारे हंस, चामरासारखे दिसत होते. त्यांत त्या पुण्यवान् ब्राह्मणानें स्नान-संध्यादि नित्य कर्में केलीं. त्याच्या उत्तरेस थोड्या अंतरावर फलयुक्त व हिरव्यागार वृक्षांनीं परिवेष्टित, असा एक आश्रम त्याला दिसला. त्याच्याकडे जातांच एक अश्वत्थ वृक्षाखालीं अनेक तापसांसह बसलेला एक सूर्यतप नांवाचा वृद्ध मुनी त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां प्रणामपूर्वक तो तरुण त्याच्यापाशीं गेला. उदार मुनींनेंही मोठ्या आदरानें त्याचें स्वागत केलें, आणि म्हटलें,-"भद्रमुखा, कोठून आलास व तुला कोठें जावयाचें आहे?"

तो शुभ प्रश्न ऐकून शक्तिदेव म्हणाला,-कनकपुरी पहाण्याची प्रतिज्ञा करून मी वर्धमाननगराहून आलों; पण ती कोठें आहे हें कांहीं मला माहीत नाहीं. आपल्याला माहीत असल्यास मला सांगा. शक्तिदेवानें अशी नम्र प्रार्थना केली असतां, तो तापसी म्हणाला,-"वत्सा, आठशें वर्षे मी या आश्रमांत काढलीं; पण या नांवाची नगरी मी कधीं ऐकलीही नाहीं."-शक्तिदेव अतिशय खिन्न झाला व 'भगवन्, तर मग मी मेलों

असेंच समजा.' असें म्हणाला-पण तें ऐकून स्वभावतःच कृपामृदु असलेल्या ज्ञानी मुनीनें,-'तुझा जर तसा निश्चयच असला तर मी सांगतों तसें कर' असें म्हणून पुढील उपाय सांगितला—

येथून तीन योजनें दूर गेलें म्हणजे कांपिल्य देश लागतो. त्यांत उत्तर या नांवाचा एक पर्वत आहे. त्याच्यावर एक आश्रम असून तो दुरूनही दिसतो. त्यांत दीर्घतपा या नांवाचा माझा ज्येष्ठ भ्राता तप करीत आहे त्याच्याकडे तूं जा. तो फारच वृद्ध असल्यामुळें कदाचित् त्याला ती नगरी ठाऊक असेल.

हें ऐकून ज्याला थोडेंसें समाधान झालें आहे, अशा शक्तिधरानें ती रात्र तेथें घालविली, व दुसऱ्याच दिवशीं तो तेथून निघाला. त्याला कांपिल्य देशास जाऊन पोंचेपर्यंत पुष्कळ क्लेश झाले, व दिवसही बरेच लागले. पण तेथें जातांच क्रमानें त्याला पर्वत, आश्रम व त्यांतील तो मुनि यांचें दर्शन झालें. मुनीला पाहून आनंदित झालेल्या त्यानें प्रणाम केला. व लागलेंच योग्य आतिथ्य केलेल्या त्याच्यापाशीं तो गेला, आणि हात जोडून म्हणाला,-"भगवन्, मी कनकपुरीला निघालों आहें; पण ती कोठें आहे हें मला माहीत नाहीं. मला तर तिचें दर्शन अवश्य घ्याव-याचें आहे. ती कोठें आहे हें समजावें म्हणून सूर्यतप मुनींनीं मला आपल्याकडे पाठविलें आहे."-

तें ऐकून तो मुनि म्हणाला,-"बाळा, मी इतक्या दिवसांत कनक-पुरी हें नांव तुझ्या तोंडूनच ऐकलें. देशांतराहून आलेल्या लोकांशीं माझा परिचय नाहीं. पण ती कोठें तरी फार दूर अन्यद्वीपांत असावी, असा माझा तर्क आहे. तूं आतां मी सांगतों तसें कर, म्हणजे कदा-चित् तुला तिचा पत्ता लागेल."

समुद्रांत उत्स्थलाख्य द्वीप आहे. त्यांत सत्यव्रत नांवाचा श्रीमान् निषादपति रहातो. त्याचें जाणें येणें सर्व द्वीपांत आहे. त्याला ती नगरी पाहून जरी नाहीं, तरी निदान, ऐकून ठाऊक असेल. यास्तव तूं आतां आधीं समुद्रकांठच्या विटंकपुरास जा. तेथून नौकामार्गानें तुला त्या द्वीपांत गेलें पाहिजे. एकाद्या व्यापारी वैश्याच्या सहाय्यानें तुला तिकडे जातां येईल.

हें ऐकतांच 'बरें आहे' असें म्हणून तो तरुण निश्चयी ब्राह्मण त्या मुनीस नमस्कार करून, तसाच तेथून निघाला. पुष्कळ दिवसांनीं

अनेक देश ओलांडून तो समुद्रतीरावरील विटंकपुरास पोंचला. तेथें शोध करून त्यानें उत्स्थल द्वीपास जाणाऱ्या एका समुद्रदत्त वैश्याशीं मैत्री केली, आणि त्याचें पूर्ण प्रेम हीच सामग्री बरोबर घेऊन तो त्याच्या-बरोबर जलमार्गानें पुढें जावयास निघाला. पुष्कळ दूर जाईपर्यंत त्यांचा प्रवास सुखानें झाला. पण उत्स्थलद्वीप थोड्याच अंतरावर राहिलें असतां, एकाएकीं आकाश मेघांनीं भरून गेलें, विजा चमकूं लागल्या, झंझावात सुटला व त्यामुळें समुद्र खवळून, मोठमोठ्या लाटा उसळूं लागल्या, धनी लोकांची उन्नति व अवनति क्रमानें कशी होते तें दाख-वीतच जणुं काय ती नौका एकदां वर जाई व एकदां खालीं होई. प्रवासी व खलाशी मोटा आक्रोश करूं लागले. कांहीं वेळानें तें जलांतील वाहान एका कडयावर आपटून फुटलें. त्याचा स्वामी पाण्यांत पडला. पण इतक्यांत दैववशात् त्याला एक फळकट सांपडलें, व त्याच्या सहायानें तरंगत जाऊन तो दुसऱ्या एका नौकेवर चढला. शक्तिदेव एका तोंड पसरून बसलेल्या मत्स्याच्या तोंडांत शिरला, व त्यानें तोंड मिटलें असतां इतर प्राण्यांबरोबर तोही अक्षत शरीरानेंच त्याच्या पोटांत गेला. विधि-वशात् तो मत्स्य सागरांत स्वैर संचार करीत असतां उत्स्थलद्वीपाजवळ गेला. त्याला कोळ्यांचा स्वामी जो सत्यव्रत, त्याच्या मासे धरणाऱ्या किंकरांनीं धरलें. फारच धिप्पाड शरीराच्या त्या माशाला त्यांनीं आपल्या धन्यापाशीं नेलें. त्याचें फार मोटें शरीर पाहून सत्यव्रतही आश्चर्यचकित झाला; कारण एवढा मोटा मासा त्यानेंही आजपर्यंत प्रत्यक्ष पाहिला नव्हता. पाठीन नांवाचा मासा फार लांब असतो, असें त्याला ऐकून मात्र ठाऊक होतें. त्यामुळें हा पाठीन मासा आहे, असं ठरवून त्यानें त्याला चिरावयास सांगितलें. त्याच्या नोकरांनीं त्या भयंकर माशाला उभें चिरलें. तों आंतून, दैव सबळ असल्यामुळें, जिवंत राहिलेला शक्तिदेव निघाला. त्याला पहातांच निषादपतीचें कौतुक दुणावलें, व श्वास कोंडल्यामुळें घाबरलेल्या त्याला त्यानें जरा स्वस्थ होऊं दिलें. नतर त्या तरुण ब्राह्मणाला तो म्हणाला,—"महाराज, आपण कोण, व या मत्स्याच्या पोटांत कसे शिरलां? आपला काय वृत्तांत आहे?"

हे त्याचे प्रश्न ऐकून शक्तिदेव त्या कोळ्यांच्या राजास म्हणाला,—"हे भल्या मनुष्या, मी शक्तिदेव ब्राह्मण आहें. मी वर्द्धमान नगराहून

आलों. मला कनकपुरी नामक नगरीस अवश्य जावयाचें आहे; पण ती नगरी कोठें आहे हें ठाऊक नसल्यामुळें, मी आज पुष्कळ दिवस पृथ्वीवर भटकत आहें. एका दीर्घतप नांवाच्या मुनीच्या सांगण्यावरून, ती नगरी कोठें द्वीपांतरीं असेल असें जाणून, तिचा पत्ता लागावा म्हणून उत्स्थल-द्वीपांत रहाणाऱ्या सत्यव्रताकडे जात असतांना, मध्येंच मार्गांत नौका फुटून मी या माशाच्या तोंडांत पडलों; पण आयुष्य संपलेलें नसल्यामुळें मी असल्या भयंकर दशेंतूनही विचित्र रीतीनें जिवंत राहिलों आहें."

त्या दुःखी ब्राह्मणाचें हें कष्टकर वर्तमान ऐकून सत्यव्रत म्हणाला,-"ब्राह्मणा, सत्यव्रत मीच आहें, व उत्स्थल नांवाचें द्वीपही हेंच आहे. मीं पुष्कळ द्वीपें पाहिलीं आहेत, पण ती नगरी कधीं ऐकिली नाहीं."-तें ऐकून अतिशय खिन्न झालेल्या त्याला तो कोळ्यांचा राजा अभ्यागत-प्रेमानें म्हणाला,-"महाराज, तुम्हीं असे खिन्न होऊं नका. आजची एक रात्र येथेंच काढा. म्हणजे उद्यां सकाळीं आपल्या इष्टसिद्ध्यर्थ कांहीं उपाय सांगेन."-असें सांगून त्या उदार पुरुषानें शक्तिदेवाला, जेथें त्याचा अतिथिसत्कार चांगल्या रीतीनें होईल, असें त्याला वाटत होतें, अशा एका ब्राह्मणाच्या घरीं पाठविलें.

तेथें गेल्यावर विष्णुदत्त नांवाच्या एका ब्राह्मणानें त्याचें योग्य आतिथ्य केलें. त्यामुळें तो कष्टी ब्राह्मण प्रवासांतील आपत्तीस विसरला. नंतर भोजन करीत असतांना, बोलतां बोलतां विष्णुदत्तानें प्रश्न केला असतां, शक्तिदेवानें आपला देश, कुल व वृत्तांत थोडक्यांत सांगितला. तो ऐकून विष्णुदत्तास मोठा आनद झाला. त्याचा कंठ हर्षाश्रूंनीं दाटून आला. भोजनानंतर त्याला आलिंगन देऊन तो म्हणाला,-"मोठ्या आनंदाची गोष्ट आहे, कीं तूं माझ्या मामाचा मुलगा आज मला भेट-लास; शिवाय तुझा व माझा एकच देश आहे. मी लहानपणींच तेथून येथें आलों. तर आतां तूं येथेंच रहा; द्वीपांतरांतून येणाऱ्या व्यापारी-वर्गाच्या द्वारा तुझें कार्य लवकरच शेवटास जाईल."—

तें ऐकून शक्तिदेवाला अतिशय आनंद झाला; कारण परदेशांत आ-प्तांचा समागम होणें, हें माळभूमीवर अमृताचा झरा सांपडण्यासारखेंच*.

* विदेशे बन्धुलाभो हि मरावमृतनिर्झरः ।

आहे. आतां आपले मनोरथ लवकरच पूर्ण होणार असें त्यास वाटूं लागलें; कारण मध्येंच अकस्मात् झालेलें कल्याण पुढील कार्यसिद्धि सुचवीत असतें.† असो; त्यानंतर रात्रीं झोप न आल्यामुळें शय्येवर जागतच पडलेल्या, पण आपल्या इष्टसिद्धीकरितां निश्चित झालेल्या त्याच्या विनोदार्थ जवळच बसलेला विष्णुदत्त पुढील कथा सांगूं लागला.—

## २. अशोकदत्त व कपालस्फोट यांची कथा.

पूर्वी यमुनेच्या कांठीं एका गांवांत गोविंदस्वामी म्हणून एक ब्राह्मण रहात असे. त्या गुणशाली द्विजाला त्याच्याचसारखे दोन पुत्र झाले. त्यांतील एकाचें नांव अशोकदत्त व दुसऱ्याचें विजयदत्त होतें. कांहीं दिवसांनीं त्या प्रांतांत भयंकर दुष्काळ पडला. तेव्हां गोविंदस्वामी आपल्या भार्येला म्हणाला,—" प्रिये, या देशांत आतां मोठा ताप होऊं लागला आहे; आपल्या आप्तांची ही दुर्दशा माझ्यानें पहावत नाहीं; आणि द्यावयाचें तरी कोणाकोणाला व किती? यास्तव आपल्यापाशीं जें कांहीं थोडें आहे तें सर्व यांना वांटून देऊन आपण वाराणसींत रहावयास जाऊं या."—त्याच्या साध्वी भार्येनें या त्याच्या म्हणण्यास अनुमोदन दिलें असतां, सर्वस्व दान करून, तो भार्या, पुत्र व भृत्य यांसह तेथून निघाला. साधुपुरुष आपल्या लोकांची आपत्ति पहाण्यास समर्थ *नसतात. असो; जात असतांना मार्गांत त्याला एक महासाधु भेटला. त्यानें श्रीशंकराप्रमाणेंच आपल्या अंगास शुभ्र भस्म लाविलें होतें. डोक्यावर जटा धारण केल्या होत्या, व हातांत भिक्षा-कपाल घेतलें होतें. त्यास पहातांच गोविंदस्वामीच्या मनांत त्याच्याविषयीं मोठा विश्वास उत्पन्न झाला. त्यानें आपल्या दोन्हीं पुत्रांस नम्रपणें त्याच्या समोर बसवून त्यांचें शुभाशुभ विचारिलें. तेव्हां तो ज्ञानी योगी त्यास म्हणाला,—"ब्राह्मणा, तुझे हे दोघेही पुत्र पुढें फार थोर व गुणी महात्मे होतील; पण या धाकट्या पुत्राचा व तुझा कांहीं दिवस वियोग होईल. तथापि कांहीं कालानें या तुझ्या मोठ्या पुत्राच्या प्रभावानें तो तुला पुनः भेटेल."

---

† अन्तरापाति हि श्रेयः कार्यसम्पत्तिसूचकम् ।

* उत्सहन्ते न हि द्रष्टुमुत्तमाः स्वजनापदम् ।

तें ऐकून ज्याच्या चित्तांत सुख व दुःख या दोघांचाही चमत्कारिक रीतीनें प्रादुर्भाव झाला आहे, असा तो परोपकारी ब्राह्मण त्यास विचारून पुढें चालला. कांहीं दिवसांनीं वाराणसीस पोंचल्यावर, गांवाच्या बाहेरील देवीच्या मंदिरांत राहून व तिची पूजा करून त्यानें तो दिवस घालविला. रात्रीं त्या देवळाजवळच्या वृक्षा खालीं दुसऱ्या कांहीं वाटसरू साधूंसह तो सहकुटुंब राहिला. त्यांच्याप्रमाणेंच त्यानेंही झाडांचे टाळे हातरून त्या पर्णशय्येवरच अंग टाकलें. मध्यरात्रीच्या सुमारास त्याचा प्रिय विजयदत्त एकाएकीं 'बाबा, मला फार थंडी वाजत आहे' असें म्हणाला. थोड्याच कालांत त्याचें अंगही तापूं लागलें आहे, असें गोविंदस्वामीला कळलें. विजयदत्त म्हणतो—बाबा, मला हें हिंव असह्य झालें आहे, यास्तव मला लांकडें तरी पेटवून द्या, म्हणजे मी आपलें अंग शेकून जरा सावध होईन; नाहीं तर मी कांहीं जगत नाहीं. आपल्या आवडत्या बाळाचे हे शब्द कानीं पडतांच त्या बिचाऱ्या ब्राह्मणाचें हृदय विदीर्ण झालें; पण कांहींच इलाज न सुचल्यामुळें तो म्हणाला,-" बाळा, आतां अग्नि कोठून आणूं ? " त्यावर तो पुत्र विव्हल होऊन म्हणतो—बाबा, हा जवळच पेटलेला अग्नि दिसत आहे तर खरा; तेथें मला न्या. म्हणजे त्या मोठ्या थोरल्या अग्नीपाशीं बसून मी आपली व्यथा कमी झाल्यास पाहीन.

त्यावर त्याचा पिता म्हणतो—लाडक्या; तें श्मशान आहे, व त्यांत ती चिता जळत आहे. श्मशानांत रात्रीं अनेक पिशाचांचा स्वैर संचार होत असतो. तूं लहान आहेस, तेव्हां तुला तेथें कसें नेऊं ? पहांट होऊं दे, म्हणजे कोठून तरी तुला विस्तव आणून देईन. जरा थांब आपल्या प्रेमळ पित्याचें तें भाषण ऐकतांच वीर विजयदत्त हंसून म्हणाला,- "बाबा, तीं क्षुद्र पिशाचें मला काय करणार ? मी कांहीं भितरा नाहीं. तर आतां आपण मला निःशंकपणें तेथें न्या. माझ्यानें हें शीत सहन करवत नाहीं.—"

आपल्या आर्त पुत्राचा असा फारच आग्रह पाहून गोविंदस्वामी त्याला श्मशानांत घेऊन गेला. तेव्हां धूम हेच जिचे अस्ताव्यस्त केंस आहेत, अशा नरमांस खाणाऱ्या राक्षसीप्रमाणें असलेल्या त्या चितेजवळ तो बालक शेकण्याकरितां गेला. कांहीं वेळ शेकतांच जरा सावध झालेला

तो आपल्या पित्यास म्हणाला,–" बाबा, या चितेंत हें वाटोळें काय दिसत आहे ?"–त्यावर 'बाळा, हें मनुष्याचें कपाळ आहे' असें त्यानें उत्तर दिलें. तेव्हां दैव फिरल्यामुळें त्या मुलानें एका जळत्या लांकडाचा प्रहार करून तें फोडलें. त्याबरोबर त्यांतून वसेची धार उडून, श्मशानाग्नीनें अर्पण केलेल्या राक्षसी सिद्धीप्रमाणेंच, ती त्याच्या तोंडांत शिरली. तिचा स्वाद घेतांच तो बालक महाराक्षस झाला. त्याचे केंस उभारले, डोळे लाल झाले व विक्राळ दाढा बाहेर दिसूं लागल्या. त्यानें चितेतील तें कपाल ओढून घेऊन त्यांतील वसा प्राशन केली, व तरवार उपसून तो आपल्या बापाला मारावयास धांवला. तेव्हां 'हे कपालस्फोट देवा, तूं आपल्या या पित्याला मारूं नकोस.' अशी वाणी तेथें उमटली. ती ऐकतांच तो राक्षस कोठें गुप्त झाला. हा सर्व अद्भुत प्रकार पाहून दुःखी गोविंदस्वामी "हा पुत्रा, हा गुणशालिन् विजयदत्ता,' असें म्हणत व आक्रोश करीत देवीच्या मंदिराकडे परत आला. सकाळीं त्यानें तें सर्व वर्तमान आपल्या भार्येला व ज्येष्ठ पुत्राला सांगितलें आणि तीं तिघेंजणें इतकीं दुःखी झालीं कीं, देवीच्या दर्शनास आलेल्या लोकांनाही त्यांची अवस्था पाहून रडूं कोसळलें.

कांहीं वेळानें देवीची पूजा करण्याकरितां कोणी एक समुद्रदत्त नांवाचा श्रीमान् वैश्य तेथें आला. त्यानें पुत्रशोकानें व्याकुल झालेल्या गोविंदस्वामीला तेथें पाहिलें. त्या साधूला त्याची दया आली. त्यानें हातापायां पडून त्याला बरोबरच्या परिवारासह आपल्या घरीं नेलें, व स्नानादि उपचारांनीं त्याची उत्तम सेवा केली. दुःखी लोकांवर दया करणें, हा महात्म्यांचा स्वभावच आहे.* योग्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून भार्येसह तो ब्राह्मणही कसेंबसें धैर्य धरून राहिला. त्या दिवसापासून त्या वैश्यानें प्रार्थना केल्यामुळें, तो त्याच्याच येथें सहपरिवार बिऱ्हाड करून राहूं लागला. त्याच्या वडील मुलानें सर्व उचित विद्यांचें अध्ययन केलें. तो तरुण व सशक्त झाला. त्यानें त्या क्षेत्रांत उत्तम बाहुयुद्धाचें ज्ञानही संपादन केलें. त्या कलेंत तो कांहीं दिवसांनीं इतका प्रवीण झाला, कीं त्याच्या तोडीचा मल्ल या भूतलांत सांपडणें कठिण आहे, असें त्याचें युद्धकौशल्य पहाणाऱ्या प्रत्येकास वाटूं लागलें.

* निसर्ग एष महतां यदापन्नानुकम्पनम् ।

एकदां देवयात्राप्रसंगीं मल्लांच्या कुस्त्या ठरल्या असतां, दक्षिणदेशांतून कोणीएक महामल्ल तेथें आला. त्यानें वाराणसीच्या प्रतापमुकुटराजाच्या समक्ष तेथल्या सर्व मल्लांना जिंकलें. तेव्हां समुद्रदत्त वैश्याच्या तोंडून ज्याची ख्याति ऐकली आहे, अशा अशोकदत्तास बोलावून आणून राजानें त्याला या महामल्लाशीं लढावयास सांगितलें. त्याबरोबर तो दंड ठोकून कुस्ती करावयास आखाड्यांत उतरला. विजयी दक्षिणीमल्लानेंही शड्डु ठोकून त्याच्याशीं कुस्ती आरंभिली; पण हाताला हात लागतांच अशोकदत्तानें त्याचा हात मोडून, त्याला भूमीवर सपशेल चित केलें. तेव्हां त्या मोठ्या समाजांत त्याची फार वाहवा झाली. राजाही त्याच्यावर संतुष्ट झाला व त्याला अनेक रत्नें देऊन त्यानें आपला पार्श्वचर केलें. तेव्हां स्वगुणांनीं उत्तरोत्तर राजाला अधिक प्रिय झालेल्या अशोकदत्ताचा उत्कर्ष झाला.

एकदां चतुर्दशीस राजा शंकराची पूजा करावयास नगराबाहेर गेला होता. प्रदोषपूजा आटोपून मध्यरात्रीच्या सुमारास श्मशानाजवळून परत येत असतांना त्यानें प्रभो, ‘ तुमच्या न्यायाधीशानें मला व्यर्थ वध्य ठरवून द्वेषानें सुळीं दिलें. त्या गोष्टीला आज तीन दिवस झाले, तरी मज पाप्याचे प्राण अजून जात नाहींत, मला फार तहान लागली आहे, मला थोडेंसें जल दे. ’ अशी वाणी ऐकिली. तेव्हां कृपापरवश झालेल्या राजानें जवळच असलेल्या अशोकदत्तास म्हटलें,—“ वीरा याला पाणी पाजावयास कोणाला तरी सांग. ” त्यावर—‘ या भयंकर श्मशानांत यावेळीं दुसरा कोण जाणार ? मीच जातों,’—असें म्हणून तो धीट, पाणी घेऊन तिकडे जावयास निघाला व राजा आपल्या इतर परिवारासह नगरांत आला. थोडें दूर जातांच, कालरात्रीचें जणुं निवासस्थानच असें सर्वतः दाट काळोखानें आवृत झालेलें, पण कोठें कोठें मध्येंच चिताग्नीनें उज्वल दिसणारें श्मशान त्याला लागलें; त्याच्या मध्यभागीं जातांच ‘ राजापाशीं पाणी कोणी रे मागितलें तें ?’ असें तो मोठ्यानें विचारूं लागला. तेव्हां ‘ मीं मागितलें ’ असा एकीकडून आवाज आला. तो ऐकून त्या बाजूलाच गेलेल्या अशोकदत्ताला सुळावर चढविलेला एक पुरुष व त्याच्या खालीं रडणारी, पण सर्व अलंकारांनीं भूषित व पूर्वी कधीं न पाहिलेली एक सुंदर स्त्री दिसली. त्या शूलाजवळच एक चिता

पेटत होती. त्यामुळें त्याला त्या दोघांचींही शरीरें स्पष्ट दिसलीं. तिला पाहून थक्क झालेला तो–'बाई तूं कोण आहेस, व येथें अशी रडत कां बसलीस?' असें म्हणाला. त्यावर ती म्हणते–सज्जना, मी या सुळावर चढविलेल्या पुरुषाची दुर्दैवी स्त्री आहें. याच्याबरोबर सहगमन करण्याचा माझा निश्चय झाला आहे, व त्याच्या प्राणोत्क्रमणाचीच मी वाट पहात आहें; पण आज तीन दिवस तो अशा स्थितींत असतांनाही प्राण त्याला सोडीत नाहींत. हा माझा प्रिय, वारंवार 'पाणी, पाणी' म्हणत आहे. मी तें जाऊन आणिलेंही आहे; पण त्याच्या तोंडापर्यंत माझा हात पुरत नाहीं. काय करूं!

हें तिचें हृदयाला आर्द्र करणारें भाषण ऐकून तो वीर म्हणाला,–"भद्रे, राजानें पाठविलेलें हें जलही माझ्यापाशीं आहे. तर तूं आतां माझ्या पाठीवर उभी राहून याच्या तोंडांत पाणी घाल. आपत्कालीं परपुरुषाला नुस्ता स्पर्श केल्यास, त्यामुळें साध्वी स्त्रिया दूषित होत नाहींत."*–तें ऐकून व 'बरें आहे' असें म्हणून तिनें त्याच्या हातांतलें जल घेतलें व तो शूलाच्या खालीं वांकला असतां, ती त्याच्या पाठीवर दोन्ही पाय देऊन उभी राहिली; पण इतक्यांत भूमीवर व आपल्या पाठीवर टपटप रक्ताचे थेंब पडत आहेत, असें पाहून त्या वीरानें तोंड वर केलें. तों, ती स्त्री सुरीनें त्याच्या अंगाचें मांस कापून खात आहे, असें त्याला दिसलें. त्याबरोबर ही याची स्त्री नसून कोणी हडळ आहे, असें समजून त्यानें क्रोधानें तिला ओढून भूमीवर पाडिलें; आणि आपटून मारण्याकरितां नूपुरानें भूषित झालेला तिचा पाय धरला. पण तीही मोठी बळकट होती, त्यामुळें तिनें वेगानें आपला पाय ओढून घेतला, आणि गगनांत उड्डाण केलें. त्यानंतर ती कोठें दिसेनाशी झाली. तथापि तिचें रत्नजडित नूपुर अशोकदत्ताच्या हातांत आलें. सारांश, दुर्जनांच्या संगतीप्रमाणें, प्रथम फार रमणीय, त्यानंतर पापिनी, व शेवटीं विक्राळ भासणारी, ती तर नष्ट झाली आहे; पण तिचें अमूल्य नूपुर आपल्या हातीं लागलें आहे, असें पाहून तो विस्मित, संतप्त व आनंदित झाला, आणि पुष्कळ विचार केल्यावर तें रत्नजडित दिव्य भूषण घेऊन तो आपल्या घरीं गेला.

---

* न परस्पर्शमात्रं हि स्त्रीणामापदि दूषणम् ।

प्रातःकाळीं उठल्यावर स्नानादि नित्य कर्मे आटोपून तो नेहमींप्रमाणें राजवाड्यांत गेला असतां, 'त्या तृषिताला जल दिलेंस का?' असें राजानें विचारलें. तेव्हां 'होय' एवढेंच बोलून त्या ब्राह्मणपुत्रानें तें दिव्य नूपुर राजापुढें ठेविलें. त्या अलौकिक भूषणास पाहून विस्मित झालेल्या राजानें 'हें तुला कसें मिळालें?' असा प्रश्न केला तेव्हां, अशोकदत्तानें घडलेला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून त्या ब्राह्मणाचें असामान्य धैर्य व गुण यांविषयीं राजाची खात्री झाली. तो त्याच्यावर फारच संतुष्ट झाला. राजा तें अपूर्व नपुर घेऊन अंतःपुरांत गेला व आनंदानें त्यानें तें आपल्या राणीला दाखविलें, आणि घडलेला सर्व अद्भुत वृत्तांतही सांगितला. तेव्हां तो ऐकून व तें दिव्यभूषण पाहून ती अतिशय संतुष्ट झाली. इतक्यांत राजा, अशोकदत्ताची प्रशंसा करून म्हणाला,-"देवि, हा ब्राह्मणपुत्र जाति, विद्या, सत्य व रूप यांच्यायोगानें अति थोर आहे. यास्तव तो जर आपल्या मदनलेखेचा पति होईल, तर फार चांगलें होईल असें मला वाटतें; कारण वराचे गुण पाहिले पाहिजेत. क्षणभंगुर लक्ष्मीकडे पाहून उपयोगी नाहीं. यास्तव तुझी अनुकूलता असेल, तर मी त्या महावीराला आपली कन्या देईन."

हें आपल्या प्राणनाथाचें म्हणणें व अशोकदत्ताची प्रशंसा ऐकून, फारच संतुष्ट झालेली ती देवी मोठ्या आदरानें म्हणाली-नाथ, आपली ही वरयोजना अगदीं योग्य आहे. आपली कन्याही त्या योग्य वराला मधुवनांत पाहिल्यापासून त्याच्याकरितां वेडी झाली आहे. तिची ही अवस्था तिच्या सख्यांच्या द्वारा मला काल रात्रींच कळली, व त्यामुळें मी सचिंत होऊन निजलें असतां, पहांटे एका दिव्यस्त्रीनें मला स्वप्नांत म्हटलें,-"वत्से, तूं ही आपली मदनलेखा-कन्या अशोकदत्तालाच दे. दुसऱ्या कोणाला देऊं नकोस; कारण ती त्याचीच पूर्वजन्मींची पत्नी आहे."-तें ऐकून मी जागी झालें, व उजाडतानांच स्वतः तिच्याकडे जाऊन तिचें समाधान केलें. मी आपल्याला सुद्धां आज हेंच सांगणार होतें; पण आपल्या तोंडूनच तें निघालें हें चांगलें झालें. माझी या गोष्टीला पूर्ण संमति आहे.

याप्रमाणें गृहिणीची अनुज्ञा मिळतांच, राजानें अशोकदत्तास मोठ्या सत्कारानें आपल्या कन्येचें दान दिलें. त्यामुळें लक्ष्मी व विनय यांच्याप्रमाणें, राजकन्या व ब्राह्मणपुत्र यांचा तो जोडा एकमेकांस शोभवूं लागला.

त्यानंतर एकदां अशोकदत्तानें आणिलेल्या त्या रत्नजडित नूपुरास उद्देशून राणी म्हणाली,—“आर्यपुत्र, हें एकच नूपुर शोभत नाहीं. यास्तव याच्याचसारखें दुसरें नूपर करवा.”—तें ऐकतांच राजानें कुशल सोनारांस बोलावून तसलें दुसरें नूपुर करावयास सांगितलें; पण तें पाहून ते म्हणाले, ‘महाराज, आम्हांला असलें भूषण करतां येणार नाहीं; कारण ही कारागिरी या लोकची नव्हे, देवलोकची आहे. असलीं रत्नें भूलोकीं मिळत नाहींत. यास्तव हें जेथें मिळालें असेल तेथूनच दुसरें आणवा.’—हें त्यांचें निराशेचें भाषण ऐकून देवीसह राजा खिन्न झाला असतां, जवळच बसलेला अशोकदत्त एकाएकीं म्हणाला,—“मी तसलें दुसरें नूपुर घेऊन येतों”—इतकें बोलून प्रतिज्ञेप्रमाणें जावयास तो सिद्ध झाला. तेव्हां स्नेहामुळें अपायाची भीति वाटलेल्या राजानें न जाण्याविषयीं पुष्कळ सांगितलें; पण तो वीर केलेल्या, निश्चयापासून ढळला नाहीं. तो तें नूपुर घेऊन कृष्णचतुर्दशीस रात्रीं राजकन्या स्वस्थ निजली असतां, तिच्या अंतःपुरांतून निघून श्मशानांत गेला. निशाचरांनीं भरलेल्या पितृकाननांत शिरल्यावर नरमांस विकणें, हाच त्या स्त्रीच्या दर्शनाचा उपाय आहे असें जाणून, तेथील एक शव खांद्यावर घेऊन ‘कोणाला महामांस हवें का महामांस’ असें मोठ्यानें ओरडत तो तेथें फिरू लागला. इतक्यांत दुरून आपल्याला कोणी हांक मारीत आहे, असें ऐकून तो तिकडे चालला, तों त्याला एक स्त्री भेटली. तिच्या सांगण्यावरून तो तिच्या मागून बराच दूर गेला. तेव्हां एका झाडाखालीं रत्नजडित अलंकारांनीं भूषित झालेली व अनेक स्त्रीपरिजनांनीं परिवेष्टित असलेली एक दिव्यस्त्री त्याला दिसली. ती एका सुंदर आसनावर बसली होती. बोलवावयास आलेल्या स्त्रीनें त्याला अगदीं तिच्या समीप नेलें. तेव्हां तो त्या दिव्यस्त्रीला म्हणाला,—“महामांस कोणाला पाहिजे?”—तें ऐकून ती उत्तम स्त्री म्हणते—अरे धीट पुरुषा, या सर्व शवाचें तूं काय मूल्य घेणार? हा तिचा प्रश्न ऐकतांच ज्याच्या खांद्यावर शव आहे, असा तो आपल्या हातांतील भूषण दाखवून तिला म्हणाला,—“सुंदरि, या नूपुराच्या जोडीचें दुसरें नूपुर जो मला देईल त्याला मी हें शव देईन.”—

त्यावर ती म्हणते—याच्या जोडीचें नूपुर मजजवळ आहे. हें तुझ्या हातांतलें नूपुरही माझेंच आहे. मागच्या चतुर्दशीला तूं तें माझ्या पायांतून

ओढून घेतलेंस, त्यावेळीं मीं सुळावर चढविलेल्या एका पुरुषाच्या तोंडांत पाणी घालण्याकरितां, तुझ्या पाठीवर उभी राहिलें होतें. त्यावेळचें माझें रूप यावेळच्या रूपापेक्षां निराळेंच होतें, त्यामुळें तूं मला आज ओळखलें नाहींस. असो; तें जाऊं दे. हें तुझें मांसही राहूं दे. मी आतां सांगतें तें जर तूं करशील, तर मी तुला याच्या जोडीचें दुसरें नूपुर देईन.

हें तिचें भाषण ऐकून त्या वीरानें लागलेंच तिचें म्हणणें मान्य करण्याची प्रतिज्ञा केली. तेव्हां तिनें आपला असा मनोरथ कळविला कीं, हे भद्र, हिमालयावर त्रिघंटा म्हणून एक नगर आहे. तेथें लब्धजिव्ह म्हणून एक महावीर राक्षसाधिपति रहात असे. त्याची विद्युज्जिव्हा या नांवाची मी भार्या आहें. मला माझ्या इच्छेप्रमाणें रूप बदलतां येतें. तो माझा पति दैवदोषामुळें, ही माझी कन्या उत्पन्न झाली असतां, प्रभु कपालस्फोटाच्या समक्ष संग्रामांत मरण पावला. नंतर संतुष्ट झालेल्या कपालस्फोटानें आपलें नगर मला दिलें. म्हणून मी कन्येसह तेथें रहातें. ही माझी कन्या आतां तरुण झाली आहे. त्यामुळें तिला योग्य वर कसा मिळेल ही चिंता मला लागली आहे. गेल्या चतुर्दशीस राजासह जात असलेल्या तुला मी पाहिलें, व 'हा कल्याणगुणसंपन्न वीर माझ्या कन्येला योग्य वर आहे' असा मीं मनांत निश्चय केला. तुझी व माझी एकांतांत भेट व्हावी म्हणून मीच तें जल मागितलें. आणि तूं पुनः येथें यावेंस म्हणून मी आपल्या इच्छेनेंच हें नूपुर सोडून त्यावेळीं नाहिंशी झालें. तर तूं आतां आमच्या येथें चल, या माझ्या कन्येचा उपभोग घे व दुसरें नूपुर मिळीव.

त्या निशाचरीनें असें सांगितलें असतां तो वीर 'बरें आहे' असें म्हणून तिच्यासह तिच्याच सामर्थ्यानें आकाशमार्गानें त्रिघंटनगरास गेला. हिमालयाच्या शिखरावर असलेल्या त्या सुवर्णाच्या नगरास पाहून आकाशमार्गानें जात असतांनां, विश्रांति घेण्याकरितां तेथ बसलेल्या सूर्यमंडलाचाच त्याला भास झाला. त्या रमणीय नगरांत पोंचल्यावर आपल्या साहसाची जणुं काय साक्षात् महासिद्धीच अशा प्राप्त झालेल्या विद्युत्प्रभेचा त्यानें अंगीकार केला. कांहीं काल तो तिच्याशीं विहार करीत राहिला. सासूच्या दैवी ऐश्वर्याचा यथेच्छ अनुभव घेत असतांना त्याला तेथें अवर्णनीय सुख झालें.

त्यानंतर एकदां तो अशोकदत्त आपल्या सासूला म्हणाला,–" आई, मला तें नूपुर दे. मी आतां वाराणसीस जातों; कारण–मी तें घेऊन येतों अशी राजापुढें प्रतिज्ञा केली आहे." तें ऐकून रात्रिंचरीनें आपल्या प्रिय जामातास दुसरें नूपुर व एक सुवर्णकमलही दिलें. तेव्हां पुनरपि येण्याचें कबूल करून, तो आकाशमार्गानेंच श्मशानापर्यंत सासूबरोबर आला. शेवटीं निरोप देतांना वृक्षाखालीं बसलेली ती म्हणाली,–" वत्सा, मी प्रत्येक महिन्याच्या कृष्णचतुर्दशीस येथें येतें, तर त्या वेळीं तूंही मला येथें येऊन भेटत जा, म्हणजे तुझी प्रियाही तुला भेटेल.–" त्यावर 'बरें आहे,' असें तिला सांगून अशोकदत्त आपल्या घरीं गेला. धाकट्या भावाच्या दुःखानें पोळलेल्या आपल्या आईबापांस, आपल्या ह्या प्रवासानें किती कष्ट झाले असतील, त्याची कल्पना त्याला सहज होण्यासारखी होती, म्हणून अगोदर घरीं जाऊन एकाएकीं आलेल्या प्रिय व शूर पुत्राला पाहून, अत्यानंदयुक्त झालेल्या त्यांचें तो जों समाधान करीत आहे, तों तेथें राजा आला. त्याला त्या वीरानें प्रणाम केला असतां राजानें, जणुं काय त्या साहसिकाच्या स्पर्शास भिऊनच, रोमांचित झालेल्या अंगांनीं त्याला घट्ट आलिंगन दिलें, व त्यामुळें अतिशय आनंदित झालेला तो त्याला घेऊन आपल्या वाड्यांत गेला. तेथें त्या कृतकृत्य जामातानें श्वशुराला दिव्य नूपुरांची जोडी व सुवर्णकमल अर्पण केलें. तेव्हां सासू व सासरा यांनीं कौतुकानें हें कसें मिळालें, म्हणून प्रश्न केला. तेव्हां त्यानें घडलेला सर्व अद्भुत इतिहास सांगितला. 'साहसाचा अंगीकार केल्यावांचून शुभ्र यश कसें प्राप्त होणार ?¶ असें म्हणून राजा व राणी त्या जामातामुळें आपणांस धन्य मानूं लागलीं.

त्याच्या दुसऱ्या दिवशीं राजानें, आपल्या सुंदर देवगृहांत रुप्याच्या कलशावर तें सुवर्णकमल ठेविलें. तेव्हां लालकमल व शुभ्र कलश हीं दोन्हीं, राजा व अशोकदत्त यांचें यश व प्रताप यांसारखीं शोभूं लागलीं. तेव्हां राजा मोठ्या संतोषानें म्हणाला,–" अहाहा, हा शुभ्रवर्ण कलश, भस्मानें शुभ्र झालेल्या शंकराच्या अंगाप्रमाणें, व हें कमल त्याच्या भुरकट जटेप्रमाणें दिसत आहे. असलें जर आणखी एक कमल मिळालें असतें, तर तें देवाच्या दुसऱ्या बाजूस ठेवतां आलें असतें."–राजाच्या तोंडून

¶ प्राप्यते किं यशः शुभ्रमनङ्गीकृत्य साहसम् ।

सहज निघालेले हे शब्द ऐकून अशोकदत्त म्हणाला—राजन्, मला सांगा, मी दुसरेंही कमल आणतों. त्यावर राजा म्हणाला,—" बाबा, पुरे झालें. मला तें कमलही नको व तें तुझें साहसही नको."—

पण कांहीं दिवसांनीं कृष्णचतुर्दशी आली असतां, रात्रीं निजलेल्या राजकन्येला तेथेंच सोडून, तो वीर स्मशानांतील ठरलेल्या वृक्षाखालीं गेला. तेथें त्याला ती राक्षसी सासू भेटली. तिनें त्याचें मोठ्या आदरानें स्वागत केलें. नंतर तिच्या बरोबर त्रिघंटास जाऊन आपल्या प्रियेसह तो कांहीं काल आनंदानें राहिला, आणि एकदां " आई, मला तसलें दुसरें सुवर्णकमल दे." असें आपल्या सासूला तो म्हणाला. पण त्यावर ती म्हणते—बाबा, तसलें दुसरें कमल मला आतां कसें मिळणार ? आमच्या कपालस्फोट स्वामीचें एक सरोवर आहे. त्यांत असलीं शेंकडों सुवर्ण-कमलें होतात. त्यांतलेंच त्यानें माझ्या पतीला एक दिलें होतें. त्यावर 'तें सरोवर कोठें आहे, हें मला दाखवा, म्हणजे मीच तें घेतों' असें त्यानें म्हटलें असतां ती उलट बोलली—" नकोरे बाबा, तूं तिकडे जाऊं सुद्धां नकोस. तेथें मोठाले राक्षस त्याचें सर्वत: रक्षण करीत असतात"—पण सासूच्या या ना उमेदीच्या भाषणानें त्याचें धैर्य खचलें नाहीं; उलट त्यानें तें दाखविण्याविषयीं आग्रह धरिला. तेव्हां त्या निशाचरीनें मोठ्या नाखुषीनें त्याला पुष्कळ दूर नेऊन तें दाखविलें. त्यांत फुललेलीं कमलें एकसारखीं ओळीनें उभीं होतीं. त्यांच्याकडे पहातांच याच्या नेत्रांचें पारणें फिटलें. व तो मोठ्या उत्सुकतेनें तळ्यांत उतरून त्यांतील कांहीं कमलें जों तोडीत आहे, तों घोर राक्षसांनीं त्याला वेढलें. पण शस्त्र उपसून त्यानें त्यांस व दुसऱ्याही राक्षसांस मारलें असतां, त्यांतील कांहीं रक्षक राक्षस जीव घेऊन कपालस्फोटाकडे गेले. त्यांच्या तोंडून घडलेला वृत्तांत ऐकून तो राक्षसपंडित अतिशय रागावला, व स्वत: त्या प्रिय-सरोवराजवळ आला; पण कमलें तोडित असलेल्या अशोकदत्ताला पहा-तांच हा आपलाच वडील भाऊ आहे, असें त्याला कळलें. त्या बरोबर शस्त्र टाकून व डोळ्यांत पाणी आणून, त्यानें धांवत येऊन त्याचे पाय धरिले, आणि 'दादा, मी तुझा विजयदत्त भ्राता आहें, मला ओळखलेंस का ? आपण उभयतां गोविंदस्वामीचे पुत्र दुर्दैवामुळें मी इतके दिवस राक्षस झालों होतों. चितेंतील कपाल फोडल्यामुळें माझें कपालस्फोट,

नांव पडलें, पण आतां तुझें दर्शन झाल्याकारणानें माझें राक्षसत्व जाऊन, जन्मसिद्ध ब्राह्मण्य आठवलें आहे,' असें म्हणाला. तें ऐकतांच अशोकदत्तानें राक्षसभावामुळें दूषित झालेल्या, त्याच्या शरीरास कवटाळून आपल्याला व त्यालाही बाष्पजलानें न्हाऊं घातलें.

इतक्यांत कौशिकनामक विद्याधरगुरु आकाशांतून उतरून त्या दोघां भ्रात्यांस म्हणाला,-" तुम्ही सर्व विद्याधर असून शापामुळें तुमची अशी दशा झाली होती. आतां तो शाप निवृत्त झाला आहे. यास्तव ही आपली विद्या घ्या, आणि घरीं जा."–असें बोलून व त्यांस विद्या देऊन तो गुरु स्वर्गाला गेला. नंतर विद्याधर व ज्ञानी झालेले ते सुवर्णकमलें घेऊन आकाशमार्गानें हिमालयाच्या शिखरावर गेले. अशोकदत्त आपल्या प्रिय राक्षसकन्येस भेटला. त्याला पहातांच तीही राक्षसीत्व सोडून विद्याधरी झाली. नंतर तिच्यासह ते दोघे भ्राते एका क्षणांत आकाशमार्गानें वाराणसीस पोंचले. आपल्या बिऱ्हाडीं जातांच त्यांनीं विरहाग्नीनें संतप्त झालेल्या आपल्या आईबापांस दर्शनामृतवृष्टीनें शांत केलें. याप्रमाणें त्याच शरीरांत चमत्कारिक रीतीनें ज्यांचा पुनर्जन्म झाला आहे, अशा त्या दोघांनीं केवल आपल्या जन्मदात्यांसच नव्हे, तर इतर लोकांसही मोठा संतोष दिला. विजयदत्तानें फार दिवसांनीं घट्ट आलिंगन देणाऱ्या आपल्या पित्याच्या उरःस्थलाप्रमाणेंच त्याचे मनोरथही परिपूर्ण केले. राजा प्रतापमुकुटही तो वृत्तांत कळतांच हर्षानें तेथें आला. त्यानें अशोकदत्ताला व त्याच्या सर्व आप्तांना मोठ्या सत्कारानें आपल्या येथें नेलें. तेव्हां त्या वीर-जामातानें श्वशुरास पुष्कळ सुवर्णकमलें दिलीं. अर्थात्च इच्छेपेक्षां अधिक लाभ झाल्यामुळें राजा अतिशय संतुष्ट झाला.

त्यानंतर ज्याला मोठें आश्चर्य व कौतुक वाटलें आहे, अशा गोविंदस्वामी सर्वांच्या समक्ष विजयदत्तास म्हणाला,-" वत्सा त्या दिवशीं श्मशानांत एकाएकीं राक्षसीभावास प्राप्त झाल्यावर तूं काय काय केलेंस, तें सर्व सांग." तेव्हां विजयदत्त म्हणाला–बाबा, स्वाभाविक चापल्यामुळें अथवा दुर्दैवामुळें चितेंतील तें जळणारें कपाल फोडल्याकारणानें त्यांतून उडालेली वसेची धारा माझ्या तोंडांत शिरली व मी राक्षस झालों. माझें शरीरही तत्काल बदललें. इतक्यांत कपालस्फोट या नांवानें राक्षसांनीं मला हाक मारली. तेव्हां मी त्यांच्या समूहांत जाऊन मिसळलों.

ते मला राक्षसराजाकडे घेऊन गेले. तेव्हां संतुष्ट झालेल्या त्यानें मला आपला सेनापति केलें. कांहीं दिवसांनीं तो राक्षसेश्वर गर्वानें गंधर्वाशीं लढावयास गेला व त्यांच्या हातूनच मेला. तेव्हां त्याच्या अनुयायींनीं त्याचें आधिपत्य मला दिलें. त्यामुळें मी त्याच्याच नगरांत राहून आपला अधिकार चालवूं लागलों; पण सुवर्णकमलें तोडण्याकरितां माझ्या राज्यांतील एका सरोवरांत आलेल्या या माझ्या ज्येष्ठ भ्रात्याचें दर्शन होतांच ती माझी दशा बदलली. त्यानंतर आम्हां दोघांचाही शाप निवृत्त होऊन, आमच्या विद्या आम्हांला कशा प्राप्त झाल्या, तें सर्व हा माझा दादा तुम्हांला सांगेल, विजयदत्त इतकें बोलून मुकाट्यानें बसला असतां, अशोकदत्त पुढीलप्रमाणें सविस्तर इतिहास सांगूं लागला.

पूर्वी आम्हीं दोघां विद्याधरांनीं गालवमुनीच्या आश्रमापाशीं गंगेंत स्नान करीत असलेल्या मुनिकन्यांना आकाशांतून पाहिलें. त्यांचीही दृष्टि आमच्याकडे गेली. आम्हीं एकमेकांच्या समागमाची इच्छा करूं लागलों. पण त्यांच्या दिव्य बंधूनीं आमचा आशय जाणून क्रोधानें आम्हांला 'अरे पाप्यांनो, तुम्हीं मनुष्ययोनींत जन्म घ्या. तुम्हां दोघांचा तेथें विचित्र कारणानें वियोग होईल; पण मानवांना जेथें जातां येणें शक्य नाहीं, अशा दूर प्रदेशीं जेव्हां तुमच्यांतील एक दुसऱ्याला भेटेल, तेव्हां तुमच्या शापाची निवृत्ति होईल. त्यानंतर तत्काल विद्याधरांच्या गुरूपासून तुमच्या विद्या तुम्हांला प्राप्त होऊन, तुम्ही विद्याधर व्हाल', असा शाप दिला. पुढें आम्ही तुमच्या कुलांत जन्म घेतला. अचिंत्य रीतीनें आमचा वियोग झाला. त्यानंतरचें वर्तमान तुम्हांला ठाऊकच आहे. शेवटीं माझ्या राक्षसी सासूच्या साह्यानें राक्षसाधिपाच्या सरोवरांत सुवर्ण कमलें आणण्याकरितां मी गेलों असतां, मला हा माझा कनिष्ठ भ्राता भेटला. शापाची निवृत्ति झाली. कौशिक-गुरूपासून विद्या प्राप्त झाल्या व विद्याधर होऊन आम्ही सत्वर आपल्या दर्शनाकरितां येथें आलों.

याप्रमाणें पूर्व वृत्तांत सांगून सर्वांस आनंदित केलेल्या अशोकदत्तानें आपल्या विशेष विद्यांच्या योगानें त्यांच्याशीं, असा व्यवहार केला कीं, त्याच्या योगानें तीं सर्व ज्ञानसंपन्न झालीं, व त्यांनांही विद्याधरत्वाची प्राप्ति झाली. त्यानंतर राजाचा निरोप घेऊन अशोकदत्त भाऊ, आई बाप व दोघीजणी प्रियतमा, यांच्या सहवर्तमान आकाशमार्गानें विद्याधरपुरास

गेला. तेथें विद्याधरराजास भेटून त्याच्या संमतीनें ते दोघे अशोकवेग व विजयवेग या नांवाचे विद्याधर झाले. आणि स्वजनांसह आपल्या गोविंदकूट पर्वतावर गेले.

इकडे वाराणसीपति प्रतापमुकुटानें त्या अद्भुत वृत्तान्तानें आनंदित होऊन, आपल्या देवगृहांत दुसऱ्या कलशावर त्यांतील एक कमल ठेविलें व बाकीच्या कमलांनीं शंकराची पूजा केली. त्यामुळें त्याला आपलें कुल धन्य आहे व आपण कृतकृत्य झालों आहों, असें वाटलें.

सारांश, बा शक्तिदेवा, याप्रमाणें शापामुळें भूलोकीं आलेले दिव्य प्राणी महाशक्तिमान् निपजतात; व दुर्लभ सिद्धी प्राप्त करून घेतात. तूंही असाच कोणी दिव्य पुरुष येथें उत्पन्न झाला आहेस. तुझे मनोरथ अवश्य सफल होतील. दुष्करकर्मांमध्येंही उत्साहानें प्रवृत्त होणें हाच प्रायः मोठ्या लोकांतील विशेष आहे.* तुझी प्रिय कनकरेखाही खचित दिव्य कन्या असली पाहिजे. त्यावांचून, ज्यानें कनकपुरी पाहिली असेल, त्याच्याशींच मी विवाह करीन, असा आग्रह तिनें धरलेला नाहीं. असो; विष्णुदत्ताच्या तोंडची ही अद्भुत व सरस कथा ऐकून त्या ब्राह्मणानें मनांत कनकपुरी दृष्टीस पडेल, अशी आशा धरली, व धैर्य धरून ती रात्र घालविली.

## तरंग ३ रा.

### १. शक्तिदेवाचा पुढील जलप्रवास.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळींच कोळ्यांचा नायक सत्यव्रत मठस्थ शक्तिदेवाकडे आला व म्हणाला,–" ब्राह्मणा, मला एक उपाय सुचला आहे. समुद्राच्या मध्यभागीं रत्नकूट म्हणून एक उत्तम द्वीप आहे. तेथें समुद्रानें ज्याची प्रस्थापना केली आहे, असा भगवान् नारायण आहे. आषाढ शुक्लद्वादशीस तेथें मोठी यात्रा भरत असते. त्या प्रसंगीं प्रायः सर्व लांब लांबच्या द्विपांतून लोक तेथें येतात. तेथें गेल्यास आपल्याला कनक-

* प्रायः क्रियासु महतामपि दुष्करासु सोत्साहता कथयति प्रकृतेर्विशेषम् ।

पुरीचा पत्ता लागेल; कारण मोठ्या भक्तीनें नारायणाची पूजा करण्याकरितां अनेक देशांतून आलेल्या हजारो लोकांतील कोणाला तरी ती माहिती असेलच. यास्तव आपण दोघे आतां लवकरच तिकडे जावयास निघूं या. कारण, ती तिथी अगदीं जवळ आली आहे."

परोपकारी सत्यव्रताचें हें म्हणणें ऐकून शक्तिदेवानें 'चला, मी तर पाहिजे तेथें यावयास तयार आहें' असें लागलेंच म्हटलें. व विष्णुदत्तानें तयार करून दिलेलें फराळादिकांचें सामान घेऊन तो सत्यव्रतासह त्याच्याच होडीवर चढला व समुद्रमार्गानें त्वरेनें जाऊं लागला. पुष्कळ दूर गेल्यावर सुकाणूं धरून बसलेल्या सत्यव्रतास, वल्हीं मारणारा शक्तिदेव म्हणाला " दयाळा, तें तिकडे दूर काय दिसत आहे? त्याच्या फार मोठ्या आकाराकडे पाहिलें असतां, तो समुद्रांतून सहज वर उठलेला पक्षयुक्त पर्वतच आहे, असा भास होतो "–त्यावर तो कोळी म्हणतो– 'ब्राह्मणा, हा एक फार जुना व फार मोठा वटवृक्ष आहे. त्याच्या खालीं वडवामुख या नांवाचा एक मोठा भोंवरा आहे. नावाडी लोक याच्या जवळूनही जात नाहींत; कारण त्यांत एकदां नाव सांपडली कीं, ती त्यांतून निघत नाहीं. पण सत्यव्रत जों इतकें सांगत आहे, तों वायुवेगामुळें त्याची ती लहानशी होडी वडवामुखाकडेच जोरानें चालली. तेव्हां आपल्या प्रयत्नाचा कांहीं उपयोग होत नाहीं, असें पाहून सत्यव्रत, शक्तिदेवास निराशेनें म्हणाला,– " ब्राह्मणा, आमचा विनाशकाल समीप आला आहे; कारण हें वाहन थेट त्या भोंवऱ्याकडेच जोरानें जात असून, सर्व कौशल खर्चून केलेल्या माझ्या प्रयत्नास यश मुळींच येत नाहीं. हा वारा व समुद्र आम्हांला जणुं काय, आमच्या इच्छेविरुद्ध, मृत्युमुखांतच ढकलीत आहेत. प्रत्येक गोष्ट कर्माप्रमाणेंच होत असते; कोणाचें शरीर* स्थिर आहे? कोणाचेंही नाहीं. मला त्याबद्दल फारसें वाईट वाटत नाहीं; पण इतकीं संकटें भोगूनही तुझा मनोरथ शेवटास गेला नाहीं, याविषयीं मला मोठें दुःख होत आहे. यास्तव मी आपल्या नावेस जरा मंदगति करितों, तों तूं या वटवृक्षाच्या शाखेस धरून त्याच्यावर चढ. दैव अनुकूल असल्यास

* शरीरं कस्य हि स्थिरम्।

असा सुंदर आकृतीनें युक्त असलेल्या तुला त्या वृक्षावरही कांहीं उपाय [सु]चेल; कारण समुद्राच्या तरंगांप्रमाणेंच दैवाच्या गती अतर्क्य आहेत."‡

तो अतिधीर सत्यव्रत असें बोलत आहे तोंच होडी वडाच्या झाडा-[ख]ालीं आली. त्याबरोबर घाबरलेल्या शक्तिदेवानें उंच उडी मारून [त्या]ची डहाळी दोन्हीं हातांनीं घट्ट धरली. इतक्यांत ज्यानें आपला देह [दु]सऱ्याच्या कामास वाहिला आहे, त्या सत्यव्रतासह ती नौका वडवामुखांत [शि]रली. तें पाहून मनांत अतिशय खिन्न झालेल्या शक्तिदेवानें, ज्यानें [आ]पल्या शाखांनीं सर्व दिशा झांकून टाकल्या आहेत अशा त्या झाडाच्या [त्या]च शाखेचा मोठ्या कष्टानें आश्रय केला, व आपल्या मनोरथसिद्धी-[वि]षयीं निराश होऊन, तो मनांत विचार करूं लागला कीं, हर हर, [ती] नगरी तर माझ्या दृष्टीस पडली नाहींच. पण एकाएकीं तो परोपकारी [स]त्यव्रतही माझ्याकरितां मेला, अथवा सर्व जनांच्या डोक्यावर पाय ठेव-[णा]ऱ्या भगवती भवितव्यतेचें उल्लंघन कोण करणार !$

असो; अशा विचारांतच त्याचा तो दिवस मावळला. तों चोहोंकडून [मो]ठमोठे गृध्र आपल्या शब्दानें दिशांस नादित करीत, व पंखांच्या वायूनें [स]मुद्राच्या लाटांस अधिकच चंचल करीत, त्या वृक्षावर रात्र घालविण्या-करितां आले. नंतर नेहमींप्रमाणें झाडावर स्वस्थ बसून ते एकमेकांस या दिवशीं पाहिलेले चमत्कार मनुष्य–वाणीनें सांगूं लागले. तेव्हां हा ब्राह्मणपुत्रही वडाच्या पानांनीं आपलें शरीर झांकून घेऊन, त्यांचें भाषण [ल]क्ष लावून ऐकूं लागला. कोणी त्या दिवशीं पाहिलेल्या पर्वताचें, कोणी नदीचें, कोणी द्वीपाचें व कोणी नगराचें वर्णन करूं लागला. तों इत-क्यांत एक अतिवृद्ध व मोठा गृध्र त्यांस म्हणाला,–" गड्यांनों, मी आज कनकपुरी पहावयास गेलों होतों, व उद्यांही तेथेंच सुखानें विहार करावयास जाणार आहें."—

## २. कनकपुरीची प्राप्ति.

अकस्मात् अमृतवृष्टीप्रमाणें तृप्त करणारे ते शब्द कानीं पडतांच शक्तिदेवाच्या सुखाला पार नाहींसा झाला. त्याचा सर्व संताप एका

‡ विधेर्विलासानब्धेश्च तरङ्गान्को हि तर्कयेत् ।

$ यदि वा सततन्यस्तपदा सर्वस्य मूर्धनि । कामं भगवती केन भज्यते भवितव्यता॥

क्षणांत दूर झाला. कनकपुरी या नांवाची नगरी आहे, इतकें ऐकूनच तो क्षणभर देहभान विसरला. त्या पक्षिराजालाच आपलें वाहन करून तेथें जाण्याचा त्यानें तत्काल निश्चय केला. इतक्यांत ते सर्व धिप्पाड पक्षी स्वस्थ निजले, तेव्हां शक्तिदेव हळुच त्या म्हाताऱ्या गृध्राच्या पाठीवर जाऊन त्याच्या पंखांत लपून बसला. सकाळीं दुसरे सर्व पक्षी इतस्ततः निघून गेले, व तो वृद्ध गृध्र कनकपुरीकडे वेगानें निघाला. शक्तिदेव आपलें अंग चोरून त्याच्या पंखांत मुकाट्यानें बसलाच होता. त्याला त्याचें सामर्थ्य व गति पाहून मोठें आश्चर्य वाटलें. थोडक्याच अवकाशांत तो त्या दिव्य नगरीजवळच्या उद्यानांत जाऊन उतरला असतां शक्तिदेव गपचूप मागच्या मागें त्याच्या पंखांतून निघून, पाय न वाजवितां उद्यानांत शिरला. नंतर त्या रम्य उपवनांत फिरत असलेल्या त्याला, फुलें तोडीत असलेल्या दोन स्त्रिया दिसल्या. पण आपल्याला पाहून त्या एकाएकीं विस्मित झाल्या आहेत; असें जाणून तो म्हणाला,—"भद्रे, हा कोणता प्रदेश आहे व तुम्ही कोण?"—त्यावर त्या म्हणाल्या,—"बाबा, ही विद्याधरांची कनकपुरी आहे. येथें चंद्रप्रभा नांवाची विद्याधरी रहाते. आम्ही या उद्यानाचें रक्षण करणाऱ्या, तिच्या दासी आहों. तिच्याकरितांच आम्हीं हीं फुलें वेंचित आहों."—

तें ऐकून तो तरुण पुरुष म्हणाला,—"बायांनो मला तुमच्या स्वामिनीची आजच्या आज भेट होईल, अशी तुम्ही मजवर दया कराल का?"—त्यावर 'हो' असें म्हणून त्यांनीं त्याला नगरींत नेलें. राजमंदिरांत जातांच सुवर्णाच्या भिंती व माणिक्यस्तंभ यांच्या योगानें चमकणाऱ्या व संपदांच्या वसतिस्थानाप्रमाणें असलेल्या त्या लोकोत्तर गृहास त्यानें डोळेभरून पाहिलें. त्या आलेल्या अपूर्व तरुणास पाहून, परिजनांनीं, धांवत जाऊन चंद्रप्रभेला तें वर्तमान कळविलें. तेव्हां, तिनेंही त्याला सत्वर आंत आणावयास सांगितलें. अंतःपुरांत जातांच, नेत्रांस आनंद देणाऱ्या त्या रूपवतीला शक्तिदेवानें जेव्हां पाहिलें, तेव्हां ती विधात्याची अद्भुत सृष्टिच आहे, असें त्याला भासलें. तिलाही त्याच्या दर्शनानें मोठा आनंद झाला. ती तत्काल रत्नजडित पर्यंकावरून उठली. तिनें स्वतः याचें स्वागत केलें, व उचित आसनावर बसल्यावर त्याला

म्हणाली,-" कल्याणिन्, तूं कोण? मानवांस अगम्य असलेल्या या जागीं कसा आलास ?"—

चंद्रप्रभेनें मोठ्या कौतुकानें असा प्रश्न केला असतां, शक्तिदेवानें तिला आपला देश, जाति व नांव सांगून—कनकपुरी पहाण्याचा पण जिंकून, कनकरेखा-राजकन्येशीं विवाह करण्याच्या उद्देशानें, अनेक संकटांतून वांचून, येथें येईतों घडलेला सर्व वृत्तांत सविस्तर सांगितला. तो ऐकून व कांहींसें चिंतन करून दीर्घ श्वास सोडल्यावर ती एकान्तांत त्याला म्हणाली,-" हे सुभग, मी कांहीं सांगतें तें ऐक. या पुरींत शशिखंड या नांवाचा विद्याधरांचा राजा आहे. आम्ही त्याला चार कन्या झालों. त्यांतील श्रेष्ठ चंद्रप्रभा मी, दुसरी चंद्ररेखा, तिसरी शशिरेखा व चवथी शशिप्रभा. आम्ही आपल्या पित्याच्या येथें सुखानें वाढत असतां एकदां माझ्या तिघीजणी बहिणी, मी कन्याव्रतस्थ असल्याकारणानें मला सोडून, गंगेंत स्नान करावयास गेल्या. तेथें जलक्रीडा करीत असतांना, तारुण्य-मदानें मत्त झालेल्या त्यांनीं, अग्रतपस-नांवाच्या मुनीच्या अंगावर पाणी उडविलें. तेव्हां रागावलेल्या त्यानें 'कुकन्यांनो, मर्त्यलोकीं जन्म घ्या' असा त्यांस शाप दिला. तो कळतांच माझ्या पित्यानें त्याच्याकडे जाऊन त्यास प्रसन्न करून उःशाप देवविला. त्या महामुनीनें कृपा करून त्या तिघींनाही मर्त्यलोकीं जन्म घेतल्यावरसुद्धां या जन्माचें स्मरण राहील, असें सांगितलें होतें. त्यानंतर आपापला देह सोडून माझ्या भगिनी मनुष्यलोकास गेल्या असतां, शोकाकुल झालेल्या माझ्या पित्यानें ही नगरी मला देऊन वनांत गमन केलें.

एकदां चंडिकादेवि येथेंच निजलेल्या माझ्या स्वप्नांत येऊन म्हणाली-" पुत्रि, मानव तुझा पति होईल."—त्या आईच्या सांगण्यावर विश्वास ठेवून मी पुष्कळ विद्याधरांचा निषेध करून अजून कन्याच राहिलें आहें. आज तुझ्या या अद्भुत आगमनानें व सुंदर शरीरानें मला परतंत्र केलेलें असून मी तुला आपलें दान केलें आहे; पण या गोष्टीला पित्याचें अनुमोदन मिळविण्याकरितां मी येत्या चतुर्दशीस ऋषभ पर्वतावर जाईन; कारण त्या तिथीस सर्व विद्याधर त्र्यंबकाची पूजा करण्याकरितां चोहों-कडून तेथें जमत असतात. माझा बाबाही तेथें येईल. त्याची अनुज्ञा घेऊन लवकरच मी परत आलें म्हणजे तूं माझें ग्रहण कर. तर आतां ऊठ."

असें म्हणून चंद्रप्रभेनें विद्याधरांस उचित असलेल्या भोगांनीं शक्तिदेवाची परिचर्या केली. तेथें राहिलेल्या त्याला, दावाग्नीनें पोळलेल्या पुरुषास अमृताच्या डोहांत बुडी मारिली असतां जसें सुख होतें, तसें झालें.

## ३. शक्तिदेवाचा स्वनगरींत भ्रंश व राजकन्येचा मृत्यु.

कांहीं दिवसांनीं चतुर्दशी आली, तेव्हां चंद्रप्रभा त्याला म्हणाली,—"आज तुमच्याकरितां पित्याची अनुज्ञा घेण्याच्या उद्देशानें मी जातें. माझा हा सर्व सेवकवर्गही मजबरोबरच जाईल. आम्हांला परत यावयास दोन दिवस लागतील. तोंपर्यंत आपल्याला येथें एकटेंच राहिलें पाहिजे; पण त्याकरितां उद्विग्न होऊं नये. या मधल्या जागेस सोडून आपण बाकी दुसऱ्या पाहिजे तेथें मंदिरांत खुशाल हिंडावें. या मध्यभूमींत मात्र जाऊं नका."—असें सांगून व आपलें चित्त त्याच्या पाशीं ठेवून ती पित्याकडे जावयास निघाली असतां, त्याचें शरीर मात्र तेथें राहून चित्त तिच्या मागून गेलें. ती निघून गेल्यावर एकट्या शक्तिदेवाला तेथें करमेना. तो महासमृद्धींनीं भरलेल्या त्या विचित्र मंदिराच्या निरनिराळ्या दालनांतून स्वैर फिरत राहिला. शेवटीं प्रायः तें सर्व मंदिर पाहून झाल्यावर, 'चंद्रप्रभेनें या मधल्या भूमींत उतरूं नको' असें कां बरें मला बजाऊन सांगितलें? यांत आहे काय? असें म्हणून त्यांत काय आहे तें हळुच पहाण्याकरितां तो आंत शिरला. मानवांचें मन प्रायः निषिद्ध कर्म करावयासच प्रवृत्त होतें. असो; त्या भूमींत जातांच ज्यांची दारें घट्ट लाविलीं आहेत, अशीं तीन गर्भगृहें त्याला दिसलीं. त्यांतील एकाचें दार उघडून तो आंत शिरला. तों रत्नजडित पर्यंकावर सुंदर शय्या हांतरलेली असून, तिच्यावर एक रमणीय स्त्री निजली आहे, व तिचें शरीर वस्त्रानें आच्छादित केलें आहे, असें त्याला दिसलें; पण तिचा श्वासोच्छ्वासही चालत नाहीं, असें पाहून तो जवळ गेला, व त्यानें तिच्या तोंडावरचें वस्त्र काढलें. तों आपल्या परोपकारी राजाचीच कन्या ही येथें मरून पडली आहे, असें त्याला दिसलें. त्यामुळें त्याचें मन आश्चर्यचकित झालें, व तो असा विचार करूं लागला कीं, खरोखरच ही सुंदरी अशी निश्चेष्ट होऊन पडली आहे, कीं मला भ्रम झाला आहे! जिच्याकरितां मी हा एवढा दीर्घ व कष्टकर प्रवास केला, तीच येथें

---

प्रायो वारितरामा हि प्रवृत्तिर्मनसो नृणाम् ।

गतप्राण होऊन पडली आहे; पण तेथें ती सप्राण व अम्लानकांति होती. विधात्यानें मला मोहांत पाडण्याकरितां तर हें इंद्रजाल रचलें नसेल? इतका विचार करून व त्या गृहांतून निघून, त्यानें क्रमानें दुसऱ्याही दोन्ही खोल्या उघडून पाहिल्या. त्यांतही त्याला तसल्याच शय्यायुक्त पर्यंकांवर दोन मृतकन्या दिसल्या. तेथेंच त्याला एक विहिरही दिसली. तिच्या कांठीं एक रत्नजडित खोगीर घातलेला घोडा उभा होता. त्याच्यावर आपण चढावें असें त्याला वाटलें; पण जवळ जातांच त्या घोड्यानें लाथ मारून त्याला त्या विहिरींत पाडलें. तेव्हां घाबरलेला तो आपलें डोकें पाण्यांतून वर जों काढीत आहे, तों आपण आपल्या वर्धमान नगराजवळच्या उद्यानांतील विहिरींत आहों, असें त्याला दिसलें. मग काय विचारतां! चंद्रप्रभेच्या समागमसुखाला आंचवल्यामुळें त्याचें मन दुःखानें ढेंकळल्यासारखें विरघळून गेलें. जागें होतांच, स्वप्नांतील अतिप्रिय पदार्थही जसे एकाएकीं नाहींसे होतात, त्याप्रमाणें त्याचे ते दिव्य भोग, तें सुंदर व विस्तृत मंदिर व ती चंद्रप्रभेची आशा हीं एकदम लीन झालीं. तो अतिशय दीन झाला. 'अरेरे काय झालें हें? मज दुर्भाग्याला कोणी तरी निर्दयानें फसविलें आहे, यांत संशय नाहीं. किंवा भवितव्यता कशी आहे हें कोणाला समजणार?' असें म्हणून तो दुर्दैवी पुरुष आपल्या बापाच्या घरीं गेला, आणि त्यानें त्याचें अभिनंदन केलें, व आनंदित झालेल्या आप्तांशीं बोलत त्यानें तो सर्व दिवस घालविला. दुसऱ्या दिवशीं घराच्या बाहेर पडला, तों त्याला 'कोणी क्षत्रियानें किंवा ब्राह्मणानें खरोखरच कनकपुरी पाहिली असल्यास सांगावें, म्हणजे राजा त्याला आपली कन्या व यौवराज्य देईल' असा घोष ऐकूं आला. त्याबरोबर त्या डांगोरा पिटणाऱ्या राजसेवकांजवळ जाऊन 'मी कनकपुरी पाहिली आहे' असें तो सांगूं लागला. तेव्हां त्यांनीं त्याला राजाकडे नेलें; पण त्याला पहातांच हा आतांही पूर्वीप्रमाणेंच खोटें बोलत असेल असें राजाला वाटलें. तेव्हां 'मी खोटें बोलत असेन तर मला तुम्हीं खुशाल सुळावर चढवा, याविषयीं हाच पण. आतां राजकन्या मला तेथली हवी ती खूण विचारूं दे, मी सांगतों.' असें त्यानें म्हटलें असतां, राजानें आपल्या कन्येलाच तेथें आणविलें; पण त्या पूर्वीच्याच ब्राह्मणपुत्राला ओळखून 'बाबा, हा पुनः कांहीं तरी खोटें

सांगेल;' असें तिनें म्हटलें. तेव्हां शक्तिदेव म्हणाला,–'राजपुत्रि, मी खरें सांगत आहें किंवा खोटें सांगत आहें, हें तुला मग कळेल; पण अगोदर तूं मला खरें सांग; कारण त्याविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे. कनकपुरींतील पर्यंकावर तूं मृत होऊन पडली आहेस, असें मला दिसलें; पण येथें मी तुला जिवंत पहात आहें; हें काय?"

शक्तिदेवाचे हे खुणेचे शब्द ऐकतांच कनकरेखा तत्क्षणीं आपल्या पित्यास म्हणाली,–"बाबा, या महात्म्यानें खरोखरच ती नगरी पाहिली आहे. थोडयाच दिवसांनीं हा भाग्यशाली पुरुष माझा पति होईल. माझ्या दुसऱ्या तीन बहिणींशींही हा विवाह करील, व कनकपुरींत राहून हा धीर पुरुष विद्याधरांचें राज्य करील. मला तर आजच आपल्या शरीरांत प्रवेश केला पाहिजे. मुनींच्या शापामुळें मी तुमच्या कुलांत जन्मास आलें. 'जेव्हां कोणी मानुष कनकपुरींतील तुझा मृत देह पाहून ती खरी गोष्ट तुला मर्त्यलोकांत सांगेल, तेव्हां तुझ्या शापाची निवृत्ति होईल. व तोच तुझा पति होईल.' असें शाप देणाऱ्या मुनींनींच उ:शाप देतांना सांगितलें होतें. मीं जरी मनुष्य झालें होतें तरी माझें पूर्वजन्मींचें ज्ञान लुप्त झालें नव्हतें. असो; तर आतां मी आपल्या धामास जातें."–असें म्हणून व तत्काल देहत्याग करून ती गेली. त्याबरोबर राजगृहांत हाहा:कार उडाला. शक्तिदेव देहभान विसरला. त्याला काय करावें हें सुचेना. त्याचे सर्व मनोरथ निष्फल झाले.

## ४. कनकपुरीची पुनर्यात्रा.

नंतर तो शक्तिदेव त्या दोघी प्रियतमांविषयीं चिंतन करीत राजगृहांतून बाहेर पडला. इतक्यांत त्याला वाटलें कीं, मी उगीच कां खिन्न होत आहें! कोणत्याही सिद्धीला धैर्याची अपेक्षा असते.* कनकरेखेनें सांगितल्याप्रमाणें माझें कल्याण अवश्य झालें पाहिजे, तर आतां पुन: त्याच मार्गानें मी कनकपुरीस जातों. दैव पुन: कांहीं तरी उपाय अवश्य सुचवील. असा विचार करून तो तेथून तसाच निघाला. ज्यांनीं उद्यम केला आहे असे धैर्यशाली पुरुष, मनोरथसिद्धि झाल्यावांचून प्रयत्न सोडीत नाहींत.† जातां जातां तो विटंकपुरास पोंचला. त्या नगरांत

* सत्त्वाधीना हि सिद्धयः।

† असिद्धार्था निवर्तन्ते न हि धीराः कृतोद्यमाः।

प्रवेश करितांच त्याला समोरून येणारा एक वैश्य दिसला व तो बराच समीप आला असतां, पहिल्या खेपेला आपण ज्याच्या बरोबर उत्स्थलद्वीपाला जात असतांना नौका बुडाली, तोच हा समुद्रदत्त होय, असा त्यानें तर्क केला; पण–समुद्रांत पडलेला तो जिवंत कसा राहिला ! किंवा त्यांत तरी आश्चर्य कसलें ! मी नाहींका त्या आपत्तींतून पार पडलो,–असा जों तो विचार करीत आहे, तोंच त्या वाण्यानें त्याला ओळखून आनंदानें आलिंगन दिलें व तो त्याला आपल्या घरीं घेऊन गेला. योग्य आतिथ्य केल्यावर समुद्रदत्तानें त्याला प्रश्न केला असतां, शक्तिदेवानें माशाच्या पोटांत शिरून उत्स्थलद्वीपास पोंचल्याचा आपला चमत्कारिक वृत्तांत सांगितला. नंतर वैश्यानेंही समुद्रांत पडल्यापासूनचा आपला सर्व वृत्तांत सांगण्यास आरंभ केला.—

## समुद्रदत्ताचा वृत्तांत.

मित्रा, ईश्वर मोठा दयाळु आहे. मी समुद्रांत बुडत असतांना माझ्या हाताला एक फळकट लागलें. तेव्हां त्यावर बसून मी समुद्रांत तसाच तरंगत राहिलों. तीन दिवसांनीं मला दुरून येत असलेलें एक मोठें तारूं दिसलें. तेव्हां त्यावरील लोकांना–मला वर घ्या, व माझे प्राण वांचवा–असें मी मोठमोठ्यानें ओरडून सांगूं लागलों; पण जवळ आल्यावर त्यांनां माझी आरोळी ऐकूं गेली, व तत्काल त्या दयाळु नांवाड्यांनीं आपली नौका माझ्याजवळ आणून मला वर घेतलें. पण काय सांगूं मित्रा, तें तारूं माझ्याच बापाचें असून फार दिवसांपूर्वी व्यापाराकरितां द्वीपांतरास गेलेला तो आपल्या गांवास परत जात होता. पुष्कळ दिवसांनीं भेटलेल्या मला ओळखून, व आलिंगन देऊन सद्गदीत कंठानें बाबा मला म्हणाला,–"बाळा, तूं असल्या ह्या भयंकर आपत्तींत कसा पडलास?"–तें ऐकून त्यावेळीं मलाही रडें कोसळलें, व मी म्हटलें,–"बाबा, आपल्याला जाऊन पुष्कळ दिवस झाले, तरी आपण परत येत नाहीं, असें पाहून मी फार दुःखी झालों. पण माझ्या आप्तांनीं माझें सांत्वन केलें. त्यानंतर आपला धर्म समजून मी व्यापार आरंभिला आणि त्याकरितांच द्वीपान्तरास जात असतांना, दुर्दैवामुळें नौका फुटून मी आज तीन दिवस अन्नजलावांचून या भयंकर समुद्रांत एका लहानशा

फळीच्या आधारावर कसा तरी वांचलों. पण आयुष्य प्रबल असल्यामुळें आज तुम्ही मला हा दुसरा जन्म दिलात."–

माझ्या तोंडची ही हकीगत ऐकतांच रागावून व मला दोन चार शिव्या देऊन माझा बाप म्हणाला,–" अरे दुर्भाग्या, अशा संकटांत आपल्याला कां पाडतोस ? तुजपाशीं काय धन नाहीं? कीं तुला घर नाहीं ? कीं तुझें लग्न झालें नाहीं ? कीं तूं दरिद्री आहेस ? मी आणखी हवें तितकें धन मिळविण्यास तयार असतांना तूं अशा साहसांत कां पडतोस ? व्यापाराला जातांनाच मी तुजपाशीं अमित द्रव्य ठेऊन गेलों होतों, व आतां हें तारूं सोन्यानें भरून आणिलें आहे. पहा जा हवें तर." असें म्हणून व माझें सांत्वन करून तो मला विटंक पुरास परत घेऊन आला. असो; हें त्याचें वर्तमान ऐकून व त्या रात्रीं तेथेंच विश्रांति घेऊन दुसऱ्या दिवशीं शक्तिदेव त्याला म्हणाला,–" मित्रा, मला पुनः उत्स्थल द्वीपाला जावयाचें आहे. तर त्याकरितां मी कोणता उपाय योजूं तें मला सांग."

तें ऐकून समुद्रदत्त म्हणाला,–" माझे लोक आजच तिकडे जावयास निघणार आहेत. तूंही त्यांच्याबरोबर जा."–त्यानंतर तो धीर त्याच दिवशीं पुढें निघाला. हा कांहीं आपल्याला भीत नाहीं, असें पाहून संकटांनींही त्याला सोडलें. तो योग्यवेळीं आनंदानें त्या द्विपास जाऊन पोंचला. किनाऱ्यावर पाय ठेवतांच, आपल्या विष्णुदत्त आतेभावाकडे प्रथम जावें, असें त्याला वाटलें, व त्याप्रमाणें तो त्या व्यापाऱ्यांस विचारून ब्राह्मणमठाकडे जाऊं लागला. तों मार्गांतच त्याला कोळ्यांच्या सत्यव्रत राजाची कन्या भेटली. तिनें त्याला ओळखलें, व घरीं नेऊन ब्राह्मणा, माझ्या पित्याबरोबर कनकपुरी हुडकण्या करितां तूं गेलास; पण तो अजून आला नाहीं व तूंच कसा परतलास ? तेव्हां तो म्हणतो–काय सांगूं ? बाई, समुद्रांत तो तुझा बाप बुडून मेला. तेथें एका मोठ्या वडाच्या झाडाखालीं वडवामुख म्हणून एक भयंकर भोंवरा आहे, त्यांत तो परोपकारी निषद होडीसह गडप झाला.

पण या त्याच्या सत्यभाषणावरही सत्यव्रताच्या पुत्रांचा विश्वास बसेना. ते आपल्या सेवकांना म्हणाले–" या दुरात्म्याला बांधा, यानेंच आमच्या पित्याला मारलें असावें. नाहींतर एकाच नौकेंतून गेलेल्या दोघांपैकीं, एक जिवंत राहून एकच त्या नौकेबरोबर बुडावा, हें आश्चर्य नव्हे का !

यास्तव या आपल्या पितृघातकाला उद्यां सकाळीं चंडिका देवीच्या पुढें बळी द्या."–ही धन्यांची आज्ञा ऐकतांच, द्रव्याचे दास झालेल्या त्याच्या सेवकांनीं त्याला बांधून अतिशय भयंकर असलेल्या चंडिकागृहांत नेलें. तेथें बद्ध होऊन पडलेला तो जीविताची आशा सोडून, त्याच देवीची प्रार्थना करूं लागला.–हे वरदे, दानव, दैत्य, राक्षस इत्यादिकांनीं पीडिलेल्या जगाचें जसें तूं सतत रक्षण करीत असतेस, तसेंच यावेळीं तुला शरण आलेल्या, तुझ्यापुढें सतत नम्र होणाऱ्या, व प्रियेकरितां फार दुरून येथवर प्रवास केलेल्या या दीनाचेंही या निष्कारण हत्येपासून रक्षण कर.–अशाप्रकारें प्रार्थना करून स्थिरचित्त झालेल्या त्याला झोंप लागली असतां, स्वप्नांत त्यानें एका दिव्य स्त्रीला पाहिलें. ती मोठ्या कृपेनें त्याच्यापाशीं येऊन म्हणाली,–"शक्तिदेवा, भिऊं नकोस. तुझें अनिष्ट कधींही होणार नाहीं. या कोळ्याच्या पुत्रांची बिंदुमती नांवाची अविवाहित भगिनी, उद्यां सकाळींच येथें येईल, व तुला पहातांच कामवश होऊन, तुला आपला पति होण्याविषयीं सांगेल. तिचें म्हणणें तूं मान्य कर, म्हणजे तीच तुला सोडवील. ती कोळ्याची कन्या आहे, असें समजून तूं साशंक होऊं नकोस. ती वस्तुतः दिव्य कन्या असून शापभ्रष्ट होऊन या जातींत उत्पन्न झाली आहे."—असें सांगून ती देवी गुप्त झाली असतां शक्तिदेव जागा झाला. कांहीं वेळानें उजाडलें; तों त्याच्या नेत्रांस तृप्त करणारी ती दाशकन्या त्याच मंदिरांत आली. त्याला पहातांच अतिशय उत्सुक झालेली ती, आपण कोण तें सांगून म्हणाली,–"हे सुभगा, या संकटांतून मी तुला सोडवितें; पण तूं माझें म्हणणें मान्य कर. माझ्या भावांस पसंत पडलेल्या पुष्कळ वरांस मी नाकारिलें, पण आज तुला पहातांच तुजवर मात्र माझें अतिशय प्रेम बसलें आहे. यास्तव माझ्याशीं विवाह कर."–हें तिचें म्हणणें ऐकून स्वप्नाची आठवण होऊन शक्तिदेवाला मोठा आनंद झाला, व त्यानें तिच्या इच्छेप्रमाणें करण्याचें कबूल केलें. त्याबरोबर तिनें त्याला त्या रज्जुबंधांतून सोडवून प्रेमबंधांत अडकविलें. विवाहानंतर त्या दिव्य व केवल पुण्यानेंच प्राप्त होणाऱ्या सुंदरीशीं विहार करीत कांहीं काल तो तेथेंच राहिला.

एकदां मार्गानें गोमांस घेऊन जाणाऱ्या एका चांडाळाला माडीवरून पाहून शक्तिदेव आपल्या प्रियेला म्हणाला,–"सुंदरि, पहा, हा दुरात्मा

त्रिभुवनांस वंद्य असलेल्या गायींचें मांस खातो."–तें ऐकून बिंदुमती म्हणते,–नाथ, खरोखर हें पाप अचिंत्य आहे. मी गायींच्या प्रभावानें थोड्याशा अपराधाकरितांच, या दाशकुळांत जन्मास आलें आहें. त्यावर 'प्रिये, हें तर तूं मोठेंच नवल सांगत आहेस, तर मग खरोखर तूं कोण ? व येथें तुझा जन्म कसा झाला ? तें मला सांग.' असें बोलून तो तिला फारच आग्रह करूं लागला. तेव्हां 'नाथ, माझें आणखी एक म्हणणें जर मान्य कराल, तर मी तें गुप्त वर्तमानही तुम्हांला सांगेन.' असें ती म्हणाली. त्याबरोबर 'तुझ्या गळ्याची शपथ मी तुझें म्हणणें ऐकेन' असें उलट बोलून तिचें गुप्त वृत्त ऐकण्यास तो उत्सुक झाला. तेव्हां ती स्ववृत्त सांगूं लागली.—

## बिंदुमतीचें पूर्ववृत्त.

आर्यपुत्र, याच द्विपांत तुम्हांला आणखी एक भार्या प्राप्त होईल. ती विवाहानंतर थोड्याच दिवसांत गर्भवती होईल; पण त्या गर्भाला आठवा महिना लागला म्हणजे तुम्हीं तिचें उदर फाडून त्या गर्भाला ओढून काढावें. या कामीं किळस मानतां उपयोगी नाहीं. पण हें तिचें घोर कर्म करण्याविषयींचें म्हणणं ऐकून 'छेः मी असें कसें करूं ;' असे विस्मित होऊन उच्चारिलेले त्याचे शब्द कानीं पडतांच बिंदुमती पुनः म्हणाली–" नाथ, कांहीं कारणाकरितां आपण हें कर्म अवश्य करा. आतां माझा वृत्तांत थोडक्यांत सांगतें. मी पूर्वी एक विद्याधरी होतें, व शापामुळें या मर्त्यलोकीं आलें आहें. मी तेथें असतांना गायींच्या शुष्कस्नायूंची तार दांतानें तोडून वीण्यास लाविली व त्यामुळें मला अशी अधोगति मिळाली. तेव्हां प्रत्यक्ष गोमांस खाणारांची काय दशा होईल हें तुम्हींच तर्कानें जाणा."

इतकें जा ती सांगत आहे, तों एकाएकीं तिचा भ्राता येऊन शक्तिदेवास म्हणाला,–" ऊठ लवकर ऊठ, हा एक सूकर कोठूनसा येऊन व पुष्कळ लोकांस मारून दर्पानें इकडेच येत आहे."–हें ऐकतांच शूर शक्तिदेव, गडबडीनें माडीवरून खालीं उतरला व एका घोडयावर बसून त्या दुष्ट डुकराच्या मार्गे लागला. जवळ जातांच त्यानें त्याला आपल्या खड्गाचा एक तीक्ष्ण प्रहार केला. तो प्रहार मर्मस्थानीं लागल्यामुळें, व्याकुळ झालेला सूकर, सत्वर आपल्या बिळाकडे पळून जाऊं लागला.

तेव्हां शक्तिदेवही त्याच्या मागोमाग चालला. सूकर बिळांत शिरला आहे, असें पाहून तो पुरुषार्थी ब्राह्मणही घोड्याला एका झाडाशीं बांधून व हातांत खड्ग घेऊन त्यांत शिरला. तों तेथें त्याला एक मोठें उद्यान दिसलें. त्यांत एक सुंदर मंदिरही होतें. इतक्यांत त्याला एक सुंदर स्त्री प्रेमानें हंसत असून आपल्याकडेच येत आहे असें वाटलें. तिचें रूप फारच रमणीय होतें. ती जवळ येतांच 'कल्याणि, तूं कोण आहेस, व अशी गडबडीनें कोठें जातेस?' असा त्यानें तिला प्रश्न केला. तेव्हां ती सुमुखी पुढील वृत्तांत सांगूं लागली.—

## बिंदुरेखेचा वृत्तांत.

दक्षिणदिशेस चंडविक्रम म्हणून एक राजा आहे. त्याची मी कन्या. माझें नांव बिंदुरेखा; पण एका पापी दैत्यानें कपटानें पित्याच्या घरून मला येथें आणिलें, व मांस खाण्याच्या इच्छेनें सूकराचें रूप घेऊन तो क्षुधार्त निशाचर कोठें बाहेर गेला. इतक्यांत वाटतें, त्याला आज कोणी वीरानें शस्त्राचा वार केला, त्यामुळें तो दुष्ट या आपल्या घरांत येऊन मरून पडला आहे. अशा या विचित्र योगामुळें मी अद्यापि भ्रष्ट झालेली नाहीं. हें तिचें म्हणणें ऐकून शक्तिदेव म्हणाला,—"तर मग आतां तूं उगीच गडबड करतेस? राजपुत्रि, त्या दुरात्म्याला मीच या खड्गाचा प्रहार केला. तूं भिऊं नकोस"—त्यावर 'तर मग आपण कोण?' असें तिनें विचारिलें असतां—'मी शक्तिदेव या नांवाचा ब्राह्मण आहें?' असें त्यानें उत्तर दिलें, तेव्हां—'तर मग आपणच माझे प्राणनाथ आहांत.' असें लाजत लाजत तिनें अस्पष्ट शब्द उच्चारिले. तेव्हां 'बरें आहे' असें म्हणून तो तिला घेऊन बिळांतून बाहेर पडला व अश्वारूढ होऊन तिच्या सहवर्तमान दाशकन्येच्या घरीं आला. तेथें बिंदुमतीच्या संमतीनें त्यानें तिच्याशीं विवाह केला. कांहीं दिवसांनीं बिंदुरेखा गर्भार राहिली. पुढें त्या गर्भाला आठवा महिना लागला असतां, बिंदुमती एकांतांत शक्तिदेवास म्हणाली,—"नाथ, आपण मला काय सांगितलें होतेंत तें आठवा. या दुसऱ्या भार्येला आठवा महिना लागला आहे, तर आतां आपण जाऊन व तिचें उदर फाडून गर्भ ओढून काढा. महात्म्यांना अंगीकृत अनुल्लंघनीय असतें."—तिनें असें सांगितलें असतां, स्नेह व कृपा यांनीं आकुल व प्रतिज्ञापरतंत्र-

झालेला, तो एक क्षणभर चंचलचित्त व निरुत्तर होऊन राहिला. पण बिंदुमतीचा अत्याग्रह पाहून शेवटीं तो मोठ्या दुःखानें बिंदुरेखेकडे चालला; पण आपला नाथ अतिशय खिन्न होऊन येत आहे, असें पाहून ती म्हणाली,-"प्राणनाथ, आपण असे खिन्न कां होतां? बिंदुमतीनें आपल्याला मजकडे कशाकरितां पाठविलें आहे, हें मी जाणतें. तिनें सांगितलें आहे तसें तुम्हीं करा; कारण त्यांत कांहीं गुप्त हेतु साध्य व्हावयाचा आहे. त्यामुळें त्यांत निष्ठुरतेचा अंशही नाहीं. आपण किळस मानूं नका. याविषयीं मी एक देवदत्ताची कथा सांगतें, ती ऐका.—

## ५. देवदत्ताची उपकथा.

पूर्वीं कंबुक पुरांत हरिदत्त ब्राह्मण होता. त्या श्रीमानास देवदत्त म्हणून एक पुत्र होता. लहानपणीं त्यानें जरी चांगला विद्याभ्यास केला होता, तरी तरुणपणीं वाईट संगतीनें त्याला जुगारीचें व्यसन लागलें. एकदां द्यूतामध्यें त्याचीं सर्व वस्त्रेंही गेलीं, तेव्हां बापाच्या घरीं जावयास त्याला लाज वाटली, व तो एका शून्य देवालयांत गेला. तेथें त्याला एक जप करीत असलेला महाव्रतस्थ पुरुष दिसला. त्याचें नांव जालपाद असें असून त्यानें अनेक मनोरथ साध्य केले होते. त्याच्यापाशीं हा उघडा-बोडका गेला व त्याला प्रणाम करून बसला. तेव्हां जालपादानें आपलें व्रत संपवून याचें स्वागत केलें; पण देवदत्ताची ती अवस्था पाहून जालपाद म्हणाला,-"बाबा, तुझीं वस्त्रें काय झालीं? तूं असा बावरलेला कां दिसतोस?"-तें ऐकून 'जुगारीच्या व्यसनानें माझी अशी दुर्दशा केली आहे' असें त्यानें उत्तर दिलें. तेव्हां तो व्रती हंसून म्हणाला-बाळा, व्यसनी लोकांस पुरेल इतकें धनच भूलोकीं नाहीं.‡ या विपत्तींतून पार पडण्याची जर तुझी इच्छा असेल, तर मी सांगतों तें ऐक. विद्याधरत्व संपादन करण्याकरितां मी जें केलें आहे तेंच तूंही कर. म्हणजे सुखी होशील. त्यावर 'बरें आहे, तुम्ही सांगाल तसें मी करीन' असें बोलून देवदत्त त्याच्यापाशीं राहूं लागला. दुसऱ्या दिवशीं रात्रीं तो महाव्रती स्मशानांतील वडाच्या झाडाखालीं गेला. तेथें त्यानें पूजा केली; पायसाचा नैवेद्य दाखविला, सर्व दिशांमध्यें बळी अर्पण केला, आणि पूजाविधि संपवून तो जवळ असलेल्या ब्राह्मणास म्हणाला,-"वत्सा, तूंही

‡ नास्ति व्यसनिनां वत्स भुवि पर्याप्तये धनम्।

अशीच ‘ विद्युत्प्रभे, गृहाण इमां पूजां ’ या मंत्रानें प्रत्यहीं पूजा करीत जा. म्हणजे आम्हां दोघांनाही सिद्धि मिळेल. त्यावांचून मिळणार नाहीं.”– असो; असा उपदेश करून तो व्रती त्याच्यासह आपल्या वसति-स्थानीं गेला. तेव्हांपासून देवदत्त रोज त्या झाडाखालीं जाऊन सांगितल्याप्रमाणें पूजा करूं लागला.

एकदां पूजेच्या शेवटीं त्याच्या डोळ्यां देखत द्विधा झालेल्या त्या वृक्षांतून एक स्त्री बाहेर पडली; व ‘ ये, उदार पुरुषा ये; आमची स्वामिनी तुला बोलावीत आहे.’ असें बोलून ती त्याला त्याच वृक्षांत घेऊन गेली. आंत जातांच एक दिव्य रत्नजडित गृह व त्यांत पर्यंकावर बसलेली एक रमणी त्याला दिसली. ही आमची मूर्तिमत सिद्धिच आहे, असें जों तो आपल्या मनांत म्हणत आहे, तों ती श्रेष्ठ स्त्री अतिथीचा सत्कार करण्याकरितां उठली. त्याबरोबर तिच्या सुंदर भूषणांचा रमणीय ध्वनि ऐकूं आला असतां, तीं भूषणेंच आपलें स्वागत करीत आहेत, असा त्याला भास झाला. असो; इतक्यांत तिनें स्वतः त्याला आपल्या पर्यंकावर बसविलें, व म्हटलें,–“ हे महाभागा ! मी रत्नवर्ष यक्षपतीची विद्युत्प्रभा कन्या आहें. या जालपाद महाव्रती पुरुषानें माझी आराधना केली. त्याला मी अर्थसिद्धि देणार आहें, पण तूं माझ्या प्राणांचाही प्रभु आहेस. यास्तव प्रेम करणाऱ्या माझें तूं पाणिग्रहण कर.”–त्यावर ‘ ठीक आहे ’ असें म्हणून व तिच्याशीं विवाह करून तो कांहीं काल तेथेंच राहिला. पुढें ती गर्भवती झाली असतां, मी पुनरपि येईन असें सांगून तिच्या संमतीनें तो महाव्रत्याकडे निघाला. त्याच्यापाशीं येऊन पोंचल्यावर देवदत्तानें झालेलें वर्तमान भीत भीत त्याला सांगितलें. तेव्हां ‘ बाळा, बरें केलेंस, पण आतां परत जाऊन व तिचें पोट फाडून तिचा गर्भ सत्वर घेऊन ये.’ असें सांगून व मागच्या त्याच्या प्रतिज्ञेची आठवण देऊन त्यानें त्याला पाठविलें. तेव्हां स्नेहवश झालेला तो बिचारा खिन्न मनानें तिच्याकडे आला; पण त्याची मुद्रा पाहून विद्युत्प्रभा म्हणाली,–“ आर्यपुत्र, असे खिन्न कां होतां ? जालपादानें तुम्हांला काय करावयास सांगितलें आहे, तें मला ठाऊक आहे. त्याप्रमाणें तुम्ही करा, नाहीं तर मीच आपलें पोट फाडून घेतें. कारण, तसें करण्यांत कांहीं हेतु साध्य होणार आहे.”—

पण हें तिचें भाषण ऐकूनही देवदत्तानें तसें केलें नाहीं, म्हणून स्वतः त्या यक्षिणीनेंच आपलें पोट फाडून घेऊन गर्भ ओढून काढला, व तो त्याच्यापुढें ठेवून ती म्हणाली,–" याला जो खाईल तो विद्याधर होईल. यास्तव हा घ्या. मी विद्याधरी असून शापामुळें यक्षिणी झालें, मला पूर्व जन्माचें स्मरण आहे, माझ्या शापाचा शेवट असाच ठरला होता, आतां मी निजधामास जातें. आपला पुनः समागम होईल."–इतकें बोलून विद्युत्प्रभा कोठें दिसेनाशी झाली. तेव्हां खिन्न झालेला देवदत्तही त्या गर्भास घेऊन जालपादाकडे आला. त्यानें सिद्धि देणाराही तो गर्भ त्याच्यापुढें ठेविला; कारण सज्जन लोक दुर्लभ वस्तूंचाही स्वतःच उपभोग घेत नसतात.* पण त्या मतलबी दुर्जन जालपादानें युक्तीनें देवदत्ताला भैरवाच्या पूजेकरितां पाठवून दिलें, व तो पूजा करून परत येण्याच्या पूर्वीच त्यानें तें गर्भाचें सर्व मांस खाऊन टाकलें. 'तूं सर्वच मांस कसें खाल्लेंस' असें देवदत्त त्याला विचारीत आहे, तोंच तो कपटी जालपाद विद्याधर होऊन आकाशांत उडून गेला. तो चमत्कार पाहून 'अरेरे हें काय झालें? या पाप्यानें मला फसविलें, अथवा अत्यंत सरळ स्वभाव कोणाच्या पराभवास कारण होत नाहीं?† यास्तव स्वतः विद्याधर होऊन, मला आतां कसा तरी त्याचा सूड उगवला पाहिजे; पण वेताळाला साध्य करून घेतल्यावांचून दुसरा उपाय सुचत नाहीं.' असा पश्चात्ताप केल्यावर तो स्मशानांत गेला, व तेथें वृक्षाखालीं एका मनुष्य–शरीरांत वेताळाचें आव्हान करून व त्याचें पूजन करून, त्यानें महामांसाचा बळी समर्पण केला. पण त्यामुळें तो तृप्त होत नाहीं, व दुसऱ्या मनुष्यास आणून त्याचा बळी द्यावा, तर तेंही सामर्थ्य आपल्यामध्यें नाहीं, असें पाहून देवदत्तानें आपलेंच मांस काढून तें त्याला अर्पण करण्यास आरंभ केला. तेव्हां त्याला वेताळ म्हणाला,–'महापुरुषा, तुझें हें धैर्य पाहून मी प्रसन्न झालों आहें. असें साहस करूं नकोस. तुझें कोणतें इष्ट मी करूं तें सांग.'

हें त्याचें प्रसन्न वचन ऐकून देवदत्त म्हणाला,–विश्वासघात करणारा व्रती जालपाद विद्याधर होऊन जेथें राहिला आहे, तेथें मला ने. त्या-

* भजन्त्यात्मंभरित्वं हि दुर्लभेऽपि न साधवः ।

† यदि वात्यन्तमृजुता न कस्य परिभूतये ।

बरोबर वेताळानें त्याला आपल्या खांद्यावर बसवून एका क्षणांत आकाश-मार्गानें विद्याधरांच्या लोकीं नेलें. तेथें तो जालपाद एका मोठ्या प्रासादा-वर आहे, व तो अति मोठ्या विद्याधर राजाच्या रत्नासनावर बसलेल्या व विद्याधरी झालेल्या विद्युत्प्रभेला, तिची इच्छा नसतांनाही खोट्या–नाट्या गोष्टी सांगून, आपली भार्या होण्याविषयीं प्रार्थना करीत आहे, असें त्याला दिसलें. त्याला पहातांच ज्याला अतिशय संताप आला आहे, असा देव-दत्त वेतालारूढ होऊनच त्या सुंदरीच्या नेत्रांस आनंद देत त्याच्या अंगा-वर गेला. तेव्हां अकस्मात् आलेल्या त्याला पहातांच जालपाद घाबरला. त्याच्या हातांतलें खड्ग खालीं पडलें व तोही आसनावरून पडला. पण देवदत्तानें त्याचें खड्ग हातीं लागलें असतांही त्याला मारलें नाहीं. कारण महात्मे भयभीत झालेल्या शत्रूंवरही दया करीत असतात.* वेताळ त्याला मारीत होता, पण त्याचेंही निवारण करून देवदत्त म्हणाला,–या पाखंड्यास मारून काय करावयाचें आहे? याला भूलोकीं नेऊन त्याच्याच येथें ठेव. हा पापी कापालिक तेथेंच राहूं दे.

देवदत्त इतकें बोलत आहे, तोंच देवी भवानी आकाशांतून उतरून व प्रत्यक्ष दृग्गोचर होऊन, पुढें नम्र झालेल्या देवदत्तास म्हणाली,– "पुत्रा, तुझ्या ह्या असाधारण धैर्योत्कर्षानें मी प्रसन्न झालें आहें. आज मी तुला विद्याधराचें राजत्व देतें."–इतकें बोलून व त्याला लागल्याच सर्व विद्या देऊन देवी गुप्त झाली. जालपाद सिद्धीपासून भ्रष्ट झाला असतां, वेताळानें त्यालाही भूलोकीं नेऊन ठेविलें. कारण अधर्म स्थिर समृद्धीला कारण होत नाहीं.§ त्यानंतर देवदत्त त्या विद्युत्प्रभेसह विद्या-धराधिपत्य चालवीत सुखानें राहूं लागला.

## ६. शक्तिदेवाची सिद्धि व विवाह.

ही कथा सांगून मृदु व मधुर भाषण करणारी ती बिंदुरेखा पुनः शक्तिदेवास म्हणाली,–"नाथ, अशा प्रकारचीं कार्यें असतात. यास्तव बिंदुमतीनें सांगितल्याप्रमाणें या माझ्या गर्भाला फाडून काढा. या कामांत भिऊन उपयोगी नाहीं."–तिनें असें सांगितलें असतांही शक्ति-

* रिपुष्वपि हि भीतेषु सानुकंपा महाशयाः ।

§ नामधर्मश्चिरमृद्धये ।

देव पापाची भीति बाळगीत आहे, असें पहातांच पुढीलप्रमाणें आकाशवाणी झाली.—शक्तिदेवा, तूं निःशंकपणें हिचा गर्भ ओढून काढ, व त्याचा कंठ आपल्या हातांत धर, म्हणजे तो गर्भच तुझ्या हातांतील उत्तम खड्ग होईल.—आकाशवाणी ऐकतांच शक्तिदेवानें तत्काल तिचें पोट फाडून गर्भ ओढून काढला व त्याचा गळा धरिला. त्याबरोबर तो गर्भ उत्तम खड्ग झाला. शक्तिदेवही तत्काल विद्याधर झाला, व बिंदुरेखा गुप्त झाली. नंतर विद्याधर झालेला तो ब्राह्मण दाशकन्या बिंदुमतीकडे जाऊन तें सर्व वर्तमान सांगूं लागला, तेव्हां ती म्हणाली,—नाथ, आह्मीं तिघीजणी विद्याधरराजाच्या बहिणी असून शापामुळें खालीं उतरलों. त्यांतील एक कनकरेखा. तिच्या शापाचा शेवट कसा झाला हें आपण वर्धमानपुरांत पाहिलेंच आहे. दुसरी बिंदुरेखा तिच्या शापाचा अंतही आपणच केलात. तिसरी मी. माझ्या शापाचा अंतही लौकरच होईल. मला आतां आपल्या नगरीस जावयाचें आहे. आमचीं विद्याधरयोनींतील शरीरें तेथें आहेत. चंद्रप्रभा ही आमची वडील बहीण होय. ती तेथेंच आहे. तर आपणही या खड्गसिद्धीच्या प्रभावानें तेथें या, म्हणजे वनांत असलेला आमचा पिता आपल्याला आमचें दान करील, व चार भार्यांनीं युक्त होऊन आपण त्या नगरांत राज्य कराल.

याप्रमाणें आपलें खरें तत्व सांगणाऱ्या बिंदुमतीसह विद्याधराच्या शरीरानें भूषित झालेला शक्तिदेव, आकाशमार्गानें कनकपुरीस जावयास निघाला. तेथें पोंचतांच पूर्वीचीं मृत शरीरें सजीव झालीं आहेत, व त्यांच्यासह त्यांची ज्येष्ठ भगिनी मोठ्या उत्सुकतेनें आपलीच वाट पहात आहे, असें त्याला कळलें. नंतर तेथल्या सेवकांनीं ज्याचें अभिनंदन केलें आहे, असा तो अंतःपुरांत गेला असतां चंद्रप्रभा ह्मणते—सुभगा, वर्धमान पुरांत कनकरेखा म्हणून जी राजकन्या तूं पाहिली होतीस, तीच ही चंद्ररेखा होय. उत्स्थल द्वीपांतील दाशकन्याच ही माझी दुसरी बहीण शशिरेखा आहे. तसेंच दानवाला मारून तुला मिळालेली जी बिंदुरेखा राजकन्या, तीच ही माझी शशिप्रभा नांवाची तिसरी बहिण होय. तर आतां माझ्या बापाकडे चल आणि त्यानें आमचें दान केलें म्हणजे तूं आमच्याशीं यथाविधि विवाह कर.

चंद्रप्रभेचें हें म्हणणें मान्य करून शक्तिदेव त्या चौघीजणींसह वनांत असलेल्या त्यांच्या पित्याजवळ गेला. त्यांनीं प्रणामपूर्वक - सर्व वर्तमान सांगितलें आणि त्याच वेळीं दिव्य आकाशवाणीनेंही प्रेरणा केली. तेव्हां आनंदित झालेल्या विद्याधरराजानें आपल्या चारी कन्या, राज्य व सर्व विद्या त्याला दिल्या. त्यामुळें तो सर्व विद्याधरांचा राजा झाला. नंतर तुज महाप्रभावशाली वीराला, एका वत्सेश्वर नरवाहन दत्तावांचून दुसरा कोणी जिंकूं शकणार नाहीं. तोच तुझा विभु होईल. त्याला मात्र तूं प्रणाम कर. असा उपदेश व मोठा सत्कार करून चारी भार्यासह त्यानें त्यास तेथून रवाना केलें. तेव्हां तो शक्तिवेग नांवाचा राजा आपल्या भार्यांसह विद्याधरलोकाची जणुं काय पताकाच, अशा कनकपुरीस जाऊन, तेथें परम सुख व विद्याधरांचें ऐश्वर्य भोगीत राहिला.

अशा प्रकारचें हें आपलेंच चरित्र सांगून वक्ता शक्तिवेग, पुनरपि वत्सेश्वरास म्हणाला,–" बा चंद्रवंशजा राजा, तोच शक्तिवेग मी आहें, असें समज. उत्पन्न झालेल्या या भावी प्रभूचे चरण पहाण्याकरितां मी आलों. याप्रमाणें शंकराच्या कृपेनें मज मानवालाही विद्याधराधिपत्व प्राप्त झालें आहे. मी आतां निजधामीं जातों. मला माझ्या प्रभूचें दर्शन झालें. तुझें नित्य कल्याण होवो."—

असें सांगून, हात जोडून व आज्ञा घेऊन तो चंद्रासारखा तेजस्वी शक्तिवेग आकाशांतून उडून गेला. तो प्रकार पाहून दोघी देवी व मंत्री यांसह वत्सराजास अतिशय आनंद वाटला.

येथें चतुर्दारिका नामक पांचवा लंबक समाप्त झाला.

---

# ६. मदनमञ्चुकालंबक.

## तरंग १ ला.

### १. नरवाहनदत्ताला तारुण्यप्राप्ति.

कुमार नरवाहनदत्त पित्याच्या प्रयत्नानें आपल्या गुणांसह प्रत्यहीं वाढतां वाढतां नऊ वर्षांचा झाला. तेव्हां वत्सराजानें मंत्रिपुत्रांसह त्याला सर्व विद्यांचें शिक्षण द्यावयास आरंभ केला. इतर विद्यांबरोबर अस्त्र-विद्येचाही या कुमारांनीं अभ्यास केला. उदयनानें आपल्या पुत्राकरितां जगांतील नामांकित आचार्य पदरीं ठेवून, विद्यार्थ्यांना खेळण्याचा नाद लागूं नये व अभ्यासांत विक्षेप येऊं नये, म्हणून पाठशाला गांवाबाहेर पृथक् बांधविली. राजकुमार आपल्या समवयस्क मित्रांसह नेहमीं तेथेंच राही. स्वतः राजा, राण्या, व प्रधान त्यांस भेटण्याकरितां तेथें जात; पण विद्या संपण्यांपूर्वीं त्यांना त्या पवित्र स्थानांतून बाहेर आणण्याचेंही मनांत आणीत नसत. व्यायाम-विहारादिकांच्या सर्व साधनांची योजना त्या विद्यामंदिरांतच केलेली होती.

बारा वर्षें अध्ययन केल्यावर ते सर्व बालक मोठे विद्वान् व तरुण झाले. तेव्हां राजाही पुत्रांच्या विवाहाविषयीं विचार करूं लागला.

### २. कलिंगदत्त व वैश्यपुत्र यांची कथा.

त्याच वेळीं तक्षशिला नामक नगरांत कलिंगदत्त म्हणून एक जैनधर्मी राजा होता. तो आपला राजधर्म सोडून प्रजेला सतत आपण स्वीकारलेला धर्म शिकवीत असे. त्याच नगरांत वितस्तदत्त म्हणून एक मोठा श्रीमान् वैश्य होता. त्याला जैन-अतिथी फार प्रिय असत. त्या कारणानें त्याचा पुत्र रत्नदत्त आपल्या जनकाला पापी समजून त्याची नेहमीं निंदा करीत असे. एकदां त्याच्या पित्यानें त्याला निंदेचें कारण विचारिलें असतां, रत्नदत्त मोठ्या रागानें म्हणाला,–" बाबा, वैदिकधर्माचरण सोडून व केवळ जैनभिक्षुकांच्या सेवेमध्यें तत्पर राहून तुम्ही मोठा अधर्मसंचय करीत आहां; कारण या जैनांत स्नान-शौचादि कांहीं नाहीं. या धर्मांत

सर्व अधमजातीचे लोक असतात. यापेक्षां ब्राह्मणांना दानें द्या; आणि त्यांचा सत्कार करा."

त्यावर त्याचा पिता म्हणतो–वत्सा, धर्माचे अनेक प्रकार आहेत. बाबारे लोकोत्तर धर्म निराळा व सार्वलौकिक धर्म निराळा. रागादिराहित्य, सत्य, भूतदया इत्यादिकांसच ब्राह्मण्य म्हणतात. जातींच्या व्यर्थ कलहास ब्राह्मण्य कोणीही म्हणत नाहींत.* सर्व धर्मांत अहिंसा हाच मुख्य धर्म आहे, असें सर्व बुद्धिमान् समजतात. व मीही त्याचेंच अनुष्ठान करीत आहें. असें असतांना तूं मला अधार्मिक कसें समजतोस? परंतु पित्याच्या या उपदेशानेंही पुत्राचें समाधान झालें नाहीं. उलट त्यानें त्याची निंदाच केली. तेव्हां तें त्याचें अकृत्य सहन न झाल्यामुळें वितस्तदत्तानें राजाकडे फिर्याद केली. त्याबरोबर राजानें त्याला आणवून व अतिशय रागावल्यासारखें दाखवून वधदंड सांगितला; पण कलिंगदत्तानें आपल्या पुत्रास देहान्तशासन सांगितलेलें ऐकून भयभीत झालेल्या वैश्यानें त्याची पुनः क्षमा करण्याविषयीं प्रार्थना केली. तेव्हां राजा म्हणाला,–"साधो, तुजकडे पाहून मी याला दोन महिन्याची अवधि देतों. तितक्या अवकाशांत हा शुद्धीवर येऊन धर्माचरण करूं लागला, तर बरें आहे. दोन महिन्यांनीं याला पुनः मजकडे आण. म्हणजे हा धार्मिक झाला असला तर मी क्षमा करीन. नाहीं तर हाच दंड त्याला भोगावा लागेल." असें सांगून राजानें आज्ञा दिली असतां तो वैश्य पुत्राला घेऊन घरीं परत आला.

रत्नदत्त, राजाच्या वधदंडास अतिशय भ्याला. त्याला मोठी चिंता लागली. फार काय, पण त्यानें आहार व निद्राही सोडली. अर्थात्च त्यामुळें तो अति कृश झाला. दोन महिने होतांच त्याच्या पित्यानें आज्ञेप्रमाणें त्याला राजाकडे नेलें. तेव्हां त्याची ती दशा पाहून राजा म्हणाला,–"वैश्यपुत्रा असा कशानें झालास? तुझ्या बापानें तुझा आहार तर कमी केला नाहीं? मीही तशी आज्ञा केली नव्हती."–तें ऐकून रत्नदत्त म्हणतो- स्वामिन् ज्या दिवशीं आपण मला वधदंड सांगितलात,

---

* ब्राह्मण्यमपि तत्प्राहुर्यद्रागादिविवर्जनम् ।
सत्यं दया च भूतेषु न मृषा जातिविग्रहः ।

त्या दिवसापासून त्याच चिंतनांत माझा प्रत्येक दिवस व रात्र गेल्यामुळें मी असा कृश झालों आहें.–तें ऐकून राजा म्हणाला,–" तर मग मृत्यु किती भयंकर आहे हें तुला समजलें म्हणावयाचें! तेवढ्यासाठींच मी तुला वधशिक्षा दिली होती. असो; आतां विचार कर; म्हणजे तुझ्या प्रमाणेंच प्राणिमात्राला मृत्युभय वाटत असतें हें तुझ्या ध्यानांत येईल. अरे वेड्या, अशा भयापासून सोडविणाऱ्या अहिंसादि लोकोपकाराहून अधिक मोठा धर्म दुसरा कोणता असणार?* मृत्युभय दाखवून मी तुला धर्मोपदेश केला आहे, बुद्धिमान् पुरुष मरणास अतिशय भिऊनच मोक्षाची इच्छा करितो.‡ यास्तव आतां यापुढें तूं आपल्या मोक्षार्थी बापाची निंदा करूं नकोस.

राजाचा हा अमृततुल्य उपदेश ऐकून रत्नदत्त म्हणाला–' राजन्, आपल्या या मधुर वाणीनें मी कृतार्थ झालों आहें. मला मोक्षाची तीव्र इच्छा झाली आहे. यास्तव आपण मला मोक्षधर्माचा उपदेश करा, म्हणजे मीही त्याप्रमाणें वागून सत्वर कृतकृत्य होईन.'–हें ऐकून राजाला अतिशय आनंद झाला. नंतर थोड्या दिवसांनीं त्या नगरांत एक महोत्सव सुरू झाला. तेव्हां रत्नदत्ताला बोलावून व त्याच्या हातांत तेलानें भरलेलें पात्र देऊन तो म्हणाला,–" हें घेऊन तूं सर्व नगरभर फिरून ये; पण खबरदार यांतलें एक थेंबभर तेलही सांडतां कामा नये. जर सांडलें तर तत्काल, हे माझे सशस्त्र लोक तुझा शिरच्छेद करतील."–इतकें सांगून राजानें निरोप दिला, व तो वैश्यपुत्र नगरांत फिरावयास निघाला. राजपुरुष त्याच्या दोन्ही बाजूंस नग्न शस्त्रें घेऊन चालले होते. अशा स्थितींत रत्नदत्त मोठ्या कष्टानें नगरभर फिरून राजाजवळ आला.

तेव्हां आज्ञा केल्याप्रमाणें तेलाचा बिंदुही न पाडवितां हा नगरभर फिरून आला आहे असें पाहून राजा म्हणाला,–" वत्सा, नगरांत फिरत असतांना तूं महोत्सवांत गुंग झालेल्या हौशी लोकांची हालचाल, कशी चालली होती, ती पाहिलीस काय?" त्यावर तो म्हणतो–प्रभो, तेलाचा

* ईदृगेव हि, सर्वस्य जन्तोर्मृत्युभयं भवेत्।
तद्रक्षणोपकाराच्च धर्मः कोऽभ्यधिको वद ॥

‡ मृत्युभीतो हि यतते नरो मोक्षाय बुद्धिमान्।

एक बिंदु सांडल्यास राजपुरुषाच्या हातांतली तीक्ष्ण सुरी मानेवर पडेल, या भीतीनें माझें सर्व लक्ष्य पात्राकडे व त्यांतील तेलाकडे होतें, म्हणून मीं कांहीं ऐकलें नाहीं, व कांहीं पाहिलेंहि नाहीं. त्यावर राजा फिरून म्हणाला,-" बाळा, तुझें चित्त तेलाकडे लागलेलें असल्यामुळें तुला कांहीं कळलें नाहीं. तेव्हां चित्तच सर्व प्रत्ययांचें निमित्त आहे, असें झालें कीं नाहीं? तर तूं आतां असेंच चित्तैकाग्र्य करून परमात्म्याचें चिंतन कर. चित्ताला स्थिर करून बाह्य वस्तूंपासून परतविलें, म्हणजे तत्त्वज्ञान होतें. ज्याला तत्त्वदर्शन झालें आहे तो कर्मजालानें पुनः बद्ध होत नाहीं.† हा मी तुला थोडक्यांत मोक्षोपदेश केला आहे."-असें सांगून त्याला आपल्या घरीं जावयास आज्ञा दिली, व राजाही अंतर्गृहांत गेला.

त्या कलिंगदत्त राजाची राणी तारादत्ता म्हणून होती. ती रूपवती, गुणवती व कुलीन होती. राजा तिच्यासह सुखानें काल घालवीत असतां, त्याचवेळीं स्वर्गलोकीं देवसभेंत महोत्सव-प्रसंगीं, नाचण्याकरितां सर्व अप्सरा आल्या आहेत; पण त्यांच्या संघांत एक सुरभिदत्ता मात्र नाहीं, असें पाहून ती कोठें आहे, म्हणून इंद्र दिव्य दृष्टीनें पाहूं लागला. तेव्हां ती नंदनवनांत विद्याधराशीं विलास करण्यांत गुंतली आहे, असें त्याला वाटलें. त्याबरोबर देवेंद्राला मोठा कोप आला. तो मनांत म्हणाला,-" अरे, हीं दोघें दुराचारी कामपरतंत्र, सुखासक्त व मत्त होऊन आम्हांलाही भीत नाहींत; पण यांत त्या विद्याधराचा इतका अपराध असेलसें वाटत नाहीं. कारण अप्सरेच्याच रूपानें आकृष्ट झाल्यामुळें, तो असलें निंद्य कृत्य करावयास प्रवृत्त झाला असावा. कारण स्त्रियांच्या स्वरूपांत अशीच कांहीं भयंकर उन्मादन शक्ति आहे, कीं तिचें उल्लंघन कोणालाही करितां येत नाहीं. पूर्वीं सर्व रूपवान् पदार्थांतील तिळ तिळ सार घेऊन ब्रह्मदेवानें तिलोत्तमेला बनविलें; पण तिला पाहून त्रिभुवनकर्ता मदनदहन शंकरही लुब्ध झाला. मेनकेला पाहून विश्वामित्र तपापासून निवृत्त झाला. शर्मिष्ठेच्या रूपानें मोहित झालेला ययाति जराग्रस्त झाला. यास्तव यामध्यें विद्याधराचा कांहीं दोष नसावा, असें मला वाटतें. असा विचार करून व स्त्रियाच सर्व अनर्थांचें मूळ आहेत असें ठरवून, देवेंद्रानें विद्याधरास सोडून देऊन, फक्त सुरभिदत्तेस 'पापशीले, या दोषामुळें तूं मर्त्यलोकीं

† दृष्टतत्त्वश्च न पुनः कर्मजालेन बध्यते ।

जन्म घे. तेथें राहून तूं जेव्हां स्वर्गोचित कर्तव्यकर्म करशील, तेव्हांच तुझ्या या शापाचा अंत होईल' असा शाप दिला.

इकडे मर्त्यलोकीं त्याचवेळीं तारादत्ता ऋतुमती होती. शापभ्रष्ट झालेली सुरभिदत्ता तिच्याच उदरीं उत्पन्न झाली. तारादत्तेनें स्वप्नांत, आकाशांतून पडणारी एक दिव्य ज्योति आपल्या उदरांत शिरली, असें पाहिलें. पुढें तिनें तो वृत्तांत आपला पति कलिंगदत्त यास सांगितला. तेव्हां राजा म्हणाला,–"प्रिये, असें नेहमीं होतें. शापभ्रष्ट झालेले स्वर्गवासी मनुष्यलोकीं येऊन जन्म घेत असतात. या तुझ्या स्वप्नवृत्तांतावरून मला खास असें वाटतें, कीं कोणी देव अथवा देवयोनींतील दुसरा कोणी तुझ्या गर्भांत जन्म घेण्याकरितां आला आहे. विचित्र शुभाशुभ कर्मांनीं निबद्ध झालेले प्राणी, शुभाशुभ फलें भोगण्याकरितां या त्रिभुवनांत फिरत असतात."

राजाचें तें भाषण ऐकून राणी म्हणाली,–खरें आहे प्राणनाथ, शुभाशुभ फल देणारें कर्मच बलाढ्य आहे. याविषयीं मी एक ऐकलेली गोष्ट आपणास सांगतें, ती ऐका.—

### ३. धर्मदत्त राजाची कथा.

पूर्वीं कोशल देशांत धर्मदत्त नांवाचा एक राजा होता. त्याची नागश्री म्हणून पतिव्रता राणी होती. शिष्ट लोक तिला भूलोकची अरुंधतीच म्हणत असत. कांहीं कालानें त्या साध्वीच्या उदरीं मी झालें. मी लहान असतांना माझ्या आईला एकदम पूर्वजन्माचें स्मरण होऊन, ती माझ्या बाबांना म्हणाली,–"प्राणनाथ, मला अकस्मात् पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे. पण तें सांगितलें तर तत्काल मरण येईल, व न सांगावें तर मनाला रुखरुख रहाणार! त्यामुळें मला मोठा खेद वाटत आहे."–हें ऐकून माझे बाबा म्हणाले,–" प्रिये, तुझ्याप्रमाणेंच मलाही एकाएकीं पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे. पण तूं अगोदर आपलें वृत्त सांग, म्हणजे मग मी माझें सांगेन. त्याचा परिणाम कांहींका होईना! भवितव्यतेचें उल्लंघन कोण करणार?"–बाबांचा असा आग्रह पाहून माझी आई आपलें पूर्ववृत्त सांगूं लागली.—

याच देशांत माधवदत्त म्हणून एक ब्राह्मण होता. त्याच्या येथें मी पूर्वजन्मीं सदाचरणशील दासी होतें. देवदास नांवाचा माझा पतीही साधु

असून तो एका वैश्याचें दास्य करीत असे. आपल्या अवस्थेला उचित असें एक झोंपडें बांधून आम्ही दोघें त्यांत रहात होतों. आपआपल्या स्वामीच्या घरून आणलेलें पक्क अन्न आम्हीं खात असों. आमच्या झोंपड्यांत १ मडकी-रांजण, २ केरसुणी-मांचा व ३ मी आणि माझा पति अशीं तीनच कायतीं जोडपीं होतीं. आमच्या क्षुद्र घरट्यांत पदार्थ जरी फारसे नव्हते, तरी समाधानानें रहाणाऱ्या आमच्या आनंदानें त्याला भरून टाकलें होतें; त्यामुळें कलहाला आंत शिरावयास अवकाशच मिळत नसे. देव, पितर व अतिथी यांस देऊन राहिलेलें परिमित अन्न आम्हीं खात होतों. त्यामुळें रोगांनाही आमच्याकडे पहावेंसें वाटत नसे. आम्हां दोघांना दोन वस्त्रें असलीं, म्हणजे आमचें काम भागत असे. म्हणून कधीं कांहीं अधिक वस्त्रपात्र मिळाल्यास आम्हीं तें दरिद्र्यांना देऊन टाकीत होतों.

एकदां त्या देशांत मोठा दुष्काळ पडला, त्यामुळें स्वामीच्या घरून आम्हांला थोडें थोडें अन्न मिळूं लागलें. पण करणार काय ? त्यावरच आम्ही निर्वाह करीत होतों. त्यामुळें आमचीं शरीरें अति कृश झालीं. एकदां आम्ही दोघें भोजनास बसणार, इतक्यांत एक अतिशय क्षुधित झालेला ब्राह्मण आमच्या येथें आला. तेव्हां त्याला दिल्यावांचून आपण कसें खावें ? असा विचार करून प्राणसंकट असतांनाही आम्ही तें सर्व अन्न त्या अतिथीला दिलें. तेव्हां तें खाऊन तो ब्राह्मण संतुष्ट झाला. भोजनोत्तर तृप्त होऊन तो निघून गेला असतां, क्षुधेनें आर्त झालेल्या माझ्या पतीचे प्राण, 'याचकांविषयीं याला मोठा आदर वाटतो, आमच्या विषयीं मुळींच नाहीं,' असें म्हणून जणुं काय, रागावूनच त्याच्या शरीरांतून निघून गेले. तेव्हां मी आपल्या चित्ताचें समाधान करून आपल्या प्रियतमाला स्मशानांत नेवविलें व चिता पेटवून सहगमन केलें. त्यानंतर या जन्मीं मी राजगृहांत उत्पन्न झालें, व आपल्या पायांची दासी बनलें.

हें ऐकून राजा धर्मदत्त म्हणाला,-" प्रिये, मीच तो तुझा पूर्वजन्मींचा पति. माझेंच नांव देवदास असून, मीच एका वैश्याच्या येथें काम करीत असें. आज मला तें सर्व आठवलें."-इतकें बोलून तीं दोघेंही स्वर्गास गेलीं. तेव्हां माझ्या मावशीनें मला आपल्या येथें नेलें. एकदां कुमारी-अवस्थेंत असलेल्या मला, मावशीनें आपल्या घरीं आलेल्या अतिथीची

परिचर्या करावयास सांगितलें. तेव्हां कुंतीनें जशी दुर्वासांची सेवा केली होती, तशीच मी माझ्या बुद्धि व शक्तीप्रमाणें त्याची परिचर्या केली. तेव्हां अति संतुष्ट झालेल्या त्यानें मला वर देऊन गमन केलें. त्यामुळें मी या पायांची दासी झालें आहें. पुण्यवृक्ष तत्काल अचिंत्य फल प्रसवतो.§

त्यावर कलिंगदत्त म्हणाला,–देवि, खरें आहे. चांगल्या रीतीनें आचरिलेला थोडासा धर्मही मोठें फल देण्यास समर्थ होतो.* याविषयीं मी एक जुनी सात ब्राह्मणांची कथा सांगतों, ती ऐक.—

## ४. सात ब्राह्मणांची कथा.

कुंडिन म्हणून एक पुर आहे. त्यांत एक उपाध्याय रहात असे. त्याचे सात ब्राह्मणपुत्र शिष्य होते. एकदां दुष्काळाचे क्लेश असह्य झाल्यामुळें त्यानें आपल्या श्वशुरापासून एक गाय मागून आणण्याकरितां शिष्यांस पाठविलें. तेव्हां ते अन्नाभावी व्याकुल झालेले शिष्य, दूरच्या गांवीं रहाणाऱ्या उपाध्यायाच्या सासऱ्याकडे मोठ्या कष्टाने गेले, व त्यांनीं त्याला आपल्या गुरूचा निरोप अक्षरशः सांगितला. तेव्हां जांवयाच्या प्रार्थनेस मान देऊन त्यानें त्यांस एक गाय दिली. पण त्यांतील एकालाही त्या कृपणानें एक मुठभरही अन्न दिलें नाहीं. शिष्य इलाज नाहींसा झाल्यामुळें गायीला घेऊन तेथून परत निघाले; पण क्षुधा व तृषा यांच्या योगानें अति व्याकुल होऊन ते अर्धमार्गांत खालीं बसले. त्यांच्यानें एक पाऊलही पुढें टाकवेना. उपाध्यायाचें घर तेथून फार लांब होतें. त्यामुळें आतां आमचें प्राणरक्षण होणें अत्यंत अशक्य आहे, असें पाहून त्या सर्वांनीं मिळून त्या धेनूस प्रोक्षणपूर्वक यथाशास्त्र मारून तिच्या मांसानें आपलें दुष्पूर उदर भरलें, आणि राहिलेलें मांस घेऊन ते गुरूकडे आले. प्रणाम करून त्यांनीं सर्व वृत्तांत जेव्हां त्याला सांगितला, तेव्हां त्यांच्या सत्य भाषणानें प्रसन्न झालेल्या गुरूनें त्यांचा अपराध सहन करून क्षमा केली. पुढें दुष्काळामुळें अन्नाभावीं ते सातही जण मरण पावून त्या सत्याच्या प्रभावानें जातिस्मर झाले. सारांश हे देवि, याप्रमाणें शुद्धसंकल्परूपी जलानें शिंपलेलें थोडेंसेंही पुण्यबीज निर्विघ्नपणें उगवून त्याला अवश्य

§ अचिन्त्यं हि फलं सूते सद्यः सुकृतपादपः ।

* सत्यं सम्यक्कृतोऽल्पोऽपि धर्मो भूरिफलो भवेत् ॥

शुभ फलें लागतात.* पण याच्या विरुद्ध आचरण केल्यास विरुद्ध फल मिळतें. आतां विपरीत फल कसें मिळतें त्याविषयीं एक कथा सांगतों.—

### ५. ब्राह्मण व चांडाल यांची कथा.

पूर्वीं कोणी एक ब्राह्मण व चांडाल असे दोघे गंगेच्या तीरीं उपवास-व्रत धरून तप करीत होते. एकदां क्षुधेनें अतिशय पिडित झालेला मूढ ब्राह्मण, मत्स्यांस धरून खाणाऱ्या कोळ्यांस पाहून म्हणाला,–" अरे हे दुष्ट कोळी या जगांत धन्य आहेत; कारण ते आपल्या इच्छेप्रमाणें माशांचें मांस खातात."–त्याच वेळीं तो चांडालही म्हणाला,–" या दुष्टांना धिक्कार असो. हे हिंसक व्यर्थ प्राणिघात करीत असतात. यांचें तोंडही मला पहावयास नको "–असें म्हणून व डोळे झांकून तो आत्म्याकडे दृष्टि लावून बसला. पुढें उपवासामुळेंच ते दोघेही तपस्वी मरण पावले. त्यांतील ब्राह्मणाच्या शरीराला कुत्रीं व कोल्हे यांनीं खाल्लें, व चांडालाचें शरीर गंगाजलांत सडून गेलें. पुढें तो अतृप्त ब्राह्मण कोळ्यांच्याच जातींत जन्माला आला. त्याला तीर्थ प्रभावामुळें पूर्वजन्माचें स्मरण मात्र होतें; पण चांडाल त्याच गंगातीरावरील राजाच्या येथें उत्पन्न झाला. त्यालाही जातिस्मरण होतें. तो केव्हांही अतृप्त झाला नाहीं. तात्पर्य संकल्पदोषामुळें एक कोळी होऊन पश्चात्ताप करूं लागला, व दुसरा राजा होऊन आनंदित झाला. धर्मवृक्षाचें मूळ मन आहे. तें शुद्ध असल्यास शुद्ध फल मिळतें व अशुद्ध असल्यास अशुद्ध फल मिळतें.§

### ६. दोघां ब्राह्मणमित्रांची कथा.

राजा कलिंगदत्त आपल्या तारादत्त राणीस असें सांगून पुनः म्हणाला, " देवि, अवन्तिदेशांत उज्जयिनी म्हणून एक नगरी आहे. तेथें अमर-सिंह राजा होता. तो बाहुवीर्य व अस्त्रविद्या यांत फारच कुशल होता; पण देशांत आपल्याशीं सामना करणारा कोणी नाहीं, असें जाणून तो संतप्त होत असे. तेव्हां एकदां त्याचा आशय जाणणारा महामंत्री अमर-

* इत्थं फलति शुद्धेन सिक्तसंकल्पवारिणा ।
पुण्यबीजमपि स्वल्पं ...............॥

§ इति धर्मतरोर्मूलमशुद्धं यस्य मानसम् ।
शुद्धं यस्य च तद्रूपं फलं तस्य न संशयः ॥

गुप्त एकांतांत त्याला म्हणाला,–" प्रभो, आपल्याला समबल प्रतिस्पर्धी नाहीं, म्हणून आपण सतत खिन्न होत असतां असें मी ऐकलें; पण आपल्यासारख्यांना हें शोभत नाहीं. असें माझ्या अल्पमतीस वाटतें; कारण अत्यंत बलशाली वीरही पुष्कळदां पराभूत होत असतात. यास्तव अहंकार सोडून कोणी शत्रु नाहीं; यांतच समाधान मानून रहावें हें चांगलें. आतां आपल्याला शस्त्रशिक्षानैपुण्यच दाखवावयाचें असेल, तर अरण्यांत जाऊन मृगया करावी. व्यायामादिकांकरितां राजांना ती अवश्य केली पाहिजे. मृगयेंत श्रम सहन करण्याचा अभ्यास होतो. ज्यांना श्रमांची संवय नसते, ते युद्धादि श्रमसाध्य कार्यें करण्यास समर्थ होत नाहींत. शिवाय जंगली हिंस्र पशू पृथ्वीस जनशून्य करण्याची इच्छा करीत असतात, यास्तव त्यांना मारण्याकरितांही मृगया अवश्य केली पाहिजे. पण तिचें व्यसन लावून घेणें चांगलें नव्हे; कारण त्यामुळें आजवर पुष्कळ राजे नाश पावले आहेत."—

राजा विक्रमसिंहानें मंत्र्याचा हा हितोपदेश मान्य केला, व दुसऱ्याच दिवशीं तो मोठ्या चतुरंग सैन्यासह सज्ज होऊन मृगया करण्याकरितां नगरातून निघाला. तेव्हां मार्गामध्यें एका देवळांत दोन पुरुष कांहीं विचार करीत बसले आहेत, असें त्याला आढळलें. पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करून तो तसाच पुढें गेला. दिवसभर अरण्यांत फिरून व पशूंच्या मागें पळतां पळतां थकून, संध्याकाळीं तो परत यावयास निघाला. पण येतांनाही त्यानें त्या शून्य देवळांत त्या दोघांना पाहिलें. तेव्हां तो मनांत म्हणाला,–" हे कोण असावेत बरें ? व हे अशा निर्जन जागीं इतका वेळ बसून काय करीत आहेत ? मला वाटतें कीं, हे कोणा राजाचे गुप्त हेर असावेत."–असा विचार करून त्यानें त्यांना आपल्या नगरांत नेऊन प्रतिबंधांत ठेवावयास सांगितलें. दुसऱ्या दिवशीं त्यांना राजसभेंत बोलावून राजानें 'तुम्ही कोण, काय संकेत करीत होतां तें खरें सांगा!' भिऊं नका; असें सांगितलें तेव्हां, राजाच्या अभयदानानें निर्भय झालेला त्यांतील एक म्हणाला,–" देव ऐका,"—

या नगरांत एक करभक नामक ब्राह्मण होता. त्यानें सुपुत्राच्या इच्छेनें अग्नीची उपासना केली असतां त्याला मी झालों. दुर्दैवामुळें माझ्या बालपणींच माझा बाप मेला व आई सती गेली. त्याकारणानें मी अनाथ

झालों. विद्यारसाचा स्वाद घ्यावयास मला कोणींही शिकविलें नाहीं. त्यामुळें आपला धर्म सोडून मी द्यूतविद्या व शस्त्रविद्या यांमध्यें निष्णात झालों; कारण गुरूचें शासन न मिळाल्यास बालपण उच्छृंखल झाल्यावांचून कसें राहील ?* इतक्यांत माझ्या तारुण्यासही आरंभ झाला. तेव्हां एकदां मी बाणांचा नेम मारण्याचा अभ्यास करण्याकरितां अरण्यांत जात असतांना, मी ज्या मार्गानें नगरांतून बाहेर पडत होतों, त्याच मार्गानें कोणीएक रमणी शिबिकेंत बसून सख्यांसह बाहेर जावयास निघाली; तिच्या बरोबर पुष्कळ पुरुषही होते. त्यांत तिचा पति सुद्धां होता. पण एकमत्त हत्ती साखळदंड तोडून कोठूनसा आला, व तो त्या रमणीच्या अंगावरच त्वेषानें चालला. तेव्हां त्या भयंकर पशूस पाहून भयभीत झालेले तिचे अनुचर व पतीही पळून गेला. क्लीबांप्रमाणें जीव घेऊन पळणाऱ्या त्या मूर्खांची मला जरी कींव आली होती, तरी त्या भित-ऱ्यांनीं त्या सुंदरीला वांचविण्याचा कांहींच उपाय योजला नाहीं असें पाहून, मला मोठा रागही आला. मी त्या अबलेला त्या संकटांतून सोडविण्याचा निश्चय केला; कारण आपत्तींत पडलेल्या जीवांचें रक्षण ज्यांच्या योगानें करतां येत नाहीं, त्या प्राणांना व पौरुषाला नुस्तें बाळगून काय करावयाचें आहे ?† असा विचार करून मी मोठ्यानें ओरडत त्या दुष्ट हत्तीच्या अंगावर धांवलों. तेव्हां तो गजही तिला सोडून माझ्या मागें लागला. ती भ्यालेली स्त्रीही आमची पळापळ पहातच होती. मी पळतां पळतां आपल्या मागून त्याला फार दूर नेलें. इतक्यांत नुस्तीच मोडून पडलेली व ताज्या दाट पानांनीं आच्छादित झालेली एक झाडाची डहाळी मला दिसली. तेव्हां मी तिच्या आड उभा राहिलों. तो मागोमाग चिडून आलेला हत्तीही त्या शाखेला मोडून टाकण्याच्या नादांत गुंतला. तेव्हां ती संधि साधून त्या गजेंद्राच्या दृष्टीस न पडतां त्या सुंदरीजवळ परत आलों. व भयविह्वल झालेल्या तिला कुशल प्रश्न केला. सुरक्षितपणें परत आलेल्या मला पहातांच जिच्या मनाला पुष्कळ समाधान वाटलें आहे, अशी ती लज्जित होऊन म्हणाली, "सत्पुरुषा, माझें कुशल राहूंदे; पण माझें रक्षण करावयास सज्ज झालेल्या तुला कांहीं त्रास झाला नाहीं, हेंच मोठें मगल

* कस्य नोच्छृंखलं बाल्यं गुरुशासनवर्जितम् ।

† आपन्नत्राणविकलैः किं प्राणैः पौरुषेण वा ।

मी समजतें. ज्याच्यामध्यें आपल्या स्त्रीचें रक्षण करण्याचेंही सामर्थ्य नाहीं, अशा भित्र्या पुरुषाला माझें दान करून पित्यानें माझ्या जन्माचा नाश केला आहे, पण मी आतां त्याला भर्ताच समजत नाहीं. आपल्या प्राणांकडेही न पहातां रक्षिलेल्या या माझ्या शरीराचा धनी तूंच आहेस. तो पहा माझा भितरा पति आपल्या भीरु अनुयायींसह परत येत आहे; पण तूं आमच्याच मागून हळू हळू चल. अवसर मिळाला म्हणजे आपण दोघें कोठेंतरी निघून जाऊं."-असें सांगून तिनें मला थोडेसें फराळाचे पदार्थ दिले. व त्यावरच कसा तरी निर्वाह करून मी तिच्याकरितां, थोड्याच वेळांत तिला येऊन भेटलेल्या सानुचर पतीच्या मागून हळू हळू चाललों. सुरूप व आपण होऊन प्राप्त झालेल्याही परस्त्रीला घेऊन काय करावयाचें आहे; हा विचार तरुणांच्या अशिक्षित मनांत उद्भवत नाहीं.* हत्तीनें आक्रमण केल्यामुळें ( अंगावर पाय दिल्यामुळें ) माझें सर्व अंग अतिशय दुखत आहे, असा बहाणा करून तिनें पतीला, आपल्या अंगास स्पर्शही करूं दिला नाहीं. कांहीं वेळानें आम्हीं सर्व लोहनगरास पोंचलों. तेव्हां त्या सुंदरीसह ते सर्व तिच्या पतिगृहीं गेले व मी गांवाबाहेर एका देवालयांत राहून तो दिवस कसा तरी घालविला.

संध्याकाळीं हा ब्राह्मण ( माझा मित्र ) तेथें आला. त्याची माझी मागची ओळख जरी नव्हती, तरी एकमेकांस पहातांच आमच्या मनांत परस्परांविषयीं प्रेम व विश्वास उद्भवला. चित्त, प्राण्यांचें जन्मान्तरार्जित प्रेम जाणतें.‡ मी त्याला आपलें सर्व रहस्य सांगितलें. तेव्हां तत्काल तो म्हणाला,—"मित्रा, तूं स्वस्थ रहा. ज्याकरितां तूं येथें आला आहेस, त्या कार्याची सिद्धि होईल असा उपाय मला सुचला आहे. तुझ्या प्रियेची नणंद माझी प्रिया असून तीही तुझ्या प्रियेप्रमाणेंच मजबरोबर पाहिजे तेथें येण्यास तयार आहे. तिच्या द्वारा मी तुझेंही काम साधीन."—असें सांगून त्यानें तत्काल तिच्यापाशीं जाऊन ती सर्व गुप्त गोष्ट सांगितली. तेव्हां त्या चतुर स्त्रीनें दुसऱ्याच दिवशीं आपल्या भावजयीला पुरुषवेष

---

* सुरूपाप्यर्पितात्माऽपि परस्त्रीयं किमेतया ।
इति धैर्यस्य मार्गोऽयं न तारुण्यस्य संगिनः ॥

‡ चित्तं जानाति जन्तूनां प्रेम जन्मान्तरार्जितम् ।

देऊन, त्या देवालयांत आणिलें व माझ्या मित्राला आपल्या भावजयीचा वेष देऊन नगरांत नेलें. मी त्या पुरुषवेष धारण करणाऱ्या प्रियेला बरोबर घेऊन तत्काल उज्जयिनीस यावयास निघालों. तिची नणंद त्या रात्रीं आपल्या भावाच्या येथें राहून माझ्या मित्रासह दुसऱ्याच दिवशीं, ठरल्याप्रमाणें मला येऊन मिळाली. राजन्, याप्रमाणें आम्ही दोघे दोन तरुणींस घेऊन येथें आलों, व लोकभयानें त्या निर्जन देवालयांत राहिलों. पण आतां यांचा योगक्षेम कसा चालवावा या विचारांत आम्हीं कालचा सर्व दिवस घालविला; कारण साहस अथवा लोकांत निंद्य मानलेलें कर्म केल्यावर चित्त निर्भय कसें रहाणार ?* असो; याप्रमाणें विचार करीत असलेल्या आम्हांला राजपुरुषांनीं आपल्या आज्ञेनेंच काल येथें धरून आणिलें. हा आमचा खरा वृत्तांत आहे. आतां आपल्याला वाटेल तें करा."

तें ऐकून राजा विक्रमसिंह म्हणाला,-" मी तुम्हांवर प्रसन्न झालों आहें. तुम्हीं निर्भय होऊन या नगरींत रहा. तुमचा संसार तूर्त सुरळीत चालावा म्हणून मी तुम्हांस धन देतों." असें सांगून व बरेंच द्रव्य देऊन राजानें निरोप दिला असतां, ते दोघे प्रियांसह उज्जयिनीस सुखानें राहूं लागले. हे देवि, सत्य ही एक मोठी शक्ति आहे. सत्य व निश्चय यांच्या योगानें पाहिजे तें कार्य करितां येतें. बुद्धिमान् व साहसी लोकांवर राजे सदा प्रसन्न होतात. कर्मबलानेंच सर्व शुभाशुभ होतें, हाच संसारधर्म आहे. यास्तव स्वप्नांत-स्वर्गीय तेज आपल्या उदरांत शिरलें असें जें तूं पाहिलेंस, त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कोणी देवांश कर्मवशात् भूतलीं येऊन जन्म घेण्याकरितां तुझ्या उदरांत प्रविष्ट झाला आहे, असें मला वाटतें." राजाचें हें प्रिय भाषण ऐकून राणी तारादत्ता संतुष्ट झाली.

## तरंग २ रा.

### १. कलिंगसेनेचा जन्म.

त्यानंतर तक्षशिलेमध्यें असलेल्या तारादत्तेचा गर्भ हळूहळू वाढूं लागला. दहाव्या महिन्यांत त्या राजपत्नीला एक दिव्यरूपवती कन्या झाली. पण

* कस्याश्वसिति चेतो हि विहितस्वैरसाहसम् ।

तसल्या कन्यारत्नाला पाहूनही, तसाच पुत्र होईल, ही फार दिवसांची आशा विफल झाल्यामुळें राजा खिन्न झाला. कारण-शोकाचें साक्षात् मूळच अशी कन्या कोठें व मूर्तिमान् आनंदच असा पुत्र कोठें ?-* असा विचार त्याच्या मनांत वारंवार येऊं लागला. एकदां चित्तविनोदाकरितां तो खिन्न झालेला राजा आपल्या घरून निघून एका जैनमठांत गेला. तेथें एका बाजूस पुष्कळ लोकांमध्यें बसलेला एक धर्मोपदेशक भिक्षु, लोकांस पुढील उपदेश करीत आहे, असें त्यानें ऐकिलें.

'द्रव्यप्रदान हेंच लोकांमध्यें फार मोठें तप मानिलें आहे अर्थद प्राणदच आहे, असें म्हणतात; कारण प्राण अर्थामध्यें गढलेले असतात. करुणाप्रधान बुद्धानें दुसऱ्याकरितां आपला आत्माही तृणासारखा देऊन टाकिला; मग क्षुद्र अर्थाची कथा काय ? असल्या अलौकिक धैर्यानें व तपानेंच त्या निःस्पृह पुरुषाला दिव्य ज्ञान झालें व तो बुद्ध झाला. यास्तव आपल्यालाही यथार्थ ज्ञानाकरितां शरीरापर्यंत सर्व इष्ट विषयांविषयीं निराश होऊन प्राणिहित केलें पाहिजे. याविषयीं मी एक कथा सांगतों, ती ऐका.'

## २. सात कुमारिकांचें वृत्त.

पूर्वी एका कृतनामक राजाला क्रमानें सात मुली झाल्या. त्या मोठ्या भाग्यवती होत्या; पण वैराग्यामुळें त्यांनीं लहानपणींच पित्याचें घर सोडून श्मशानाचा आश्रय केला. पुढें त्यांच्या संबंधीं लोकांनीं त्यांस असें करण्याचें कारण विचारिलें असतां त्या म्हणाल्या,-" हें विश्व असार आहे. त्यांतून या शरीराविषयीं तर कांहीं विचारूंच नका. इष्टजन-संयोग, त्यामुळें होणारें सुख, इष्टजन-वियोग, त्यामुळें होणारें दुःख, इत्यादि तर शुद्ध स्वप्नभ्रम आहे. या संसारांत परहित हेंच एक सार आहे. यास्तव या शरीरानें आम्हीं प्राण्यांचें हित करणार. आम्हीं याला जिवंत असतानांच श्मशानांत मांसभक्षकांच्या उपयोगाकरितां टाकून देतों; कारण किती सांभाळलें तरी शेवटीं अवश्य मरणाऱ्या या सुंदर शरीराचा लोभ धरून काय करावयाचें आहे ?"

## ३. विरक्त राजपुत्राची कथा.

पूर्वी कोणी एक विरक्त राजपुत्र होता. सुंदर व तरुण असतांनाही त्यानें संन्यास घेतला. एकदां तो भिक्षु एका वैश्याच्या घरीं गेला. तेव्हां

* शोककन्दः क्व कन्या हि क्वानन्दः कायवान् सुतः ।

त्याच्या तरुण पत्नीनें त्याला पाहिलें. त्याबरोबर तिचें मन त्याच्यावर गेलें व ती म्हणाली,-"अशी सुंदर आकृति असतांना तूं अशा उपभोगक्षम वयांत हें कष्टकर व्रत कां धरिलेंस ? तुझा हा नेत्र जिला पहातो ती स्त्री धन्य होय"-तिच्या तोंडांतून निघालेले हे शब्द ऐकतांच त्या निःस्पृह यतीनें आपला तोच डोळा फोडून काढून तळहातावर धरिला. व म्हटलें-"माते, तूं ज्याला अतिरमणीय समजतेस तोच हा माझा नेत्र असा रक्त-मांसाचा आहे. तो तुला आवडत असला तर घे. माझ्या शरीरांतील सर्व भाग असेच रक्तमांसमय आहेत. त्यांतील तुला कोणता हवा तो सांग.-"

हें त्याचें वचन ऐकून ती वैश्यवधू दुःखानें म्हणाली,-"अरेरे, म्यां पापिणीनें हें काय घोर पाप केलें ! माझ्या दुष्ट वासनेमुळें यानें आपला नेत्र ओढून काढला !"- असें बोलत असलेल्या तिला तो यति म्हणाला,-"आई तूं दुःखी होऊं नकोस. वस्तुतः तूं मजवर मोठे उपकार केले आहेस. याविषयीं मी तुला एक दृष्टांत सांगतों. तो ऐक.-

## ४. तपस्वी व राजा यांची कथा.

पूर्वी गंगातीरीं एका उपवनांत एक अति विरक्त यति रहात असे. तो तेथें बसून तप करीत असतांना दैवत-राजा तेथेंच विहार करण्याकरितां स्त्रियांसह आला. कांहींवेळ विहार करून व मद्यपानानें मत्त होऊन राजा निजला. तेव्हां त्याच्या राण्या स्वाभाविक चापल्यामुळें त्या उद्यानांत भ्रमण करूं लागल्या. तेव्हां त्या उपवनाच्या एका कोपऱ्यांत समाधि लावून बसलेल्या त्या यतीला पाहून व हा काय चमत्कार आहे, असें म्हणून त्या सर्व जणी त्याच्या सभोंवार उभ्या राहिल्या. पण निजून उठल्यावर पुष्कळ वेळ त्या तेथेंच आहेत, असें पाहून रागावलेल्या राजानें त्या मुनीवर खड्गाचे प्रहार केले; कारण ऐश्वर्य, ईर्ष्या, निर्दयता, मत्तत्व, व अविवेकिता यांतील एकेकही जर काय हवें तें करूं शकतें, तर हे पांची अग्नी जेथें असतात त्याविषयीं काय बोलावें !* असो; असें निर्दयपणाचें व मूर्खपणाचें आचरण करून राजा निघून गेला कसतां, अंग छिन्नभिन्न

* ऐश्वर्यमीर्ष्या नैर्घृण्यं क्षीबत्वं निर्विवेकिता ।
एकैकं किं न यत्कुर्यात्पञ्चाग्नित्वे तु का कथा ॥

झालें असतांही याला कोप किंवा दुःख मुळींच होत नाहीं, असें पाहून विस्मित झालेली कोणी एक देवता प्रकट होऊन त्याला म्हणाली,–"सत्पुरुषा, या पापी राजानें क्रोधवश होऊन तुला अशी असह्य पीडा दिली आहे; पण तुझी इच्छा असल्यास मी स्वशक्तीनें त्याला दंड करितें."

तें ऐकतांच तो ऋषि म्हणाला–छे, छेः, देवि असें मनांतही आणूं नकोस, कारण त्या राजानें माझें कांहीं अप्रिय केलें नाहीं. उलट त्यानें मला धर्मामध्यें मोठें सहाय केलें आहे. भगवति, त्याच्या प्रसादानेंच मला क्षमा–धर्माचा लाभ झाला आहे. कारण त्यानें जर कृपाकरून मला अशी पीडा दिली नसती, तर मी क्षमा कोणाला केली असती ? या नश्वर शरीराकरितां क्रोध काय करायचा आहे. प्रिय व अप्रिय यांची प्राप्ति झाली असतां, क्रमानें हर्ष व शोक न करितां दोन्ही प्रसंगीं, समचित्तवृत्ति ठेवणारा पुरुषच क्षमा करूं शकतो. व क्षमा हेंच ब्रह्मपद आहे.§

हें त्याचें उदात्त भाषण ऐकून व त्याचें तप पाहून संतुष्ट झालेली देवता त्याचें शरीर पूर्वीप्रमाणें अक्षत करून गुप्त झाली.

यास्तव, हे साध्वि, त्या ऋषीनें राजाला जसें उपकारी मानलें तसेंच मीही तुला, मजवर मोठे उपकार करणारी, समजत आहें; कारण आतां पुनः माझ्या कुरूप तोंडाकडे पाहून कोणी स्त्री कामवश होणार नाहीं. असें अतिशय नम्र झालेल्या त्या वैश्यस्त्रीस सांगून तो आपल्या रम्य शरीरावरही आस्था न ठेवणारा भिक्षु, सिद्धि मिळविण्याकरितां दूर कोठें निघून गेला. तात्पर्य; अतिसुकुमार व रम्य, पण क्षणभंगुर शरीरावर आस्था न ठेवितां त्याच्या योगानें प्राण्यावर उपकार करणें हेंच एक कार्य साधून घेणें उचित आहे.* आम्हीही याच विचारानें स्वाभाविक सुखाचें जणुं काय घरच, अशा या स्मशानांत प्राण्यांकरितां आपलीं शरीरें टाकितों. असें आपल्या आप्तवर्गास सांगून त्या सात कन्यांनीं बोलल्याप्रमाणें वागून परम सिद्धि मिळविली. सारांश, अहो श्रोत्यांनो; बुद्धिमान् आपल्या शरीरावरही ममत्व ठेवीत नाहींत; मग स्त्री, पुत्र इत्यादि परिग्रहरूपी केरावर ते ममत्व कसें ठेवणार !'

---

§ क्षमा हि ब्रह्मणः पदम् ।

* तस्माद्बालेऽपि रम्येऽपि कः काये गत्वरे ग्रहः ।
सत्त्वोपकारस्त्वेतस्मादेकः प्राज्ञस्य शस्यते ॥

त्या मठांत चाललेला धर्मपालकाचा अशा प्रकारचा उपदेश ऐकून, व तेथेंच सर्व दिवस घालवून राजा कलिंगदत्त स्वगृहीं गेला; पण आपला राजा, कन्या झाली म्हणून अतिशय कष्टी झाला आहे, असें पाहून त्याच्या पदरचा एक वृद्ध ब्राह्मण त्याला म्हणाला,–" महाराज, कन्यारत्न झालें म्हणून आपण इतके खिन्न कां होतां? कन्या तर पुत्रांहूनही उत्तम, व इहपरलोकीं कल्याण करणारी आहे. पुत्र राज्याच्या लोभानें पित्याशींही विरोध करितात. कुंतिभोजप्रभृति राजे कुंतीसारख्या कन्यांच्या गुणांनींच, कोपी दुर्वासप्रभृति मुनींच्या तिरस्कारापासून मुक्त झाले आहेत. कन्यादानापासून मिळणारें फल, पुत्रांच्या योगानें कधीं तरी मिळणें शक्य आहे काय? याविषयीं मी एक सुलोचनेची कथा सांगतों ती ऐका.—

## ५. सुलोचनेची कथा.

चित्रकूटपर्वतावर सुषेण नांवाचा एक तरुण राजा होता. ब्रह्मदेवानें कामदेवास जाळणाऱ्या शंकरावर रागावूनच जणुं काय त्याला निर्माण केलें होतें. त्या राजानें चित्रकूट महागिरीच्या पायथ्याशीं एक दिव्य आराम ( बाग ) निर्माण केला होता. त्याच्याकडे पाहून देवांनाही नंदनवनांतील वास तुच्छ वाटत असे. त्यानें त्या उपवनाच्या मध्यभागीं प्रफुल्लित कमलांनीं युक्त अशी एक वापी केली होती. खरोखर लक्ष्मीच्या हातांतील लीलापद्मांची ती जणुं काय खाणच होती. तिला रत्नांच्या पायऱ्या बांधल्या होत्या; पण अनुरूप पत्नी न मिळाल्यामुळें तो राजा त्या वापीच्या तीरीं एकटाच रहात असे. एकदां रंभा इंद्राच्या घरून निघून आपल्या घरीं त्याच मार्गानें जात असतांना उद्यानांत विहार करीत असलेल्या त्याच्याकडे तिची दृष्टि गेली. तेव्हां तिला तो राजा प्रफुल्लित पुष्पोपवनामध्यें असलेल्या साक्षात् वसंताप्रमाणें दिसला. तेव्हां त्याच्याविषयीं ती अप्सरा असे तर्क करूं लागली कीं,–वापींतील कमलांकरितां स्वर्गांतून खालीं पडलेल्या चंद्रश्रीच्या मागोमाग पडलेला हा चंद्र तर नव्हे! पण छे; चंद्राची श्री क्षय पावणारी असते व याची अक्षय आहे. तेव्हां खचित पुष्पांची इच्छा करणारा हा पुष्पबाण ( मदन ) च येथें आला आहे. पण याची सहचारिणी रति कोठें गेली? इत्यादि नाना तर्क करून ती उत्सुक झालेली अप्सरा आकाशांतून खालीं उतरली व मानुषीच्या रूपानें त्याच्याकडे येऊं लागली. तेव्हां अकस्मात्

आलेल्या तिला पाहून, विस्मित झालेला राजा मनांत म्हणाला,–" अरे, ही कोण ? हिची आकृति तर कल्पनातीत आहे. पण ही मानुषी तर खचित नव्हे; कारण हिचे पाय धुळीनें भरलेले नाहींत. शिवाय मनुष्यांप्रमाणें हिचे नेत्रही निमिषोन्मेष करीत नाहींत. तेव्हां ही कोणी तरी दिव्य स्त्री असून ती स्वर्गांतून खालीं उतरली असावी. पण आपण हिला कांहीं प्रश्न करूं नये. कारण त्यामुळें ही कदाचित् पळून जाईल. दिव्य स्त्रिया कांहीं कारणानेंच भेटत असतात, यास्तव त्यांचें मन दुखविणें मुळींच इष्ट नाहीं,"–तो असें चिंतन करीत आहे, तों ती सुंदरी अगदीं जवळ आली. त्यांचें परस्पर संभाषण झालें. थोड्या अवकाशांत राजाला त्या अलौकिक स्त्रीचें समागमसुख मिळालें. तीं दोघेंही तेथें मोठ्या आनंदानें क्रीडा करीत राहिलीं. सुषेणाच्या सहवासांत असलेल्या रंभेला स्वर्गाचेंही विस्मरण पडलें; कारण वस्तुतः जन्मभूमि रम्य नसते तर प्रेम रम्य असतें.* असो; तिचें प्रिय करण्याकरितां तिच्या यक्षिणी–सखीनें सुषेणाच्या राज्यांत सुवर्णाचे ढीग पाडले. कांहीं कालानें तिला त्या राजापासून एक सर्वोत्तम कन्या झाली, पण प्रसूत होतांच ती अप्सरा आपल्या मानुष-प्रियाला म्हणाली,–" राजन्, मला हा अशा प्रकारचा शाप झाला होता, तो आतां निवृत्त झाला; मी रंभा–अप्सरा आहें; तुला पहातांच माझें मन तुजवर गेलें. आमचा असा नियम आहे, कीं एकाद्यावर मन गेल्यास आम्हीं त्याच्याजवळ गर्भोत्पत्ति होईतों रहातों, व तो झाला कीं, आम्हीं आपल्या लोकीं जातों; यास्तव मी आतां जातें. तूं या कन्येचें रक्षण कर; हिचा विवाह झाला म्हणजे स्वर्गलोकीं आमचा पुनः समागम होईल.

इतकें सांगून परतंत्र असलेली रंभा गुप्त झाली. तेव्हां तिच्या असह्य दुःखानें व्याकुल होऊन प्राण देण्यास तयार झालेल्या राजाला, त्याचे सचिव म्हणाले,–"राजन्, आपण असे धैर्यशून्य कां होतां ! शकुंतलेला जन्म देऊन मेनका जेव्हां स्वर्गास गेली, तेव्हां विरक्त विश्वामित्रानें धैर्यानें प्रियावियोग सहन नाहींका केला ! तसाच आपणही तो सहन करा."– इत्यादि गंभीर उपदेश ऐकून राजानें कसें तरी धैर्य धरलें, व पुनरपि प्रियासमागमास कारण होणाऱ्या कन्येचा त्यानें प्रेमानें स्वीकार केला.

* रम्यं प्रेम न जन्मभूः ।

त्या सुंदर कन्येचे नेत्र फारच रमणीय होते. म्हणून सुषेणानें सुलोचना असें तिचें नांव ठेविलें. योग्यसमयीं ती उपवर झाली; व एकदां पूर्वोक्त उपवनांत विहार करीत असतांना तिला कश्यपगोत्री वत्समुनीनें पाहिलें. तोही सहज फिरणारा तरुण ब्राह्मण होता. त्यामुळें वस्तुतः तपोराशिरूप असलेलाही तो अनुरागरसश झाला, व मनांत म्हणाला,– "अहाहा! काय हो हें हिचें रमणीय व परम अद्भुत रूप! ही जर मला भार्या न मिळाली, तर माझ्या तपाचें आणखी दुसरें कोणतें फल मिळणार?" असें चिंतन करीत असलेल्या त्या धूमरहित साक्षात् अग्नी-सारख्या तरुण तपस्व्यास सुलोचनेनेंही इतक्यांत पाहिलें. तिच्याही मनांत स्नेहांकुर उद्भवला. हातांत जपाची माळ व कमंडलु घेतलेला हा शांत व रमणीय पुरुष कोण बरें असावा? असा मनांत विचार करून जणुं-काय त्याला वरण्याकरितांच त्याच्या शरीरावर नेत्रकमलांची माला फेंकीत तिनें त्या मुनीला प्रणाम केला. तेव्हां देव, दानव इत्यादिकांसही दुरु-ल्लंघ्य असलेल्या मदनाच्या आज्ञेंत रहाणाऱ्या त्यानें 'योग्य पतीस प्राप्त हो' असा तिला आशीर्वाद दिला. तो ऐकून असामान्य रूपाच्या लोभामुळें जिची लज्जा शिथिल झाली आहे, अशी ती, खालीं तोंड करून त्या श्रेष्ठ मुनीस म्हणाली,–" आपली जर इच्छा असेल व ही थट्टा नसेल तर हे देव! आपण माझ्या पित्याची याचना करा."—

तें ऐकून व तिच्या परिजनांकडून तिच्या वंशाची माहिती मिळवून, तो मुनि तिच्या सुषेणपित्याकडे गेला, व त्यानें तिच्याविषयीं प्रार्थना केली. तेव्हां राजानेंही तप व शरीर यांच्या योगानें तो अलौकिक पुरुष दिसत आहे, असें जाणून व त्याचें योग्य आतिथ्य करून म्हटलें,–"भग-वन्, ही माझी कन्या रंभेच्या ठायीं झाली आहे. हिचा विवाह झाला म्हणजे स्वर्गलोकीं माझा तिच्याशीं समागम होईल, असें तिनें येथून जातांना मला सांगितलें; पण हे महाभाग, हें घडेल कसें? तें मला सांगा."

तें ऐकून मुनिपुत्र, क्षणभर मनांत असा विचार करूं लागला,–पूर्वी मेनकेपासून उत्पन्न झालेल्या प्रमद्वरेला सर्पदंश झाला असतां, रुरूनें आपलें अर्धे आयुष्य देऊन तिला उठविलें कीं नाहीं? विश्वामित्रानें चांडाल झालेल्या त्रिशंकूला स्वर्गास धाडलें कीं नाहीं? मग तसेंच मींही आपल्या तपाचा कांहीं भाग देऊन हें कृत्य कां करूं नये? असा अगोदर

आपल्याशींच विचार करून-" राजन्, तें कांहीं फारसें जड नाहीं." असें राजास सांगितलें. नंतर तो मुनि ' हे देवतांनो, माझ्या तपोंशानें हा राजा याच शरीरानें रंभेचा समागम करण्याकरितां स्वर्गास जाऊं दे.' असें मोठ्यानें उजवा हात वर करून म्हणाला. तेव्हां लागलीच सर्व सभा ऐकत असतांना ' तथास्तु ' अशी आकाशवाणी झाली. त्याबरोबर अति सुप्रसन्न झालेल्या राजानें त्या काश्यप वत्सास सुलोचनेचें दान केलें, व तो स्वतः स्वर्गास गेला. तेथें पोंचतांच तो देव झाला, व इंद्राच्या आज्ञेनें पुनः त्या अप्सरेशीं संगत होऊन त्यानें तेथें दिव्य सुख भोगलें.

सारांश हे देव, याप्रमाणें सुषेण राजा कन्येच्या योगानें कृतार्थ झाला. तुमच्या सारख्या भाग्यवानांच्या येथें अशाच मोठ्या प्रभावसंपन्न कन्या निपजत असतात. ही आपली कन्याही अशीच कोणी मोठी देवता असून, ती शापामुळें च्युत होऊन आपल्या येथें जन्मास आली आहे, यास्तव तिच्याकरितां शोक करणें योग्य नव्हे.

## ६. कलिंगसेना व सोमप्रभा यांचा स्नेह.

अशा प्रकारची उपदेशपर कथा ऐकून राजा संतुष्ट झाला. त्यानें शोकाचा त्याग केला. व नेत्रांस आनंद देणाऱ्या अपल्या कन्येचें त्यानें कलिंगसेना असें नांव ठेवलें. नंतर ती बाला इंदुकलेप्रमाणें प्रत्यहीं वाढूं लागली. ती सख्यांबरोबर मोठाले विहार, उपवनें, नदीपुलीन इत्यादि स्थलीं फिरावयास जात असे. एकदां आकाशांतून जाणाऱ्या मयादानवाच्या सोमप्रभा कन्येनें उघड्या गच्चीवर खेळत असलेल्या हिला पाहिलें. मुनीच्या मनालाही हरण करून घेणाऱ्या तिला पाहून, विस्मित व प्रसन्न झालेली सोमप्रभा मनांत म्हणाली, कीं ही इंदुमूर्ति आहे कीं काय ? पण चंद्राची मूर्ति दिवसां अशी नसते. ही रति असेल किंवा कदाचित् काम असेल. पण छेः, तसेंही संभवत नाहीं. कारण ही अजून अल्प बालिका आहे. यास्तव शापच्युत होऊन या राजाच्या घरीं जन्मास आलेली ही कोणी दिव्य स्त्री असावी. खचित अन्य जन्मींही हिचा व माझा गाढ स्नेह असावा; कारण त्यावांचून माझें मन हिच्याविषयीं इतकें स्नेहाकुल होणें शक्य नाहीं. यास्तव हिला आपली स्वतःच सखी करणें युक्त आहे. असा विचार करून, त्या अल्प कन्येला भीति वाटूं

नये म्हणून सोमप्रभा आकाशांतून गपचूप खालीं उतरली आणि तिचा विश्वास बसेल, असें मनुष्यकन्येचें रूप घेऊन ती कलिंगसेनेजवळ हळूच गेली.

तिला पहातांच 'अग बाई, ही कोणी अद्भुत रूपवती राजकन्या माझी सखी होण्याकरितां मजजवळ आली आहे' असा मनांत विचार करून कलिंगसेनेनें मोठ्या आदरानें उठून तिला आलिंगन दिलें. आणि सखीभावानें आसनावर बसवून तिचें नांव व गोत्र विचारलें. तेव्हां 'सर्व सांगतें, एक क्षणभर धीर धर.' असें बोलून सोमप्रभेनें बोलतां बोलतां तिच्याशीं वाणीनें सख्य केलें. नंतर त्या दोघींनीं एकमेकींचा हात धरून मैत्री दृढ केली; पण इतक्यांत सोमप्रभा म्हणते, तूं राजकन्या आहेस. तुझें सख्य राजांच्या पुत्रांशीं होणेंच शक्य व उचित आहे; पण त्या सख्यांत फार क्लेश होतात, कारण तें फार दिवस टिकत नाहीं. राजांचीं मुलें थोड्या कारणानेंही रागावतात. याविषयीं मी तुला राजपुत्र व वैश्यपुत्र यांची एक कथा सांगतें.—

## ७. राजपुत्र व वैश्यपुत्र यांची कथा.

पुष्करावती नगरींत गूढसेन म्हणून राजा होता. त्याला एकच पुत्र होता. अर्थात् राजानें त्याचे फार लाड केले. त्यामुळें तो मुलगा मोठा दुर्वृत्त व मत्त झाला. तो जें कांहीं बरें-वाईट करी, तें राजाला पसंत पडे. एकदां उपवनांत फिरत असतांना त्यानें आपल्या सारख्याच वैभवानें व आकृतीनें युक्त असलेल्या एका ब्रह्मदत्त वैश्याच्या पुत्राला पाहिलें. त्याबरोबर राजपुत्रानें त्याच्याशीं आपण होऊन मैत्री केली, व त्यामुळें ते दोघे एकरूप झाले. त्यांचें प्रेम इतकें वाढलें कीं, ते एकमेकांस सोडून एक क्षणभरही राहूं शकेनात. जन्मांतरींचा परिचय तत्काल प्रेम उत्पन्न करितो.* राजपुत्र, वैश्यपुत्राला प्राप्त न झालेला कोणताही भोग कधींही घेत नसे.

पण एकदां त्या मित्राच्या पूर्वीच आपला विवाह ठरवून त्याकरितां राजपुत्र, त्याच्यासह गजावर बसून ससैन्य अहिछत्र नगरास चालला. सायंकाळीं इक्षुमतीच्या तीरावर येऊन त्यानें तळ दिला. तेथें चंद्रोदय समयीं मद्यपान करून तो शय्येवर पडला, तेव्हां त्याच्या धात्रीनें गोष्ट सांगण्या-

* आशु बध्नाति हि प्रेम प्राग्जन्मान्तरसंस्तवः ।

विषयीं त्याची प्रार्थना केली. तेव्हां तो ती सांगूं लागला; पण थकलेल्या व मत्त झालेल्या त्याला लागलीच झोंप आली. त्याची दायी व इतर सेवकही स्वस्थ निजले. एकटा वैश्यपुत्र मात्र जागत होता. त्यानें आकाशांत स्त्रियांचा आलाप ऐकला. म्हणून लक्ष्य देऊन तो ऐकूं लागला. असतां, 'हा पापी राजपुत्र, कथा पुरी न सांगतांच निजला आहे. यास्तव मी याला शाप देतें. प्रातःकाळीं हा एक हार पाहील; पण त्यानें जर तो उचलला व गळ्यांत घातला, तर हा लागलाच मरेल.' असें म्हणून एक थांबली. लागलीच दुसरी म्हणाली—पण या संकटांतून जर तो वांचला, तर त्याला एक फलांनीं ओथंबलेला आम्रवृक्ष दिसेल. त्याचीं फळें खातांच त्याचे प्राण निघून जातील. इतकें बोलून तीही थांबली असतां, तिसरी म्हणाली,—"यांतूनही वांचल्यास तो विवाहाकरितां ज्या गृहांत प्रवेश करील, तें गृहच याच्या अंगावर पडून हा मरेल."—यानंतर चवथी म्हणाली—या मृत्युद्वारांतूनही जर तो सुटला, तर रात्रीं अंतःपुरांत जातांच शंभर वेळां शिंकेल, पण त्यांतील प्रत्येक शिंकेबरोबर 'शतं जीव' असें जर कोणी म्हटलें नाहीं तर हा मृत्युवश होईल. पण ज्यानें हें आमचें म्हणणें ऐकलें आहे तो जर याच्या रक्षणाकरितां हें सर्व अगोदर त्याला सांगेल, तर त्यालाही मृत्यु ग्रासील. इतकें बोलून तीही गप्प बसली.

तेव्हां वज्रपातासारखें दारुण असलेलें तें त्यांचें भाषण ऐकून, वैश्यपुत्र राजपुत्रावरील परम स्नेहामुळें उद्विग्न झाला, आणि मनांत म्हणाला—अरेरे, कथा सांगावयास आरंभ करून ती यानें संपविली नाहीं, व त्यामुळें गुप्तरीतीनें ती ऐकावयास आलेल्या देवतांचा मनोभंग झाला. पण त्यांनींही याच्यावर दया केली नाहीं; तर उलट असे भयंकर शाप दिले. मनोभंग झाल्यावर दया कोठून उद्भवणार ? असो; पण आतां काय करूं ? राजपुत्र मेल्यावर मला तरी प्राण ठेवून काय करावयाचें आहे. मला आतां याचें रक्षण युक्तीनेंच केलें पाहिजे. माझ्या या प्राणतुल्य मित्राला हा वृत्तांतही अगोदर सांगतां कामा नये; कारण तो सांगिल्यास मला मरावें लागेल.

असा विचार करीत त्या वैश्यानें कशी तरी ती रात्र घालविली. प्रातःकाळीं त्याचा मित्र राजपुत्रही उठून, अवश्य कृत्यें केल्यावर पुढें निघाला, तों त्याला मार्गांत एक उत्तम हार दिसला. तो उचलून गळ्यात घालावा असें त्याला वाटलें. पण वैश्यपुत्र म्हणाला,—"मित्रा, तूं तो घेऊं नकोस,

हा खरा हार नव्हे ती माया आहे. नाहींतर पुढें जाणाऱ्या या तुझ्या सैनिकांस तो दिसला नसता का ?"–तें ऐकून तो त्याचा त्याग करून पुढें चालला. तेव्हां कांहीं वेळानें पिकलेल्या आंब्यांनीं लवलेला आम्रवृक्ष त्याला दिसला त्याचीं सुंदर फळें खावीं असें राजपुत्रास वाटलें; पण वैश्यपुत्रानें पुनः त्याचें निवारण केलें. तेव्हां राजपुत्र पुनः श्वशुरगृहीं गेला, व तो विवाहाकरितां तयार केलेल्या गृहांत प्रवेश करूं लागला असतां, त्याचा मित्र त्याला परतवून जों बाहेर आणीत आहे, तोंच तें गृह खालीं पडलें. दुसऱ्या मंडपांत विवाह समारंभ झाल्यावर रात्रौ तो आपल्या स्त्रीसह अंतःपुरांत गेला. वैश्यपुत्रही तेथें गुप्तपणें त्याच्या अगोदर जाऊन बसला होता. राजपुत्र शय्येवर बसतांच शंभरदां शिंकला. तेव्हां त्या लपून बसलेल्या वैश्यपुत्रानेंही 'शतं जीव' असें प्रत्येक शिंकेबरोबर हळुच म्हटलें. नंतर आपलें इष्ट कार्य झालें आहे, असें जाणून आनंदित झालेला तो सर्वांच्या समक्ष तेथून बाहेर येऊं लागला. तेव्हां राजपुत्रानें त्याला पाहिलें व तत्काल ईर्ष्यावश होऊन, त्याच्या स्नेहास विसरलेल्या त्यानें क्रोधानें 'एकांतांत असलेल्या माझ्या अंतःपुरांत हा पापात्मा शिरला आहे, यास्तव याला सकाळपर्यंत बांधून ठेवा, सकाळीं याला मी दंड करवीन.' अशी आज्ञा द्वारपालांस केली. स्त्रीमोह कसा विषारी असतो तो पहा.

त्याबरोबर सेवांध सेवकांनीं त्याला रात्रभर बांधून ठेविलें. प्रातःकाळीं राजपुत्राच्या आज्ञेनें ते त्याला वध्यभूमीकडे नेऊं लागले. तेव्हां तो म्हणाला,–'अरे बा दूतांनो, मला अगोदर राजपुत्राकडे न्या; कारण त्याला मला कांहीं सांगावयाचें आहे. नंतर तुह्मी खुशाल मारा.'

तेव्हां त्यांनीं राजपुत्राला त्याचें म्हणणें कळविलें असतां, व सचिवांनींही त्याची पुष्कळ समजूत घातली असतां, त्यानें त्याला आपल्याकडे आणावयास सांगितलें. तेव्हां वैश्यपुत्रानें त्याला रात्रीं ऐकलेला शापवृत्तांत व त्याचा साक्षात् आलेला अनुभव त्याला सांगितला. तेव्हां हार, आम्रवृक्ष घर पडणें व शिंका येणें या आकस्मिक गोष्टींवरून राजपुत्राचीही खात्री झाली. नंतर त्यानें त्याला वधापासून सोडविलें. शेवटीं मृत्यूच्या दाढेंतून सोडविलेल्या त्या मित्राबरोबर तो सुप्रसन्न झालेला राजपुत्र पत्नीसह आपल्या नगरास परत आला. त्याचाही तेथें विवाह झाला. सर्व लोक त्याच्या प्रशस्त गुणांची स्तुति करूं लागले व अशा रीतीनें तो पुढें सुख भोगूं लागला.

सारांश, हे राजकन्ये, राजांचीं मुलें अशीं उच्छृंखल असतात. तीं मत्त गजांप्रमाणें आपलें हित जाणीत नाहींत. तेव्हां हंसत प्राण घेणाऱ्या तसल्या वेताळाशीं मैत्री कशी करावी.† राजपुत्रि, तूं मात्र माझें सख्य विसरूं नकोस म्हणजे झालें.

सोमप्रभेच्या तोंडची ही कथा गच्चीवर बसून ऐकल्यावर कलिंगसेनेस मोठा आनंद वाटला. व ती मोठ्या प्रेमानें तिला म्हणाली,—"सखे, असा मित्रद्रोह करणारे ते पिशाच होत, राजपुत्र नव्हेत. याविषयीं मी एक कथा तुला सांगतें ती ऐक."

## ८. पिशाच व ब्राह्मणकन्या यांची कथा.

पूर्वी यज्ञस्थल-ग्रामांत एक ब्राह्मण होता. तो दरिद्री असल्यामुळें लांकडें आणण्याकरितां अरण्यांत गेला असतां, व तेथें कुऱ्हाडीनें एक लांकुड फोडीत असतां, त्यांतील एक बारीक ढलपी त्याच्या मांडींत शिरली. त्याबरोबर त्यांतून रक्त वहावयास लागलेलें पाहून, तो सात्त्विक ब्राह्मण मूर्च्छित होऊन पडला. इतक्यांत त्याच्या ओळखीच्या एका मनुष्यानें त्याला पाहिलें व उचलून घरीं आणिलें. पतीची ती अवस्था पाहून अतिशय व्याकुल झालेल्या त्याच्या पत्नीनें मांडी धुवून व त्याला सावध करून जखमेवर पट्टी बांधिली; पण औषधोपचार चालले असतांनाही त्याचा तो व्रण अधिकाधिक खोल जाऊं लागला. व शेवटीं तर तो नाडीव्रण होऊन बसला. तेव्हां त्या दुःखानें व्याकुल झालेला तो दीन ब्राह्मण, मरावयास तयार झाला असतां त्याचा एक ब्राह्मण-मित्र, त्याच्याजवळ येऊन एकांतांत त्याला म्हणाला,—"माझा यज्ञदत्त मित्र पुष्कळ दिवस दरिद्री होता. पण तो पिशाच साधन करून व त्याच्यापासून पुष्कळ धन मिळवून आतां सुखी होऊन राहिला आहे. त्यानें तें साधन मलाही सांगितलें आहे. तूंही तें करून पिशाच वश करून घे. म्हणजे तें तुझ्या या व्रणास तत्काल भरून काढील." असें सांगून व मंत्र शिकवून तो पुनः त्यास म्हणाला,—"मित्रा, तूं चवथ्याप्रहरीं उठून, केंस मोकळे सोडून, दिगंबर होऊन, आचमन न करितां, दोन हातांत दोन मुठी

† राजपुत्रा न मन्यन्ते हितं मत्तगजा इव ।
वैतालैस्तैश्च का मैत्री ये विहस्य हरन्त्यसून ॥

तांदुळ घेऊन, मंत्राचा जप करीत चवाठ्यावर जा. तेथें ते तांदुळ ठेवून कांहीं न बोलतां व मागेंही न पहातां तूं परत ये. पिशाच प्रत्यक्ष दिसेपर्यंत तूं असें कर. 'मी आपणच तुझी व्याधि नाहींशी करीन.' असें तें तुला सांगेल. तूं त्याचें अभिनंदन कर. म्हणजे तुझा हा रोग नाहींसा होईल."

मित्राचें तें म्हणणें ऐकून त्या आर्त ब्राह्मणानेंही तें साधन केलें. त्याला पिशाच साध्य झालें. त्यानें हिमालयावरून दिव्य औषधी आणून त्याची जखम भरून काढली; पण त्यामुळें आनंदित झालेल्या त्या ब्राह्मणास तो राक्षस म्हणाला,-"मला बरा करावयास दुसरा व्रण दे. नाहीं तर मी तुजवर अनर्थ कोसळेल असें करीन, अथवा तुझ्या शरीराचा नाश करीन."

हृ त्याचें भयंकर भाषण ऐकून ब्राह्मण भयभीत झाला व तेवढ्या वेळे पुरते तरी प्राण वांचविण्याकरितां त्यानें 'सात दिवसांत मी तुला दुसरा व्रण देईन' असें सांगून सात दिवसांची मुदत मागून घेतली. व 'बरें आहे' असें म्हणून पिशाचानें सोडलें असतां, तो दीन ब्राह्मण आपल्या जीविताविषयीं निराश होऊन घरीं परत आला.

इतकें सांगून पुढचें अश्लील आख्यान सांगावयाची लाज वाटल्यामुळें कलिंगसेना जराशी थांबली. 'पण येथें आपण सर्व सख्या आहोंत दुसरें कोणी नाहीं; मग लाजतेस कशाला? पुढें काय झालें तें सांग.' असा सोमप्रभेनें आग्रह केला. तेव्हां ती म्हणाली-"नंतर दुसरा व्रण न मिळाल्यामुळें खिन्न झालेल्या त्या आपल्या बापास पाहून व खेदाचें कारण विचारून त्याची विधवा कन्या "बाबा, मी त्या पिशाचास फसवितें. तुम्हीं जाऊन माझ्या कन्येचा नाडीव्रण तूं बरा कर, असें त्याला सांगा" असें त्याला म्हणाली. ब्राह्मणानेंही तसेंच केलें व त्याच्या सांगण्यावरून तो आपल्या कन्येला त्याच्याकडे घेऊन गेला. तिनें पित्याचे प्राण वांचविण्याकरितां क्षणभर लज्जा सोडून, त्याला आपलें वरांग दाखवून 'हा माझा व्रण बरा कर' असें म्हटलें. मूर्ख पिशाचानेंही त्याच्यावर औषधींचे अनेक लेप लाविले. पण ईश्वराच्या नियमाप्रमाणें तो व्रण भरून आला नाहीं. तेव्हां आपला पराभव झाला आहे, असें जाणून त्या पिशाचानें तेथून पलायन केलें.

सारांश, याप्रमाणें त्या साध्वी कन्येनें आपल्या पित्याचे प्राण वांचविले. पिशाचें अशीं दुष्ट असतात. राजांचे लाडके पुत्रही पिशाचांसारखेच असतात. ते प्रसन्न झाले तरी अनर्थ ओढवतो व रुष्ट झाले तरी प्राणघात होतो. यास्तव हे सखे, त्या दोघांपासूनही मोठ्या युक्तीनेंच आपलें रक्षण केलें पाहिजे. पण कुलीन राजकन्या अशा नसतात. त्यांचा असा दुर्लौकिक कधींही कोणी ऐकलेला नाहीं. यास्तव हे सखे, तूं माझ्या मैत्रीविषयीं अशी साशंक होऊं नकोस.

याप्रमाणें साहस व चमत्कार यांनीं मधुर झालेली ती कथा कलिंगसेनेच्या तोंडून ऐकून सोमप्रभा संतुष्ट झाली. व हे सखे, माझें घर येथून साठ योजनें दूर आहे आणि हा दिवस तर मावळला. मी येथें आज पुष्कळ वेळ बसलें. यास्तव आतां येतें, मला निरोप दे.—असें म्हणून दिनकर अस्तशिखरास गेला असतां, पुनरपि असाच समागम व्हावा, अशी इच्छा करणाऱ्या तिला विचारून व आलिंगन देऊन सोमप्रभा आकाशांत उडून गेली. तो चमत्कार पाहून राजकन्येला मोठा विस्मय वाटला.

सोमप्रभेची ती अमानुप सिद्धि पाहून कलिंगसेनेच्या मनांत अनेक तर्क आले. ती आपल्या अंतःपुरांत जाऊन विचार करूं लागली कीं, ही माझी नवी सखी कोण बरें असावी ? ही कोणी सिद्धांगना आहे, कीं अप्सरा आहे, कीं विद्याधरी आहे ? आकाशमार्गानें सहज जाणारी ही कोणी दिव्य स्त्री आहे, यांत तर मुळींच संशय नाहीं. मोठ्या स्नेहामुळें दिव्य स्त्रियाही मानुषींची संगति धरितात. पृथुराजाची कन्या व अरुंधती यांचें सख्य होतें कीं नाहीं ? तिच्या संतोषाकरितां पृथूनें स्वर्गलोकाहून सुरभि कामधेनु आणली. तिचें दूध प्याल्यामुळें तो भ्रष्ट झालेला असूनही पुनः स्वर्गास गेला. तेव्हांपासून भूतलीं अव्यंग गायी निपजूं लागल्या, इत्यादि कथा प्रसिद्ध आहेत. मी धन्य आहें. माझें पुण्य फलोन्मुख झाल्यामुळेंच मला आज ही दिव्य सखी लाधली. उद्यां ती आली म्हणजे मी अगोदर तिचें नांव व कुल विचारून घेईन.—इत्यादि चिंतन करीत इकडे राजकन्येनें ती रात्र घालविली, व तिकडे सोमप्रभाही तिच्या दर्शनाविषयीं अत्यंत उत्सुक होऊन रात्रभर आपल्या घरीं राहिली.

---

# तरंग ३ रा.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच सोमप्रभा आपल्या नव्या मैत्रिणीच्या चित्तविनोदाकरितां, एका करंडींत पुष्कळ कळसूत्री लांकडी बाहुल्या भरून घेऊन, आकाशमार्गानेंच कलिंगसेनेजवळ आली. तिला पहातांच कलिंगसेनेच्या नेत्रांतून आनंदाश्रू वाहूं लागले. आलिंगन देऊन तिनें आपल्या सखीला आपल्याजवळच बसविलें, आणि म्हटलें,-" सखे, तुझ्या या मुखरूपी पूर्णचंद्राचें दर्शन न झाल्या कारणानें, मला गेली रात्र शंभर रात्रीं एवढी मोठी वाटली. तुझा व माझा जन्मांतरींचा कांहीं तरी संबंध असावा. त्यावांचून एकाएकीं इतकें प्रेम जडणें शक्य नाहीं. पण तो मला ठाऊक नाहीं, तुला माहीत असल्यास सांग."-तें ऐकून सोमप्रभा म्हणाली-सखे, पूर्वजन्माचें स्मरण नसलेल्या मलाही त्याचें ज्ञान होत नाहीं. कांहीं मुनींना मात्र पूर्वजन्मांचें स्मरण असतें, असें म्हणतात.

## १. सोमप्रभेचा वृत्तान्त.

त्यानंतर कलिंगसेना सोमप्रभेला मोठ्या विश्वासानें-तुझा पिता कोण? तूं कोणत्या वंशांत उत्पन्न झालीस ? तुझें नांव काय ? ही करंडी तूं कां आणलीस व हिच्यामध्यें काय आहे ?-इत्यादि प्रश्न करूं लागली. तेव्हां, सोमप्रभा म्हणाली,-त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेल्या मयानें असुर भाव सोडून, नारायणाच्या चरणांचा आश्रय धरिला असतां, त्या दयासागरानें त्याला अभय देऊन कृतार्थ केलें. नंतर भगवानाच्या आज्ञेनेंच त्यानें इंद्राला एक रम्य सभा करून दिली. पण दैत्यांना जेव्हां ही वार्ता कळली, तेव्हां हा देवांच्या पक्षाचा असल्यामुळें कुलकलंक आहे, असें समजून ते मयाशीं विरोध करूं लागले. सखे, प्राणांचें भय सर्वांस अधिक असतें. कदाचित् हे दुष्ट राक्षस मला जिवानिशी मारतील, या भीतीनें त्या उत्तम कारागीरानें विंध्याद्रीच्या खोऱ्यांत एक मायानगर निर्माण केलें. तें मोठ्या कुशलतेनें रचलेलें असल्यामुळें दैत्य त्यांत जाऊं शकत नाहींत. त्या मयाच्या आम्हीं दोघीजणीं कन्या. माझ्या वडील बहिणीचें नांव स्वयंप्रभा व माझें नांव सोमप्रभा. ती ब्रह्मचारिणी असून पित्याच्या येथेंच आहे. पण पित्यानें कुबेरपुत्र नलकूबराला माझें दान केलें आहे. बाबानें

मला अनेक मायायंत्रें शिकविलीं आहेत. तुझ्या विनोदाकरितां तसलीं कांहीं यंत्रें मी करंडींतून आणलीं आहेत, तीं पहा.

इतकें सांगून व करंडी उघडून ती कलिंगसेनेला अनेक चमत्कार दाखवूं लागली. खिळ्याचा प्रहार करितांच त्यांतील एक बाहुली तिच्या आज्ञेनें आकाशमार्गातून जाऊन सत्वर पुष्पमाला घेऊन आली. एकीनें यदृच्छेनें पाणी आणलें. कोणी नाचूं लागली, कोणी बोलूं लागली, इत्यादि अनेक चमत्कार दाखवून कांहीं काल तिला संतोष दिल्यावर सोमप्रभेनें त्या सर्व बाहुल्या करंडींत व्यवस्थित रीतीनें भरून ठेविल्या, व करंडी तिच्या स्वाधीन करून, पतिपराधीन असलेली ती उत्कंठित झालेल्या कलिंगसेनेला विचारून आकाशमार्गानें आपल्या मंदिरीं गेली.

राजकन्येला त्या दिवशीं आश्चर्यदर्शनामुळें क्षुधाही लागली नाहीं. आनंदित झालेल्या कलिंगसेनेनें तो दिवस कांहीं न खातां घालविला. पण तारादत्तेला जेव्हां तें कळलें, तेव्हां आपल्या लाडक्या कन्येला कांहीं पीडा होत असेल, असें जाणून तिनें आनंद–वैद्याला आणवून तिची प्रकृति दाखविली. तेव्हां परीक्षा करून–कांहीं कारणानें पुष्कळ हर्ष झाल्यामुळें हिची क्षुधा शांत झाली आहे, रोगामुळें नव्हे, हिचें प्रफुल्लित मुख व नेत्रच हिचें आरोग्य सुचवीत आहेत.–असें वैद्यानें सांगितलें. तेव्हां तारादत्तेनें आपल्या कन्येला हर्षाचें कारण विचारलें असतां, त्या निष्कपटी कन्येनेंही तिला सर्व वृत्तांत कळविला. तो ऐकून आपल्या कन्येला योग्य व स्तुत्य सखी मिळाली आहे, असें जाणून आनंदित झालेल्या राणीनें तिला उचित आहार दिला.

तिसऱ्या दिवशीं सोमप्रभा कलिंगसेनेजवळ येऊन म्हणाली,–" सखे, माझ्या तोंडून तुझ्याशीं सख्य केल्याचें वृत्त ऐकून, माझा पति अतिशय संतुष्ट झाला, व त्यानें मला तुजपाशीं रोज येण्याची आज्ञा दिली आहे. त्यामुळें मला आतां कोणाची भीति राहिली नाहीं; पण तूंही एकदां आपल्या आई-बापांची आज्ञा घेऊन ठेव. म्हणजे आपल्याला पाहिजे तेथें जातां येईल."

आपल्या प्रियसखीचें तें भाषण ऐकतांच कलिंगसेना, सोमप्रभेचा हात धरून आईबापांकडे घेऊन गेली. तिला पहातांच राजा व राणी आनंदित झाली. तिच्या उदार आकृतीकडे पाहूनच त्यांचा तिच्यावर पूर्ण विश्वास बसला. कन्येच्या तोंडून तिचें नांव, गोत्र, गुण, विद्या, प्रभाव, इत्यादि

ऐकल्यावर सोमप्रभेचा योग्य सत्कार व अभिनंदन करून, तीं दोघेंही मोठ्या प्रेमानें तिला म्हणालीं,–" वत्से, आजपासून ही आमची कलिंगसेना आम्हीं तुझ्या स्वाधीन केली आहे. तुम्ही दोघीही यथेच्छ विहार करून चित्तरंजन करा."—आईबापांची अशी अनुकूल आज्ञा मिळतांच कलिंगसेना कृतार्थ झाली. ती, करंडी घेतलेल्या सोमप्रभेसह उद्यानांत गेली. सोमप्रभेनें त्या करंडींतील एक यंत्रमय यक्ष बाहेर काढून, त्याला वर सोडलें तेव्हां एका क्षणांत आकाशमार्गानें जाऊन त्यानें मोत्यें, रत्नें सुवर्णकमलें व बुद्धाची सुंदर मूर्ति आणिली. तेव्हां सोमप्रभेनें त्या पूजासाहित्यानें बुद्धाची पूजा केली. व त्यामुळें सुगतांचें मंदिरच चमकूं लागलें.

राजाला जेव्हां तें वर्तमान कळलें, तेव्हां राणीसह येऊन व तो चमत्कार पाहून, तो फार विस्मित झाला. पण त्यानें सोमप्रभेला त्याविषयीं प्रश्न केला असतां, ती म्हणाली,–" राजन्, माझ्या पित्यानें हीं असलीं अनेक प्रकारचीं मायायंत्रें निर्मिलीं आहेत. जसें हें पंचभूतात्मक जगद्यंत्र आहे, तशींच हीं सर्व आहेत. मी आतां त्यांतील प्रत्येकाचें थोडक्यांत वर्णन करितें. यांत जें पृथ्वीप्रधान यंत्र आहे तें द्वारादिकांस बंद करितें. त्याच्या योगानें एकदां दार झांकलें म्हणजे तें दुसऱ्या कोणालाही उघडतां येत नाहीं. दुसऱ्या जलमय यंत्रानें निर्जीव आकार सजीव असल्यासारखा दिसतो. तिसऱ्या तेजोमय यंत्रापासून ज्वाला निघते. चवथ्या वायुमय यंत्राच्या योगानें पाहिजे तेथें जातां येतें. पांचवें आकाश यंत्र आलाप व्यक्त करितें. माझ्या बापापासून मला हीं यंत्रें प्राप्त झालीं आहेत. त्याच्यापाशीं अमृतरक्षक म्हणून एक यंत्र आहे; पण तें त्यानें मला दिलें नाहीं.

इतकें जों ती सांगत आहे, तों तिचें सर्व म्हणणें खरें आहे, अशी साक्षी देतच जणुंकाय मध्यान्हसमयींच्या शंखांचा ध्वनि झाला. तो ऐकतांच राजा व राणी विस्मित चित्तानें आपल्या राजमंदिरांत परत आलीं, व सोमप्रभा राजाच्या आज्ञेनें सर्व परिजनासह कलिंगसेनेला यंत्रनिर्मित विमानांत बसवून आकाशमार्गानें एका क्षणांत विंध्यपर्वतावरील आपल्या पित्याच्या घरीं घेऊन गेली. तेथें पोंचतांच असुर–कन्येनें आपल्या भगिणीला स्वयंप्रभेच्या भेटीस नेलें. कलिंगसेनेनें त्या जटाजूटयुक्त व

अक्षमाला धारण करणाऱ्या ब्रह्मचारिणीस प्रणाम केला. अगदीं शुभ्र वस्त्र नेसलेली ती प्रसन्नमुखी साध्वी तिला पार्वतीसारखी दिसली. सोमप्रभेनें प्रणाम करून राजकन्येचें नांव, गांव इत्यादि सर्व आपल्या ज्येष्ठ भगिनीला सांगितलें असतां, तिनेंही कलिंगसेनेचें उचित आतिथ्य करून त्या दोघींनांही मिष्ट फळें खावयास दिलीं. दैवाच्या योगानें कमलांची शोभा जशी पार नाहींशी होते, त्याप्रमाणें वृद्धावस्थेच्या योगानें सर्वसौंदर्याची सर्वस्वी हानि होत असते. पण हे प्रिय राजपुत्रि ! मी दिलेलीं फळें खाल्यानें तुला जराच येणार नाहीं, असें त्या साध्वीनें सांगितलें असतां, व सोमप्रभेनेंही–एवढ्यासाठींच मी तुला येथें आणिलें,–असें म्हटलें असतां, कलिंगसेनेनें तीं अमृतासारखीं गोड फळें खाल्लीं; व त्याबरोबर अमृतरसाची वृष्टि झाल्याप्रमाणें तिचें सर्व शरीर सुखी झालें. नंतर त्या मंदिराच्या समोर असलेल्या उद्यानांत विहार करण्याकरितां ती कौतुकानें गेली. त्यांत सुवर्ण–कमलयुक्त वापी, गोड फलांनीं भरलेले वृक्ष, विचित्र पंखांचे पक्षी, रत्नजडित स्तंभांचे आभास, जेथें भिंत असेल तेथें कांहीं नाहीं असा व जेथें ती नसेल तेथें मोठी थोरली भिंत आहे, असा होणारा चमत्कारिक भास, इत्यादि अनेक अपूर्व चमत्कार तिला दिसले. तेथील अद्भुत वस्तू पहाण्यांतच तिचा तो सर्व दिवस गेला. सायंकाळीं स्वयंप्रभेला विचारून सोमप्रभेनें जराशून्य झालेल्या आपल्या सखीला यंत्रांत बसविलें व आकाशमार्गानें एका क्षणांत तक्षशिलेंतील तिच्या अंतःपुरांत आणून सोडिलें; आणि प्रियसखीला घट्ट आलिंगन देऊन व उद्यां पुनः येण्याचें कबूल करून ती कुबेराची सून आपल्या घरीं परत गेली.—

अंतःपुरांत आल्यावर कलिंगसेनेनें मयासुराच्या येथें पाहिलेले अनेक चमत्कार आपल्या आईबापांस सांगितले,व ते ऐकून त्यांनाही मोठा संतोष झाला. याप्रमाणें त्या दोघी सख्यांचा स्नेह उत्तरोत्तर वृद्धि पावत असतां, एकदां सोमप्रभा कलिंगसेनेला म्हणाली,–" सखे, तुझें लग्न झालें नाहीं, तोंपर्यंत आमचें हें सख्य टिकणार; कारण लग्न झाल्यावर तूं आपल्या पतीच्या घरीं जाशील, मग तेथें माझें येणें कसें होईल ? पण मी तुला सांगतें तें विसरूं नकोस. विशेष गोष्टींचा चांगला विचार केल्यावांचून तूं पतीचा अंगीकार करूं नकोस. कारण लांडगी बकरीचें मांस

खाते, तशीच सासू सुनेला एक सारखी खात असते.* याविषयीं मी तुला कीर्तिसेनेची कथा सांगतें ती ऐक—

## २. कीर्तिसेनेची कथा.

पाटलीपुत्र नगरांतील धनपालित नामक एका श्रीमान् वैश्याची कीर्तिसेना म्हणून एक अतिसुंदर कन्या होती. तिच्या पित्यानें मगध-देशांतील आपल्या सारख्याच मोठ्या श्रीमान् वैश्याला, ती आपली प्राणा-सारखी प्रिय कन्या दिली. त्याचें नांव देवसेन असें होतें. तो स्वतः मोठा सदाचारसंपन्न होता; पण त्याची विधवा आई इतकी वाईट होती, कीं त्या देवीसारख्या व आपल्या पुत्रास अतिशय आवडणाऱ्या सुने-लाही पाहून तिच्या आंगाचा संताप होत असे. पुत्र जवळपास कोठें नाहींसा पाहून, ती त्या दीन सुनेची हवी तशी निर्भर्त्सना करी; पण ती बिचारी त्यांतील एक अक्षरही पतीला सांगावयास समर्थ होत नसे. कारण तें सासूला कळल्यास तिकडूनही ती छळावयास कमी करणार नाहीं, अशी तिला भीति वाटत होती. खरोखर नववधूंनीं कुटिल सासूंच्या आधीन रहाणें हे फार कष्टकर आहे.।

एकदां तिचा पति देवसेन आप्तजनांनीं अतिशय आग्रह केल्यामुळें, व्यापाराकरितां वलभीपुरीला जावयास तयार झाला. तेव्हां ती साध्वी आपल्या पतीला दीनवाणीनें रडत म्हणाली,—“आर्यपुत्र, इतके दिवस मी आपल्याला सांगितलें नाहीं. पण आपली माता आपण येथें असतांनाही जर मला अतिशय छळते, तर आतां आपण दूर गेल्यावर ती काय करील कोण जाणे.” प्रियेचें हें भाषण ऐकून देवसेनाचाही कंठ दाटून आला, व प्रियेला सोडून जावें असें मुळींच वाटेना; पण लोकलज्जा व द्रव्यलोभ या दोन पाशांनीं त्याला बलात्कारानें ओढल्यामुळें, तिची कशी तरी सम-जूत करून भयानें व सासूच्या जाचांत दिवस काढणाऱ्या प्रियेच्या वियोग-दुःखानें व्याकुल झालेला तो आईच्या पायांवर मस्तक ठेवून म्हणाला,—“आई, मी ही आपली कलिंगसेना तुजपाशीं ठेव ठेवून जात आहें. हिच्यावर रागावूं नकोस. प्रेम कर, ही मोठी कुलीन स्त्री आहे.”

---

* अवेर्वृकीव स्नुषायाः श्वश्रूर्मांसानि खादति ।

। कष्टा हि कुटिलश्वश्रूपरतन्त्रवधूस्थितिः ।

आपल्या पुत्राच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच आंतून अतिशय रागावलेली ती, कीर्तिसेनेला हाक मारून व तिच्याकडे डोळे वटारून पाहून देवसेनाला म्हणाली,–" वत्सा, तूंच आपल्या बायकोला विचार! मी हिला काय करितें? घरांत भेद उत्पन्न करण्याकरितां ही तुला खोटेंच कांहींतरी सांगत असेल, मला तुम्हीं दोघेंही सारखींच." हें ऐकून देवसेनाला जरा समाधान वाटलें. तिच्या भाषणांत कौटिल्य आहे, असें त्याच्या मनांतही आलें नाहीं; पण सासूची ती चलाखी पाहून कीर्तिसेनेला मात्र मनांतल्या मनांत हसूं आलें; व आपली कांहीं आतां धडगत नाहीं, असेंही वाटलें. पण त्यावेळीं मुकाट्यानें बसण्यावांचून तिला दुसरा मार्गच नव्हता. नंतर देवसेन वलभीस निघून गेला.

इकडे ती साध्वी पतीच्या विरहानें अतिशय दुःखी झालेली आहे, असें पाहून तिच्या निर्दय सासूनें तिच्या सर्व दासींना हळू हळू काढून टाकिलें; व एकदां आपल्या दासीला बरोबर घेऊन ती एकांतांत असलेल्या सुनेकडे गुप्तपणें गेली, व तिला नग्न करून आणि–'पापे माझ्या मुलाला तूं अगदीं आपलासा केलें आहेस नव्हे'–असें म्हणून तिचे केंस धरिले, व त्या दोघी राक्षसींनीं तिला चांगली तुडवून आणि नखें व दांत यांनीं तिचें अंग विदीर्ण करून तिला तळघरांत टाकिलें, व माझ्या लेकाची ठेव या कोठारांत असूंदे–असें म्हणून सासूनें कोठाराचें दार बंद करून आडणा लाविला. तेव्हांपासून तिला जेथें त्या वैश्याच्या पूर्वजांचा द्रव्यसांठा होता, तेथेंच अंधकारांत पडून रहावें लागलें. रोज संध्याकाळीं देवसेनाची आई तिला थोडेंसें रुक्ष अन्न देत असे. हिचा पति आतां दूर गेला आहे, तेव्हां हिचे हाल हाल करून ती मेली, म्हणजे 'काय करूं बाबा, तुझ्या विरहदुःखानें माझी गुणी सून मेली' असें देवसेनाला सांगण्याचा त्या निर्दय सासूनें निश्चय केला होता.

याप्रमाणें सुखास योग्य असलेली कीर्तिसेना तसल्या दुर्दशेंत पडून, अतिशय क्लेश भोगीत असतांना, एकदां असा विचार करूं लागली कीं, माझा पति मोठा संपन्न, कुलीन व सत्पुरुष आहे; पण अरे, दुष्ट नशीबा, माझ्या सासूच्या प्रसादानें माझी अशी दुर्दशा व्हावी काय? एवढ्याच साठीं लोक कन्येच्या जन्माची निंदा करीत असतात. सासू व नणंद यांचा जाच खरोखरच असह्य असतो. असें जों चिंतन करीत आहे, तों त्याच

तळघरांत एक कुदळ सांपडली. तिच्या योगानें तिनें दोन चार दिवसांत बाहेर पडतां येण्यासारखा एक सुरुंग ( चर ) खणला. आणि एके दिवशीं पहांटे उठून आपलीं वस्त्रें व भूषणें घेऊन, ती त्या तळघरांतून बाहेर पडली. नंतर अशा अवस्थेंत पित्याकडे जाणें बरें नव्हे; कारण तेथें जाऊन मी सांगूं काय ? व माझ्या खऱ्या सांगण्यावरही ते विश्वास ठेवतीलच म्हणून कशावरून ? यास्तव आतां आपण पतीकडेच जावें तें बरें. कारण पति हीच साध्वीस्त्रियांची ऐहिक व परलौकिक गति आहे,‡ असा विचार करून तडागजलानें स्नान केलें, व राजपुत्राच्या वेषानें बाजारांत जाऊन कीर्तिसेनेनें आपल्याजवळचें थोडेंसें सोनें विकलें व प्रवासांत अवश्य लागणाऱ्या वस्तू विकत घेऊन, ती त्या दिवशीं एका वैश्याच्या येथें राहिली. दुसऱ्या दिवशीं वलभीस जाण्याची इच्छा करणाऱ्या एका समुद्रसेन वैश्याशीं मैत्री करून, त्याच्या बरोबर ती आपल्या पतीला भेटण्याच्या इच्छेनें निघाली. मार्गांत त्यानें प्रश्न केला असतां, मला माझ्या आप्तांनीं अतिशय छळल्यामुळें देशत्याग करून वलभींतील आपल्या एका अत्यंत इष्ट आप्ताकडे मी जात आहें, असें तिनें खरेंच वर्तमान त्याला सांगितलें. तेव्हां हा कोणी पुढें मोठ्या लौकिकास चढणारा राजपुत्र आहे, असें तिच्या रम्य मुद्रेवरून ताडून, वाणी तिची उत्तम सेवा करूं लागला. कांहीं दिवस त्यांचा प्रवास सुखानें झाला. पण एकदां द्रव्याच्या भीतीनें निर्जन मार्गांतून जात असलेला त्यांचा तो समूह एका भयंकर अरण्यांत येऊन पोंचला. सायंकाल झाल्यामुळें आतां अधिक पुढें जाणें प्रशस्त नव्हे, असें समजून त्यांनीं त्या दिवशीं तेथेंच तळ दिला. तों भालु अशुभ शब्द करून पुढचें संकट सुचवूं लागली. तेव्हां आज चोरांचें भय आहे, असें जाणून सर्व लोक शस्त्रास्त्रें घेऊन सज्ज झाले. तें पाहून कीर्तिसेना मनांत म्हणाली,–" अरेरे, मी ज्याकरितां घर सोडलें तेंच संकट पुनः ओढवलें. खरोखर प्राण्यांचें दुष्कर्म एकसारखें वाढत असतें.* सासूनें केलेला छल मला येथेंही पीडा देत आहे. प्रथम मृत्यूसारख्या सासूच्या कोपानें मला खाल्लें, नंतर दुसऱ्या गर्भवासाप्रमाणेंच मी तळघरांत राहिलें; पण दैववशात् मी

‡ इहामुत्र च साध्वीनां पतिरेका गतिर्यतः ।

* अहो दुष्कृतिनां कर्म संतानेनैव वर्धते ।

तेथूनही पुनः जन्माला येण्याप्रमाणें सुटलें, आणि येथें येऊन पुनः मृत्युमुखांत पडलें आहें. चोरांनीं जर मला धरून नेलें तर पर पुरुषाशीं लागू होऊन ती कोठें निघून गेली. असें माझी सासू माझ्या प्राणनाथाला सांगेल. ही पुरुषवेश धारण करणारी स्त्री आहे, असें जर कोणाला कळलें तर माझें शील भ्रष्ट होण्याचीही मोठी भीति आहे. त्यापेक्षां मला मृत्यु आलेला पतकरेल; पण शीलभ्रंश पतकरणार नाहीं.‡ यास्तव आतां अगोदर मला आपलें शरीर राखलें पाहिजे. यावेळीं या निरपेक्ष उपकार करणाऱ्या वैश्याच्या स्नेहांत पडणें मला कधींही हितकर होणार नाहीं. कारण सुस्त्रियांना अगोदर सतीधर्म पाळला पाहिजे."† असा बराच विचार करून ती जवळच्या झाडींत शिरली. तों तिला तेथें एक लहानसा खोल खळगा दिसला. तेव्हां भूमातेनें आपल्या पोटांत निर्भयपणें रहाण्याची जणुंकाय प्रेमानें सूचनाच केली आहे, असें तिला वाटलें. नंतर त्यांत कोणी दुष्ट जीव नाहीं असें पाहून ती आंत शिरली व पानें आणि गवत यांच्या योगानें तिनें आपल्याला झांकून घेतलें.

काहीं वेळानें चोरांची मोठी सेना तेथें आली, व त्या वैश्याच्या सार्थावर तिनें चाल केली. दोन्ही पक्षांच्या लोकांची मोठी निकराची लढाई झाली. खळग्यांत बसलेल्या कीर्तिसेनेला, एकमेकांस मारून शत्रूंच्या रक्तानें पृथ्वीला भिजविणाऱ्या वीरांचा सिंहनाद, व जखमी होऊन पडलेल्या लोकांचा आर्तनाद बराच वेळ ऐकूं येत होता; पण कांहीं वेळानें वैश्याच्या पक्षाचे सर्व लोक मेले. व त्यांचें सर्व धन घेऊन चोरांचें सैन्य पळून गेलें आणि त्या अरण्यांतील हिंस्र मानवांचा कोलाहलही बंद झाला. रात्र संपून दिवस उगवला, तेव्हां ती त्या खळ्यांतून बाहेर निघाली. खरोखर आपत्कालीं, पतीवर अनन्य प्रेम ठेवून शीलभ्रष्ट न होणाऱ्या साध्वीचें रक्षण देवताच करीत असतात.* कारण खळग्यांतून वर येत असलेल्या तिला पाहूनही त्या निर्जन अरण्यांत स्वैर फिरणारा एक सिंह तिला सोडून आपल्या मार्गानें

‡ ततो मृत्युर्मम श्रेयान्न पुनः शीलविप्लवः ।

† सतीधर्मो हि सुस्त्रीणां चिन्त्यो न सुहृदादयः ।

* कामं भर्त्रेकभक्त नामविस्खलिततेजसाम् ।
देवता एव साध्वीनां त्राणमापदि कुर्वते ।

निघून गेला. इतक्यांत ज्याच्या हातांत कमडलु आहे, असा एक तापसी तेथें आला व तिचा सर्व वृत्तांत ऐकून घेऊन आणि तिचें समाधान करून, त्यानें तिला आपल्या कमंडलूंतील जल प्यावयास दिलें, आणि वलभीचा मार्ग दाखवून तो महात्मा गुप्त झाला. तापशाच्या कमंडलूंतील जल प्याल्याकारणानें तिची भूक व तहान पार नाहींशी झाली. ती पतिव्रता त्यानें सांगितलेल्या मार्गानें पुढें जाऊं लागली. सर्व दिवसभर सुखरूपपणें चालून गेल्यावर, आजची एक रात्र मला क्षमा कर, असेंच जणुंकाय म्हणणारा सूर्य अस्तशिखरावर गेला आहे, असें पाहून ती पुनः मोठ्या चिंतेंत पडली. पण अन्य उपायच नसल्यामुळें पतीच्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेल्या त्या स्त्रीनें एका मोठ्या वृक्षाच्या ढोलींत प्रवेश केला, व तिचें द्वार एका फळीनें झांकून घेतलें. परमात्म्याप्रमाणें आपल्या पुण्यवान् पतीचें स्मरण करण्यावांचून तिला तेथें दुसरें कांहीं काम नव्हतें.

बरीच रात्र झाल्यावर कीर्तिसेनेला ढोलीच्या फटींतून लहान लहान बालकांसह एक घोर राक्षसी येत आहे असें दिसलें. यावेळेपर्यंत मी बऱ्याच आपत्तींतून सुटलें; पण आतां मात्र ही मला जिवंत सोडीत नाहीं, असें जों ती मनांत म्हणत आहे तों ती राक्षसी आपल्या पोरांसह त्याच वृक्षावर चढली. इतक्यांत तीं पोरें म्हणालीं,–आई, आम्हांला कांहींतरी खायला दे." त्यावर राक्षसी म्हणते–बाळांनों, आज श्मशानांत मला कांहीं मिळालें नाहीं, म्हणून मी डाकिणी पाशींही तुमच्यासाठीं कांहीं मागितलें. पण त्यांनींही कांहीं दिलें नाहीं. तेव्हां खिन्न झालेल्या मीं भैरवाची प्रार्थना केली. तेव्हां त्या कृपाळूनें मला नांव व गोत्र विचारून म्हटलें–राक्षसी, तूं खर व दूषण यांच्या मोठ्या कुलांत जाहली आहेस. यास्तव तूं आतां जवळच असलेल्या वसुदत्तपुरास जा. तेथें वसुदत्त नांवाचा मोठा धर्मपरायण राजा आहे. या अरण्याच्या सीमेवर असलेला तो या सर्व अरण्याचें रक्षण करितो. प्रवाशांकडून कर घेतो व चोरांस शासन करितो. पण तो नुक्ताच या अरण्यांत मृगया करून थकल्यावर निजला असतां त्याच्या कानांत लहान घोण शिरली, व कांहीं दिवसांनीं ती तेथें व्याली. त्यामुळें मस्तकांत होणाऱ्या वेदनांनीं राजा अतिशय व्याकुल झाला आहे. वैद्यांना दुःखाचें निदानच न कळल्यामुळें योग्य औषध त्याला मिळत नाहीं; पण अशाच अवस्थेंत कांहीं दिवस गेल्यास

तो राजा मरेल. मग तूं त्याचे मांस खा. म्हणजे सहा महिनेपर्यंत तुझी तृप्ति होईल. असें सांगून भैरवानेंही मला संशयित व कांहीं कालानें मिळणारा आहार नियत केला आहे. तेव्हां बाळांनों, मी आतां काय करूं?

आईचें हें भाषण ऐकून पुत्र म्हणाले,–आई, रोगाचें निदान समजून त्याच्यावर कोणी योग्य उपाय केल्यावर तो राजा जगेल कीं काय? व असला रोग कोणत्या उपायानें नाहींसा होतो;" त्यावर राक्षसी म्हणाली बाळांनों, रोगाचें निदान समजून योग्य उपाय योजल्यास राजा जिवंत राहील. पण त्या गोमींना बाहेर काढण्याकरितां असा उपाय योजिला पाहिजे. राजाच्या एका कानांत ऊन तूप घालून व मस्तकावरही तें ठेवून दुसऱ्या कानांत बारीक नळी घालावी. त्या नळीचें दुसरें टोंक एका थंड पाण्याच्या घागरीला भोंक पाडून त्यांत शिरकवून ठेवावें, व राजाला उघड्या डोक्यानें भर मध्याह्न समयीं प्रखर उन्हांत एक प्रहर-भर बसवावें. म्हणजे उन्हानें डोकें तापेल. दुसऱ्या कानाच्या छिद्रांत ऊन तूप सोडलेलें असल्यामुळें तो मार्गही बंद होईल. व त्यामुळें संतप्त झालेल्या सर्व घोणी नळीच्या द्वारा थंड पाण्यानें भरलेल्या घागरींत येतील व राजा सुखी होईल.

असा रामबाण उपाय सांगून राक्षसी मुकाट्यानें बसली असतां, ढोलींत बसून तें सर्व ऐकलेली कीर्तिसेना आपल्यापाशींच म्हणते–सुदैवानें मी जर या मृत्यूच्या दाढेंतून सुटलें, तर अगोदर या युक्तीनें राजाचे प्राण वांचवीन. याच अरण्याच्या सीमेवर राहून तो यांतून जाणाऱ्या-येणाऱ्या व्यापाऱ्यांकडून थोडेंसें धन (जकात) घेतो व त्यांचें रक्षण करितो. त्यामुळें येथून सर्वांना निर्भयपणें प्रवास करितां येतो. या उत्तम सोयीचा उल्लेख काल रात्रीं मेलेल्या समुद्रदत्तानेंही मजजवळ केला होता. व तोही आज याच मार्गानें जाणार होता. माझा भर्ताही याच मार्गानें येईल. यास्तव या अरण्याच्या सीमेवरील राजनगरास जाऊन व राजाला पीडारहित करून, मी आपल्या स्वामीची वाट पहात तेथेंच राहीन. इत्यादि विचार करीत तिनें ती रात्र मोठ्या संकटानें घालविली. पहांट होतांच तो राक्षससंघ कोठें निघून गेला. व चांगलें उजाडल्यावर ती साध्वी ढोलींतून निघून वृक्षावरून खालीं उतरली. आणि समोरच्या मार्गानें पुढें जाऊं लागली.

पुष्कळ दूरवर चालून गेल्यावर अपराह्न समयीं ( तिसऱ्या प्रहरीं ) पुरुषवेष घेतलेल्या तिला एक गरीब व सरळ स्वभावाचा धनगर भेटला. तेव्हां सुकुमार शरीर असूनही फार दुरून आलेल्या कीर्तिसेनेला पाहून, ज्याचें चित्त करुणेनें आर्द्र झालें आहे अशा त्याला 'या प्रदेशाचें नांव काय,' असें तिनें विचारलें. त्याबरोबर-' आमच्या वसुदत्तराजाचें हें नगर समोर दिसत आहे, पहा, पण काय सांगावें ? आमचा तो मायबाप राजा रोगानें पीडून गेला आहे. त्याची कांहीं घडगत दिसत नाहीं'-असें तो म्हणाला. तें ऐकून कीर्तिसेना त्या गोपालास म्हणाली,-" मला जर कोणी त्याच्याकडे घेऊन जाईल, तर मी त्याचा रोग बरा करीन." तेव्हां तो म्हणाला-मी वसुदत्तपुरांतच जात आहें. तूं ही मजबरोबर चल, म्हणजे कांहीं यत्न करून पहातां येईल. त्यावर ' बरें आहे चल.' असें तिनें म्हटलें. तेव्हां तो गोप लागलाच पुरुषवेषानें भूषित झालेल्या कीर्तिसेनेला वसुदत्तपुरास घेऊन गेला. राजमंदिरापाशीं पोंचल्यावर खिन्न झालेल्या प्रतीहारीला सर्व यथार्थ हकीकत कळवून, व त्या सुंदरमुख वैद्याला त्याच्या स्वाधीन करून तो गोप आपल्या घरीं निघून गेला.

प्रतीहारीनेंही राजाला कळवून त्याची आज्ञा झाली असतां तिला राजापाशीं नेलें. तेव्हां रोगानें व्याकुल झालेल्या राजाला, तिची ती अद्भुत आकृति पाहूनच समाधान वाटलें, याच्या हातून आपल्या दुःखाचें निवारण खचित होणार, असेंही त्याच्या मनांत आलें. शुद्ध चित्ताला, हिताहित आपोआप कळतें.* असो; राजा तिला म्हणाला-" माझा रोग जर तूं बरा केलास, तर मी तुला आपलें अर्धे राज्य देईन. काल रात्रीं-एका स्त्रीनें माझ्या पाठीवरील काळें कांबळें काढून टाकिलें.-असें मी स्वप्नांत पाहिलें. व त्यावरून माझा हा रोग तूं बरा करशील, अशी मलाही मोठी आशा वाटत आहे."-राजाचें हें भाषण ऐकून कीर्तिसेना म्हणाली-" प्रभो, आज आतां संध्याकाळ झाली आहे. यास्तव उद्यां मी तुमचा रोग बरा करीन. आपण भिऊं नका, धैर्य धरा."-असें बोलून तिनें त्या राजाच्या मस्तकावर गायीचें ताजें तूप चोळविलें. त्यामुळें राजाची मस्तकवेदना कमी झाली, व त्याला जरासें बरें वाटून झोंप येऊं लागली. तेव्हां ' हा कोणी देवच वैद्यरूपानें आला आहे,'

* वेत्त्यात्मैव हिताहितम् ।

असें म्हणून तेथील सर्व लोक तिची स्तुति करू लागले. राजाच्या मुख्य राणीनें नानाप्रकारच्या उत्तम उपचारांनीं तिची सेवा केली. रात्रीं तिच्या करितां निराळें घर व दासी यांची योजना केली.

नंतर दुसऱ्या दिवशीं मध्याह्न समयीं सर्व मंत्री व अंतःपुरांतील स्त्रीवर्ग पहात असतां, राक्षसीनें सांगितलेल्या अद्भुतयुक्तीनें कीर्तिसेनेनें राजाच्या कानांतून दीडशें लहान लहान घोणी घागरींत काढून दाखविल्या, व कानांत तूप आणि दूध सोडून तिनें राजाला नीरोगी केलें. तेव्हां राजा स्वस्थ झाला आहे, व त्या थंड पाण्याच्या घागरींत पुष्कळ घोणी आल्या आहेत, असें प्रत्यक्ष पाहिल्यावर कोणाला विस्मय वाटणार नाहीं! डोक्यांतून निघालेल्या त्या दुष्ट किड्यांस पाहून राजाला भय वाटलें; पण आतां अगदीं बरें वाटत असल्यामुळें आनंदही झाला. आपला आज पुनर्जन्म झाला, असें तो समजूं लागला. त्यानंतर स्नान करून त्यानें त्या अपूर्व वैद्याचा मोठा सत्कार केला. नगरांत मोठा उत्सव करविला. बोलल्याप्रमाणें जीवदान देणाऱ्या त्या वैद्यराजाला अर्धें राज्य देण्यास राजा तयार होता; पण तिनें तें घेतलें नाहीं. तेव्हां गांव, हत्ती, घोडे, व सोनें देऊन त्यानें तिला संतुष्ट केलें. आमच्या प्रभूचे प्राण वांचविणारा हा वैद्य आम्हांलाही पूज्य आहे, असें म्हणून राण्या व मंत्री यांनींही तिला पुष्कळ धन व वस्त्रें दिलीं, पण तूर्त मी व्रतस्थ आहें, यास्तव माझें हें सर्व वित्त तुमच्या पाशींच असूंदे; असें म्हणून आपल्या पतीची मार्गप्रतीक्षा करणाऱ्या तिनें तें सर्व राजाच्या हवालीं करून ठेविलें.

त्यानंतर मोठ्या सन्मानानें ती जों तेथें कांहीं दिवस पुरुषवेषानें रहात आहे, तों त्या मार्गानें, वलभीहून आपला पति देवसेन व्यापाऱ्यांच्या मोठ्या संघासह येत आहे, असें तिनें लोकांच्या तोंडून ऐकलें. कांहीं वेळानें तो संघ त्यानगरांत येऊन उतरला आहे असें तिला समजलें, तेव्हां लागलीच ती साध्वी तेथें गेली. मयूरी जशी नव्या मेघाला मोठ्या आदरानें पहाते, त्याप्रमाणें ती आपल्या भर्त्याला कांहीं वेळ पहातच राहिली. पति फार दिवसांनीं भेटल्यामुळें अनेक संकटांतून सुटलेल्या तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, व ती एकाएकीं त्याच्या पायांवर जाऊन पडली. तेव्हां पुरुषवेष धारण केलेल्या तिला

ओळखून आश्चर्य चकित झालेला देवसेन 'तूं येथें कशी व कां आलीस' असें विचारूं लागला. तेव्हां ती साध्वी पतीच्या पायांवर डोकें ठेवून कांहीं वेळ पुष्कळ रडली. तिच्या अंतःकरणांत अनेक वृत्ती उठल्या-मुळें तिच्यानें कांहीं बोलवेना. इतक्यांत राजा वसुदत्ताला हें वर्तमान कळल्यामुळें तो स्वतः तेथें आला, व दुःखाचा आवेग कमी झाल्यावर तिनें सांगितलेली आपली दुःख व भय उत्पन्न करणारी वार्ता ऐकून सर्व श्रोते विस्मित झाले. देवसेनाच्या अंतःकरणांत कोप, क्षमा, विस्मय व हर्ष यांचें एकच काहूर उठलें. माझ्या दुर्वृत्त आईच्या निर्दयपणामुळेंच हिच्यावर हीं सर्व संकटें ओढविलीं, असें जाणून तो तिच्यापासून पराङ्मुख झाला. तिचें तोंड पहावयाचें नाहीं, असा त्यानें तत्काल निश्चय केला. तों तिची ती हृदयद्रावक हकीकत ऐकणारे सर्व लोक–पतिभक्तिरूप रथावर आरूढ झालेल्या, शीलरूपी कवचानें सुरक्षित असलेल्या व धर्म हाच ज्यांचा सारथि आहे, अशा साध्वी स्त्रिया संकटरूपी शस्त्रांचे प्रहार सहन करून, अशाच विजयसंपन्न होत असतात, असें मोठ्या आनंदानें म्हणूं लागले. राजानेंही कीर्ति-सेनेचें तें अद्भुत चरित्र शांतचित्तानें ऐकून घेऊन–पतीकरितां असे असह्य क्लेश सहन केलेल्या हिनें, रामाकरितां दुःख भोगणाऱ्या सीतादेवी-लाही जिंकलें आहे. मला प्राण देणारी ही माझी धर्मभगिनी आहे–असें म्हटलें. तेव्हां कीर्तिसेना म्हणाली–"देव, आपण मला संतुष्ट होऊन दिलेलें सर्व वित्त या माझ्या स्वामीच्या स्वाधीन करावें."

तें ऐकतांच राजानें आपल्यापाशीं असलेलें तिचें सर्व वित्त तिच्या पतीच्या स्वाधीन केलें, व संतुष्ट झालेल्या राजानें देवसेनाचा मोठा सत्कार केला. तेव्हां व्यापारांत मिळविलेल्या व राजापासून प्राप्त झालेल्या धनानें अतिशय संपन्न झालेला तो साधु–देवसेन मातेचा त्याग करून, व भार्येची स्तुति करून त्याच वसुदत्तनगरांत राहूं लागला. कीर्तिसेनाही याप्रमाणें केवल धर्माचरणानें सासूच्या असह्य जाचांतून सुटून व पतीच्या अति सुखावह सहवासांत राहून, अखंड पुण्यफलसमृद्धि भोगूं लागली. सखे

* भर्तृभक्तिरथारूढाः शीलसंनाहरक्षिताः ।
धर्मसारथयः साध्व्यो जयन्ति मतिहेतयः ॥

कलिंगसेने, याप्रमाणें साध्वी स्त्रिया प्रतिकूल दैवामुळें ओढवणाऱ्या आपत्ती सहन करितात, व आपलें शीलरूपी धन राखतात. त्यांचें शुद्ध व सात्त्विक धैर्यच त्यांचें रक्षण करितें, आणि त्यामुळें त्या आपलें व पतीचें कोट कल्याण करून घेतात. बाई ग, याप्रमाणें विवाहितस्त्रियांना सासू व नणंदा यांचे अनेक जाच सोसावे लागतात.

सोमप्रभेनें सांगितलेली ही आनंददायक कथा ऐकून कलिंगसेना संतुष्ट झाली. इतक्यांत ती विचित्र कथा संपली आहे, असें पाहूनच जणुं काय सूर्य पातालांत जावयास प्रवृत्त झाला असतां, उत्कंठित झालेल्या कलिंगसेनेला आलिंगन देऊन सोमप्रभा आपल्या भवनास गेली.

## तरंग ४ था.

### १. मदनवेगाचा वृत्तांत.

सोमप्रभा आपल्या घराकडे निघून गेली असतां, कलिंगसेना स्नेहानें तिच्या मार्गाकडे पहात आपल्या माडीवर उभी होती. इतक्यांत दैवयोगानें मदनवेग नांवाच्या विद्याधरराजानें आकाशांतून तिला पाहिलें, व तत्काल तो मोहित झाला. ‘मानुषस्त्रियाही जर अशा अद्भुत व सुन्दर उत्पन्न होऊं लागल्या, तर विद्याधरी व अप्सरा यांना घेऊन काय करायचें आहे! खरोखर ही सुंदरी जर माझी प्रिया न झाली, तर माझें हें जीवित व्यर्थ होय. पण मी विद्याधर असून या मानुषीशीं संग कसा करूं!’ असा मनांत विचार करून त्यानें प्रज्ञप्ति नामक विद्येचें स्मरण केलें. त्याबरोबर ती साक्षात् पुढें येऊन त्याला म्हणाली,—“ही स्त्री वस्तुतः मानुषी नव्हे, तर शापामुळें भ्रष्ट झालेली अप्सरा आहे.” विद्येनें असें सांगितलेलें ऐकून आनंदित झालेला तो आपल्या घरीं जाऊन, कामार्त झाल्यामुळें पुनः विचार असा करूं लागला कीं, ती रमणी कशी बरें प्राप्त होईल! तिचें बलात्कारानें हरण करणें उचित नव्हे; कारण तसें केल्यास मला तत्काल मरण येईल, असा शाप झाला आहे. यास्तव आपण शंभूचें आराधन करून त्याच्या वरानें तिची प्राप्ति करून घेऊं या. कारण सर्व कल्याण तपाच्या अधीन असतें.*

* तपोधीनानि श्रेयांसि.

असा विचार करून दुसऱ्याच दिवशीं तो ऋषभ पर्वतावर जाऊन व एका पायावर उभा राहून तप करूं लागला. त्यानें आहारही सोडला. त्यामुळें थोड्याच कालांत प्रसन्न झालेल्या शंभूनें त्याला दर्शन देऊन, व त्याचा उद्देश विचारून घेऊन त्यास म्हटलें,–"कलिंगसेना भूलोकीं अप्रतिमकन्या आहे, तिला एक वत्सराजच योग्य पति आहे; पण वासवदत्ते-च्या भीतीनें तो अतिशय आवडणाऱ्याही तिच्या विषयींची इच्छा प्रकट करीत नाहीं. सोमप्रभेच्या तोंडून त्याचें वर्णन ऐकून कलिंगसेनाही त्याच्या स्वरूपावर लुब्ध झाली आहे. ती स्वतः त्याला वरील, पण तिचा विवाह होई पर्यंत तूं वत्सेश्वराच्या रूपानें तिच्याकडे जाऊन तिच्याशीं गांधर्व-विधीनें विवाह कर. असें केल्यासच ती तुला कांहीं दिवस लाभेल." शंकराचें तें भाषण ऐकून संतुष्ट झालेला मदनवेग त्याला प्रणाम करून कालकूट पर्वतावरील आपल्या घरीं गेला.

## २. कलिंगसेनेच्या विवाहाची चर्चा.

इकडे प्रत्यहीं सायंकाळीं आपल्या भवनास जाऊन, सकाळीं आकाश-गामी यंत्रानें तक्षशिला नगरीस येणाऱ्या सोमप्रभेशीं कलिंगसेना एकदां एकांतांत खेळत असतांना तिला म्हणाली,–" सखे, तूं कोणाला सांगूं नकोस; पण माझा विवाह लवकरच होणार असें चिह्न दिसत आहे. माझी मागणी करण्याकरितां पुष्कळ राजांनीं येथें आपले दूत पाठिवले; पण त्या सर्वांना बाबांनीं परतवून लाविलें आहे. श्रावस्तीमध्यें प्रसेनजित् म्हणून जो राजा आहे, त्याच्या दूतालामात्र त्यांनीं तेथें मोठ्या सत्कारानें ठेवून घेतलें आहे. आईचीही त्या गोष्टीला संमति मिळाली आहे. तो राजा मोठा कुलीन असल्यामुळें त्यांना फार आवडला आहे. यास्तव तो माझा पति होईल असें वाटतें. कौरव व पांडव यांच्या पितामही अंबा, अंबालिका इत्यादि ज्या कुलांत झाल्या, त्याच कुलांत तो झाला आहे." आपल्या सखीचें हें भाषण ऐकून सोमप्रभा रडूं लागली, व त्याचें कारण विचारिलें असतां ती म्हणाली—

सखे, वराचें वय, रूप, शील, कुल व वित्त यांचाच मुख्यतः विचार करावयाचा असतो. पण त्यांतूनही वयाकडे अगोदर दृष्टि देऊन, नंतर वंशादि गुण पहावयाचे असतात. प्रसेनजित् तर म्हातारा आहे. तेव्हां त्याच्या नुस्त्या कुलाकडे पाहून काय होणार ? तसल्या जीर्ण पतीची तूं

भार्या होणार, असें ऐकल्यामुळें मला फार दुःख झालें आहे. खरोखर तूं जर वत्सराज उदयनाची भार्या झालीस, तर मात्र मला संतोष होईल. कारण वय, रूप, लावण्य, कुल, शौर्य, वैभव, यांच्या योगानें त्याच्या बरोबरीचा राजा या भूलोकांत दुसरा नाहीं.

## ३. वत्सराजाचें वर्णन.

सोमप्रभेच्या या भाषणानें कलिंगसेनेचें मन वत्सराजावर गेलें. व ती मय-कन्येला म्हणाली,—"सखि, तो वत्सराज व उदयन अशा दोन नांवानीं कां प्रसिद्ध झाला आहे? त्याचें कुल कोणतें? राजधानी कोठेंशी आहे?"—त्यावर सोमप्रभा म्हणाली—कल्याणि, वत्स म्हणून एक उत्तम देश आहे. त्यांत कौशांबी या नांवाची अमरावतीशीं स्पर्धा करणारी विस्तृत नगरी असून, त्यांत राहून तो राजा आपल्या सर्व देशाचें रक्षण करीत असतो. म्हणून त्याला वत्सेश्वर, वत्सराज इत्यादि म्हणतात. त्याचा वंशही मोठा प्रख्यात आहे. पांडवांमध्यें अर्जुन म्हणून एक महाधनुर्धर, कृष्णसारथी, गांडीवधन्वा, अतिरथी वीर होता. त्याचा पुत्र अभिमन्यु. प्रसिद्ध भारतीय युद्धांत चक्रव्यूहाचा भेद करीत असतांना त्यानें कौरवसेनेचा क्षय केला. त्याच्यापासून महान् भगवद्भक्त राजा परीक्षित् झाला. शुकाचार्यांच्या उपदेशास कारण होणाऱ्या त्यानें केवळ आपलेंच नव्हे, तर सर्व धार्मिकांचें कल्याण केलें आहे. त्याचा पुत्र सर्पसत्र करणारा जनमेजय. त्याचा आत्मज शतानीक, त्यानेंच ही कौशांबी वसविली. त्याचा मुलगा सहस्रानीक, तो इंद्राच्या रथांतून विहार करीत असे. त्याच्यापासून मृगावतीच्या ठायीं मोठ्या चमत्कारिक योगानें हा उदयन उदय पर्वतावर झाला. ( हा सर्व वृत्तांत २ कथामुखलंबक तरंग १ पान ६३ यांत पहावा.) देवानींच त्याचें उदयन असें नांव ठेविलें. पुढें अशाच चमत्कारिक योगायोगानें सहस्रानीकानें त्याला व त्याच्या आईला उदय पर्वतावरून आपल्या येथें नेलें. क्रमानें युवराज झालेल्या त्याला बापाच्या मागें वत्सदेशाचें राज्य व उत्तम मंत्री मिळाले. मंत्र्यांच्या अपूर्व नीतीनें तो भाग्यशाली उदयन आतां सार्वभौम राजा झाला आहे. सारांश, हे सखे, चंद्रवंशांत उत्पन्न झालेल्या त्या साक्षात् मदनासारख्या रूपवान् तरुण राजाची बरोबरी करणारा एकही राजा या लोकीं नाहीं. तुझ्या सारख्या त्रैलोक्यसुंदरीला तोच एक योग्य

पति आहे. तुझ्या लावण्यावर लुब्ध झालेला तो खचित तुझी इच्छा करीत असेल; पण वासवदत्ता म्हणून त्याची पट्टराणी आहे. उषा व शकुंतला यांनाही लज्जित करणाऱ्या तिनें आपल्या आप्तांचा त्याग करूनही त्याला वरलें. तिला आतां नरवाहनदत्त म्हणून एकच पुत्र झाला आहे; पण तो पुढें विद्याधरांचा राजा होईल, असें देवांनीं पूर्वीच सांगून ठेविलें आहे. यास्तव तो आपल्या अनन्यपरायण राणीला भिऊन तुझी मागणी करीत नाहीं, असें मला वाटतें. मी तिलाही पाहिलें आहे, पण ती कांहीं तुझ्याइतकी रूपवती नाहीं.

असें सांगणाऱ्या सोमप्रभेला वत्सेशाविषयीं उत्सुक झालेली कलिंगसेना म्हणाली,–" सखे, सगळें खरें. पण आईबापांच्या अधीन असलेल्या मला काय करितां येण्यासारखें आहे, तें तूंच सांग पाहूं ? कारण तूं सर्वज्ञ व प्रभावसंपन्न असल्यामुळें माझा सर्व भार तुजवर आहे "– हें ऐकून सोमप्रभा म्हणते–बाईग, या सर्व गोष्टी दैवाधीन आहेत. त्याविषयीं मी एक कथा सांगतें ती ऐक.

## ४. तेजस्वतीची कथा.

पूर्वीं उज्जयिनींत विक्रमसेन राजा होता. त्याला तेजस्वती म्हणून एक रूपानें अप्रतिम सुंदर कन्या होती. तिला प्राय: एकही राजा आवडला नाहीं. एकदां आपल्या माडीवर असलेल्या तिनें एका पुरुषाला पाहिलें. व ज्याची आकृति फार चांगली आहे, अशा त्याच्याशीं संगति करावी असें दैववशात् तिच्या मनांत आलें. तेव्हां आपला अभिप्राय कळविण्याकरितां, तिनें आपल्या दासीला त्याच्याकडे पाठविलें. ती सखीही त्याच्यापाशीं जाऊन राजकन्येची इच्छा न करणाऱ्या, व त्यांत मोठें साहस आहे असें जाणणाऱ्या, राजाची प्रार्थना करून ती त्याला म्हणाली,– " भद्रमुखा, या पुढच्या शून्य देवालयांत येऊन तूं आज रात्रीं राजकन्येची वाट पहात रहा."–असा संकेत करून ती राजकन्येकडे आली. तिच्या तोंडचा वृत्तांत ऐकून राजकन्याही सूर्य केव्हां मावळतो, म्हणून मोठया उत्कंठेनें वाट पहात राहिली. पण तो दुर्दैवी पुरुष येण्याचें कबूल करूनही भयानें तेथें आला नाहीं. बेडकाला लाल कमलाच्या किंजल्काचा स्वाद घ्यावयास कसा मिळणार ? इतक्यांत कोणी एक कुलीन राजपुत्र पिता मेल्याकारणानें त्याच्या मित्राला म्हणजे तेजस्वतीच्या

आपाला भेटावयाकरितां तेथें आला. तो तरुण असून दायादांनीं त्याचें राज्य हरण केल्यामुळें एकटाच तेथें सायंकाळीं येऊन राहिला होता. सोमदत्त असें त्याचें नांव असून स्वरूपही प्रेक्षणीय होतें. तेजस्वतीच्या दासीनें देवालयांत एक पुरुष आला आहे, असें येऊन सांगतांच ती स्वतः तेथें येऊन गेली व प्रेमानें अंध झालेल्या तिला हा कोणी अन्य पुरुष आहे असें न कळल्यामुळें तिनें त्याला वरलें. त्या शहाण्यानेंही भाग्यवशात् अनायासानें या मिळालेल्या व यापुढें प्राप्त होणाऱ्या राजलक्ष्मीची सूचना करणाऱ्या तिचा मुकाट्यानें स्वीकार केला. तो राजपुत्रही अतिसुंदर होता; त्यामुळें धात्यानें आपल्याला फसविलें आहे, असें तिला वाटलें नाहीं. गांधर्वविवाहानंतर बऱ्याच प्रेमाच्या गोष्टी बोलून व पुनरपि त्याच जागीं भेटण्याचा संकेत करून, त्यांतील एक राजमंदिरांत परत आली, व दुसऱ्यानें राहिलेली रात्र तेथेंच घालविली. प्रातःकाळीं राजसभेंत जाऊन त्यानें प्रतीहारीला आपलें नांव व कुल राजास कळवावयास सांगितलें. तेव्हां विक्रमसेनानेंही त्याला ओळखून आंत आणावयाची आज्ञा केली. राजापाशीं आल्यावर त्या त्याच्या मित्राच्या पुत्रानें आपलें सर्व दुःख त्याला सांगून त्याच्याजवळ सहाय मागितलें. तेव्हां विक्रमसेनानेंही मोठ्या आनंदानें तें देण्याचें मान्य केलें. या सुंदर व तरुण राजपुत्राला आपली कन्या द्यावी असें राजाला वाटलें, व त्यानें आपला आशय मंत्र्यांना कळविला. तेव्हां त्या सोमदत्त राजपुत्रानेंही त्याच्या कन्येचा वृत्तांत त्याला सांगितला, राजकन्येनेंही आपलें रात्रीचें साहस दासीच्या तोंडून आपल्या आईला कळविलें. तेव्हां अनायासानें इष्ट-सिद्धि झाल्याचें पाहून अति विस्मित झालेल्या राजाला एक मंत्री म्हणाला;— "देव, सत्सेवक दक्ष राहून वेळोवेळीं मूढ स्वामींचें जसें हित करीत असतात; त्याप्रमाणें ज्यांचें पुढें कल्याण व्हावयाचें असतें, अशा पुरुषांचें प्रयोजन सिद्ध करण्याविषयीं विधीच जागत रहातो.* याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका."—

---

* विधिरेव हि जागर्ति भव्यानामर्थसिद्धिषु ।
असंचेतयमानानां सद्भृत्यः स्वामिनामिव ॥

## ५. हरिशर्म-ब्राह्मणाची कथा.

एका गावांत हरिशर्मा म्हणून ब्राह्मण होता. तो दरिद्री, मूर्ख, निर्वाहाचें साधन नसल्यामुळें मोठ्या कष्टांत पडलेला, व जणुंकाय पूर्व दुष्कर्माचा फलभोग घेण्याकरितांच निर्माण झालेला होता. त्याला मुलेंही पुष्कळ झालीं. तेव्हां आपल्या सर्व कुटुंबासह भिक्षा मागत तो एका नगरांत गेला, व स्थूलदत्त नांवाच्या एका मोठ्या श्रीमानाचा आश्रय धरून तो तेथें राहिला. त्यानें आपल्या पुत्रांना त्याच्या गायी वगैरे राखावयास लाविलें. भार्येला त्याच्या येथली मोलकरीण केलें, व स्वतः आपण त्याचा सेवक होऊन राहिला. एकदां स्थूलदत्ताच्या कन्येचा विवाह मांडला, मोठा समारंभ सुरू झाला, अनेक पाहुणे गोळा झाले, तेव्हां हरिशर्मा व त्याच्या कुटुंबांतील माणसें–आतां काय आपली मोठी मौज होणार! तूप, मांस, लाडु, पोळ्या, इत्यादि अनेक अपूर्व पदार्थ आम्ही आतां ओ–होई तों खाऊं.–इत्यादि मनोरथ करीत होतीं; पण दैववशात् लग्नाच्या घाईमुळें, त्यांच्याकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. अर्थात्च त्या दिवशीं त्यांना उपाशीं रहावें लागलें. तेव्हां रात्रीं हरिशर्मा आपल्या बायकोला म्हणाला,–प्रिये, दारिद्र्य व मूर्खपणा यांच्या योगानें माझा असा अनादर होत आहे. यास्तव मी आतां कांहीं कृत्रिम युक्ति करितों. म्हणजे मी या स्थूलदत्ताच्या गौरवास पात्र होईन. योग्य अवसर आला म्हणजे तूं मात्र मी ज्ञानी आहें, असें आमच्या धन्याला सांग. असें तिला सांगून व काय करावयाचें तें ठरवून, सर्व लोक निजले असतां, जावयाचा घोडा सोडून त्यानें दूर कोठें नेऊन ठेविला. सकाळीं सर्व लोक घोडा काय झाला म्हणून इतस्ततः शोधूं लागले; पण त्याचा कांहीं केल्या पत्ता लागेना. तेव्हां हें मोठेंच अमंगल झालें आहे, असें समजून खिन्न झालेल्या स्थूलदत्ताजवळ येऊन हरिशर्म्याची स्त्री म्हणाली,–"धनिराज, माझा भर्ता मोठा ज्योतिषी आहे, तो शकून पहातो; त्याला कां विचारीत नाहीं ? तो तुमच्या जांवयांच्या घोड्याचा पत्ता खरोखर लावून देईल."—

तें ऐकून स्थूलदत्तानें त्या आपल्या सेवकाला बोलाविलें. तेव्हां 'काल मला आपण विसरलां; आणि आतां मात्र मी हवा आहें.' असें म्हणणाऱ्या त्याची क्षमा मागून स्थूलदत्त घोड्याविषयीं प्रश्न विचारूं लागला.

तेव्हां त्या धूर्तानें उगीच रेखा ओढून, बोटें मोजून व पुष्कळ विचार केल्यासारखें करून, या वेळीं या गांवाच्या दक्षिण हद्दीवर चोरांनीं घोडा बांधला आहे. ते त्याला पुढें नेणार आहेत; यास्तव सत्वर जाऊन परत आणा, असें सांगितलें. त्याबरोबर पुष्कळ लोक धांवत गेले व त्यांनीं गुप्त जागीं बांधलेल्या घोड्याला परत आणिलें. सर्व लोक हरिशर्म्याच्या ज्ञानाची स्तुति करूं लागले. त्या दिवसापासून स्थूलदत्ताच्या येथें त्याचा मोठा सत्कार होऊं लागला, व क्लेश कमी झाले.

कांहीं दिवसांनीं त्या नगरांतील राजाच्या येथें पुष्कळ सोनें व रत्नें यांची चोरी झाली. चोराचा पत्ता लागेना, तेव्हां ज्ञानी म्हणून प्रसिद्ध झालेल्या हरिशर्म्याला राजवाड्यांतून बोलावणें आलें. तोही धूर्त राजसभेंत गेला, पण राजानें–आमच्या येथें चोरी कोणी केली तें सांगा,–असा प्रश्न केला असतां, टाळाटाळ करण्याकरितां मी आपल्याला उद्यां या प्रश्नाचें उत्तर सांगेन, असें म्हणून त्यानें ती वेळ कशी तरी मारून नेली. तथापि राजानें त्याला आपल्या येथेंच रहावयास सांगून त्याच्यावर पहारा ठेविला. कदाचित् चोराचें नांव न समजल्यामुळें तो पळून जाईल, म्हणून राजानें हा उपाय योजिला होता. असो; त्या राजवाड्यांत जिव्हा म्हणून एक दासी होती. तिनें व तिच्या भावानें तें राजधन चोरलें होतें. त्यामुळें अर्थात्च तिला हरिशर्म्याची भीति वाटली, व तो ज्ञानी काय करीत आहे, तें पहावें म्हणून रात्रीं हळुच येऊन ती त्याच्या दारापाशीं उभी राहिली. तेव्हां दैववशात् आपण मोठ्या संकटांत पडलों आहों, असें जाणून तो एकटाच बसलेला हरिशर्मा, आपल्या–मी ज्ञानी आहें, असें खोटेंच सांगणाऱ्या,–जिव्हेची अशी निंदा करूं लागला कीं, जिव्हे, भोगलंपट होऊन काय केलेंस हें ! दुराचारे, आतां राजा देईल तो दंड सहन कर. तें ऐकून, या ज्ञानी पुरुषानें मला ओळखलें आहे, असें समजून ती (जिव्हा दासी) भयभीत झाली. मोठ्या युक्तीनें त्याच्या खोलींत गेली व त्याच्या पायावर मस्तक ठेवून ज्ञान्याचें सोंग घेतलेल्या त्याला ती म्हणाली. महाराज, राजाचें द्रव्य चोरणारी जिव्हा म्हणून जी आपल्याला कळली आहे व जिला उद्देशून आपण आपल्यापाशींच आतां कांहीं बोलत होतां, तीच मी आहें. मी राजाचें धन नेऊन याच मंदि-

राच्यामागें डाळिंबीच्या खालीं पुरून ठेविलें आहे. यास्तव कृपासागर, माझें रक्षण करा. माझ्या हातांत असलेलें हें सोनें मी तुम्हांला देईन.

दीन झालेल्या त्या दासीचें हें भाषण ऐकून, आंतल्या आंत विस्मित व आनंदित झालेल्या हरिशर्म्यानें गर्वानें तिला म्हटलें,—"जा, मला सर्व कळलें आहे; पण शरण आलेल्या तुझें नांव मी प्रकट करणार नाहीं. तुझ्याजवळचें सोनें तूं मला मग दे."—तें ऐकून ती चेटी तेथून निघून गेली. तेव्हां हरिशर्मा विस्मयानें म्हणाला—अनुकूल विधि असाध्य कार्यही सहज सिद्ध करितो.* मी अनर्थांत पडल्यामुळें आपल्या जिह्वेची निंदा केली, तों चोरी करणारी जिव्हा आपोआप पुढें आली. दैवाची कशी विचित्र लीला आहे ती पहा! गुप्त पापें करणारे पापी नुसत्या भीतीनेंच आपणाला प्रकट करीत असतात.‡

असो; असा विचार करीत आनंदित झालेल्या त्यानें ती रात्र घालविली. प्रातःकाळीं लबाडीनें आपलें ज्ञान व्यक्त करीत त्यानें राजाला मागच्या बागेंत नेलें, व तेथें पुरलेलें धन काढून घ्यावयास सांगितलें. राजानेंही तत्काळ तेथें खणवून आपलें बहुतेक धन काढून घेतलें. त्यांतील कांहीं भाग घेऊन चोर पळून गेला आहे, त्याचा पाठलाग करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. असें हरिशर्म्यानें सांगितलें असतां, राजानेंही त्याचा नाद सोडला. नंतर संतुष्ट झालेला राजा त्याला गांव देऊं लागला असतां, ज्ञानी या नांवाचा मंत्री त्याच्या कानांत म्हणाला,—"देव, शास्त्रावांचून असलें मानुषांस अगम्य असलेलें ज्ञान कसें होणार! मला मोठी शंका वाटत आहे. चोरांशीं संकेत करून या धूर्तानें ही पैसे उपटण्याची युक्ति योजिली असावी. तर आणखी एकदां याची परीक्षा पहा"

मंत्र्याचें तें सांगणें राजालाही खरें वाटलें व त्यानें एका नव्या घागरींत एक मंडूक (बेडूक) घालून व त्याचें तोंड बांधून एकाएकीं त्याच्या समोर तो आणून ठेविला. व 'ब्राह्मणा, यांत काय आहे तें जर तूं मला सांगशील, तर मी तुझी फार मोठी पूजा करीन' असें म्हटलें. तें ऐकून आतां मात्र आपला विनाशकाल अवश्य आला, असें समजून व

---

* असाध्यं साधयत्यर्थं हेलयाभिमुखो विधिः।

‡ शङ्कयैव प्रकाशन्ते बत प्रच्छन्नपातकाः।

लहानपणीं खेळतांना बापानें 'मंडूक' असें ठेवलेलें आपलें नांव आठवून, कष्टी झालेला तो ब्राह्मण विधात्याच्या प्रेरणेनें एकाएकीं असें म्हणाला—"अरे बिचाऱ्या मण्डूका, परतंत्र झालेल्या तुझ्या मरणास हा घट कारण झाला म्हणायचा!!" हे शब्द ऐकतांच 'अहाहा! केवढें हें याचें अपूर्व ज्ञान!' असें म्हणून सर्व लोक त्याची स्तुति करूं लागले. राजानेंही मोठ्या आनंदानें त्याला अनेक ग्राम, सोनें, छत्र व वाहनें दिलीं. त्यामुळें एका क्षणांत मृत्युमुखांतून सुटलेला हरिशर्मा सामान्य राजासारखा झाला. याप्रमाणें भाग्योदय प्रसंगीं दैवच सर्व अर्थ सिद्ध करितें. राजन्, या न्यायानेंच एका सामान्य पुरुषाच्या आज्ञेनें देवालयांत गेलेल्या तेजस्वतीला हा शुभ पति अनायासें मिळाला आहे.

मंत्र्यानें सांगितलेली ही कथा ऐकून, प्रसन्न झालेल्या राजानें साक्षात् आपल्या लक्ष्मीप्रमाणें असलेली कन्या त्या राजपुत्रास विधिपूर्वक दिली. नंतर श्वशुराच्या सैन्यासह आपल्या देशांत शिरून व शत्रूंस जिंकून, सोमदत्तानें आपलें राज्य परत मिळविलें. आणि भार्येसह सुखानें काल घालविला. सखे कलिंगसेने, याप्रमाणें सर्व कांहीं दैवाच्या योगानें घडत असतें. दैवावांचून तुझ्यासारख्या सुंदरीचा सदृश वत्सेश्वराशीं संयोग कोण करणार? माझा तरी काय इलाज चालणार आहे?

सोमप्रभेचें हें एकांतांतील भाषण ऐकून कलिंगसेना वत्सेश्वराविषयीं अतिशय उत्सुक झाली. आप्तांचें भय व लज्जा यांनाही सोडून ती कामिनी प्रियसमागमाविषयीं आतुर झाल्याचें चिन्ह स्पष्ट दिसूं लागलें. इतक्यांत सायंकाल झाल्यामुळें दुसऱ्या दिवशीं येण्याचें कबूल करून मय-कन्या आकाशमार्गानें आपल्या गृहीं गेली.

---

## तरंग ५ वा.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळींच सोमप्रभा आली असतां, कलिंगसेना तिला म्हणाली,—"गडे, माझा पिता मला प्रसेनजित्-राजालाच देणार, असें मी आईच्या तोंडून ऐकिलें आहे. पण तूं तो वृद्ध आहे हें प्रत्यक्ष पाहून सांगत आहेस. वत्सेशाचें रूप कसें आहे तेंही तूं मला सांगितलेंस; पण काय चमत्कार सांगू, तुझ्या तोंडचें त्याचें तें वर्णन ऐकूनच जणुंकाय

कानांच्या द्वारा हृदयांत प्रवेश केलेल्या त्याच्याविषयीं माझें मन अतिशय उत्सुक झालें आहे. वास्तव प्राणदायिनि, मला अगोदर प्रसेनजित्-राजाला दाखवून वत्सेशाकडे घेऊन चल. मला आतां बाबांना किंवा आईला तरी घेऊन काय करावयाचें आहे ?"

असें बोलून वत्सेशाविषयीं अति उत्कंठित झालेल्या तिला सोमप्रभा म्हणाली,-" सखे, बरें आहे. यंत्रावर बसून आकाशमार्गानें आपण जाऊं. पण तूं आपलें सर्व सामान व परिजन यांस बरोबर घे; कारण एकदां वत्सेश्वराला पाहिल्यावर तूं पुनः येथें येण्यास समर्थ होणार नाहींस. तूं आपल्या आईबापांना पहाणार नाहींस. फार काय, पण तुला त्यांची आठवणही येणार नाहीं. एकदां तो प्रिय पुरुष मिळाला, म्हणजे मग दूर असलेल्या मलाही तूं विसरशील. मीही जशी येथें रोज येत आहें, तशी तुझ्या पतीच्या घरीं येणार नाहीं."-

आपल्या सखीचें तें भाषण ऐकून राजकन्या तिला रडत म्हणाली,- " गडे, असें जर असेल तर तूं त्या वत्सेश्वरालाच येथें आण. तुझ्या दर्शनावांचून मी तेथें एक दिवसही राहूं शकणार नाहीं ! चित्रलेखेनें उषे-करितां उपायानें अनिरुद्धाला नाहीं का आणलें ? तें आख्यान तुलाही माहीत असेलच, पण मी सांगतें; तें ऐक."

## १. उषेचें वृत्त.

पूर्वी बाणासुराची उषा म्हणून कन्या होती. तिनें गौरीची आराधना केली. तेव्हां-स्वप्नांत तुझा ज्याच्याशीं समागम होईल तोच तुझा भर्ता होईल, असा त्या देवीनें वर दिला. कांहीं दिवसांनीं त्याप्रमाणें तिनें स्वप्नांत एक देवकुमारासारखा सुंदर पुरुष पाहिला. त्यानें गांधर्व-विधीनें तिचें पाणिग्रहण केलें. नंतर ती जागी होऊन पहाते तों तो पुरुष तर कांहीं तिला दिसला नाहीं; पण संभोगचिह्न मात्र दिसलें. तेव्हां गौरीच्या वराला आठवून ती साध्वी दुःख, भय व विस्मय यांनीं व्याकुल झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिची दुःखी मुद्रा पाहून चित्र-लेखेनें पुष्कळ आग्रहानें विचारलें असतां, तिनें तें सर्व वृत्त सांगितलें. पण त्याचें नांव व कुल तिलाही ठाऊक नव्हतें. त्यामुळें चिंताक्रांत झालेली चित्रलेखा उषेला म्हणाली,-सखे, देवीच्या वराचा हा प्रभाव आहे; पण तूं त्याच्यापासून कांहीं खूण घेऊन ठेवली नाहींस, व त्याचें

नांवही विचारिलें नाहींस. तेव्हां आतां त्याला मी कसा व कोठें शोधूं ? आतां याला एकच उपाय आहे. मी देव, असुर व मानव यांनीं युक्त असलेलें सर्व जग चित्ररूपानें लिहितें. त्यांत पाहून व ओळखून तूं तो मला दाखीव, म्हणजे योगसिद्धीच्या योगानें मी त्याला येथें आणीन.

चित्रलेखेचें हें म्हणणें उषेलाही पटलें. तेव्हां चित्रकलेंत प्रवीण असलेल्या चित्रलेखेनें सर्व विश्व लिहिलें. त्यांत बाणासुराच्या कन्येनें द्वारवतींत यदुकुलामध्यें झालेल्या अनिरुद्धास आनंदित मनानें व कांपणाऱ्या अंगुलीनें ' हा तो ' असें म्हणून दाखविलें.

तेव्हां चित्रलेखा म्हणाली–सखे, तूं धन्य आहेस; कारण तुला मोठ्या भाग्यानें हरीचा पौत्र व मदनाचा पुत्र पति लाधला आहे. पण काय करावें ! तो येथून हजारों योजनें दूर आहे. !

तें ऐकून अधिकच उत्सुक झालेली उषा म्हणाली,–" सखे, चंदनासारख्या सुखकर असलेल्या त्याच्या अंकाचा आजच मला आश्रय न मिळाला, तर मी मुद्दाम कामाग्नीनें जळलें आहें, असेंच समज. मग माझ्या जीविताची आशा करावयास नको."–

उषेचें हें मोठ्या निराशेचें भाषण ऐकून चित्रलेखा मनांत घाबरली, व कसें तरी तिचें समाधान करून आकाशमार्गानें द्वारकेस आली. उंच शिखरयुक्त मंदिरांच्या योगानें समुद्राच्या मध्यभागीं विराजमान होत असलेल्या, त्या रम्य नगरीला चित्रलेखेनें दुरून जेव्हां पाहिलें, तेव्हां तिला सागरमंथनाची आठवण झाली. आकाशमार्गानें ती सिद्धिमती रात्रीं अनिरुद्धाच्या गृहांत शिरून व त्याच्याजवळ जाऊन, त्याला उषेच्या स्वप्नाचा वृत्तांत कळविल्यावर आकाशमार्गानेंच घेऊन परत निघाली. इकडे उषाही रात्रीं तिच्या मार्गाकडे दृष्टि लावून बसली होती. इतक्यांत ती त्या रमणाला तिच्या अंतःपुरांतच घेऊन आली. तेव्हां स्वप्नांत पाहिलेला पुरुष साक्षात् आला आहे, असें कळतांच उषेच्या आनंदास सीमाच राहिली नाहीं. त्यानंतर प्रतिजीविताप्रमाणेंच असलेल्या व सखीनें आणून दिलेल्या त्याच्या सहवर्तमान उषा तेथें आनंदानें राहूं लागली. पण तिच्या पित्याला जेव्हां हें वर्तमान कळलें, तेव्हां त्यानें रागानें त्याल कैदेंत टाकलें. तथापि अनिरुद्धानें आपल्या पितामहाच्या (म्ह. श्रीकृष्णाच्या)

सहायानें त्या असुरास जिंकून आपल्या प्रियेला द्वारकेस नेलें, व तेथें तीं दोघें शंकरपार्वतीप्रमाणें एकरूप होऊन सुखानें राहूं लागलीं.

सखे सोमप्रभे, याप्रमाणें चित्रलेखेनें एका दिवसांत उषेला अनिरुद्ध मिळवून दिला. तूं तर तिच्याहूनही अधिक प्रभाववती आहेस. यास्तव वत्सेशाला येथें घेऊन ये. गडे, उशीर लावूं नको.

कलिंगसेनेचें हें भाषण ऐकून सोमप्रभा उलट म्हणाली,—" सगळें खरें; पण चित्रलेखेसारखें मी कसें करूं ? ती असुरस्त्री असल्यामुळें तिनें परपुरुषाला उचलून नेलें. पण कुबेरकुलांतील मला तसें कसें करितां येईल ? तरी पण तुझ्या म्हणण्याप्रमाणें तुला अगोदर प्रसेनजित् राजा दाखवून वत्सेश्वराकडे नेतें. चल."

## २. कलिंगसेनेचें कौशाम्बीस गमन.

कलिंगसेनेलाही ती गोष्ट मान्य झाली, व ती सखीनें सज्ज केलेल्या मायायंत्रावर आपलें सर्व सामान घेऊन आरूढ झाली, व आईबापांस न कळवितांच ती आकाशमार्गानें निघाली. कामातुर स्त्रीजन ( प्राणी ) भरधांव पळत सुटलेल्या घोड्याप्रमाणें पुढचा उंच-सखल प्रदेश पहात नाहीं.* असो; प्रथम श्रावस्ती नगरीस जाऊन मृगयेकरितां निघालेल्या व जरेनें शुभ्र झालेल्या प्रसेनजिताला तिनें दुरूनच पाहिलें. त्याच्यावर जी शुभ्र चवरी वारली जात होती, ती आपल्याला जणुं काय या म्हाताऱ्याजवळ येऊं सुद्धां नको; दूर जा, असेंच सांगत आहेसें तिला वाटलें. सोमप्रभेनें सखे, तुझा पिता ज्याला तुला देत होता, तो हा म्हातारा प्रसेनजित् राजा चालला आहे पहा.—असें हंसून म्हटलें असतां—या म्हाताऱ्याला कोण वरतें ? तूं आतां मला कौशांबीस घेऊन चल.—असें ती म्हणाली. तेव्हां सोमप्रभा त्या कामिनीला घेऊन आकाशमार्गानें एका क्षणांत वत्सेश्वराच्या राजधानीस जाऊन पोंचली. तेथें उद्यानांत असलेल्या वत्सेशाला पाहून, ती सुंदरी एक क्षणभर देहभान विसरली. आपल्या हृदयावर हात ठेवून विस्मित झालेली ती—अग सखे, हा पहा तो राजा माझ्या शरीरांत बसला आहे, असेंच जणुं काय सुचवूं लागली. त्या मदनमूर्तीकडे बराच

---

* न हि पश्यति तुङ्गं वा श्वभ्रं वा स्त्रीजनोऽग्रतः ।
स्मरेण नीतः परमां धारां वाजीव सादिना ॥

वेळ पाहिल्यावर कलिंगसेना सोमप्रभेला म्हणाली- सखे आजच याचा-माझा समागम करून दे. त्याला पाहून मी एक क्षणभरही दूर राहूं शकत नाहीं.

त्यावर सोमप्रभा म्हणाली-पण गडे, आज मला चांगलें चिन्ह दिसत नाहीं. यास्तव तूं या उद्यानांतच आजची ही रात्र गुप्त राहून काढ. पण कोठें दूर जाऊं नकोस. उद्यां सकाळींच येऊन मी तुमच्या समागमाची कांहीं युक्ति योजीन. मी आतां आपल्या घरीं जातें.

असें सांगून व तिला त्या उद्यानांत गुप्तपणें ठेवून, सोमप्रभा स्वगृहीं गेली. वत्सराजही उद्यानांतून निघून आपल्या घरीं गेला; पण कलिंगसेनेला धीर निघेना. शकुनश सोमप्रभेच्या हितोपदेशाचेंही उल्लंघन करून, तिनें आपल्या महत्तर कंचुकीबरोबर वत्सेश्वराकडे निरोप पाठविला. तरुणींचा नूतन आरूढ झालेला मदन स्वतंत्र असतो,‡ म्हणून म्हणतात तें खोटें नव्हे.

आपल्या स्वामिनीच्या आज्ञेप्रमाणें कंचुकीही महत्तर राजमंदिरांत गेला. प्रतीहाराच्या द्वारा आपलें आगमन राजास कळवून, आंत गेल्यावर तो वत्सेश्वरास म्हणाला,-"राजन्, तक्षशिलानगराधिपति कलिंगदत्ताची कन्या कलिंगसेना आपण अतिशय रूपवान् आहां असें ऐकून, बांधवांस सोडून आपल्या अनुचरांसह मायायंत्र विमानानें आकाश मार्गानें येथें आली आहे. मयासुराची कन्या व नलकूबराची पत्नी सोमप्रभा म्हणून गुप्तसंचार करणारी ती आमच्या स्वामिनीची सखी आहे. तिनें तिला आज येथें आणिलें आहे. आपली प्रार्थना करण्याकरितां कलिंगसेनेनें मला इकडे पाठविलें आहे. तर हे प्रभो तिचा स्वीकार कर. कौमुदी व चंद्र यांच्याप्रमाणें तुमचा उभयतांचा योग होऊं दे.

महत्तराच्या तोंडचा हा निरोप ऐकून, व 'ठीक आहे' असें म्हणून त्याचें अभिनंदन करून संतुष्ट झालेल्या वत्सराजानें सुवर्ण-वस्त्र इत्यादिकांच्या योगानें त्याचा सत्कार केला. नंतर मंत्रिमुख्य यौगंधरायणास बोलावून राजा म्हणाला,-"कलिंगसेना मला वरण्याकरितां येथें आली आहे. कलिंगदत्ताच्या त्या कन्येचें रूप त्रिभुवनांत प्रसिद्ध आहे. तेव्हां त्याग करण्यास अशक्य असलेल्या तिचें पाणिग्रहण मी कधीं करूं तें सांग."

---

‡ स्वतन्त्रोऽभिनवारूढो युवतीनां मनोभवः ।

## ३. यौगंधरायणाचा मंत्र.

वत्सराजाचें तें म्हणणें ऐकून त्याच्या पुढील हिताची अपेक्षा करणारा यौगंधरायण मनांतल्या मनांत विचार करूं लागला कीं,—कलिंगसेना त्रिभुवनांत प्रख्यात आहे. तिचें स्वरूप पाहून देवही मोहित होत असतात. ती याला भार्या मिळाल्यास हा आमचा स्वामी सर्व राजकार्यें सोडून तिच्याच ठायीं आसक्त होईल. त्यामुळें देवी वासवदत्ताही प्राणत्याग करील. राजपुत्र नरवाहनदत्ताचेही हाल होतील. त्या दोघांवरील प्रेमामुळें देवी पद्मावतीही जिवंत रहाणार नाहीं. आपल्या कन्यांचा हा दुःखकर परिणाम ऐकून चंडमहासेन व प्रद्योतही एकतर प्राणत्याग करतील, अथवा याचे प्रबल शत्रू होतील. याप्रमाणें हिच्या विवाहामुळें सर्वस्व नाश होईल. बरें याला विवाह करूं नको, म्हणून म्हणावें तर तेंही प्रशस्त नव्हे, त्यामुळें याचें व्यसन अधिकच वाढेल, यास्तव याला कालक्षेप करावयास लावलें पाहिजे.

असा पुष्कळ विचार करून तो मंत्रिवर्य म्हणाला,—"कलिंगसेना स्वतः येऊन आपली दासी झाली, यावरून आपल्या सर्वोत्तम भाग्याचें अनुमान होत आहे. या संबंधामुळें तिचा पिताही सहजच मित्र होईल. यास्तव ज्योतिष्यांना विचारून शुभ लग्नावर यथाशास्त्र आपण हिचें पाणिग्रहण करावें. कारण ही फार मोठ्या राजाची कन्या आहे. तूर्त तिला रहाण्याकरितां तिच्या योग्य गृह, दास, दासी, वस्त्रें, आभरणें इत्यादि अर्पण करावें."

हितकर मंत्र्याचें हें म्हणणें मान्य करून, आनंदित झालेल्या उदयनानेंही तिची सर्व उत्तम व्यवस्था लावून दिली. तेव्हां कलिंगसेनाही राजानें नियत केलेल्या त्या आपल्या नूतन अंतःपुरांत गेली, व आपला मनोरथ आतां लवकरच पूर्ण होणार, म्हणून ती आनंदित झाली.

तिकडे बुद्धिमान् यौगंधरायणही आपल्या घरीं जाऊन असा विचार करूं लागला कीं,—प्रायः अशुभ कार्याला उशीर लावणें हाच त्याचा प्रतीकार आहे.* पूर्वी इंद्राला वृत्रवधामुळें ब्रह्महत्या लागून तो कोठें नाहींसा झाला असतां, नवीन इंद्र नहुष शचीकरितां अत्यंत उत्सुक झाला.

---

* प्रायोऽशुभस्य कार्यस्य कालहारः प्रतिक्रिया ।

तेव्हां शरण आलेल्या इंद्रपत्नीचें पातिव्रत्य राखण्याकरितां बृहस्पतीनेंही आज, उद्यां, संध्याकाळीं, असे वायदे करीत, ब्राह्मणशापानें तो पतित होई तों, उशीर लावला होता. आणि त्यामुळेंच शचीच्या शीलाचें रक्षण होऊन, ती पुनः आपल्या पतीला भेटली. त्याचप्रमाणें मलाही या कलिंगसेनेच्या विवाहास उशीर लावला पाहिजे. असा विचार करून त्यानें ज्योतिष्यांशींही संकेत केला, व त्यांना दूरचा मुहूर्त काढावयास गुप्तपणें सांगितलें.

इतक्यांत वासवदत्तेला हा वृत्तांत कळला. तेव्हां तत्काल यौगंधरायणाला बोलावून, प्रणाम करून बसलेल्या त्याला ती रडत म्हणाली, "आर्य, मागें तुम्ही मला, 'हा यौगंधरायण जिवंत असेपर्यंत हे देवि, तुला पद्मावतीवांचून दुसरी सवत होणार नाहीं'—असें सांगितलें होतें. पण आतां पहा, या कलिंगसेनेशीं विवाह होत आहे. ती अतिशय रूपवती आहे. त्यामुळें आर्यपुत्राचें तिच्यावर अतिशय प्रेम बसलें आहे. पण याचा परिणाम कसा होईल तें समजलें कां? तुम्ही सर्व मंत्री खोटे ठराल व मी मरेन.'

त्यावर यौगंधरायण म्हणतो—देवि, असा धीर सोडूं नको. मी जिवंत असेपर्यंत हें कृत्य शेवटास जाणार नाहीं, हें तूं निश्चयानें समज. पण तूं मात्र या राजाच्या प्रतिकूल आचरण करूं नकोस; उलट, धैर्य धरून अधिक अनुकूलता दाखीव. रोग्याच्या इच्छेविरुद्ध गेल्यास तो वैद्याच्या आज्ञेंत रहात नाहीं, यास्तव त्याच्या अनुकूल बोलूनच वैद्याला औषधोपचार करावा लागतो. स्वामीच्या विरुद्ध गेल्यास तो आपल्या हातांतून निसटून जाईल, हें ध्यानांत ठेवून तो जेव्हां जेव्हां येथें येईल, तेव्हा तेव्हां मनांतील रोष व दुःख मनांतच गुप्त ठेवून, तूं त्याची पूर्वीप्रमाणें सेवा कर. कलिंगसेनेच्या पाणिग्रहणाविषयीं तूं आपली अनुकूलताच व्यक्त कर. त्यामुळें आपल्या राज्याची वृद्धि होईल व तिचा पिता मित्र होईल. इत्यादि गोड गोड बोलून त्याला आपलासा करून घे, म्हणजे हा आपला राजा तुजवर अधिक स्नेह करूं लागेल. तुझ्या मनाप्रमाणेंच सतत वागेल व कलिंगसेना येथेंच असल्यामुळें तिच्याविषयींही तो फारसा उत्सुक होणार नाहीं. कारण जसें जसें निवारण

करूं लागावें, तशी तशी विषयेच्छा प्रबल होऊं लागते.* देवि, आपल्या देवी पद्मावतीलाही तूं असेंच शिकवून ठेव. असें झालें म्हणजे मी लावीत असलेला उशीर तो सहन करील. पुढें काय करावयाचें तें मी अगोदरच ठरवून ठेविलें आहे. माझी युक्ति व बुद्धिबल किती उत्तम आहे, तें तूं धीर धरून पहा तर खरें! संकट प्रसंगीं बुद्धिमानाची परीक्षा होते, व समरांत शूरांची परीक्षा होते.† यास्तव देवि, अशी खिन्न होऊं नकोस.

असा बोध करून व तिनें आपलें म्हणणें मान्य केलें आहे, असें पाहून यौगंधरायण तेथून गेला. वत्सेश्वर त्या दिवशीं व रात्रींही त्या दोघींपैकीं एका राणीच्याही अंतःपुरांत आला नाहीं. आपोआप प्राप्त झालेल्या कलिंगसेनेच्या नूतन समागमाविषयीं अत्यंत उत्सुक झालेल्या त्यानें, त्याविषयींच अनेक मनोराज्यें करीत तो दिवस घालविला. तिकडे वासवदत्ता, पद्मावती, यौगंधरायण व ती कलिंगसेना यांनींही आपआपल्या घरांत बसून अनेक विचित्र संकल्प करण्यांत कशी तरी ती रात्र संपविली.

---

## तरंग ६ वा.

### कलिंगसेनेचा वृत्तान्त.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच आन्हिक आटोपून सुज्ञ यौगंधरायण वाट पहात असलेल्या वत्सराजाकडे आला, व हात जोडून म्हणाला,–" प्रभो, कलिंगसेनेशीं विवाह करावयास आजच उचित मुहूर्त कां पहात नाहीं."– तें ऐकतांच उदयन म्हणतो–माझ्या मनांतही तेंच आहे; कारण माझें मन एक क्षणभरही तिच्यावांचून रहावयास समर्थ नाहीं. राजाचें हें म्हणणें ऐकतांच यौगंधरायणानें जवळच असलेल्या प्रतीहारीस पाठवून ज्योतिष्यांस आणविलें, व त्यांस राजाच्या विवाहास अनुकूल मुहूर्त काढून द्यावयास सांगितलें असतां, मंत्र्यांशीं पूर्वीच झालेल्या संकेताप्रमाणें त्यांनीं आजपासून सहा महिन्यांनीं राजाला अनुकूल मुहूर्त आहे, त्यापूर्वीं

---

* वार्यमाणस्य वाञ्छा हि विषयेष्वभिवर्तते।

† संकटे हि परीक्ष्यन्ते प्राज्ञाः शूराश्च संगरे।

चांगला मुहूर्त नाहीं, असें सांगितलें. तेव्हां तें ऐकून रागावल्यासारखें करून 'एः, या खुळ्यांना राजकार्याचें महत्त्व कळत नाहीं,' असें म्हणून व 'महाराज, आपला जो ज्ञानी–ज्योतिषी आहे त्याला आणवून विचारावें.' असें वत्सेश्वरास सांगितलें. त्याबरोबर खिन्न झालेल्या राजानेंही तत्काल त्याला आणवून सुमुहूर्त विचारिला. पण या नीतिज्ञ महामंत्र्यानें त्याच्याशींही पूर्वीच संकेत करून ठेविला होता, त्याप्रमाणें त्यानेंही सहा महिन्यांपूर्वीं चांगला मुहूर्त नाहीं, असेंच सांगितलें. तेव्हां राजा उद्विग्न झाला आहे, असें पाहून महामंत्री म्हणाला,–"देव आतां काय करावें? मला तर कांहीं उपाय सुचत नाहीं."—

सुज्ञ मंत्र्याचें असें निराशेचें भाषण ऐकून सुमुहूर्ताची इच्छा करणारा, पण कलिंगसेनेविषयीं उत्सुक झालेला वत्सराज विचार करून म्हणाला,– "कलिंगसेनेला भेटून, तिचें म्हणणें काय आहे तें पहा." त्याबरोबर तो महामंत्री गणकांना बरोबर घेऊनच त्या राजकन्येकडे गेला. तिनेंही त्या श्रेष्ठाचें मोठें आदर–आतिथ्य केलें; पण तिचें तें परम उत्कृष्ट रूप पाहून तो आपल्या मनांत 'या लावण्यलतिकेची प्राप्ति झाली, म्हणजे हा आमचा राजा खचित राज्यही घालवील.' असें म्हणून–मी या जोशांसह विवाहलग्न ठरवावयास आलों आहें, आपलें जन्मनक्षत्र काय आहे तें यांना सांगावें, असें मोठ्या गंभीरपणानें बोलला. तेव्हां तिच्या परिजनांनीं जन्मनक्षत्र सांगितलें असतां, जोतिष्यांनीं गणिताचा खोटाच आव घालून बराच खल केल्यावर 'सहा महिन्यांपूर्वीं चांगला मुहूर्त लाभत नाहीं' असें त्यांनीं तेथेंही सांगितलें. तें ऐकून कलिंगसेना मनांत फार खिन्न झाली. तथापि तिचा रक्षक कंचुकी म्हणाला,–"या दोघांचें परम कल्याण होईल, असें शुभ लग्न अगोदर पाहिलें पाहिजे, मग तें जवळ असो कीं लांब असो."

वृद्धमहत्तराचें तें वचन ऐकून सर्वांनीं त्याला आपलें अनुमोदन दिलें, व त्याच्या शहाणपणाची प्रसंशा केली. यौगंधरायणही–कुलग्नावर विवाह केल्यास तें आमच्या भावीसंबंधी कलिंगदत्तालाही आवडणार नाहीं,–असें म्हणाला. तेव्हां निरुपाय झाल्यामुळें कलिंगसेनाही 'तुम्हांला जसें उचित दिसेल तसें करा.' असें म्हणून मुकाट्यानें बसली. त्याबरोबर हीच तिची संमति आहे, असें जाणून व तिचा निरोप घेऊन यौगंध-

रायण जोशांसह वत्सेश्वराकडे परत आला. आणि तिचें म्हणणें राजाला कळवून व त्याचें समाधान करून तो धुरंधर मंत्री आपल्या घरीं गेला.

नंतर पुढील कार्याकरितां आपल्याला इष्ट असलेला अवकाश मिळाला आहे, असें पाहून त्यानें योगेश्वर नामक ब्रह्मराक्षस–मित्राचें स्मरण केलें. त्याबरोबर पूर्वी केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें तो त्याच्यापाशीं आला, व 'माझें स्मरण कां केलेंस ?' असें त्यानें विचारिलें असतां, कलिंगसेनेचा सर्व वृत्तांत सांगून तो महामंत्री म्हणाला-मित्रा, त्या दोघांचा विवाह मी युक्तीनें लांबविला आहे. आपल्याला आतां सहा महिन्याचा अवकाश सांपडला आहे, यास्तव तूं आजपासून त्या सुंदरीच्या हालचालींवर गुप्तपणें लक्ष ठेव. सिद्ध व विद्याधर त्या अमानुष रूपवतीची इच्छा खचित करीत असतील, तेव्हां त्यांतील कोणाशीं ही संगत झाली आहे, असें तुला आढळल्यास मला लागलेंच सांग. गुप्त राहून पहात असलेल्या तुझ्या दृष्टीनें आम्हांला तिचें गुप्त कळलें, म्हणजे परपुरुषाचे ठायीं आसक्त असलेल्या तिच्याविषयीं राजाचें मन कलुषित होईल व त्यामुळें आमचें इष्ट कार्य साधेल.

मंत्रि–मित्राचें तें भाषण ऐकून राक्षस म्हणाला–इतकें कशाला हवें. ? तुम्हीं सांगत असाल तर मी तिला युक्तीनें नाहींशीं करून अथवा मारून टाकीन, म्हणजे उगीच जास्त पंचाईत करायला नको. त्यावर यौगंधरायण म्हणाला–"छे, छे असें मनांतही आणूं नकोस. त्यामुळें मोठा अधर्म होईल. जो धर्मघात न करितां योग्य मार्गानें कार्यसिद्धीविषयीं प्रयत्न करीत रहातो, त्याला तो धर्मच परिणामी साह्य करतो, असा अबाधित नियम आहे.* यास्तव मित्रा, तिच्या हातूनच घडणारा दोष तूं पहात रहा."–तेव्हां 'बरें आहे' असें म्हणून तो कलिंगसेनेच्या येथें गुप्तपणें जाऊन राहिला.

इतक्यांत मयासुराची कन्या सोमप्रभा तिच्यापाशीं आली, व रात्रीची वार्ता विचारून ब्रह्मराक्षस ऐकत असतांना ती कलिंगसेनेला म्हणाली,– "आज सकाळींच उद्यानांत नसलेल्या तुला शोधित मी येथें आलें; पण

---

* यश्च धर्ममबाधित्वा स्वेन संचरते पथा ।
तस्योपयाति साहाय्यं स एवाभीष्टसिद्धिषु ॥

यौगंधरायण येथें बसला आहे, असें पाहून मी तुझ्या बाजूलाच गुप्तपणें उभी राहिलें. तुमचें भाषण मी ऐकलें, व सर्व वृत्तांत मला कळला. पण अग खुळे, मी तुला सांगितलें असतांनाही, तूं उतावीळपणानें हें काय केलेंस ! दुर्निमित्ताचें निवारण केल्यावांचून इष्टकार्याला आरंभ केल्यास त्याचा परिणाम चांगला होत नाहीं. याविषयीं मी तुला एक गोष्ट सांगतें ती ऐक."—

## २. विष्णुदत्त व त्याचे मित्र यांची कथा.

पूर्वी अंतर्वेदीमध्यें वसुदत्त म्हणून ब्राह्मण असून विष्णुदत्त हा त्याचा पुत्र होता. सोळा वर्षे पुरीं झालीं असतां, विद्याभ्यासाकरितां तो वलभी नगरीला जावयास तयार झाला. तेव्हां त्याच्याबरोबरचे दुसरे सात ब्राह्मण-पुत्रही त्याला सोबती मिळाले. पण ते सातही मूर्ख असून केवल तोच एकटा विद्वान् व कुलीन होता. त्यांच्याशीं एकमेकांस न सोडण्याची शपथपूर्वक प्रतिज्ञा करून विष्णुदत्त आईबापांच्या न कळत रात्रीं तेथून निघाला. पण प्रस्थानसमयींच त्यांना अकस्मात् पुढें अशुभ निमित्त दिसलें. तें पहातांच विष्णुदत्त आपल्या अनुयायींस म्हणाला,—" अरेरे, आपल्याला आज हा अपशकून झाला आहे. यास्तव, आतांच पुढें न जातां परत फिरून व पुनः चांगला मुहूर्त पाहून निघावें हें बरें."—

पण तें ऐकून त्याचे सातही मित्र म्हणाले,—" बाबारे, अशा उगीच शंका घेत बसूं नकोस. आम्ही कांहीं असल्या अपशकुनांना फारसे मोजीत नाहीं. तुला भय वाटत असेल तर तूं परत जा. आम्ही आपले आजच पुढें जाणार. कारण सकाळीं आमचा वृत्तांत कळल्यावर आमचे आप्त पुनः आम्हांला जाऊं देणार नाहींत."—

मित्रांचें तें भाषण ऐकून शपथेनें बांधला गेलेला विष्णुदत्त, मोठ्या अडचणींत पडला, व निरुपायास्तव पापनाशक हरीचें स्मरण करीत, तो त्यांच्याबरोबर पुढें जाऊं लागला. उजाडतांना त्याला आणखीं एक दुर्निमित्त दिसलें. तेव्हां पुनः तो त्यांना परतावयास सांगूं लागला. पण ते सर्व निर्भर्त्सना करीत त्याला म्हणाले,—"अरे, भित्र्या पदोपदीं कावळ्याप्रमाणें साशंक होणाऱ्या तुला आम्ही आपल्याबरोबर आणलें, हाच आम्हांला मोठा थोरला अपशकून झाला आहे."—इतकें बोलून ते पुढें जाऊं

लोंगले. तेव्हां-स्वेच्छेनें वागणाऱ्या मूर्खांना उपदेश करूं नये, कारण विष्ठेला संस्कार करूं लागल्यास अंग मलिन झाल्यावांचून कसें राहील?* पुष्कळ मूर्खांमध्यें पडलेल्या एका शहाण्याची अवस्था जलतरंगांतील कमलासारखी झाल्यावांचून कशी राहील? यास्तव पुनः यांना हिताहिताचा उपदेश करून उपयोगीं नाहीं. यांच्या मागून मुकाट्यानें जावें; दैव सर्व कांहीं शुभ घडवून आणील.-असें मनांत म्हणून विष्णुदत्तही गुपचूप त्यांच्या मागून चालला.

सायंकाळीं तें सर्व मंडल एका भिल्लाच्या गांवांत जाऊन पोंचलें. तेव्हां विष्णुदत्तानें गांवभर फिरून, ज्यांत एक तरुण स्त्री रहात होती अशा एका घरीं जाऊन रात्रभर रहाण्यापुरती जागा मागितली. तेव्हां तिनें जागा देण्याचें कबूल करून, एक रिकामें घर उघडून दिलें. तेव्हां विष्णुदत्त आपल्या सोबत्यासह त्यांत शिरला. कांहीं वेळानें ते सातही मूर्ख स्वस्थ पडून घोरूं लागले; पण त्या घरांत दुसरें कोणी नसल्यामुळें विष्णुदत्त जागत राहिला. अज्ञ जन नेहमींच असे निद्रालु असतात; पण विवेक्यांना झोंप कोठली येणार?† असो; इतक्यांत एक तरुण पुरुष गुप्तपणें त्या स्त्रीच्या घरांत शिरला, व त्याच्याशीं ती कांहीं गुजगुजत रममाण झाली. थोड्याच वेळानें रतिश्रांत झालेल्या त्या दोघांनाही दैववशात् झोंप लागली. तो सर्व पापप्रकार उघड्या दारांतून पाहून खिन्न झालेला तो ब्राह्मणपुत्र मनांत म्हणाला,-"अरेरे, या दुराचारिणीच्या घरांत आज कोठून व कसे आलों, कोण जाणे! हा तरुण हिचा विवाहाचा पति खचित नव्हे; कारण तसें असतें तर हा असा लपत छपत व भीत भीत कां आला असता! ही अशी आहे हें मला अगोदरच कळलें नाहीं. पण दुसरें घर न मिळाल्यामुळें मीं येथें येऊन राहिलों, हें या माझ्या सोबत्यांनाही ठाऊक आहे, एवढें तरी बरें आहे."—

विष्णुदत्त असा विचार करीत आहे, तोंच बाहेरून मनुष्यांचा शब्द त्याला ऐकूं आला. लागलाच ठिकठिकाणीं आपल्या अनुचरांस उभे

---

* नोपदेशो विधातव्यो मूर्खस्य स्वाभिचारिणः ।
संस्कारोऽवस्करस्येव तिरस्कारकरो हि सः ।

† स्वपन्त्यज्ञा हि निश्चेष्टाः कुतो निद्रा विवेकिनाम् ।

करून, आंत येत असलेला शबराधिप त्याला दिसला. तो त्या तरुण जारालाच शोधीत होता; पण त्या निजलेल्या सात जणांना व जागणाऱ्या विष्णुदत्ताला पाहून 'तुम्ही कोण?' असें विचारून 'आम्ही वाटसरू आहों' असें उत्तर मिळालें असतां तो नागवी तरवार घेऊन आंतल्या घरांत गेला. तेथें जाराच्या गळ्यांत हात घालून निजलेल्या आपल्या भार्येला पहातांच क्रोधानें त्यानें जाराचा शिरच्छेद केला, व त्या जारिणीला न उठवितां व तिचा निग्रह न करितां तो क्रूर पुरुष तरवार भूमीवर ठेवून पर्यंकावर निजला. अंतर्गृहांत ढळढळीत दिवा तेवत असल्यामुळें विष्णुदत्ताला हें सर्व कृत्य बाहेरून स्पष्ट दिसत होतें. तें पाहून तो मनांत म्हणाला-ही स्त्री आहे असें समजून यानें या आपल्या भार्येला न मारतां स्त्रीहारक जाराला मारलें हें चांगलें केलें; पण असलें घोर कर्म करूनही हा असा येथें स्वस्थ निजला आहे, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें अथवा शूरांचें धैर्य विलक्षण असतें हेंच खरें.*

विष्णुदत्त जों असा विचार करीत आहे, तोंच ती तरुण स्त्री जागी झाली. तिनें त्या मारलेल्या जाराला व निजलेल्या पतीला पाहिलें, आणि ती लागलीच उठली. तिनें आपल्या जाराचें धड खांद्यावर उचलून घेतलें व शिर हातांत घेतलें, आणि बाहेर जाऊन एका मोठ्या राखेच्या राशींत तीं दोन्ही टाकून दिलीं. विष्णुदत्तही तिचें हें घोर कृत्य पहाण्याकरितां तिच्या मागून जाऊन ती आंत येण्यापूर्वींच स्वस्थानीं येऊन मुकाट्यानें बसला. इतक्यांत ती दुर्जनी परत येऊन आपल्या घरांत गेली, व भूमीवरील तीक्ष्ण तरवार घेऊन तिनें आपल्या निद्रित पतीचें मस्तक उडविलें, आणि ती राक्षसी बाहेर असलेल्या आपल्या भृत्यांना ऐकूं जाईल, एवढ्या मोठ्यानें 'हाय हाय, घात झाला. या वाटसरूंनीं माझ्या पतीला ठार मारलें! धांवा, धांवा,' असें म्हणून ओरडत बाहेर पडली. त्याबरोबर ते अनेक अनुचर शस्त्रें घेऊन आंत शिरले व आपल्या स्वामीची दुर्दशा पाहून विष्णुदत्तादिकांच्या अंगावर शस्त्रें उगारून चालले. ते सात मूर्ख ज्या खोलींत निजले होते, त्यांत शिरल्यावर त्या क्रूरांनीं त्यांना लाथा मारून जागें केलें. तेव्हां ते सर्व अतिशय घाबरले.

*......... चित्रं वीर्यमुद्रिक्तचेतसाम्।

पण इतक्यांत विष्णुदत्त पुढें होऊन त्यांस म्हणाला,—"बाबांनों, तुम्ही उगीच आम्हां निरपराध्यांना मारून ब्रह्महत्या करूं नका. अन्य पुरुषावर आसक्त असलेल्या हिनेंच आपल्या पतीला मारलें आहे. मी या उघडया दारांतून हिचें सर्व पापकर्म आपल्या या डोळयांनीं पाहिलें आहे; पण त्याबद्दल तुम्ही मला क्षमा कराल, तर मी तुम्हांला सर्व सांगेन "—असें म्हणून त्यानें त्यांना पहिल्यापासून सर्व वर्तमान सांगितलें, व बाहेर नेऊन राखेंत टाकलेले जाराचे दोन तुकडेही प्रत्यक्ष दाखविले. तेव्हां हे वाटसरू निरपराधी आहेत, असें त्या भिल्लांना वाटलें. खरी गोष्ट फुटल्यामुळें त्या पापिणीचेंही तोंड उतरलें, व त्यांनीं तिला दरडावून विचारलें असतां, तिनें सर्व अपराध कबूल केला. तेव्हां त्या कुलटेचा तिरस्कार करून ते म्हणाले,—"काममोहित झालेली स्त्री निःशंकपणें साहस करूं लागते, व एकदां ती पराधीन झाली कीं, एखाद्या तीक्ष्ण तरवारीप्रमाणें पाहिजे त्याचा प्राण घेण्यास तयार होते."§ असो; राजकन्ये, इतकें बोलून त्या क्रूर भिल्लांनींही विष्णुदत्तादिकांस सोडून दिलें. तेव्हां आनंदित झालेले ते सातही मूर्ख 'या मृत्यूच्या दाढेंत स्वस्थ घोरत पडलेल्या आम्हांला आज तूंच जागें राहून वांचविलेंस. अपशकुनामुळें प्राप्त होणाऱ्या मृत्यूच्या तोंडांतून आम्हांला सोडविणारा तूंच परोपकारी आहेस, आमच्या दुर्वचनाची आम्हांला क्षमा कर.' इत्यादि बोलून व पायांपडून विष्णुदत्ताला प्रसन्न करूं लागले. नंतर प्रातःकाळीं ते सर्व तेथून पुढच्या मार्गाला लागले. त्या दिवसापासून त्यांनीं विष्णुदत्ताची अवज्ञा केली नाहीं.

सखे कलिंगसेने, याप्रमाणें एखाद्या कार्याला आरंभ केला असतां, जर कांहीं अशुभ निमित्त दिसलें, तर त्या कार्याला विलंब लावून अशुभाला टाळलें पाहिजे, नाहींतर तें संकटांत पाडल्या वांचून रहात नाहीं. अशावेळीं शहाण्यांच्या हितोपदेशाची अवज्ञा केल्यास पुढें पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येतो. माझ्या हितवचनाचा अनादर करून, काल अशुभ वेळीं तूं आपला दूत वत्सेश्वराकडे पाठविलास; पण तें तुझें कृत्य अगदीं अयोग्य होतें. अजून तरी दैव, तुझा विवाह निर्विघ्नपणें करो, म्हणजे

§ स्मराकृष्टा तनोत्येव या साहसमशङ्किता ।
सा परस्वीकृता कुस्त्री कृपाणीव न हन्ति कम् ॥

झालें. तूं कुलग्नावर घरांतून निघालीस, म्हणून हें असें झालें. तुझ्या रूपाकडे पाहून देवही सकाम होत असतात. त्यास्तव तूं आपलें शील राख, नीतिनिपुण मंत्री यौगंधरायणाविषयीं तूं सावध रहा. तुझ्याशीं विवाह केल्यास राजा व्यसनी होईल, असें समजून तो तुझ्या विवाहांत विघ्न उत्पन्न करील. विवाह झाल्यावरही त्यांत दोष काढील. तुला जिवानिशी मारविण्यासही तो धूर्त कमी करणार नाहीं. अथवा धार्मिक असल्यामुळें तो तुझी प्रत्यक्ष हिंसाच करणार नाहीं, तथापि तूं वत्सराजाची भार्या होणार नाहींस, अशी तो प्रत्येक युक्ति योजील. तसाच तुला आपल्या सवती विषयींही विचार केला पाहिजे. याविषयीं मी एक कथा सांगतें ती ऐक.

## ३. कदलीगर्भेची कथा.

विश्वामित्रानें वसविलेली एक इक्षुमती नांवाची नगरी असून, तिच्या जवळ त्याच नांवाची एक नदी होती. त्या नदीच्या कांठीं एक वन असून त्यांतील आपल्या आश्रमांत, मंकण नांवाचा मुनि वर पाय करून तप करीत होता. इतक्यांत गगनांतून उतरलेल्या मेनकेचें वस्त्र वाऱ्यानें उडालें आहे, असें त्या मुनीला दिसलें. त्या बरोबर त्याच्या मनांत कामसंचार होऊन त्याचें रेत कदलीमध्यें पडलें; पण तत्क्षणीं त्यापासून एक सर्वांग सुंदर कन्या झाली. महर्षींचें वीर्य असेंच अमोघ असतें, कदलीच्या सोपटांतून ती कन्या झाल्यामुळें मंकणमुनीनें कदलीगर्भा असेंच तिचें नांव ठेविलें. पूर्वी रंभेला पाहून गौतमाचें वीर्य गळलें असतां, त्यापासून उत्पन्न झालेली द्रोणपत्नी कृपी जशी गौतमाच्या आश्रमांत वाढली, तशीच कदलीगर्भाही आपल्या पित्याच्या आश्रमांत मोठी झाली. एकदां मध्यदेशांतील एक दृढवर्मा राजा मृगयाकरितांना घोडा उधळल्यामुळें तेथें आला. त्यानें मुनिकन्येला उचित असलेल्या वेषानेंच शोभणाऱ्या व केवल वल्कल धारण करणाऱ्या तिला पाहिलें. त्याबरोबर त्याचें मन तिच्यावर इतकें बसलें कीं, तो आपल्या अंतःपुरांतील सर्व स्त्रियांना विसरला. दुष्यंताला जशी कण्वकन्या प्राप्त झाली, तशी ही कोणच्याशा ऋषीची कन्या मला मिळेल काय ? असें जों तो राजा मनांत म्हणत आहे, तों समिधा दर्भ इत्यादि घेऊन येत असलेला मंकण, त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर घोड्यावरून उतरून त्या ब्राह्मणभक्त राजानें मुनीला

वंदन केलें, व त्यानें प्रश्न केला असतां आपलें नांव व गोत्र सांगितलें. तेव्हां कदलीगर्भेला बोलावून 'वत्से, या अतिथी राजाला अर्घ्य व पाद्य दे'; अशी मुनीनें आज्ञा केली. त्याप्रमाणें तिनें समर्पण केलेल्या आतिथ्याचा स्वीकार केल्यावर राजा अति नम्रपणानें 'भगवन्, ही अशाप्रकारची कन्या आपल्याला कशी लाभली' असें मंकणास विचारूं लागला. तेव्हां मुनीनें तिची उत्पत्ति कशी झाली, व कदलीगर्भा असें नांव कां ठेविलें, इत्यादि सर्व सांगितलें. तें ऐकून मेनकेविषयींच्या संकल्पापासून झालेली ही रमणी आपल्याला योग्य आहे, असें जाणून त्या दृढवर्म्यानें तिची मागणी केली. तेव्हां हा योग्य वर आहे व कन्या परकीय धन आहे, तें केव्हां तरी द्यावें लागणारच असा मनांत विचार करून मुनीनें ती त्याला यथाविधि दिली. पूर्वींच्या लोकांचा प्रभाव दिव्य असे, त्यांचें चेष्टित अविचार्य असतें.

इतक्यांत दिव्य प्रभावानें तें जाणून इतर अप्सरांसह मेनकाही तेथें आली व त्यांनीं मोठ्या प्रेमानें त्यांचा लग्नसोहाळा केला, आणि कदलीगर्भेच्या हातांत मोहऱ्या देऊन, त्या तिला म्हणाल्या, "वत्से, जातांना मार्गामध्यें या पेरीत जा. म्हणजे तुझ्या या भर्त्यानें जर तुझी कधीं अवज्ञा केली व तुला परत यावयाचें झालें, तर यांच्या झाडांवरून तुला येथें येण्याचा मार्ग सहज कळेल. अप्सरानीं असें असें सांगितलें असतां दृढवर्मा विवाहित कदलीगर्भेला घोडयावर बसवून आपल्या राजधानीकडे परत निघाला. इतक्यांत त्याच्या मागून येत असलेलें सैन्यही त्याला भेटलें, व रस्त्यानें मोहऱ्या पेरीत असलेल्या भार्येसह तो राजा आपल्या नगरीस पोंचला. नंतर तिच्या विवाहाचा वृत्तांत मंत्र्यांस सांगून अन्य पत्नींविषयीं विरस झालेला तो कदलीगर्भेच्या अंतःपुरांतच सदा राहूं लागला.

तेव्हां त्यामुळें अतिशय दुःखित झालेली त्याची महादेवी त्याच्या मंत्र्याला एकांतांत बोलावून, व आपण केलेल्या उपकाराची आठवण देऊन त्याला म्हणाली,-"नूतन भार्येच्या ठायीं आसक्त झालेल्या राजानें माझा त्याग केला आहे, यास्तव माझी ही सवत येथून कोठें जाईल असें कर."

तें ऐकून मंत्री म्हणाला-देवि, माझ्यासारख्या परम अनुरक्त भक्ताला प्रभूच्या पत्नीचा नाश करणें, अथवा त्या दोषांची ताटातूट करणें अगदीं

शोभत नाहीं. असल्या कृत्यांत कपटप्रयोगादिकांचा उपयोग करावा लागतो; पण तो आमचा विषय नव्हे. त्याच कामाकरितां ढोंगी वेष धारण करणाऱ्या धूर्त तापसींचा हा विषय आहे; कारण कपटामध्यें निपुण असलेल्या त्या बेधडक घरांत जाऊन असलीं कृत्यें करितात.

हे त्याचे शब्द कानीं पडतांच तिला लाज वाटली, व जणुं काय त्याच्यापासून चांगलाच उपदेश मिळाला आहे, असें दाखवून 'मग मला तरी असलें निंद्य कर्म करून काय करावयाचें आहे ?' असें म्हणाली; व त्या मंत्र्याची रवानगी करून तिनें चेटीला पाठवून एका तापसीला आणविलें. आपला सर्व मनोरथ सांगितल्यावर 'कार्यसिद्धि झाल्यास मी तुला पुष्कळ धन देईन' असेंही महाराणीनें कबूल केलें. तेव्हां धनाच्या लोभानें ती कुतापसी आर्त झालेल्या राजपत्नीला म्हणाली, "बाईसाहेब, हें काय अगदींच क्षुल्लक कार्य आहे. पण याहून मोठें कार्यही पाहिजे तर मी साधून देईन. मला नानाप्रकारच्या युक्त्या ठाऊक आहेत."—असें सांगून व राणीचें आश्वासन करून ती तापसी निघून गेली. आणि आपल्या मठास पोंचल्यावर भयभीत झालेली ती असें चिंतन करूं लागली. 'हर हर; मोटी भोगाशा कोणाची दुर्दशा करणार नाहीं ?§ मी राणीपुढें प्रतिज्ञा तर केली, पण मला कपटयुक्त्या मुळींच अवगत नाहींत. सामान्य लोकांच्या येथल्याप्रमाणें राजांच्या येथें खोटें बोलूनही उपयोग नाहीं; कारण ते समर्थ असल्यामुळें एकादे वेळीं प्राणही घ्यावयाचे ! आतां याला उपाय आहे. एक न्हावी माझा मित्र आहे. त्यानें जर उद्यम केला, तर तो असल्या कामांत मोठा कुशल असल्यामुळें, यांत यश येईल'

असा विचार करून ती त्या नापिताकडे गेली व तिनें आपलें इष्ट कार्य त्याला सांगितलें. तेव्हां तो धूर्त व वृद्ध नापित मनांत विचार करूं लागला कीं,-आज माझ्या मोठ्या भाग्यामुळेंच मला हें लाभस्थान प्राप्त झालें आहे. पण नव्या राजपत्नीला पीडा देणें प्रशस्त नाहीं. तिचें रक्षण केलें पाहिजे; कारण तिच्या दिव्यदृष्टि पित्याला आमचें सर्व कपट कळेल, व तो राजाला सांगेल. यास्तव या देवीला राजापासून कांहीं दिवस

§ अहो अतीव भोगाशा कं नाम न विडम्बयेत् ।

दूर करून आपण बक्षिस मिळवावें ह्मणजे झालें. वाईट कामांत† सहाय करणाऱ्या सेवकाशीं प्रभु सेवकाप्रमाणें वागूं लागतो. यास्तव हिला दूर करून योग्य समयीं तें राजालाही कळवावें. ह्मणजे राजा व ती ऋषि-कन्या अशा दोघांनाही मी प्रिय होईन. असें केल्यास फारसें पाप होणार नाहीं, व दीर्घकाल निर्वाहही चालेल असा विचार करून नापित त्या कूटतापसीला म्हणाला,–"बाई, मी हें सर्व करीन, पण राजाच्या नव्या भार्येला युक्तीनें मारल्यास व तें त्याला कळल्यास तो आम्हां सर्वांना मारून टाकील; स्त्रीहत्येचें पातक लागेल व तिचा पिता शाप देईल. यास्तव बुद्धिसामर्थ्यानें मी तिला राजापासून दूर करितों. म्हणजे देवी संतुष्ट होईल व आम्हांला धन मिळेल. मला ही कांहीं मोठी कठीण गोष्ट वाटत नाहीं. माझें विज्ञान किती आहे तें मी तुला सांगतों ऐक."

या दृढवर्मा–राजाचा पिता दुःशील होता. मी आपल्या ज्ञातीचें उचित कर्म करणारा त्याचा भृत्य होतों. एकदां फिरत असतांना त्यानें माझ्या भार्येला पाहिलें, व सुरूप व तरुण असलेल्या तिच्यावर त्याचें मन गेलें. माझ्या परिजनापाशीं विचारपूस केल्यावर ती नापित–स्त्री आहे, असें त्याला कळलें असतां 'अंः, तो न्हावी मला काय करणार?' असें म्हणून तो पापी राजा माझ्या घरांत शिरला, व आपल्या इच्छे-प्रमाणें तिचा भोग घेऊन निघून गेला. कर्मधर्मसंयोगानें मी त्या दिवशीं कोठें बाहेर गेलों होतों. दुसऱ्या दिवशीं घरीं येतांच माझ्या भार्येची कांहीं निराळी मुद्रा पाहून मी तिला विचारिलें असतां, मोठ्या तोऱ्यानें तिनें मला घडलेलें वृत्त सांगितलें. त्या दिवसापासून रोज तो दुष्ट राजा निषेध करावयास असमर्थ असलेल्या माझ्या भार्येचा उपभोग घेत असे. कुशीलानें उन्मत्त झालेल्या स्वामीला गम्यागम्य विचार कोठून अस-णार? वायूच्या योगानें भडकलेल्या वणव्याला गवताची काडी काय व अरण्य काय, सारखेंच!* पण त्याचें निवारण करण्याची शक्ति नाहीं, असें पाहून मी आपलें अन्न कमी करून क्षीण झालों, व

† कुरहस्यसहाये हि भृत्ये भृत्यायते प्रभुः ।

* कुतो गम्यमगम्यं वा कुशीलोन्मादिनः प्रभोः ।
वातोद्धूतस्य दावाग्नेः किं तृणं किंच काननम् ॥

क्षयरोग झाल्यासारखें दाखवूं लागलों. नंतर एकदां कृश, पांढरा फिक्कट व श्वास लागलेला असा मी राजाची उचित सेवा करण्याकरितां त्याच्याजवळ गेलों असतां, माझी ती अवस्था पाहून राजा गूढ अभिप्रायानें 'तूं असा कशानेंरे झालास?' म्हणून विचारूं लागला. बराच वेळ मी त्याला कांहीं सांगितलें नाहीं. पण शेवटीं तो फारच आग्रह करीत आहे, असें पाहून मी त्याला एकांतांत अभय मागून घेऊन म्हटलें,—" महाराज, माझी भार्या डाकीण आहे, मी निजलों म्हणजे माझीं आंतडीं बाहेर काढून ती चुंपते व पुनरपि तशींच आंत घालून ठेवते. त्यामुळें माझी अशी दशा झाली आहे; कारण चांगलें धष्टपुष्ट व्हायला मला स्निग्ध अन्न कोठून मिळणार?—"

मी असें सांगितलें असतां साशंक झालेला राजा मनांत विचार करूं लागला. काय ती खरोखरच डाकीण आहे? मग माझींही आंतडीं ती अशीच चुपूं लागेल. कारण मी तर चांगला आहार खाऊन यथेच्छ पुष्ट झालों आहें. असो; मी आज रात्रीं स्वतः तिची परीक्षा पहातों, असें म्हणून राजानें मला आपल्या येथलें चांगलें भोजन दिलें. तें खाऊन मी आपल्या भार्येकडे गेलों व रडूं लागलों. तेव्हां तिनें कारण विचारलें असतां मी तिला म्हटलें,—" प्रिये, कोणाजवळ बोलूं नकोस; पण राजाच्या पश्चिमद्वारांत दांत आले आहेत. त्यामुळें माझा वस्तरा आज मोडला. असाच प्रत्यहीं एकेक वस्तरा मोडूं लागल्यास मी आपला वडिलोपार्जित धंदा कसा चालवूं?"

तें ऐकून माझ्या भार्येला मोठें आश्चर्य वाटलें; व हें खरें आहे कीं काय तें पहाण्याचा तिनेंही निश्चय केला. रात्रीं राजा आला, उपभोगादि घेऊन झाला, व थकल्याचा बाहणा करून तो दुष्ट तेथेंच झोंपेचें सोंग घेऊन पडला. तेव्हां माझी भार्या हळूच चाचपून पाहूं लागली, व तिचा हात पश्चिमद्वारापाशीं येतांच 'डाकीण, डाकीण,' असें म्हणून भ्यालेला राजा जीव घेऊन पळत सुटला. त्या दिवसापासून, तो माझ्या घराचा उंबरठा चढला नाहीं, व माझी भार्याही संतोषानें माझ्यावरच प्रेम ठेवून राहूं लागली.

याप्रमाणें मी शहाणपणानें पूर्वीं आपली भार्या राजापासून सोडवून घेतली आहे. हें कार्यही असेंच युक्तीनें तडीस नेलें पाहिजे. आतां मी

सांगतों तसें कर. तूं कोणातरी एका अंतःपुरांतील वृद्ध सेवकाला वश करून घे. ती नवी राणी आतांच अरण्यांतून राजमंदिरांत आली आहे. त्यामुळें तिचा हितकर व अगदीं प्रेमळ असा कोणीही तेथें नसेल. सर्व सेवक अपरिचितच असतील. त्यामुळें धनलोभानें एकदा म्हातारा तुला व महाराणीला वश होऊन 'ही नवी राणी डाकीण आहे, असें राजाला एकांतांत सांगेल. तें ऐकून राजा साशंक झाला असतां, रात्रीं गुप्तपणें आपण तिच्या अंतःपुरांत माणसाचे तुटलेले हातपाय नेऊन ठेवूं. म्हणजे सकाळीं ते दृष्टीस पडतांच ती खरोखरच डाकीण आहे, अशी त्याच्या मनाची खात्री होईल व भिऊन तो कदलीगर्भेचा त्याग करील. या युक्तीनें सवतीचा विरह झाला म्हणजे तुझी महादेवी सुख भोगील.

नापिताची ही युक्ति ऐकून तापसी देवीकडे गेली व तिला तें सर्व सांगून सर्व तसेंच घडवून आणलें. कदलीगर्भा दुष्ट स्त्री आहे, असें जाणून राजानें तिचा त्याग केला असतां, कृतकृत्य झालेल्या महाराणीनें तापसीला पुष्कळ धन दिलें, व त्याचा तिनें नापितासह यथेष्ट उपभोग घेतला.

इकडे कदलीगर्भा राजाच्या येथून निघून आपल्या घरीं जाव-यास निघाली. येतांना पेरलेल्या मोहऱ्यांच्या झाडांनीं तिला परत जाण्याचा मार्ग दाखविला. मंकणाच्या आश्रमांत पोंचल्यावर त्या साध्वीनें परत येण्याचें कारण सांगितलें. तेव्हां हिनेंच कांहीं अपराध केला असेल, असें समजून मुनि ध्यानस्थ होऊन अंतर्दृष्टीनें पाहूं लागला. त्या बरोबर त्याला सर्व सत्य वर्तमान कळलें. नंतर कन्येचें समाधान करून व तिला धीर देऊन तो मुनि तिला घेऊन स्वतः राजाकडे आला. त्यानें नम्र झालेल्या त्याला सर्व सत्य वृत्तांत सांगितला. 'महादेवीच्या सापत्न-दोषामुळें हें सर्व कपटनाटक रचिलें गेलें आहे.' असें नापितानेंही राजाला सांगितलें. तेव्हां राजानें कदलीगर्भेचा पुनः स्वीकार केला, महाराणीचा त्याग केला, मुनींनाही संतुष्ट करून रवाना केलें, व हा नापित माझा हितकर्ता आहे, असें समजून त्यालाही मोठें बक्षीस दिलें. हर हर! धूर्तलोक स्वामींना असेच लुबाडीत असतात.*

---

* धूर्तैर्भोज्या ह्यतेश्वराः।

सखे कलिंगसेने, सवती असे खोटेच अनेक दोष निर्माण करीत असतात. तूं अद्यापि कन्या आहेस. विवाहाचा मुहूर्त फार दूर आहे. अचिंत्यगति देव तुझी इच्छा करीत आहेत. यास्तव तूं आतां जगांतील मुख्य रत्नच, अशा या वत्सेश्वराला अर्पण केलेल्या आपल्या शरीराचें स्वतःच रक्षण कर. यांतच तुझा उत्कर्ष आहे. आतां पतिमंदिरांत असलेल्या तुझ्याकडे मी येणार नाहीं. कारण सत्स्त्रिया सखीच्या पतीच्या येथें जात नसतात.‡ शिवाय माझ्या भर्त्यानेंही मला पुनः येथें न येण्याविषयीं सांगितलें आहे. तुझ्या स्नेहामुळें मी गुप्तरीतीनें येईन म्हणेन, तर तेंही शक्य नाहीं; कारण तो माझा प्राणनाथ दिव्यदृष्टी आहे. त्याला तें कळल्यावांचून रहाणार नाहीं. आजसुद्धां मी कशी तरी त्याची आज्ञा घेऊन आलें. सखे, आतां माझें तुझ्याशीं कांहीं कार्य राहिलें नाहीं. यास्तव मी आतां जातें. माझ्या नाथानें जर मला आज्ञा दिली, तर मी पुनः आपली लज्जाही मोडून तुझ्याकडे येईन.

असें, डोळ्यांत पाणी आणून, सांगून व अतिशय रडूं लागलेल्या कलिंगसेनाला घट्ट भिटी मारून आणि तिचें मोठ्या कष्टानें सांत्वन करून, सूर्य अस्त पावल्यामुळें सोमप्रभा आपल्या भवनास गेली.

---

## तरंग ७ वा.

### १. वत्सराजाला विवेक झाला.

नंतर प्रियसखी सोमप्रभा निघून गेली असतां, स्वदेश व स्वबांधव यांस सोडून परदेशांत व परक्यांच्या हातांत येऊन पडलेली कलिंगसेना, वत्सेश्वराशीं होणारा विवाहमहोत्सव लांबल्याकारणानें वनांत चुकलेल्या हरिणीप्रमाणें कौशांबींत राहूं लागली. त्या सुंदरीशीं होणारा विवाह-लांबणीवर टाकणाऱ्या जोशांचा वत्सराजालाही मोठा राग आला, व औत्सुक्यामुळें खिन्न झालेल्या मनाचें रंजन करण्याकरितां, तो देवी वासव-दत्तेच्या अंतःपुरांत गेला. तेव्हां मनांतील रोष तोंडावर मुळींच व्यक्त न करितां श्रेष्ठ मंत्र्यानें पूर्वींच शिकवून ठेविल्याप्रमाणें, ती विशेष रीतीनें

‡ सखीपतेः सद्म न यान्ति सत्स्त्रियः ।

त्याची सेवा करूं लागली. तें पाहून कलिंगसेनेचा वृत्तांत कळला असूनही ही अशी प्रसन्न कशी राहिली ? म्हणून विस्मित झालेला वत्सराज तिचें मन पहाण्याकरितां मुद्दाम, तिला म्हणाला,-"देवि, मला वरण्याकरितां कलिंगसेना म्हणून ही एक राजकन्या आपण होऊन येथें आली आहे, हें तुला कळलें का ?"-तें ऐकूनही जिच्या मुद्रेंत थोडासा सुद्धां फरक पडलेला नाहीं, अशी वासवदत्ता म्हणाली,-"होय, प्राणनाथ, मी तें ऐकलें. मला मोठा आनंद झाला, ती साक्षात् लक्ष्मीच आपल्या येथें चालून आली आहे, असें मला वाटतें. तिच्याशीं विवाह केल्यानें तिचा पिताही आपल्याला वश होऊन, त्यामुळें पृथ्वीही शत्रुरहित होईल. मी आपल्याच विभूतीनें व सुखानें सुखी होणारी आहें. हें आपल्याला पूर्वींच कळलें आहे. इतर राजे ज्यांची इच्छा करितात, त्या राजकन्या जर आपण होऊन तुम्हांला येऊन वरूं लागल्या, तर असल्या लोकोत्तर भर्त्याची मी भार्या धन्य नव्हे का !"

आपल्या प्रियेचें हें भाषण ऐकून, राजाला मनांतल्या मनांत मोठा संतोष वाटला, व तिच्या सहवर्तमान पेयादिकांचें सेवन करून तो त्या रात्रीं तेथेंच निजला. पहांटे जागा झाल्यावर तो मनांत असा विचार करूं लागला कीं,-खरोखर ही देवी वासवदत्ता केवढी थोर स्त्री आहे ! मला संतुष्ट करण्याकरितां ती कलिंगसेनेच्या विवाहालाही अनुमोदन देत आहे. तिच्या विषयीं सापत्नभाव मुळींच धरीत नाहीं. पण या साध्वीला हें माझें कृत्य सहन कसें होतें, याचेंच मला मोठें आश्चर्य वाटत आहे. पद्मावतीच्या विवाहाच्या वेळींही मोठ्या सुदैवानेंच हिनें प्राण सोडले नाहींत. यास्तव हिचें कोणतेंही अनिष्ट आपल्याला करितां कामां नये. हिचें रक्षण मला सर्वथा केलें पाहिजे; कारण हिचें कांहीं अनिष्ट घडल्यास, केवल हिच्याच आश्रयानें असणारा माझा लाडका पुत्र, मेहुणे, सासरे, पद्मावती व फार काय, पण राज्यही नाहींसें होईल. तेव्हां कलिंगसेनेशीं मी विवाह करावा कीं न करावा ?

राजा असा विचार करीत आहे, तों उजाडलें व त्यामुळें तो तेथून निघून गेला. नंतर त्या दिवसाचीं सर्व कार्यें आटोपून अपराह्णसमयीं (तिसऱ्या प्रहरीं) तो पद्मावतीच्या येथें विश्रांति घेण्याकरितां गेला. तेव्हां वासवदत्तेच्या शिकविण्याप्रमाणें तिनेंही त्याची विशेषप्रकारें सेवा केली, व

या नव्या विवाहाविषयीं त्यानें प्रश्न केला असतां, वासवदत्तेसारखेंच तिनें आपलें अनुमोदन दिलें. तेव्हां अधिकच विस्मित झालेला राजा, दुसऱ्या दिवशीं त्यांचें तें ऐकमत्य यौगंधरायणाला सांगूं लागला. तेव्हां तो कालज्ञ महामंत्री, आपला राजा आतां विचारांत पडला आहे, असें पाहून राजाला उलट म्हणाला,–"प्रभो, आपण समजतां तसा खरा प्रकार नसून, त्यांत त्या दोघी देवींचा कांहीं निराळाच, पण दारुण अभिप्राय असावा, असें मला वाटतें. त्या दोघीजणींनीं जीवित-त्यागाचा दृढनिश्चय करून, असें सांगितलें आहे; कारण पति अन्य स्त्रीच्याठायीं आसक्त झाला असतां, अथवा परलोकास गेला असतां, मरणाविषयीं निश्चय करून स्त्रिया अशाच गंभीर व दैन्यरहित होत असतात. साध्वी स्त्रिया सर्वत्र निःस्पृह असतात.* त्यांना गाढ प्रेमाचें खंडन असह्य होतें.‡ राजन्, याविषयीं मी एक श्रुतसेनाची कथा सांगतो ती ऐका.

## २. श्रुतसेनाची कथा (पहिलें आश्चर्य).

मागें दक्षिणदेशांतील गोकर्णपुरांत श्रुतसेन म्हणून एक मोठा विद्वान् व कुलभूषण राजा होता. सर्व ऐश्वर्यानें संपन्न असलेल्या त्याला अनुरूप भार्या नव्हती, एवढेंच काय तें एक न्यून होतें. एकदां तो राजा त्याविषयीं चिंता करीत असतां, अग्निशर्मानामक ब्राह्मण त्याला म्हणाला,–" राजन्, मी दोन आश्चर्यें पाहिलीं, तीं तुला सांगतों. मी एकदां तीर्थयात्रा करीत, ऋषीच्या शापानें मगरी झालेल्या पांच अप्सरांचा अर्जुनानें ज्यांतून उद्धार केला, त्या पंचतीर्थास गेलों. पांच दिवस उपवास करून स्नान केलें असतां, नारायणाचें अनुचरत्व देणाऱ्या त्या श्रेष्ठ तीर्थांत स्नान करून मी जों पुढें जात आहें, तो नांगरलेल्या एका शेताच्या मध्यभागीं शेतकरी गात आहे, असें मला आढळलें. इतक्यांत मार्गानें जाणाऱ्या एका संन्याशानें त्या शेतकऱ्याला पुढची वाट विचारली; पण तो आपल्या गाण्यांत इतका गुंग झाला होता, कीं त्याचें संन्याशाकडे लक्षच गेलें नाहीं. त्यामुळें संन्याशाला राग आला व तो शेतकऱ्याला कमीजास्त बोलूं लागला. तेव्हां आपलें गाणें बंद करून

* साध्व्यः सर्वत्र निःस्पृहाः ।

‡ असह्यं हि पुरंध्रीणां प्रेम्णो गाढस्य खण्डनम् ।

शेतकरी त्याला म्हणाला, वाहवारे वाहवा! मला मूर्खालाही समजलेलें धर्माचें सार तुला संन्याशाला समजूं नये काय?

त्यावर संन्यासी कौतुकानें म्हणाला–तुला काय समजलें तें सांग पाहूं? तेव्हां शेतकरी म्हणाला,–" या थंड सावलींत बैस, म्हणजे मी सांगतों. या प्रदेशांत ब्रह्मदत्त, सोमदत्त व विश्वदत्त असे तीन ब्राह्मण भ्राते आहेत. त्यांतील पहिल्या दोघांचीं लग्नें झालीं आहेत; पण शेवटचा धाकटा भाऊ अविवाहित आहे. आपल्या दोघां वडील भावांची एकाद्या नोकराप्रमाणें सेवा करणारा तो कधींही क्रोध न करितां येथें मजबरोबर रहात असे. मी त्यांचा शेतकरी आहें; पण त्याचे भाऊ त्या कोणालाही पीडा न देणाऱ्या सरळ स्वभावाच्या, सन्मार्गवर्ती साधूला हा मतिमंद व मृदु आहे, असें समजत असत.

एकदां त्याच्या भावजयींनीं त्याला एकांतांत बोलाविलें; पण त्या कनिष्ठ विश्वदत्तानें मातेप्रमाणें त्यांचें निराकरण केलें. तेव्हां रागावलेल्या त्या दोघीजणींनीं आपापल्या पतीपाशीं जाऊन ‘ हा तुमचा कनिष्ठ भ्राता आमच्याकडे पापदृष्टीनें पहातो ’ असें खोटेंच सांगितलें. त्यामुळें ते दोघेही त्याच्यावर आंतल्या आंत फार रागावले. दुष्टस्त्रियांच्या खोट्या चाहड्यांनीं मोहित झालेल्या त्यांनीं खऱ्या–खोट्याचा विचार केला नाहीं. त्यांनीं आपला क्रोध व्यक्त न करितां–शेतांतील वारुळ सारखें कर जा–असें त्याला सांगितलें. तेव्हां तोही कुदळ घेऊन शेतांत आला व वारुळ खणूं लागला. ‘ तें तूं खणूं नकोस; तेथें मोठा थोरला नाग आहे, ’ असें मी त्याला सांगितलें; पण हा मरावा, अशी इच्छा करणाऱ्या श्रेष्ठभ्रात्यांच्या आज्ञेचेंही उल्लंघन करावयाचें नाहीं, अशा निश्चयानें ‘ काय व्हायचें असेल तें होईल ’ असें म्हणून त्यानें तें खणलें. तों त्याला त्यांत सोन्यानें भरलेली एक घागर सांपडली. काळा सर्प कोठें दिसलाही नाहीं. धर्म, सज्जनांचें सदा सांनिध्य करीत असतो.§ त्यानें ती घागर मी ‘ नको नको ’ म्हणत असतांनाही वडलांच्या भक्तीनें भावांनाच नेऊन दिली. पण त्या भावांनीं त्यांतलेंच थोडेंसें धन देऊन मारेकऱ्यांकडून त्याचे हात पाय तोडविले; पण तो त्यांच्यावर रागावला नाहीं. नंतर त्या क्रोध-

§ धर्मो हि सान्निध्यं कुरुते सताम् ।

रहित सत्यधर्मामुळें त्याला पुनः हातपाय आले. तें पाहून त्या दिवसापासून मी सर्व क्रोध सोडून दिला आहे; पण तूं तापसी असूनही अद्यापि क्रोध सोडला नाहींस. क्रोध सोडल्यानें स्वर्ग हातीं कसा लागतो तें तूं आतांच पहा. असें म्हणून व शरीर सोडून तो शेतकरी आमच्या समक्ष स्वर्गलोकास गेला.

राजन्, हें एक आश्चर्य मला दिसलें व दुसरें कोणतें तें सांगतों.—

( दुसरें आश्चर्य. )

तीर्थयात्रा करीत पुढें जात असतांना, मी समुद्रतीरावरील वसंतसेनराजाच्या राष्ट्रास पोंचलों. तेथें राजसत्रांत भोजन करावयास मी चाललों असतां, तेथील द्विज मला म्हणाले,—" अरे ब्राह्मणा, तूं या मार्गानें जाऊं नकोस. येथें राजकन्या बसली आहे. विद्युद्द्योता असें तिचें नांव असून एकाद्या मुनीनें जरी तिला पाहिलें, तरी तो कामशरपीडित व उन्मत्त होईल, इतकी ती सुंदर आहे "—तें ऐकून मी म्हटलें,—" त्यांत कांहीं मोठेसें आश्चर्य नाहीं. कारण मी, जणुं काय दुसरा मदनच अशा श्रुतसेनराजाला नेहमीं पहात असतों. तो कोठें फिरावयास निघाला म्हणजे त्याचे रक्षक सतीव्रतभंग होईल, या भीतीनें कुलस्त्रियांना त्याच्या मार्गांतून दूर करीत असतात."—

पण या माझ्या भाषणावरून मी तुमचा आश्रित आहें, असें जाणून तेथील पुरोहित व सत्राचा अधिपति यांनीं मला भोजनाकरितां राजापाशीं नेलें. तेथें कामाची जणुंकाय साक्षात् जगन्मोहमंत्रविद्याच अशी ती राजकन्या मीं पाहिली, व बऱ्याच अवकाशानें तिच्या दर्शनामुळें उद्भवलेल्या क्षोभाचें नियमन करून मी मनांत असा विचार केला, आमच्या प्रभूची जर ही भार्या झाली तर तो राज्यालाही विसरेल. पण हा वृत्तांत मला स्वामीच्या कानांवर घातला पाहिजे. नाहींतर उन्मादिनी* व देवसेन यांच्यासारखा प्रकार व्हावयाचा.

[ पूर्वी देवसेन राजाच्या राष्ट्रांत उन्मादिनी म्हणून खरोखरच जगास उन्मत्त करणारी एक वैश्यकन्या होती. तिच्या पित्यानें स्वतः येऊन 'पाहिजे असल्यास आपण हिच्याशीं विवाह करा' असें सांगितलें अस-

* लंबक ३. तरंग १५. यांत ही सविस्तर कथा आहे.

तांही राजाचें व्यसनापासून रक्षण करणाऱ्या ब्राह्मणांनीं 'ती कुलक्षणा' आहे, असें सांगितल्यामुळें, देवसेनानें तिच्याशीं विवाह केला नाहीं. नंतर त्याच्या एका मुख्य मंत्र्यानें तिचें पाणिग्रहण केलें. एकदां मार्गानें जात असलेल्या राजाच्या दृष्टीस पडून, त्या भुजंगीनें त्याला दुरूनच दृष्टिविषानें व्याकुल करून सोडलें असतां, तो वारंवार मूर्च्छित होऊं लागला. त्याला कसें तें बरें वाटेना, आहारही गोड लागेना, तेव्हां तिचा भर्ता व इतर मंत्री यांनीं तिचा स्वीकार करण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला; पण त्या धार्मिकानें परस्त्री–स्पर्श न करितां प्राण सोडले. ]

यास्तव स्वामीला न सांगितल्यामुळें असा कांहीं प्रमाद घडल्यास, मोठा द्रोह केल्यासारखें होईल.–असा विचार करून मी हें दुसरें आश्चर्यही येथें येऊन सांगितलें आहे.

ब्राह्मणाच्या तोंडचें हें वर्तमान ऐकून श्रुतसेनराजा विद्युद्द्योतेविषयीं अतिशय उत्सुक झाला, व त्याच ब्राह्मणाला तेथें पुनः पाठवून व त्या सुंदरीला आणवून त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें. नंतर सूर्याच्या प्रभे-प्रमाणें ती राजपत्नी राजाच्या शरीला सोडून क्षणभरही कधीं दूर झाली नाहीं. कांहीं दिवसांनीं मातृदत्ता नांवाची एक महाश्रीमान् वैश्याची रूपगर्वित कन्या त्या राजाला स्वतः वरण्याकरितां आली. अधर्माच्या भीतीनें राजानेंही तिचा स्वीकार केला; पण तें कळतांच विद्युद्द्योतेचें हृदय विदीर्ण झालें व ती मेली. तिची ती शोचनीय अवस्था पाहून व तिला मांडीवर घेऊन रडणाऱ्या राजाचेही प्राण गेले. वैश्यकन्या–मातृ-दत्ता सती गेली, व हा दुःखकर वृत्तांत ऐकून सर्व राष्ट्र दुःखी झालें. नंतर श्रुतसेनाच्या शत्रूंनीं त्याचें राष्ट्र वांटून घेतलें.

यास्तव, महाराज, अतिप्रेमाचा भंग सर्वदाच अनिष्ट व दुःसह असतो. मानी वासवदत्तेला तर तो विशेषतः असह्य होईल. आपण कलिंगसेनेशीं जर विवाह केलात, तर ही देवी प्राण देईल, यांत संशय नाहीं. पद्मा-वतीचीही तीच दशा होईल. मग त्या दोघींचें जणुंकाय जीवितच अशा नरवाहनदत्ताचें काय होईल, याचा आपणच विचार करा. मला वाटतें कीं, त्याविषयींचा विचारही आपल्या कोमल हृदयाला सहन होणार नाहीं. याप्रमाणें एकाच वेळीं हें सर्व नष्ट होईल. त्या दोघींचें भाषण-गांभीर्यच त्यांचें–हृदय जीवितत्यागाविषयीं निश्चित व निःस्पृह झालें आहे,–

असें सुचविलें. यास्तव प्रभो, स्वार्थाचें रक्षण करा ! महाराज, पशु-पक्ष्यादि तिर्यक्प्राणीही आपलें रक्षण कसें करावें तें जाणतात. मग आपल्यासारख्या बुद्धिमानांविषयीं काय सांगावें ?

## ३. वत्सराजाचें मन बदललें.

मंत्रिवराच्या तोंडचें हें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकल्यावर, विवेकपदवीस पूर्णपणें प्राप्त झालेला वत्सेश्वर म्हणतो–बा हितकर यौगंधरायणा, तूं म्हणतोस तें खरें. माझ्या सर्वस्वाचा नाश होईल, यांत कांहीं संशय नाहीं. तर मग मला कलिंगसेनेशीं विवाह करून काय करावयाचें आहे ? गणकांनीं दूरचा मुहूर्त सांगितला तेंच बरें झालें. स्वतः वरण्याकरितां आलेल्या तिचा त्याग केल्यास अधर्म कितीसा होणार आहे.

वत्सराजाचें हें अनुकूल भाषण ऐकून, संतुष्ट झालेला यौगंधराण आपलें इष्ट कार्य सिद्ध झालें आहे, असें समजूं लागला. व उपायरूपी रसाचा जिच्यावर सेक केला व देश–कालानुरूप जिला पुष्ट केलें आहे, अशी ही नीतिवल्ली कोणतें फल देणार नाहीं ? असा मनांत विचार करीत तो महामंत्री राजास प्रणाम करून आपल्या घरीं गेला.

इकडे राजाही, मनांतील दुःख गुप्त ठेऊन वर वर उत्तम आतिथ्य करणाऱ्या, वासवदत्तेकडे जाऊन तिचें सांत्वन करीत म्हणाला,–" हे, हरिणाक्षि, तूं स्वतः जाणत असतांना मीं आणखीं आपल्या तोंडानें अधिक काय सांगूं ? पण जलांत उगवणाऱ्या कमलाचें जीवित जसें जल, त्याप्रमाणें माझें जीवित तुझें प्रेम. मग असें असतांना दुसऱ्या कोणा-स्त्रीचें नांव घेण्यास तरी मी समर्थ होईन का ? कलिंगसेना आपण होऊन माझ्या येथें आली. व्रतस्थ पार्थानें आपण होऊन आलेल्या रंभेचें ( उर्वशीचें नव्हेका ? ) निराकरण केलें व त्यामुळें तिनें त्याला 'एक वर्षभर षंढ हो, असा शाप दिला. तेव्हां त्याप्रमाणें षंढ होऊन त्या महात्म्यानें आश्चर्यकारक स्त्रीवेषानें विराटाच्या येथें तें वर्ष कसें घालविलें, तें जगजाहीर आहे. म्हणून मीं भिऊन तिचें तेव्हांच निराकरण केलें नाहीं; पण मी तुझ्या इच्छेविरुद्ध कांहीं करूं शकत नाहीं; हें तूं निश्चयानें समज. असें सांगून व तिची समजूत करून महामंत्र्याच्या विशालबुद्धिमत्तेची प्रशंसा करीत त्या भाग्यवानानें ती रात्र तिच्यासह तेथेंच घालविली.

इतक्यांत तिकडे यौगंधरायणानें कलिंगसेनेचा वृत्तांत जाणण्याकरितां अहोरात्र ज्याची योजना केली होती, तो ब्रह्मराक्षस त्याच रात्रीं सहज येऊन मंत्रिवरास म्हणाला,-" कलिंगसेनेच्या येथें, आंत व बाहेर, मी दक्ष होऊन स्थित आहें. दिव्य व मानुष-प्राणी तेथें आल्याचें मला कांहीं अजून दिसलें नाहीं; पण आज एकाएकीं अंतरिक्षांत झालेला एक अव्यक्त शब्द मला ऐकूं आला. तेव्हां त्याचें कारण जाणावें, या उद्देशानें मी रात्रीं गुप्तपणें माडीवर जाऊन, आपल्या विद्येचा उपयोग केला; पण तो सफल झाला नाहीं. तेव्हां आकाशांतून फिरणाऱ्या व कलिंगसेनेचें लावण्य पाहून लुब्ध झालेल्या कोणा दिव्य-प्रभावसंपन्न पुरुषाचा तो शब्द असावा, असें मी अनुमान केलें. ज्या अर्थी माझी विद्या लागू होत नाहीं, त्याअर्थी मला प्रत्यक्षच पाहिलें पाहिजे. कारण डोळ्यांत तेल घालून जागत रहाणाऱ्या निपुणांना परच्छिद्र आढळणें कांहीं फारसें कठिण नाहीं.* दिव्यप्राणी हिची इच्छा करीत असतात. असें आपल्याप्रमाणेंच तिच्या सोमप्रभासखीच्या तोंडचेंही मी ऐकलें आहे, हें झालेलें वर्तमान कळविण्याकरितां मी आलों. आतां मी एक विचारतों तें मला सांगा. तुम्हीं राजाशीं बोलत असतांना 'तिर्यक्प्राणीही आपलें रक्षण करितात' असें म्हटलेंत तें मी गुप्त राहून ऐकलें. तर त्याविषयीं कांहीं उदाहरण माहीत असल्यास मला सांगा.

योगेश्वर राक्षसाची ही प्रार्थना ऐकून यौगंधरायण म्हणाला-मित्रा, त्याविषयीं मला एक उदाहरण ठाऊक आहे तें तुला सांगतों.

## ४. उंदरादिकांची कथा.

विदिशा नगरीच्या बाहेर पूर्वी एक मोठा वटवृक्ष होता. त्या महातरूवर मुंगुस, घुबड, मांजर व उंदीर असे चार प्राणी आपापलीं निरनिराळीं घरें करून रहात असत. त्यांतील उंदीर व मुंगूस त्याच्या मुळाशीं निरनिराळ्या बिळांत रहात. मांजर झाडाच्या मध्यभागीं एका ढोलींत बसे, व घुबड दुसऱ्या कोणाच्याही हातास न लागणाऱ्या एका शाखेच्या अग्रावर राही. त्यांतील उंदीर इतर तिघांस वध्य होता, मांजर बाकीच्या तिघांस मारण्यास समर्थ होतें, म्हणून उंदीर व मुंगुस

* न दुष्प्रापं परच्छिद्रं जाग्रद्भिर्निपुणैर्यतः।

अन्न मिळविण्याकरितां मांजराच्या भीतीनें रात्रीं बाहेर पडत, व उलूकही दिवाभीत असल्यामुळें रात्रींच बाहेर निघे. मांजर मात्र निर्भयपणें दिवसा व रात्रीं आहार हुडकीत पाहिजे तेथें फिरत असे. तेथें जवळच एक शेत होतें. त्यांत उंदरांच्या आशेनें तें नेहमी जाई. उंदीर, मुंगूस व घुबड ही आपापल्या वेळीं तेथें जात. एकदां एक चांडाल लुब्धक तेथें आला व त्या शेतांत जाणारी मांजरांच्या पायांची पंक्ति (रांगा, ओळ) पाहून त्यानें त्याला मारण्याकरितां त्या शेताच्या सभोंवार पाश लावून ठेविले व तो स्वतः घरीं गेला.

रात्रीं मांजर उंदराच्या आशेनें त्या शेतांत आलें व पाशांत अडकलें. उंदीरही अन्नाकरितां लपतछपत तेथें आला, व मांजर जाळ्यांत अडकलें आहे असें पाहून हर्षानें नाचूं लागला; पण तो जों एका संकुचित मार्गानें क्षेत्रांत जात आहे, तों तेथें मुंगूस व घुबडही आलें. मांजर अडकून पडलें आहे, असें पाहून त्या दोघांनींही उंदरास धरण्याची इच्छा केली. तेव्हां त्यांस दुरूनच पाहून उंदीर मनांत खिन्न होऊन असा विचार करूं लागला. मी उलूक व नकुल या दोघांनाही भय देणाऱ्या मांजराचा जर आश्रय केला, तर तो माझा शत्रु मला एका प्रहरानेंच मारील; पण त्याच्यापासून दूर जावें तर हे दोघे मला मारतील! मी शत्रूंच्या जाळ्यांत सांपडलों आहें. आतां काय करूं? व कोठें जाऊं? आपत्तींत पडलेल्या मला माझ्याप्रमाणें प्राणसंकटांत पडलेल्या या मांजराचाच आश्रय केला पाहिजे. स्वजीवित संरक्षणाकरितां पाश तोडण्याच्या उपयोगी पडणारा मीं असल्यामुळें माझें हा बोका रक्षण करील.

असा विचार करून तो हळुच मांजराजवळ गेला, व तो त्याला म्हणाला मित्रा, तूं अडकून पडला आहेस, असें पाहून मला मोठें दुःख होतें. मी तुझे पाश तोडतों. सहवासामुळें सरळस्वभावाच्या प्राण्यांचा स्नेह शत्रूवरही जडतो;* पण तुझा अभिप्राय काय आहे तें न कळल्यामुळें मला तुझा विश्वास येत नाहीं."

तें ऐकून मांजर म्हणतें–मित्रा, तूं मजवर पूर्ण विश्वास ठेव. मला प्राण देणारा तूं आजपासून माझा सखा झाला आहेस. तें ऐकतांच उंदीर

* ऋजूनां जायते स्नेहः सहवासाद्रिपुष्वपि।

मांजराजवळ गेला, व तें पाहून मुंगूस व घुबडही खिन्न मनानें तेथून निघून गेलीं. तेव्हां पाशानें पीडलेलें मांजर उंदराला म्हणतें; मित्रा, रात्र जवळ जवळ संपली. माझे पाश लवकर तोड. तें ऐकून लुब्धक येण्याची वाट पहाणारा तो उगीच दांत कडकड वाजवीत व हळू हळू पाश तोडीत आहेंसें दाखवीत राहिला, तों रात्र संपली. व लुब्धक समीप आला. तेव्हां जीव घेऊन पळण्यास अगदीं तयार झालेलें मांजर आर्जव करूं लागलें असतां, उंदरानें झटकन त्याचे पाश तोडले व चांडालाच्या भीतीनें मांजर पळून गेलें असतां, तोही स्वतः पळत जाऊन बिळांत शिरला. त्यानें त्या मांजरावर पुनः विश्वास ठेवला नाहीं. एकदां त्यानें मुद्दाम हाक मारली असतां, तो म्हणाला "बाबारे, प्रसंगविशेषीं शत्रु मित्र होत असतो; सदा नाहीं" †

सारांश; याप्रमाणें उंदरानें जर केवल शहाणपणानें पुष्कळ शत्रूंपासून आपलें रक्षण केलें, तर मग मनुष्याविषयीं काय सांगावें! सर्वदा बुद्धि हाच उत्तम मित्र आहे, पुरुषप्रयत्न नव्हे.* याविषयींही मी सांगतों ती कथा ऐक.

## ५. एका कृपणाची कथा.

श्रावस्ती § नगरींत मागें एक प्रसेनजित् म्हणून राजा होता. त्या नगरींत एकदां एक अपूर्व द्विज आला. तो शूद्राचें अन्न खात असे. पण एका वैश्यानें 'हा मोठा गुणवान् आहे' असें समजून एका ब्राह्मणाच्या येथें त्याला ठेवलें. तो तेथें शुष्क अन्नावर आपला निर्वाह करून, दक्षिणेचे पैसे सांठवून ठेवीत असे. कांहीं दिवसांनीं त्या कृपणापाशीं एक सहस्र दीनार सांठले. तेव्हां त्यानें ते सर्व एका फडक्यांत बांधून अरण्यांत पुरून ठेवले. नंतर तो रोज एकटाच जाऊन तेथें पहात असे. एकदां ती आपली जागा कोणी खणली आहे व त्यांत द्रव्यही नाहीं, असें पाहून त्याचें हृदय फाटलें. तो बिचारा रडत आपल्या बिऱ्हाडीं परत आला. ज्या ब्राह्मणाच्या येथें तो रहात होता, त्यानें विचारलें असतां त्या

† कालयुक्त्या ह्यरैर्मित्रं जायते नच सर्वदा ।

* बुद्धिर्नाम च सर्वत्र मुख्यं मित्रं न पौरुषम् ।

§ ही कथा जीवानंद विद्यासागरभट्टाचार्यांच्या गद्यात्मक कथासरित्सागरांत नाहीं.

कृपणानें आपल्या दुःखाचें कारण त्याला सांगितलें, व अन्न न खातां त्यानें तीर्थांत जाऊन जीव देण्याचा संकल्प केला. पण त्याच्या अन्नदात्या वैश्याला जेव्हां हें सर्व वर्तमान कळलें, तेव्हां तो अन्य वैश्यांसह त्याच्या पाशीं आला व म्हणाला,–"ब्राह्मणा, धनाकरितां तूं व्यर्थ प्राण कां देतोस? चैत्र वैशाखांतील मेघांप्रमाणें वित्त अकस्मात् येतें व जातें." पण तें ऐकूनही तो जीव देण्याचा आग्रह सोडीना. खरोखर कृपणाला वित्तलेश प्राणाहूनही अधिक प्रिय वाटत असतो! ‡ नंतर जीव देण्याकरितां तो ब्राह्मण तीर्थाकडे चालला. तेव्हां, तें ऐकून स्वत: राजा प्रसेनजित् त्याच्यापाशीं आला, व म्हणाला,–"तूं जेथें आपले हजार दीनार पुरले होतेस, तेथें कांहीं खूण आहे का?" त्यावर तो रडत म्हणतो–देवा, त्या अरण्यांत एक लहान झाड आहे व त्याच्या खालीं मी ते पुरले होते. तें एकून राजा म्हणाला,–"मी तें तुझें धन हुडकून देतों, पण तूं जीव देऊं नकोस." असें सांगून व परतवून राजानें त्याला वैश्याच्या स्वाधीन केलें व स्वतः राजमंदिरांत गेला.

नंतर माझें मस्तक दुखत आहे, असें निमित्त सांगून राजानें प्रतीहाराकडून डांगोरा पिटविला, व गांवांतील सर्व वैद्यांना बोलावून आणलें. व त्यांतील प्रत्येकास एकांतांत बोलावून–तुझे किती रोगी आहेत, त्यांस तूं काय काय औषध देत असतोस, असें तो विचारूं लागला. तेव्हां तेही सर्व खरी गोष्ट सांगूं लागले. होतां होतां त्यांतील एक म्हणाला,–"प्रभो, आजारी असलेल्या मातृदत्त वैश्याला मी आज दोन दिवसांपूर्वी नागबला नांवाची औषधी सांगितली आहे." तें ऐकतांच राजानें त्या वैश्याला बोलावून तूं नागबला कोठून आणलीस, असा प्रश्न केला. तेव्हां 'माझ्या सेवकानें कोठूनशी आणून दिली.' असें तो म्हणाला.–त्याबरोबर राजानें त्या त्याच्या सेवकाला आणवून–नागबलेकरितां झाडाच्यामुळाशीं खणत असतांनां, तुला सांपडलेले सहस्र दीनार कोठें आहेत ते आण. तें ब्राह्मणाचें धन आहे–असें म्हणतांच सेवकाचें तोंड उतरलें. त्यानें भीतीनें ती गोष्ट मान्य केली. आणि लागलेच फडक्यांत बांधलेले ते दीनार जसेच्या तसे राजापुढें आणून ठेविले. तेव्हां

‡ प्राणेभ्योऽप्यर्थमात्रा हि कृपणस्य गरीयसी।

त्या शहाण्या राजानेंही अन्न वर्ज करून बसलेल्या ब्राह्मणाला बोलावून जणुं काय, त्याचे बहिश्चर प्राणच असे ते हरवलेले दीनार त्याला परत दिले. महामंत्री म्हणाला,—बा राक्षसा, याप्रमाणें नागबला कोठें सांपडते, हें जाणणाऱ्या राजानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें चोराला शोधून काढलें. तात्पर्य सदा बुद्धि श्रेष्ठ आहे. असल्या कार्यांत पराक्रम काय कामाचा ? यास्तव योगेश्वरा, तूंही आपल्या प्रज्ञेनें कलिंगसेनेचा कांहीं दोष हुडकून काढ. तिच्यावर सुर व असुर लुब्ध होतात हें खरें आहे. गेल्या रात्रीं तूं अंतरिक्षांत शब्दही ऐकला आहेस. तिचा जरी कांहीं दोष आढळला, तरी आम्ही तिचें अकल्याण करणार नाहीं. कोणताही अधर्म करणार नाहीं. केवळ आमचा राजा तिच्याशीं विवाह करणार नाहीं; इतकेंच काय तें !

उदारबुद्धि यौगंधरायणाचें तें वचन ऐकून, योगेश्वर ब्रह्मराक्षस म्हणाला बृहस्पति देवावांचून नीतीमध्यें तुमची बरोबरी करणारा कोण आहे ? तुमचा हा मंत्र म्हणजे या राजवृक्षावर केला जाणारा अमृतसेकच आहे. मी आतां जाऊन आपल्या बुद्धि व शक्तीप्रमाणें तिचा दोष पहात बसतों, असें बोलून तो निघून गेला.

### ६. कलिंगसेनेचा मदनवेगाशीं विवाह.

कलिंगसेना आपल्या उघड्या माडीवर फिरणाऱ्या वत्सराजाला पाहून संतप्त होत असे. स्मरसंतप्त झालेल्या तिच्या चित्ताला शांति कशी ती मुळींच मिळत नसे. तिकडे शंकराची आराधना करून वर मिळविलेला मदनवेग—विद्याधराधीश तिच्या करितां, व्याकुल होतच होता; पण दुसऱ्यावर आसक्त असलेली व परक्यास्थलीं रहाणारी ती त्याला अनायासानें प्राप्त होण्याजोगी नव्हती. त्यामुळें तो विद्याधरांचा राजा तिच्यापाशीं जावयास योग्य काल पहात, प्रत्यहीं रात्रीं तिच्या मंदिरावर फिरत असे. एकदां रात्रीं शंकराच्या वराचें स्मरण करून व आपल्या विद्याबलानें वत्सेश्वराचें रूप घेऊन त्याच्याकरितां संतप्त झालेल्या कलिंगसेनेकडे तो आला. मंत्र्याचा कालक्षेप सहन न झाल्यामुळें हा आमचा स्वामीच गुप्तपणें हिच्याकडे आला आहे, असें द्वारपालास वाटलें, व त्यानें लवून प्रणाम केला असतां तो मंदिरांत शिरला. अकस्मात् आलेल्या त्याला पहातांच कांपूं लागलेली कलिंगसेना आपल्या आसनावरून उठली. तेव्हां

तिच्या भूषणांनीं आपल्या ध्वनीनें 'तो हा नव्हे' असेंच जणुंकाय तिला सुचविलें. पण कामांधांचे कानही बधिर होत असल्यामुळें, तिचें लक्ष तिकडे गेलें नाहीं. असो; वत्सेशाच्या रूपानें तिचें सांत्वन करून मदन-वेगानें गांधर्वविधीनें तिचें पाणिग्रहण केलें. तेव्हां आंत गेलेला हा वत्सेश्वरच आहे, असें समजून कलिंगसेनेच्या पाळतीवर असलेला योगेश्वर फार खिन्न झाला. पण त्यानें ती गोष्ट लागलीच यौगंधरायणाच्या कानांवर घातली. तेव्हां प्रथमतः त्या महामंत्र्यालाही थोडी भीति वाटली; पण त्या धीर पुरुषानें त्या राक्षसालाच या वेळीं वत्सराज कोठें आहे, तें पहावयास राजमंदिरांत पाठविलें. तेव्हां तो लागलाच राजमंदिरांत गेला, व युक्तीनें राजा वासवदत्तेच्या अंतःपुरांत आहे, असें पाहून आनंदित झाला. नंतर मंत्र्याच्याच आज्ञेनें कलिंगसेनेच्या येथें असलेला पुरुष कोण आहे, हें पहाण्याकरितां तो योगेश्वर तेथें परत गेला. कलिंगसेनेच्या शय्येवर स्वस्थ निजलेल्या त्याला चांगलें निरखून पाहिलें. त्याच्या पायांवर शंख-चक्रादि चिह्नें असून ते धुळीनें मळकट झालेले नव्हते. त्यावरून तो सामान्य पुरुष नसून कोणी दिव्य आहे, असें त्यानें अनुमान केलें. शिवाय झोंप लागल्या कारणानें त्याची विद्या गुप्त होऊन त्याचें मूळ रूप त्याला प्राप्त झालें होतें.

हा सर्व चमत्कार पाहून तो योगेश्वर यौगंधरायणाकडे परत आला, व हर्षानें म्हणाला,—"मला तर बाबा यांत कांहीं कळत नाहीं. पण तुमच्या नीति-चक्षूंला कांहीं दिसलें तर पहा. हें दुःसाध्य कार्यही तुमच्या अचिंत्य मंत्रानें सिद्ध झालें आहे. सूर्यावांचून आकाश, जलावांचून सरोवर, मंत्र्यावांचून राज्य व सत्यरहित भाषण काय कामाचें ?"*

असो; याप्रमाणें स्तुति करून राक्षसानें सर्व वृत्तांत सांगितला असतां, त्याला वाटेल तेथें जावयास सांगून यौगंधरायण प्रातःकाळीं राजसभेंत आला. व एकांतांत बोलतां बोलतां 'कलिंगसेनेविषयीं काय निश्चय केलात ?' असें राजानें त्याला विचारलें असतां—'प्रभो, ती स्त्री स्वच्छंद आहे असें दिसतें. आपल्याशीं विवाह करावयास ती आपल्याच इच्छेनें

* किंवा व्योम विनार्केण किं तोयेन विना सरः ।
किं मन्त्रेण विना राज्यं किं सत्येन विना वचः ॥

प्रसेनजित् राजाला पहावयास आली होती. पण तो वृद्ध आहे, असें पाहून त्याच्याविषयीं विरक्त झालेली ती रूपाच्या लोभानें येथें आली. आतां ती येथें स्वेच्छेनें अन्य पुरुषाशींही समागम करीत आहे ' असें तो बेध-डक बोलला; परंतु राजाला तें आवडलें नाहीं. ' छे:, असें भलतेंच काय बोलतोस ? ती मोठी कुलीन कन्या आहे, ती असें दुराचरण कसें करील ! शिवाय माझ्या अंतःपुरांत प्रवेश करण्याची कोणाची शक्ति आहे?' असें राजानें म्हटलें असतां बुद्धिमान् यौगंधरायण उलट बोलला,– " प्रत्यक्षाला दुसरें प्रमाण नको. आपण आजच रात्रीं मजबरोबर चला. म्हणजे सर्व प्रत्यक्ष दिसेल. आपल्या अंतःपुरांत कोणी मनुष्य शिरूं शकणार नाहीं, हें अगदीं खरें आहे; पण तिला सिद्धादि–दिव्य प्राणी इच्छित असतात. तेव्हां त्यांच्या गतीला निरोध कोण कसा करणार ?"–

### ६. पुढील वृत्तांत.

मंत्र्याचें हें विस्मयकारक भाषण ऐकून राजानेंही रात्रीं त्याच्याबरोबर जाण्याचा निश्चय केला. नंतर घरीं जातां जातां वासवदत्तेच्या येथें जाऊन–' देवि, पद्मावतीवांचून राजा दुसऱ्या कोणत्याही राजकन्येशीं विवाह करणार नाहीं, असें जें मी तुला वचन दिलें होतें तें खरें करून दाखविलें आहे; पहा.–असें सांगून त्या महामंत्र्यानें तिला कलिंगसेनेचा सर्व वृत्तांत कळविला. तेव्हां "तुमच्या उपदेशाप्रमाणें चालल्यामुळें, मला हें फळ मिळालें आहे "–असें म्हणून वासवदत्तेनें नम्रपणें त्याचें अभिनंदन केलें.

त्यानंतर त्याचदिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास सर्व लोक स्वस्थ निजले असतां, यौगंधरायणासह वत्सराज कलिंगसेनेच्या मंदिरांत गेला. कोणाच्या दृष्टीस न पडतां ते दोघे तिच्या शय्यास्थानीं गेले. तेथें तीं दोघें (मदनवेग व कलिंगसेना) एकमेकांस आलिंगन देऊन निजलीं आहेत, असें पहातांच क्रोधानें संतप्त झालेल्या वत्सराजानें निजलेल्या मदनवेगाचा शिरच्छेद करण्याकरितां तरवार उपसली. पण इतक्यांत विद्येनें ज्याला जागें केलें आहे, असा तो विद्याधर एकदम आकाशांत उडून गेला. त्या गडबडीमुळें कलिंगसेनाही जागी झाली व आपल्या शय्येवर आपला प्राणनाथ नाहीं, असें पाहून ' अगबाई, आर्यपुत्र वत्सराज, मला एकटीलाच सोडून न विचारतां कोठें गेले ? ' असें म्हणून रडूं लागली.

तेव्हां तें ऐकून यौगंधरायण म्हणाला–प्रभो, या धूर्तानें तुमचें रूप धारण करून हिला भ्रष्ट केलें आहे, ही काय म्हणते तें ऐका. याचें हें कृत्य योगबलानेंच जाणून मी आज आपल्याला प्रत्यक्ष आणून दाखविलें आहे. हा दिव्यप्रभावसंपन्न असल्यामुळें याला मारतां येणें शक्य नाहीं.

इतकें बोलून तो व राजा कलिंगसेनेजवळ गेले. त्यांना पाहून तीही मोठ्या नम्रपणानें उभी राहिली. व "आर्यपुत्र, इतक्यांतच आपण मंत्र्यासह कोठून जाऊन आला?" असें जरा वक्रदृष्टीनें पहात वत्सेश्वरास म्हणाली. तेव्हां यौगंधरायण म्हणाला,–"कलिंगसेने मायेनें वत्सेशाचें रूप घेतलेल्या कोणी दिव्य पुरुषानें तुला फसवून तुझ्याशीं गांधर्व विवाह केला आहे. या आमच्या राजानें नव्हे."

तें ऐकतांच हृदयांत बाण मारल्याप्रमाणें दुःखी व भयभीत झालेली ती कलिंगसेना नेत्रांत पाणी आणून म्हणाली,–"राजन्, गांधर्वविधीनें माझ्याशीं विवाह करूनही शकुंतलेला जसा आपला पूर्वज दुष्यंत विसरला तसे आपण विसरलां कीं काय?"—

तेव्हां पापभीरु राजा खालीं तोंड घालून म्हणाला,–'सुंदरि, खरोखर, मी कांहीं तुझ्याशीं विवाह केला नाहीं. मी आजच व आतांच येथें आलों आहें.' इतक्यांत–चला आपण जाऊंया–असें म्हणून यौगंधरायण त्याला राजमंदिरांत घेऊन गेला.

नंतर आपल्या आप्तांस सोडून चुकलेल्या गाईच्या वासराप्रमाणें परकीयस्थानी पडलेली ती अति दुःखी झाली. संभोगामुळें जिचे केंस विखुरले आहेत व कन्याभाव नष्ट झाला आहे, अशी ती दीन साध्वी निरुपायास्तव आकाशाकडे तोंड करून, म्हणाली.–वत्सेशाच्या रूपानें मला मोहित करून ज्यानें वरलें आहे, तो दिव्य पुरुष आतां मजपुढें येवो. मी त्याचीच विवाहित भार्या आहें.

तिच्या तोंडांतून इतके शब्द निघत आहेत, तोंच हार–केयूरादि भूषणांनीं विराजमान होणारा एक दिव्य पुरुष आकाशांतून उतरला. तेव्हां तूं कोण आहेस, असें तिनें विचारिलें असतां तो म्हणाला–'हे सुंदरि, मी मदनवेग नांवाचा विद्याधरांचा राजा आहें. आपल्या पित्याच्या येथें असलेल्या तुला मी पूर्वी एकदां पाहिलें व तप करून

महेश्वरापासून तुझ्या प्राप्तीचा वर मिळविला. शंकराच्या आज्ञे-प्रमाणेंच वत्सेश्वरावर अनुरक्त असलेल्या पण त्याच्याशीं विवाह न झालेल्या तुझें, मी युक्तीनें पाणिग्रहण केलें.

हें त्याचें वागमृत कर्णमार्गानें तिच्या हृदयांत प्रविष्ट झालें असतां, तिच्या चित्ताला जरा समाधान वाटलें. नंतर मदनवेगानें त्या आपल्या प्रियतमेला नानाप्रकारच्या मूल्यवान् भूषणांनीं भूषित केलें. नंतर 'हा आपल्याला योग्य भर्ता मिळाला आहे, असें मनांत समजून कलिंगसेनेनें आपल्यावर पतिप्रेम ठेविलें आहे, असें जाणून व पुनः येण्याचें वचन देऊन, मदनवेग आकाशांत उडून गेला. आपल्या स्वामीचें घर स्वर्गलोकीं असून तेथें मनुष्यानां स्वशरीरानें जातां येत नाहीं व पित्याचें घर तर मी स्वेच्छेनें सोडिलें आहे, यास्तव आपण आतां येथेंच रहावें, असें कलिंग-सेनेनें मनांत आणलें, व त्या गोष्टीला मदनवेगाचेंही अनुमोदन मिळालें.

---

## तरंग ८ वा.

### १. वत्सराज व कलिंगसेना यांचा संवाद.

नंतर एकदां कलिंगसेनेचें अनुपम सौंदर्य पाहून, कामवश झालेला वत्सराज एकटाच तरवार घेऊन तिच्या मंदिरांत गेला. तेव्हां 'मी परस्त्री व त्यामुळें तुला अगम्य आहें' असें म्हणून तिनें त्याचें निवारण केलें. पण त्यावर तो म्हणाला,—"तूं तिसऱ्याच पुरुषाला प्राप्त झाली आहेस, यास्तव तूं आतां स्वैरिणी झालीस. म्हणून तुझ्याशीं समागम करण्यांत मला परस्त्रीगमन दोष लागणार नाहीं."

राजाचें तें दुःख देणारें भाषण ऐकूनही मी अगदीं निर्दोष आहें, असा निश्चय असल्यामुळें मनांत मुळींच खिन्न न होता ती साध्वी शांतपणें राजाला उलट म्हणाली—राजन्, मी तुझ्यासाठीं येथें आलें; पण मदनवेग विद्याधरानें स्वेच्छेनें तुझें रूप धरून माझ्याशीं गांधर्वविधीनें विवाह केला, व तोच एक माझा भर्ता आहे. या शरीराला दुसऱ्या कोण-त्याही पुरुषाचा स्पर्श झालेला नाहीं. याविषयीं सर्व देवता व सर्वसाक्षी नारायण साक्षी आहेत. मग असें असतांना मी स्वैरिणी कशी ?

स्वेच्छाचारानें ज्याची विवेक-शक्ति नाहींशी झाली आहे, व त्यामुळें आपल्या आप्तांना ज्यांनीं सोडलें आहे, अशा मोठाल्या स्त्रियांवरही असल्या आपत्ती येतात, मग माझ्यासारखा अल्लड कन्येवर त्या आल्या तर त्यांत नवल कोणतें ? अपशकुन झाल्यामुळें माझ्या सोमप्रभा सखीनें माझा निषेध केला होता, तरी मीं मूर्खपणानें तुमच्याकडे दूत पाठविला, त्याचें हें फल आहे. वास्तव जर मी अनाथ व एकटी आहें असें समजून तुम्ही मला बलात्कारानें स्पर्श कराल, तर मी जीव देईन. कारण माझ्यासारखी कुलस्त्री भर्तृद्रोह कसा* करील ? याविषयीं मी एक कथा सांगतें ती ऐका.—

## २. एका वैश्यस्त्रीची कथा.

पूर्वी चेदिवंशांत उत्पन्न झालेला इंद्रदत्त नांवाचा राजा होता. भौतिकशरीर क्षणभंगुर आहे, असें जाणून अक्षय्य यशःशरीर संपादन करण्याकरितां, एका पवित्र तीर्थाचे ठायीं त्यानें एक मोठें देवालय बांधलें. तेथें तो मोठ्या भक्तीनें त्याचें दर्शन घेण्याकरितां नेहमीं येत असे. त्या नगरांतील सर्व लोकही तीर्थस्नानाकरितां तेथें येत. एकदां जिचा पति प्रवासांत गेला आहे, अशी एक वैश्यस्त्री स्नानाकरितां आली असतां त्या राजाच्या दृष्टीं पडली. स्वच्छ कांति हीच जिची शुभ्र सफेती आहे, अशी ती विचित्र भूषणांनीं भूषित झालेली, मनोरम, चालती बोलती मदनाची राजधानीच आहे कीं काय, असा त्याला भास झाला. तिच्या सौंदर्यावर तो अतिशय मोहित झाला, व त्याच रात्रीं तिचें घर हुडकीत तो विवश राजा तिच्या येथें गेला. पण हातापायांपडून तो कामी तिची प्रार्थना करूं लागला असतां ती साध्वी त्याला म्हणाली,—"राजन्, तूं सर्वांचा रक्षक आहेस, तेव्हां परस्त्रियांना भ्रष्ट करणें तुला शोभत नाहीं. मला जर तूं बलात्कारानें स्पर्श करशील, तर तुला मोठा दोष लागेल. मी तत्काल प्राण देईन; पण दोष सहन करणार नाहीं."†

हें तिचें निग्रहाचें भाषण ऐकूनही त्या दुष्ट राजानें तिच्यावर बलात्कार करण्याची इच्छा केली. तेव्हां आपलें शील भ्रष्ट होईल या भीतीनें

* क्व नाम कुलजा हि स्त्री भर्तृद्रोहं करिष्यति ।

† मरिष्यामि च सद्योऽहं न सहिष्ये च दूषणम् ।

तिचें हृदय तत्काल फुटलें. तें पाहून लज्जित झालेला तो पापात्मा राजाही आल्या मार्गानें परत जाऊन, त्या अकृत्यामुळेंच होणाऱ्या पश्चात्तापानें कांहीं दिवसांनीं मरण पावला.

अशी कथा सांगून भय व विनय यांनीं नम्र झालेली ती कलिंगसेना वत्सराजाला पुनः म्हणाली,–" महाराज, यास्तव आपणही माझे प्राण घेणाऱ्या या अधर्मांत प्रवृत्त होऊं नका. मी तुमची आश्रित होऊन येथें राहिलें आहें; पण तेंही आपल्याला आवडत नसेल, तर मी कोठें जाऊन राहीन."

कलिंगसेनेच्या तोंडचें हें भाषण ऐकून व त्याविषयीं विचार करून धर्मज्ञ वत्सराज तिला म्हणाला,–" तूं आपल्या भर्त्यासह येथें सुखानें रहा. यापुढें मी तुझ्या वाटेला जाणार नाहीं. भिऊं नको."

इतकें बोलून राजा तेथून निघून गेला असतां, गुप्त राहून तें सर्व ऐकत असलेला मदनवेग आकाशांतून खालीं उतरला व आपल्या भार्येला दृढ आलिंगन देऊन 'प्रिये, फार उत्तम केलेंस. शुभे, तूं जर असें केलें नसतेंस तर तुझें बरें झालें नसतें; कारण तें मला सहन झालें नसतें' असें तो म्हणाला. याप्रमाणें तिचें सांत्वन केल्यावर तिच्या सहवासांत ती रात्र घालवून प्रातःकाळीं तो गुप्त झाला. याप्रमाणें तो मदनवेग कलिंगसेनेकरितां तेथें नित्य जात व येत असे. कलिंगसेनाही विद्याधरांचा राजा, पति प्राप्त झाल्यामुळें, स्वतः मनुष्यकन्या असतांनाही दिव्य भोग भोगीत तेथें राहिली. तिकडे वत्सराजही तिचा नाद सोडून व मंत्र्यांचें म्हणणें आठवून आनंदित झाला. देवी, पुत्र व राज्य हीं आपल्याला जणुं काय पुनः मिळालीं आहेत, असें त्याला वाटलें. देवी वासवदत्ता व मंत्री यौगंधरायण यांना, आपल्या नीति-कल्पलतेला गोड फळ आलें आहे असें पाहून फार आनंद झाला.

## ३. कलिंगसेना गर्भवती झाली.

कांहीं दिवस लोटल्यावर कलिंगसेना गर्भवती झाली. तिचें मुख व शरीराचे इतर अवयव यांवर गर्भाचीं चिन्हें दिसूं लागलीं. तेव्हां एकदां मदनवेग तिला म्हणाला,–" आम्हां स्वर्गवासी जनांचा असा नियम आहे कीं, उद्भवलेला मनुष्यगर्भ सोडून आम्ही दूर जातों, कण्वाश्रमांत

मेनकेनें शकुंतलेचा त्याग नाहीं कां केला? तूं पूर्वी इंद्राची अप्सरा होतीस. या लोकीं आलीस, त्यामुळेंच तुज साध्वीला 'स्वैरिणी' असा कलंक लागला. आतां तूं ह्या उरस्थ अपत्याचें रक्षण कर. मी स्वस्थानास जातों. तूं जेव्हां माझें स्मरण करशील तेव्हां मी तुजपाशीं येईन."— इतकें सांगून व तें ऐकल्यावर रडूं लागलेल्या तिचें सांत्वन करून, आणि तिला उत्तम उत्तम रत्नें देऊन तिच्या ठायीं ज्याचें चित्त आसक्त आहे, असा तो विद्याधर केवल दैवी संकेतानें आकर्षण केल्यामुळें स्वर्गलोकास गेला. इकडे कलिंगसेनाही अपत्याची आशा ह्याच उत्तम सखीचा आसरा धरून, वत्सराजाच्या भुज–छायेमध्यें यदृच्छा–लाभ संतुष्ट होऊन, सुखानें काल घालवूं लागली.

## ४. रतीचा अवतार.

इतक्यांत शरीरयुक्त पतीची प्राप्ति व्हावी म्हणून, तप करणाऱ्या मदनपत्नीला ( म्हणजे रतीला ) शंकर म्हणाला,—"मदनप्रिये, माझ्या नेत्राग्नीनें पूर्वी जळलेला तुझा पति वत्सराजाच्या येथें नरवाहनदत्त या नांवानें झाला आहे; माझा अपराध केल्यामुळें तो गर्भाशयांतून उत्पन्न झाला आहे. पण माझ्या आराधनेमुळें तूं मर्त्यलोकींही अयोनिजा उत्पन्न होशील, व तेथें शरीरयुक्त पतीशीं तुझा समागम होईल."—याप्रमाणें रतीला सांगून शंभु प्रजापती म्हणाला,—"कलिंगसेनेला दिव्य पुत्र होणार आहे, पण त्याला तत्काल हरण करून तूं त्याच्या जागीं या रतीला मानुपकन्या करून ठेव.

शंकराची ही आज्ञा शिरसा मान्य करून, ब्रह्मदेव निघून गेला व कलिंगसेनेचा प्रसूतिकाल समीप आला असतां, त्यानें सर्व तसेंच केलें. तेथल्या सर्व लोकांना तिला कन्याच झाली असें दिसलें. त्या सुंदर कन्येची कांति इतकी अलौकिक व रम्य होती कीं, भर दिवसाही ती अकस्मात् उगवलेल्या चंद्रकलेप्रमाणें शोभूं लागली. सूतिकागृहास सर्वतः प्रकाशित करणाऱ्या तिच्या अंगतेजानें रत्नदीप जणुं काय लज्जित झाल्याप्रमाणें निस्तेज बनले. आपल्याला अशी असामान्य कन्या झाली आहे, असें पाहून, कलिंगसेनेला पुत्रजन्माहूनही अधिक संतोष झाला, व त्या संतोषानुरूप तिनें उत्सव केला.

## ५. राजादिकांचा विचार.

मंत्री व देवी यांसह अंतःपुरांत बसलेल्या राजा वत्सेश्वराला तें वृत्त कळलें. तेव्हां ईश्वराचीच प्रेरणा झाल्यामुळें तो अकस्मात् म्हणाला,– " मला वाटतें, कीं ही कलिंगसेना दिव्य स्त्री असून ती शापामुळें या लोकीं आली आहे. यास्तव माझ्या नरवाहनदत्ताच्या रूपाला साजे अशी ही असून, ती महादेवी या पदवीला योग्य होईल."–तें ऐकून देवी वासवदत्ता राजाला म्हणते–महाराज, आपण काय बोलतां ? उभयकुलविशुद्ध असा हा माझा पुत्र कोठें व स्वैरिणीच्या पोटीं जन्मास आलेली कलिंगसेनेची कन्या कोठें ?

आपल्या राणीचें तें भाषण कानीं पडतांच तो पुनः म्हणाला–" देवि, मी आपण होऊन हें बोलत नसून कोणी तरी मला आंतून प्रेरणा करीत असल्यामुळें मी तसें बोलत आहें. ही कन्या नरवाहनदत्ताची पूर्वनिर्मित भार्या आहे, अशी अंतरिक्षांत उठलेली वाणीच जणुं काय मी या वेळीं ऐकत आहें, असा मला भास होतो. शिवाय ही कलिंगसेना कुलीन व एका पतीची भार्या आहे. केवल दैवयोगानें तिच्यावर हा मोठा आरोप आला आहे."–

राजानें असें सांगितलें असतां यागंधरायण मंत्री म्हणतो-देव, मदन जळल्यावर रतीनें तप केलें असतां, मनुष्यलोकीं तुझा पति उत्पन्न होईल, तेव्हां तूंही मनुष्ययोनींत जाऊन त्याच्याशीं संगत हो–असा शंकरानें तिला वर दिला, असें आम्ही ऐकलें आहे. पूर्वीं आकाशवाणीनें हा कुमार कामदेवाचा अवतार आहे, असें सांगितलेंच आहे. कलिंगसेनेचें सुवर्णपण करण्याकरितां ज्या धात्रीला मी पाठविलें होतें, ती नुक्तीच मला एकांतांत येऊन म्हणाली,–" स्वामिन्, पूर्वीं कलिंगसेनेला रमणीय पुत्र झाला असें मला वाटलें. पण इतक्यांत पहातें तों तो कोठें नाहींसा होऊन, त्याच्या जागीं ही विजेसारखी कन्या आहे, असें मला दिसलें."– तिच्या या आश्चर्यकारक वचनाविषयीं पुष्कळ विचार केल्यावर-देवांनीं मायेनें कलिंगसेनेचा दिव्यगर्भ चोरून नेऊन त्याच्या जागीं या अयोनिसंभव रतीची योजना केली असावी, असें मीं आपल्याशीं ठरविलें. राजन्, तीच तुमच्या–कामाचा अवतार अशा–या कुमाराची भार्या होणार. याविषयीं मी एक यक्षाची कथा सांगतों ती ऐका–

## ६. यक्षाची कथा.

कुबेराचा विरूपाक्ष या नांवाचा एक यक्ष (चाकर) होता. तो निधानलक्षण मुख्य अध्यक्षतेस प्राप्त झाला. त्यानें मथुरेच्या बाहेर असलेल्या एका निधीचें शिलास्तंभाप्रमाणें अचल राहून रक्षण करावयास एका यक्षाला सांगितलें. कांहीं दिवसांनीं मथुरेंतील एक पाशुपत-मताचा ब्राह्मण निधान हुडकण्याकरितां हातांत मनुष्याच्या चरबीचा दिवा घेऊन तेथें आला, आणि तो स्थान पहात आहे, तोंच त्याच्या हातांतून दिवा खालीं पडला. तेव्हां आपला इष्ट निधि येथेंच आहे असा निश्चय करून, आपल्या ब्राह्मण–मित्रांसहवर्तमान तो तेथें खणूं लागला. तेव्हां त्याचें रक्षण करण्याकरितां ठेवलेल्या यक्षानें विरूपाक्षाला ती गोष्ट कळविली. त्या बरोबर त्याला फार राग आला व त्यानें त्या दुष्टांस मारण्याविषयीं आज्ञा केली. यक्षानेंही तत्काल त्यांस मारून टाकलें. पण कुबेराला जेव्हां तें समजलें, तेव्हां–'अरे पाप्या, तूं ब्रह्महत्या कशी करविलीस? दरिद्री लोक लोभानें काय करीत नाहींत? त्यांना अनेक विघ्नें करून नुस्तें भिववावें म्हणजे झालें. जिवानिशी कधींही मारूं नये.' असें बोलून त्यानें विरूपाक्षाला 'या दुराचरणामुळें तूं मर्त्ययोनींत उत्पन्न होशील' असा शाप दिला.

तेव्हां तो भूलोकीं एका ब्राह्मणाचा पुत्र झाला. त्यामुळें अतिशय दुःखी झालेली त्याची पत्नी कुबेराकडे जाऊन प्रार्थनापूर्वक म्हणाली– "देव, तुम्ही माझ्या भर्त्याला जेथें टाकलें आहां, तेथेंच मलाही पण टाका. कारण त्याला सोडून मी क्षणभरही राहूं शकत नाहीं."–ही तिची विज्ञप्ति ऐकून धनद म्हणाला–तुझा पति अमुक ब्राह्मणाच्या येथें जन्माला आला आहे. यास्तव तूंही त्याच्या दासीच्या येथें अयोनिजा उत्पन्न हो. म्हणजे तेथें तुझ्या पतीशीं तुझा समागम होईल, आणि तुझ्याच प्रसादानें शापमुक्त होऊन तो माझ्याजवळ पुनः येईल.

कुबेराच्या या आज्ञेप्रमाणें ती साध्वी मनुष्यकन्या होऊन, त्या ब्राह्मणाच्या दासीच्या दारांत पडली. त्या अद्भुत आकाराच्या कन्येला पहातांच दासीला मोठें आश्चर्य वाटलें. तिनें त्या कन्येला उचलून घेतलें व आपल्या ब्राह्मण धन्याला दाखविलें. तेव्हां 'ही कोणी दिव्य अयोनिजा कन्या आहे, असें माझें मन मला निःशंकपणें सांगत आहे. यास्तव तूं हिला निर्भयपणें

ठेवून घे. ही माझ्या पुत्राची भार्या होईल, असें तो तिला म्हणाला व त्यामुळें तीं दोघेंही आनंदित झालीं. पुढें हळूहळू तीं दोन्हीं मुलें मोठीं होऊं लागलीं.

एकमेकांस पाहून त्यांना मोठा आनंद होत असे. त्यांचें परस्परांवर अवर्णनीय प्रेम बसलें. कांहीं दिवसांनीं ब्राह्मणानें त्यांचा विवाह केला. त्यामुळें तर पूर्व जन्माचें स्मरण जरी नव्हतें, तरी तीं दोघेंही विरहशून्य होऊन राहिलीं. कांहीं कालानें तो ब्राह्मणपुत्र मरण पावला. ती त्याच्या बरोबर सती गेली, आणि तिच्या तपाप्रमाणें ज्याचें पाप क्षीण झालें आहे, असा तो पुन: विरूपाक्ष यक्ष होऊन स्वपदास प्राप्त झाला. याप्रमाणें निरपराधी जीवही कांहीं कारणानें या लोकीं अयोनिज उत्पन्न होतात, त्यांच्या उत्पत्तीस देवतांचें साह्य असतें. असल्या देवनिर्मित कन्यांचें कुल हीन कसें असणार? यास्तव ही कलिंगसेनेची कन्या आपल्या कुमाराची भार्या व्हावी, असाच देवांचा संकेत दिसतो.

इतकें सांगून राजा व राणी या दोघांचाही त्यांवर दृढ विश्वास बसला असतां, तो मंत्रिवर्य आपल्या घरीं निघून गेला व राजा उदयनही पानादिकांमध्यें आसक्त होऊन, वासवदत्तेच्या अंत:पुरांतच राहिला.

कलिंगसेनेची कन्या प्रत्यहीं आपल्या रूपसंपत्तीनें वाढूं लागली. ती मदनवेगाची कन्या होती. म्हणून तिला तिची आई व इतर लोक मदनमञ्चुका या नांवानेंच हाक मारीत.

एकदां देवी वासवदत्तेनें मदनमञ्चुकेचें रूप निरुपम आहे, असें ऐकून तिला पहाण्याकरितां आपल्या येथें आणलें, व तिचें तें अलौकिक व नयनांस आनंद देणारें स्वरूप पाहून, ही साक्षात् रतिच आहे असा राजा, मंत्री, इत्यादि सर्वांनीं निश्चय केला. तिला पाहून देवीनें आपल्या नेत्रांस आनंद देणाऱ्या पुत्रालाही तेथें आणविलें. तेव्हां तीं दोघें एकमेकांस पाहून इतकीं अतृप्त व परस्परांविषयीं आसक्त झालीं कीं, त्यांना एक क्षणभरही एकमेकांपासून दूर होणें आवडेनासें झालें. तें पाहून राजाला त्यांच्या विवाहाची मोठी हांव सुटली. तो एकदां केव्हां होईल, असें त्यास झालें. राजाचा तो अभिप्राय कळला असतां, कलिंगसेनेलाही मोठा आनंद झाला, व तेव्हांपासून ती नरवाहनदत्तावर जामातृ-प्रेम करूं लागली.

## ७. नरवाहनदत्ताला यौवराज्य-प्राप्ति.

त्यानंतर आपल्या मंत्र्याशीं पृथक् संकेत करून, त्याच्या संमतीनें राजानें आपल्या पुत्राकरितां आपल्याच सारखें सुंदर निराळें मंदिर तयार करविलें. ज्याच्या अंगचे गुण अगदीं व्यक्त झाले आहेत, अशा नरवाहन-दत्ताला त्याच्या कालज्ञ भाग्यवान् पित्यानें यौवराज्यावर अभिषेक केला. त्यावेळीं त्या राजपुत्राच्या मस्तकावर प्रथम वत्सराजाचे आनंदाश्रू व नंतर वेदोक्त मंत्रांनीं अभिमंत्रित केलेलें तीर्थ-जल पडलें. अभिषेक-जलानें त्याचें मुखकमल निर्मल झालें असतां, खरोखर मोठें आश्चर्य आहे, कीं सर्व दिशाही प्रसन्न झाल्या. त्याच्या माता त्याच्यावर मंगलमालांचा वर्षाव करूं लागल्या असतां, आकाशांतूनही पुष्पवृष्टि झाली. कौशांबींत वाजणारीं आनंद-मंगल-वाद्यें, देव-दुदुंभीशीं स्पर्धा करण्याकरितांच जणुं काय आकाशास भरून सोडूं लागलीं. एका त्याच्या प्रभावाला सोडून बाकी दुसऱ्या सर्वांनी त्या अभिषिक्त युवराजाला नमस्कार केला. तद-नंतर वत्सेश्वरानें बालपणापासून त्याच्या बरोबर वाढलेल्या यौगंधरायणा-दिकांच्या मरुभूति-प्रभृति तरुणपुत्रांस आणवून त्यांच्या त्यांच्या उचित कामांत नियुक्त केलें. मरुभूति त्याचा मंत्री, हरिशिख सेनापति, तपंतरु, विदूषक, ( नर्म-सचिव, खुपमस्कऱ्या ) व गोमुख प्रतीहाराधिप झाला. पूर्वी सांगितलेले पिंगलकेचे पुत्र वैश्वानर व शांतिसोम, त्याचे पुरोहित झाले. राजानें ही योजना केली असतां, पुष्पवृष्टिपुरःसर पुढीलप्रमाणें आकाश-वाणी झाली.—" या राजाचे हे सर्वार्थसाधक मंत्री होतील. गोमुख तर याला, याच्या शरीराहून भिन्न वाटणारच नाहीं."—ती वाणी ऐकून वत्सेश्वर अतिशय आनंदित झाला व त्याने सर्वांचा उचित सन्मान करून, त्यांस वस्त्रें व आभरणें दिलीं. तो उदार राजा आपल्या सेवकांना धन देऊं लागला असतां, तेथें केवळ दरिद्र या शब्दाची अर्थसंगति लागेनाशी झाली. कौशांबीनगरी पताका-मंडलांनीं हंसत असल्यासारखी वाटूं लागली. नांचणाऱ्या स्त्रिया व गायक यांनीं सर्वतः आनंदमहोत्सव केला. कलिंगसेनेच्या भावी जांवयाच्या त्या अभिषेकोत्सव-प्रसंगीं, जणुं काय, पुढें त्याची होणारी विद्याधरांची लक्ष्मीच, तेथें आली होती. वासवदत्ता, कलिंगसेना व पद्मावती अशा त्या तिघीजणी जणुं काय एकत्र मिळालेल्या तीन शक्तींप्रमाणें अत्यंत आनंदित झाल्या. उद्यानांतील लता व वृक्षही

वायूच्या योगानें हलत असल्यामुळें हर्षानें सर्वतः नाचतच आहेत, असा भास होऊं लागला, मग सचेतन मानवांविषयीं काय सांगावें ?

## अद्भुत उद्यान व कलाप्राप्ति.

असो; याप्रमाणें अवर्णनीय आनंदांत अभिषेक झाला असतां, युवराज नरवाहनदत्त जयकुंजरावर बसून, नगरांतील पूज्य देवस्थानें पहाण्याकरितां निघाला. तेव्हां तेथील पौरस्त्रियांनीं त्याच्यावर नील शुभ्र व आरक्तवर्ण नेत्रांनीं, रम्य कटाक्ष व हस्तांजलींनीं नील–शुभ्र कमलें व लाह्या फेंकल्या. क्रमानें समस्त देवतांचें दर्शन घेऊन, स्तुतिपाठक स्तुति करीत असतांना तो सचिवांसह आपल्या मंदिरांत प्रविष्ट झाला. तेव्हां जांवयाच्या स्नेहानें परमवश झालेल्या कलिंगसेनेनें अगोदर आपल्या शक्तीच्या बाहेर अमात्य व इतर भृत्य यांसह त्याला दिव्य भोज्य व पेय पदार्थ दिले. नंतर त्या सर्वांना तिनें दिव्य वस्त्रें व आभरणें अर्पण केलीं. याप्रमाणें वत्सेश्वरादिकांचा तो दिवस महोत्सवांत गेला. त्या दिवशीं त्यांना झालेलें सुख, अमृतप्राशनामुळें होणाऱ्या आनंदाला तुच्छ करणारें होतें. रात्रीं कलिंगसेना आपल्या शय्येवर पडून कन्येच्या विवाहाविषयीं विचार करीत असतां, तिला सोमप्रभा सखीची आठवण आली. पण त्याबरोबर तिचा महाज्ञानी पति नलकूबर तिला म्हणाला–" प्रिये, तुला आज तुझी कलिंगसेना मोठ्या उत्कंठेनें आठवीत आहे, तर तूं आज तिच्या कन्येकरितां एक दिव्य उद्यान करून दे." अशी आज्ञा करून व तिच्याविषयींचें मागचें पुढचें–सर्व वृत्त सांगून तिला पाठविलें असतां, मयकन्या सोमप्रभा कलिंगसेनेजवळ आली; व फार दिवसांत न भेटलेल्या प्रिय सखीला दृढ आलिंगन देऊन व कुशल विचारून सोमप्रभा तिला म्हणाली,– " सखे, महासंपन्न विद्याधरानें तुझें पाणिग्रहण केलें. शंकराच्या अनुग्रहानें रति तुझ्या उदरीं जन्मास आली. वत्सेश्वरपुत्राची ही पूर्व भार्या आहे; तो कामाचा अवतार असून देवांच्या एक कल्पभर विद्याधरांचें अधिराज्य करील. त्याला ही तुझी कन्या दुसऱ्या सर्व स्त्रियांहून अधिक मान्य होईल. तूं अप्सरा असून इंद्रशापामुळें येथें आली आहेस. आतां राहिलेलें आपलें प्रारब्ध भोगून तूं शापमुक्त होशील. माझ्या सर्वज्ञ पतीनें आजच मला हें सर्व सांगितलें. यास्तव गडे, तूं आतां कांहीं चिंता करूं

नको, सर्व शुभ होईल: मी आतां येथें तुझ्या कन्येकरितां त्रिभुवनांत कोठें न दिसणारें रम्य उद्यान करितें."—

असें बोलून व दिव्य उद्यान तयार करून देऊन सोमप्रभा उत्कंठित झालेल्या आपल्या सखीला कडकडून भेटली, आणि डोळ्यांत पाणी आणून तिनेंही मोठ्या दुःखानें जाण्याविषयीं अनुज्ञा दिली असतां, मानसिक स्नेह तिच्यापाशींच ठेवून ती शरीर घेऊन निघून गेली.

नंतर प्रातःकाळीं लोक उठून पहातात, तों त्यांस अकस्मात् स्वर्गांतून खालीं पडलेलें नंदनवन दिसलें. राजालाही जेव्हां तें आश्चर्यकारक वर्तमान कळलें, तेव्हां तो चकित झाला; आणि भार्या, सचिव, पुत्र व इतर अनुचर यांसह तें पहावयास आला. तेव्हां ज्यांत अनेक फुलझाडें व फलझाडें, फुलें व फलें यांच्या योगानें संतांच्या मस्तकाप्रमाणें नम्र झालीं आहेत; ज्यांत नाना प्रकारच्या रत्नजडित पायऱ्यांच्या वापी, स्तंभ व भूभाग आहेत; शीत व सुगंध जलांचे कारंजे ठिकठिकाणीं विचित्र रीतीनें उडत आहेत; विपुल जल मिळाल्यामुळें ज्यांतील प्रत्येक वनस्पती तरुण कामिनीप्रमाणें टवटवीत दिसत आहे; ज्यांत सुवर्णवर्णाचे पक्षी आहेत व भूलोकीं न दिसणारे असेही अनेक चमत्कार स्पष्ट दिसत आहेत, असें अद्भुत उद्यान त्याच्या दृष्टीस पडलें. देवांच्या आज्ञेनें हा स्वर्गाचा एक तुकडाच आपल्या पुत्राकरितां खालीं आला आहे, असें त्यांस वाटलें. पण असल्या संशयित वाटण्यानें त्याच्या मनाचें समाधान होईना. म्हणून संबंधीजनांचें आतिथ्य करण्यांत व्यग्र झालेल्या कलिंगसेनेला हा काय चमत्कार आहे ? असें त्यानें विचारलें. तेव्हां यौगंधरायणादि सर्व ऐकत असतांना ती वत्सेश्वरास म्हणाली,—"मय म्हणून एक महा असुर आहे. तो विश्वकर्म्याचा अवतार होय. त्यानेंच युधिष्ठिर व इंद्र यांचीं रम्य नगरें [सभा, यज्ञगृहें] बनविलीं. त्याची सोमप्रभा नामक कन्या माझी प्रियसखी आहे. तिनें गेल्या रात्रीं येथें येऊन आपल्या लाडक्या कन्येकरितां हें दिव्य उद्यान तयार केलें."—इतकें सांगून शिवाय सखीनें सांगितलेली मागची—पुढची हकीकतही तिनें त्यांस कळविली. तेव्हां तिचें तें सप्रमाण भाषण ऐकून सर्वांचे संशय दूर झाले, व सर्वांनां अतुल संतोष झाला. नंतर कलिंगसेनेचा सत्कार घेत सर्व परिवारासह राजानें तो दिवस त्या नूतन उद्यानांतच घालविला.

दुसऱ्या दिवशीं वत्सराज देवालयांत देवदर्शनार्थ गेला असतां, उत्तम वस्त्रें व आभरणें यांनीं भूषित झालेल्या अनेक स्त्रिया त्याला दिसल्या. 'तुम्ही कोण ?' असें त्यानें विचारलें असतां त्या म्हणाल्या,–"आम्हीं विद्या व कला आहों, तुझ्या पुत्राकरितां येथें आलों आहों. आतां आम्हीं त्याच्यामध्यें जाऊन प्रवेश करतों."–इतकें बोलून त्या सर्वजणी गुप्त झाल्या. तेव्हां विस्मित झालेला राजाही अंतःपुरांत जाऊन सर्वांना तो चमत्कार सांगूं लागला. तेव्हां मंत्री यौगंधरायण व इतर सर्व 'हा मोठाच देवतानुग्रह आहे,' असें म्हणून राजाचें अभिनंदन करूं लागले. कांहीं वेळानें नरवाहनदत्त तेथें आला. इतक्यांत राजाच्या आज्ञेनें वासवदत्ता वीणा वाजवूं लागली. पण तें ऐकून तो विनयानें आपल्या मातेला म्हणाला,–आई, ही वीणा बरोबर लागली नाहीं. तेव्हां राजा म्हणाला,–तर मग तूं तिला चांगली लावून वाजीव पाहूं–आज्ञेप्रमाणें तो ती वीणा घेऊन इतकी सुंदर वाजवूं लागला, कीं त्यामुळें गंधर्वही विस्मित झाले. याप्रमाणें सर्व विद्या व कला यांमध्यें तो आपोआप निपुण झाला. आपला पुत्र सकलगुणसंपन्न झाला आहे, असें पाहून वत्सेशानें कलिंगसेनेच्या मदनमञ्चुकेस नृत्य शिकविलें. मदनमञ्चुकारूपी चंद्रकला जशी जशी परिपूर्ण होऊं लागली, तसा तसा नरवाहनदत्तरूपी समुद्र अधिकाधिक क्षुब्ध झाला. गात व नाचत असलेल्या तिला पाहून त्याला फार संतोष वाटत असे. तो क्षणभर दिसेनासा झाल्यास तिच्याही नेत्रांतून घळघळ अश्रू वाहूं लागत.

एकदां तो युवराज मदनमञ्चुकेविषयीं फार उत्सुक होऊन, त्या उद्यानांत आला. तेव्हां कलिंगसेनेनेंही त्याचा अभिप्राय ओळखून कन्येला जवळ बोलावून त्याचें चित्तरंजन केलें. आपल्या स्वामीच्या मनांत येथें बराच वेळ रहावयाचें आहे, असें जाणून चित्तज्ञ गोमुख कलिंगसेनेशीं नानाप्रकारच्या गोष्टी बोलूं लागला, त्यामुळें राजपुत्राला फार संतोष झाला, कारण प्रभूच्या हृदयांत प्रवेश करणें हीच प्रभूला स्ववश करून घेण्याची युक्ति आहे.* असो; इतक्यांत मदनमञ्चुका त्या उद्यानांतील संगीत शाळेंत जाऊन नृत्य करूं लागली. तेव्हां नरवाहनदत्त स्वतः वाद्यें वाजवूं

* हृदयानुप्रवेशो हि प्रभोः संवननं परम् ।

लागला, व त्यांचें तें संगीत–ज्ञान पाहून उत्तम चारणही लज्जित झाले. तो नाना देशांतून आलेल्या गज-अश्व-रथ-शस्त्र-अस्त्र-चित्र-वेदशास्त्र इत्यादिकांतील कोविदांस आपल्या अलौकिक ज्ञानानें कुंठित करीत असे. याप्रमाणें स्वतः विद्यांनीं ज्याला वरलें आहे, अशा त्या युवराजाचे पूर्व-वयांतील दिवस मोठ्या आनंदानें गेले.

## ९. गोमुखकृत स्त्रीनिंदा.

एकदां यात्रेच्या वेळीं तो राजपुत्र आपली प्रिया व मंत्री यांसह नाग-वन नामक उद्यानास गेला. तेथें एका सकाम वैश्यस्त्रीचें निराकरण केल्यामुळें गोमुखास ती विष घालून मारण्यास तयार झाली; पण तें तिचें कपट त्या शहाण्यास तिच्या सखी कडूनच कळलें. तेव्हां गोमुखानें तिनें आणून दिलेल्या पेयाचा अव्हेर केला, व स्त्रियांची निंदा केली. खरोखर विधात्यानें अगोदर स्त्रिया व नंतर साहस निर्माण केलें असावें. यांना स्वभावतःच दुष्कर असें कांहीं नाहीं. अमृत व विष या दोन द्रव्यांनीं स्त्री बनविलेली असावी; कारण ती अनुरक्त झाली तर तिच्या-पासून अमृत प्राप्त होतें, व विरक्त झाली तर विषाचा लाभ होतो. जिचें मुख प्रसन्न असून पातक गुप्त आहे, तिचें हृदय कोणाला समजणार ? तीवर फुललेलीं कमलें व आंत गुप्त असलेला मकर यानीं युक्त अस-लेल्या कमलिनीप्रमाणेंच आहे; पण देवलोकांतूनच आलेली एकादीच सुस्त्री सूर्याच्या निर्मल–प्रभेप्रमाणें पतिपरायण असते. बाकीच्या पापी स्त्रियांना नागिणीची उपमा योग्य आहे.

एका गावांत शत्रुघ्न म्हणून एक पुरुष होता. त्याची भार्या व्यभि-चारिणी झाली. त्यानें एके दिवशीं सायंकाळीं जाराशीं संगत झालेल्या तिला पाहिलें, त्या बरोबर रागावलेल्या त्यानें अंतर्गृहांत असलेल्या त्या जाराला खड्गानें जीवानिशीं मारलें, व रात्र केव्हां होते म्हणून वाट पहात तो भार्येला अडवून दारावर बसला. इतक्यांत रात्रभर रहाण्याकरितां जागा शोधणारा एक मार्गस्थ तेथें आला. तेव्हां शत्रुघ्नानें त्याला मोठ्या आनंदानें जागा दिली, व रात्रीं युक्तीनें त्याला वश करून घेऊन त्याच्या साह्यानें त्यानें त्या मारलेल्या पाप्यास उचलून अरण्यांत नेलें; पण त्याला जों तो एका खोल विहिरींत टाकीत आहे, तोंच मागून गुपचुप आलेल्य

त्याच्या भार्येनें त्यालाही विहिरींत ढकललें. सारांश; या जगांत कुस्त्री कोणतें साहस करीत नाहीं ? याप्रमाणें वयानें लहान असूनही गोमुख स्त्रीचरिताची निंदा करूं लागला. नंतर नागवनांतील नागांचें पूजन करून नरवाहनदत्त आपल्यां सर्व परिवारासह स्वमंदिरीं गेला.

## १०. राजनीतीचें तत्त्व.

दुसऱ्या दिवशीं स्वतः जाणत असूनही मंत्र्यांची परीक्षा पहाण्याकरितां नरवाहनदत्त गोमुखादिकांस राजनीतीचें तत्त्व विचारूं लागला. तेव्हां आपण स्वतः सर्वज्ञ आहां, हें ठाऊक असतांनाही प्रश्न करीत आहां म्हणूनच, आम्ही सांगतों-अशी प्रस्तावना करून व एकमेकांच्या विचारानें राजनीतीचें सार ठरवून ते म्हणाले. राजानें प्रथम वश केलेल्या इंद्रियरूपी अश्वांवर आरोहण करून कामक्रोधादि आंतर शत्रूंस जिंकावें. आपल्या शरीरादिकांस जिंकल्यावर नंतर परकीय बाह्य शत्रूंना जिंकावें; कारण ज्यानें आपल्यालाच जिंकलें नाहीं, तो अजितात्मा दुसऱ्याला वश कसें करणार ! नंतर गुणवान् व विद्वान् मंत्रिवर्गाचा संग्रह करावा. अथर्व वेदोक्त (अभिचारादि )कर्मांत निष्णात असलेल्या तपस्वी व अति दक्ष पुरोहिताची योजना करावी. नाना प्रकारच्या युक्तींनीं भय, धर्म व काम यांविषयीं चांगलें परीक्षण करून, अमात्यांची योग्य कामांत योजना करावी. कार्यप्रसंगीं एकांतांत परस्पर बोलत असलेल्या त्यांच्या वचनाचें परीक्षण करावें. सत्य, द्वेषमूलक, स्नेहयुक्त व स्वार्थसहित भाषण तत्काल ओळखावें. सत्यानें संतुष्ट व्हावें, कापट्य करणारास दंड करावा, गुप्त हेर ठेवून त्यांच्या योगानें प्रत्येक मंत्र्याचें आचरण कसें आहे, तें पहावें. चार, हेर किंवा दूत असें ज्यांना म्हणतात, तेच राजाचे नेत्र आहेत. त्यांना नेहमीं उघडे ठेवून सर्व कार्यें पहावींत. क्षुद्र शत्रूंचें उन्मूलन करावें. पुष्कळ संपत्ति सांठवावी. अपराध्यास दंड करावा, शूर लोकांचें सैन्य जमवावें व अशारीतीनें बद्धमूल होऊन रहावें परदेशांस जिंकण्याची इच्छा करणाऱ्या राजानें त्यानंतर उत्साह, प्रभुता व मंत्र या तीन शक्तींनी युक्त होऊन, आप्त ( हितकार ), बुद्धिमान् व विद्वान् मंत्र्यांशीं संकेत करावा. त्यांनीं ठरविलेल्या गोष्टींचा आपल्याशींच चांगला विचार करावा. सामदानादि उपा-

यांस जाणणाऱ्या त्यानें नसलेल्या वस्तूंचें सपादन व असलेल्या वस्तूंचें संरक्षण करावें. संधि-विग्रहादि सहा गुणांचा योग्यरीतीनें उपयोग करावा. याप्रमाणें आळस सोडून व सतत सावधान राहून आपपर-विचारपूर्वक जो कार्यें करितो, त्याचा अवश्य विजय होतो. त्याला कोणी जिंकूं शकत नाहीं. पण जो मूर्ख व काम-लोभांध असतो त्याला त्याचे वृथा मार्गदर्शक व धूर्त अमात्य, भलत्याच मार्गानें नेऊन खड्डयांत पाडतात व सर्वस्वीं नागवितात. शेतकरी साळीच्या शेताला, चोहोंकडून कुंपण घालून, जसें बंद करून सोडतात; त्याप्रमाणें धूर्तांनीं ज्यांच्याकडे जाण्याचे सर्व मार्ग बंद केले आहेत, अशा त्या राजाजवळ कोणी शहाणा जाऊं शकत नाहीं. त्याच्या गुप्त कृत्यामध्येंही शिरून ते त्याला आपलासा करून टाकितात. त्यामुळें विशेष गोष्टींस न जाणाऱ्या त्याच्यापासून लक्ष्मी पळून जाते. यास्तव राजानें जितात्मा, युक्तदंड व विशेषज्ञ असावें. प्रजेचें प्रेम हेंच त्याच्या स्थिरलक्ष्मीचें मुख्य साधन आहे. पूर्वी एक शूरसेन नांवाचा राजा होता. तो केवळ आपल्या भृत्यांवर पूर्ण विश्वास ठेवीत असे. सचिवांनीं त्याला अगदीं आपल्या मुठींतला करून घेतलें होतें त्यामुळें ते हवा तसा कारभार चालवीत. त्यांची इच्छा नसल्यास ते राजाच्या अतिशय निकट संबंधी जनालाही कांहीं देत नसत, व त्यांची मर्जी लागल्यास एकाद्या परक्यालाही ते हवें तें देत. राज्यव्यवहारही त्यांच्या इच्छेप्रमाणें होत असे. त्यामुळें पुष्कळ निरपराध्यांस दंड होऊन अपराधी सुटून जात, असा व्यवहार बरेच दिवस चालला, त्यामुळें त्या राजाची प्रजा विरक्त झाली. हा राजा नाहींसा होईल तर बरें, असें जो तो बोलूं लागला; पण शेवटीं राजाला ती गोष्ट समजली, व त्याबरोबर अंजन घातल्याप्रमाणें त्याचे डोळे उघडले. त्यानें युक्तीनें मंत्र्यांचा कट फोडून त्यांचें सामर्थ्य कमी केलें, आणि स्वतःवरील गुणांनीं भूषित होऊन कोणावरही विश्वास न ठेवतां त्यानें राज्य चालविलें. त्यामुळें त्याची प्रजा पुनः त्याच्यावर पित्याप्रमाणें प्रेम करूं लागली.

तसाच एक हरिसिंह म्हणून सामान्य राजा होता. तो स्वतः नीतितत्त्वज्ञ असून त्यानें भक्त व ज्ञानी अमात्य आपल्या पदरीं ठेविले होते. चांगला दुर्ग व विपुल द्रव्यसंचय यांचेंही त्याला चांगलें सहाय होतें.

त्यानें प्रजाप्रेम संपादन करून असें राज्य केलें, कीं चक्रवर्ती राजालाही तो भारी होऊन राहिला. सारांश, विचार व चिंता या दोन गोष्टी राज्यांत मुख्य आहेत.

## ११. नरवाहनदत्ताचा मदनमञ्चुकेशीं विवाह.

इतकें सांगून ते सर्व अमात्य मुकाट्यानें बसले असतां, नरवाहनदत्त त्यांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून–पुरुषाचें कर्तव्य जरी चिंत्य असलें, तरी दैव अचिंत्य आहे, असें म्हणाला. नंतर त्याच्या सहवर्तमान तेथून निघून फार वेळ झाल्यामुळें, उत्कंठित झालेल्या आपल्या प्रियेला पहाण्याकरितां तो कलिंगसेनेच्या मंदिरांत गेला. तेथें तो आसनावर बसला असतां, आदर करणारी व क्षणभर विस्मित झालेली कलिंगसेना गोमुखास म्हणाली,–" या आयुष्मान् युवराजाला उशीर लागल्यामुळें, अत्यंत उत्सुक झालेल्या मदनमञ्चुकेसह मी गच्चीवर चढून त्याचा मार्ग पाहूं लागलें. तों किरीट व खड्ग यांनीं भूषित झालेला एक दिव्याकृति पुरुष आकाशांतून खालीं उतरला, व–मी मानसवेग नांवाचा विद्याधरांचा अधीश्वर आहें. तूं सुरभिदत्ता अप्सरा आहेस. शापामुळें तूं येथें आलीस. ही तुझी कन्या दिव्य आहे, हें मी पूर्ण ओळखलें. ही कन्या मला दे; कारण हा आपला योग्य संबंध होणार आहे.–असें तो मला एकाएकीं म्हणाला.–तेव्हां मी त्यास हंसून म्हटलें,–" देवांनीं नरवाहनदत्त हिचा पति निश्चित केला. तो तुम्हा सर्वांचा चक्रवर्ती होईल. पण माझ्या तोंडचे हे शब्द कानीं पडतांच माझ्या कन्येच्या नेत्रांना अकस्मात् विजेप्रमाणें दिपविणारा तो विद्याधर आकाशांत उडून गेला.

तें ऐकून गोमुख म्हणाला–हा आमचा स्वामी उत्पन्न झाला असतां, जी आकाशवाणी झाली ती ऐकून विद्याधर, पुढें अधिपति होणाऱ्या याचा द्वेष करूं लागले, व त्याला मारावयास टपले. कारण बलिष्ठ नियंता प्रभु कोणत्या उच्छृंखल पुरुषाला आवडणार आहे?* पण शंभूनें आपल्या गणांची योजना करून याचें रक्षण केलें. असें नारदानें सांगितलेलें वृत्त मीं बाबांच्या तोंडून ऐकलें आहे.

तें ऐकून व सांप्रतकाळीं विद्याधर आपल्या विरुद्ध आहेत, असें जाणून कलिंगसेना मनांत भयभीत झाली. माझ्याप्रमाणें हिलाही कोणी फसवि-

* उच्छृंखलो नियंतारं क इच्छेद्बलिनं प्रभुम् ।

त्यास काय करावें ? अशी शंका आल्यामुळें ती म्हणाली,—तर मग राजपुत्र हिच्याशीं सत्वर विवाह कां करीत नाहीं. त्यावर गोमुखादिक म्हणाले,—" तूंच वत्सेश्वराला ही गोष्ट सांग."—नंतर त्या सर्वांसह नरवाहनदत्त मदनमञ्चुकेकडे पहात त्याच उद्यानांत रममाण झाला. त्याच्या प्रियेचें मुख फुललेल्या कमलासारखें, नेत्र अर्धवट उमललेल्या कुवलयासारखे, ओष्ठ दुपारीच्या फुलासारखे व उरोज मंदारपुष्पाच्या गुच्छासारखे होते, आणि ती स्वतः शिरीषपुष्पासारखी सुकुमार होती. तात्पर्य, सर्व जगाला जिंकण्याकरितांच जणुंकाय मदनानें तिचा सर्व देह पुष्पमय रचिला होता, यांत संशय नाहीं.

असो; दुसऱ्या दिवशीं कलिंगसेना स्वतः वत्सेश्वराकडे गेली, व कन्येच्या विवाहाकरितां तिनें त्याची प्रार्थना केली. तेव्हां 'बरें आहे' असें म्हणून तिची रवानगी केल्यावर वासवदत्तेच्या समक्ष मंत्र्यांस बोलावून तो म्हणाला,—" कलिंगसेना कन्येच्या विवाहाकरितां त्वरा करीत आहे, पण त्या स्वैरिणीशीं शरीरसंबंध कसा करावा ? ती जरी निर्दोष आहे तरी लोक थोडेंच तसें समजणार आहेत." पूर्वी लोकरंजनार्थ राजा रामचंद्रानें आपल्या अत्यंत प्रिय व निर्दोष भार्येचाही त्याग केला, हें सर्वांस ठाऊक आहे! भीष्मानें आपल्या भावाकरितां मोठ्या यत्नानें जिंकून आलेल्या अंबेला तिनें मनानें दुसऱ्याच राजाला वरलें आहे, असें समजतांच सोडून दिलें. त्याचप्रमाणें हिनें मनानें प्रथम मला वरलें असून, मागून मदनवेगानें तिच्याशीं विवाह केला, म्हणून लोक तिची निंदा करितात. यास्तव नरवाहनदत्तानें गांधर्वविधीनें हिच्याशीं विवाह करावा, असें मला वाटतें."

राजाचें हें म्हणणें ऐकून घेऊन यौगंधरायण म्हणाला—प्रभो, हें अनुचित कर्म कलिंगसेनेला कसें मान्य होईल ? कन्येसह ही सामान्य स्त्री नव्हे; दिव्य स्त्री आहे. असें राष्ट्रभर सर्वांच्या तोंडीं झालें आहे; माझ्या ज्ञानी ब्रह्मराक्षस मित्रानेंही मला असेंच सांगितलें आहे.

ते आपसांत इतकें जों बोलत आहेत, तों एकाएकीं पुढीलप्रमाणें आकाशवाणी झाली.—'माझ्या नेत्रजन्य अग्नीनें जळालेल्या व नरवाहनदत्त या रूपानें अवतीर्ण झालेल्या कामाची, ही रतीही माझ्याच आज्ञेनें उत्पन्न झाली आहे. माझ्या प्रसादानें सर्व शत्रूंस जिंकून सर्व पत्नींतील श्रेष्ठ अशा

या मदनमञ्चुकेसह हा राजपुत्र दिव्यकल्पभर विद्याधर–चक्रवर्तित्व भोगील'. ही दिव्य वाणी ऐकून वत्सेशानें आपल्या परिवारासह शंकरास नमस्कार केला व पुत्राच्या विवाहाविषयीं मोठ्या आनंदानें निश्चय केला.

त्यानंतर ज्ञानी यौगंधरायणाची प्रशंसा करून राजानें जोशांस बोलाविलें व उचित सत्कार करून, त्यांस विवाहाकरितां शुभलग्न स्थिर करण्याची आज्ञा केली. त्याबरोबर शुभलग्नाचा निश्चय करून ते म्हणाले,–"देव, युवराजाला कांहीं दिवस हिचा वियोग सहन करावा लागेल, हें आम्हीं आमच्या शास्त्रदृष्टीनें सांगत आहों."

तें ऐकून राजानें आपल्या वैभवानुरूप विवाहाची अशी तयारी केली, कीं तिच्या योगानें केवल त्याची नगरीच नव्हे, तर सर्व पृथ्वी क्षुब्ध झाली. विवाहदिवस उजाडला असतां कलिंगसेनेनें, मदनवेगानें दिलेल्या दिव्यभूषणांच्या योगानें, आपल्या कन्येला भूषित केलें. सोमप्रभाही पतीच्या आज्ञेनें तेथें आली. तिनें दिव्य मंगल–कौतुक केलें असतां, मदनमञ्चुका अधिकच शोभूं लागली; कारण चंद्रतनु स्वभावतःच सुदर, मग कृत्तिकानुगत झाल्यावर काय विचारतां? * ज्यांच्या दिव्य गायनाचा ध्वनि स्पष्ट ऐकूं येत आहे, अशा दिव्य स्त्रिया, शंकराच्या आज्ञेनें जणुं काय तिच्या रूपानें विजित झाल्यामुळें लज्जित होऊनच, गुप्तपणें मंगलगीतें गाऊं लागल्या. 'हे भक्तांवर अनुकंपा करणारे पार्वति, तूं स्वतः येऊन आज रतीचें तप कृतार्थ केलेंस.' इत्यादि दिव्य चारणाचें वाद्यरव–मिश्र वचन ऐकून तेथील लोकांनीं गौरीही तेथें आली आहे, असें अनुमान केलें. त्यानंतर केलेल्या विवाहकौतुक–मंगलानें शोभणारा नरवाहनदत्त जेथें नानाप्रकारचीं वाद्यें वाजत आहेत, अशा विवाहगृहांत गेला. तेथें वैदिक ब्राह्मणश्रेष्ठांनीं यथाशास्त्र विवाहमंगलविधि केला असतां, वधू–वर शुद्ध रत्नांनीं दीप्त झालेल्या व राजांच्या मस्तकाप्रमाणेंच जणुं काय, दीप्त

* नन्वेवमेव कान्ता चन्द्रतनुः कार्तिकानुगता ।

अग्नीनें युक्त असलेल्या वेदीवर चढले. चंद्र व सूर्य असे दोघेही जर मेरु पर्वताच्या सभोंवार एकदम फिरूं लागले, तर त्यांची मात्र उपमा अग्नीस प्रदक्षिणा घालणाऱ्या जोडप्यास देतां आली असती. विवाहमंगल वाद्याच्या ध्वनीला देवदुंदुभींनीं व वधूनें अग्नींत टाकलेल्या लाह्यांना देवांनीं केलेल्या पुष्पवृष्टीनें आच्छादित करून सोडलें; उदारबुद्धि कलिंगसेनेनें जामातास इतकें सुवर्ण व रत्नें दिलीं, कीं त्यांच्यायोगानें त्या नगरींतील लोक कुबेरालाही त्याच्याहून न्यून समजूं लागले.

याप्रमाणें फार दिवसांपासून इच्छिलेला पाणिग्रहण–विधि समाप्त करून, तें अलौकिक जोडपें स्त्रीजनांनीं भरलेल्या अंतःपुरांत गेलें. भेटी घेऊन चोंहोंकडून आलेल्या मोठ्या शूर असंख्य सैन्ययुक्त, पण पराभव पावून नम्र झालेल्या राजांच्या योगानें जलौघांनीं जसा सागर, तसें तें नगर भरून गेलें. वत्सराजानें या महोत्सवप्रसंगीं सर्व सेवकांस व मान्य लोकांस मोठमोठ्या देणग्या देऊन अतिशय संतुष्ट केलें. देशोदेशींच्या लोकांस उत्तमोत्तम गायकांचीं गाणीं, नर्तकांची नृत्यें, नटांचीं नाटकें व वादकांचीं वाद्यें यांच्या योगानें जीवलोक तन्मय झाल्यासारखा भास झाला. पौरस्त्रियांनीं जिला भूषित केलें आहे, अशी कौशांबीही वाऱ्यानें हालणाऱ्या पातका हेच हात उचलून हावभाव करीत व नाचत आहे असें त्यावेळीं वाटलें. याप्रमाणें प्रत्यहीं वाढणारा तो महोत्सव पुढें पुष्कळ दिवसपर्यंत चालला. तेथील सुहृत् व स्वजन–वर्ग सदा आनंदित असे; पण त्या महोत्सव प्रसंगीं तर अगदीं पूर्ण मनोरथ झाला. त्यानंतर उदयाची इच्छा करणारा युवराज नरवाहनदत्त मदनमञ्चुकेसह फार दिवसांपासून इच्छिलेलें मर्त्य लोकचें सुख भोगूं लागला.

६. मदनमञ्चुकालम्बक समाप्त.

# ७. रत्नप्रभालंबक.

## तरंग १ ला.

### १. रत्नप्रभा व नरवाहनदत्त यांची भेट.

याप्रमाणें प्राणप्रिय मदनमञ्चुकेशीं विवाह करून कृतार्थ झालेला युवराज नरवाहनदत्त आपल्या सचिवांसह यथेच्छ सुख भोगीत कौशांबींत राहिला. एकदां वसंतऋतु लागून आंब्यांवर बसलेल्या मत्त कोकिलांचा रम्य ध्वनि ऐकूं येऊं लागला असतां, नूतन व टवटवीत पालवीनें भरलेल्या वृक्षांना व लतांना, मलय-मारुत (दक्षिणवायु) नृत्य करीत असल्याप्रमाणेंच, हालवूं लागला असतां, व मधुपान करणारे भ्रमर मत्त होऊन गुंजारव करूं लागले असतां, राजपुत्र मंत्र्यांसह उद्यानांत विवाह करावयास गेला. तेव्हां त्या स्थलीं एकटाच फिरत असलेला त्याचा मित्र तपंतक आनंदानें त्याच्यापाशीं येऊन म्हणाला,-" युवराज, येथें जवळच कोणीएक अति अद्भुत कन्या आकाशांतून उतरून अशोकवृक्षाच्या खालीं उभी आहे. आपल्या कांतीनें दिशांस प्रकाशित करणाऱ्या तिनेंच सख्यांसह मजजवळ येऊन आपल्याला बोलावून आणावयास सांगितलें आहे."

तें ऐकतांच तिच्या दर्शनाविषयीं अतिशय उत्सुक झालेला नरवाहनदत्त आपल्या सचिवांसह वसंतकानें सांगितलेल्या अशोकवृक्षाच्या खालीं सत्वर गेला. तेथें वाट पहात असलेल्या त्या कन्येचें अद्भुत रूप पाहून, त्याला मोठें समाधान वाटलें. तिचे नेत्र चंचल भ्रमरांप्रमाणें व ओंठ लाल पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें दिसत होते. पुष्पांतील परागांच्या ढिगाप्रमाणें तिची अंगकांति पीतवर्ण होती. आपल्या छायेनें संताप दूर करणारी ती साक्षात् मूर्तिमती उपवनदेवताच आहे, असा त्याला भास झाला. असो; जवळ जातांच तिनें राजपुत्राला प्रणाम केला, तेव्हां तिच्या रूपानें ज्याच्या नेत्रांस हरण केलें आहे, अशा नरवाहनदत्तानेंही तिचें अभिनंदन केलें

सर्व उचित आसनावर बसले असतां, गोमुख तिला म्हणाला,-" तूं कोण? व येथें कशी आलीस?" तें ऐकून मदनाच्या दुर्लंघ्य आज्ञेमुळें जिनें

आपली स्वाभाविक लज्जा जरा शिथिल केली आहे, अशी ती युवराजाच्या तोंडाकडे वक्र दृष्टीनें वारंवार पाहून जणुंकाय, प्रेमरसाचा स्रावच करीत आपला सविस्तर वृत्तांत सांगूं लागली.

## २. हेमप्रभाचें वृत्त.

कैलासपर्वतावर कांचनशृंग म्हणून एक सुवर्णाचें नगर आहे. तें आपल्या तेजानें सूर्यासारखें चमकत असतें. अनेक योजनें विस्तीर्ण असलेल्या त्यांत हेमप्रभ नांवाचा एक विद्याधरेश्वर आहे. त्याची शंकरावर मोठी भक्ति असून चंद्राच्या रोहिणीप्रमाणें त्याच्या अनेक भार्यांमध्यें अलंकारप्रभा म्हणून एक अतिप्रिय भार्या आहे. तो धार्मिक राजा तिच्यासह प्रातःकालीं उठून व स्नान करून, गौरी व महेश्वर यांची नित्य पूजा करितो. नंतर मर्त्यलोकीं येऊन दीन दरिद्री शुभगुणसंपन्न व विद्वान् ब्राह्मणांस पुष्कळ धन देतो. आणि त्यानंतर आपल्या घरीं परत जाऊन धर्मानें राज्यकार्य पहातो. एकाद्या नियतव्रत मुनीप्रमाणें तो नित्य सात्त्विक व युक्त आहार करीत असतो. असो; कांहीं दिवसां पूर्वी एकदां त्या राजाला ' पुत्र नाहीं ' म्हणून मोठा खेद झाला. त्याचें मन उद्विग्न झालें. पण त्याच्या चर्येवरून त्याची मानसिक व्यथा ओळखून प्रिया अलंकारप्रभा त्याला उद्वेगाचें कारण विचारूं लागली. तेव्हां तो विद्याधरांचा राजा म्हणाला,—" प्रिये, मला सर्व अनुकूल आहे; पण एक पुत्र नसल्यामुळें मोठें दुःख होतें. मागें मी एका पुत्ररहित सत्त्ववानाची कथा ऐकिली, व तिचें अकस्मात् स्मरण झाल्यामुळें माझ्या मनांत आज ही चिंता उद्भवली आहे. "—तेव्हां ' मला ती कथा सांगा ' असा प्रियेनें आग्रह केला असतां, तो थोडक्यांत ती कथा सांगूं लागला.

## ३. सत्त्ववानाची उपकथा.

प्रिये, चित्रकूटनगरांत ब्राह्मणवर म्हणून एक राजा होता. ब्राह्मणांवर याची मोठी भक्ति असे. त्याचा सत्त्वशील या नांवाचा एक विजयी सेनापति होता. राजापासून त्याला प्रतिमासीं शंभर स्वर्ण वेतन मिळत असे; पण त्या दानशील पुरुषाला तें धन पुरत नसे. कारण त्याला पुत्र नसल्यामुळें त्याचें चित्त दानामध्येंच आसक्त झालें होतें. विधात्यानें मला चित्तरंजनार्थ पुत्र दिला नाहीं, दान—व्यसन दिलें आहे; पण त्याला पुरेल इतकें द्रव्य नाहीं. जीर्ण व शुष्क वृक्ष अथवा पाषाण होणेंही चांगलें,

पण या संसारांत दरिद्र व दानशील निपजणें चांगलें नव्हे.* असा नित्य विचार करणारा तो सत्त्वशील एकदां उद्यानांत फिरत असतांना, त्याला भाग्यवशात् एक मोठा निधि सांपडला. तेव्हां विपुलसुवर्णानें व अमूल्य रत्नांनीं युक्त असलेलें तें सर्व धन घेऊन तो आपल्या घरीं गेला. आणि त्या दिवसापासून तो यथेच्छ भोग भोगूं लागला, दानें देऊं लागला आणि आप्त व सेवक यांस देणग्या देऊं लागला.

पण तें पाहून त्याच्या दायजांस 'याला खचित कोठें तरी द्रव्य सांपडलें असावें, त्यावांचून याला इतका व्यय करतां येणें शक्य नाहीं' असें वाटलें, व त्याप्रमाणें त्यांनीं लागलेंच राजाला कळविलें. तेव्हां राजानें प्रतीहाराला पाठवून त्याला बोलाविलें. तोही तत्काल राजसभेत जाऊन एक क्षणभर बाहेर अंगण्याच्या कोपऱ्यांत उभा राहिला, व सहज हातांतील काठीनें भूमीस खणीत असतांना तेथेंही त्याला तांब्याच्या घागरींत घातलेलें मूल्यवान् निधान सांपडलें. हें राजाला देऊन तूं त्याचें रंजन कर. असाच जणुं काय त्याच्या सत्त्वावर संतुष्ट झालेल्या विधात्याचा आशय, तें सुचवीत आहे, असें त्याला वाटलें, व लागलाच तो घट मातीनें झांकून प्रतीहारानें राजाज्ञा आणली असतां तो आंत गेला. तेव्हां 'तुला निधि मिळाला आहे, असें ऐकतों तर तो आमच्याकडे आणून दे' असें राजानें त्यास सांगितलें. त्यावर देव, पूर्वीचा निधि आपल्याला देऊं कीं आज मिळालेला देऊं ?' असें तो विचारूं लागला. तेव्हां 'आज नूतन मिळालेला निधीच मला दे, अशी राजाज्ञा झाली असतां, त्यानें अंगणांतील कोपऱ्यांत सांपडलेला तो मोठा निधि राजाला अर्पण केला. तेव्हां संतुष्ट झालेल्या राजानें 'पूर्वीच्या निधीचा तूं यथेच्छ विनियोग कर' असें त्याला सांगितलें. नंतर राजाची आज्ञा घेऊन तो भाग्यवान् सत्त्वशील आपल्या घरीं गेला, व त्या दिवसापासून दान व भोग यांच्या योगानें आपलें नांव सार्थ करीत आणि अपुत्रता–दुःख कमी करीत तो तेथें राहिला.

हें सत्त्वशीलाचें मागें ऐकलेलें चरित्र मला आज आठवलें. आपल्यालाही पुत्र नाहीं, असें मनांत आल्यामुळें वाईट वाटलें. असें हेमप्रभानें

* वरं जीर्णस्य शुष्कस्य तरोर्जन्मोपलस्य वा ।
न संसारे दरिद्रस्य त्यागैकव्यसनस्य च ॥

देवी अलंकारप्रभेस सांगितलें. तेव्हां ती त्याला म्हणाली-स्वामिन्, खरें आहे. सत्त्वशील पुरुषांना दैवच सहाय्य करीत असतें. संकटाच्या वेळीं त्या सत्वशीलाला अकस्मात् दुसरा निधि जसा मिळाला, तसेंच तुमच्या सत्त्वप्रभावानें तुमचें इष्टही सिद्ध होईल. याविषयीं मी विक्रमतुंगाची कथा सांगतें ती ऐका.

## ४. विक्रमतुंगाची कथा.

चातुर्वर्ण्य-व्यवस्थेनें व विपुल ऐश्वर्यानें मंडित झालेल्या पाटलीपुत्र नगरांत विक्रमतुंग राजा होता. तो मोठा धैर्यवान् असून याचकांस दान देतांनां व शत्रूंशीं युद्ध करतांना कधींही पराङ्मुख होत नसे. एकदां तो वीर मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला. तेथें एक ब्राह्मण बिल्व-फलांचा होम करीत आहे, असें त्यानें दुरूनच पाहिलें. तेव्हां 'हें तूं काय करीत आहेस,' असें त्याला विचारावें, अशी राजाला इच्छा झाली. पण मृगयेमध्यें निमग्न झालेला तो सैन्यासह दूर गेला. चेंडू प्रमाणें उडणाऱ्या व भूमीवर पडणाऱ्या सिंहादि पशूंस आपल्या हातानें मारीत पुष्कळ वेळ मृगया-क्रीडा करून शेवटीं थकलेला तो राजा परतला. पण अद्यापि तो ब्राह्मण होम करीतच आहे, असें पाहून विक्रमतुंग राजा त्याच्या जवळ गेला व प्रणाम करून 'आपलें नांव काय व हें कर्म आपण कोणत्या फलाच्या उद्देशानें करीत आहां!' असें त्यास विचारूं लागला. तेव्हां आशीर्वाद देऊन तो म्हणाला,-" मी नागशर्मा या नांवाचा ब्राह्मण आहें, या होमापासून मला कोणतें फल मिळणार आहे तें सांगतों ऐक."

या बेलफळांच्या होमामुळें अग्नि जेव्हां प्रसन्न होतो, तेव्हां कुंडांतून सोन्याचीं बेलफळें निघतात व लागलाच अग्निही प्रकट होऊन इष्ट वर देतो. मी आज फार दिवसांपासून बेलफळांचा होम करीत आहें; पण मज मंदभाग्यावर तो देव अजून प्रसन्न होत नाहीं.

ब्राह्मणानें असें सांगितलें असतां, तो धीरसत्त्व राजा म्हणाला,-" तर मग मला एक फल दे, म्हणजे मी आपल्या हातानें त्याचा होम करून तुझ्या अग्नीला आतांच प्रसन्न करितों."-तेव्हां 'अस्नात व अशुचि असा तूं अग्नीला कसा प्रसन्न करणार? कारण मी व्रतस्थ व पवित्र होऊन आज इतके दिवस त्याची आराधना करीत आहें, तरी तो मजवर प्रसन्न

होत नाहीं.' असें तो ब्राह्मण म्हणाला. पण 'इतकें बोलणें हवें कशाला? तुम्ही तें बेलफळ माझ्या हातांत द्या, आणि एका क्षणांत काय चमत्कार होतो तो पहा' असें राजानें त्यास उलट म्हटलें. तेव्हां ब्राह्मणानें मोठ्या कौतुकानें एक फल त्याला दिलें. तें घेऊन राजानें दृढ चित्तानें 'अग्ने! तूं जर यानें संतुष्ट न झालास तर मी या आपल्या मस्तकाचा होम करीन' असा संकल्प करून तें फल त्यांत टाकलें. त्याबरोबर त्याच्या सत्त्वतरूचें जणुं काय फलच असें सुवर्णमय बेलफळ घेऊन, स्वतः अग्नि प्रकट झाला, व राजाला म्हणाला,-"तुझ्या या धैर्यानें मी संतुष्ट झालों आहें. हवा तो वर माग" त्यावर तो धीर पुरुष म्हणाला,-प्रभो! मला आणखी दुसरा कोणता वर इष्ट असणार? या ब्राह्मणाचे मनोरथ पूर्ण कर, म्हणजे झालें.

राजाची ती उदार प्रार्थना ऐकून, अधिकच प्रसन्न झालेला अग्नि, त्याला म्हणाला,-"राजन्, हा ब्राह्मण महाधनपति होईल; व माझ्या प्रसादानें तुझीही संपत्ति कधीं क्षीण होणार नाहीं."-अग्नीनें दिलेला हा वर ऐकून, ब्राह्मण प्रणामपूर्वक त्याला म्हणाला,-भगवन्! हा राजा स्वेच्छाचारी, पण असें असूनही तूं एकाएकीं प्रकट होऊन त्याला वर दिलास, आणि मी आज इतके दिवस पवित्र होऊन एकसारखें तुझें हवन करीत आहें, तरी तूं मजवर प्रसन्न झाला नाहींस; याचें कारण काय?

तें ऐकून अग्नि म्हणाला,-"ब्राह्मणा, मी जर याला दर्शन दिलें नसतें, तर तीक्ष्णवीर्यवान् अशा या राजानें आपलें मस्तक तोडून माझ्यामध्यें आहुतिरूपानें टाकलें असतें. तीव्र सत्त्ववानाला सत्वर सिद्धि प्राप्त होते; आणि तुझ्यासारख्या मंदसत्त्ववानाला सिद्धि मिळावयास उशीर लागतो."† असें म्हणून अग्नि गुप्त झाला. नंतर, राजाला विचारून कृतार्थ झालेला तो ब्राह्मण आपल्या घरीं गेला, व हळूहळू धन संपादन करीत कांहीं दिवसांनीं महाधनवान् झाला. राजाचाही प्रभाव पाहून, विस्मित झालेला अनुयायिवर्ग त्याची स्तुति करीत, त्याच्या मागून चालला असतां, योग्य वेळीं तोही आपल्या पाटलीपुत्र नगरास येऊन पोंचला.

एकदां राजा एकांतांत बसला असतां शत्रुंजयनामक प्रतीहार येऊन म्हणाला,-"प्रभो, एकांतांत आपल्याला कांहीं विनंति करण्याची इच्छा

---

† तीव्रसत्त्वस्य न चिराद्भवन्त्येव हि सिद्धयः।
मन्दसत्त्वस्य तु चिराद्भवन्त्युष्मादृशस्य ताः॥

करणारा, व दत्तशर्मा असें आपलें नांव सांगणारा एक ब्राह्मणपुत्र द्वारावर उभा आहे." तें ऐकून 'त्याला आंत आण.' असें राजानें सांगितलें. आज्ञेप्रमाणें तो आंत आला व 'स्वस्ति' असें म्हणून व प्रणाम करून त्याच्याजवळ बसला. आणि म्हणाला,-" प्रभो, मी एका चूर्णाच्या योगानें तांब्याचें तत्काल सोनें कसें करावें, तें जाणतों. माझ्या गुरूनें ती युक्ति मला सांगितली आहे व तिच्या योगानें त्यानें केलेलें सोनेंही मी पाहिलें आहे."-तें ऐकतांच राजानें तांबें आणविलें व त्याचा रस करून त्या बटूनें त्यांत चूर्ण टाकलें; पण तें तांब्याच्या रसांत पडण्यापूर्वीच एका यक्षानें अदृश्य राहून वरच्यावर धरिलें, त्यामुळें त्याचें सोनें झालें नाहीं. त्या बिचाऱ्या दत्तशर्मानें तीनदां प्रयोग करून पाहिला; पण तिन्ही वेळां यक्षानें तें चूर्ण हरण केलें. अग्नीच्या प्रसादानें राजाला तें यक्षाचें गुप्त कृत्य दिसत होतें, म्हणून त्यानें आपल्या हातानें तें चूर्ण ताम्ररसांत टाकलें. तेव्हां यक्षानें त्याला हात लावला नाहीं व त्यामुळें त्याचें सोनें झालें. तो चमत्कार पाहून ब्राह्मणपुत्र विस्मित झाला व राजाला त्याचें कारण विचारूं लागला. तेव्हां राजानेंही यक्षाचा वृत्तान्त त्याला सांगितला. नंतर त्याच्यापासून चूर्ण कसें करावयाचें तें शिकून घेऊन, विक्रमतुंग-राजानें त्याचा विवाह करून दिला व त्याला धनादि देऊन कृतार्थ केलें. राजानें त्या युक्तीनें आपला कोष सुवर्णमय करून सोडला. अलौकिक भोग भोगले व ब्राह्मणांस पुष्कळ दानें दिलीं. सारांश; हे नाथ, विधाता भिऊन अथवा संतुष्ट होऊन तीव्रवीर्यवानांस सत्वर सिद्धि देतो. आपणही धीरप्रकृति व दानशील आहां. यास्तव तुमच्या आराधनेनें संतुष्ट झालेला शंभु तुम्हांलाही पुत्र देईल, खिन्न होऊं नका.

अलंकारप्रभेच्या तोंडून निघालेलें हें उदार भाषण ऐकून हेमप्रभ संतुष्ट झाला, व त्यानें तिच्या सांगण्यावर विश्वास ठेविला. त्याचें उत्साहशाली मनच त्याला सुचवूं लागल्या कारणानें शंकराच्या आराधनेनें आपल्याला खचित पुत्र होईल, असें तो समजूं लागला.

नंतर दुसऱ्या दिवशीं आपल्या पत्नीसह स्नान करून शंकराचें पूजन केल्यावर, त्यानें नऊ कोटी सुवर्ण ब्राह्मणांस वांटलें, व दृढ निग्रहानें पुत्रप्राप्तीकरितां यत्न आरंभिला. तीन दिवस निराहार राहून त्यानें शंकराची अशी उत्तम स्तुति केली कीं, तिच्या योगानें अतिशय प्रसन्न

होऊन शंकरानें त्याला स्वप्नांत–' वत्सा, माझ्या अनुग्रहानें तुला एक वंशधर व अद्वितीय पुत्र होईल, आणि गौरीच्या प्रसादानें एक उत्तम कन्या होईल. ती पुढें तुमचा चक्रवर्ती होणारा जो वत्सराज-पुत्र नरवाहनदत्त त्याची भार्या होईल,–'–असें सांगितलें, आणि तो गुप्त झाला. नंतर हेमप्रभ आनंदित होऊन पहांटे जागा झाला व अलंकारवती प्रियेला स्वप्नवृत्तांत सांगूं लागला. तेव्हां तिलाही मोठा हर्ष झाला. कारण गौरीनें तिलाही स्वप्नांत तसेंच सांगितलें होतें. त्यानंतर त्या दोघांनीं स्नान करून देवदेवाचें पूजन केलें, व त्याची स्तुति करून पारणें सोडलें, त्यावेळींही त्या दोघांनीं पुष्कळ दान दिलें.

### ५. रत्नप्रभेची उत्पत्ति व चिंता.

कांहीं दिवसांनीं त्याची ती अलंकारवती प्रिया गर्भवती झाली, व दहाव्या महिन्यांत तिला सूर्यासारखा तेजस्वी पुत्र झाला. त्याच्या देहप्रभेनें प्रसूति-गृहही लाल दिसूं लागलें. हेमप्रभानें शत्रु व दायाद यांस भयावह असलेल्या बालकाचें नांव वज्रप्रभ असें ठेविलें. कुलरूपी सागराच्या वृद्धीकरितां तो चंद्रतुल्य बालक प्रत्यहीं वृद्धि पावूं लागला. कांहीं दिवसांनीं अलंकारप्रभा राणी पुनः गर्भवती झाली. योग्य वेळीं प्रसूत होऊन तिला एक असामान्य कन्या झाली. गौरीच्या प्रसादानें उत्पन्न झालेल्या तिच्या स्वरूपाचें वर्णन करावें तितकें थोडेंच होणार आहे. पित्यानें रत्नप्रभा असें तिचें नांव ठेविलें, व ती चंद्रकलेप्रमाणें वाढूं लागली. तिच्या जन्मसमयीं हेमप्रभ राजानें पुत्रजन्माप्रमाणेंच मोठा उत्सव केला. नंतर योग्यसमयीं बालपणाचें अतिक्रमण करून तारुण्यांत प्रविष्ट झालेल्या वज्रप्रभाचें अनुरूप कन्येशीं लग्न लावून देऊन, राजानें सर्व राज्यभार त्याच्यावर टाकिला. त्यामुळें त्याला जरी पुष्कळ सुख वाटलें, तरी कन्येच्या विवाहाविषयींची चिंता त्याच्या मनाला स्वस्थ बसूं देईना. एकदां तो जवळ बसलेल्या व कोणाला तरी देऊन टाकावयास योग्य असलेल्या कन्येकडे पाहून, मोठ्या दुःखानें अलंकारप्रभेला म्हणाला,–" देवि, काय चमत्कार आहे पहा. असली कुलालंकारभूत कन्याही दुसऱ्याला देऊन टाकावी लागते. त्यामुळें अरेरे ! लोकांनाही फार मोठें दुःख होतें. योग्य वर मिळत नाहीं, म्हणून रात्रीच्या रात्री चिंतेंत घालवाव्या लागतात.

आपली ही रत्नप्रभा किती नम्र, सुशिक्षित, व सुंदर आहे. तरी सुद्धां तिला योग्य पति मिळत नसल्यामुळें माझें चित्त व्याकुल होत असतें," त्यावर 'ही नरवाहनदत्ताची भार्या होईल, असें देवतांनीं हिच्या जन्मकालीं सांगून ठेविलें आहे. मग त्याप्रमाणें त्यालाच ही कां अर्पण करीत नाहीं?' असें भार्येनें मध्येंच म्हटलें. तेव्हां तो पुनः म्हणाला,—तो वर जिला प्राप्त होईल ती कन्या खरोखर मोठी धन्यच होय. तो कामदेवाचा अवतार आहे; पण त्याला अजून विद्यांची प्राप्ति झालेली नाहीं. ती केव्हां होईल म्हणून मी वाट पहात आहें.

असें बोलत असलेल्या पित्याचे ते मदनमोहमंत्रासारखे शब्द कानीं पडतांच रत्नप्रभेची वृत्ति कांहीं चमत्कारिक झाली. त्या वरानें तिचें चित्त आकर्षण करून घेतलें. तिला कांहीं सुचेना, ती वेडी झाली. व कशी तरी आईबापांस वंदन करून आपल्या अंतःपुरांत गेली. चिंतातुर झालेल्या तिला पुष्कळ वेळ झोंपच लागेना; पण शेवटीं कशी तरी ती निजली. पहाटेस 'वत्से, आज शुभ दिवस आहे, करितां तूं कौशांबीस जाऊन तो आपला वर पहा. नंतर तुझा पिता त्याला आपल्या या नगरांत आणून तुझा व त्याचा विवाह करून देईल.' असें दयाळु गौरीनें तिला स्वप्नांत सांगितलें. त्याबरोबर ती सुंदरी खडबडून जागी झाली. तिनें आपलें स्वप्न आईला कळविलें. नंतर तिच्याच अनुज्ञेनें आपल्या विद्या-प्रभावानें तो वर या वेळीं उद्यानांत आहे, असें जाणून ती त्याला पहाण्याकरितां तेथून निघाली.

'आर्यपुत्र, ती रत्नप्रभाच मी आहें. उत्कंठित होऊन मी एका क्षणांत येथें आलें आहें. आतां याच्या पुढचें कायतें तुम्हीच जाणा.'

## ६. रत्नप्रभेचा विवाह.

आपल्या माधुर्यानें अमृतालाही तुच्छ करणारें तें तिचें वचन ऐकून, व नेत्रांना तृप्त करणारें तें तिचें शरीर अवलोकन करून, नरवाहनदत्त मनातल्यामनांत 'विधात्यानें मला नेत्रमय व कर्णमयच कां केलें नाहीं' असें म्हणून त्याची निंदा करूं लागला, व तिला उलट म्हणाला, "हे सुंदरि, तूं प्रेमानें मजकडे आलीस, म्हणून मी आपल्याला धन्य व कृतार्थ समजत आहें."

पण तीं दोघें एकमेकांशीं जों असें नूतन प्रेममय भाषण करीत आहेत, तोंच अकस्मात् आकाशांत विद्याधरांचें सैन्य दिसूं लागलें, व ' हा पहा माझा पिता येथें आला आहे, ' असें जों रत्नप्रभा म्हणत आहे तों राजा हेमप्रभ पुत्रासह आकाशांतून खालीं उतरला. नरवाहनदत्तानें उचित आदर-आतिथ्य केल्यावर एक क्षणभर ते सर्व जों स्वस्थ होत आहेत, तोंच तो वृत्तांत ऐकून मंत्र्यांसह वत्सराजही तेथें आला. परस्पर सत्कार होऊन सर्वांनीं आसन-परिग्रह केल्यावर हेमप्रभानें, कन्येनें वर सांगितलेलाच आपला वृत्तान्त वत्सेशाला सांगितला, व म्हटलें,-" ही माझी प्रिय कन्या रत्नप्रभा येथें आली आहे, असें विद्याप्रभावानें जाणून मी तिच्या मागोमाग आलों. या युवराजाकरितां मी एक उत्तम चक्रवर्ति-विमान तयार करवितों, व त्यांत बसवून याला आपल्या लोकीं नेतों. थोड्याच दिवसांत हा तुमचा पुत्र रत्नप्रभा भार्येसह येथें परत येईल. तर या गोष्टीला आपलें अनुमोदन असावें." विद्याधराचें हें प्रार्थनावचन ऐकून व यौगंधरायणादिकांची संमति घेऊन उदयनानें त्यास ' बरें आहे; याला घेऊन जा; पण सत्वर परत आणून पोंचवा;' असें सांगितलें. हेमप्रभ व वज्रप्रभ यांनीं आपल्या विद्येनें विमान तयार केलें, व त्यांत गोमुखादिकांसह लज्जेनें ज्याचें मुख नम्र झालें आहे, अशा नरवाहनदत्तास बसवून व वत्सराजानें मुद्दाम पाठविलेल्या यौगंधरायणालाही बरोबर घेऊन, हेमप्रभ रत्नप्रभेसह आपल्या काचनशृंग नगरास गेला.

तेथें पोंचल्यावर नरवाहनदत्तानें सोन्याच्या कोटानें चमकत असलेलें आपल्या श्वशुराचें तें सुवर्णमय नगर दुरूनच पाहिलें. त्यांतून चोहोंकडून निघणारे किरण, हे जामातृप्रेमानें पसरलेले त्या नगरीचे अलंकृत अनेक हातच आहेत, असा त्याला भास झाला. असो; हेमप्रभानें यथाविधि कन्यादान केलें. त्या वेळीं तेथें मोठा समारंभ झाला. नारायणाला लक्ष्मीचें दान देतांना सागरानें जशी त्याला कौस्तुभादि दुसरीं रत्नेंही दिलीं, त्याप्रमाणेंच त्या विद्याधरानें आपल्या जावयाला दीप्तविवाह-अग्नीसारखीं अनेक तेजस्वी रत्नें अर्पण केलीं. त्या उत्सवसमयीं तो राजा द्रव्याचा वर्षाव करूं लागला असतां, पताका लावलेलीं घरेंही वस्त्रयुक्त झालीं आहेत, असा भास झाला.

विवाहसमारंभ आटोपल्यावर नरवाहनदत्त दिव्यभोग भोगीत कांहीं दिवस तेथेंच राहिला. आपल्या प्रियेसह, तिच्याच विद्याबलाच्या आश्रयानें आकाशमार्गानें अनेक रम्य उद्यानें, जलाशय, देवस्थानें व भुवनें पहात तो प्रत्यहीं अतिशय रममाण होत असे.

याप्रमाणें त्या विद्याधराच्या नगरांत कांहीं दिवस आनंदानें राहून, वत्सेश्वराचा पुत्र, यौगंधरायणाच्या संमतीनें प्रियेसह आपल्या नगरास परत जाण्याचा विचार करूं लागला. तेव्हां त्याच्या सासूनें मंगलविधान केलें, सासऱ्यानें मंत्र्यांसह त्याची योग्य पूजा केली, आणि त्याच आपल्या विमानांत भार्या, सचिव, श्वशुर व श्यालक यांसह बसून तो आपल्या आईच्या नेत्रांस व मदनमंचुकेच्या हृदयास आनंद देणारा युवराज कौशांबीस परत आला. तो उद्यानांत येऊन पोंचला आहे, असें कळतांच अतिशय आनंदित झालेल्या वत्सराजानें सर्व नगरभर उत्सव सुरू केला. नंतर रोहिणीयुक्त चंद्राप्रमाणें पौरजनांस आनंद देत, तो वधूयुक्त नरवाहनदत्त श्वशुर, श्यालक व सचिव यांसह आपल्या राजधानींत शिरला. राजमंदिरांत पोंचल्यावर पायांवर मस्तक ठेवलेल्या पुत्राचें व नवीन सुनेचें वत्सराजानें व त्याच्या दोघी देवींनीं अभिनंदन केलें. वत्सराजानें नूतन संबंधी हेमप्रभ व त्याचा पुत्र यांचेंही आतिथ्य यथाशक्ति केलें.

याप्रमाणें आपल्या कन्येचा योग्य पतीशीं विवाह झाला आहे, व तिचें सासरच्या सर्व मुख्य मनुष्यांनीं अभिनंदन केलें आहे, असें पाहून कृतार्थ झालेला हेमप्रभ पुत्र व अनुचर यांसह स्वस्थानीं गेला. नंतर नरवाहनदत्तानें मदनमञ्चुका व रत्नप्रभा यांसह दिव्य सुख भोगीत व आपल्या मित्रांशीं विविध विनोद करीत तो दिवस घालविला.

## तरंग २ रा.

---

याप्रमाणें नरवाहनदत्ताला मोठी कल्याणदायी, शुभ, विद्याधरी भार्या प्राप्त झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो भाग्यवान् राजपुत्र तिच्यासह आपल्या मंदिरांत बसला असतांना गोमुखादिक मंत्री त्याचें दर्शन घेण्याकरितां त्याच्या द्वारीं आले. तेव्हां द्वारावर स्थित असलेल्या द्वारपालिकेनें

एक क्षणभर त्यांना तेथें उभें रहाण्यास सांगून व आंतून आज्ञा घेऊन नंतर युवराजापाशीं जाऊं दिलें. आंत प्रवेश करतांच राजपुत्रानें त्यांना सत्कारानें जवळ बसविलें. तेव्हां रत्नप्रभा द्वारपालिकेस म्हणाली—स्वामींच्या या मित्रांना तूं केव्हांही द्वारावर प्रतिबंध करूं नकोस; कारण हे आमचे अवयवच आहेत. अंतःपुरांत अशा प्रकारचा प्रतिबंध असावा हें मला आवडत नाहीं. असें त्या प्रतीहारीला सांगून ती साध्वी पुनः आपल्या पतीला म्हणाली,—"आर्यपुत्र, या प्रसंगीं मी कांहीं सांगतें, तें आपण ऐका. स्त्रियांच्या रक्षणाकरितां विशेष प्रतिबंध करणें ही केवल नीति आहे; अथवा ईर्ष्यामूलक मोह आहे. खरोखर पहातां त्याचा उपयोग कांहीं नाहीं. एका सर्वोत्तम शीलाच्या योगानेंच कुलस्त्रियांचें रक्षण होत असतें. चपल वस्तूंचें रक्षण करण्यास प्रायः विधाताही समर्थ नसतो. मत्त नदी व स्त्री यांचे नियमन कोण करूं शकणार ?* याविषयीं मी एक कथा सागतें ती ऐका.

### १. रत्नाधिपति राजाची कथा.

सागरामध्यें एक रत्नकूट नांवाचें मोठें द्वीप आहे. तेथें परम विष्णु-भक्त व मोठा उत्साही रत्नाधिपति म्हणून यथार्थनामधारक राजा होता. त्यानें सर्व पृथ्वीचा विजय व राजकन्या प्राप्त व्हाव्या, म्हणून मोठें तप केलें. विष्णूची मोठी आराधना केली. तेव्हां त्याच्या तपानें संतुष्ट झालेला भगवान् त्याला म्हणाला,—"राजन्, ऊठ. मी तुजवर संतुष्ट झालों आहें, मी काय सांगतों तें ऐक. कलिंगदेशांत कोणीएक गंधर्व, मुनीच्या शापानें श्वेतरश्मि या नांवाचा शुभ्र गज उत्पन्न झाला आहे. तो पूर्व जन्मांतील तपःसिद्धीच्या योगानें व माझ्या भक्तीनें ज्ञानी, गगनांतून गमन करणारा व जातिस्मर (पूर्व जन्माचें ज्याला स्मरण आहे असा) निपजला आहे. मी त्याला स्वप्नांत आज्ञा केली आहे, त्याप्रमाणें तो

* नीतिमात्रमहं मन्ये स्त्रीणां रक्षानियन्त्रणम् ।
ईर्ष्याकृतोऽथवा मोहः कार्यं तेन न किंचन ॥
महत्तरेण रक्ष्यन्ते शीलेनैव कुलस्त्रियः ।
धाताऽपि न प्रभुः प्रायश्चपलानां तु रक्षणे ।
मत्ता नदी च नारी च नियन्तुं केन पार्यते ॥

महागज स्वतः तुझ्याकडे येईल व तुझें वाहन होईल. त्या शुभ्र गजावर बसून इंद्राप्रमाणें तूं आकाशमार्गानें ज्या ज्या राजाकडे जाशील, तो तो तुझ्या प्रभावास भिऊन, मीही स्वप्नांत आज्ञाकेल्यामुळें, तुला कन्या व कर देईल. याप्रमाणें तूं सर्व पृथ्वीला जिंकशील, व तुला ऐशीं सहस्र राजकन्या प्राप्त होतील."

इतकें सांगून भगवान् गुप्त झाला, व राजानेंही तप व आराधना संपवून पारणें केलें. दुसऱ्या दिवशीं आकाशमार्गानें तो शुभ्र गज आला त्याच्यावर बसून त्यानें सर्व पृथ्वी व ऐशीं सहस्र राजकन्या जिंकल्या. नंतर तो राजा रत्नकूट बेटांत येथेच्छ विहार करीत राहिला. श्वेतरश्मि—हत्तीच्या समाधानार्थ तो प्रत्यहीं पांचशें ब्राह्मणांस भोजन घालीत असे.

एकदां तो रत्नाधिपति राजा त्या हत्तीवर बसून व सर्व द्वीपें पाहून, आपल्या द्वीपास परत येत होता. तों मार्गामध्यें दैववशात् एका गरुडवंशज पक्ष्यानें हत्तीच्या मस्तकावर जोरानें चंचुप्रहार केला. राजानें त्याला तीक्ष्ण अंकुशाचा प्रतिप्रहार केला पण तो पक्षी पळून गेला. चोंचीच्या भयंकर आघातामुळें श्वेतरश्मीला मूर्छा आली व तो रत्नकूटद्वीपांत राजधानीच्या बाहेर भूमीवर पडला. तेव्हां राजा त्याच्या पाटीवरून खालीं उतरून त्याला सावध करूं लागला. बऱ्याच वेळानें तो श्वेतहत्ती सावध झाला, पण त्याला उठण्याचें सामर्थ्य मुळींच नव्हतें. पांच दिवस त्यानें कांहीं खाल्लेंही नाहीं. त्याची ती अत्यवस्था पाहून राजाला फार दुःख झालें. पांच दिवसांत हत्तीप्रमाणें त्यानेंही अन्न ग्रहण केलें नाहीं. सर्व शक्य उपाय करून तो थकला, आणि शेवटीं निराश होऊन व वर तोंड करून म्हणाला, "लोकपालांनो, या संकटसमयीं तुम्ही मला कांहीं उपाय सांगा, नाहीं तर मी आपलें मस्तक तोडून तुमच्या पुढें ठेवीन. इतकें बोलून त्यानें मस्तक कापण्याकरितां खड्ग उचललें असतां लागलीच आकाशवाणी म्हणाली,— "राजन्, असें साहस करूं नकोस. एखाद्या पवित्र साध्वीनें याला स्पर्श केला, कीं लागलाच हा उठेल. त्यावांचून कधींही उठणार नाहीं."

तें ऐकतांच हृष्ट झालेल्या राजानें आपल्या अमृतलता—नामक मुख्य देवीस आणविलें. कारण ती शीलभ्रष्ट होऊं नये, म्हणून राजानें फार मोठा बंदोबस्त टेविला होता; पण तिनें स्पर्श केला तरी हत्ती उठेना. तेव्हां राजानें आपल्या सर्व राण्यांना आणविलें, व त्या सर्वजणींनी क्रमानें त्या

हत्तीला स्पर्श केला; पण त्यांतील एकीच्याही स्पर्शानें तो पशु उठला नाहीं. आपल्या ऐशीं सहस्र राण्यांपैकीं एकही साध्वी नाहीं, असें जाणून ज्याचें तोंड उतरलें आहे, अशा राजानें आपल्या नगरांतील सर्व स्त्रियांना आणवून त्यांच्याकडून त्याला स्पर्श करविला. तरी तो उठला नाहीं. तेव्हां माझ्या पुरांतील नागरिकांच्या स्त्रियांमध्येंही कोणी एकादी पतिव्रता नाहीं, असें समजून तो अतिशय लज्जित झाला.

इतक्यांत ताम्रलिप्तीहून आलेला एक हर्षगुप्त–नामक वैश्य तो वृत्तांत ऐकून कौतुकानें तेथें आला. त्याच्या मागून त्याची मोलकरीणही तेथें आली. ती पतिव्रता असून शीलवती असें तिचें नांव होतें. ती त्या हत्तीला पाहून व त्याचा वृत्तांत ऐकून 'मी याला स्पर्श करितें. माझ्या पतीवांचून मी जर दुसऱ्या कोणाचें कधीं मनानें ध्यान केलें नसेल तर हा उठेल' असें ती सर्वांच्या समक्ष मोठ्यानें म्हणाली, व जवळ जाऊन तिनें हत्तीला स्पर्श करतांच तो उठून उभा राहिला. त्याची सर्व व्यथा पार नाहींशी झाली. त्यानंतर त्यानें रोटही खाल्ले, व पुन: तो पहिल्यासारखा झाला. तेव्हां तो प्रत्यक्ष चमत्कार पाहून '*ईश्वराप्रमाणें जगाची उत्पत्ति, स्थिति व नाश करण्यास समर्थ असलेल्या साध्वी स्त्रिया विरल निपजतात**' असा एकच मोठा ध्वनि तेथें सर्वांच्या तोंडून निघाला. प्रत्येक जण शीलवतीची स्तुति करूं लागला. रत्नाधिपति राजाही अतिशय संतुष्ट झाला. त्या शीलवती सतीचें अभिनंदन करून त्यानें तिला अनेक रत्नें दिलीं. तिच्या स्वामीच्या म्हणजे तिला आपल्या पदरीं काम करावयास ठेवणाऱ्या हर्षगुप्त वैश्याचाही त्यानें मोठा सत्कार केला. त्याला आपल्या राजगृहापाशींच एक उत्तम गृह रहावयास दिलें. आणि राजानें आपल्या सर्व भार्यांचा त्याग करून त्यांना केवल अन्न व वस्त्र मिळेल अशी योजना केली.

नंतर घरीं जाऊन भोजन केल्यावर हर्षगुप्ताच्या समक्ष शीलवतीला जवळ बोलावून राजा एकांतांत तिला म्हणाला,–"शीलवति, तुझ्या बापाच्या येथें एकादी अविवाहित कन्या आहे का? असल्यास ती मला

* इमास्ता विरलाः साध्व्यः काश्चिदेवेश्वरोपमाः ।
सर्गपालनसंहारसमर्था जगतोऽस्य याः ॥

देवीव; कारण तीही तुझ्या सारखीच असेल."–तें ऐकून शीलवती म्हणाला. महाराज, राजदत्ता या नांवाची माझी एक चांगली रूपसंपन्न बहीण माझ्या माहेरीं ताम्रलिप्तींत आहे. पाहिजे तर आपण तिच्याशीं विवाह करा.

तें ऐकून राजानें 'बरें आहे' असें म्हटलें. नंतर आपल्या मंत्र्यादिकांची संमति घेऊन, रत्नाधिपति दुसऱ्याच दिवशीं शीलवती व हर्षगुप्त यांस बरोबर घेऊन आकाशगामी श्वेतरश्मीवरून ताम्रलिप्तीस निघाला. तेथें पोंचल्यावर तो हर्षगुप्ताच्या येथेंच जाऊन राहिला. शीलवतीच्या बहिणीला त्यानें पाहिलें, व जोशांस सुमुहूर्त पहावयास सांगितला. तेव्हां दोघांच्याही नक्षत्रांचा विचार करून ते म्हणाले,–" राजन्, आजपासून तीन महिन्यानीं उत्तम मुहूर्त आहे. आजही एक सामान्य मुहूर्त आहे; पण त्यावर विवाह केल्यास स्त्री व्यभिचारिणी होण्याचा बराच योग दिसतो."

जोशांनीं असें सांगितलें तरी सुंदर व तरुण भार्येविषयीं अतिशय उत्सुक व त्यामुळेंच एकाकी रहाण्यास असमर्थ झालेला राजा, मनांत विचार करूं लागला, कीं फार संशयांत पडून उपयोगीं नाहीं. राजदत्तेशीं आपण आजच विवाह करावा. किती झाली तरी ती शीलवतीची बहीण आहे. राजकन्यांना जसा मोठा गर्व वाटत असतो, तसा हिला वाटत नाहीं. यास्तव ही असाध्वी होईल अशी शंकाच घेणें व्यर्थ आहे. समुद्रामध्यें एक अमानुष (निर्जन) बेट आहे. त्यांत एकच चौसोपी घर आहे, तेथें हिला मी ठेवीन. त्या दुर्गम स्थळीं हिचा सर्व परिवार स्त्रियांचाच राहील अशी योजना मी करीन. मग पुरुषाचें दर्शनच न झाल्यावर ती भ्रष्ट कशी होणार? असा पुष्कळ विचार करून त्यानें, शीलवतीनें अर्पण केलेल्या राजदत्तेशीं त्याच दिवशीं विवाह केला. सर्व शास्त्रीय विधि यथासांग आटोपल्यावर हर्षगुप्त व शीलवती यांसह आपल्या नूतन पत्नीला बरोबर घेऊन, आपल्या गजावरून तो आकाशमार्गानें रत्नकूट द्वीपास परत आला. तेथील लोकही त्याची वाटच पहात होते. त्यानें शीलवतीला पुनः अनेक देणग्या दिल्या. त्यामुळें तिला आपल्या साध्वीव्रताचें उचित फल मिळून ती कृतार्थ झाली. नंतर आकाशांत गमन करणाऱ्या श्वेतरश्मीवर आपल्या नूतन भार्येला बसवून व पूर्वोक्त दुर्गम द्वीपांत नेऊन, तेथें निर्जन मंदिरांत स्त्रीपरिजनांसह त्यानें तिला ठेविलें. तिला लागेल तो प्रत्येक पदार्थ स्त्रियांविषयीं साशंक झालेला

रत्नाधिपति हत्तीवरून नेऊन तेथें पोंचवीत असे. तिच्यावर अतिशय अनुरक्त झालेला तो स्वतः रात्रभर तेथें राही, व दिवसा राजकार्य पहावयाकरितां रत्नकूटास परत येई.

एके दिवशीं प्रातःकालीं राजाला एक दुःस्वप्न पडलें. तेव्हां त्याचें निवारण करण्याकरितां त्यानें आपल्या प्रियेसह उजाडतांनाच मद्यपानरूपी मंगल केलें. त्यामुळें मत्त झालेली राजदत्ता त्याला परत जाऊं देईना. पण राजकार्यें पहाण्याकरितां तिच्या इच्छेविरुद्ध तो तेथून निघाला. खरोखर राजता मोठा लोभ ( स्नेह ) उत्पन्न करणारी आहे.† पण राजकार्यें करीत असतांना त्या दिवशीं त्याचें चित्त वारंवार साशंक होऊं लागलें. तें जणुं काय 'तूं आपल्या मत्त स्त्रीला एकटीला सोडून कां आलास ?' असेंच त्याला म्हणत होतें. इकडे दासी स्वयंपाकादि कामांमध्यें व्यग्र होत्या, व ती त्या दुर्गम स्थानीं एकटीच बसली होती. तों इतक्यांत साक्षात् विधिच ( दैवच ) असा एक आश्चर्यदायी पुरुष जणुंकाय तिच्या त्या कडेकोट रक्षणाचा भंग करण्याकरितांच येत आहे, असें तिला दिसलें. तेव्हां 'तूं कोण व या दुर्गमस्थानीं कसा आलास ?' असें जवळ आलेल्या त्याला त्या मत्त स्त्रीनें विचारलें. तेव्हां ज्यानें पुष्कळ क्लेश भोगले आहेत, असा तो पुरुष तिला म्हणाला,— "सुंदरि, मी पवनसेन म्हणून मथुरेचा वैश्यपुत्र आहें. माझा पिता मरण पावला व मी अनाथ झाल्यामुळें माझ्या भाऊबंधांनीं माझें सर्वस्व हरण केलें. तेव्हां निर्वाहाचें साधनच न राहिल्यामुळें मी विदेशांत जाऊन प्राण्यास दीन करणारी परसेवा पतकरली. तेथें मोठ्या संकटानें व्यापार करून थोडेंसें धन मिळविलें; पण तें घेऊन देशांतरास जात असतांना मार्गांत इतरांबरोबर मलाही चोरांनीं लुटलें. नंतर माझ्या सोबत्यांसह मी भिक्षा मागत रत्नांचें जणुं आगरच अशा एका कनकक्षेत्र नामक स्थानास जाऊन पोंचलों. तेथें उचित कर देऊन राजापासून आम्हीं सर्वांनीं रत्नें काढण्याची अनुज्ञा मिळविली. आम्हीं खाणीमध्यें प्रत्यहीं खणीत होतों. दुसऱ्यांना वरींच रत्नें मिळालीं; पण मला त्या उभ्या वर्षांत एकदांही एकसुद्धां रत्न सांपडलें नाहीं. तेव्हां दुःखानें आर्त होऊन मी समुद्रतीरीं गेलों, व अग्नींत प्रवेश करण्याचा निश्चय करून काष्ठें

† नित्यस्निग्धा हि राजता ।

गोळा केलीं आणि चिता पेटविली. तों जीवदत्त म्हणून तेथें कोणी एक वैश्य आला. त्या दयाळूनें माझें मरणापासून निवारण केलें, व मला आपल्या पदरीं वृत्ति देण्याचें कबूल केलें. नंतर स्वर्णद्वीपास जाणाऱ्या त्यानें मला आपल्या नौकेंत घेतलें. आम्हीं सर्व समुद्रमार्गानें जाऊं लागलों. पांच दिवस चांगल्या रीतीनें गेले, पण सहाव्या दिवशीं, जणुं काय माझ्या मागून मला हुडकीत येणाऱ्या माझ्या दुर्दैवाला मी दिसल्यामुळेंच, एकाएकीं मोठें वादळ झालें. झंझावात सुटला. मेघानीं आकाशाला भरून सोडलें. वरून मेघधारांचा, खालून उसळणाऱ्या लाटांचा व बाजूनें भयंकर वाऱ्याचा मारा सुरू झाला. नौका झोंपाळ्याप्रमाणें झोंके घेऊं लागली. कांहीं वेळानें तें जलयान फुटलें व पाण्यांत बुडालें. अर्थात्च त्यांतील आम्हीं सर्व मृत्यूच्या दाढेखालीं चुरडून जाऊं लागलों. पण जणुं काय माझें फुटकें अदृश्य अजून तृप्त झालेलें नसल्यामुळेंच बुडत असलेल्या माझ्या हाताला एकाएकीं एक फळी लागली. त्याबरोबर माझ्या जीवित आशेनें मला एकदम तिच्यावर बसविलें. कांहीं वेळानें जगांतील सुख-दुःख-अवस्था अनित्य आहेत, असें प्रत्यक्ष अनुभवास आणून देण्याकरितांच जणुं काय तें वादळ शांत झालें. पाऊस थांबला. समुद्र थंड झाला व मी या वनांत पोंचलों. इतस्ततः फिरत असतांना मला ही चतुःशाला दिसली, व मोठ्या आशेनें आंत येतांच नेत्रांस तृप्त करणाऱ्या तुज सुंदरीचें मला दर्शन झालें.

तो इतकें सांगत आहे तोंच मदानें व मदनानें मोहित झालेल्या राजदत्तेनें त्याला आलिंगन दिलें व पर्यंकावर नेऊन बसविलें. स्त्रीत्व, मत्तत्व, एकांत, पुरुषाची प्राप्ति व प्रतिबंधराहित्य, हे पांच अग्नी एकत्र जमले म्हणजे मग शीलरूपी तृणाची काय वाट लागणार तें दिसतेंच आहे.* मदनाच्या योगानें मोहित झालेली स्त्री विचार करण्यास समर्थ नसते. त्यामुळेंच त्या राणीनेंही विपत्तींत पडलेल्या व कामना करण्यास योग्य नसलेल्या त्याची इच्छा केली. पण इतक्यांत तिच्याविषयीं उत्सुक झालेला रत्नाधिपति राजा रत्नकूटद्वीपाहून आकाशगामी हत्तीवर बसून तेथें आला; व तो जों आंत प्रवेश करीत आहे, तोंच त्या तसल्या पुरु-

* स्त्रीत्वं क्षीवत्वमेकान्तः पुंसो लाभोऽनियन्त्रणा ।
यत्र पञ्चाग्नयस्तत्र वार्ता शीलतृणस्य का ॥

पाशीं रत होणाऱ्या आपल्या भार्येला त्यानें पाहिलें. त्याबरोबर राजा त्या पुरुषाला ठार मारणार होता; पण इतक्यांत पायांवर पडून कृपण वचनें बोलणाऱ्या त्या दीनाची त्याला दया आली. भयभीत व मत्त भार्येकडे पाहूनही तो 'मदनाचा जणुंकाय मित्रच अशा मद्याच्या ठिकाणीं आसक्त झालेली स्त्री साध्वी कशी असणार? चपल स्त्रीचें रक्षण नुसत्या पहाऱ्यानें होत नाहीं.† अहो, उत्पात–वायूला हातांनीं कवटाळून धरतां येईल का? कधींही नाहीं. मी त्या जोशांचें सांगणें ऐकलें नाहीं, म्हणून त्याचें हें फल मला मिळालें आहे. आप्तवाक्याकडे दुर्लक्ष केलें म्हणजे त्याचा असाच कडु परिणाम व्हावयाचा!§ शीलवतीची ही बहीण आहे, इतकेंच समजून हिच्याशीं विवाह करतांना सुधे–अमृता–बरोबरच निघालेल्या कालकूट विषाच्या छटेचें मला विस्मरण कसें पडलें? अथवा अद्भुत कर्म करणाऱ्या दैवाचें असंभाव्य चेष्टितही प्रयत्नानें व्यर्थ करण्यास कोण समर्थ आहे?' असा उदार विचार करून तो राजा कोणावरच रागावला नाहीं. त्या गुप्त कामुकाचा वृत्तांत ऐकून घेऊन त्यानें त्याला पाहिजे तेथें जाऊं दिलें.

तेव्हां राजानें ज्याला जिवंत सोडलें आहे, असा तो वैश्यपुत्र तेथून बाहेर पडला, तों दुरून येत असलेलें एक जलयान त्याला दिसलें. तेव्हां दुसरा मार्गच नसल्यामुळें तो त्या पूर्वीच्या फळीवर बसून पुनः समुद्रांत शिरला व ती नौका जवळ आली असतां–' अरे मला कोणी वांचवा रे; मी मरतों आहें '–असें मोठ्यानें ओरडला. तें ऐकून त्या नौकेंतील क्रोधवर्मा–वैश्यानें मोठ्या दयेनें त्याला आपल्या नावेवर घेतलें, व आपल्यापाशीं सेवक करून ठेविलें. पण म्हणतात ना, कीं ज्याच्या नाशाकरितां विधात्यानें जें कर्म नेमलेलें असतें, तें त्याच्या मागून धांवत येत असतें.* त्या न्यायानें तो मूर्ख त्या प्राणदात्या वैश्याच्या स्त्रीशींही

† मद्ये मारकसुहृदि प्रसक्ता स्त्री सती कुतः।
नियन्तुं चपला नारी रक्षयापि न शक्यते ॥

§ विपाककटुकं कस्य नाप्तवाक्यावधीरणम्।

* यस्य यद्विहितं धात्रा कर्म नाशाय तस्य तत्।
पदवीं यत्र तत्राऽपि धावतोऽप्यनुधावति ॥

संगत झाला. त्याचें पाप कृत्य एकदां क्रोधवर्म्यानें स्वतः पाहिलें, व तत्काल त्याला समुद्रांत फेंकून दिलें. त्याबरोबर तो दुष्ट मरण पावला.

इकडे कोप सोडून शांत झालेल्या रत्नाधिपति राजानें सर्व परिवारासह राजदत्तेला श्वेतरश्मीवर बसविलें व आकाशमार्गानें रत्नकूटास गमन केलें. त्या आपल्या राजस्थानास पोंचतांच त्यानें राजदत्तेला शीलवतीच्या स्वाधीन केलें; व तिला आणि मंत्र्यांना तो सर्व वृत्तांत सांगितला. आणि शेवटीं दीर्घ व उष्ण श्वास सोडून म्हणाला.—" हर हर! असार व विरस अशा विषयांमध्यें आसक्त होऊन मी किती दुःख भोगलें हें! आतां वनांत जाऊन मी हरीचा आश्रय धरितों. म्हणजे पुनः मला असलीं दुःखें भोगावयास लागणार नाहींत."

इतकें बोलून दुःखी व विरक्त झालेल्या त्या राजाला मंत्र्यांनीं व शीलवतीनेंही पुष्कळ उपदेश केला; पण त्याचा निश्चय ढळला नाहीं. निःस्पृह झालेल्या त्या राजानें आपल्या कोपांतील अर्धे वित्त साध्वी शीलवतीला दिलें, व राहिलेलें अर्धें ब्राह्मणांस अर्पण केलें. त्याच्या राज्यांत पापभंजन म्हणून एक सर्वगुणसंपन्न ब्राह्मण होता. त्याला त्यानें आपलें सर्व राज्य यथाविधि दिलें; व तपोवनास जाण्याची इच्छा धरून श्वेतरश्मीस आणविलें; पण राजाजवळ येतांच त्यानें आपलें गजशरीर सोडून दिव्य पुरुषाची आकृति धरली. तेव्हां 'हें काय, व तूं कोण आहेस?' असा राजानें त्यास प्रश्न केला, तेव्हां तो म्हणाला,—"मलयपर्वतावर रहाणारे आम्ही दोघे गंधर्व-भ्राते होतों. त्यांतील माझें नांव सोमप्रभ व माझ्या ज्येष्ठ भ्रात्याचें देवप्रभ. माझ्या भ्रात्याची एकच भार्या असून ती त्याला फार आवडत असे. तिचें नांव राजवती होतें, एकदां तिला आपल्या मांडीवर बसवून आकाशमार्गानें फिरत असतांना तो माझ्या सहवर्तमान सिद्धवास-स्थानीं गेला. तेथें केशवाचें मोठ्या प्रेमानें पूजन करून आम्ही सर्व त्या भगवानापुढें गाऊं लागलों. तेव्हां तेथें एक सिद्ध आला व जिचें गायन खरोखर ऐकण्यासारखें होतें, अशा त्या राजवतीकडे टक लावून पहात उभा राहिला. तें पाहून माझ्या भ्रात्याला मोठा राग आला, व 'सिद्ध असूनही तूं असा साभिलाष होऊन परस्त्रीकडे पहातोस काय'! असें तो त्याला त्वेषानें म्हणाला. तें ऐकून सिद्धालाही कोप आला व शाप देण्याच्या उद्देशानें तो त्याला उलट म्हणाला—अरे मूर्खा,

हिचें आश्चर्यकारक गायन ऐकून व चकित होऊन मी तिच्याकडे पाहिलें, कामतः नव्हे; पण माझा उद्देश न जाणतां ज्या अर्थी तूं मजवर आरोप केला आहेस, त्या अर्थी तुम्हीं दोघेंही मर्त्ययोनींत उत्पन्न व्हा. तेथें दुसऱ्याशीं रत होत असतांना तिला तूं प्रत्यक्ष पहाशील.

त्या सिद्धाचें हें शापवचन ऐकून मला कोप आला, व मी अल्लड-पणामुळें आपल्या हातांतील खेळावयाचा लांकडी शुभ्र हत्ती त्याला मारला. तेव्हां त्यानें मलाही 'तूं असलाच शुभ्र गज होऊन भूलोकीं निर्माण हो.' असा शाप दिला. तेव्हां माझ्या देवप्रभ भ्रात्यानें पायां-पडून त्याची दीनवाणीनें प्रार्थना केली. तव्हां, त्या कृपालु सिद्धानें असा शापान्त सांगितला कीं, तूं जरी मर्त्य झालास तरी हरीच्या प्रसादानें द्वीपेश्वर बनशील. गज झालेला हा भ्राताच तुझें दिव्य वाहन होईल. तुला ऐशीं सहस्र स्त्रिया प्राप्त होतील. त्यांची दुःशीलता तूं लोकां-समक्ष अनुभवशील. नंतर मानुषी झालेल्या हिच्याशीं तुझा विवाह होईल. परपुरुषाशीं संगत झालेल्या हिला तूं प्रत्यक्ष पहाशील. त्यानंतर विरक्तचित्त होऊन, सर्व राज्य सत्पात्र ब्राह्मणास देऊन, धन योग्य स्त्रीपुरुषांस वांटून तूं शांत मनानें तपोवनास जावयास निघालास, म्हणजे हा तुझा भाऊ प्रथम शापमुक्त होईल, व त्याच्या तोंडून ही सर्व वार्ता ऐकतांच तुम्हीं दोघेंही मुक्त व्हाल.

राजन्, त्याप्रमाणें आज हा आपला शापान्ताचा शुभ दिवस उगवला आहे. सोमप्रभाचें हें भाषण ऐकतांच राजालाही पूर्व जन्माचें स्मरण झालें, व 'होयरे होय; मी देवप्रभच आहें, व ही राजदत्ता माझी प्रिया राजवतीच होय.' असें बोलून त्या दोघांनींही तत्काल शरीरें सोडलीं. आणि लोकांच्या डोळ्यांदेखत गंधर्व होऊन तीं तिघेंही आकाशांत गेलीं. शीलवतीलाही शील माहात्म्यामुळें पुष्कळ संपत्ति मिळाली व ती आपल्या ताम्रलिप्ती नगरीस जाऊन सुखानें धर्माचरण करूं लागली.

तात्पर्य, याप्रमाणें या जगांत कोणीही केव्हांही बलात्कारानें स्त्रियांचें शील राखूं शकत नाहीं. तर जो स्वतः अति शुद्ध असतो, व जो स्त्रीला धैर्य व स्नेह या पाशांनीं बांधून ठेवतो, तोच आपल्या कुलीन स्त्रीचें रक्षण चांगल्या रीतीनें करूं शकतो. तशीच स्त्रियांविषयींची ईर्ष्या हा पुरुषास केवळ दुःख देणारा व इतरांचा द्वेष करावयास लावणारा

एक मोटा दोष आहे. त्यामुळें स्त्रियांचें रक्षण तर होत नाहींच; पण उलट त्यांचें चित्त अधिक उत्सुक होतें.

असो; प्रिय रत्नप्रभेनें सांगितलेली ही उत्तम कथा ऐकून सचिवांसह नरवाहनदत्त अतिशय संतुष्ट झाला.

---

## तरंग ३ रा.

रत्नप्रभेनें सांगितलेली ती कथा शांतपणें ऐकून गोमुख सचिव, नरवाहन दत्तास म्हणाला,–" स्वामिन्, खरें आहे. साध्वी स्त्रिया फार थोडया असतात. चपल व विश्वासपात्र नसलेल्याच फार. यांविषयीं मीही एक कथा सांगतों ती ऐका.

### १. निश्चयदत्त व अनुरागपरा यांची कथा.

जगप्रसिद्ध उज्जयिनी म्हणून नगरी आहे. तेथें पूर्वी निश्चयदत्त नांवाचा एक वैश्यपुत्र होता. तो मोटा बुद्धिमान् होता हें खरें; पण त्याला जुगारीचें व्यसन लागलें. व त्यांत तो फार पटाईत झाला. रोज द्यूतानें धन मिळवून नर्मदेच्या जलांत स्नान करून, महाकालेश्वराची पूजा करून, दीन, अनाथ व ब्राह्मण यांस दान देऊन नंतर तो भोजन करीत असे. स्नान व पूजन झालें म्हणजे श्मशानांतील महाकालेश्वराच्या मंदिराजवळच एक शिलास्तंभ होता, तेथें जाऊन तो सदा आपल्या सर्व अंगास चंदनादिकांचा लेप लावीत असे. पण पाठीला हात पोंचत नसल्यामुळें तो त्या दगडी खांबाला चंदनादिक लावी, व त्यावर आपली पाठ घांशी. त्यामुळें कांहीं दिवसांनीं खांबाचा तेवढाच भाग अगदीं तुळतुळीत झाला. एकदां त्या मार्गानें एक चित्रकार व दुसरा चित्रें खोदणारा असे दोघे वाटसरू चालले होते. चित्रकारानें तो गुळगुळीत व तुळतुळीत स्तंभ पाहिला व त्याच्यावर गौरीचें चित्र लिहिलें. तेव्हां खोदकाम करणारानेंही आपलें बारीक हत्यार घेऊन तें सहज चांगल्या रीतीनें कोरलें. नंतर ते दोघेही आपापल्या मार्गानें निघून गेले.

त्यानंतर शंकराची पूजा करण्याकरितां तेथें एक विद्याधर–कन्या आली व तिनें त्या स्तंभावरील देवीला पाहिलें. तेव्हां हा स्तंभ मोठा

सुलक्षणी असल्यामुळें यांत देवीनें सान्निध्य केलें असावें, असें अनुमान करून तिनें तिचें पूजन केलें, व थोडी विश्रांति घेण्याकरितां ती कन्या त्या स्तंभांत शिरून अदृश्य होऊन राहिली. इतक्यांत रोजच्याप्रमाणें निश्चयदत्त तेथें आला; पण आपल्या पाठ घांसावयाच्या जागीं गौरीची मूर्ति कोणी खोदली आहे, असें पाहून तो विस्मित झाला. त्यानें आपल्या अंगास चंदन लावलें व त्या खांबावर रोजची जागा सोडून दुसरीकडे चंदन लावून तो त्यावर आपली पाठ घांसूं लागला. तेव्हां त्याचें रूप पाहून खांबांत लपलेली तरुण विद्याधर-कन्या त्याच्यावर आसक्त झाली व मनांत म्हणाली,–" काय, असल्या सुस्वरूप तरुण पुरुषाच्या पाठीला चंदन लावायलाही कोणी मिळूं नये ना! बरें मीच आतां याच्या पाठीला तें चोळतें. "–असा विचार करून तिनें केवल आपला हात बाहेर काढून प्रेमानें पाठीला लेप लाविला. पण त्या कोमल हाताचा स्पर्श होतांच व कंकणाचा ध्वनि ऐकतांच त्या धीर वैश्यपुत्रानें तिचा तो हात धरला. तेव्हां अदृश्य राहूनच 'अरे महाभागा, मी तुझा काय अपराध केला, माझा हात कां धरतोस, मला सोड' असें ती म्हणाली. त्यावर 'माझ्या पुढें साक्षात् उभी राहून तूं कोण आहेस तें सांग, म्हणजे मी हात सोडीन' असें त्यानें उत्तर दिलें. तें ऐकून 'मी तुझ्यापुढें साक्षात् येऊन तुला आपलें सर्व वृत्त सांगतें;' असें तिनें शपथपूर्वक सांगितलें, तेव्हां, निश्चयदत्तानें तिचा हात सोडला.

नंतर खांबांतून निघून त्याच्या मुखावर जिचे नेत्र आसक्त झाले आहेत, अशी ती सर्वांगसुंदरी भूमीवर बसली व त्याला म्हणाली,–" हिमालयावर पुष्करावती नांवाची एक नगरी आहे. तिच्या मध्यें विंध्यपर नांवाचा एक विद्याधराधिप असतो. त्याची मी अनुरागपरा कन्या. महाकालाच्या पूजनाकरितां मी येथें आलें व थकल्यामुळें येथें जराशी विश्रांति घेत होतें. तों इतक्यांत तूं येथें येऊन या खांबावर आपली पाठ घांशीत आहेस असें मला दिसलें. तुझें स्वरूप मला मदनाच्या मोहनास्त्रासारखें भासलें. त्यामुळें प्रथम माझा अंतरात्मा व नंतर पाठीला उटी लावतांना हात रंजित झाला. माझ्या पित्याचें घर तुला आतां माहीत झालें आहे मी जातें."

तें ऐकून निश्चयदत्त म्हणाला–"सुंदरि, तूं हरण केलेलें माझें हृदय अद्यापि माझ्या स्वाधीन झालेलें नाहीं. मग धरून ठेवलेलें तें माझें मला

परत न देतां तूं कशी जातेस बरें ? " हें त्याचें म्हणणें ऐकून घेऊन व 'तूं जर आमच्या नगरीस आलास तर मी निःशंकपणें तुझ्याशीं रत होईन. हे नाथ तुला ती नगरी दुर्गम मुळींच नाहीं. तुझें इष्ट खचित होईल. निश्चयी लोकांना दुष्कर असें कांहींच नसतें.'† असें सांगून अनुरागपरा आकाशांत उडून गेली. व तिच्या ठिकाणींच ज्याचें चित्त आसक्त झालें आहे, असा निश्चयदत्तही खिन्न मनानें आपल्या घरीं यावयास निघाला. त्याच्या मनांत तिच्याविषयींचेच विचार घोळत होते. "अरेरे! फार वाईट झालें. एकाद्या वृक्षांतून जसा कोमल पल्लव निघावा; त्याप्रमाणें त्या शिलास्तंभांतून निघालेला तो तिचा हात धरूनही मला तिचें पाणिग्रहण करावयास मिळालें नाहीं ! बरें कांहीं चिंता नाहीं. मी आतां तिच्या पुष्करावती नगरीस जातों. तेथें गेलों म्हणजे मला तिची प्राप्ति होईल. या कष्टकर कामाला मी आरंभ तर करितों, दैव अनुकूल असलें तर तें आपणच सहाय करील, नसलें तर मी आपले प्राण सोडीन; पण तिला जाऊन भेटण्याचा निश्चय सोडणार नाहीं." इत्यादि विचार करीत त्या कामार्त वैश्यपुत्रानें तो दिवस तेथेंच घालविला, व दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळींच तो उत्तर दिशेकडे जावयास निघाला. थोडेंसें दूर जातांच त्याला तीन सोबती भेटले. तेही वैश्यपुत्र असून उत्तर दिशेकडे जात होते. त्याच्या बरोबर तो अनेक गांव, पुरें, अरण्यें, नद्या व डोंगर ओलांडीत कांहीं दिवसांनीं जेथें म्लेच्छ लोक फार आहेत अशा उत्तर दिग्भूमीस जाऊन पोंचला; पण दुर्दैवामुळें तेथें तो आपल्या तिघां मित्रांसह एका क्रूर ताजक जातीच्या म्लेछाच्या हातांत सांपडला. त्यानें दुसऱ्या एका श्रीमान् ताजक म्लेंछाकडे त्याला नेऊन विकलें. त्यानें तुर्कस्थानच्या मुरवार नांवाच्या राजाकडे त्याला आपल्या नोकराबरोबर भेटीच्यारूपानें पाठविलें. तेव्हां त्यांनीं त्या तिघांसह त्याला तुर्कस्थानांत नेलें; पण त्यावेळीं नुक्ताच मुरवार राजा मेला होता, म्हणून त्यांनीं त्याला त्याच्या पुत्राच्या स्वाधीन केलें. तेव्हां माझ्या पित्याच्या मित्रानें त्याच्याकरितां ही भेट पाठविली आहे, यास्तव उंद्यां सकाळीं या चौघांना पित्याच्या कबरींत त्याच्या शेजारींच पुरून ठेवावें म्हणजे झालें. असा विचार करून तुरुष्कांच्या नव्या राजानें त्यांना रात्रभर

† न हि दुष्करमस्तीह किंचिदध्यवसायिनाम् ।

बांधून ठेवविलें. तेव्हां दृढ बंधनामध्यें पडलेल्या व मरणास भ्यालेल्या तिघां वैश्यांस निश्चयदत्त म्हणतो,-मित्रानों, असे भिता काय? भ्याल्यानें मरण चुकतें कीं काय? असे खिन्न होऊं नका. धैर्य धरून रहा. धीरांच्या विपत्ती जणुं काय त्यांस भिऊनच दूर जातात.* आपत्तींतून सोडविणाऱ्या भगवती दुर्गेचें मात्र स्मरण करण्यास आतां आळस करूं नका. असें म्हणून त्यांस धीर देत निश्चयदत्त मोठ्या भक्तीनें गौरीचें स्तवन करूं लागला. "हे महादेवि, तुला नमस्कार असो, तूं दुष्ट असुरांना आपल्या पायांखालीं तुडवून टाकीत असतेस. तूं भगवान् शंकराची अद्भुत शक्ति आहेस, तूंच हें सर्व विश्व रचिलेंस, तुझ्या अनुग्रहानेंच ह्या त्रिभुवनांतील प्राण्यांची प्रत्येक चेष्टा होत असते. हे महिषासुरनाशिनि! तूं सर्व लोकांचें रक्षण करीत असतेस. तसेंच हे शरणागतवत्सले! तूं मज अनन्य भक्ताचेंही आज परित्राण कर." याप्रमाणें मोठ्या प्रेमानें मित्रांसह देवीची स्तुति करीत असतांच, चालण्यानें व चिंतेनें थकलेल्या निश्चयदत्ताला व त्याच्या सोबत्यांनाही झोंप लागली. तेव्हां 'पुत्रांनो! उठा, तुमचें बंधन पार निघून गेलें.' असें देवीनें त्यांना स्वप्नांत सांगितलें. त्याबरोबर जागे होऊन ते जों पहातात तों आपलीं बंधनें आपोआप गळून पडलीं आहेत असें त्यांना दिसलें. तेव्हां आपापलें स्वप्न इतरांस सांगून हृष्ट झालेले ते रातोरात तेथून निघाले. पळत जाणाऱ्या त्यांनीं उजाडेपर्यंत बरीच मजल मारली, व प्रातःकाल होतांच क्लेश भोगून भ्यालेले ते तिघे निश्चयदत्तास म्हणाले,-"बाबारे; या देशांत म्लेच्छ फार आहेत, यास्तव आम्ही आपले दक्षिण दिशेस परत जातों. तुला वाटेल तिकडे तूं खुशाल जा."—

तें त्यांचें अधैर्याचें भाषण ऐकून निश्चयदत्तानेंही त्यांना परत जाण्यास अनुमोदन दिलें; व अनुरागपरेचे प्रेमपाश ओढीत असल्यामुळें तो स्वतः उत्तर दिशेकडेच निघाला. पुढें जातां जातां त्याला चार महाव्रती भेटले. त्यांच्याबरोबर त्यानें वितस्तानदीचें उल्लंघन केलें. तिच्या परतीरीं गेल्यावर ते पांचीजण कांहीं वेळ तेथें बसले. आहार केला व सायंकाल होऊन सूर्य अस्ताचलास पोंचला असतां, पुढें लागलेल्या घोर वनांत त्यांच्या सहवर्तमान तो शिरला. कांहीं वेळानें डोक्यावर काष्ठें घेऊन येत अस-

* भीता इव हि धीराणां यान्ति दूरे विपत्तयः ॥

लेले जंगली लोक त्यांना भेटले, व 'दिवस मावळल्यावर आतां तुम्ही आणखी पुढें कोठें जातां, पुढें गांव तर जवळपास कोठेंच नाहीं, या अरण्यांत एक शून्य देवालय मात्र आहे, पण तेथें आंत किंवा बाहेर रात्रीं जो रहातो, त्याला शृंगोत्पादिनी नामक यक्षिणी शृंगादि उत्पन्न करून खरोखरच पशु बनविते व खाते,' असें सांगूं लागले; पण तें ऐकून फारसे न घाबरलेले ते चौघे महाव्रती निश्चयदत्ताला म्हणाले,– "एः, चल तूं. ती भिकारीण यक्षिणी आम्हांला काय करणार ? आम्हीं रात्रीच्या रात्री अनेक मोठमोठ्या स्मशानांत बसून घालविल्या आहेत. मग आजच हिला भितों कीं काय ?"

असें बोलून ते चौघे महाव्रती व निश्चयदत्त त्या शून्य शिवालयांत गेले व तेथेंच ती रात्र घालविण्याकरितां राहिले. त्या मंदिराच्या अंगण्यांत भस्माच्या योगानें मोठें मंडल काढून व त्यांत अग्नि पेटवून, धीर निश्चयदत्त व ते चौघे महाव्रती आपल्या सुरक्षणाकरितां मंत्रांचा जप करीत बसले. मध्यरात्रीच्या सुमारास हाडांची खंजिरी वाजवीत व नाचत ती शृंगोत्पादिनी यक्षिणी आली. महाव्रत्यांच्या मंडलापाशीं येतांच त्यांतील एका व्रत्याकडे दृष्टि लावून ती नाचत मंत्र म्हणूं लागली; पण त्या दुष्ट स्त्रीनें मंडलाच्या आंत पाय ठेवला नाहीं. त्या तिच्या मंत्राच्या प्रभावानें त्या व्रत्यास शिंग फुटलें, व तो मोहित होऊन उठला, व नाचत नाचत अग्नीमध्यें जाऊन पडला. अग्नींत पडून तो अर्धा-मुर्धा जळत आहे, तोंच त्याला ओढून घेऊन यक्षिणीनें भक्षण केलें. त्यानंतर दुसऱ्या व्रत्यावर दृष्टि लावून ती तो शृंगोत्पादक मंत्र म्हणून नाचूं लागली. तेव्हां थोड्याच अवकाशांत त्यालाही शिंग फुटलें व तोही नाचत जाऊन अग्नींत पडला. वायंग्याप्रमाणें अर्धवट जळलेल्या त्यालाही तिनें अग्नींतून ओढून घेऊन त्या तिघांच्या समक्ष खाल्लें. याच क्रमानें तिनें त्या चारी महाव्रत्यांस खाल्लें. पण त्यांतील चवथ्या तापसाला खात असतांना, यथेच्छ रक्त-मांस खाल्यामुळें जिचें अंग जड झालें आहे, अशी ती, तें हाडांचे वाद्य खालीं ठेवून भूमीवर बसली. तें पाहून निश्चयदत्तानें तें वाद्य उचलून घेतलें, व ती जो मंत्र म्हणत होती, तोच पुष्कळ वेळ ऐकल्यामुळें पाठ झालेला मंत्र म्हणत व तें वाद्य वाजवीत तिच्याकडे टक लावून तो नाचूं लागला. तेव्हां शिंग

फुटूं लागण्याचा प्रसंग आला आहे, असें पाहून मृत्यूला भ्यालेला ती यक्षिणी व्याकुल झाली, व नम्र होऊन त्याला म्हणाली–हे महाधीरा, तूं मज स्त्रीला मारूं नकोस. मी कृपण होऊन तुला शरण आले आहें. आपला हा मंत्र–पाठ एकदम बंद कर. माझें रक्षण कर. मी तुझें इष्ट साधून देईन. तुझा उद्देश काय आहे तें मी जाणतें. मी तुला अनुरागपरेजवळ नेऊन पोंचवीन. इत्यादि बोलून तिनें शपथ वाहिली. तेव्हां, धीर निश्चयदत्तानें मंत्राचा जप थांबविला. दैव अनुकूल असलें, म्हणजे कशा अचिंत्य गोष्टी घडतात व हित होतें तें पहा. त्यानंतर यक्षिणीच्याच विनंतीवरून तो तिच्या खांद्यावर बसला व आकाशमार्गानें आपल्या प्रियेकडे चालला.

पण ती रात्र संपवून उजाडतांच, एका पर्वतावरील अरण्यांत त्याला खालीं उतरून ती यक्षिणी नम्रपणें म्हणाली, "सूर्योदय झाल्यावर मला वर जातां येणार नाहीं; कारण सूर्यकिरणामध्यें आमची गति कुंठित होत असते. यास्तव आपण आतां या रम्य अरण्यांतच हा दिवस कसातरी काढा. येथलीं मधुर फळें खा, व शुभ जल प्या. मी आतां आपल्या स्थानीं जातें. रात्र होतांच येईन, आणि लागलीच पुष्करावतींत असलेल्या प्रियेपाशीं आपल्याला नेऊन पोंचवीन."

असें सांगून व त्याला तेथें ठेवून ती यक्षिणी स्वस्थानीं गेली. त्यानंतर निश्चयदत्तानें तेथें एक सरोवर पाहिलें. तें अगाध असून त्यांत जरी भयंकर विष होतें,–तरी तें वरून रम्य दिसत असून त्याचें जलही स्वच्छ व शीतल होतें. 'अरे रागिन्, स्त्रियांचें चित्त असेंच असतें बरें.' असें म्हणूनच जणुं काय सूर्यानें किरणरूपी हात पसरून त्याला तें उजाडतांच दाखविलें. निश्चयदत्ताला त्यावेळीं पुष्कळ तहानही लागली होती; पण त्या जलाच्या वासावरूनच त्यांत विष आहे, असें ओळखून त्यानें तें तोंडांतही घातलें नाहीं. तर तो तसाच त्या रम्य पर्वतावर फिरत राहिला. एका फार मोठ्या टेकडीवर चढतांच त्याला भूमीमध्यें दोन तेजस्वी मणी दिसले, म्हणून तो तेथें खणूं लागला. थोडीशी माती दूर करतांच त्याला एका जिवंत माकडाचें डोकें दिसलें. त्याचेच ते पद्मरागमणीसारखे डोळे त्याला दिसत होते. त्याला पहातांच विस्मित होऊन 'हें काय' असें जों तो म्हणत आहे तोंच तें मर्कट मनुष्यवाणीनें

त्याला म्हणालें,-" अरे बाबा, मी मनुष्य व ब्राह्मण असून हा असा येथें माकड होऊन पडलों आहें. साधो, मला येथून बाहेर काढ, म्हणजे मी आपला सर्व वृत्तांत तुला सांगेन."-तें ऐकतांच आश्चर्यचकित झालेल्या निश्चयदत्तानें त्याच्यावरील सर्वमाती उकरून त्याला वर काढलें त्याबरोबर त्याच्या पायां पडून मर्कट म्हणाला-या संकटांतून सोडवून तूं आज मला प्राण दान दिलें आहेस. आतां तूं माझ्या बरोबर चल आणि अगोदर फळें खाऊन पाणी पी. कारण तूंही फार श्रांत झाला आहेस असें दिसतें. मीही फार दिवसांचा उपाशी आहें. तूं फलाहार केलास म्हणजे मलाही पारणें सोडण्यास बरें वाटेल. इतकें बोलून वैश्यपुत्रानें 'बरें आहे' असें म्हटलें असतां, ते मर्कट त्याला बरेच दूर घेऊन गेलें. जेथें गोड फळें व शीतल छाया यांनीं युक्त असलेले अनेक प्रकारचे अनेक वृक्ष रांगेनें उभे आहेत, अशा एका गिरिनदीच्या तीरावर पोंचतांच त्या दोघांनीही स्नान करून फलाहार केला, व शीतजल पिऊन थोडीशी विश्रांति घेतल्यावर 'तूं मनुष्य असून मर्कट कसा झालास' असें निश्चयदत्त त्याला विचारूं लागला. तेव्हां 'मी आपला सर्व वृत्तांत सांगतो तो ऐक' असें बोलून तें आपला सर्व वृत्तांत सांगूं लागलें.—

## २ सोमस्वामीचा वृत्तांत.

वाराणसींत चंद्रस्वामी म्हणून एक उत्तम द्विज होता. त्याच्या सुवृत्त भार्येच्या उदरीं मी झालों. पित्यानें माझें नांव सोमस्वामी असें ठेविलें. क्रमानें वाढतां वाढतां मी तरुण झालों त्या अवस्थेंत प्रत्येक प्राणी मदानें उच्छृंखल झालेल्या मदनरूपी भयंकर गजावर कसा आरूढ होत असतो, हें सर्व अनुभवी लोकांना माहीत आहेच. तशा अवस्थेत मी असतां मला एकदां त्या नगरींत रहाणाऱ्या श्रीगर्भाख्य वैश्याच्या तरुण कन्येनें आपल्या माडीवरून खिडकींतून पाहिलें. बंधुदत्ता असें तिचें नांव असून ती मथुरेंतील वराहदत्त वैश्याची तरुण भार्या होती. त्यावेळीं ती आपल्या पित्याच्या येथें माहेरपणाकरितां आली होती. मला पहातांच तिला संभोगेच्छा झाली. माझ्या नांवाची चवकशी करून तिनें आपली जिवलग सखी माझ्याकडे पाठविली. ती एकांतांत मला भेटली, व वैश्यकन्येचा अभिप्राय कळवून मला

आपल्या येथें घेऊन गेली. तेथें मला बसवून ती उत्सुकतेमुळें निर्लज्ज झालेल्या बंधुदत्तेला तत्काल गुप्तपणें घेऊन आली. घरांत शिरतांच मला मिठी मारून तिनें आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. खरोखर स्त्रियांचा अति वाढलेला मदन हाच एक वीर आहे.† याप्रमाणें प्रत्यहीं घरून तेथें येऊन माझ्याशीं रममाण होत असे.

एकदां माहेरीं फार दिवस राहिलेल्या तिला नेण्याकरितां तिचा पति मथुरेहून वाराणसीस आला. तेव्हां पित्यानेंही अनुमोदन दिल्यामुळें पतीबरोबर तिला जाणें भाग पडलें; पण आपलें रहस्य जाणणाऱ्या सखीला ती म्हणाली,–"गडे, माझा पति मला आपल्या बरोबर मथुरेस नेणार हें तर आतां ठरलेंच आहे. पण सोमस्वामीवांचून तेथें मी जिवंत राहूं शकणार नाहीं. तेव्हां याला काय उपाय योजावा तें मला सांग"–तें ऐकून सुखशया नांवाची योगिनी सखी तिला म्हणाली,–सखे, मजजवळ दोन मंत्र आहेत. त्यांतील एकानें एक सूत्र मंत्रून गळ्यांत बांधलें असतां, मनुष्याचा मर्कट होतो, व दुसऱ्या मंत्रानें तें सूत्र सोडलें म्हणजे तो तत्काल मनुष्य बनतो; पण वानर झाल्यावरही त्याची ज्ञानशक्ति लुप्त होत नाहीं. तुझी जर इच्छा असेल तर मी ते मंत्र तुला शिकवितें, व तुझ्या प्रिय सोमस्वामीनें अनुमोदन दिल्यास त्याला वानराचें पोर करितें. म्हणजे हा माझा खेळावयाचा वानर आहे, असें सांगून तूं त्याला आपल्या बरोबर नेऊन आपल्याच मंदिरांत ठेवूं शकशील, व एकांतांत त्याला मनुष्य बनवून तूं त्याच्याशीं हवी तेव्हां रममाणही होशील."

सखीची ही युक्ति तिला आवडली, व तत्काल मला एकांतांत बोलावून तिनें सर्व वृत्तांत सांगितला. तिच्या प्रेमपाशांत बद्ध झालों असल्यामुळें मी त्या दुसऱ्या सूत्रपाशालाही आपलें अनुमोदन दिलें. त्याबरोबर तिच्या सखीनें माझ्या गळ्यांत एक दोरा बांधून मला खासें माकड बनविलें. नंतर बंधुदत्तेनें मला आपल्या पतीजवळ नेऊन 'हें पहा माझ्या सखीनें मला एक माकड खेळावयास दिलें आहे,' असें म्हणून त्याला दाखविलें. तेव्हां पटकन् उडी मारून मी त्याच्या मांडीवर बसलों, व मला पाहून त्यालाही मोठें कौतुक वाटलें. मी जरी वानर झालों होतों

† एकवीरो हि नारीणामतिभूमिं गतः स्मरः।

तरी तीं काय बोलतात, काय करितात तें सर्व मला समजत होतें, व बोलशक्तिही कायम होती; पण मी कोणाशीं बोललों नाहीं. मनांतल्या मनांत ' वाहवारे स्त्रियांचें चरित्र.'* असें म्हणत व हंसत मात्र असें. सारांश; एका स्पर्शसुखाकरितां मी उत्तम ब्राह्मण होतों तो वानर झालों. कामदेवानें आजपर्यंत माझ्यासारख्या आणखी किती लोकांची अशी दुर्दशा केली असेल कोण जाणे. असो; बंधुदत्तेला तिच्या सखीनें ते मंत्र शिकविले व दुसऱ्याच दिवशीं आम्ही तेथून मथुरेस जावयास निघालों. बंधुदत्तेचें प्रिय करण्याकरितां तिच्या पतीनें मला एका सेवकाच्या खांद्यावर बसविलें होतें. दोन दिवस सुखरूपपणें प्रवास केल्यावर आम्ही एका मर्कटाच्या समूहांनी भयंकर झालेल्या वनांत शिरलों. मला पहातांच तेथील माकडें किल-किल शब्द करून जणुं काय एकमेकांस बोलावीतच धावून आलीं. जवळ येतांच ज्याच्या खांद्यावर मला बसविलें होतें, त्याला ते सर्व हुपट चावूं लागले. त्या बिचाऱ्यानें त्यांना हाकलून लावण्याचा बराच प्रयत्न केला, पण ते कांहीं केल्या दूर जात ना. तेव्हां भयभीत झालेल्या त्यानें मला भूमीवर टाकून आपला जीव घेऊन पलायन केलें. त्या नंतर जणुं काय माझ्या कुकर्मामुळेंच रागावलेल्या वानरांनीं नखें व दांत यांच्या योगानें माझ्या अंगावरील केसानकेस ओरबडून काढिला. माझी प्रिया बंधुदत्ता, तिचा प्रिय वराहदत्त व त्याचे सेवक यांनीं पाषाण व काठ्या यांच्या योगानें वानरांना मारून पळविण्याचा मोठा प्रयत्न केला; पण त्यांना यश आलें नाहीं. कांहीं वेळानें कंठसूत्र व शंकराची कृपा यांच्या योगानें मला बरेंच बल आलें, व मी त्यांच्या हातून सुटून जीव घेऊन पळालों. त्यांची दृष्टि चुकवून मी एका मोठ्या झाडींत शिरलों. नंतर तेथून हळू हळू अनेक अरण्यें ओलांडित येथें येऊन पोंचलों. ' अरे सोमस्वामी, तुझा परस्त्रीसमागम याच जन्मीं मर्कटरूपानें कसा फलास आला.' असें म्हणून दुःखी होणाऱ्या मजवर येथेंही पावसाळ्यांत दुसरा असाच घोर प्रसंग गुदरला. अजून याला हवें तितकें दुःख झालें नाहीं, असें समजून असंतुष्ट झालेल्या विधीच्या आज्ञेनेंच जणुं काय, एकदां अकस्मात् एका हत्तिणीनें मला सोंडेंत धरिलें, व पाऊस पडून चिखलमय झालेल्या

* अहो स्त्रीचरितं चित्रम् ।

वारुळांत खुपसलें. तेथून निघण्याची शक्ति माझ्या अंगांत मुळींच नव्हती. तेव्हां ही हत्तीण नसून भवितव्यतेनें पाठविलेली कोणी देवताच आहे, असें म्हणून मी भगवान् शंकराचें सतत ध्यान करूं लागलों, त्यामुळें मला क्षुधा व तृषा यांचीही पीडा झाली नाहीं. या अवस्थेंत दीर्घकाल गेल्यामुळें मला आतां आत्मसाक्षात्कार झाला आहे. आज फार दिवसांनीं तूं जेव्हां मला त्या शुष्क मातींतून वर काढलेंस, तेव्हां मात्र मला अतिशय क्षुधा लागली आहे, असें वाटलें. असो; तुझ्या कृपेनें मी आतां शांतचित्त झालों आहें. शंकराच्या सतत चिंतनानें मला जरी आत्मसाक्षात्कार झाला आहे, तरी मर्कटभावांतून मी मुक्त होईन असें ज्ञान मला मिळालेलें नाहीं. कारण जेव्हां कोणी योगिनी त्याच मंत्रानें माझें हें कंठसूत्र सोडील, तेव्हांच मी पुरुष होईन. माझा वृत्तांत हा असा आहे; पण तूं या अगम्यस्थलीं कसा व कां आलास ? तें मला सांग.

याप्रमाणें मर्कटरूपी सोमस्वामीद्विजाचा वृत्तांत त्याच्याच तोंडून ऐकल्यावर निश्चयदत्तानें जन्मापासूनचा आपला सर्व वृत्तांत त्याला सांगितला. तो ऐकून कपिरूपी सोमस्वामी त्याला म्हणाला–मित्रा, मजप्रमाणें तूंही स्त्रीकरितां मोठें दुःख सहन केलें आहेस. स्त्री व श्री कधींही कोणाजवळ स्थिर रहात नाहीं.* स्त्रिया संध्ये प्रमाणें क्षणभर रमणीय दिसणाऱ्या, (प्रेम करणाऱ्या) नदीप्रमाणें कुटिलाशय, भुंजगीप्रमाणें अविश्वास्य व विजेसारख्या चपल असतात. यास्तव अनुरागवती विद्याधरी जरी तुजवर आसक्त झाली आहे, तरी तिला स्वजातीचा कोणी पुरुष मिळाला, म्हणजे ती तुझ्यासारख्या सामान्य मनुष्यावरील प्रेम खचित कमी करील. यास्तव स्त्रीकरितां तुझा हा प्रयास आतां पुरे झाला. याचें फार कडु फळ मिळेल व त्यावेळीं तुलाही माझ्या प्रमाणेंच स्त्रीविषयाविषयीं विरस व्हावें लागेल. मित्रा, माझें सांगणें ऐक. तूं आतां पुढें पुष्करावतीला जाऊं नकोस. त्या विद्याधरीचा नाद सोड. यक्षीणीच्या खांद्यावर बसून उज्जयिनीला जा. मित्रा, माझें आप्ताचें हें एवढें सांगणें तूं ऐकच. मी पूर्वी विषयासक्त होऊन आपल्या मित्राचें म्हणणें ऐकलें नाहीं, म्हणून मला हा पश्चात्ताप करण्याचा प्रसंग आला आहे. मी बंधुदत्तेच्या ठायीं

* न च श्रियः स्त्रियश्चेह कदाचित्कस्यचित्स्थिराः ।

अनुरक्त झालों आहें असें पाहून माझ्या एका भवशर्मा नामक अतिहितकर ब्राह्मण मित्रानें माझें पुष्कळ निवारण केलें. तो मला म्हणाला, "मित्रा, स्त्रीवश होऊं नकोस. स्त्रियांचें चित्त अति दुर्गम असतें. स्त्रीच्या पायीं माझी कशी दुर्दशा झाली तें मी सांगतों ऐक.

### ३. भवशर्म्याची कथा.

याच वाराणसींत सोमदा नांवाची तरुण व रूपशालिनी ब्राह्मणी होती. ती स्वभावानें अतिचपल व गुप्तयोगिनी असे. दैवयोगानें तिचा–माझा समागम झाला. आमचें प्रेम उत्तरोत्तर वाढलें. एकदां तिच्याविषयीं मला संशय आल्यामुळें मी ईर्ष्या कोपानें तिला ताडन केलें. त्यामुळें तिला मोठा राग आला, पण तिनें तो त्यावेळीं बाहेर दाखविला नाहीं. दुसऱ्या दिवशीं प्रेमभरांत तिनें माझ्या गळ्यांत एक सूत्र बांधलें. व त्यामुळें मी तत्क्षणीं दान्त (खच्ची केलेला) गर्दभ झालों. तेव्हां तिनें मला एका लोणाऱ्यास विकून योग्य मूल्य घेतलें. त्या गाढवेंवाल्यानेंही माझ्यावर यथेच्छ भार वाहून मला इतर गर्दभांबरोबर पळावयास लावलें. त्यामुळें आंतल्या आंत सर्व जाणणाऱ्या मला किती क्लेश झाले असतील, त्याची तूं नुस्ती कल्पनाच कर म्हणजे झालें. पण पूर्व पुण्यसंचयामुळें मला एका बंधमोचनिका नामक योगिनीनें पाहिलें. तिला माझी दया आली. सोमदेनें मला पशु बनविलें, असें तिनें आपल्या ज्ञानद्वारा जाणलें. व माझ्या धन्याचें लक्ष्य दुसरीकडे लागलें आहे, असें पाहून तिनें माझ्या गळ्यांतील दोरा सोडला. त्याबरोबर मी मनुष्य झालों. इतक्यांत धन्याचें लक्ष्यही गाढवांकडे गेलें; व मी त्यांत नसल्यामुळें 'अरे, माझें नवें गांढव कोठें पळून गेलें' म्हणून तोही इतस्ततः धावूं लागला.

त्यानंतर मी बंधमोचिनीसह जात असतांना दववशात् समोरून येणाऱ्या सोमदेनें मला दुरून पाहिलें, व क्रोधानें संतप्त होऊन–'या पाप्याला तूं तिर्यक्–योनींतून कां सोडविलेंस? तुला धिक्कार असो. दुराचारे, या कुकर्माचें फल तुला मिळेल. मी उद्यांच या पाप्यासह तुला मारीन.'–असें बंधमोचिनीस तिनें म्हटलें. पुढें ती सिद्धयोगिनी निघून गेली असतां, तिच्या योग-कृत्याला प्रतिबंध करण्याच्या हेतूनें माझ्यावर उपकार करणारी ती ज्ञानिनी म्हणाली–"ही कौटाळीण मला मारण्या-

करितां उद्यां सकाळीं काळ्या घोडीच्या रूपानें येईल. तेव्हां मीही लाल घोडी होईन. मग आमचें भांडण सुरू झालें म्हणजे तूं हातांत खड्ग घेऊन मोठ्या सावधगिरीनें तिला मार. याप्रमाणें आपण हिलाच मारून टाकूं. तूं उद्यां उजाडतांच माझ्या घरीं ये." इतकें बोलून तिनें मला आपलें घरही दाखविलें, व ती आंत शिरली असतां, याच जन्मांत अद्भुत जन्मांतराचा अनुभव घेऊन मीही आपल्या घरीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच हातांत तरवार घेऊन मी बंधमोचिनीच्या येथें गेलों. तों सोमदाही काळी घोडी होऊन तेथें आली. तें पाहून हिनेंही लाल घोडीचें रूप घेतलें. त्या दोघींचे खुर व दांत यांच्या योगानें मोठें युद्ध सुरू झालें. मीही मोठा धीर धरून कांपत कांपत काळ्याघोडीच्या पाठीवर जोरानें खड्ग–प्रहार केले व त्यामुळें विह्वल झालेल्या त्या दुष्ट सोमदेला बंधमोचिनीनें मारलें. त्या दिवसापासून मी कानाला खडा लावून घेतला,–व दुष्ट स्त्री समागमाचा नुस्ता विचारही सोडला. चापल, साहसिकता, इत्यादि त्रिभुवनास भयभीत करणारे दोष स्त्रियांमध्यें साहजिक असतात. यास्तव जणुंकाय शाकिनीची सखीच अशा बंधुदत्तेशीं तूं संबंध ठेवूं नकोस. अरे, आपल्या सुंदर व श्रीमान् पतीवर जिचें प्रेम नाहीं, ती तुजसारख्या परपुरुषावर कितीसें प्रेम ठेवणार ?

माझ्या त्या मित्रानें मला अशा प्रकारें पुष्कळ हितोपदेश केला, पण मी त्याचें ऐकलें नाहीं; व त्यामुळें या असह्य यातनेंत पडलों. आतां तूं तरी माझें सांगणें ऐक, अनुरागपरेकरितां व्यर्थ क्लेश भोगूं नकोस. तिच्या जातीचा पुरुष तिला मिळाला म्हणजे ती तुला खचित सोडील. भ्रमरी जशी नव्या नव्या पुष्पांचा स्वाद घेते. त्याप्रमाणें स्त्रीही नव्या नव्या पुरुषाचा स्वाद घेण्याची इच्छा करिते. यास्तव मित्रा, माझें ऐक. मजप्रमाणें तुलाही पश्चात्ताप करण्याची पाळी न येवो."

## ४. निश्चयदत्ताचा पुढील वृत्तांत.

कपिरूपी सोमस्वामीनें निश्चयदत्ताला असा पुष्कळ बोध केला; पण आसक्तीनें परिपूर्ण झालेल्या त्याच्या हृदयांत तो भिनला नाहीं, व त्यामुळें तो त्या कपीस म्हणाला,–"शुद्ध विद्याधराधिपांच्या कुलांत झालेली ती माझ्याशीं प्रतारणा कधींही करणार नाहीं."–इतकें जों ते दोघे बोलत

आहेत, तों निश्चयदत्ताचें जणुकाय प्रिय करण्याची इच्छा करणारा सूर्य अस्ताचलास जाऊन पोंचला. रात्र पडतांच ती यक्षिणी त्याच्यापाशीं आली. त्या बरोबर 'बरें मला निदान विसरूं तरी नकोस,' असें सांगणाऱ्या कपीला विचारून तो प्रियेकडे जाण्याकरितां तिच्या खांद्यावर बसला व ती यक्षिणी आकाशमार्गानें वेगानें निघाली. मध्यरात्रीच्या सुमारास निश्चयदत्त अनुरागपरेच्या पित्याच्या हिमालयावरील पुष्करावती नगरीस जाऊन पोंचला. तों आपल्या विद्याप्रभावानें त्याचें आगमन झालें आहे, असें जाणून त्याच्या सन्मुख जाण्याकरितां अनुरागपरा त्या नगरीच्या बाहेर आली. तिला पहातांच, 'ही बघ रात्रीं दुसऱ्या चंद्रकलेप्रमाणें नेत्रांस आनंद देणारी तुझी कांता समोर येत आहे, आतां मी जातें,' असें सांगून; त्याला खांद्यावरून खालीं उतरून व प्रणाम करून यक्षिणी गेली.

तों अनुरागपराही जवळ येऊन व फार दिवसांनीं भेटलेल्या त्या प्रिय पुरुषाला आलिंगन देऊन त्याचें अभिनंदन करूं लागली. तेव्हां अनेक क्लेश भोगून ज्याला तिचा संगमोत्सव प्राप्त झाला आहे, असा निश्चयदत्तही जणुं काय आपल्या शरीरांत रहाणें अशक्य झाल्यामुळें आलिंगनरूपानें तिच्या शरीरांतच शिरला. त्यानंतर तत्काल ती गांधर्वविधीनें त्याची भार्या झाली. आपल्या विद्यासामर्थ्यानें तिनें तत्क्षणीं एक सुंदर नगर निर्माण केलें. त्यांत तो तिच्यासह तिच्या आई बापांच्या नकळत राहूं लागला.

एकदां तिनें प्रश्न केला असतां, निश्चयदत्तानें आपल्या घरून निघाल्यापासून येथें येईतों घडलेला सर्व वृत्तांत व भोगलेले सर्व क्लेश तिला सांगितले. तेव्हां तर ती त्याला अधिकच मानूं लागली, व इष्ट उपचारांनीं तिनें त्याची सेवा केली. त्यानें मर्कट झालेल्या सोमस्वामीची अद्भुत कथाही तिला सांगितली, व म्हटलें,–"प्रिये, तुझ्या एकाद्या प्रयत्नानें तो माझा मित्र जर तिर्यग्भावापासून मुक्त होईल, तर खरोखरच मोठें पुण्य लागेल." तें ऐकून ती म्हणली–नाथ, मंत्रमार्ग हा योगिनींचा विषय आहे आमचा नव्हे. तथापि भद्ररूपा म्हणून माझी एक सिद्धयोगिनी मैत्रीण आहे. तिची प्रार्थना करून मी हें तुझें प्रिय करीन. हे तिचे प्रिय शब्द ऐकून वैश्यपुत्र आनंदित झाला व तिला म्हणाला,–"प्राणसखे, तर मग चल, आपण त्याच्याकडे जाऊं. तूं त्याला एकदां पहा तर खरी!"

तेव्हां तिनें ती गोष्ट मान्य केली, आणि दुसऱ्याच दिवशीं तिच्या विद्याबलानें तिच्या सहवर्तमान तो आकाशमार्गानें त्या वनांत आला. तेथें त्या कपिरूप मित्रास पाहून व त्याच्या जवळ जाऊन त्यानें भार्येसह नमस्कार केला, व कुशल विचारलें.

तेव्हां तो म्हणाला–मित्रा, आज प्रियेसह तूं मला येऊन भेटलास, हेंच माझें कुशल आहे. असें बोलून व निश्चयदत्ताच्या भार्येला आशीर्वाद देऊन तीं तिघेंही तेथील एका रम्य शिलातलावर बसलीं. कांहीं वेळ त्यांनीं एकमेकांनीं इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगितल्या, व त्या कपि मित्राला विचारून अनुरागपरेसह निश्चयदत्त प्रियेच्या येथें गेला. दुसऱ्या दिवशीं तो पुनः तिला ' मित्राकडे जाऊं चल, ' असें म्हणाला. तेव्हां ती म्हणाली–आज मी वर उडण्याची व खालीं उतरण्याची विद्या तुम्हांला देतें. तिच्या योगानें तुम्हांला पाहिजे तेथें जातां–येतां येईल.- असें बोलून तिनें त्याला लागलीच ती विद्या शिकविली. त्याबरोबर निश्चयदत्त कोणाच्या सहायावांचूनच आकाशमार्गानें आपल्या मित्राकडे आला, व त्याच्याशीं पुष्कळ वेळ नानाप्रकारच्या गोष्टी बोलत राहिला.

इकडे प्राणप्रिय बाहेर गेल्यामुळें अनुरागपरेला घरांत करमेनासें झालें, म्हणून ती आपल्या घरांतून बाहेर येऊन उद्यानांत बसली. इतक्यांत कोणीएक विद्याधर-कुमार आकाशांतून सहज फिरत तेथें आला, व उद्यानांत स्वस्थपणें बसलेल्या तिला पहातांच कामवश होऊन तो तिच्यापाशीं गेला. ती विद्याधरी असून तिचा पति एक मर्त्य आहे, असेंही त्याला विद्याप्रभावानें कळलें होतें. तो रम्य पुरुष आपल्याच जवळ आला आहे, असें पाहून तिनें खालीं तोंड करून हळुच कौतुकानें ' तूं कोण व येथें कां आलास ? ' असें विचारिलें. तेव्हां तो म्हणाला–सुंदरि, मी रागभंजन या नांवाचा विद्या व ज्ञान यांच्या योगानें शोभणारा विद्याधर आहें. तुझ्या दर्शनाबरोबर एकाएकीं मदनानें मला तुझ्या आधीन केलें आहे. तर आतां हे देवि, मर्त्याची सेवा पुरे झाली. तुझ्या पित्याला हें तुझें अयोग्य कृत्य कळलें नाहीं, तोंच तूं माझें सेवन कर.

त्याचें तें रम्य वचन ऐकून अर्धकटाक्षानें त्याच्याकडे पहाणाऱ्या तिनें ' हाच मला अनुरूप पति आहे ' असा मनांत निश्चय केला, व तत्काल त्या चपलेनें त्याचे मनोरथ पूर्ण केले. कारण एकांतांत स्त्रीपुरुषांचें एक–

चित्त झाल्यावर मदनाला आणखी कशाची अपेक्षा असणार ?* असो; त्यानंतर विद्याधरपुत्र तेथून निघून गेला व निश्चयदत्त परत आला, पण त्याच्याविषयीं विरक्त झालेल्या तिनें त्याला आलिंगनादि दिलें नाहीं. 'माझें कपाळ दुखत आहे,' असें सांगून ती त्याच्यापासून दूरदूरच राहिली. पण त्या भोळ्या वैश्यपुत्राला तें तिचें कपट कळलें नाहीं. तिच्या स्नेहानें व्याकुल झालेला तो खरोखरच ती अस्वस्थ आहे, असें जाणून फार दुःखी झाला. त्यानें तो दिवस मोठ्या कष्टानें कसातरी घालविला. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं विद्यासामर्थ्यानें तो आपल्या सोमस्वामी मित्राकडे गेला.

तो निघून गेला आहे, असें पहातांच कामी विद्याधर अनुरागपरेकडे आला. कारण तिच्यावांचून रात्रभर त्याला झोंप आली नव्हती. कांहीं वेळ क्रीडा केल्यावर थकल्यामुळें त्याला तिच्या मांडीवरच झोंप लागली. तेव्हां आपल्या विद्यासामर्थ्यानें त्याला आच्छादित करून, रात्रभर जागरण झाल्यामुळें तीही निजली.

इकडे निश्चयदत्त आपल्या कपिमित्राकडे आला; पण त्याचें तोंड थोडेंसें उतरलें आहे, असें पाहून 'आज तुझी चर्या अशी अप्रसन्न कां?' असा त्यानें प्रश्न केला. तेव्हां निश्चयदत्त म्हणाला,—"मित्रा, काय सांगूं? अनुरागपरा कालपासून अतिशय अस्वस्थ आहे, त्यामुळें मला असह्य दुःख होत आहे. ती मला प्राणाहूनही प्रिय वाटते." हें त्याचें भाषण ऐकून तो ज्ञानी कपि म्हणाला—"मित्रा, तूं असाच परत जा, व आपल्या विद्यासामर्थ्यानें अदृश्य केलेल्या एका विद्याधरपुत्राला मांडीवर घेऊन निजलेल्या तिला तशीच येथें घेऊन ये. म्हणजे तुला मी एक चमत्कार दाखवीन."

मित्राच्या सांगण्याप्रमाणें तो परत गेला, व निजलेल्या अनुरागपरेला हळुच मांडीवर उचलून घेऊन आकाशमार्गानेंच सोमस्वामीजवळ आला; पण तिच्या मांडीवरचा तो विद्याधर त्याला दिसला नाहीं. तेव्हां दिव्य दृष्टि कपीनें त्याला एक उपाय सांगितला. त्याच्या योगानें तो विद्याधर तिच्या गळ्यांत लोंबत आहे, असें निश्चयदत्तानें पाहिलें. त्याला पहातांच

---

* अपेक्षते द्वयोरैकचित्त्ये किं रहसि स्मरः।

'हाय, हाय ! धिक्कार असो ! हें काय !' असें म्हणून घाबरलेल्या वैश्य-पुत्राला सोमस्वामीनें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून अर्थात्च निश्चय-दत्ताला क्रोध आला. इतक्यांत त्याच्या भार्येची कामना करणारा विद्याधर-पुत्रही जागा झाला व मारण्याच्या हेतूनें हा मानव आपल्या अंगावर येत आहे; असें पहातांच तो उडून गेला.

त्या गडबडीमुळें जागी झालेली अनुरागपराही आपली गुह्य गोष्ट बाहेर पडली, असें जाणून लज्जित झाली, व तोंड खालीं घालून उभी राहिली. तें पाहून निश्चयदत्त नेत्रांत पाणी आणून तिला क्रोधानें म्हणाला, "पापे, तुझ्यावर सर्वस्वी विश्वास ठेवून राहिलेल्या मला तूं कसें फस-विलेंस ? खरोखर अति चपल पाऱ्यालाही स्थिर करावयास कांहीं उपाय आहे, पण स्त्रीचित्ताला स्थिर करण्यास एकही युक्ति नाहीं." †

तो असें बोलत असतांना निरुत्तर झालेली अनुरागपरा हळुहळु रडत आकाशांत निघून गेली. तेव्हां निश्चयदत्ताला त्याचा सुहृत् म्हणाला, "मित्रा, मी नको म्हणत असतांनाही तूं जिच्या लोभानें येथून गेलास, तिचें हें कौटिल्य प्रत्यक्ष पाहिलेंसना ? तीव्र रागाग्नीचें हें असेंच तीव्र फल मिळावयाचें. संपत्ति, वीज व स्त्री यांचा काय विश्वास ? * तर आतां संताप करूं नकोस, शांत हो. भवितव्यतेचें उल्लंघन विधात्यालाही करितां येत नाहीं." सोमस्वामीचें हें उपदेशपर भाषण ऐकून निश्चयदत्तानें शोक व मोह यांचा त्याग केला, विरक्त होऊन तो शंकरास शरण गेला, व त्या मित्राच्या सहवासास तेथेंच राहिला.

कांहीं दिवसांनीं भाग्यवशात् तेथें एक मोक्षदा नांवाची तपस्वीनी आली. तिला निश्चयदत्तानें प्रणाम केला. तेव्हां तिनें 'हा तुझा मित्र मानुष अस-तांना मर्कट कसा झाला' असें विचारिलें. तेव्हां त्यानें अगोदर आपला व नंतर त्या मित्राचा सर्व दुःखकर वृत्तांत तिला सांगितला. व शेवटीं अगदीं दीन वाणीनें तो म्हणाला–" भगवति, तुला जर कांहीं मंत्र अथवा तंत्र ठाऊक असेल, तर या माझ्या सन्मित्राला दुरावस्थेंतून कृपा करून

† अत्यन्तचञ्चलस्येह पारदस्य निबन्धने।
कामं विज्ञायते युक्तिर्न स्त्रीचित्तस्य काचन ॥

* को हि संपत्सु चपलास्वाश्वासो वनितासु च ।

सोडीव.''- तें ऐकतांच तिनें 'बरें आहे' असें म्हणून त्याच्या गळ्यांतील सूत्र मंत्रोच्चार करून सोडलें. त्याबरोबर मर्कटभाव सोडून सोमस्वामी पूर्वीप्रमाणें मनुष्य झाला. इतक्यांत विजेप्रमाणें ती दिव्यप्रभाव-संपन्न मोक्षदा गुप्त झाली. नंतर त्याच वनांत राहून पुष्कळ तप केल्यावर ते दोघे मित्र परम गतीस गेले.

सारांश; प्रभो, स्त्रिया याप्रमाणें स्वभावतःच चपल असतात. त्यांच्या अनेक प्रकारच्या दुश्चरितांचा अनुभव आला असतां, पुरुषाला विवेक व वैराग्य अवश्य प्राप्त होतें. नवी इंदुलेखा जशी आकाशास, तशी अनेक स्त्रियांमध्यें एकादीच साध्वी आपल्या विशाल कुलास अलंकृत करिते. असो; अशा प्रकारची ही विचित्र कथा गोमुख सचिवाच्या—तोंडून ऐकून रत्नप्रभेसह नरवाहनदत्त संतुष्ट झाला.

---

## तरंग ४ था.

*गोमुखानें सांगितलेली कथा ऐकून राजा संतुष्ट झाला आहे, असें पाहून* जणुंकाय स्पर्धेनेंच मरुभूति म्हणाला,—" देव, स्त्रिया प्रायः चपल असतात, असें म्हणणें बरें; कारण सर्वच स्त्रिया चपल नसतात. वेश्यांमध्येंही सत्त्वसंपन्न स्त्रिया आढळतात, मग इतरांची तर गोष्टच राहूं दे. मी या संबंधानें एक विख्यात कथा सांगतों, ती ऐका.

### १. विक्रमादित्य व वेश्या यांची कथा.

पाटलीपुत्र नगरांत विक्रमादित्य राजा असून हयपति व अश्वपति असे त्याचे दोन प्रिय मित्र होते. त्यांच्यापासून त्याला पुष्कळ हत्ती व घोडे मिळत. त्या मानी राजाचा नरसिंह नामक प्रतिष्ठानचा बलाढ्य राजा मोठा शत्रु असे. त्याच्यापाशीं अगणित पायदळ होतें. एकदां त्याच्यावर अतिशय रागावून अतिशय गर्वित झालेल्या विक्रमादित्यानें एकाएकीं अशी प्रतिज्ञा केली:—मी त्या राजाला असा जिंकीन, कीं बंदी व मागध द्वारामध्यें त्याला माझा सेवक म्हणतील. अशी घोर प्रतिज्ञा करून व आपल्या त्या दोघां परम मित्रांना बोलावून त्यांच्या सहवर्तमान घोडे व हत्ती यांच्या योगानें पृथ्वीला क्षुब्ध करीत तो त्य

नरसिंह राजावर निघाला. तो प्रतिष्ठान नगराजवळ आला आहे, असें कळतांच नरसिंह राजा आपल्या विशाल सैन्यासह बाहेर आला. त्यानंतर दोघांचें विस्मयजनक युद्ध झालें. गज व अश्व यांवरील योद्ध्यांशीं पदाती लढूं लागले. बराच वेळ संग्राम झाल्यावर नरसिंहाच्या शूर शिपायांनीं विक्रमादित्याच्या लोकांचा पराभव करून त्यांना अश्व व गज यांसह दशदिशांस पिटाळून लाविलें. तेव्हां विक्रमादित्यही पळून आपल्या नगरास परत आला, व त्याचे मित्र आपापल्या राजधानीस गेले. इकडे नरपति-नरसिंहही, बंदिजन त्याच्या पराक्रमाची स्तुति करीत असतांना, आपल्या प्रतिष्ठान नगरींत शिरला.

पाटलीपुत्र नगरांत परत आल्यावर कार्य न साधल्यामुळें विक्रमादित्य चिंताग्रस्त झाला. आणि 'शस्त्रांनीं अजिंक्य असलेल्या त्या राजाला मी आतां आपल्या बुद्धिसामर्थ्यानें जिंकतों, त्यामुळें कित्येक माझी निंदा करतील, पण ते ती खुशाल करोत. मी माझी प्रतिज्ञा कशी तरी पुरी करणार,' असा विचार करून व राज्यभार योग्य मंत्र्यांवर टाकून, एका बुद्धिवरनामक मुख्य मंत्र्याला व कांहीं राजपुत्रांना बरोबर घेऊन तो गुप्तपणें आपल्या नगरांतून निघाला. संन्याशाचा वेष घेतलेले पांच कुलीन शूर क्षत्रियही त्याच्या बरोबर होते. अशा प्रकारच्या परिवारासह तो शत्रूच्या प्रतिष्ठान नगरास गेला. तेथें मदनमाला या नांवाच्या एका वेश्येचें राजाच्या मंदिरासारखें रमणीय घर होतें, त्या मंदिराच्या उंच प्रासाद शिखरावर लावलेल्या ध्वजांचीं वाऱ्यानें हलणारीं वस्त्रें त्यांना जणुंकाय बोलावीतच होतीं. त्या मंदिराच्या मुख्य पूर्वद्वारावर वीस सहस्र सशस्त्र शिपायी पाहरा करीत होते. बाकीच्या तीन दिशांतील तीन द्वारांवर दहा दहा सहस्र शूर उभे होते. द्वारावर जाऊन राजानें प्रतीहाराला आपला आंत जाण्याचा उद्देश कळविला. त्यानें मदनमालेची आज्ञा घेऊन त्याला आंत सोडलें. त्या सुंदर गृहांत प्रवेश करतांच तें कोठें अनेक जातिवंत घोड्यांच्या रांगांनीं सुशोभित झालें आहे, कोठें बांधलेल्या हत्तींच्या संघानें दुःसंचर झालें आहे; कोठें आयुधांच्या राशींनीं गंभीर आकारवान् झालें आहे, कोठें रत्नांच्या प्रभेनें दैदीप्यमान झालेल्या कोषगृहांनीं उज्ज्वल दिसत आहे, कोठें त्यांतील सेवक-समूहानें एकसारखें मंडल बांधलें आहे, कोठें तें उंचस्वरानें स्तुतिपाठ करणाऱ्या

बंदिजनाच्या कोलाहलानें व्याकुल झालें आहे, व कोठें सतत चाललेल्या गायनाच्या व मृदंगांच्या ध्वनीनें नादित झालें आहे, असें त्याला आढळलें. त्या भव्य मंदिरांत सात चौक होते. त्या विचित्र गृहाचें चांगल्या रीतीनें निरीक्षण करीत, राजा आपल्या परिवारासह मदनमालेच्या रहावयाच्या उंच मंदिरांत गेला.

आपल्या सेवकांच्या तोंडांतून, या पाहुण्यानें निरनिराळ्या चौकांतील अश्वादिनिरनिराळ्या वस्तूंचें सूक्ष्म निरीक्षण केलें, असें ऐकून-हा कोणी गुप्तवेषानें आलेला राजा असावा,-असें मदनमालेनें अनुमान केलें. ती उठून समोर गेली, व साभिलाप आणि सकौतुक प्रणाम करून तिनें त्याला आंत नेलें. व राजाला उचित अशाच आसनावर बसविलें. तिचें रूप, लावण्य व विनय यांनीं ज्याच्या चित्तास आकर्षण करून घेतलें आहे, अशा विक्रमादित्यानें 'मी कोण आहें' हें न सांगतांच तिचें अभिनंदन केलें. त्यानंतर मदनमालेनें स्नान, पुष्पें, अनुलेपन, उंची वस्त्रें, आभरणें इत्यादिकांच्या योगानें राजाचा मोठा सत्कार केला. त्याच्या अनुयायींस त्या दिवसाचा शिधा देववून सचिवांसह राजाला उत्तम भोजन घातलें पानादिकांत तिनें तो दिवस त्याच्या बरोबर घालविला. दर्शन होतांच वश झालेल्या तिनें त्याला आपलें समर्पण केलें. तो राजा तेथें जरी गुप्तरीतीनें रहात होता, तरी चक्रवर्ती राजाला उचित अशाच थाटानें तो रहात असे. तो याचकांना प्रत्यहीं जितकें व जें जें कांहीं देई, तें तें ती स्वतः त्याला पुरवीत असे. त्याच्या उपभोगानें आपलें शरीर व धन कृतार्थ होत आहे, असें समजून ती इतर पुरुषाविषयीं विरक्त झाली. तिच्या प्रेमामध्यें आसक्त झालेल्या राजा नरसिंहाचेंही तिनें युक्तीनें निवारण केलें.

याप्रमाणें ती सेवा करीत असतांना एकदां राजा एकांतांत आपल्या सहचर बुद्धिवरास म्हणाला,-" मंत्रिन्, वेश्या म्हणजे नेहमीं द्रव्याचा लोभ करणारी हें प्रसिद्ध आहे. तिचा लोभच विधात्यानें याचकांस वांटून दिला आहे. पण ही मदनमाला किती उदार आहे पहा. मी हिच्या सर्वस्वाचा उपभोग घेत असतांनाही ही अतिस्नेहामुळें मजविषयीं विरक्त होत नाहीं, तर उलट संतुष्टच होते. तर आतां मी हिच्यावर कोणत्या रीतीनें प्रत्युपकार करूं तें सांग, व त्यामुळें माझी प्रतिज्ञाही सिद्ध

होईल असा कांहीं उपाय शोधून काढ."–राजाचें हें भाषण ऐकून मंत्री म्हणाला; महाराज, असें जर असेल तर प्रपंचबुद्धिभिक्षूनें जीं अमूल्य रत्नें आपल्याला दिलीं आहेत, त्यांतील कांहीं तिला द्या.

तें ऐकून राजा म्हणाला,—"मित्रा, त्यानें दिलेलीं सर्व रत्नें जरी मी दिलीं, तरी हिच्या उपकाराची फेड होणें शक्य नाहीं."–त्यावर मंत्री विचारूं लागला, "देव, आपल्याला तीं रत्नें भिक्षूनें कशीं दिलीं, त्याविषयीं मला तर मोठें कौतुक वाटत आहे." तें ऐकून राजा तत्संबंधीं वृत्त सांगूं लागला.

## २. प्रपंचबुद्धिभिक्षूची उपकथा.

मागें तो भिक्षु रोज मजजवळ येऊन एकेक लांकडी बंद केलेला संपुट देत असे. मीही तो न उघडतां जशाचा तसाच एक वर्षभर कोषाधिपतीच्या ( खजीनदाराच्या ) स्वाधीन करीत असें. तोही त्याला कोषागारांतच व्यवस्थेनें ठेवी. एकदां प्रपंचबुद्धीनें मला आणून दिलेला संपुट दैववशात् माझ्या हातांतून खालीं पडला, व त्याचे दोन तुकडे झाले. त्याबरोबर त्यांतून निखाऱ्यासारखें तेजस्वी रत्न बाहेर पडलें. तें पहातांच मला मोठें आश्चर्य वाटलें. मी त्या भिक्षूनें दिलेलीं संपुटें फोडून त्यांतील अनेक अमूल्य रत्नें बाहेर काढलीं. आणि विस्मयानें त्या भिक्षूस म्हटलें, "महाराज, आपण असल्या अमूल्य रत्नांनीं माझी सेवा कां करतां?" तेव्हां तेथल्या सर्व लोकांस जावयास सांगून तो मला म्हणाला,–"येत्या कृष्ण चतुर्दशीस श्मशानांत जाऊन मी कांहीं एक विद्या संपादन करणार आहें. यास्तव हे वीरा, तेथें येऊन तूं माझें सहाय कर; कारण वीराच्या सहायानें निर्विघ्न झालेली कोणतीही सिद्धि सुलभ होत असते"§ तें ऐकून मी त्याला सहाय करण्याचें अभिवचन दिलें, व त्यामुळें तो भिक्षु आनंदित होऊन गेला. कांहीं दिवसांनीं कृष्ण चतुर्दशी आली. मला आपल्या वचनाचें स्मरण होतेंच. त्यामुळें मी आपलीं सर्व दैनिककृत्यें आटोपून प्रदोषकालाची वाट पहात राहिलों, पण सायंसंध्या करतांच दैववशात् मला झोंप लागली. व तत्काल भगवान् हरि, गरुडावर बसून व कमलेला मांडीवर घेऊन स्वप्नांत माझ्यापाशीं आला, आणि म्हणाला,–

§ वीरसाहाय्यनिर्विघ्नाः सुखलभ्या हि सिद्धयः।

"राजन्, हा दुष्ट प्रपंचबुद्धि आज तुला स्मशानांत नेऊन मंडलपूजनामध्यें तुझा बली देणार आहे. यास्तव तुझा घात करण्याकरितां तो जें कांहीं तुला करावयास सांगेल, तेव्हां–' तें तूं स्वतः अगोदर करून दाखीव, म्हणजे मग मी तसें करीन ' असें तूं त्याला सांग, व तो तें करून दाखवूं लागला म्हणजे योग्य अवसर पाहून तूं त्याला मार. असें केल्यानें त्याला मिळणारी सिद्धि तुला मिळेल." इतकें सांगून भगवान् विष्णु गुप्त झाला, आणि मी जागा झालों. व ' हरीच्या अनुग्रहानेंच तो भिक्षु कपटी व वध्य आहे, असें मला आज कळलें; नाहीं तर फुकट प्राणास मुकलों असतों ' असें मनांत म्हटलें. नंतर त्या रात्रीचा पहिला प्रहर समाप्त झाला असतां, हातांत खड्ग घेऊन मी एकटाच स्मशानांत गेलों. तेथें एकीकडे मंडलांत बसून पूजन करीत असलेल्या त्याला मीं पाहिलें व जवळ गेलों. तेव्हां मजकडे पाहून त्यानेंही माझें अभिनंदन केलें. कांहीं वेळानें अवशिष्ट पूजा आटोपून तो शठ मला म्हणाला--राजन्, डोळे मिटून व अंग पसरून तूं येथें उपडा पड, म्हणजे आम्हां दोघांनाही सिद्धि मिळेल.–तें एकून मी त्याला म्हटलें, " योगिन्, कृपा करून तूं मला अगोदर कसें निजावयाचें तें स्वतः निजून दाखीव, म्हणजे लागलेंच मीही तसें करीन."

हें माझें म्हणणें ऐकून तो मूढ संन्यासी भूमीवर हात पाय पसरून तोंड खालीं करून पडला. तेव्हां मीही, त्याच्या वेषाला फारसा मान न देतां, दुर्गुणांकडेच केवल दृष्टि देऊन, त्याचें शिर आपल्या तीक्ष्ण शस्त्रानें एका क्षणांत उडविलें. त्याबरोबर अंतरिक्षांतून " राजन्, या पापी भिक्षुकाला मारलेंस, हें तूं फार चांगलें काम केलेंस. गगनांतून गमन करितां येणें, ही सिद्धि याला पाहिजे होती; पण ती आतां तुला प्राप्त होईल. तुझ्या या धैर्यानें मी कामचारी कुबेर तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. तुला हवा असेल तो आणखी एक वर तूं मजपासून मागून घे. अशी आकाशवाणी झाली, व तो देव कुबेर तत्काल प्रकट झाला. त्याबरोबर मी प्रणाम करून म्हटलें, " भगवन्, यावेळीं मला कांहीं नको; पण कांहीं लागेल तेव्हां मी आपलें स्मरण करीन, त्यावेळीं आपण दर्शन देऊन माझें इष्ट मला द्यावें." त्यावर 'बरें आहे' असें म्हणून कुबेर गुप्त झाला, व अद्भुत सिद्धि प्राप्त झाल्यामुळें मीही एकदम आपल्या

मदिरांत आलें. असो, मंत्रिन्, असा तो वृत्तांत घडला. त्या कुबेराच्या वरानें मी हिच्यावर प्रत्युपकार करण्याची इच्छा करितों, यास्तव बुद्धिवरा, तूं गुप्त वेषानें हा राजपुत्रांचा परिवार घेऊन अगोदर पाटलीपुत्रास जा. तों मीही माझ्या ह्या प्रियेवर अपूर्व परोपकार करून मागोमाग येतों; असें सांगून व सर्व परिवारासह त्याला पाठवून, राजा त्या रात्रीं तिच्याबरोबर तेथें आनंदानें राहिला. आतां आपला कांहीं काल वियोग होणार आहे, हें मनांत आल्यामुळें, अर्थात् त्याला मोठी चिंता लागली होती. व राजा आपणापासून दूर होणार आहे, असें तिला तिच्या हृदयानेंच कळविल्यामुळें तिला रात्रभर झोंपही आली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजा सर्व प्रातःकृत्यें करून जपाच्या निमित्तानें देवघरांत गेला. तेथें एकांतांत बसून त्यानें कुबेराचें स्मरण केलें. त्याबरोबर तो वरद त्याच्याजवळ आला. त्याला समोर पहातांच प्रणाम करून राजा म्हणाला–देवा, मागें मला अभिवचन दिल्याप्रमाणें पांच सोन्याचे अक्षय पुरुष दे. त्यांच्या अंगाचें सोनें काढून त्याचा कितीही जरी व्यय केला तरी ते पुनः पुनः भरून यावेत.–राजाची ही वरप्रार्थना ऐकून व 'तथास्तु' असें म्हणून धनद गुप्त झाला, व लागलेच पांच मोठे सुवर्ण पुरुष त्याच देवघरांत उत्पन्न झाले. त्यांना पाहून राजाला मोठा संतोष झाला. नंतर तो विक्रमादित्य राजा आपल्या प्रियेला न सांगतांच आकाशमार्गानें पाटलीपुत्र नगरास परत आला. तेथें पौरजन, मंत्री व अंतःपुरवर्ग यांनीं त्याचें उत्तमप्रकारें अभिनंदन केलें. नंतर आपलें सर्व चित्त प्रतिष्ठानांत ठेवून तो राजकार्यें पहात कांहीं दिवस तेथें राहिला.

इकडे प्रतिष्ठानांत आपला प्रिय अजून बाहेर कां येत नाहीं, असें म्हणून उत्कंठित झालेली मदनमाला त्याला पहाण्याकरितां देवघरांत शिरली. पण तिला तेथें आपला कांत न दिसतां पांच उंच सुवर्णाचे पुतळे दिसले. तेव्हां अतिशय दुःखित होऊन ती मनांत म्हणाली,– "खरोखर तो माझा प्रिय कोणी विद्याधर अथवा गंधर्व असावा. त्यानें मला हे सोन्याचे पांच पुरुष दिले व आपण स्वतः मला सोडून निघून गेला. पण त्याच्यापासून दूर झालेल्या मला, या भारांना घेऊन काय करावयाचें आहे!" इतकें मनांत आणून ती विह्वल झाली व सेवकांना

आणि राजाला शोधीत सर्व घरभर हिंडली. खालीं, वर, आंत, बाहेर, कोनांत, सांधींत, इत्यादि सर्व ठिकाणीं तिनें त्याला पाहिलें; पण कांहीं पत्ता लागला नाहीं. तेव्हां ती फार कष्टी झाली, व वियोगदुःख असह्य झाल्यामुळें शरीरत्याग करण्याचा तिनें निश्चय केला. तों इतक्यांत 'देवि, असा विषाद करूं नकोस तुझा प्रिय कोणी कामचर देवच आहे, असें समज. तो पुनरपि तुजकडे येईल, तूं अगदीं चिंता करूं नकोस.' इत्यादि अनेक आशाजनक भाषणें करून तिच्या वृद्ध व अनुभवी परिजनांनी तिचें सांत्वन केलें. तेव्हां मदनमालेनें अशी प्रतिज्ञा केली कीं—सहा महिन्यांच्या आंत जर त्यानें मला पुनः दर्शन दिलें नाहीं, तर मी हें सर्वस्व देऊन टाकून अग्नींत प्रवेश करीन.—नंतर आपल्या चित्ताचें मोठ्या कष्टानें स्तंभन करून, प्रत्यहीं यथेच्छ दानें देत व आपल्या प्रियकराचें ध्यान करीत ती एकेक दिवस मोजून घालवूं लागली.

एकदां त्या सोन्याच्या पुरुषांतील एका पुरुषाचे दोन्ही हात तोडून—केवल दानतत्पर झालेल्या तिनें—ते ब्राह्मणास अर्पण केले; पण दुसऱ्या दिवशीं पहाते तों ते तसेच पुनः उत्पन्न झाले आहेत, असें तिला दिसलें. तो चमत्कार पाहून अर्थात्च तिला मोठा विस्मय वाटला, व क्रमानें तिनें इतर चार पुरुषांचे हातही दानाकरितां तोडविले. पण तेही पुनः पर्ववत् उत्पन्न झाले. तें पाहून हे पांची पुरुष अक्षय आहेत असें तिनें ताडलें, व वारंवार त्यांच्या अंगांचें सोनें काढून ती वेदवेत्त्या विद्वानांस व अध्यापकांस नित्य दानें देऊं लागली. थोडक्याच कालांत तिची ख्याति चोहोंकडे पसरली, व ती ऐकून संग्रामदत्त नांवाचा एक ब्राह्मण पाटलीपुत्र नगराहून तेथें आला. तो मोठा गुणी व चतुर्वेदवेत्ता, पण दरिद्री होता. त्या वेश्येपासून प्रतिग्रह घेण्याची इच्छा करणारा तो तिच्या द्वारावर आला. द्वारपालांनीं मदनमालेची आज्ञा घेऊन त्यास आंत नेलें. तेव्हां व्रताच्या योगानें जिचें शरीर कृश झालें आहे व प्रियविरहामुळें जिचा वर्ण पांडुर झाला आहे, अशा मदनमालेनें पूजा करून त्याला चार सोन्याचे हात दिले. नंतर दुःखार्त झालेल्या परिवाराच्या तोंडून तिच्या महाघोर प्रतिज्ञेसह तिचा सर्व वृत्तांत ऐकून घेऊन, हृष्ट व उद्विग्न झालेला तो ब्राह्मण ते सोन्याचे हात दोन उंटावर लादून पाटलीपुत्रास परत गेला. तेथें पोंचल्यावर—राजाच्या साह्यावांचून माझें हें सोनें सुरक्षित रहाणार नाहीं,

असा मनांत विचार करून तो राजाकडे गेला, व सभास्थानीं बसलेल्या विक्रमादित्य राजाचें दर्शन घेऊन, पुढीलप्रमाणें विनंति करूं लागला.

महाराज, मी याच नगरांत रहाणारा एक द्विज आहे. दारिद्र्यानें पीडल्यामुळें मी द्रव्य मिळविण्याच्या उद्देशानें दक्षिण देशाकडे निघालों; पण नृसिंह राजाच्या प्रतिष्ठानपुरास पोंचतांच दानशीलत्वामुळें जिचें नांव सर्वांच्या तोंडीं झालें आहे, अशा एक मदनमाला नांवाच्या गणिकेच्या येथें मी प्रतिग्रहाच्या इच्छेनें गेलों. तिच्या पाशीं कोणी एक दिव्य पुरुष कांहीं दिवस राहून व पांच सोन्याचे अक्षय पुरुष देऊन कोठें निघून गेला. त्याच्या विरहानें ती वारांगना असूनही, अति उद्विग्न झाली आहे, व तिनें जीव देण्याचा निश्चय केला आहे. जीवित ही विषवेदना आहे, देह हा निष्फल आयास आहे, व आहार चौरयातना आहे, असें समजणाऱ्या तिचें धैर्य नाहींसें झालें; पण तिच्या सेवकांनीं तिला पुष्कळ धीर दिला. तेव्हां–'माझ्या प्राणप्रियानें सहा महिन्यांत मला दर्शन न दिल्यास मी अग्नींत प्रवेश करीन.'–अशी घोर प्रतिज्ञा करून ती यथेच्छ दानें देऊं लागली. त्या दिवसापासून तिनें आहार व निद्राही अगदीं परिमित करून शरीर अति शुष्क करून घेतलें आहे. पण तिच्या अंगावर दिसणारें विलक्षण तेजच, ती कोणी असामान्य स्त्री आहे, असें सहज सुचवितें. तिचे हात दानोदकानें एकसारखे ओले असतात. ज्या धन्य व कामी पुरुषानें तिला सोडलें, तो विषयवितृष्णेमुळें वंद्यही आहे, व त्याच्याकरितां जी सुंदरी प्राण देण्यासही तयार झाली आहे अशा प्रियेला सोडल्यामुळें तो निंद्यही आहे, असें मी समजतों. असो; सारांश अशा त्या दानशील बाईनें मी चार वेदांस जाणतों म्हणून मला सोन्याच्या पुरुषांचे चार हात दिले आहेत, मी आतां मोठें सत्र करण्याची इच्छा करीत आहें, पण आपण मला तें करण्याचें अभिवचन दिलें पाहिजे. राजाश्रयावांचून असलीं धर्मकृत्यें सुरक्षितपणें पार पडत नसतात.

संग्रामदत्ताच्या तोंडचा वृत्तांत ऐकून विक्रमादित्य उद्विग्नचित्त झाला. त्यानें आपल्या प्रतीहाराला–या ब्राह्मणाला सर्वप्रकारें सहाय कर–अशी आज्ञा केली; आणि मंत्र्यांवर राज्यभार टाकून आपल्या प्रेमामुळें, जिनें आपलें जीवित तृणासारखें तुच्छ समजून, थोड्याच दिवसांत त्याला घालविण्याचा निश्चय केला आहे, त्या प्रिय मदनमालेकडे तो राजा आका-

शमार्गानें गेला. प्रतिष्ठान नगरींतील तिच्या भव्य घरांत शिरतांच जिनें शुभ्र वस्त्र परिधान केलें आहे, आभरणें व केशादि–संस्कार यांचा त्याग केला आहे, व दान धर्मांत जी आपला काल घालवीत आहे, अशा कृश झालेल्या आपल्या कांतेस कृश–चंद्रकलेप्रमाणेंच त्यानें पाहिलें. अकस्मात् समोर येऊन उभा राहिलेला आपला प्रियकर पहातांच मदनमालेलाही क्षणभर मूर्च्छा आली. ती वेडी झाली. मी कोठें आहें व काय करीत आहें, याचें तिला भान नाहींसें झालें. कांहीं वेळानें थोडीशी शुद्धीवर आल्यावर जणुं काय तो पुनः पळून जाईल, या भीतीनेंच ती त्याला घट्ट आलिंगन देऊन बसली. तिनें त्याच्या गळ्यांत भुज-लता-पाश अडकविले. 'हे निष्करुण कांत, मज निरपराधी अबलेला सोडून आपण कां गेलां!' असें ती दाटून आलेल्या कंटानें अस्पष्ट बोलली. तेव्हां 'चल, मी तुला सर्व सांगतों.' असें म्हणून तो तिला एकांतांत घेऊन गेला. तेथें दुसरें कोणी नाहीं असें पाहून, त्यानें आपण कोण, येथें कशाकरितां आलों, कुबेराच्या वरामुळे पांच सुवर्ण पुरुष कसे मिळविले, व ब्राह्मणाच्या तोंडची वार्ता ऐकून आजच्या आज पुनः येथें कसे आलों, तें सर्व त्यानें तिला आपल्या प्रतिज्ञेसह सांगितलें. आणि पुनः म्हटलें,—"प्रिये, नरसिंह–राजा अति बलाढ्य आहे. सैन्याच्या योगानें त्याला जिंकतां येणें शक्य नाहीं. द्वंद्वयुद्ध करून व स्वतः आकाशांत राहून भूमीवर असलेल्या त्याला जिंकणें माझ्या सारख्या सुक्षत्रियाला शोभत नाहीं. यास्तव–द्वारावर उभे असलेले बंदिजन, तो आला आहे, असें मला येऊन कळवितील व सामान्यराजाप्रमाणें मी द्वारावर त्याची संभावना करीन–ही माझी प्रतिज्ञा युक्तीनें पूर्ण करण्याकरितां मी येथें आलों होतों–व अजूनही माझा तो निश्चय ढळलेला नाहीं. तर या कामांत तूं मला साहाय्य कर.

राजानें असें सांगितलें असतां 'खरोखर मी धन्य आहें' इतकेंच बोलून मदनमालेनें काय काय करावयाचें त्याचा राजाच्या संमतीनेंच निश्चय केला. आणि आपल्या बंदिजनास व प्रतीहारास बोलावून म्हटलें,—"राजा नरसिंह जेव्हां माझ्या येथें येईल, तेव्हां तुम्हीं द्वारावरच सावधपणें रहा. तो आंत प्रवेश करूं लागला म्हणजे त्याला प्रतिबंध न करितां, 'हे देव, राजा नरसिंह आपल्यावर अनुरक्त व आपला भक्त आहे,' असें वारंवार

म्हणा. 'येथें कोण आहे,' असें त्यानें विचारल्यास राजा विक्रमादित्य आहे असें त्याला सांगा.''–तें ऐकून व बरें आहे असें म्हणून सर्व तेथून गेले.

इतक्यांत राजा नरसिंहही मदनमालेची अतिदानाविषयींची ख्याति ऐकून तिला प्रत्यक्ष पहाण्याच्या लालसेनें तिच्या येथें आला. तेव्हां प्रतीहारानें प्रतिबंध केला नाहीं, म्हणून तो आंत शिरूं लागला. तों इतक्यांत गणिकेनें शिकवून ठेविल्याप्रमाणें तिचे बंदिजन मोठ्यानें वारंवार म्हणूं लागले. तेव्हां त्याला मोठा क्रोध व संशयही आला, आणि ' येथें कोणरे आहे?' असें त्यानें विचारलें. तेव्हां 'राजा विक्रमादित्य' असें त्यांनींही तत्काल उत्तर दिलें. त्याबरोबर तो सुज्ञ राजा मनांत असा विचार करूं लागला–'वाहवा, या राजानें माझ्याच घरांत शिरून आपली प्रतिज्ञा पूर्ण करून घेतली ! खरोखर तो मोठा तेजस्वी आहे यांत संशय नाहीं. आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्यानें आज मला युक्तीनें जिंकलें आहे. या वेळीं हा एकटाच माझ्या घरांत सांपडला आहे, हें खरें. पण अशा अवस्थेंत त्याला मारणें योग्य नव्हे. यास्तव आंत जाऊन त्याला भेटावें हें बरें.'

असा विचार करून बंदिजनांनीं ज्याचें आगमन आंत कळविलें आहे, असा तो राजा अंतःपुरांत गेला. तेव्हां हंसत हंसत येत असलेल्या राजास विक्रमादित्यानेंही हंसत आलिंगन दिलें, व आसनावर आणून बसविलें. मदनमाला बाजूला उभी असतांनाच त्यांनीं एकमेकांस कुशल प्रश्न विचारले. नंतर बोलतां बोलतां नरसिंहराजानें विक्रमादित्यास त्या पांच अक्षय सुवर्णपुरुषांविषयीं प्रश्न केला. तेव्हां त्या उदार राजानें पहिल्यापासून आपला सर्व अद्भुत वृत्तांत त्याला सांगितला. त्यावरून तो आकाशांतूनही जाणारा राजा महाशक्तिमान् आहे, असें जाणून नरसिंहानें त्याच्या विषयींची पापबुद्धि सोडली व मित्र होण्याविषयीं प्रार्थना केली. विक्रमादित्यानेंही त्याचें मित्रत्व मान्य केलें. तेव्हां नरसिंहानें आपल्या येथें नेऊन त्याचा सर्वोत्कृष्ट सत्कार केला. नंतर कांहीं दिवस पाहुणचार घेऊन नवीन मित्र झालेल्या शूर राजानें अनुज्ञा दिली असतां, विक्रमादित्य मदनमालेच्या येथें परत आला.

कांहीं दिवसांनीं ज्यानें आपला दुर्वह प्रतिज्ञाभार केवल बुद्धिसामर्थ्यानें कमी केला आहे, असा तो विक्रमादित्य राजा आपल्या नगरास परत जाण्या-

चा विचार करूं लागला. तेव्हां त्याचा विरह सहन करण्यास असमर्थ असलेल्या मदनमालेनेंही तें नगर सोडण्याचा निश्चय केला, व आपलें भव्य गृह सत्पात्र ब्राह्मणास दिलें. त्यानंतर अनन्यचित्त अशा तिला आपल्या बरोबर घेऊन तिच्या–हत्ती–अश्वादि सर्व परिवारासह विक्रमादित्य–राजा, आपल्या पाटलीपुत्र नगरीस परत आला, आणि त्या दिवसापासून नरसिंहराजाशीं मित्रभाव ठेवून, विक्रमादित्य केवल प्रेमबद्ध होऊन स्वदेशत्याग करणाऱ्या त्या मदनमालेसहवर्तमान सुखानें राज्य करीत राहूं लागला.

सारांश, हे देव, वेश्याजनही जर असा राजांच्या अंतःपुर–वर्गाप्रमाणें उदार–सत्त्व व दृढ–अनुरक्त असूं शकतो, तर कुलीन पतिव्रता स्त्रियांविषयीं काय सांगावें ? यास्तव स्त्रिया प्रायः चंचल असतात, इतकेंच म्हणून पतिव्रतांचा योग्य मान करावा, हें चांगलें.

यौगंधरायणपुत्रानें सांगितलेली ही मनोहर कथा ऐकून युवराज नरवाहनदत्त व विद्याधर-कुलोत्पन्न नववधू रत्नप्रभा-यांना मोठा प्रमोद झाला.

---

## तरंग ५ वा.

मरुभूतीनें अशी कथा सांगितली असतां, नरवाहनदत्ताचा सेनापति हरिशिख म्हणाला–" खरें आहे. सुस्त्रियांना पतीवांचून अन्य आधारच नसतो. याविषयीं मी एक अतिशय चमत्कारिक कथा सांगतों ती ऐका.

### १. वीरभुज व गुणवरा यांची कथा.

वर्धमानपुर म्हणून जें एक या भूलोकीं अतिविख्यात नगर आहे, त्यांत मागें एक वीरभुज या नांवाचा परम धार्मिक राजा होता. त्या प्रभूच्या शंभर स्त्रिया होत्या; पण त्या सर्वांत गुणवरा–राणी त्याला प्राणांहूनही अधिक प्रिय वाटत असे, तथापि दैववशात् त्याला एकही अपत्य झालें नाहीं. म्हणून त्यानें श्रुतवर्धन नामक वैद्याला ' पुत्र होईल असें एकादें औषध आहे का ?' असें विचारिलें. तेव्हां तो म्हणाला–"महाराज, होय, मला एक औषध माहित आहे; पण त्याकरितां एक वनांतील

बकरा आणवा. त्याबरोबर राजानें प्रतीहाराला आज्ञा करून वनांतून एक बकरा आणविला. तेव्हां तो राजाच्या स्वयंपाक्यांस देऊन, वैद्यानें त्याच्या मांसाचें राण्यांकरितां एक उत्तम औषध तयार करविलें. आणि राजा देवपूजा करावयास गेला असतां, वैद्यानें सर्व राण्यांस एकत्र जमविलें. त्यावेळीं राजाबरोबर देवघरांत असलेली गुणवरा मात्र तेथें आली नव्हती; पण वैद्याच्या कांहीं तें लक्षांत आलें नाहीं. त्यानें तयार केलेलें सर्व औषध इतर राण्यांनाच देऊन टाकिलें.

इतक्यांत त्या प्राणप्रियेसह राजा वीरभुज तेथें आला. तेव्हां वैद्य, सर्व औषध संपलेलें पाहून हा आपला मोठाच अपराध झाला, असें लक्षांत आल्यामुळें निस्तेज झाला असतां, राजा म्हणाला,–"हें काय केलेंस? माझ्या गुणवरेकरितां थोडेंसुद्धां औषध राखून ठेवलें नाहींस! मुख्यतः जिच्याकरितां मी एवढा प्रयास करविला तिलाच तूं विसरलास!"–असें त्या वैद्याला बोलून राजा स्वयंपाक्यांस म्हणाला,–"त्या बकऱ्याच्या शरीरांतील थोडासा सुद्धां भाग राहिलेला नाहीं काय"–त्यावर स्वयंपाकी म्हणाला–सरकार, त्याचीं दोन शिंगें मात्र राहिलीं आहेत. आणखी कांहीं नाहीं. तें ऐकतांच वैद्य म्हणाला–"तर मग काय, फारच चांगलें झालें. त्यांतील गर काढून त्याचा रस करून द्या, म्हणजे तो उत्तम उपयोगी पडेल." वैद्याच्या या सांगण्याप्रमाणें पाचकांनीं शिंगांतील मांसाचा रस केला. व त्यांत आपल्या जवळचें चूर्ण मिसळून वैद्यानें तें औषध गुणवरेला दिलें.

कांहीं दिवसांनीं त्याच्या नव्याण्णव राण्या गर्भवती झाल्या, व योग्य समयीं प्रसूत होऊन त्यांतील प्रत्येकीस एकेक पुत्र झाला. महादेवी गुणवरा त्यांच्या मागून गर्भार राहिली, व तिला सर्व उत्तम-लक्षण-संपन्न पुत्रही सर्वांच्या मागूनच झाला. तेव्हां राजानें मोठा उत्सव करून, शृंगरसापासून झालेल्या त्या पुत्राचें नांव शृंगभुज असें ठेविलें. इतर भ्रात्यां-बरोबर तोही प्रत्यहीं वाढूं लागला. तो वयानें जरी इतर राज-पुत्रांहून कनिष्ठ होता, तरी गुणांनीं त्यांच्याहून फारच श्रेष्ठ होता. पुढें तरुण दशेस प्राप्त झालेला तो राजपुत्र रूपानें कामासारखा, धनुर्वेदांत अर्जुनासारखा व बलामध्यें भीमासारखा निपजला. पण त्या पुत्रासह त्याची गुणवरा माता वीरभुज राजाला अतिप्रिय आहे, असें पाहून दुसऱ्या राण्या तिच्याशीं मत्सर करूं लागल्या. त्यांच्यामध्यें अयशोलेखा

म्हणून एक दुष्ट स्वभावाची राणी होती. तिनें इतर सवतींशीं संकेत केला, व एकदां राजा आला असतां ती खोटेंच मुख उतरलेंसें करून खिन्न होऊन बसली. पण तो नाथ खेदाचें कारण वारंवार विचारूं लागला, तेव्हां ती कपटी स्त्री मोठ्या कष्टानें म्हणाली,—" आर्यपुत्र, आपल्याला हें गृहदूषण सहन कसें होतें ? इतरांच्या दोषांचें निवारण करण्याचा ज्यांचा अधिकार, त्यांनींच आपल्या दोषांचें निवारण करूं नये, हें आश्चर्य नव्हे का ? हा जो आपला सुरक्षित नांवाचा तरुण अंतःपुराधिपति आहे, त्याच्यावर ही आपली गुणवरा राणी आसक्त झाली आहे. कंचुकींनीं चांगल्या प्रकारें रक्षण केलेल्या या अंत:पुरांत, इतर पुरुषाची प्राप्ति होणें शक्य नाहीं, म्हणून ती त्याच्याशींच संगत झाली आहे. ही गोष्ट अंत:पुरांत आतां सर्वांना ठाऊक झाली आहे.

अयशोलेखेनें असें सांगितलें असतां राजानें पुष्कळ विचार केला. व अंतःपुरांतील प्रत्येक स्त्रीला विचारून पाहिलें; पण पूर्वींच संकेत करून एकमत असल्यामुळें त्या सर्वजणींनीं राजाला तसेंच सांगितलें. तथापि तो वीरभुज मोठा बुद्धिमान् व जितक्रोध होता. त्यानें आपल्यापाशींच पुष्कळ विचार करून राणी गुणवरा व सुरक्षित यांच्या वरील तो आरोप नसावा; कारण तसें होणें अशक्य आहे, असा निर्णय केला. पण या गोष्टीचा पूर्ण निश्चय केल्यावांचून ती कोणाला सांगणें उचित नव्हे, असें समजून त्यानें दुसऱ्या दिवशीं सभास्थानीं जाऊन बसतांच सुरक्षितास बोलाविलें. आणि क्रोध आला आहे असें दाखवून तो त्यास म्हणाला,— " सुरक्षिता, तूं ब्रह्महत्या केली आहेस. यास्तव तीर्थयात्रा करून जेव्हां परत येशील तेव्हांच मी तुझें तोंड पाहीन." राजाचें हें दुःखप्रद भाषण ऐकून भयभीत झालेल्या व ' महाराज, मीं कधीं ब्रह्महत्या केली ' असें म्हणणाऱ्या त्याला राजा पुन: म्हणाला,—" चुप रहा; उगीच बोलण्याचें धाष्टर्य करूं नकोस. पापनाशक काश्मीर देशास जाऊन विजयक्षेत्र नंदिक्षेत्र, वाराहक्षेत्र, मडवक्षेत्र, उत्तर–मानससरोवर इत्यादिकांच्या योगानें आपल्याला पवित्र करून जर तूं परत आलास, तरच तुला माझें दर्शन होईल, त्यावांचून होणार नाहीं."—इतकें बोलून राजानें परवश असलेल्या सुरक्षिताला युक्तीनें दूर पाठविलें.

त्यानंतर स्नेह, कोप व विचार यांनीं युक्त होऊन, तो अगोदर गुणवरा-राणीकडे गेला, व तेथें जरा खिन्नचित्त होऊन बसला. पण तीं त्याची अवस्था पाहून व्याकुल झालेली राणी म्हणाली–आर्यपुत्र, आज आपण असे खिन्न कां? तो तिचा प्रेमानें केलेला प्रश्न ऐकून, राजा तिला असें खोटेंच म्हणाला,–"देवि, आज एक महाज्ञानी मजकडे आला व म्हणाला,–'राजन्, गुणवरा–देवीला कांहीं काल तळघरांत कोंडून ठेव, व तूं स्वतः ब्रह्मचारी होऊन रहा, नाहींतर तुझ्या राज्याचा नाश होईल. व तीही मरेल.' हें त्याचें वज्रपातासारखें भाषण ऐकून माझें चित्त अतिशय खिन्न झालें आहे."

राजाच्या तोंडचे ते शब्द कानीं पडतांच भय व प्रेम यांच्या योगानें विह्वल झालेली ती पतिव्रता म्हणाली–तर मग हे नाथ, मला आजच कां तळघरांत टाकीत नाहीं? माझ्या प्राणांचा व्यय होऊनही जर आपलें हित झालें, तरी मी आपल्याला धन्य समजेन; किंवा त्या ज्ञानी पुरुषाच्या सांगण्याप्रमाणें मला मरण आलें तरी चालेल; पण आपल्याला कोणत्याही प्रकारचें दुःख होऊं नये. कारण स्त्रियांना या लोकीं व परलोकींही पति हीच परम गति * आहे.

त्या साध्वीचे हे खऱ्या निर्धारानें उच्चारिलेले शब्द ऐकतांच राजाच्या डोळ्यांत पाणी आलें. 'ही साध्वी व तो सुरक्षित यांच्यामध्यें पापाचा लेशही नाहीं; कारण त्यांची अम्लान मुखकायाच त्यांचें निष्पापत्व सांगत आहे; तथापि या अपवादाला पूर्णपणें धुवून काढण्याकरितां मला कांहीं दिवस यांना दुःख दिलेंच पाहिजे. असा विचार करून राजानें त्या अंतःपुराच्या खालींच भूगृह करविलें, व त्यांत गुणवरेला टाकलें. शृंगभुज-राजपुत्राला जेव्हां तो घोर प्रकार कळला, तेव्हां त्या सत्पुत्रानें राजाला तसें करण्याचें कारण विचारिलें; पण त्यालाही वरील ज्ञानी पुरुषाची वार्ता सांगून राजानें शांत केलें. तळघरांत पडलेली गुणवराही पतीच्या हिताकडे दृष्टि देऊन, तेथेंच स्वर्गसुख मानून घेऊं लागली. कारण साध्वींना आपलें असें सुख नसतेंच; तर पतीचें जें सुख तेंच त्यांचें सुख.‡

---

* इहामुत्र च नारीणां परमा हि गतिः पतिः।

‡ स्वसुखं नास्ति साध्वीनां तासां भर्तृसुखं सुखम्।

असो; इतकें वर्तमान झालें असतां, अयशोलेखा राणी आपल्या निर्वासभुज नांवाच्या पुत्रास म्हणाली,–" पुत्रा, राजानें आमच्या गुणवरा सवतीला तर अंधारकोठडींत टाकलेंच आहे. आतां तिचा पुत्रही जर येथून निघून जाईल तर फारच चांगलें होईल. यास्तव बाळा, तूं आपल्या इतर सावत्र भावांशी एकमत करून तो तेथून निघून जाईल, अशी कांहीं युक्ति योज."–आईचें हे सकृद्दर्शनी फार हितकर वाटणारें बोलणें ऐकून निर्वासभुजाच्या मनांतही मत्सराग्नि पेटला, व भ्रात्यांना आपल्या कटांत घेऊन तो अनुकूल युक्ति व वेळ यांचे चिंतन करीत राहिला.

## २. शृंगभुज व रूपशिखा यांची कथा.

एकदां महास्त्रांचा प्रयोग करीत असलेले ते सर्व राजपुत्र, राजमंदिराच्या शिखरावर बसलेल्या एका धिप्पाड शरीराच्या बगळ्यास पाहून विस्मित झाले; पण इतक्यांत त्या मार्गानें येणाऱ्या एका भिक्षूनें त्यांस म्हटले–"राजपुत्रांनो, हा खरा बगळा नव्हे, तर या विक्राळ रूपानें नगराचा नाश करीत फिरणारा, हा अग्निशिख नांवाचा राक्षस आहे. यास्तव याच्यावर बाण टाका. म्हणजे हा त्यायोगानें पीडित होऊन येथून निघून जाईल "–भिक्षूचें तें हितकर वचन ऐकून नव्याण्णव राजपुत्रांनीही त्याच्यावर बाण टाकले; पण त्यांतील एकाचाही बाण त्याला लागला नाहीं. तें पाहून तो दिगंबर भिक्षु म्हणाला–" हा तुमचा कनिष्ठ भ्राता शृंगभुज या बकास मारण्यास समर्थ आहे, यास्तव त्याला हें धनुष्य द्या. "–तें ऐकतांच निर्वासभुजाला आपल्या आईच्या उपदेशाचें स्मरण झालें, व याला येथून घालवून देण्यास हा योग्य अवसर आहे, व या उपायानें त्याला घालवितांही येईल. असा मनांत विचार करून त्यानें इतर भ्रात्यांशीं असा संकेत केला कीं, याला आतां आपण बाबांचें धनुष्य व सुवर्णयुक्त बाण देऊं या. याचा बाण शरीरांत घुसला म्हणजे तो बक त्यासह उडून जाईल. तें पाहून आम्ही बाण शोधूं लागलों असतां, तोही त्याच्या मागें लागेल; पण तो राक्षस बक, याच्या हातीं मुळींच सांपडणार नाहीं. बाण घेतल्यावांचून परत येण्याचीही याला लाज वाटेल, व शेवटीं अशा युक्तीनें तो येथून कोठें तरी दूर जाऊन इतस्ततः भटकत राहील. याप्रमाणें संकेत करून त्या पाप्यांनीं त्याला वीरभुजाचें धनुष्य व बाण दिला. तेव्हां त्या महाबलाढ्यानेंही धनुष्य सज्ज करून, त्याची प्रत्यंचा आकर्ण

ओढून रत्नजडित बाण त्या बकावर सोडला. तो त्याच्या शरीरांत शिरून बसला, व त्यामुळें तो बगळा बाणासहवर्तमान उडून गेला. त्याच्या अंगांतून रक्ताची धार पडत असल्यामुळें, तो कोणत्या मार्गानें गेला हें सहज समजण्यासारखें होतें. असो; बगळा उडून गेला आहे, असें पहातांच शठ निर्वासभुज व त्यानें प्रेरणा केल्यामुळें त्याच्याच सारखें बोलणारे आणखी चौघेजण भ्राते शृंगभुजाला म्हणाले–"आमच्या बाबांचा सोन्याचा बाण दे, नाहींतर आम्ही आपले प्राण येथें तुझ्यासमोर देऊं; कारण तो बाण गेला असें कळतांच बाबा आम्हांला येथून घालवून देतील. त्या बाणासारखा दुसरा बाण करून देतां येणंही शक्य नाहीं."

तें त्यांचें मिथ्या व कपटी भाषण ऐकून धीर–शृंगभुज त्यांस म्हणाला– "तुम्ही स्वस्थ बसा, असे भिऊं नका. त्या अधम राक्षसाला मारून मी बाण घेऊन परत येतों."–इतकें सांगून शृंगभुजानें आपलें सशर धनुष्य घेतलें, व भूमीवर पडत गेलेल्या रक्तधारेला पहात तो त्या दुष्ट राक्षसाच्या मागून गेला. तें पाहून इतर भावांना मोठाच आनंद झाला, व ते आपल्या आईकडे जाऊन तो वृत्तान्त सांगूं लागले.

तिकडे शृंगभुज त्या अधम पक्ष्याच्या मागून, फार दूर असलेल्या एका मोठ्या अरण्यांत गेला. तेथें पुण्य-वृक्षाचें जणुं काय फलच, असें योग्य समयीं उपभोगाकरितां प्राप्त झालेलें एक नगर त्याला दिसलें. त्याच्या बाहेर एक रम्य उद्यान होतें. त्यांत जाऊन व एका वृक्षाखालीं बसून त्यानें थोडीशी विश्रांति घेतली. तों त्याला आपल्याकडे येत असलेली एक आश्चर्यरूप कन्या दिसली. विरहसमयीं जीविताचें हरण करणारी व संगमसमयीं जीवित देणारी, अशी ती रमणी विधात्यानें विष व अमृत या दोन्ही द्रव्यांनीं निर्मिली आहे, असें त्याला वाटलें. प्रेमाचा वर्षाव करणाऱ्या नेत्रांनीं पहात ती हळूहळू जवळ आली, असें पाहून राजपुत्र म्हणाला–"सुंदरि, या नगराचें नांव काय? हें कोणाचें आहे? तूं कोण व येथें कशी आलीस?"

आसक्त झालेल्या राजपुत्राचे हे प्रश्न ऐकून, जिनें आपली दृष्टि भूमीकडे लाविली आहे, अशी ती सुंदरी मधुर व स्निग्ध वाणीनें म्हणाली– "हें मधुपुर आहे. हें नगर सर्व संपत्तीचें घर आहे. यांत अग्निशिख या नांवाचा महाराक्षस रहातो. त्याची मी कन्या. माझें नांव रूपशिखा.

येथें आलेल्या तुझें अलौकिक रूप पाहून, माझें मन तुजवर गेलें आहे. आतां तूं कोण आहेस व येथें कां आलास, तें मला सांग."- हें तिचें भाषण ऐकून शृंगभुजानें आपण कोण, कोणत्या राजाचा पुत्र, व बाणाकरितां येथें कसे आलों, तें सर्व वृत्त सांगितलें. तेव्हां आनंदित झालेली ती म्हणाली— तुजसारखा धनुर्धर या त्रिभुवनांत नाहीं. तूं माझ्या बकरूपी पित्याला ज्या सुवर्णाच्या बाणानें वेध केलास, तो बाण पोरबुद्धीनें मीं खेळण्याकरितां घेतला आहे. महादंष्ट्र मंत्र्यानें माझ्या बाबांना विशल्यकरणी नामक एका महा-औषधीनें आतांच बरें केलें आहे. तर आतां मी जातें व बाबांना विचारून तुला आपल्या अंतःपुरांत नेण्याकरितां येतें हे नाथ, तुम्हीच माझे प्राणप्रिय पति आहां. मीं हा देह आपल्याला समर्पण केला आहे.

असें सांगून व त्याला तेथेंच रहाण्याविषयीं प्रार्थना करून, रूपशिखा बापाजवळ गेली. व मोठया नम्रतेनें, पण लाजत म्हणाली,— बाबा, आपल्या या नगरोद्यानांत शृंगभुज या नांवाचा कोणी एक राजपुत्र आला आहे. रूप, कुल, शील, वय व गुण यांमध्यें त्याची बरोबरी करणारा पुरुष या जगांत असणें शक्य नाहीं. हा कोणी देवांशच अवतीर्ण झाला आहे, असें मला वाटतें. तो अनुरूप वर जर मला न मिळेल, तर मी खचित प्राणत्याग करीन. रूपशिखेचें तें भाषण ऐकून राक्षस तिला म्हणाला—पुत्रि, मानुष-प्राणी आमचें भक्ष्य आहे; पण त्यांतूनही तुझा आग्रहच असला, तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. जा त्याला येथें आणून मला दाखीव.

हें ऐकतांच रूपशिखा शृंगभुजाकडे आली, व त्याला सर्व वृत्तांत सांगून आपल्या घरीं घेऊन गेली. अग्निशिखानें त्या नम्र राजपुत्राला पाहिलें व त्याचा आदर करून तो म्हणाला,—"राजपुत्रा, माझ्या म्हणण्याचें जर तूं कधींही उल्लंघन न करशील, तर मी, ही आपली कन्या रूपाशिखा तुला देईन."—तें ऐकतांच 'बरें आहे. मी तुमच्या सांगण्याबाहेर वागणार नाहीं.' असें बोलून शृंगभुजानें राक्षसाचें म्हणणें मान्य केलें. तेव्हां संतुष्ट झालेला अग्निशिख म्हणाला,—' तर मग ऊठ, स्नान-गृहांत जाऊन तूं सत्वर स्नान करून ये.'—व ' रूपशिखे, तूंही जाऊन आपल्या सर्व भगिनींना घेऊन ये '—याप्रमाणें त्यानें त्या दोघांनाही आज्ञा केली. त्याबरोबर तीं दोघेंही

आज्ञेप्रमाणें करावयास निघाली. पित्याच्या नेत्रांपलीकडे गेल्यावर शहाणी रूपशिखा आपल्या प्रियाला म्हणाली-आर्यपुत्र, मला शंभर बहिणी आहेत. त्या सर्वजणी अविवाहित व माझ्याच सारख्या रूपवती आहेत. आमचीं वस्त्रें, आभरणें, व गळ्यांतील हार इत्यादि सर्व एकसारखें आहे. यास्तव आम्हां सर्वांना एकत्र जमवून हा माझा पिता, तुम्हांला मोह पाडण्या-करितां 'यांतील जी तुला आवडत असेल तिच्या गळ्यांत माळ घाल' असें सांगेल. मी त्याचा हा सर्व कपटाभिप्राय ओळखला आहे; कारण तसें जर नसतें तर सगळ्याजणींना एकत्र जमविण्याचें कांहींच कारण नव्हतें. हा माझा पिता अगदीं जड आहे. त्याला विवेकबुद्धि नाहीं. म्हणू-नच ता माझ्याशींही कपट करीत आहे. याचा स्वभावसिद्ध गुण जाणार कसा? असो; पण मी एक युक्ति योजणार आहें. ती अशी की, आपल्या त्यानें माळ दिली म्हणजे मी आपला हा हार गळ्यांतून काढून डोक्यावर ठेवीन. तें पाहून तुम्हां ती माळ माझ्याच गळ्यांत घाला. तुम्हांला फसविण्याकरितां तो आणखीही पुष्कळ गोष्टी सांगेल; पण त्याच्या तोंडा-पुरतें होय होय म्हणून तुम्हीं तें सर्व मला सांगत चला.

इतकें सांगून रूपशिखा आपल्या बहिणीकडे गेली, व 'बरें आहे' असें म्हणून शृंगभुज स्नानगृहांत गेला. तेथें चेटींनीं त्याला अभ्यंग स्नान घातलें. नंतर तो राजपुत्र अग्निशिखाकड आला. तों रूपशिखेनें आपल्या शंभर बहिणींनाही तेथें आणिलें. शृंगभुज आला आहे, असें पहातांच राक्षसानें त्याच्या हातांत पायापर्यंत लोंबणारी माळ देऊन 'यांतील जी तुला इष्ट असेल तिच्या गळ्यांत ही घाल' असें म्हटलें,-तेव्हां राजपुत्रानें पूर्व संकेताप्रमाणें जिनें आपल्या डोक्यावर हाराचा सर ठेविला आहे, अशा रूपशिखेच्या गळ्यांतच ती माळ घातली. याप्रमाणें प्रिय रूपशिखेलाच त्याचा लाभ झाला. तेव्हां उद्यां सकाळीं मी तुमचा विवाह मंगल-विधि करीन, असें बोलून अग्निशिखानें इतर कन्यांना व त्या दोघांनाही जावयास सांगितलें. कांहीं वेळानें शृंगभुजाला पुनः बोलावून तो राक्षस म्हणाला-मानवा, हा दोन बैलांचा नागर घेऊन तूं नगराबाहेर जा, व जमिन नांगरून, तेथें रास घालून ठेवलेल्या तिळांतील शंभर मण तिळ पेरून ये. तें ऐकतांच 'बरें आहे' असें म्हणून तो आपल्या प्रियेकडे आला, व विह्वल होऊन तिला तें सांगू

लागला. तेव्हां ती म्हणाली, 'आर्यपुत्र, आपण कांहीं चिंता करूं नका. दोन बैल घेऊन तेथं जा. मी आपल्या मायेनें तें दुर्घट कर्मही करून दाखवीन.' असें सांगून तिनें त्याला नगराबाहेर पाठविलें. राजपुत्रानेंही तेथील ती खडकाळ जमीन व ती तिळांची पर्वतप्राय रास पाहिली, आणि मोठ्या दुःखानें नांगरण्यास व पेरण्यास आरंभ केला; पण दैव अत्यंत अनुकूल असल्यास जसें एकादें दुर्घट कर्मही अनायासानें तडीस जातें, त्याप्रमाणें ती भूमि आपोआप चांगली नांगरलेली व पेरलेली आहे असें त्याला दिसलें. त्यामुळें त्याचें मन आश्चर्यचकित झालें. लागलीच भावी सासऱ्याकडे जाऊन 'आज्ञेप्रमाणें केलें आहे' असें त्यानें त्याला कळविलें.

पण तो ठग राक्षस पुनः त्याला म्हणाला—ते पेरलेले तिळ माझ्या कांहीं कामाचे नाहीत. तूं त्यांना पुनरपि गोळा करून होता तसा ढीग करून ठेव. तें ऐकतांच 'बरें आहे' असें सांगून तो रूपशिखेकडे आला, व तिला तें कळतांच तिनें आपल्या मायेनें त्या शेतांत असंख्य मुंग्या उत्पन्न करून, त्यांच्याकडून हाहा म्हणतां तिळ गोळा करविले. शृंगभुजानेंही तो चमत्कार पाहून अग्निशिखाला 'आज्ञेप्रमाणें तिळांची रास केली आहे,' असें येऊन सांगितलें. तेव्हां तो धूर्त शठ राक्षस त्याला पुनः म्हणाला शृंगभुजा, या दक्षिण दिशेंत येथून आठ कोसांवर अरण्यांत एक सूना शिवालय आहे, त्यांत धूमशिख या नांवाचा माझा प्रिय भ्राता रहातो. तेथें जाऊन व त्या देवालयासमोर उभा राहून 'धूमशिखा, सर्व परिवारासह तुला बोलावण्याकरितां तुझ्या अग्निशिखभ्रात्यानें मला तुजकडे दूतरूपानें पाठविलें आहे, तर लवकरच चल. उद्यां सकाळीं रूपशिखेचा विवाहोत्सव व्हावयाचा आहे', असें सांग व आजच्या आज परत ये.

स्त्रीलोभांत पडल्यामुळें त्यानें 'बरें आहे' असें म्हटलें, व तत्काल प्रियेला तें कळविलें. तेव्हां त्या साध्वीनें माती, पाणी, कांटे व अग्नि इतकी सामग्री व आपला चपल घोडा त्याला दिला. आणि म्हटलें, "शंकरास नमस्कार करून या घोड्यावर बसा, व बाबांचा निरोप त्याला सांगून तत्काल तेथून वेगानें निघा. घोडा भरधांव चालत असला, तरी वारंवार मागें वळून पहात रहा. मागून तो येत आहे असें जर वाटलें तर ही माती मागें फेंका. पण तिच्या योगानें त्याची गति कुंठित न झाल्यास

हें पाणी आपल्या पाठीमागें टाका. तो आपली पाठ सोडीत नाहीं असें दिसल्यास हे कांटे फेका. इतकें करूनही जर तो मागें लागलाच आहे, असें अनुभवास आलें तर अग्नीलाही आपल्या पाठीमागें फेंकून द्या, म्हणजे तुम्ही सुरक्षितपणें परत याल. मनांत भिऊं नका, अथवा कांहीं विकल्प आणूं नका. माझें विद्याबल किती आहे तें तर पहा."

प्रियेचें तें भाषण ऐकून शृंगभुज निर्भयपणें त्या अरण्यांत गेला. तें शून्य शिवालय दुरूनच दिसत असल्यामुळें तो एकदम त्याच्यापाशीं गेला. त्यांत महेशाची भव्य मूर्ति होती. तिच्या वाममार्गी गौरी, उजव्या मांडीवर विनायक व पुढें शुभ्र नंदी होता. त्यांत जाऊन 'शंभो, हर हर' असें मोठ्यानें म्हणून व घंटा वाजवून नमस्कार केल्यावर, जणुंकाय त्या भव्य मंदिरांतून तसाच निघालेल्या प्रतिध्वनि ऐकून, भ्यालेला तो राजपुत्र एकदम बाहेर येऊन घोड्यावर बसला, व अग्निशिखाचा निरोप धूमशिखास ओरडून सांगून त्यानें लागलीच घोड्याला टांच दिली. त्याबरोबर तो जातिवंत अश्व मनोवेगानें धावूं लागला. कांहीं वेळानें शृंगभुजानें मागें वळून पाहिलें, तो त्याला मागून येणारा धूमशिख दिसला. त्याबरोबर त्यानें ती माती आपल्या पाठीमागें फेंकली, तेव्हां एका क्षणांत तिचा मोठा पर्वत झाला पण कांहीं वेळानें तो जों; मागें पहातो, तों त्याचें उल्लंघन करून तो राक्षस आला आहे, असें राजपुत्राला दिसलें. म्हणून त्यानें आपल्या जवळचें पाणी मागें फेंकलें. त्याच्या योगानें तेथें एक मोठी नदी झाली. पण एकाद्या उद्योगशील पुरुषाप्रमाणें तो त्या नदीरूपी विघ्नांतूनही पार पडला. अद्यापि तो आपल्या मागें लागलाच आहे, असें पाहून शृंगभुजानें कांटे फेकले, त्यांच्या योगानें तेथें एक भयंकर कांटेरी–झाडांचें अरण्य झालें; पण तो अधम राक्षस त्यांतूनही निघून धांवत येत आहे, असें पाहून त्या रूपशिखेच्या प्रियानें आपल्या जवळचा प्राणरक्षणाचा अन्य उपायच असा अग्नि आपल्या मागें फेकला. त्याबरोबर तेथें भयंकर वणवा लागला. गवत, ओलीं–सुकीं झाडें, वेली, पानें, पशू, पक्षी इत्यादिकांची सरसकट होळी झाली. तें पहातांच मात्र धूमशिख घाबरला व रूपशिखेच्या मायेनें मोहित झालेल्या त्याला तमोगतीचें स्मरण झालें नाहीं, त्यामुळें तो खिन्न होऊन परत गेला.

आपल्या मागें लागलेला राक्षस परतून गेला आहे, असें पहातांच शृंगभुजाला मनांतल्यामनांत प्रियेच्या विद्यासामर्थ्याचें मोठें कौतुक वाटलें, व निर्भय झालेला तो तिची प्रशंसा करीत धूमपुरास सुखरूपपणें परत येऊन पोंचला. रूपशिखेला सर्व वर्तमान सांगून व तिला घोडा देऊन तो अग्निशिखाकडे गेला—पण; 'मी तुझ्या भ्रात्याला आमंत्रण देऊन आलों आहें.'—या त्याच्या सांगण्यावर राक्षसाचा प्रथम विश्वासच बसेना. म्हणून 'तेथील एकादी खूण सांग पाहूं' असें तो त्याला म्हणाला. तेव्हां शृंगभुजानें प्रत्यक्ष पाहिलेल्या मंदिराचें अगदीं यथार्थ वर्णन केलें. तें ऐकून विस्मित झालेला अग्निशिख 'माझा भ्राता याला खाऊन टाकावयास कसा समर्थ झाला नाहीं ? खरोखर हा कोणी देव आहे, मनुष्य नव्हे. माझ्या कन्येला हा अनुरूप वर आहे, असा विचार करूं लागला. नंतर कृतार्थ झालेल्या त्याला राक्षसानें आपल्या रूपशिखेकडे पाठविलें. तिचाच हा सर्व प्रभाव आहे हें त्याच्या लक्षांत आलें नाहीं. असो; याप्रमाणें तो शृंगभुज सासऱ्याच्या कचाट्यांतून सुटल्यामुळेंच विवाहाविषयीं अतिशय उत्सुक झाला, व रूपशिखेकडे जाऊन खान-पान झाल्यावर त्यानें आनंदानें तिच्या सहवर्तमान ती रात्र घालविली. प्रातःकालीं अग्निशिखानें स्वसिद्धीला उचित अशा ऋद्धीसह अग्नीसमक्ष यथाशास्त्र कन्यादान केलें राक्षसाची कन्या कोठें ? राजपुत्र कोठें व त्यांचा विवाह कोठें ? खरोखर प्राक्तन कर्मांची गति विचित्र आहे !*

त्या प्रिय राक्षसकन्येची प्राप्ति झाली असतां, राजपुत्र चिखलांतील कोमल कमलिनीपाशीं गेलेल्या राजहंसाप्रमाणें शोभूं लागला. तो केवल आपल्याच ठायीं स्थिरचित्त ठेवणाऱ्या रूपशिखेसह राक्षसी सिद्धीनें प्राप्त होणारे नाना प्रकारचे भोग भोगीत तेथेंच राहिला. पुढें कांहीं दिवस गेल्यावर तो आपल्या प्रियेला म्हणाला-सुंदरि, आपण वर्धमान पुरास जाऊंया चल. कारण ती आमची राजधानी आहे. माझ्या सापत्न भावांनीं मला त्यांतून घालवावें; हें मला सहन होत नाहीं. कारण माझ्या साऱख्यांना मान प्राणांसारखा प्रिय वाटत असतो.‡ यास्तव प्रिये, मजकरितां

* क्व राक्षससुता कुत्र राजपुत्रः क्व चैतयोः ।
विवाहो बत चित्रैव गतिः प्राक्तनकर्मणाम् ॥

‡ मानप्राणा हि मादृशाः ।

दुस्त्यज अशी ही आपली जन्मभूमि सोड. आपल्या पित्याला हें वर्तमान सांग, व त्याची आज्ञा घे आणि चल. माझा सोन्याचा बाणही मला परत दे.

आपल्या प्रियाचें तें म्हणणें ऐकून रूपशिखा बोलली, "आर्य पुत्र, आपण जी आज्ञा कराल ती मला मान्य आहे; कारण कोठली जन्मभूमि व स्वजन कोण! माझें तें सर्व आपणच आहांत. सुस्त्रियांना पतीवांचून अन्यगति नसते.* पण बाबांना हें सांगतां कामा नये. तो आम्हांला सोडणार नाहीं. यास्तव त्या क्रोधी राक्षसाला न कळवितांच येथून गेलें पाहिजे. माझ्या सेवकांच्या तोंडून ऐकल्यावर तो जर मागून आला, तर मी आपल्या विद्यासामर्थ्यानें त्याचें निवारण करीन."

हें तिचें भाषण ऐकून शृंगभुज अतिशय संतुष्ट झाला, व दुसऱ्याच दिवशीं तिनें मूल्यवान् रत्नें व त्याच्या पित्याचा बाण आणून दिला. तेव्हां तो राजपुत्र तिच्या सहवर्तमान तिच्याच शरवेग नांवाच्या घोड्यावर बसून व 'सहज उद्यानांत फिरावयास जात आहों,' असें तेथील सेवक वर्गास सांगून निघाला.

तीं दोघें पुष्कळ दूर निघून गेलीं असतां अग्निशिखाला तें समजलें. त्याबरोबर तो क्रोधानें लाल होऊन त्यांच्या मागोमाग निघाला. त्याच्या येण्याच्या वेगानें होणारा शब्द ऐकतांच रूपशिखा म्हणाली—"आर्यपुत्र, आम्हांला परत नेण्याकरितां बाबा येत आहे; पण मी आतां आपल्या विद्येनें त्याला कसें टकवितें तें तुम्ही येथें मुकाट्यानें बसून पहा. मी आपल्या घोड्या सह तुम्हांला आच्छादित करून सोडतें. म्हणजे तो तुम्हांस पाहूं शकणार नाहीं." इतकें बोलून ती घोड्यावरून उतरली. व तिनें मायेनें पुरुषवेष धारण केला. इतक्यांत एक गरीब लांकडे तोडणारा तेथें आला. त्याला पाहून 'अरे बाबा, तो पहा राक्षस येत आहे. आपली कुऱ्हाड मला दे व तूं येथेंच मुकाट्यानें उभा रहा. तो गेला म्हणजे तुझी कुऱ्हाड मी तुला परत देईन' असें ती म्हणाली, व त्याची ती कुऱ्हाड घेऊन लांकडें तोडूं लागली. तिच्या विद्येनें अदृश्य झालेला शृंगभुज विस्मित होऊन हें सर्व पहात होता. इतक्यांत अग्निशिख तेथें

* का जन्मभूः कः स्वजनः सर्वमेतद्भवान्मम ।
न पतिव्यतिरेकेण सुस्त्रीणामपरा गतिः ॥

आला, व आकाशांतून खालीं उतरून लांकडें तोडणाऱ्या तिला तो म्हणाला,—"कायरे बाबा या मार्गानें जाणारा एक तरुण पुरुष व एक स्त्री तुला भेटली काय?—" त्यावर जराशी खिन्न होऊन पुरुषवेषा रूपशिखा म्हणाली,—' नाहींरे माझ्या दादा, आम्ही कोणाला पाहिलें नाहीं. राक्षसांचा राजा अग्निशिख आज मेला. तेव्हां त्याला जाळण्या करितां आम्ही हीं लांकडें तोडीत आहों.'

हे तिचे शब्द कानीं पडतांच तो मूढबुद्धि राक्षस मनांत असा विचार करून म्हणाला—काय, मी मेलों! मग मला कन्येला घेऊन काय करावयाचें आहे? तर आतां अगोदर मी परत जाऊन आपल्या सेवकांना विचारतों.—असा विचार करून तो तेथून परतला व त्याची कन्या भर्त्यासह दंगत पुढें निघाली. पण सेवकांना विचारून त्यांनीं 'तुम्हीं जिवंतच आहां मेला नाहां' असें सांगितलें. तेव्हां आनंदित झालेला तो मूर्ख पुनः वेगानें परत आला. तथापि दुरूनच त्याचें आगमन ओळखून रूपशिखा घोड्यावरून खालीं उतरली. तिनें त्या दोघांना अदृश्य केलें, स्वतः पुरुषवेष घेतला व समोरून येणाऱ्या एका दूताच्या हातचा लेख घेऊन ती स्वतः दूत होऊन उभी राहिली. इतक्यांत तो मूढ आला, व पूर्वी प्रमाणेच प्रश्न करूं लागला. तेव्हां ती पुरुषरूपा कन्या धापा टाकीत त्याला म्हणाली,—"मी एका मोठ्या महत्त्वाच्या कामाकरितां सत्वर जात आहें, त्यामुळें मी कोणाला पाहिलें नाहीं अग्निशिखाला शत्रूंनीं संग्रामांत मारलें. त्याचे प्राण, धूमशिख भ्रात्याला बोलावून आणून आपलें राज्य त्याला देण्याकरितां, अगदीं कंठांत अडून राहिले आहेत. त्याकरितां हा त्याचा लेख घेऊन आम्ही दूत सत्वर धूमशिखाकडे जात आहों."

तें ऐकतांच तो मूर्ख पुनः घाबरला, व 'काय? मला शत्रूंनीं मारलें!' असें म्हणत तो त्या गोष्टीचा निर्णय करण्याकरितां आपल्या घरीं परत गेला. मारलें कोणाला व हा स्वस्थ असलेला कोण हें कांहीं त्या मूर्खाला कळलें नाहीं. खरोखर प्रजापतीची तामस मूढ सृष्टि विचित्र असते.† असो; घरीं येऊन चवकशी केल्यावर तें सर्व खोटें व लोकांस हास्यकारक वाटणारें आहे असें त्याला समजलें. पण कन्येच्या मोहानें श्रांत

† कोऽप्यहो तामसश्चित्रो मूढसर्गः प्रजापतेः

झालेला तो, तिला विसरला व पुनः परत आला नाहीं. इकडे रूपशिखेनेंही कृत्रिम वेष टाकून आपला स्वाभाविक स्त्रीवेष धारण केला, आणि ती आपल्या पतीबरोबर त्याच्या राजधानीस जाऊं लागली. साध्वी स्त्रिया पतिहितावांचून अन्य कांहीं जाणत नाहींत.*

असो, त्यानंतर शृंगभुज तिच्या सहवर्तमान त्या आश्चर्यकारक घोड्यावर बसून वर्धमान पुरास गेला. तो आपल्या पत्नीसह आला आहे, असें समजतांच वीरभुजाला मोठा आनंद झाला, व त्याचें अभिनंदन करण्याकरितां त्याला सामोरा गेला. भामेसह येणाऱ्या कृष्णाप्रमाणें शोभत असलेल्या त्या आपल्या सस्त्रीक पुत्राला पाहून नरेंद्र, आज आपल्याला नवी राज्यसंपत्ति मिळाली आहे, असें समजूं लागला. जवळ येतांच तो सत्पुत्र घोड्यावरून उतरला. त्यानें व त्याच्या भार्येनेंही राजाला वंदन केलें. तेव्हां वीरभुजानेंही त्याला उठवून घट्ट पोटाशीं धरिलें. फार दिवसांनीं भेटल्यामुळें राजाला प्रथम दर्शनीं आनंदाश्रूंनीं व्याकुल केलें. पण त्या गंभीर पुरुषानें अश्रू आंतल्याआंत जिरवून स्नुषेसह पुत्राला आपल्या राजभुवनांत नेलें. ‘ मुला, मला सांगितल्यावांचून तूं एकटाच कोठें गेला होतास ? असें राजानें विचारलें असतां, शृंगभुजानें पहिल्यापासून सर्व वृत्तांत ऐकून सांगितला, व निर्वासभुजादि भ्रात्यांस बोलावून राजासमक्ष त्यानें तो बाण त्यांस दिला. पण ते कौटिल्य कळल्यामुळें राजाला त्यांचा मोठा राग आला व तो आपल्याला एकच पुत्र झाला असें समजूं लागला.

## ३. गुणवरेची शुद्धि.

त्यानंतर त्या बुद्धिमान् राजानें स्वस्थपणें एकीकडे बसून असा विचार केला कीं, बाहेरून भाऊ हें रमणीय नांव धारण करून, आंतून शत्रूंहूनही अधिक द्वेष करणाऱ्या या पापी पुत्रांनीं माझ्या निरपराधी शृंगभुजाला येथून घालविण्याचा जसा प्रयत्न केला, तसाच यांच्या मातांनींही गुणवरेला नाहींशी करण्याकरितां तिच्यावर मिथ्या आरोप केलेला असावा. आतां उगीच उशीर लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आजच मी त्याचा निर्णय करतों. असा निश्चय करून त्यानें तो दिवस राज्यकार्यांत

* पतिहितादन्यत्साध्व्यो न जानते ।

घालविला, व रात्रीं अयशोलेखेकडे गेला. तेव्हां तिला मोठा आनंद झाला. राजानें तिला पुष्कळ मद्य पाजिलें, व सुरतक्रीडेनंतर ती थकून निजली असतां झोपेंत बडबडूं लागली: राजाला तिची परीक्षाच पहावयाची होती, त्यामुळें तो जागत होता. इतक्यांत ती हंसून म्हणाली, आम्हीं सर्वजणींनीं मिळून गुणवरेविषयीं जर असें खोटेंच कांहीं सांगितलें नसतें, तर आज हा राजा मजकडे आला असता का? हें तिचें बरळणें ऐकतांच राजाच्या मनाचा निश्चय झाला, व तो लागलाच तेथून निघाला.

आपल्या रहावयाच्या जागीं जातांच त्यानें कंचुकींना बोलाविलें व 'गुणवरेला भूगृहांतून काढून तिला स्नानादि घालून आतांच्या आतांच येथें घेऊन या. ज्ञान्यानें सांगितलेला काल निघून गेला आहे;' असें त्यांस सांगितलें. त्याबरोबर 'जी सरकार' असें म्हणून ते सर्व धांवत अंत:पुरांत गेले, व त्या देवीला तळघरांतून काढून, स्नान घालून व भूषणें धारण करवून त्यांनीं सत्वर राजापाशीं आणलें. त्यानंतर विरह-सागराचें अनायासानें उल्लंघन झाल्यामुळें, अतिशय आनंदित झालेलीं तीं दोघें एकमेकांस वारंवार आलिंगन देऊनही तृप्त झालीं नाहींत. त्या दोघांनीं ती रात्र जागतच घालविली. राजानें शृंगभुजाचा वृत्तान्त तिला कळविला, व तो ऐकून सुन मुख पहावयास उत्सुक झालेल्या देववरेला परम आनंद झाला. तिकडे अयशोलेखा जागी झाली, व राजा तेथें नाहीं असें पाहून तिच्या मनाला फार दु:ख वाटलें.

प्रात:कालीं राजानें शृंगभुजाला आणून त्याच्या आईला भेटविलें. तळघरांतून निघालेल्या मातेचें दर्शन घेतांच त्या सत्पुत्राला परम आनंद वाटला. नूतन स्त्रीसह त्यानें आपल्या आईबापांचे चरण धरले. तेव्हां आपला पुत्रही आपल्या प्रमाणेंच घोर आपत्तींतून सुटला आहे, असें पाहून तिनें उत्सवांच्या परंपरेचा अनुभव घेतला. त्यानंतर पूज्य पित्याच्या आज्ञेनें शृंगभुजानें आपला सविस्तर वृत्तान्त व रूपशिखेनें केलेले उपकार यांचें सविस्तर वर्णन केलें. तें ऐकून गुणवरा म्हणाली—बाळा, आपलें जीवित, आप्त व देश या तिन्ही प्रिय वस्तूंचा त्याग करून, या रूपशिखेनें तुझ्या त्या तिन्ही वस्तू तुला परत दिल्या आहेत. तेव्हां तिच्या उपकारांची गणना संख्येनें कशी करतां येईल? खरोखर हिचें

चरित्र फार चमत्कारिक आहे. विधिवशात् तुझ्यासाठीं ही कोणी देवीच उत्पन्न झाली आहे. सर्व पतिव्रतांमध्यें ही मुख्य होऊन राहिली आहे.

गुणवरा असें सत्य भाषण बोलत असतांना, राजाही तिचें अभिनंदन करूं लागला, व त्यामुळें रूपशिखेचें मस्तक विनयानें नम्र झालें.

इतक्यांत अयशोलेखेनें मिथ्या आरोप केल्यामुळें, राजानें तीर्थयात्रा करण्याकरितां घालविलेला सुरक्षित सर्व तीर्थें करून परत आला. द्वारपालानें राजाज्ञेनें त्याला आंत आणलें. तेव्हां तो अंतःपुराचा अध्यक्ष राजाच्या चरणावर मस्तक ठेवून अतिशय आनंदित झाला. तो अगदीं शुद्ध आहे अशा विषयीं राजाचा निश्चय अगोदरच झालेला असल्यामुळें त्याचें अभिनंदन केलें, व त्या दुष्ट राण्यांस त्याच्याच कडून तेथें आणविलें, व 'या सर्व जणींना तळ घरांत कोंडून टेव' अशी राजानें आज्ञा केली. ती कानीं पडतांच त्या नव्याण्णवही राण्या भयानें कांपूं लागल्या. तेव्हां गुणवरेला त्यांची मोठी दया आली. तिनें हात जोडून पडून म्हटलें,–"देव, आपण मलाच आणखी पाहिजे तितके दिवस तळघरांत ठेवा; पण कृपा करून अगोदरच भयभीत झालेल्या यांनां त्या दुःखांत पाडूं नका. कारण यांचें दुःख माझ्यानें पहावत नाहीं."–याप्रमाणें अति नम्रपणें राजाची प्रार्थना करून, देववरेनें आपल्या सवतींना दुःखांतून सोडविलें. महात्म्यांची दयाच त्यांच्या शत्रूंचा प्रतीकार करिते.* असो; त्यानंतर 'चला जा येथून' असें राजानें तिरस्कारानें सांगितलें असतां, त्या सर्व जणी लज्जित होऊन आपापल्या अंतःपुरांत परत गेल्या. त्या दिवसापासून राजा त्या आपल्या महा उदार गुणवरेला अतिशय मान देऊं लागला. त्या पत्नीच्या योगानें आपला उद्धार झाला आहे असें त्याला वाटलें.

त्यानंतर राजानें आपल्या निर्वासभुजादिक-पुत्रांस तेथें बोलाविलें, आणि तिरस्कानें तो त्यांस म्हणाला,–"तुम्ही पाप्यांनीं एका वैश्य वाटसरूची हिंसा केली आहे, यास्तव तो दोष घालविण्याकरितां तीर्थयात्रा करावयास जा."–राजाची ती आज्ञा ऐकून त्यांतील एकही कांहीं बोलूं शकला नाहीं. कारण प्रभु बलात्कार करावयासच प्रवृत्त झाल्यावर त्याला कोणी कितीही जरी सांगितलें, तरी त्याचा काय उपयोग होणार आहे.‡

* महतामनुकम्पा हि विरुद्धेषु प्रतिक्रिया ।

‡ प्रभौ हठप्रवृत्ते हि कस्य प्रत्यायना भवेत् ।

राजाज्ञेप्रमाणें ते जावयास तयार झाले आहेत, असें पाहून कृपेनें ज्याच्या नेत्रांत अश्रू आले आहेत, असा शृंगभुज आपल्या पित्याच्या पांया पडून म्हणाला,-" बाबा, यांचा एवढा हा अपराध सहन करा. त्यांना मजकरितां एकदां क्षमा करा. "-आपल्या लाडक्या व गुणी पुत्राचें तें म्हणणें वीरभुजाला मोडवेना. यश व दया यांनीं युक्त व राजभार सहन करण्यास समर्थ असलेला तो शृंगभुज, यशोदापुत्राप्रमाणें साक्षात् हरीचाच अवतार आहे, असें वीरभुजाला वाटलें. त्यानें त्यांस क्षमा केली. शृंगभुजाचे भ्रातेही आज हाच आपला प्राणदाता झाला, असें मानूं लागले. त्याच्या अनेक उदार गुणांचा अनुभव आल्यामुळें प्रजाजनही त्याच्यावर प्रेम करूं लागले. नंतर सर्वांच्या संमतीनें राजानें वयानें ज्येष्ठ असलेल्या इतरांस सोडून, गुणांनीं ज्येष्ठ असलेल्या अशा त्या शृंगभुजास यौवराज्याभिषेक केला. त्यानंतर पित्याची आज्ञा घेऊन तो वीर चतुरंगसैन्यासह दिग्विजयास निघाला. कांहीं दिवसांनीं स्वभुजवीर्यानें जिंकलेल्या राजांच्या मंडलास बरोबर घेऊन व आपली यशःश्री सर्व दिशांत पसरून तो धन्य पुत्र परत आला. त्यानंतर नम्र भ्रात्यांसह राज्यभार वहात, निश्चिंत होऊन सुख भोगणाऱ्या कृतकृत्य मातापितरांस संतुष्ट करीत, व योग्य ब्राह्मणांस अनेक दानें देत, सुखी शृंगभुज, साक्षात् रूपसिद्धीप्रमाणेंच असलेल्या रूपशिखेसह मोठ्या आनंदानें काल घालवूं लागला.

सारांश, स्वामिन्, सासू गुणवरा व सून रूपशिखा यांच्याप्रमाणें ज्या साध्व्या असतात त्या अनन्य चित्तानें सार्वकाल पतीचीच सेवा करितात.

हरिशिखानें सांगितलेली ही कथा ऐकून राजपुत्र व गंधर्वकन्या 'फार उत्तम कथा सांगितलीस' असें म्हणत फारच संतुष्ट झालीं. नंतर तेथून उठून, आह्निकं कृत्यें आटोपून, वत्सेश्वराजवळ जाऊन, भार्येसह भोजन करून, गीत व वाद्य यांच्या योगानें, अपराह्ण काल तेथेंच घालवून सायंकालीं आपल्या अंतःपुरांत आल्यावर, त्यानें स्त्रियांसह ती रात्र सुखानें घालविली.

## तरंग ६ वा.

### १. मत्तमरुभूति व गोमुख यांचा कलह.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं रत्नप्रभेच्या येथें असलेल्या नरवाहन दत्ताकडे गोमुखादिक आले. मरुभूति जरा उशिरानें आला. तो त्यावेळीं थोडासा मत्त झाला होता. त्यानें आपल्या डोक्यावर पुष्पांची माळ बांधली होती, अंगाला उटी लावली होती, व पहांटे प्यालेल्या दारूची धुंदी उतरली नसल्यामळें, त्याचे पाय अडखळत होते. तें पाहून तेथल्या सर्वांना हंसूं आलें. त्याची ती अवस्था पाहून ज्याच्या तोंडावर हास्याची छाया आली आहे, असा गोमुख थट्टेनें त्याला म्हणाला–यौगंधरायणाचा पुत्र असून तूं नीति कशी जाणत नाहींस ? प्रातःकालीं मद्य पितोस व मत्त होऊन प्रभूकडे येतोस ! हें ऐकतांच तारवटलेला मरुभूति क्रोधानें म्हणाला,–" ही गोष्ट या माझ्या प्रभूनें अथवा गुरूनें सांगावी, हें बरें. इत्यर्क–द्वारपालाच्या पोरा, तूं मला शिकवणार कोण ?", तो रागानें व डोळे अधिकच लाल करून असें बोलत आहेसें पाहून गोमुख हंसत म्हणाला–प्रभू अनम्रांची निर्भर्त्सना आपल्या वाणीनें का करितात ? जें योग्य असेल तें त्यांच्या जवळच्या लोकांनींच सांगितलें पाहिजे अरे मी तर द्वारपालाचाच पोरगा आहें; पण तूं तरी मंत्रि–वृषभ ( मंत्री–बैल ) आहेसना ? तुझें जाड्यच तूं वृषभ आहेस केवल शिंगें मात्र नाहींत, असें सांगत आहे. गोमुखाचें हें भाषण ऐकून मरुभूति पुनः म्हणतो–बाबारे जो गोमुख गायीच्या तोंडाचा असेल, त्यालाच वृषभत्व शोभतें; पण तुझें दमन केलेलें नाहीं, याचें कारण हा तुझा जातिसंकर. म्हणजे तूं जर मनुष्यजातीशीं संकर पावला नसतास, तर तुला वृषभ समजून लोकांनीं तुझें दमन केलें असतें. मरूभूतीचें हें फार मार्मिक भाषण ऐकून सर्व लोक हसूं लागले. तेव्हां गोमुख म्हणाला–अहो, हा मरुभूति म्हणजे शेकडों यत्नांनींही ज्याला वेध करितां ( भोंक पाडतां ) येत नाहीं, असें एक वज्रासारखें रत्न आहे. तेव्हां त्यांत गुण ( दोरा ) कसा घालतां येणार ? कारण जें पुरुषरत्न असतें, त्याला भोंक पाडून त्यांत गुण सहज घालतां येतो, याविषयीं रेतीच्या पुलाचा वृत्तांत सांगतों, तो ऐका:—

## २. वाळूच्या सेतूचा वृत्तांत.

प्रतिष्ठानांत तपोदत्त म्हणून एक ब्राह्मण होता. बालपणीं त्याचा पिता त्याला पुष्कळ शिकवीत असे; पण तो कांहीं विद्याभ्यास करीना. पुढें तो मोठा झाला, व लोक त्या अविद्वानाचा तिरस्कार आणि निंदा करूं लागले. तेव्हां विद्यासिद्धीकरितां गंगेच्या कांठीं जाऊन तो मूर्ख तप करूं लागला; पण व्यर्थ उग्र तप करीत असलेल्या त्या तपोदत्ताचें निवारण करण्याच्या उद्देशानें, इंद्र ब्राह्मणरूपानें त्याच्यापाशीं आला, व त्याच्या समक्ष गंगेच्या तीरावरील वाळू आपल्या मुठींनीं घेऊन गंगेच्या प्रवाहांत वारंवार टाकूं लागला. बराच वेळ चाललेला तो त्याचा प्रयत्न पाहून, विस्मित होऊन तपोदत्तानें मौन सोडलें, व 'हें तूं काय आरंभलें आहेस बाबा!' असें तो त्या ब्राह्मणरूपी इंद्रास विचारूं लागला. तो तपस्वी मोठ्या कौतुकानें व आग्रहानें विचारीत आहे असें पाहून, इंद्र म्हणाला,-" लोकांच्या सुखाकरितां मी गंगेवर पूल बांधीत आहें."

तेव्हां तपोदत्त हंसून म्हणाला-अहारे मूर्खा, प्रवाहाबरोबर वहात जाणाऱ्या वाळूचा सेतु कधीं तरी होईल का ?-तें त्याचें युक्त वचन ऐकून ब्राह्मणरूपी इंद्र म्हणाला-हें जर तूं जाणत आहेस, तर गुरूचा उपदेश व स्वत:चें पठन यावांचूनच नुसतीं व्रतें, उपवास इत्यादि प्रकारच्या तपानें तूं विद्या प्राप्त करून घेण्यास कसा उद्युक्त झाला आहेस ? बाबारे, अध्ययनावांचून विद्या संपादन करण्याची इच्छा करणें, म्हणजे एकही अक्षर न काढतां मोठमोठे ग्रंथ रचण्याची, आकाशांत चित्र काढण्याची, अथवा सशाचें शिंग मिळविण्याची इच्छा करण्यासारखेंच आहे. कारण विद्या जर अशी सुलभ असती, तर कोणीं कधीं अध्ययनच केलें नसतें. ब्राह्मणरूपी इंद्रानें असा सदुपदेश केला, तो तपोदत्तालाही विचाराअंतीं खरा वाटला व तप सोडून तो आपल्या घरीं गेला.

तात्पर्य, याप्रमाणें जो सुबुद्धिमान् असतो, त्याला अनायासानें बोध करतां येतो. हा मरुभूति दुर्मति आहे. यास्तव याला बोध करितां येणें शक्य नाहीं. बोध करूं लागलें असतां त्याला उलट क्रोधच येणार.

## ३. विरूपशर्म्याची कथा.

गोमुख इतकें सांगत आहे, तोंच हरिशिख मध्येंच म्हणाला-देव, खरें आहे. बुद्धिमानांस अनायासानें बोध करितां येतो. पूर्वी वाराणसींत विरूप-

शर्मा या नांवाचा एक विरूप व निर्धन ब्राह्मण होता. तो त्या दोन्ही वैगुण्यांमुळें अतिशय खिन्न होऊन, एका मोठया अरण्यांत गेला. व चांगलें रूप आणि पुष्कळ धन मिळावें, म्हणून तो तेथें उग्र तप करूं लागला. तेव्हां इंद्र एका कुरूप व रोगी कोल्ह्याचें रूप घेऊन त्याच्यापुढें आला. त्याच्या सर्व अंगावर माशा बसल्या होत्या. त्या दुर्लक्षण पशूस पहातांच विरूपशर्म्याच्या मनांत असा विचार आला कीं,–"अरेरे, पूर्वकर्मामुळें या संसारांत असलेही प्राणी निपजतात ना? विधात्यानें माझें शरीर यापेक्षां किती तरी चांगलें केलें आहे! तेव्हां मला त्याचे उपकारच मानले पाहिजेत. दैवलिखित भोगांचें उल्लंघन करण्यास कोण समर्थ आहे?"–असें म्हणून विरूपशर्मा प्राप्त झालेल्या स्थितींतच संतुष्ट होऊन आपल्या घरीं परत गेला.

तात्पर्य, हे देव! सुबुद्धिमान् पुरुषास अल्प यत्नानेंच बोध करितां येतो; पण ज्याच्या बुद्धींत विचार मुळींच नाहीं, त्याला मोठया संकटानेंही एकादी गोष्ट समजवितां येत नाहीं.*"

हरिशिखानें असें सांगितलें असतां, व गोमुखानें त्याला आपली संमति दिली असतां, मत्त व अतिशय रागावलेला मरुभूति, मी कोठें आहें, व काय करीत आहें, हेंही न जाणतां म्हणाला,–"अरे गोमुखा, तुमच्यासारख्यांचें बल वाणीमध्येंच असतें; बाहूंमध्यें नसतें. बाहुशाली पुरुषांनीं भित्र्या व निर्बल वाचालांशीं कलह करणें हें त्यांस लज्जावह आहे."–इतकें बोलून युद्धास सज्ज झालेल्या त्या यौगंधरायण–पुत्राचें निवारण व सांत्वन स्वतः नरवाहनदत्तानें केलें; व बालपणच्या खेळगड्यांवर प्रेम करणाऱ्या त्या युवराजानें त्याला आपल्या घरीं जावयास सांगितलें; त्यानंतर राजपुत्रानें तो दिवस आपल्या दिनकृत्यांतच घालविला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याचे सर्व मित्र पुनः आले. त्या वेळीं मरुभूतीची धुंदी उतरलेली असल्यामुळें, तो लज्जेनें अधोमुख होऊन राहिला. पण तें पहातांच रत्नप्रभा म्हणाली,–"आर्यपुत्र, आपल्याला हे असले उत्तम मंत्री मिळाल्यामुळें आपण मोठे पुण्यवान् आहांत, असेंच म्हणावें लागतें.

* इत्थं सुबुद्धिरल्पेन देव यत्नेन बोध्यते ।
न कृच्छ्रेणाऽपि महता निर्विचारमतिः पुनः ॥

हे सर्व शुद्धचित्त व बालपणापासून स्नेहपाशानें बद्ध झालेले आहेत. तसेंच ज्यांना आपल्यासारखा स्नेहपर प्रभु मिळाला आहे, असे हेही मोठे धन्य होत. तुम्ही सर्व एकमेकांच्या प्राक्तनकर्मांमुळेंच एकमेकांस लाधलों आहांत; यांत कांहीं संशय नाहीं."

राज्ञीचें हें सुखदायक भाषण ऐकून वसंतकाचा पुत्र तपंतक (नरवाहनदत्ताचा नर्मसचिव–विदूषक–खुषमस्कऱ्या ) म्हणाला,–"खरें आहे; देवि, अगदीं सत्य आहे. आमचा हा स्वामी पूर्वकर्मार्जितच आहे. सर्व कांहीं पूर्वकर्माप्रमाणेंच होत असतें. याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.

## ४. विनयशील राजा व वैद्य यांची कथा.

श्रीकंठनिलयांतील विलासपुर नगरांत विनयशील नांवाचा खरोखरच विनयानें शोभणारा असा एक राजा होता. त्याची कमलप्रभा म्हणून प्राणतुल्य–प्रिय पत्नी होती. तो तिच्या सहवर्तमान पुष्कळ दिवस केवल भोगांमध्येंच आसक्त होऊन राहिला होता. कांहीं दिवसांनीं त्याच्या सौंदर्याचें हरण करणारी वृद्धावस्था त्याला आली. त्यामुळें त्या राजाला फार दुःख झालें. 'दंव पडल्यावर म्लान होणाऱ्या कमलाप्रमाणें पिकून निस्तेज झालेलें हें तोंड मी आतां देवीला कसें दाखवूं ! अरेरे, धिक्कार असो, यापेक्षां मला मरण येईल तर बरें.' असें मनांत आणून त्यानें तरुणचंद्र नांवाच्या वैद्याला मोठ्या आदरानें म्हटलें,–"बाबा, तूं आमचा मोठा भक्त आहेस. नेहमीं आम्हांला कुशलप्रश्न करीत असतोस. आम्हींही आपल्या शारीरिक व्याधि तुला सांगत असतों, व तूं मोठा कुशल वैद्य आहेस. म्हणून विचारतों, कीं माझ्या या जरेचें निवारण होईल अशी कांहीं युक्ति आहे का ?"

राजाचा हा प्रश्न ऐकतांच शुक्ल द्वितीयेच्या खऱ्या तरुणचंद्राप्रमाणें कला हेंच ज्याचें सार ( अवशिष्ट भाग अथवा बल ) आहे, व जो स्वभावतःच वक्र आहे, असा पूर्ण होण्याची इच्छा करणारा, तो तरुणचंद्र आपल्या मनांत म्हणाला कीं,–"हा राजा मूर्ख आहे. तेव्हां याला कांहीं तरी सांगून आपली चंगळ करून घेतली पाहिजे."–नंतर तो उघड म्हणाला–देव, आपण तळघरांत एकटे राहून जर आठ महिने औषध घ्याल, तर आपली जरा जाईल व तारुण्य प्राप्त होईल.

वैद्याचें हें सांगणें मान्य करून राजानें लागलेंच तळघर करविलें. विषयासक्त मूर्ख प्राणी विचार करण्यास समर्थ नसतात.$ राजा विचारहीन होऊन ह्या लबाड वैद्याचे नादीं लागला आहे व कांहीं तरी करीत आहे असें पाहून त्याचे मंत्री म्हणाले–'राजन्, पूर्वीच्या लोकांचें सत्त्व, तप, दम व युग-प्रभाव यांच्या योगानें रसायनें सिद्ध होत असत. हल्लींचे वैद्य, ग्रंथामध्यें जशी कृति सांगितलेली असते, तशींच तीं तयार करितात; पण त्यांना वरील चार गोष्टींची अनुकूलता नसल्यामुळें त्यांच्यामध्यें बदल पडतो. यास्तव प्रभो, आपण त्या धूर्ताच्या नादीं लागूं नका. गेलेलें वय पुन: परत का येणार आहे ?'‡–इत्यादि प्रकारें मंत्र्यांनीं राजास पुष्कळ उपदेश केला; पण गाढ भोगतृष्णेनें व्यापलेल्या राजाच्या हृदयांत त्याला अवकाशच मिळाला नाहीं. वैद्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून सर्व राजोचित सामग्रीचा त्याग करून, तो खुळा एकटाच तळघरांत गेला. तेथें वैद्य, आपल्या एका सेवकासह औषधोपचारादिकांच्या योगानें त्याची सेवा करीत असे. हृदयाच्या बाहेर पसरलेल्या अज्ञानांधकारांत जसे अविवेकी संसारी पडलेले असतात, त्याप्रमाणें तो राजा एकटाच कोठडींत पडला. याप्रमाणें सहा महिने लोटले; पण राजाची वृद्धावस्था थोडीसुद्धां न बदलतां ती प्रत्यहीं वाढतच आहे, असें पाहून त्या शठ-वैद्यानें अगदीं हुबेहुब राजाच्याच आकृतीचा एक तरुण पुरुष पाहिला. व 'तुला मी राजा करीन; पण माझ्या सांगण्याप्रमाणें तुला चाललें पाहिजे.' असें म्हणून त्यानें त्याच्याशीं संकेत केला. आणि एक भुयार खणून तें त्या तळघरापर्यंत आणलें. एके दिवशीं भरमध्यरात्रीं राजा गाढ निद्रेंत असतां, त्याला ठार मारलें व त्याचें शव त्या भुयारांतून बाहेर नेऊन, एका खोल विहिरींत टाकलें. नंतर भुयारांतूनच त्या तरुणाला आणून तळघरांत ठेविलें व भुयार बुजवून टाकलें. कारण मूर्ख-पुरुष पूर्णपणें हातांत सांपडले असतां, उच्छृंखल प्राकृत पुरुष कोणतें साहस करावयास भिईल !*

---

$ क्षमन्ते न विचारं हि मूर्खा विषयलोलुपाः ।

‡ किं देव समतिक्रान्तमागच्छति पुनर्वयः ॥

* संप्राप्य मूढबुद्धीनामवकाशं निरर्गलम् ।
उच्छृंखलमतिः कुर्यात्प्राकृतः किं न साहसम् ॥

असो; इतकें सर्व झाल्यावर दुसऱ्या दिवशीं वैद्य सर्व अमात्यांना म्हणाला,–" मी राजाला पहिल्याप्रमाणें तरुण केलें आहे, पहा. सहा महिन्यांत जरा पार नाहींशी झाली आहे. आणखी दोन महिन्यांनीं तो पुनः सुस्वरूप होऊन सभेंत येऊन बसूं लागेल."–इतकें बोलून त्यानें त्या सर्वांना दुरूनच राजाचें शरीर दाखविलें. ते गेल्यावर त्यांतील प्रत्येकाचें नांव व कर्म यांची त्या तरुणास वैद्यानें माहिती करून दिली. त्याचप्रमाणें अंतःपुरांतील स्त्रियांचींही नांवें, कुल, शील, त्यांचा स्वभाव व तेथील सेवक-वर्गाचीं नांवें इत्यादि सर्व त्यानें त्यास उत्तमप्रकारें शिकविलें. पुढच्या दोन महिन्यांत प्रत्यहीं तो हेंच मोठें काम करीत असे. आठ महिने लोटतांच त्या धूर्त वैद्यानें 'हा पहा तुमचा राजा' असें म्हणून त्याला तळ घरांतून बाहेर काढलें. तेव्हां तो चांगला पुष्ट व अगदीं तरुण झाला आहे, असें लोकांच्या नजरेस आलें. त्यानंतर स्नानादि केल्यावर तो पूर्वीप्रमाणें सर्व राज्य–कार्यें पाहूं लागला व मंदिरांत व्यवहार करूं लागला. त्यामुळें कोणाला त्याचा संशयही आला नाहीं. औषधाच्या प्रभावानें वृद्धत्व जाऊन, मोठ्या चमत्कारानें या राजाला तारुण्य आलें, असें जो तो समजूं लागला. राजानें आपलें पहिलें नांव सोडून 'अजर' असें दुसरें नवें नांव धारण केलें. तो अंतःपुरांतील स्त्रियांशीं निःशंकपणें पूर्वीप्रमाणें विलास करूं लागला. त्यामुळें राण्यांनाही त्याच्याविषयीं संशय आला नाहीं. रसायनाच्या प्रभावानें याच्या सामर्थ्यांत विलक्षण अंतर पडलें आहे, असें समजून त्या स्वस्थ राहिल्या. त्या राजानें आपल्या मंत्रिमंडळाशीं मोठ्या प्रेमानें व्यवहार चालविला. कमलप्रभेला पूर्वीप्रमाणेंच प्रसन्न ठेविलें. भेषजचंद्र व पद्मदर्शन या आपल्या मित्रांना त्यानें पुष्कळ देणग्या देऊन आपल्यासारखें सुखी केलें. तरुणचंद्राला राजवैद्य बनविलें; पण त्याच्यावर फारसा विश्वास न ठेवितां, तो आपल्या इच्छेप्रमाणें राज्य चालवूं लागला; कारण हा धूर्त वैद्य सत्यधर्मापासून च्युत झाला आहे, व त्यामुळेंच तो विश्वासपात्र नाहीं, असा त्याच्या मनाचा दृढ ग्रह झाला होता.

पण तें त्या वैद्याला आवडलें नाहीं. एकदां तो त्याला एकांतांत म्हणाला,–" तूं मला न विचारतां पाहिजे तसा वागतोस, याचा अर्थ काय? मी तुला येथें राजा केलें आहे, हें विसरलास कीं काय?"–हें

त्याचें जरासें उद्धटपणाचें भाषण ऐकून, अजर राजा लागलाच त्यास म्हणाला,-"अरेरे, तूं फार मूर्ख आहेस. कोण कोणाचा कर्ता व कोण कोणाचा दाता बाबा! कोणी कोणाचा दाता नव्हे, व कोणी कोणाचा कर्ताही नव्हे. तर मित्रा, प्राक्तन कर्मच सर्व कांहीं करितें व देतें.‡ यास्तव तूं गर्व करूं नकोस. हें माझ्या तपःसिद्धीचेंच फल आहे. मी तुला लवकरच याचें प्रत्यक्ष प्रमाण दाखवीन."-राजाचें तें म्हणणें ध्यानांत घेऊन वैद्य भ्याल्यासारखा झाला, व मनांत म्हणाला-वाहवा! हा पहा कसा बदलला तो! आतां हा धीट मोठ्या ज्ञानाच्या गोष्टी सांगूं लागला आहे. स्वामीचें रहस्य जाणणें हेंच अनुजीवींचें मोठें स्नेहसाधन आहे; पण हा मनुष्य मोठा निःस्पृह आहे. मी जर याच्या विरुद्ध गेलों, तर हा माझें सर्व कृत्य बाहेर फोडावयास कमी करणार नाहीं. यास्तव कांहीं झालें तरी मला याच्या म्हणण्याप्रमाणेंच चाललें पाहिजे. शिवाय पाहूं या तर खरें, हा मला प्रत्यक्ष काय दाखविणार आहे तें.-अशाप्रकारें विचार करून वैद्य त्यावेळीं मुकाट्यानें स्वस्थ बसला.

दुसऱ्या दिवशीं अजर राजा सहज फिरावयाकरितां बाहेर निघाला. त्यावेळीं तरुणचंद्रादिकही त्याच्या बरोबर होते. फिरतां फिरतां तो नदीच्या तीरीं आला, तों प्रवाहांतून वहात येत असलेलीं पांच सोन्याचीं कमळें त्याला दिसलीं. त्या बरोबर भृत्यांकडून त्यानें तीं बाहेर काढविलीं, व तीं हातांत घेऊन आणि त्यांना चांगल्या रीतीनें पाहून जवळच असलेल्या तरुणचंद्राला तो म्हणाला,-" मित्रा, तूं या नदीकांठानें असाच वर जा, व हीं कमळें कोठें होतात तें पाहून ये. मला यांचें मोठें कौतुक वाटत आहे. यास्तव तूंच जा; दुसऱ्या कोणाला सांगून हें काम होणार नाहीं." याप्रमाणें राजानें आज्ञा केली असतां, बिचारा पराधीन असलेला वैद्य त्या नदीच्या कांठाकांठानेंच वर जाऊं लागला, व राजाही आपल्या नगरांत परत आला.

तरुणचंद्र वैद्य, जातां जातां त्याच नदीच्या कांठीं असलेल्या एका भव्य शिवमंदिरांस जाऊन पोंचला. त्या मंदिराच्या पुढें नदीच्या अगदीं कांठावर

‡ अहो मूर्खोऽसि कः कस्य कर्ता दाताऽपि वा पुमान् ।
प्राक्तनं कर्म हि सर्वे करोति च ददाति च ॥

एक मोठा वट वृक्ष असून, त्याच्यावर एक मनुष्याच्या शरीचा सांगाडा लोंबत आहे, असें त्याला दिसलें. पण चालून चालून थकल्यामुळें त्यानें देवालयांतील शीतल छायेंत थोडीशी विश्रांति घेऊन, नदीच्या थंड जलांत स्नान केलें. भगवान् शंकराची पूजा केली, आणि आतां पुढें काय करावें, असा जों तो विचार करीत आहे, तोंच आकाशांत एकाएकीं एक मोठा ढग उठला, व त्यानें वृष्टि केली. पण मेघाचे जे बिंदु त्या वटवृक्षावरील नर-अस्थिपंजरांत पडून त्यांतून पुन: नदीच्या पाण्यांत पडत होते, त्यांचींच तीं सुवर्ण कमळें होत होतीं, असें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें. तेव्हां तो म्हणाला,-"कायहो हें आश्चर्य! याचें कारण मी या निर्जन वनांत विचारूं तरी कोणाला? अथवा विधात्याच्या अनेक आश्चर्यमय सृष्टीचा पत्ता कोणाला लागणार? असो; सोन्याच्या कमलांचें हें उत्पत्तिस्थान तर मी पाहिलें, आतां हा सांगाडा मी या वृक्षशाखेवरून खालीं जलांत पाडवितों, म्हणजे आपल्या हातून हा मोठा धर्म घडेल. शिवाय कदाचित् याच्यांतून अनेक सुवर्ण कमळें निपजतील."-असा बराच वेळ विचार करून त्यानें तें मनुष्य शरीर खालीं पाडलें, व तो दिवस तेथेंच घालवून दुसऱ्या दिवशीं तो वैद्य आपल्या नगरास परत यावयास निघाला. कांहीं दिवसांनीं तो विलासपुरास सुखरूपपणें येऊन पोंचला. राजद्वारीं पोंचतांच द्वारपालानें राजाज्ञा घेऊन त्याला आंत सोडलें. तेव्हां प्रवासामुळें कृश झालेला तो वैद्य राजापाशीं गेला. त्याला पहातांच तेथील इतर सर्वांना बाहेर जावयास सांगून, राजा स्वत: त्याला म्हणाला,-" मित्रा, सुवर्णकमलांच्या उत्पत्तीचें स्थान तूं पाहिलेंस का? तें उत्तम क्षेत्र कसें होतें? वटवृक्षावर तूं जो अस्थिपंजर पाहिलास, तीच माझी पूर्व तनु होय. वर पाय व खालीं डोकें करून दीर्घ काल तप केल्यावर शुष्क झालेल्या त्या शरीराला मी तेथें सोडलें. तपश्चर्येच्या माहात्म्यामुळें त्या सांगाड्यांतून पडलेल्या मेघबिंदूंपासून नदीच्या जलांत सुवर्ण-कमलें होत होतीं. तूं माझा तो देह जलांत पाडविलास हें फार चांगलें झालें. तूं माझा मागच्या जन्मींचा मित्र आहेस. भेषजचंद्र व पद्मदर्शन हे माझे पूर्व-जन्मार्जित सुहृद् आहेत. तात्पर्य, हे मित्रा, पूर्व-तपाच्या माहात्म्यामुळें मला या जन्मीं मागचें ज्ञान व हें राज्य प्राप्त झालें आहे. युक्तीनें मी तें तुलाही प्रत्यक्ष दाखविलें. तूं तें शरीर जलांत पाडविलेंस, हें सर्व मला येथूनच कळलें,

व मी तुला येथें येतांच सांगितलें आहे. यास्तव सख्या, मी तुला राज्य दिलें, इत्यादि व्यर्थ अहंकार तूं करूं नकोस. आपल्या दुःखी चित्ताला स्वस्थ कर. प्राक्तन कर्मावांचून कोणी कोणाचा दाता नाहीं. गर्भाशयांत आल्या दिवसापासून प्राणी आपल्या पूर्वकर्मरूपी वृक्षाचें फल भोगीत असतो.†

राजानें केलेला हा उत्तम उपदेश ऐकून व तें सर्व खरें आहे, असा मनाचा दृढ निश्चय करून वैद्य पुनः कधीं असंतुष्ट झाला नाहीं; तर त्याच्या सेवेमध्येंच तल्लीन होऊन सुख भोगूं लागला. जातिस्मर ( पूर्व जन्मास स्मरणाऱ्या) राजा–अजरानेंही त्या वैद्यास उचित द्रव्य देऊन त्याचा चांगला सन्मान केला. व अंतःपुरवर्ग व सुहृद् यांच्यासह तो राजा, पुण्यप्रभावानें प्राप्त झालेल्या निष्कटंक पृथ्वीचें पालन करीत सुखानें राहूं लागला.

हे देव, याप्रमाणें या लोकांत सर्व प्राण्यांचें सर्व शुभाशुभ सदा प्राक्तन कर्माप्रमाणेंच होत असतें.‡ यास्तव आपणही आमचे पूर्वजन्मार्जित स्वामी आहां; कारण तसें जर नसतें, तर दुसरे इतके लोक असतांना आमच्यावरच आपण इतके प्रसन्न कां झाला असतां?'

असो; तपंतकाच्या तोंडून कांतेसह अशी अति रमणीय व विचित्र कथा ऐकल्यावर, नरवाहनदत्त स्नान करावयास उठला. स्नानानंतर माता व पिता यांच्या नेत्रांमध्यें वारंवार अमृतवृष्टि करणारा तो राजा त्यांच्यापाशीं गेला, व स्त्रिया आणि मंत्री यांसह भोजन करून त्यानें तो दिवस व ती रात्र सुखानें घालविली.

---

† विना हि प्राक्तनं कर्म न दाता कोऽपि कस्य चित् ।
आगर्भाज्जन्तुरश्नाति पूर्वकर्मतरोः फलम् ॥

‡ एवं भवति लोकेऽस्मिन्देव सर्वस्य सर्वदा ।
प्राक्कर्मोपार्जितं जन्तोः सर्वमेव शुभाशुभम् ॥

## तरंग ७ वा.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं नरवाहनदत्त रत्नप्रभेच्या अंत:पुरांत मित्रासह गोष्टी बोलत असतां, एकाएकीं त्याला बाहेर अंगणांत पुरुषाचा आक्रोश ऐकूं आला. तेव्हां 'हें काय आहे,' असें जों जवळचे लोक म्हणत आहेत, तोंच चेट्या धावून आल्या, व–'प्रभो हा धर्मगिरि कंचुकी ओरडत आहे. तीर्थयात्रेस गेलेला याचा भ्राता तीर्थाचे ठायींच मेला, पण त्याची वार्ता त्याच्या एका मूर्ख मित्रानें त्याला आतांच येथें येऊन सांगितली. त्यामुळें मी राजकुलांत आहें, याचेंही भान न राहून तो रडूं लागला होता; पण त्याला बाहेरच्या लोकांनीं आतां घरीं नेलें आहे',–असें म्हणाल्या. पण तें ऐकून युवराज दयेनें दु:खित झाला आहे, असें पाहून रत्नप्रभा खिन्न झाली व म्हणाली,–" अरे अरे, प्रिय बंधूच्या वियोगामुळें होणारें दु:ख अति असह्य असतें. हर हर! ! विधात्यानें या जगांतील लोकांना अजर व अमर कां नाहीं केलें !"

### १. नागार्जुनाची कथा.

राणीचे ते उद्गार कानीं पडतांच मरुभूति म्हणाला–' देवि मर्त्यामध्यें अजरत्व व अमरत्व कोठून असणार ? याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.–मागें चिरायुनामक नगरांत, चिरायु याच नांवाचा एक चिरायु (दीर्घायु) राजा होता. तो राजा सर्व संपत्तींचें जणुं काय घरच होतें. त्याचा नागार्जुन म्हणून एक ज्ञानी, दयालु व दानशील मंत्री होता. त्याला सर्व औषधींचें यथार्थ ज्ञान असून, त्यानें अनेक रसायनें सिद्ध केलीं होतीं, आणि त्यांच्या योगानें त्यानें आपल्याला व राजाला चिरायु केलें. एकदां त्या मंत्र्याचा सर्व पुत्रांत अतिशय आवडता असलेला पुत्र मेला, त्यामुळें नागार्जुनाला फार दु:ख झालें. त्यानें मनुष्यांच्या मरण-दु:खाची शांति व्हावी, म्हणून तप व दान यांच्या प्रभावानें अनेक विचित्र द्रव्यें जमविलीं, आणि त्यांतून अमृत काढलें; पण त्यांत एक द्रव्य मिळवावयाचें राहिलें होतें. त्याच्या योग्य कालाची तो महामंत्री वाट पहात होता. परंतु इतक्यांत इंद्राला तें वर्तमान समजलें. तेव्हां इतर देवांची संमति घेऊन त्यानें अश्विनीकुमारांस अशी आज्ञा केली कीं,–तुम्ही

भूलोकीं नागार्जुनाकडे जाऊन त्याला असें सांगा, कीं तूं मंत्री असूनहि हा काय अन्याय करीत आहेस ? तूं हल्लीं प्रजापतीला जिंकावयास तयार झाला आहेस कीं काय ? कारण त्यानें मर्त्यांस मरणधर्मयुक्त केलें आहे, व तूं अमृत-रसायन तयार करून त्यांस अमर करण्याची इच्छा करीत आहेस ! पण असें झाल्यावर देव व मानव यांमध्यें अंतर कोणतें रहाणार ? यज्ञकर्ते मानव व यज्ञभोक्ते देव यांचा अभाव झाल्यामुळें, जगन्मर्यादा तुटणार नाहीं का ? यास्तव आमच्या सांगण्यास मान देऊन तूं हा अमृतसाधनाचा नाद सोड; नाहींतर देव रागावून तुला खचित शाप देतील. ज्याच्या शोकानें तूं या अघटित कामांत प्रवृत्त झाला आहेस, तो हा तुझा पुत्र स्वर्गलोकीं सुखानें रहात आहे. असा निरोप सांगून इंद्रानें त्या दोघां स्वर्गांतील वैद्यांस भूलोकीं पाठविलें. तेव्हां तेही सत्वर नागार्जुनाकडे आले. त्यांस पहातांच मंत्री संतुष्ट झाला. त्यानें त्यांस अर्घ्य-पाद्य इत्यादि देऊन त्यांचें पूजन केलें. नंतर त्यांनीं नागार्जुनास इंद्राचा निरोप सांगितला. तो ऐकून -मंत्री मनांत म्हणाला,-"मी जर हें देवेंद्राचें म्हणणें अमान्य केलें, तर इतर देव तर दूरच राहिले; पण आतां अगोदर हे दोघे वैद्यच मला शाप देतील. यास्तव अमृताचा नाद सोडावा हें बरें. पूर्वसुकृत-कर्मांमुळें माझा पुत्र तर उत्तम गतीस प्राप्त झालाच आहे. आतां उगीच अधिक आशा करून उपयोगी नाहीं. असा पोक्त विचार करून नागार्जुन त्यांस म्हणाला,-"बरें आहे. तुमच्या आज्ञेप्रमाणें मी अमृताच्या प्रक्रियेला बंद ठेवितों. तुम्ही जर आणखी पांच दिवस आला नसतात, तर या लोकीं अमृत-रस सिद्ध होऊन सर्व पृथ्वी अमर झाली असती."-असें सांगून त्यांच्या समक्ष त्या मंत्र्यानें अगदीं तयार होत आलेला अमृतरस भूमींत पुरून टाकला, तें त्याचें कृत्य प्रत्यक्ष पाहून व त्याची अनुज्ञा घेऊन अश्विनीकुमार स्वस्थानीं गेले, व झालेला वृत्तांत इंद्राला सांगून सर्व देवांस त्यांनीं आनंदित केलें.

इतक्यांत इकडे नागार्जुनाच्या चिरायु-राजानें आपल्या जीवहर पुत्रास यौवराज्याभिषेक केला. तेव्हां राज्याभिषेकामुळें आनंदित झालेला पुत्र आपल्याला नमस्कार करण्याकरितां आला आहे, असें पाहून धनपरा राणी म्हणाली,-" बाळा, हें यौवराज्य मिळालें म्हणून व्यर्थ इतका आनंद कशाला मानतोस ? कारण हा मान तुला केवल कुलक्रमानें मिळाला

आहे, तपाच्या प्रभावानें नव्हे. तुझ्या पित्याचे अनेक पुत्र आजपर्यंत युवराज झाले; पण त्यांतील एकालाही राज्य मिळालें नाहीं. नागार्जुनानें कांहीं रसायन तयार करून राजाला दिलें आहे. त्यामुळें तो पुष्कळ दिवस जगला आहे. हल्लीं त्याचें वय आठशें वर्षांचें आहे. आणखी असे किती शेंकडे जातील याचा कांहीं नेम नाहीं."

आपल्या आईचें हें भाषण ऐकून जीवहर खिन्न झाला. पण त्याची दुःखी मुद्रा पाहून, धनपरा पुनः म्हणाली,—"वत्सा, तुला जर राज्य हवें असेल, तर मी सांगतें तशी युक्ति योज. तो ज्ञानी नागार्जुन प्रत्यहीं आह्निक कर्में आटोपल्यावर 'येथें कोण याचक आहे? मी कोणाला काय देऊं?' असा घोष करीतो, व त्यावेळीं जो जें मागतो तें त्याला तो देतो, आणि त्यानंतर भोजन करतो. यास्तव तूं तेथें जाऊन त्या वृद्ध मंत्र्याचें मस्तक माग. तो सत्यवक्ता आहे, त्यामुळें आपलें मस्तकही तो तोडून देईल. आणि या युक्तीनें तो मेला म्हणजे त्याच्या दुःखानें व्याकुल झालेला राजाही प्राण सोडील. अथवा निदान तो वनांत तरी निघून जाईल, मग तूं खरा राजा होशील. यावांचून दुसरा उपाय दिसत नाहीं."

आपल्या आईचें हें घोर भाषण ऐकूनही जीवहर राजपुत्र संतुष्ट झाला व 'ठीक आहे' असें म्हणून त्यानें त्याप्रमाणें करण्याचा निश्चय केला. अरेरे! राज्यलोभ मोठा दुःखकर आहे. तो बंधुप्रेमालाही विसरतो.†

दुसऱ्या दिवशीं भोजनाच्या वेळीं जीवहर गुप्तपणें मंत्र्याच्या येथें गेला. इतक्यांत नागार्जुनही आह्निक संपवून 'कोण याचक आहे?' इत्यादि विचारूं लागला. तेव्हां राजपुत्र आंत जाऊन—'मी याचक आहें, मला तुझें शिर दे!'—अशी याचना करूं लागला. तेव्हां 'वत्सा, मोठेंच आश्चर्य आहे.' तूं माझ्या मांस, हाडें, व केंस यांनीं भरलेल्या मस्तकाला घेऊन काय करणार? तुला त्याचा काय उपयोग होणार आहे? पण त्यांतूनही तुला तें हवेंच असेल, तर आपल्या खड्गानें तोडून घे.' असें बोलून त्यानें आपलें शरीर त्याला अर्पण केलें. राजपुत्रानेंही त्याच्या मानेवर तीक्ष्ण तरवारीचा वार केला; पण रसायनानें दृढ झालेल्या त्याच्या मानेवर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. युवराजाचीं पुष्कळ खड्गें

† कष्टो हि बान्धवस्नेहं राज्यलोभोऽतिवर्तते ।

तुटली. इतक्यांत हा वृत्तांत राजाला कळला. तेव्हां तोही तेथें धावून आला. त्यानें शिरोदान न देण्याविषयीं मंत्र्याला पुष्कळ आग्रह केला; पण राजाच्या म्हणण्यास मान न देतां नागार्जुन म्हणाला,–" राजन्, मी जातिस्मर आहें, मागच्या नव्याण्णव जन्मांत मी आपलें मस्तक दान दिलें आहे. हें माझें शंभरावें दान आहे, यास्तव आपण माझें निवारण करूं नका. कोणताही याचक माझ्या येथून आजपर्यंत विमुख गेलेला नाहीं. आतां मी या तुमच्या पुत्रालाही पूर्ण मनोरथ करून येथून पाठवितों. केवळ शेवटीं आपलें दर्शन व्हावें, म्हणून मी इतका उशीर लावला."–असें बोलून नागार्जुनानें आपल्या औषधालयांतून एक चूर्ण आणून तें जीवहराच्या तरवारीस फांसलें, व ' आतां तूं माझ्या मानेवर वार कर, ' असें म्हणून तो दानशूर हात जोडून भूमीवर बसला. तों देंठापासून जसें कमल खुडावें, त्याप्रमाणें युवराजानें त्याचें शिर उडविलें. त्याबरोबर तेथें मोठाच आक्रोश सुरू झाला, व राजाही जीव द्यावयास तयार झाला; पण इतक्यांत ' राजन्, असें अकार्य करूं नकोस. हा तुझा मित्र नागार्जुन मुक्त होऊन भगवान् बुद्धाच्या गतीस प्राप्त झाला आहे. यास्तव त्याच्या करितां शोक करूं नकोस.' अशी गंभीर आकाशवाणी झाली. ती ऐकून राजानें आपला मरणाचा निश्चय शिथिल केला, सर्वस्व दान दिलें, व तपस्या करण्याच्या इच्छेनें वनाचा मार्ग धरिला. पुढें कांहीं दिवसांनीं त्याला आत्मसाक्षात्कार होऊन तो मुक्त झाला.

त्याच्या मागें त्याचें राज्य जीवहराला मिळालें; पण थोडक्याच दिवसांत नागार्जुनाच्या पुत्रांनीं पित्याच्या वधाचा सूड घेण्याकरितां त्याच्या राज्यांत वैर उत्पन्न केलें व त्याला मारून टाकिलें. त्यामुळें पुत्रशोकानें त्याच्या आईचें हृदय विदीर्ण होऊन तीही मरण पावली. कारण क्षुद्रजनांच्या मार्गानें जाणारांचें कल्याण कसें होणार?* असो; त्यानंतर त्या मंत्रिपुत्रांनीं चिरायु राजाच्या दुसऱ्या राणीच्या ठायीं जन्मलेल्या शतायुनांवाच्या पुत्रास राज्यावर बसविलें.

तात्पर्य, याप्रमाणें नागार्जुनानें मर्त्यांच्या मृत्यूचा नाश करण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केला; पण देवतांना ती गोष्ट सहन झाली नाहीं. शेवटीं

* अनार्यजुष्टेन पथा प्रवृत्तानां शिवं कुतः ।

तोही मरण पावला. तस्मात् विधात्यानें केलेला हा जीव-लोक अनित्य आहे, व यांत अनेक अनिवार्य दुःखें आहेत. यास्तव कोणालाही शेंकडों यत्नांनीही त्याच्या ( विधात्याच्या ) इच्छेविरुद्ध कांहीं करतां येत नाहीं.‡

मरुभूति असें सांगून गप्प बसला असतां नरवाहनदत्त सचिवांसह तेथून उठला व त्यानें आपलें आह्निक नेहमीप्रमाणें संपविलें.

---

## तरंग ८ वा.

### नरवाहनदत्ताचें कर्पूरिकेकडे गमन.

दुसऱ्या दिवशीं 'मी शीघ्र परत येतों' असें सांगून व उत्कंठित झालेल्या रत्नप्रभा-प्रियेचें समाधान करून, नरवाहनदत्त आपल्या पित्याबरोबर अश्व, गज व मित्र इतक्या परिवारासह अरण्यांत मृगया करावयास गेला. तेथें त्या पिता-पुत्रांनीं, अनेक मत्त-गजांची गंडस्थलें विदारण करीत असतांना, ज्यांच्या नखांत गंडस्थलांतील मोत्यें अडकलीं आहेत, अशा भयंकर सिंहांस मारून भूमीवर लोळविलें. तेव्हां त्यांच्या नखांतून गळून पडलेल्या मोत्यांची जणुंकाय, पेरणीच केली. त्यांनीं बाणांच्या योगानें व्याघ्रांचे दांत तोडून भूमीवर पाडले. त्यामुळें ती ( भूमि ) अंकुर-युक्त असल्यासारखीच झाली. हरिणांच्या अंगांतून गळणाऱ्या रक्ताच्या योगानें, अरण्यभूमि जणुं काय, कोमल-पल्लवयुक्त असल्याचा भास होऊं लागला. ज्यांच्या अंगांत बुंध्यापर्यंत बाण शिरले आहेत, अशा रान-डुकरांच्या योगानें ती भूमि स्तबकयुक्त असल्याप्रमाणें दिसूं लागली. व मृत शरभांच्या शरीराच्या योगानें ती जणुं काय फलयुक्तच आहे, असा भास झाला. तात्पर्य, जिनें सर्व अरण्यास सुशोभित करून सोडलें आहे, अशी ती मृगयारूपी लता त्या युवराजाला फार प्रिय वाटली. अशाप्रकारें बराच वेळ शिकार करून थकल्यावर त्यानें थोडीशी विश्रांति घेतली, व एकट्या गोमुखाला मात्र बरोबर घेऊन,

‡ तस्माद्विधातृविहितोऽयमनित्य एव दुर्वारदुःखबहुलो ननु जीवलोकः ।
शक्यं न कर्तुमपि यत्नशतैस्तदत्र केनापि किंचिदपि नेच्छति यद्विधाता ॥

आणि घोड्यावर बसून तो दुसऱ्या अरण्यांत शिरला. तेथें तो, गोट्या फेंकून खेळूं लागला; पण इतक्यांत त्या मार्गानें एक तापसी आली. दैववशात् नरवाहनदत्तानें फेकलेली गोटी तिच्या मस्तकावर लागली. तथापि ती साध्वी रागावली नाहीं. उलट हंसून म्हणाली,–अरे राजपुत्रा, तुला जर आतांच इतका मद आहे, तर कदाचित् कर्पूरिका भार्या मिळाल्यास तुझी काय दशा होईल ?

तें ऐकतांच नरवाहनदत्त घोड्यावरून खालीं उतरला, व तापसीच्या चरणावर मस्तक ठेवून म्हणाला,–', भगवति, मला क्षमा कर. मी तुला पाहिलें नाहीं व त्यामुळें माझी गोटी तुला लागली. हा माझा मोठाच अपराध आहे, पण तूं तो सहन करण्यास समर्थ आहेस."–त्यावर ती क्षमाशील तापसी ' पुत्रा, मला कांहीं कोप आला नाहीं ' असें म्हणून व त्याला आशीर्वाद देऊन त्याचें सांत्वन करूं लागली. तें पाहून ही खरींच जितेंद्रिय व ज्ञानी तापसी आहे, असें जाणून तो तिला विनयानें म्हणाला,–" भगवति, तूं कर्पूरिका म्हणून जी म्हणालीस ती कोण ? तिच्याविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे, तर कृपा करून तिचा वृत्तांत तूं मला सांग."—

नरवाहनदत्ताची प्रार्थना ऐकून ती तापसी म्हणाली,–समुद्राच्या पलीकडे कर्पूरसंभव म्हणून एक पुर आहे. तेथें कर्पूरक म्हणून राजा असून, त्याची कर्पूरिका या नांवाची एक कन्या आहे, देवांनीं मंथन करून एका कमलेला काढून नेलें आहे, असें पाहून सागरानें ही दुसरी कमलाच जणुंकाय, त्या राजाच्या येथें सुरक्षणाकरितां ठेविली आहे. ती पुरुषांचा द्वेष करीत असते. ती विवाहाची मुळीं इच्छाच करीत नाहीं; पण तुला पाहिल्यावर तिचा तो सर्व मान डळमळेल. यास्तव पुत्रा, तूं जा. तुला ती प्राप्त होईल. या अरण्यांतून जातांना तुला मोठे क्लेश होतील, पण तूं त्यांना भिऊं नकोस; कारण त्याचा शेवट मोठा गोड होणार आहे. इतकें सांगून ती तापसी आकाशांत उडून गेली, व एका क्षणांत ती दिसेनाशी झाली. तिच्या त्या भाषणरूपी मदनाच्या आज्ञेनें नरवाहनदत्त परवश झाला, व जवळच असलेल्या गोमुखाला म्हणाला,–" मित्रा, चल. कर्पूरसंभव नगरांतील कर्पूरिकेकडे आपण जाऊं. तिला पाहिल्यावांचून माझ्यानें एक क्षणभरही रहावत नाहीं."—पण त्यावर गोमुख

म्हणाला,–देव, आपलें हें साहस पुरे झालें. आम्हीं कोठें, हें अरण्य कोठें, सागर कोठें, तें नगर कोठें, त्याला जावयाचा बिकट मार्ग कोठें व ती कन्या कोठें! केवल नांव ऐकतांच दोन दिव्य स्त्रिया असतांना त्यांना सोडून एकट्यानेंच, जिचा विवाह करण्याचा निश्चयही नाहीं, अशा मानुषी स्त्रीच्या मागें लागत जाणें योग्य नव्हे.

पण गोमुखाचें तें हितवचन युवराजाला पटलें नाहीं. तो म्हणाला, "सिद्धतापसीनें जें सांगितलें आहे, तें खोटें कधींही होणार नाहीं. यास्तव मी त्या राजकन्येला मिळविण्याकरितां अवश्य जाणार!"–इतकें बोलून घोड्यावर बसलेला नरवाहनदत्त तसाच निघाला. इच्छा नव्हती तरी गोमुख मुकाट्यानें त्याच्या मागून चालला; कारण प्रभूनें जरी आपलें हित-वचन ऐकलें नाहीं, तरी भृत्यांना त्याच्या म्हणण्याप्रमाणें चाललेंच पाहिजे.*

तिकडे वत्सेश्वरही मृगया संपवून आपल्या नगरीस परत गेला. त्याला वाटलें कीं, नरवाहनदत्त सैन्याबरोबर येत असेल. मरुभूति-प्रभृति त्याचे मित्रही आपला युवराज सैन्यामध्यें असेल, असें समजून परतले. सायंकालीं कौशांबीस परत आल्यावर तो नाहीं असें त्यांना कळलें. स्वतः वत्सराजानेंही पुष्कळ शोध केला; पण दुपारपासून त्याला पाहिल्याचें कोणीच सांगेना. तेव्हां वत्सराजादि सर्व मुख्य पुरुष रत्नप्रभेच्या अंतःपुरांत गेले. राजपुत्र आला नाहीं. असें जेव्हां तिला त्यांच्या तोंडून कळलें, तेव्हां ती साध्वी फार दुःखित झाली; पण तो कोठें आहे तें तरी कळावें म्हणून तिनें आपल्या विद्येचें ध्यान केलें. त्याबरोबर विद्येनें येऊन गुप्तपणें तिला पतीचा सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून रत्नप्रभा आपल्या दुःखी श्वशुराला म्हणाली–महाराज, वनांत अकस्मात् भेटलेल्या एका तापसीनें सांगितल्यावरून कर्पूरिका राजकन्येला मिळविण्याकरितां आर्यपुत्र कर्पूरसंभवपुरास गेले आहेत. सत्वरच इष्ट मनोरथ पूर्ण करून घेऊन गोमुखासह परत येतील. आपण निश्चित असा. मला हें माझ्या विद्येच्या योगानें कळलें आहे. असें सांगून तिनें त्या सर्वांचें सांत्वन केलें; आणि पतीला प्रवासांत क्लेश होऊं नयेत, म्हणून दुसऱ्या

* अकुर्वन्वचनं भृत्यैरनुगम्यः परं प्रभुः ।

एका विद्येला पतीकडे पाठविलें. पतीच्या हिताची इच्छा करणाऱ्या सुस्त्रिया सापत्नभावाला फारसें मोजीत नसतात.*

इतक्यांत इकडे घोड्यावर बसलेला नरवाहनदत्त गोमुखासह अरण्यांत फार दूर गेला, तों एकाएकीं मार्गात एक कुमारी त्याला दिसली. ती जवळ येऊन राजपुत्रास म्हणाली, 'महाराज, रत्नप्रभेनें पाठविलेली मी मायावती विद्या आहें, मी अदृश्य राहून मार्गामध्यें तुमचें रक्षण करीन, आतां तुम्ही खुशाल पुढें चला' असें साक्षात् सांगून ती विद्या गुप्त झाली. पण तिच्या प्रभावानें मार्गात त्याला क्षुधा व तृषा लागली नाहीं. त्यामुळें, तिसरी भार्या करावयास जात असतांनाही प्रेमानें साह्य करणाऱ्या रत्नप्रभेची तो स्तुति करूं लागला. असो; सायंकालीं ते दोघेही स्वच्छ जलानें तुडुंब भरलेल्या एका सरोवरावर जाऊन पोंचले. भयंकर अरण्यांत असलेल्या त्या तडागाच्या जलांत स्नान करून, त्यांनीं मधुर फलांचा आहार व अमृताप्रमाणें लागणाऱ्या जलाचें पान केलें. रात्रीं एका झाडाच्या बुंध्याशीं दोन्हीं घोड्यांना बांधून, व त्यांना गवत घालून ते दोघेही त्याच झाडावर चढून बसले. कांहीं वेळानें तेथेंच त्यांना झोंप लागली. पण मध्यरात्रीच्या सुमारास भ्यालेल्या घोड्याच्या ओरडण्यानें नरवाहनदत्त जागा झाला, व खालीं पहातो तों एक सिंह येत आहे, असें त्याला दिसलें. त्याबरोबर घोड्याचें संरक्षण करण्याकरितां तो खालीं उतरूं लागला; पण गोमुखानें "आपल्या देहाविषयीं इतकें निरपेक्ष होणें योग्य नव्हे; कारण राजाचें मूल शरीर आहे व राजतेचें मूल मंत्र† आहे. यास्तव नखें व दाढा हींच ज्यांचीं आयुधें आहेत, अशा पशूंशीं भिडणें चांगलें नव्हे. या शरीराच्या संरक्षणाकरितांच तर आम्ही झाडावर चढून बसलों आहों." असें सांगून त्याचें निवारण केलें; पण सिंह आपल्या समक्ष घोड्याला मारीत आहे, हें त्या शूराला पहावेना. त्यानें मोठ्या त्वेषानें आपली तरवार त्या हिंस्र पशूच्या अंगावर फेकली. ती त्याच्या शरीरांतच जोरानें शिरली, त्यामुळें सिंहाला मोठी पीडा झाली. परंतु तिला न जुमानतां त्यानें एका

* नेर्ष्यां भर्तृहितैषिण्यो गणयन्ति हि सुस्त्रियः ।

† शरीरमूला हि नृपा मन्त्रमूला च राजता ।

घोड्याला तर तत्काल मारलें, व तो दुसऱ्याच्याही अंगावर गेला. त्यालाही त्यानें भूमीवर लोळविलें; पण इतक्यांत वत्सेश्वर-पुत्रानें गोमुखाची तरवार मागून घेऊन, ती त्या पशुशत्रूवर इतक्या जोरानें व नेम धरून फेकली कीं, तिच्या योगानें त्याचे दोन तुकडे झाले. त्यामुळें दोघां घोड्यांच्या शरीराबरोबर तें तिसरें सिंहशरीरही निश्चेष्ट होऊन, भूमीवर पडलें. तें पाहून राजपुत्र झाडावरून खालीं उतरला, व सिंहाच्या शरीरांतील तीं दोन्हीं शस्त्रें उपटून घेऊन पुनः झाडावर येऊन बसला.

## २. इंदीवरसेन व अनिच्छासेन यांची उपकथा.

कांहीं वेळानें उजाडलें. तेव्हां खालीं उतरून तो गोमुखासह पायींच पुढें जाऊं लागला. मार्गानें जात असतांना त्याच्या चित्तविनोदाकरितां गोमुख पुढीलप्रमाणें एक प्रासंगिक कथा सांगूं लागला.—देव, अलकेहूनही उत्तम अशी एक ऐरावती नगरी आहे. त्यांत परित्यागसेन म्हणून एक राजा असून त्याच्या प्राण-प्रिय दोन भार्या होत्या. त्यांतील एक त्याच्या मंत्र्याचीच कन्या होती. तिचें नांव अधिकसंगमा. दुसरी काव्यालंकारा. ती मात्र राजवंशांत उत्पन्न झालेली होती; पण त्या राजाला पुत्र नव्हता. म्हणून त्यानें दोघां राण्यांसह अंबिकेची आराधना केली. कांहीं न खातां दर्भशय्येवर शयन करून तीं तिघेंजणें तप करूं लागलीं. कांहीं कालानें गौरी प्रसन्न झाली. तिनें स्वप्नांत राजाला दोन दिव्य फलें देऊन म्हटलें,—" राजन्, उठ. आपल्या स्त्रियांना हीं दोन्हीं फलें खावयास दे. म्हणजे तुला दोन महावीर पुत्र होतील."—इतकें सांगून गौरी गुप्त झाली असतां, राजा जागा झाला व हातांतील फलें पाहून आनंदित झाला. त्यानें आपल्या दोन्ही राण्यांना स्वप्नवृत्तांत सांगितला आणि स्नान व गौरीचें पूजन इत्यादि करून व्रतपारणा केली.

रात्रीं अगोदर अधिकसंगमा-राणीकडे जाऊन त्यानें एक फल तिला दिलें. तें तिनें खाल्लें. नंतर तिचा पिता म्हणजे आपला मुख्य मंत्री याच्या गौरवामुळें तो रात्रभर तिच्याच अंतःपुरांत राहिला. राजानें निजतांना दुसरें फल दुसऱ्या राणीकरितां आपल्या उशागतीं ठेवलें होतें; पण अधिकसंगमेनें त्याला झोंप लागली आहे, असें पाहून व दुसरा पुत्रही आपल्यालाच व्हावा अशी दुर्बुद्धि धारण करून, तें फलही तेथून

काढून घेऊन खाल्लें. खरोखर स्त्रियांचा सवतीमत्सर स्वभावसिद्धच असतो.†
सकाळीं राजा जागा झाला व तें फल शोधूं लागला. तेव्हां 'मीच तें खाल्लें' असें ती राणी सांगूं लागली. तें ऐकून परित्यागसेन मनांत फार खिन्न झाला व तेथून निघून गेला. दिवस कसा तरी घालवून रात्रीं तो गुणी राजा आपल्या दुसऱ्या राणीच्या अंतःपुरांत गेला. तेव्हां काव्यालंकारा दुसरें फल मागूं लागली. त्याबरोबर खिन्न झालेला राजा दुःखाचा मोठा उसासा टाकून म्हणाला,—"देवि, मी काल रात्रीं दुसरें फल उशागतीं ठेवून निजलों असतां, तुझ्या सवतीनें कपट करून तेंही खाऊन टाकलें."

तें ऐकून काव्यालंकारा मनांत अतिशय दुःखित झाली. पुत्रोत्पत्तीला कारण होणारें फल सवतीच्या कौटिल्यामुळें आपल्याला मात्र मिळालें नाहीं, असें वारंवार मनांत म्हणून ती त्यावेळीं राजाला कांहीं बोलली नाहीं. अगदीं मुकाट्यानें बसली. कांहीं दिवसांनीं अधिकसंगमा राणी गर्भवती झाली. योग्यसमयीं तिला दोन जुळे पुत्र झाले. त्यांच्या उत्पत्तीमुळें राजाचा मनोरथ पूर्ण झाला. त्यानें मोठ्या आनंदानें महोत्सव केला. त्यांतील ज्येष्ठ पुत्राचें नांव इंदीवरसेन व कनिष्ठाचें अनिच्छासेन ठेविलें; कारण पहिल्याचे नेत्र कमलासारखे होते, व दुसरा त्याच्या इच्छेविरुद्ध फल खाल्यामुळें झाला होता.

पण आपल्या सवतीचा तो उत्कर्ष काव्यालंकारेला सहन झाला नाहीं. 'या माझ्या सवतीनें मला पुत्र होऊं दिला नाहीं, तेव्हां मलाही ह्याचा सूड उगवला पाहिजे. मी युक्तीनें हिच्या या पुत्रांचा नाश करून टाकीन.' असा विचार करून तीही क्रोधयुक्त झालेली राणी, योग्य उपाय व अनुकूल काल, यांचा विचार करीत व वाट पहात राहिली. जसे जसे ते राजपुत्र मोठे होऊं लागले, तसा तसा हिच्या हृदयांतील वैरवृक्षही वाढत चालला. होतां होतां ते तरुण झाले; व त्या विजयेच्छूनें आपल्या पित्याची अशी प्रार्थना केली कीं,—बाबा, आम्ही अस्त्रविद्येंत निष्णात झालों आहों, व तारुण्यावस्थेसही प्राप्त झालों आहों, तेव्हां आतां आम्हाला दिग्विजयाची आज्ञा द्या.

शूर पुत्रांचें तें रम्य भाषण ऐकून परित्यागसेन फार संतुष्ट झाला. त्यानें त्यांस दिग्विजयास जाण्याची आज्ञा देऊन, सर्व तयारीही करून

† निसर्गसिद्धो नारीणां सपत्नीषु हि मत्सरः ।

दिली, व निघण्याच्या वेळीं त्यांना म्हटलें,—" बाळांनो, तुम्हांवर जर कधीं कांहीं संकट आलें, तर सर्वदुःखनाशक देवीचें स्मरण करा; कारण तिच्या प्रसादानेंच तुम्ही मला झाला आहां. "—इतकें सांगून राजानें सैन्य व सामंत राजे यांसह त्यांची रवानगी केली. प्रसंगीं त्यांस योग्य नीति शिकविण्याकरितां त्यांच्या मातामहास, म्हणजे आपल्या मुख्य मंत्र्या-सही त्यानें त्यांच्या मागून धाडलें. तेव्हां ते दोघे ससैन्य भ्राते प्रथम पूर्व दिशेस गेले. तेथें पुष्कळ पराक्रम दाखवून, त्यांनीं ती सर्व दिशा जिंकिली. तेथून ते अनेक राजांसह दक्षिण दिशेंत शिरले. त्यांच्या विजयाची वार्ता ऐकून त्यांची आई व राजा-परित्यागसेन यांस मोठा आनंद झाला, व काव्यालंकारेला आंतल्या आंत अतिशय वाईट वाटलें. तिच्या हृदयांत द्वेषाग्नीचा भडका उडाला. तिनें राजाच्या नांवाचा एक खोटाच लेख तयार केला.—'ह्या माझ्या दोघां पुत्रांनीं भुजदर्पानें सर्व पृथ्वी जिंकून, व मला मारून माझें राज्य घेण्याचा विचार केला आहे, यास्तव तुमचें जर मजवर अत्यंत प्रेम असेल, तर कांहीं एक विचार न करितां तुम्हीं माझ्या दोन्ही पुत्रांना मारून टाका.'—असें त्यांच्या बरोबर गेलेल्या सैन्यांतील सामंत-राजास उद्देशून त्यांत लिहिलें होतें. तिनें ह्या राजाज्ञारूपी खोट्या लेखाच्या अनेक प्रती करविल्या, आणि द्रव्य देऊन वश केलेल्या दूताबरोबर प्रत्येक सामंतास त्यांतील एकेक प्रत गुप्तपणें पाठविली. त्या लोभी व कृतघ्न दूतानेंही राजपुत्रांच्या सैन्यांत जाऊन, सर्व सामंतांस त्या सर्व प्रती पोंचविल्या. ती राजाज्ञा वाचून सर्व मांडलिक राजे आश्चर्यचकित झाले. राजनीति अति कर्कश आहे, व प्रभूची आज्ञा अनुल्लंघनीय आहे, असें जाणून रात्रीं सर्वांनीं एकत्र जमून राजपुत्रास मारण्याचा घोर निश्चय केला; कारण त्या गुणी राजपुत्रावर सर्व मांडलिक राजे जरी प्रसन्न होते; तरी राजाज्ञेस मान देऊन तें घोर कर्म करणेंही त्यांस भाग पडलें होतें; पण भाग्यवशात् तो त्यांचा संकेत एका सुहृदाच्या तोंडून वृद्ध मंत्र्याला कळला. त्याबरोबर त्यानें शूर राजपुत्रांना तें सत्य वर्तमान कळवून त्यांस उत्तम घोड्यांवर बसविलें, व गुप्तपणें सैन्यांतून काढून दूर घालविलें, व आपणही स्वतः त्यांच्या बरोबर गेला; पण परत जाण्याचा मार्ग ठाऊक नसल्यामुळें, ते दोघे राजसुत आपल्या वृद्ध मातामहासह रात्रीं विंध्या-

रण्यांत शिरले. त्यांनीं ती घोर रात्र तेथेंच घालविली. उजाडल्यावर ते पुढें जाऊं लागले; पण बरीच चाल पडल्यामुळें व प्रखर उन्हाच्या तापानें, अगदीं थकलेले व तृषित झालेले त्यांचे घोडे भर मध्याह्नीं तडफडून मरण पावले. वृद्ध मंत्र्याचेंही तोंड सुकलें. क्षुधा व तृषा यांच्या योगानें त्याचे प्राण कासावीस झाले, व थोडयाच अवकाशांत हातपाय झाडून अगदीं थकून गेलेल्या मंत्र्यानें, नातवांच्या समक्ष प्राण सोडले. तेव्हां 'आमच्या त्या दुष्ट सापत्न मातेची इच्छा परिपूर्ण करणाऱ्या पित्यानें आम्हांला अशा दुर्दशेंत कसें पाडलें?' असें मनांत आणून दुःखित झालेल्या व शोक करणाऱ्या त्या दोघां भ्रात्यांनीं दिग्विजयास निघतांनाच राजानें सांगितल्याप्रमाणें अंबिकेचें ध्यान केलें. त्याबरोबर त्या देवीच्या ध्यान—प्रभावानें ते दोघे श्रम, क्षुधा व तृषा यांनीं रहित व पूर्वीप्रमाणें बळकट झाले. तेव्हां हा साक्षात् अनुभव आल्यामुळें देवीविषयीं त्यांच्या मनांत अधिकच आदर उत्पन्न झाला, व मार्ग—श्रमाला मुळींच न मोजतां ते विंध्यवासिनीचें दर्शन घ्यावयास गेले. तेथें पोंचल्यावर ते दोघेही भ्राते त्या जगन्मातेच्या पुढें निराहार राहून, तिची आराधना करण्याकरितां उग्र तप करूं लागले.

इकडे आतां सैन्यांत काय मौज झाली ती ऐका. ज्या रात्रीं ते तिघे तेथून निघाले, त्याच रात्रीं सैन्यांतील सामंत एकत्र जमून राजपुत्रांचा वध करण्याकरितां जों येत आहेत, तों मातामहासह ते तेथें नाहींत, कोठें पळून गेले आहेत, असें पुष्कळ शोध केल्यावर त्यांस कळलें. त्यामुळें अर्थात्च आपला संकेत बाहेर फुटल्यामुळें हा असा घात झाला, असें समजून भयभीत झालेले ते सर्व परित्यागसेनाकडे आले. त्यांनीं आपापले लेख राजाला दाखविले व घडलेलें वर्तमान सांगितलें. तेव्हां अतिशय भ्रांत व क्षुब्ध झालेला राजा त्यांस म्हणाला,—"हे माझे लेख नव्हेत. हें कांहीं तरी कपट आहे. पण मूर्खांनो, उग्र तप करून मिळविलेल्या पुत्रांना मी कधींही मारणार नाहीं, एवढेंही तुम्हाला कसें कळलें नाहीं? तुम्हीं इतके विचारशून्य कसे? मी असली घोर आज्ञा करीन, असें तुमच्या मनांत तरी कसें आलें? खरोखर तुम्हीं विवेकशून्यांनीं माझ्या पुत्रांना मारलेंच आहे असें मी समजतों. आतां त्यांचें सुकृत त्यांना वांचवील तें निराळें. खरोखर त्यांच्या मातामहानें आपल्या मंत्रित्वाचें उत्तम

फल दाखविलें आहे."–असें बोलून त्यानें त्या सामंत–राजांचा निग्रह केला. पळून गेलेल्या दूताला तत्काल पकडून आणून व त्याच्या तोंडून पुत्रघातिनी काव्यालंकारेचें तें कर्म आहे असें जाणून, त्यानें त्या पापिनीला भूगृहांत टाकिलें, व दूतालाही कडक शिक्षा दिली. परिणामाचा विचार न करिता द्वेषांध-बुद्धीनें सहसा केलेलें कर्म विपत्तीला कसें बरें कारण होणार नाहीं.* राजपुत्रांबरोबर जाऊन जे सामंत राजे परत आले होते, त्यांस त्यांच्या राज्यावरून काढून टाकून परित्यागसेनानें त्यांच्या जागीं दुसऱ्यांस स्थापिलें व पुत्रांच्या सुखरूपपणाची वार्ता ऐकण्याविषयीं अति उत्सुक झालेला तो धार्मिक राजा, त्यांच्या मातेसह अतिशय दुःखित होऊन, अंबिकेचें स्मरण करीत राहिला.

तिकडे अनुजासह तप करीत असलेल्या इंदीवरसेनावर विंध्यवासिनी प्रसन्न झाली, व स्वप्नांत साक्षात् दर्शन देऊन तिनें त्याला एक उत्तम खड्ग दिलें. आणि म्हटलें,–" या अद्भुत खड्गाच्या योगानें तू दुर्जय शत्रूंनाही जिंकशील. तूं जें जे मनांत आणशील तें तें तसेंच घडेल. तुम्हां दोघांचेही इष्ट मनोरथ पूर्ण होतील "–इतकें सांगून ती देवी गुप्त झाली असतां, इंदीवरसेन जागा झाला. तों देवीनें दिलेलें खड्ग आपल्या हातांतच आहे, असें पाहून त्याच्या आनंदास पार नाहींसा झाला. नंतर त्यानें आपल्या अनुजाला जागें केलें, व खड्ग दाखवून स्वप्न सांगितलें. त्यामुळे त्यालाही मोठा हर्ष झाला. उजाडल्यावर स्नान व देवीचें पूजन करून वनांतील फल मूलांनीं त्यांनीं पारणें सोडलें. त्यानंतर पुनः देवीच्या चरणावर मस्तक ठेवून, हातांत खड्ग घेऊन तो आपल्या कनिष्ठ भ्रात्यासह पुढें चालला. भगवतीच्या कृपाप्रसादानें त्याचे सर्व क्लेश दूर झाले.

पुष्कळ दूर गेल्यावर त्यांना एक मोठें नगर लागलें. सुवर्णमय प्रासादांच्या योगानें तें दुरून पहाणारास मेरुपर्वताची भ्रांति उत्पन्न करीत असे. ते दोघे भ्राते त्याच्या मुख्य द्वारावर गेले. तों त्यांस तेथें एक भयंकर राक्षस दिसला. तेव्हां ते दोघे वीर त्याला या नगरीचें नांव काय व हिचा स्वामी कोण आहे, असें विचारूं लागले. तेव्हां तो राक्षस

---

* अविचार्य तु पर्यन्तमतिद्वेषान्धया धिया ।
सहसा हि कृतं पापं कथं मा भूद्विपत्तये ।

म्हणाला,–"या नगराचें नांव शैलपुर. आमचा शत्रुनाशक स्वामी यमदंष्ट्र येथें रहातो."–तें ऐकतांच यमदंष्ट्राला मारण्याच्या इच्छेनें इंदीवरसेन त्या नगरांत शिरूं लागला; पण द्वारपाल राक्षसानें त्याला प्रतिबंध केला. तेव्हां अर्थात्च हातांतील खड्गाच्या एकाच प्रहारानें त्याचा शिरश्छेद करून त्याला पुढें जावें लागलें. राजभवनांत जातांच त्याला सिंहासनावर बसलेला यमदंष्ट्र दिसला. त्याच्या दोन्ही बाजूंस दोन सुंदर स्त्रिया उभ्या होत्या. समोर जातांच इंदीवरसेनानें त्याला युद्धार्थ बोलाविलें. त्याबरोबर तो राक्षसही आपली तरवार उपसून पुढें आला. दोघांचें घोर युद्ध जुंपलें. इंदीवरसेनानें, अंबिकेनें दिलेल्या दिव्य खड्गानें पुनः पुनः उत्पन्न होणारें त्या राक्षसाचें शिर वारवार तोडलें, पण राक्षसाच्या मायेनें तें फिरून फिरून उत्पन्न होत आहे, असें पाहून त्याच्या उजव्या बाजूला असलेल्या, व त्या सुंदर वीरास पाहून मोहित झालेल्या कुमारीनें त्याला खूण केली. ती पहातांच चपल इंदीवरसेनानें त्याचें मस्तक भूमीवर पडतांच त्याचे पुनः दोन उभे तुकडे केले. त्यामुळें राक्षसाची माया शांत झाली, व पुनरपि त्याला मस्तक उद्भवलें नाहीं.

याप्रमाणें तो राक्षस मेला असतां, त्याच्या सिंहासनाच्या डाव्या बाजूस असलेली सुंदर स्त्री व उजव्या बाजूस असलेली कुमारी अशा दोघीही आनंदित झाल्या. तें पाहून अनुजासह उचित आसनावर बसलेल्या इंदीवरसेनानें–'या असल्या नगरांत बाहेरच्या एकाच राक्षसानें ज्याचें रक्षण केलें आहे, असा हा निशाचर येथें एकटाच कसा रहात होता. तुम्ही कोण, व त्याच्या मरणानें अशा आनंदित कां झालांत?'–असें त्यांस विचारिलें. तेव्हां त्यांतील कुमारी म्हणाली–या शैलपुरांत वीरभुज राजा होता, त्याची ही भार्या. हिचें नांव मदनदंष्ट्रा. पण त्या राजाला या यमदंष्ट्र राक्षसानें येथें येऊन मायेनें भक्षण केलें. त्याच्या सर्व परिवारालाही त्यानें आपल्या उदरांत सांठविलें. अति सुंदर असलेल्या या एकट्या मदनदंष्ट्रेला मात्र त्यानें खाल्लें नाहीं. त्या दुष्टानें बलात्कारानें तिला आपली भार्या केली. नंतर या रम्य व निर्जन नगरांत सोन्याचीं सुंदर गृहें निर्माण करून, तो निर्दय हिच्याशीं पशूप्रमाणें क्रीडा करीत राहिला. मी खड्गदंष्ट्रा या नांवाची त्या राक्षसाची धाकटी बहिण आहें. मी अविवाहित आहें. दर्शन होतांच माझें मन आपल्यावर बसलें, व त्यामुळें आम्ही दोघीजणी त्याच्या

मरणानें इतक्या आनंदित झालों आहों. आर्यपुत्र, प्रेमानेंच अर्पण केलेल्या माझें तुम्ही पाणिग्रहण करा. तिचें हें सर्व म्हणणें लक्ष्यपूर्वक ऐकून, इंदीवरसेनानें तिच्याशीं गांधर्व-विवाह केला, व देवीच्या खड्गप्रभावानें, चिंतन करतांच प्राप्त होणाऱ्या भोगांचा उपभोग घेत, आपल्या अनुजासह तो त्याच नगरांत राहिला.

एकदां त्या वीरानें देवीचें चिंतन करून, एक आकाशगामी विमान निर्माण केलें, व त्यांत अनिच्छासेनास बसवून आपल्या पित्याकडे आपला वृत्तांत कळविण्याकरितां पाठविलें. तेव्हां तोही राजपुत्र अनायासानें इरावतीस जाऊन पोंचला. त्या नगरांतील राजमंदिरांत जाऊन, तीव्र दुःखानें संतप्त झालेल्या आईबापांस दर्शनानें, व आलिंगनानें आनंदित केलें. भ्रात्याचें कुशलवृत्त सांगून सशंक मनानें विचारकरणाऱ्या त्या आईबापांचें त्यानें समाधान केलें. त्या दोघांच्या पुढें त्या पितृवत्सल पुत्रानें प्रथम तीव्र दुःख व शेवटीं सुख देणारा आपला सर्व वृत्तांत मूळापासून सांगितला. तेव्हां पापिनी सावत्र मातेनें आपल्या नाशाकरितां केवल द्वेषानें तें सर्व कपट केलें होतें, असें त्याला राजाच्या तोंडून कळलें. नंतर पिता व माता यांच्यासह तो आनंदानें राहिला. कांहीं दिवस गेल्यावर एकदां त्याला दुष्ट स्वप्न दिसलें. त्यामुळें ज्येष्ठ भ्रात्याविषयीं त्याला मोठी शंका आली व तो ( अनिच्छासेन ) त्याला भेटण्याविषयीं अतिशय उत्सुक झाला. तो एकाएकीं पित्याजवळ जाऊन म्हणाला,—" बाबा, मला आज्ञा द्या. मी आर्य इंदीवरसेनाकडे जातों व आपली उत्कंठा त्याला कळवून परत घेऊन येतों. "—तें ऐकतांच पुत्राविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या राजानें व राणीनेंही त्याला अनुमोदन दिलें, व तो सत्पुत्र तत्काल विमानांत बसून शैलपुरास जावयास निघाला.

थोड्याच अवकाशात तो त्या राक्षसाच्या नगरास जाऊन पोंचला. राजभवनापाशीं विमान उतरून तो एकदम भ्रात्याच्या मंदिरांत गेला. तों तेथें त्याचा शूर भ्राता निश्चेष्ट होऊन पडला आहे, व त्याच्यापाशीं खड्गदंष्ट्रा व मदनदंष्ट्रा रडत बसल्या आहेत, असें त्याला दिसलें. त्याबरोबर त्याच्या हृदयाचें पाणी झालें व 'हें काय' असें तो त्यांस आतुरतेनें विचारूं लागला. तेव्हां मदनदंष्ट्रेनें जिची निंदा केली आहे, अशी खड्गदंष्ट्रा खालीं तोंड घालून म्हणाली,—" वीरा, एकदां तूं

येथें नसतांना मी स्नानाला गेलें आहें, असें पाहून तुझा भ्राता, हिच्याशीं एकांतांत रममाण झाला. मी स्नान करून लवकरच परत आलें. तों हा तिच्या सहवर्तमान असलेला माझ्या दृष्टीस पडला. तेव्हां मीं केवळ वाणीनें त्याची निर्भर्त्सना केली. त्यानें माझें पुष्कळ सांत्वन केलें, पण माझी नित्य दुर्लंघ्य ईर्ष्या शांत होईना. मी मनांत असा विचार करूं लागलें कीं, "माझी मुळींच भीति न बाळगितां हा असा परस्त्रीशीं संगत होत आहे, याचें कारण केवळ हें खड्ग आहे. त्याच्या दर्पामुळेंच हा इतका उद्धत झाला आहे. यास्तव याचें हें खड्गच मी नाहींसें करितें. असें म्हणून मीं मूर्खपणानें रात्रीं तो स्वस्थ निजला असतां तें अग्नींत टाकलें. त्यामुळें तें कलंकित झालें, व हा या दशेस प्राप्त झाला आहे. या घडलेल्या कृत्याबद्दल मला मोठा पश्चात्ताप झाला; व मरणाचा निश्चय करून आम्हीं दोघीही याच्या करितां शोक करूं लागलों. तूं आलास बरें झालें, आतां तूंच हें खड्ग घे व आपला क्रूर जातिधर्म न सोड-णाऱ्या मला मारून टाक.

भ्रातृपत्नीनें सांगितलेलें वर्तमान ऐकून अनिच्छासेनाला मोठा संताप आला; पण ती स्त्री अवध्य आहे, असें जाणून त्यानें आपलेंच शिर उडविण्याचा निश्चय केला. इतक्यांत—'तूं असें करूं नकोस. हा तुझा वडील भ्राता मेलेला नाहीं. खड्गाविषयीं निश्चिंत राहिल्यामुळें रागावलेल्या देवीनें याला मोहित केलें आहे. खड्गदंष्ट्रेचाही यांत कांहीं अपराध नाहीं. शापामुळें अव-तीर्ण झालेल्या यांच्या हातून हे असे प्रमाद घडले आहेत, या दोघीही तुझ्या भ्रात्याच्या मागच्या जन्मींच्या भार्या आहेत, यास्तव तूं आतां इष्ट-सिद्धीकरितां त्या देवीलाच प्रसन्न कर.'—अशी आकाशवाणी झाली. ती ऐकतांच अनिच्छासेन मरणोद्यमापासून निवृत्त झाला. तो लागलाच तें कलंकित खड्ग घेऊन व विमानांत बसून विंध्यवासिनीच्या पायां-पाशीं गेला. त्यानें तेथें उपोषण करून देवीला मस्तक अर्पण करण्याचा निश्चय केला, व त्याप्रमाणें खरोखरच तो खड्ग घेऊन देवीपुढें उभा राहिला. तेव्हां 'पुत्रा, साहस करूं नकोस. तुझ्या या निःसीम भक्तीनें मी प्रसन्न झालें आहें. आतां तूं परत जा. खड्ग पहिल्यासारखें निर्मळ होईल व तुझा भाऊही उठेल.' अशी देवीची प्रसादवाणी त्यानें ऐकली. तत्काल त्याच्या हातांतील तरवार चकचकीत झाली, व तिकडे आपला

भ्राताही उठला असेल असें जाणून, अनिच्छासेन गडबडीनें देवीला प्रदक्षिणा करून विमानांतून निघाला.

मनोरथाहूनही अधिक वेगानें जाणाऱ्या त्या अद्भुत विमानांत बसून, आकाशमार्गानें तो राजपुत्र मोठ्या उत्सुकतेनें एका क्षणांत शैलपुरास जाऊन पोंचला. तों इंदीवरसेन उठून बसला आहे, असें त्याला दिसलें. जवळ जाऊन व नेत्रांत अश्रू आणून त्यानें त्या वडील भ्रात्याचे पाय धरले. तेव्हां त्यानेंही अनिच्छासेनाला उठवून आलिंगन दिलें. नंतर त्याच्या भावजयींनीं 'तूं आमच्या भर्त्याला जिवंत केलेंस व आमचेही प्राण वांचविलेस' असें म्हणून त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. त्यानंतर प्रश्न करणाऱ्या ज्येष्ठ भ्रात्याला अनिच्छासेनानें पित्याकडचें, येथलें व विंध्यवासिनीच्या वरदानाचें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून इंदीवरसेन, भ्रात्यावर प्रसन्न झाला व खड्गदंष्ट्रेवरही रागावला नाहीं.

आपला पिता व माता आपल्या दर्शनाविषयीं अतिशय उत्सुक झालीं आहेत, व आपल्या सापत्न मातेच्या कापट्यामुळें आपल्यावर असा घोर प्रसंग आला, असें जाणून इंदीवरसेनानें, भ्रात्यानें अर्पण केलेलें दिव्य खड्ग हातांत घेतलें व एका मोठ्या विमानाचें स्मरण केलें. त्याबरोबर खड्गाच्या प्रभावानें विमान आलें. त्यांत सुवर्णमंदिर, दोन भार्या, भ्राता व इतर सुंदर पदार्थ यांसह बसून तो वीर आपल्या इरावती नगरीस चालला. तेथें पोंचल्यावर आकाशांतून उतरणाऱ्या त्याला नगरांतील लोकांनीं मोठ्या विस्मयानें पाहिलें. सर्व परिवारासह राजभवनांत गेल्यावर त्यानें आईबापांच्या चरणावर मस्तक ठेविलें. त्यावेळीं केवल राजपुत्रांच्याच नव्हे, तर तेथील प्राणिमात्राच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. एकाएकीं आलेल्या पुत्राला आलिंगन देऊन, राजा–राणीलाही परम सुख झालें. दिव्य स्वरूपयुक्त स्नुषांनींही सासू–सासऱ्यांस वंदन केलें, व त्यांनींही त्याचें अभिनंदन केलें. पुढें एकदां बोलतां बोलतां, 'या दोन्ही याच्या पूर्वजन्मींच्या भार्या आहेत' असें आकाशवाणीनें सांगितलेलें ऐकून सपत्नीक राजाला परम हर्ष वाटला. विमानगति, सोन्याचें मंदिर आणणें, इत्यादि अद्भुत प्रकार पाहून, हा कोणी असामान्य पुरुष आहे, असा सर्वांचा ग्रह झाला. असो; याप्रमाणें इंदीवरसेन आपल्या राष्ट्रांतील सर्व जनांस सुख देत, कांहीं दिवस तेथें स्वस्थपणें राहिला.

नंतर एकदां परित्यागसेनाची आज्ञा घेऊन तो राजपुत्र अनुजासह दिग्विजयास गेला. खड्गप्रभावानें सर्व राजांस जिंकून त्यानें विपुल ऐश्वर्य आणिलें. सोनें, हत्ती, घोडे व रत्नें यांच्या योगानें त्या भाग्यशाली पुत्रानें इरावती नगर भरून टाकलें. सर्वांस आनंद झाला. आई, बाप, भार्या, भाऊ, अमात्य, पौरजन व भृत्यवर्ग या सर्वांस तो एकसारखाच प्रिय वाटूं लागला. सर्व पृथ्वी जिंकून त्यानें ती पित्याच्या स्वाधीन केली व त्यामुळें तत्क्षणीं त्याला पूर्व जन्माचें स्मरण झालें. त्याबरोबर निजून उठल्याप्रमाणें तो ( इंदीवरसेन ) आपल्या पित्याला म्हणाला,–"बाबा, मला आपल्या पूर्व जन्माचें स्मरण झालें आहे. मी त्यांतील वृत्तान्त सांगतों तो ऐका.

## इंदीवरसेनाचा पूर्ववृत्तान्त.

हिमालयाच्या शिखरावर मुक्तापुर या नांवाचें एक नगर आहे. तेथें मुक्तासेन म्हणून विद्याधरांचा ईश्वर रहात असतो. त्याच्या कंबुवती राणीच्या ठायीं त्याला पद्मसेन व रूपसेन असे दोन सद्गुणी पुत्र झाले. त्यांतील पद्मसेनाला आदित्यप्रभा नामक विद्याधर–कन्येनें आपण होऊन प्रेमानें वरलें. तें ऐकून तिच्या चंद्रवती नांवाच्या कामार्त सखीनेंही त्याला येऊन वरलें. तीही सुंदरी विद्याधराचीच कन्या होती; पण दोन भार्यांच्या त्या पतीला प्रत्यहीं अतिशय खेद होऊं लागला. आदित्यप्रभा आपल्या सवतीशीं एकसारखा मत्सर करीत असे. त्यामुळें 'ईर्ष्येनें अंध झालेल्या भार्यांचा सतत होणारा कलह मला सहन होत नाहीं. त्यापेक्षां शांतीचा अनुभव घेण्याकरितां तपोवनांत जावें हें बरें' असें मनांत आणून पद्मसेन आपल्या पित्याकडे गेला, व आज्ञा देण्याविषयीं आग्रह करूं लागला. तेव्हां त्याच्यावर रागावलेला मुक्तासेन म्हणाला,–"मूर्खा! तपोवनांत कशाला जातोस? मर्त्यलोकींच जा, तेथें ही तुझी भांडखोर आदित्यप्रभा राक्षसयोनींत उत्पन्न होऊन तुला प्राप्त होईल. ही दुसरी चंद्रवती तुला अतिशय प्रिय असून तीही तुजवर अनुरक्त आहे. यास्तव तीही प्रथम राजपत्नी व नंतर राक्षसी होऊन, शेवटीं तुझी भार्या होईल. हा तुझा भ्राताही तुजबरोबर जाण्याची इच्छा करीत आहे, असें मला वाटतें. यास्तव तोही तेथें तुझा भाऊ होईल. मनुष्ययोनींतही तुला या

दोन भार्यांमुळें थोडेंसें दुःख अनुभवावें लागेल.'–हा शाप ऐकून आम्ही पुष्कळ प्रार्थना केल्यावर त्यानें पुनः असा उःशाप दिला.–'पद्मसेना, तूं सर्व पृथ्वी जिंकून जेव्हां आपल्या पित्याला देशील, तेव्हां तुम्हां सर्वांना या जन्माचें स्मरण होऊन तुम्ही मुक्त व्हाल.'–या शापाप्रमाणें पद्मसेन आपल्या परिवारासह या लोकीं आला. बाबा, तोच हा मी तुमचा पुत्र झालों व आपलें कर्तव्य केलें. विद्याधर-पुत्र रूपसेनच हा आपला अनिच्छासेन आहे. आदित्यप्रभा व चंद्रावतीच क्रमानें येथें खड्गदंष्ट्रा व मदनदंष्ट्रा होऊन मला मिळाल्या. आमच्या शापाचा अवधि आज संपला आहे, यास्तव आम्ही आतां आपल्या विद्याधर-नगरास जातों. असें सांगून त्यानें ज्यांना पूर्वजन्मांचें स्मरण झालें आहे, अशा भार्यांसह व भ्रात्यासह मानुषशरीर सोडून दिव्यदेह धारण केला, व दुःखी मातापितरांस वंदन करून, तो साधु विद्याधरपुत्र परिवारासह आपल्या नगरास गेला. तेथें त्याच्या मुक्तासेन पित्यानें त्याचें अभिनंदन केलें. त्याची माता संतुष्ट झाली; रूपसेन भ्रात्याची व त्याची गांठ पडली, व पूर्वीच्या दोघी भार्याही त्याला तेथें भेटल्या. दुःखाचा अनुभव आल्यामुळें त्यांनीं आपसांतील द्वेष सोडला. त्यामुळें पद्मसेनाला मोठें सुख झालें.

मार्गानें जात असतां अशी ही रमणीय कथा सांगून, सचिव गोमुख पुनः नरवाहनदत्तास म्हणाला,–" देव, याप्रमाणें क्लेश अथवा अभ्युदय महात्म्यांच्याच वांट्यास येत असतात. इतर सामान्य जनांना फारसे क्लेशही सोसावे लागत नाहींत, व त्यांचा कधीं उदयही होत नाहीं.† रत्नप्रभा देवीच्या विद्याशक्तीनें उत्तम प्रकारें रक्षण केल्यामुळें आपण कर्पूरिका राजकन्येला अनायासें मिळवाल.

गोमुखाच्या सुमुखानें ही असली रम्य कथा ऐकून नरवाहनदत्त मार्गश्रमांनाही विसरला व त्याच्या सहवर्तमान आनंदानें पुढें चालला. सर्व दिवसभर चालून गेल्यावर सायंकालीं त्यांना एक सरोवर लागलें. त्याचें जल अति स्वच्छ, शीतल, मधुर व विपुल होतें. राजहंसाच्या दाट

† इत्थं स्यान्महतामेव महाक्लेशस्तथोदयः ।
अन्येषां तु कियान्देव क्लेशो वाप्युदयोऽपि वा ॥

ध्वनींनी तें नादित झालें होतें. आंबे, फणस, व डाळिंबें यांच्या दाट वृक्षांनीं त्याच्या तटास सुशोभित केलें होतें. त्यांतील उमललेल्या कमलांचा घमघमाट चोहोंकडे पसरला होता. त्या सरोवरांत त्या दोघांनींही स्नान केलें. पार्वती-पतीचें मोठ्या भक्तीनें पूजन केलें. तेथल्याच सुवासिक, मधुर व हृद्य फलांचा आहार केला, व त्याच्याच तटावर मृदु पल्लव हांतरून, त्यावर पडून वत्सेशपुत्रानें ती रात्र आपल्या मित्रासह तेथें घालविली.

---

## तरंग ९ वा.

---

### १. नरवाहनदत्ताचें स्वप्न व अद्भुत नगराची प्राप्ति.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं उजाडतांच ते दोघे पुढें जावयास निघाले. मार्गानें जात असतांना नरवाहनदत्त गोमुख-मंत्र्यास म्हणाला,—" मित्रा, गेल्या रात्रीं स्वप्नांत मजकडे कोणीएक शुभ्र वस्त्र नेसलेली दिव्यरूपी कन्या आली व म्हणाली,—" वत्सा, तूं निश्चिंत हो. आतां येथून तूं लवकरच समुद्रतीरीं वनामध्यें असलेल्या एका मोठ्या आश्चर्यकारक नगरास जाऊन पोंचशील. तेथें विश्रांति घेतल्यावर तूं अनायासानें कर्पूरसंभवास जाशील व कर्पूरिका राजकन्या तुला मिळेल" इतकें सांगून ती गुप्त झाली आणि मी तत्काल जागा झालों.

युवराजाचें हें स्वप्नवृत्त ऐकून गोमुखास मोठा संतोष वाटला, व तो त्यास म्हणाला—देव, आपल्यावर देवांनींच अनुग्रह केला आहे. तेव्हां आपल्याला दुष्कर काय असणार? तुमचें इष्ट खचित सहज सिद्ध होईल त्यानंतर ते दोघेही अधिक उत्साहानें व वेगानें पुढें चालले. बरेच दू[र] गेल्यावर त्यांना तें समुद्राच्या कांठचें अद्भुत नगर लागलें. त्याचा कोट पर्वताच्या कड्यासारखा अभेद्य होता. मोठी वेश होती. आंत मोठाले मार्ग होते. सोन्याच्या राजमंदिरानें तें अतिशय सुशोभित दिसत होतें त्या नगराचा विस्तार फार मोठा होता, त्यामुळें तें दुसरें भूमंडलच आहे कीं काय, असा भास होत असे. त्या नगरांत शिरून ते दोघे भर बाजारां तून जाऊं लागले, तों त्यांना तेथें वैश्य, वेश्या, नगरवासी नर–नारी पशु-पक्षी, इत्यादि सर्व काष्ठयंत्रमय असून, सजीव प्राण्यांप्रमाणें व्यवहा[र]

करीत आहेत असें आढळलें. त्यामुळें त्यांना आश्चर्य वाटलें. लांकडी शरीरांना, जर एक वाणी असती तर तीं कळसूत्री आहेत, असें समजणें अशक्य झालें असतें. जातां जातां नरवाहनदत्त सचिवासह राजवाड्या-पर्यंत जाऊन पोंचला. तेथेंही हत्ती, घोडे, प्रतीहार व इतर भृत्य यंत्रमयच होते. त्यास पहात तो आंत शिरला. तों रत्नजडित सिंहासनावर बसलेला एकच सचेतन पुरुष त्यास दिसला. जड इंद्रियांस सचेतनाप्रमाणें चेष्टा करावयास लावणारा एक चेतन आत्माच जसा त्यांचा अधिष्ठाता असतो, त्याप्रमाणें तो त्या नगरांतील सर्व लांकडी यंत्रमय वस्तूंचा एकच सजीव प्रवर्तक होता. असो; या उत्तम आकृतीच्या राजपुत्रास पहातांच ते भव्य पुरुषही आपल्या सिंहासनावरून उठला. स्वागत करून त्यानें त्याला आपल्या सिंहासनावर बसविलें, व 'तूं कोण, या अमानुष जागीं एकाच अनुचरासह कसा व कां आलास!' असें विचारलें.

## २. राज्यधर सुताराचें वृत्त.

तेव्हां नरवाहनदत्तानें आपला वृत्तांत सांगून त्या नम्र पुरुषास 'तूं कोण, व हें मोठें आश्चर्यकारक नगर तूं कसें निर्मिलेंस ?' असा प्रश्न केला. तेव्हां तो पुरुष आपला सर्व वृत्तान्त सांगूं लागला–"भद्रमुखा, काञ्ची या नांवाची एक नगरी आहे. सर्वोत्तम गुणांनीं ( धाग्यांनीं ) गुंफलेली ती भूमिरूपी–स्त्रीची जणुंकाय मेखलाच आहे. त्या नगरींत बाहुबल या नांवाचा एक प्रख्यात राजा आहे. त्यानें बाहुबलानें जिंक-लेल्या चंचल लक्ष्मीलाही आपल्या कोषांत ( खजिन्यांत ) जणुंकाय बांधूनच ठेविलें आहे. त्या राजाच्या राष्ट्रांत आम्ही दोघे भाऊ जन्मलों. मयासुरानें केलेल्या लांकडी कळसूत्री यंत्रकलेंत आम्ही प्रवीण आहोंत. माझा ज्येष्ठ भाऊ प्राणधर वेश्याव्यसनांत नि-मग्न झाला. मी त्याचा कनिष्ठ भ्राता. माझें नांव राज्यधर. मी वडील भावाचा अनन्य भक्त आहें. माझ्या भावानें पित्याची मिळकत नाहींशी केली. स्वकष्टानें मिळविलेलें धनही व्यसनांत घाल-विलें, आणि मी त्याच्यावरील स्नेहामुळें आपल्या धनापैकीं जें दिलें होतें, तेंही त्यानें खर्च करून सोडलें. जवळ एक कवडीही नाहीं, अशी वेळ आली. पण त्या अति व्यसनी पुरुषानें वेश्येचा नाद सोडला नाहीं. पुनः तिच्याकरितां धन मिळविण्याच्या उद्देशानें त्यानें रज्जु-यंत्रमय लांकडी

हंसांचें जोडपें तयार केलें, व रात्रीं दोऱ्या बांधून त्याला आकाशांत सोडलें. तेव्हां तें जोडपें आकाशमार्गानें बाहुबल राजाच्या कोशागारांत खिडकींतून शिरलें व चोंचींतून ताटांत उघडेंच ठेवलेलें एक भूषण घेऊन परत आलें. दुसऱ्या दिवशीं तें विकून त्यानें आपला व वेश्येचा निर्वाह चालविला. पुढें तो रोज अशीच राजधनाची चोरी करवून भोजनादिकां-करितां अवश्य लागणारें धन मिळवूं लागला. मीं त्याचें पुष्कळ निवारण केलें; पण त्यानें तें अकार्य सोडलें नाहीं. कोणता व्यसनान्ध पुरुष सन्मार्ग व कुमार्ग यांचें निरीक्षण करणार आहे?*"

असो; याप्रमाणें प्रत्यहीं चोरी होऊं लागली. तेव्हां कोशाध्यक्ष मोठ्या चिंतेंत पडला. 'रात्रीं कोणी दार उघडून आंत येत असेल म्हणून म्हणावें, तर त्याचा आडणा घट्ट लावलेला असतो. बरें उंदीर भूषणें नेत असतील म्हणून म्हणावें, तर कोशागारांत बिळ एकही नाहीं.' इत्यादि पुष्कळ विचार करून व गेलेल्या अलंकारांचा पुष्कळ शोध करूनही कांहीं निष्पन्न होत नाहीं, असें जाणून व आतां उगीच अधिक दिवस भिऊन रहाणें इष्ट नाहीं असें मनांत आणून, कोषाध्यक्षानें तो चोरीचा प्रकार राजाच्या कानावर घातला. तेव्हां राजालाही मोठा संशय आला. त्यानें अधिकाऱ्याला व रक्षकांना तेथें एक रात्रभर जागत रहावयास सांगितलें. त्याप्रमाणें ते तेथें बसले असतां, खिडकींतून आंत आलेलें माझ्या भावाचें तें हंसांचें जोडपें त्यांनीं पाहिलें. ते दोन्ही लांकडी हंस यंत्रयुक्तीनें हालचाल करीत होते. त्यांनीं आंत येतांच नेहमींप्रमाणें एकेक भूषण चोंचींत धरलें व त्यांस बांधलेल्या दोरीच्या योगानें मागें ओढल्यामुळें तें परतून जाऊं लागलें; पण इतक्यांत कोषाध्यक्षानें रक्षकांकडून ती यंत्ररज्जु तोडविली. त्याबरोबर ते लांकडी हंस खालीं पडले, व राजाला दाखविण्याकरितां त्यांनीं त्यांना उचलून घेतलें.

आपल्या यंत्राचें सूत्र कोणी तोडलें आहे व त्यामुळें हंस परत येत नाहींत, असें कळतांच माझा भाऊ घाबरला, आणि मला म्हणाला–"राज्य-धरा, माझ्या हंसांच्या जोडीला राजभृत्यांनीं धरलें आहे असें वाटतें; कारण त्यांना बांधलेली दोरी सैल झाली आहे व यंत्रांतील खिळाही गळून पडला

* को हि मार्गममार्गं वा व्यसनान्धो निरीक्षते।

आहे. यास्तव आम्हां दोघांना आतांच्या आतांच येथून निघून गेलें पाहिजे; नाहींतर मायायंत्र निर्माण करण्याविषयीं आमचीच प्रख्याति झालेली असल्यामुळें, राजा उद्यां सकाळींच आम्हां दोघांनाच चोर म्हणून धरील. यास्तव, विदेश जरी दुःखप्रद असला तरी आपण कोठेंतरी दूर निघून जाऊं या चल. " हितवाक्याचा अनादर करून पापामध्येंच प्रवृत्त झाल्यावर सुख कसें होणार ?* म्यां पापबुद्धीनें तुझें हितवचन ऐकलें नाहीं; म्हणून त्याचा हा परिणाम केवळ मलाच नव्हे, तर निष्पाप अशा तुलाही भोगावा लागत आहे."

इतकें बोलून तो सकुटुंब आकाशगामी विमानांत बसला, व मलाही त्यांतच बसण्याविषयीं आग्रह करूं लागला; पण मला त्याच्या परिवारांमध्यें जाऊन बसणें आवडलें नाहीं. म्हणून 'मी तुझ्या बरोबर येत नाहीं. तूं जा हवा तेथें !' असें त्यास म्हटलें. त्याबरोबर तोही आकाशांत उडून कोठें दूर निघून गेला. नंतर प्रातःकालीं राजा आपलाही निग्रह करील, या भीतिनें मीं स्वतः केलेल्या दुसऱ्या एका विमानांत बसलों, व एकटाच उजाडण्यापूर्वीं दोनशें योजनें दूर निघून गेलों. तेथें थोडी विश्रांति घेतली, व पुनः विमानाला गति देऊन आणखी दोनशें योजनें पुढें गेलों. तों मला समुद्राचें दर्शन झालें. तेव्हां मी विमानांतून उतरलों. व पायानींच पुढें जाऊं लागलों. कांही दूर गेल्यावर मला हें शून्य नगर लागलें. कौतुकानें मी त्यांत शिरलों, व राजमंदिरापर्यंत निःशंकपणें येऊन पोंचलों. तेथेंही मला प्रतिबंध करावयास कोणी नव्हते. म्हणून मी या राजगृहांत आलों. तों हें मंदिर राजास उचित असलेलीं वस्त्रें, आभरणें, शय्या, आसनें इत्यादिकांनीं परिपूर्ण आहे, असें मला आढळलें. थोडी विश्रांति घेतल्यावर सायंकालीं या जवळच्या उद्यानांतील वापींत मीं स्नान केलें. पेरू, डाळिंबें, इत्यादि गोड फळें खाल्लीं. मधुर जल प्राशन केलें व कांही वेळ उद्यानांत फिरून अंधकार पडतांच या मंदिरांत परत आलों आणि राजशय्येवर पडून मी मनांत असा विचार करूं लागलों कीं, या निर्जन वनांत मला राहून काय करावयाचें आहे ? उद्यां सकाळीं आणखी कोठें तरी जावें हें बरें ! बाहुबल राजाचें भय तर कांहीं आतां राहिलें नाहीं.

* पापे कर्मण्यवज्ञातहितवाक्ये कुतः सुखम् ।

इतका विचार करून मी निजलों असतां, उत्तर रात्रीं मोरावर बसलेला दिव्यरूपी पुरुष मला स्वप्नांत दिसला. तो मजजवळ येऊन म्हणाला– " भद्र, तूं येथेंच रहा. दुसऱ्या कोठेंही जाऊं नकोस. आहारसमयीं तूं या मधल्या घरांत जाऊन बसत जा."–इतकें सांगून तो देव गुप्त झाला असतां, मी जागा झालों व मनांत म्हटलें–" खरोखर हें कुमारस्वामीनें निर्माण केलेलें नगर असावें. पूर्वपुण्याच्या प्रभावानें त्यानें आज मजवर स्वप्नांत अनुग्रह केला आहे. यास्तव मी आतां येथेंच रहातों; कारण स्वप्नांत झालेल्या त्या देवाच्या आज्ञेप्रमाणें येथें राहिल्यास खचित माझें कल्याण होईल."–असा निश्चय करून व स्वप्नावर दृढ आस्था ठेवून उजाडल्यामुळें मी उठलों. शौच, मुखप्रक्षालनादि आवश्यक कर्में व स्नानादि आह्निक कृत्यें संपवून मी मधल्या कक्षेत गेलों. तों तेथें माझ्या पुढें दूध, तूप, साळीच्या तांदुळांचा भात, भाज्या, वरण, कोशिंबिरी, पोळ्या इत्यादि सुग्रास अन्नानें भरलेलें सोन्याचें ताट वाढून आलें. आकाशांतून अकस्मात् उतरलेल्या त्या ताटांतच मी जेवूं लागलों. त्यावेळीं मी ज्या ज्या पदार्थांची इच्छा करीत होतों, तो तो पदार्थ माझ्या ताटांत येऊन पडत असे. प्रभो, खरेंच सांगतों; तसलें अन्न मीं पूर्वीं कधींही खाल्लें नव्हतें. भोजनानें माझी अवर्णनीय तृप्ति झाली, व येथून न जाण्याचा मी निश्चय केला. प्रत्यहीं मी ज्याचें ज्याचें चिंतन करितों, तो तो राजभोग मला येथें तत्काल प्राप्त होतो; पण स्त्री, भृत्य, वाहनें, इत्यादि सामग्री येथें मला मिळत नाहीं. म्हणून मी हा सर्व यंत्रमय परिवार निर्माण केला आहे. सारांश, हे देव, याप्रमाणें मी जातीचा सुतार व येथें एकटाच असतांनाही पूर्वपुण्यकर्मवशात् राजाची लीला करीत आहें. यास्तव आपणही या देवनिर्मित नगरांत आजचा एक दिवस राहून विश्रांति घ्या. म्हणजे मलाही यथाशक्ति परिचर्या करावयास सांपडेल.

इतकें बोलून राज्यधरानें गोमुखासह त्याला उद्यानांत नेलें. तेथें राजपुत्रानें शीतजलानें स्नान केलें. सुंदर कमलांनीं शंकराचें पूजन केलें. नंतर राज्यधराच्या मागोमाग गोमुखासह तो मध्यकक्षेत गेला. तेथें ध्यान करतांच आलेल्या षड्रस चतुर्विध अन्नानें क्षुधाशांति करून तांबूल भक्षण केल्यावर त्यानें दिव्य आसवही प्यालें, व चिंतामणीसारख्या त्या अद्भुत नगराचें माहात्म्य पाहून, विस्मित झालेला तो रात्रीं

राज्यधरासह रम्य शय्येवर जाऊन पडला; पण कर्पूरिकेविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या त्याला झोंप येईना. म्हणून त्यानें तिचा वृत्तान्त त्या राज्यधराला विचारला. तेव्हां तो शय्येवर पडूनच म्हणाला.–

## ३. मानपरा व सुखधन यांची कथा.

कल्याणिन्, तूं निजत कां नाहींस ? ती तुझी प्रिया तुला खचित प्राप्त होईल; कारण उदार–सत्त्व पुरुषास लक्ष्मीप्रमाणेंच स्त्रियाही आपण होऊनच वरीत असतात.* याविषयीं मी एक प्रत्यक्ष पाहिलेली गोष्ट सांगतों ती ऐक. काञ्चीच्या बाहुबल राजाविषयीं मी तुला दुपारीं थोडेंसें सांगितलेंच आहे. त्याचा अर्थलोभ या नांवाचा श्रीमान् प्रतीहार होता. नांवाप्रमाणेंच त्याला द्रव्यलोभ फार असे. त्याची मानपरा म्हणून एक रूपशालिनी भार्या असे. अर्थलोभ जातीचा वैश्य असल्यामुळें, त्यानें व्यापारही करावयास आरंभ केला. लोभ हा व्यापाऱ्यांचा स्वाभाविक धर्मच असतो. असो; अर्थलोभाचा दुकानांतील भृत्यांवर फारसा विश्वास नसे. म्हणून त्यानें आपल्या भार्येलाच दुकानावर बसविलें होतें. वस्तुतः तें काम करण्याची तिची इच्छा नव्हती; पण पतीच्या आज्ञेचें उल्लंघन करावयाचें नाहीं, या समजुतीमुळें तिनें इतर व्यापाऱ्यांशीं देवघेवीचा व्यवहार चालविला. मधुर रूप व भाषण यांच्या योगानें लोकांचीं मनें आकर्षण करून घेऊन, ती गज, अश्व, रत्न, वस्त्र इत्यादि जें जें विकते त्याचें मूल्य चांगलें येतें, असें पाहून अर्थलोभ फार आनंदित होऊन तिला तसेंच करावयास अनुमोदन देत असे.

एकदां फार दुरून कोणी एक सुखधन या नांवाचा मोठा व्यापारी पुष्कळ घोडे वगैरे घेऊन तेथें आला. तें ऐकतांच अर्थलोभ आपल्या भार्येला म्हणाला–" प्रिये, येथें सुखधन आला आहे, त्याच्यापाशीं वीस सहस्र सुंदर घोडे व अत्यंत सुंदर रेशमी वस्त्रें आहेत, यास्तव तूं त्याच्याकडे जाऊन पांचहजार जातिवंत घोडे व दहाहजार वस्त्रांच्या जोड्या विकत आण. म्हणजे आपले पूर्वीचे एकहजार व हे पांचहजार मिळून सहाहजार घोडे व वस्त्रें घेऊन मी राजाकडे जाईन व त्यांची विक्री करीन."–असें सांगून त्यानें तिला जावयास भाग पाडलें असतां, ती

---

* उदारसत्त्वं वृणुते स्वयं हि श्रीरिवाङ्गनाः ।

सुखधनाकडे गेली. तिला पहातांच तो मोहित झाला. त्यानें तिचें स्वागत केलें, तेव्हां तिनेंही पतीच्या आज्ञेप्रमाणें पांच हजार घोडे व दहा हजार वस्त्रें विकत मागितलीं. तेव्हां कामविवश झालेला तो तिला एकांतांत नेऊन म्हणाला—" मी तुला एकही वस्त्र विकत देणार नाहीं; पण तूं एक रात्रभर जर मजजवळ रहाशील, तर पांचशें घोडे व पांच हजार वस्त्रें देईन. कांहीं वेळानें त्यानें अधिक घोडे व वस्त्रें देण्याचेंही कबूल केलें. कारण उघडच आहे कीं, निरर्गल चेष्टा करणाऱ्या स्त्रियांची इच्छा कोणाला होणार नाहीं ?‡

असो, त्यावर ती म्हणाली,—" मी आपल्या पतीला जाऊन विचारतें. अति लोभामुळें तो कदाचित् मला 'जा' म्हणूनही म्हणेल."—असें सांगून ती आपल्या घरीं परत गेली. सुखधनाचें म्हणणें तिनें आपल्या पतीला कळविलें. तेव्हां पापी व पशूसारखा मूर्ख अर्थलोभ तिला म्हणाला—प्रिये, एका रात्रींत जर पांचशें घोडे व पांच हजार वस्त्रें मिळत आहेत, तर त्याचें म्हणणें मान्य करण्यांत कोणता प्रत्यवाय आहे! तर आज तूं त्याच्याकडे जा, व सकाळीं लवकर ये, म्हणजे झालें. नीच भर्त्याचें हें म्हणणें ऐकून मानपरा साशंक झाली, आणि मनांत म्हणाली -" स्त्रीविक्रय करणाऱ्या पापी, हीनसत्त्व व द्रव्यतृष्णेमुळें द्रव्यमय झालेल्या याला धिक्कार असो! याच्यापेक्षां शेकडों घोडे व हजारों वस्त्रें देऊन एक रात्र मला विकत घेणारा तो उदारबुद्धि सुखधनच मला योग्य भर्ता आहे."—असा मनांत विचार करून, व—' याचा मजकडे कांहीं दोष नाहीं बरें '—असें त्या कुपतीला सांगून ती त्याच्या आज्ञेनेंच सुखधनाकडे जावयास निघाली. त्याच्या बिऱ्हाडीं पोंचल्यावर, ती आली आहे, असें समजतांच त्या श्रीमान् वैश्याला मोठा संतोष वाटला. त्यानें 'तुझ्या पतीनें तुला आज्ञा दिली का?' असें विचारलें, व तिनें 'होय' असें म्हटलें असतां तो अतिशय विस्मित झाला; पण तिच्यासारख्या सुंदरीची प्राप्ति झाल्यामुळें तो आपणास धन्य मानूं लागला. त्यानें तिच्या पतीकडे ठरल्याप्रमाणें घोडे व वस्त्रें तत्काल पाठविलीं, व नंतर तो साक्षात् श्रीप्रमाणें असलेल्या त्या मानपरेसह रात्रभर सुख भोगीत राहिला.

---

‡ स्त्रीष्वनर्गलचेष्टासु कस्येच्छा नोपजायते ॥

दुसऱ्या दिवशीं पहाटेस, त्या अर्थलोभानें तिला बोलावून आणण्याकरितां निर्लज्जपणें आपले भृत्य पाठविले. तेव्हां मानपरा त्यांस म्हणाली— " माझ्या पतीनें मला विकलें व दुसऱ्याशीं समागम करावयास पाठविलें. तेव्हां आतां पुनः मी त्याच्याकडे येऊन त्याची भार्या कशी होऊं! त्याच्यासारखी मी निर्लज्ज थोडीच आहें! तुम्हीं त्याचे सेवक आहांत. तेव्हां तुम्हींच सांगा बरें, मला तिकडे येणें आतां शोभतें का? तुम्हीं आतां परत जा. ज्यानें मला विकत घेतलें तोच माझा पति."

मानपरेचें हें न्याय्य भाषण, खालीं तोंडें करून भृत्यांनीं आपल्या धन्याला अक्षरशः जाऊन सांगितलें. तेव्हां त्या नराधमानें तिला बलात्कारानें आणण्याची इच्छा केली; पण त्याचा हरबल नांवाचा मित्र त्याला म्हणाला—" मित्रा, सुखधनापासून तूं तिला आणूं शकणार नाहींस; कारण तो महावीर आहे. त्याच्या पुढें उभें रहाण्याचें धैर्य तुझ्यामध्यें दिसत नाहीं. त्याच्या दानशीलावर अनुरक्त झालेल्या तुझ्या भार्येनें त्याला शूर केलें आहे. तो स्वतः बलवान् असून इतर बलाढ्य मित्रांसह तेथें आला आहे. तूं कृपणतेमुळें आपल्या स्त्रीला गुप्तपणें विकलेंस, व त्याच अपमानामुळें तूं आतां निरुत्साह झाला आहेस. शिवाय तूं स्वतः त्याच्यासारखा बलाढ्य नाहींस. तुला मित्रबलही नाहीं. तेव्हां तूं त्याच्याशीं कलह करून विजयी कसा होणार? राजाला जर ही गोष्ट कळली, तर स्त्रीविक्रयासारखें घोर पातक करणाऱ्या तुजवर तो अतिशय रागावेल यास्तव तूं आतां मुकाट्यानें बैस. आपलें आणखी अधिक हसें करून घेऊं नकोस."

पण मित्राचें हें हितकर वचन न ऐकतां तो अर्थलोभ क्रोधानें आपल्या भृत्यांसह सुखधनाच्या घराकडे चालला, व तेथें पोंचतांच त्यानें त्याच्या घरास वेढा दिला; पण तें त्याचें मूर्खपणाचें कृत्य आंतील लोकांना कळतांच ते सर्व धांवून बाहेर आले, व एका क्षणांत त्यांनीं यथेच्छ मार देऊन तेथून त्यांना हांकून लाविलें. तेव्हां तेथून जीव घेऊन पळालेला तो महालोभी राजाकडे गेला व—' देव, सुखधन वैश्यानें माझी भार्या हरण करून नेली आहे '—असें आपला दोष लपवून ठेवून, तो राजाला सांगूं लागला. तें ऐकून अर्थातच राजाला मोठा राग आला. व

सुखधनाचा निग्रह करण्याचा त्यानें विचार केला; पण संधान नांवाचा मंत्री राजाला म्हणाला,–"प्रभो, सुखधनाचा सहज निग्रह करतां येणें शक्य नाहीं; कारण त्याचे अकरा मित्र त्याच्याकरितां सतत प्राण देण्यासही तयार असतात. त्याच्यापाशीं एकलक्ष उत्तम घोडे आहेत. शिवाय यांत खरें तत्त्व काय आहे, तेंही आपणाला अजून कळलें नाहीं. कांहीं कारणावांचून हा असला अन्याय होणेंच शक्य दिसत नाहीं. यास्तव प्रथम दूत पाठवून तो याविषयीं काय म्हणतो तें तर ऐकूं या."

मंत्र्याचें हें योग्य सांगणें मान्य करून, राजानें सुखधनाकडे दूत पाठविला. राजाज्ञेप्रमाणें तो सुखधनाकडे जाऊन त्याविषयीं विचारपूस करूं लागला. तेव्हां, मानपरेनें आपला वृत्तान्त त्याला सांगितला. तो ऐकून दूत राजाकडे परत आला. त्याच्या तोंडून तो चमत्कार ऐकून राजाला मोठा अचंबा वाटला, व तिचें लावण्य पहाण्याकरितां तो स्वतः अर्थलोभासह सुखधनाकडे आला. तेव्हां त्या वैश्यानें त्याचें मोठ्या नम्रपणानें स्वागत केलें. राजानेंही मानपरेला पाहिलें व लावण्यगुणानें ती विधात्यालाही विस्मित करील, असें त्याला वाटलें. तिनें राजाच्या चरणावर मस्तक ठेविलें, व त्यानें प्रश्न केल्यामुळें आपलें सर्व सत्य वृत्त पतीसमक्ष सांगितलें. तेव्हां त्या पाप्याचें तोंड काळें ठिक्कर पडून तो अगदीं निरुत्तर झाला. राजाला मानपरेचें म्हणणें अक्षरशः खरें वाटलें. आणि त्या कलहाचा निर्णय करण्याकरितां 'याचा शेवट कसा लावावयाचा?' असें त्यानें त्या सुमुखीलाच विचारलें. पण त्याविषयीं तिचा निश्चय पूर्वींच झालेला असल्यामुळें ती लागलीच हात जोडून व डोळ्यांत पाणी आणून म्हणाली–"महाराज, कोणत्याही प्रकारची आपत्ति नसतांना ज्या लोभी व निःसत्त्व पतीनें मला विकलें, त्याच्यापाशीं मी फिरून कशी जाऊं?"

हें तिचें म्हणणें राजाला मान्य झालें. पण त्याबरोबर काम, क्रोध, व लज्जा यांनीं व्याकुल झालेला अर्थलोभ म्हणाला, राजन्, आम्ही दोघे मित्रांच्या बलावांचून आपापल्या सैन्यासह लढतों, व आपण आमचें बलाबल पहा. पण त्यावर सुखधन म्हणाला-मग सैन्य तरी हवें कशाला? तूं व मी असे दोघेच लढूं या, म्हणजे झालें. जो विजयी होईल तो मानपरेला घेईल. तें ऐकून 'बरें आहे असेंच होऊं दे,' असें राजा बोलला. आणि

मानपरा व राजा यांच्या समक्ष घोड्यावर बसलेले ते दोघे मैदानांत लढूं लागले. सुखधनानें आपला भाला टोंचून त्याच्या घोड्याला भूमीवर पाडलें व अर्थलोभावरही वार केले; पण धर्मयुद्ध करणाऱ्या त्यानें अश्वरहित होऊन भूमीवर पडलेल्या अर्थलोभाला जिवानिशीं मारलें नाहीं. तेव्हां तेथील सर्व प्रेक्षक 'वाहवा, शाबास' असें म्हणून सुखधनाची स्तुति करूं लागले. अर्थलोभ निश्चेष्ट होऊन पडला तेव्हां त्याच्या भृत्यांनीं त्याला तेथून उचलून नेलें. राजानें सुखधनाचा मोठा सन्मान केला, व त्यानें आणलेली मोठी भेटच त्याला परत करून मानपरेला त्याच्या स्वाधीन केलें. नंतर अन्यायानें मिळविलेलें अर्थलोभाचें सर्वस्व हरण करून त्याच्या जागीं दुसऱ्या योग्य भृत्याची योजना केली. याप्रमाणें बाहुबल संतुष्ट होऊन आपल्या मंदिरांत गेला. कारण पापसंपर्क निवृत्त झाला कीं, महात्म्यांना मोठें समाधान वाटत असतें.* असो; त्यानंतर आपल्यावर अनुरक्त झालेल्या मानपरेसह तो भाग्यशाली वैश्यही सुखानें काल घालवूं लागला. सारांश; राजपुत्रा, हीनसत्त्व पुरुषापासून स्त्री व धन अशा रीतीनें पळून जातात, व अतिधीर पुरुषाला तीं दोन्ही भोगसाधनें कोठून ना कोठून तरी आपोआप येऊन मिळतात.† राजतनया, तूं आतां व्यर्थ चिंता करूं नकोस. स्वस्थपणें नीज. कर्पूरिका राजकन्या तुला लवकरच मिळेल.

## ४. नरवाहनदत्ताचा कर्पूरसंभवांत प्रवेश.

रात्रीं राज्यधरानें सांगितलेली ही गोष्ट ऐकून नरवाहनदत्त गोमुखासह स्वस्थचित्तानें निजला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून व प्रातःकालचें सर्व आह्निक उरकून भोजन केल्यावर नरवाहनदत्त क्षणभर विश्रांति घेत पडला असतां, बुद्धिमान् गोमुख राज्यधरास म्हणाला,–" मित्रा, तुझें तें यंत्रविमान तयार कर पाहूं. म्हणजे त्याच्या सहायानें हा आमचा प्रभु कर्पूरसंभवपुरास जाईल, व त्यामुळें त्याला ती प्रिया सत्वर मिळेल."

---

* निवृत्तपापसंपर्काः सन्तो यान्ति हि निर्वृतिम् ।

† एवं दाराः पलायन्ते हीनसत्त्वाद्धनानि च ।
सुसत्त्वस्योपतिष्ठन्ते स्वयमेत्य यतस्ततः ॥

तें ऐकतांच त्या कुशल सुतारानें पूर्वींच तयार केलेलें वातयंत्रविमान नरवाहनदत्ताच्या उपभोगाकरितां मोठ्या आनंदानें दिलें. तेव्हां तो राजतनय आपल्या प्रिय सचिवांसह त्यांत बसून, आकाशमार्गानें भयंकर सागराचें उल्लंघन करून चालला. मनोवेगानें जाणाऱ्या त्या विमानाच्या सहायानें तो थोड्याच अवकाशांत कर्पूरसंभवपुरास जाऊन पोंचला. आकाशांतून खालीं उतरल्यावर गोमुखासह तो त्या नगरांत फिरूं लागला. तेव्हां आपल्याला इष्ट असलेलें कर्पूरसंभवपुर हेंच, असें त्याला लोकांच्या तोंडून कळलें, व त्यामुळें त्याचें चित्त निःशंक झालें. ते दोघेही मोठ्या आनंदानें राजमंदिराजवळ गेले. तेथें एक सुंदर घर होतें. त्यांत एक वृद्ध स्त्री होती. तिला विचारून, त्या नम्र स्त्रीनें आज्ञा दिली असतां, ते दोघे वसतीकरितां त्यांत शिरले. कांहीं वेळ विश्रांति घेऊन काय युक्ति योजावी, हें ठरविण्याकरितां नरवाहनदत्त तिला म्हणाला,–" बाई, येथें राजा कोण आहे, त्याला अपत्य काय आहे, व त्याचें रूप कसें काय आहे, तें मला सांग; कारण आम्ही परदेशी आहोंत."

## ५. कर्पूरिकेचा वृत्तान्त.

राजपुत्राचा हा प्रश्न ऐकून व त्याचें तें अद्भुत सौंदर्य पाहून ती म्हणाली,–" पुत्रा, मी सर्व सांगतें ऐक. येथें कर्पूरक नामक राजा आहे. त्याला पुष्कळ दिवस कांहीं अपत्य नव्हतें. म्हणून त्यानें आपल्या बुद्धिकारी राणीसह उपोषणादि तप करून शंकराची आराधना केली. त्रिरात्र उपोषणानेंच तो आशुतोष देव प्रसन्न झाला, व त्यास स्वप्नांत दर्शन देऊन म्हणाला,–' पुत्रा, ऊठ, तुला पुत्राहूनही उत्तम अशी एक कन्या होईल. व तिच्या पतीला विद्याधरांचें साम्राज्य लाधेल.'–शंकराचा हा वरप्रसाद मिळतांच राजा प्रातःकालीं जागा झाला. आपल्या अर्धांगीला स्वप्नवृत्तांत सांगून त्यानें व्रतसमाप्ति केली. थोड्याच दिवसांनीं बुद्धिकारी गर्भवती झाली. नंतर योग्य समयीं ती प्रसूत होऊन तिला सर्वांगसुंदर कन्या झाली. पित्यानें तिचें नांव कर्पूरिका असें ठेविलें. लोकांच्या मनास आनंद देणारी ती उत्तरोत्तर मोठी होतां होतां, आतां तर ती भर तारुण्यांत आली आहे. पिता तिचा विवाह करण्याची इच्छा करीत असतो, पण पुरुषांचा द्वेष करणारी ती कन्या विवाहाच्या अगदीं विरुद्ध आहे.

माझी कन्या तिची सखी आहे. एकदां तिनें विवाह न करण्याचें कारण तिला विचारलें, तेव्हां ती म्हणाली,–" सखे, मला पूर्व जन्माचें स्मरण आहे. तूं आतां अगोदर माझ्या पूर्वजन्माचें वृत्त ऐक. म्हणजे मी विवाहाची इच्छा कां करीत नाहीं, तें तुला कळेल."–असें बोलून त्या राजकन्येनें आपला पूर्ववृत्तांत पुढीलप्रमाणें सांगितला.—

## कर्पूरिकेचें पूर्वजन्मवृत्त.

महासागराच्या तीरावर एक मोठा चंदनवृक्ष आहे. त्याच्या जवळच एक सुंदर सरोवरही आहे. प्रफुल्लित कमलांच्या योगानें तें सदा अलंकृत झालेलें असतें. त्या सरोवरांत मी पूर्वकर्मानुरूप हंसी होऊन राहिलें होतें. तेथल्याच एका हंसाची मी पत्नी झालें. एकदां मी गर्भवती झालें आहें, असें कळतांच पतीसह मी त्या चंदनवृक्षावर एक सुरेख घरटें बांधिलें. कांहीं दिवसांनीं त्यांतच मला दोन-तीन पोरें झालीं. तीं मला माझ्या प्राणांहूनही अधिक प्रिय वाटत होतीं. मी आपल्या लाडक्यांसहवर्तमान त्या घरट्यांतच अहोरात्र रहात असें; पण एकदां एकाएकीं एक मोठी समुद्राची लाट आली, व तिनें माझ्या डोळ्यां देखत माझ्या प्रिय बालकांना ओढून नेलें. खरोखर ती समुद्राची लाट नसून यमाचा पाहिजे तेथें पोंचणारा हातच आहे, असा मला भास झाला. तेव्हां मी आक्रोश करूं लागलें, अन्न सोडलें, व आपल्या शरीरालाही कंटाळलें. तेथेंच एक शिवलिंग होतें, त्याच्या समोर मी एकसारखी रडत बसलें. इतक्यांत माझा पति–हंस तेथें आला व मला म्हणाला,–" मेलेल्या पोरांकरितां तूं उगीच कां रडतेस ! तीं कांहीं आतां रडून येणार आहेत ! आम्हांला आणखी दुसरीं होतील. जिवंत असल्यास सर्व मिळवितां येतें."*

सखे, माझ्या त्या पतीचे हे शब्द मला शल्यासारखे मर्मभेदक वाटले व मीं मनांत म्हटलें,–" अरेरे, या पापी पुरुषांना सर्वस्वी धिक्कार असो. कारण ते आपल्या अति लहान बालकांविषयींही असे निःस्नेह असतात, व भक्तिमती स्त्रियांविषयींही निष्कृप होतात. त्यांना केवल आपल्या सुखापुरत्या बायका व पोरें हवीं असतात. त्यांच्या संसर्गानें थोडासा

* सर्वं जीवद्भिराप्यते ।

त्रास झाला, कीं ते त्यांना इतके कंटाळतात, कीं हीं सर्व मरतील तर बरें होईल, असेंही म्हणतात. तर मला असल्या या निर्दय पतीला अथवा या दुःखी नश्वर देहाला घेऊन काय करावयाचें आहे? असें म्हणून मीं मोठ्या भक्तीनें त्या देवाचें ध्यान केलें. त्याला नमस्कार केला, व तो माझा पति पहात असतांना, त्याच्या समक्षच, दुसऱ्या जन्मीं मी जातिस्मरा राजकन्या होईन, असा दृढ निश्चय धरून आपलें शरीर सागरांत फेकलें. माझ्या त्या अंत्य भावनेप्रमाणेंच मी या जन्मीं राजकन्या झालें आहे. पूर्वजन्मींच्या पतीचा निर्दयपणा आठवत असल्यामुळें माझें मन आतां कोणत्याच वराचे ठायीं आसक्त होत नाहीं. या क्षणापर्यंत विवाह करूं नये, अशीच माझी इच्छा आहे. पुढें काय होईल तें कांहीं माझ्यानें आज सांगवत नाहीं. कारण या सर्व गोष्टी दैवाधीन आहेत.

राजकन्येनें अशी आपली कथा माझ्या कन्येला सांगितली व तिनें घरीं येऊन ती मला सांगितली. मीं आज तीच तुला सांगितली आहे. तूं सर्व विद्याधरांचा चक्रवर्ती होणार आहेस, यास्तव ती तुझीच भार्या होईल. कारण शंभूनें वर देतांना तसेंच सांगून ठेविलें आहे. तुझ्या अंगावर चक्रवर्ती पुरुषाचीं चिन्हें मला दिसत आहेत. मला वाटतें कीं, विधात्यानें त्याकरितांच तुला येथें पाठविलें आहे. असो; तर आतां ऊठ, भोजन कर, व माझ्या येथेंच रहा. मीही आपल्याकडून यथाशक्ति प्रयत्न करीन."

## ६. कर्पूरिकेचें आनुकूल्य.

असें सांगून रात्रीं त्या वृद्ध स्त्रीनें त्याला उत्तम भोजन घातलें, व तो दीर्घ प्रवासानें थकलेला वत्सराजपुत्र गोमुखासह तेथेंच निजला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं काय करावयाचें त्याचा गोमुखासह एकांतांत निश्चय करून, राजपुत्रानें महाव्रतिकाचा वेष घेतला, व आपल्या मित्रासह तो 'हा हंसि, हा हंसि!' असें वारंवार म्हणत सर्व लोकांसमक्ष राजद्वारांत फिरूं लागला. तेव्हां त्याची ती अवस्था पाहून चेटिका आश्चर्यचकित झाल्या, व कर्पूरिकेकडे जाऊन त्या सांगूं लागल्या कीं,–देवि, सिंहद्वारावर एक महाव्रती तरुण आला आहे. तो सद्वितीय (दुसऱ्या एका मित्रासह) असला तरी सौंदर्यानें अद्वितीयच आहे. स्त्रीजनाच्या मनास मोह पाडणारा 'हा हंसि, हा हंसि' असा मंत्र तो अहर्निश म्हणत असतो.

चेटींनीं सांगितलेला हा अद्भुत वृत्तांत ऐकून, पूर्व जन्मीं हंसी असलेल्या कर्पूरिकेला त्याचें मोठें कौतुक वाटलें, व तिनें त्याला आपल्यापाशीं आणविलें. जवळ येतांच तिनें त्याला शंकराच्या आराधनेकरितां महाव्रत घेतलेल्या नूतन कामदेवाप्रमाणेंच पाहिलें. उद्दाम रूपानें अलंकृत झालेल्या त्याचा तो व्रतिक-वेष पाहून तिचें मन क्षुब्ध झालें. ती धीर कन्या त्याच्याकडे टक लावून पाहूं लागली, व 'हा हंसि हा हंसि' असें तूं हें काय बडबडत आहेस? असें ती त्याला मोठ्या कौतुकानें विचारूं लागली. पण नरवाहनदत्त एकाद्या उन्मत्तासारखा 'हा हंसि' ह्या शब्दावांचून दुसरें कांहींच बोलत नाहीं, असें पाहून त्याच्या बरोबरचा गोमुख तिला म्हणाला,—" देवि, मी याचें कारण संक्षेपतः सांगतों तें ऐक. पूर्वी हा एक हंस असून समुद्राच्या कांठीं एका मोटया सरोवरापाशीं चंदनाच्या झाडावर घर करून आपल्या प्रिय हंसीसह रहात असे. पुढें त्याची प्रिया तेथेंच प्रसूत झाली; पण निर्दय समुद्रानें तिचीं पिलें काटेबरोबर नेलीं. त्यामुळें हंसीला असह्य दुःख झालें, व तिनें त्याच समुद्रांत जीव दिला. तें पाहून यालाही फार वाईट वाटलें, व प्रियेचा वियोग असह्य झाला. त्याला प्राणही नकोतसे झाले व शरीरत्याग करण्याच्या इच्छेनें तेथील शिवलिंगासमोर जाऊन—'मी दुसऱ्या जन्मीं जातिस्मर राजपुत्र व्हावें, व या माझ्या प्रियेनेंही तेथें माझी जातिस्मर भार्या व्हावें'—असा दृढ निश्चय केला. आणि हंसीनें जेथें आपलें शरीर टाकलें होतें, तेथेंच यानेंही आपल्या पक्षिदेहाचा त्याग केला. त्यानंतर आतां हा कौशांबी नगरींत वत्सराजाच्या येथें त्याच्या वासवदत्ता-नामक भार्येच्या ठायीं शंकराच्या प्रसादानें झाला आहे. याचें नांव नरवाहनदत्त. याला पूर्वजन्माचें स्मरण आहे. याच्या जन्मकालीं 'हा राजपुत्र विद्याधरांचा चक्रवर्ती होईल' अशी स्पष्ट आकाशवाणी झाली. सर्व विद्यांमध्यें पारंगत असलेल्या या योग्य पुत्राला उदयनराजानें युवराज केलें आहे. कांहीं कारणानें या लोकीं उत्पन्न झालेल्या दिव्य मदनमञ्चुकेशीं याचा पहिला विवाह झाला. त्यानंतर कांहीं दिवसांनीं हेमप्रभ विद्याधरपतीच्या रत्नप्रभा कन्येनें स्वतः येऊन याला वरलें; पण त्या हंसीचें स्मरण होत असल्यामुळें, याच्या चित्ताला अद्यापि समाधान वाटत नाहीं.

मी याचा बालपणचा जिवलग मित्र आहें, म्हणून त्यानें हें आपलें रहस्य मला एकदां सांगितलें."

नुक्तेच आम्ही सर्व मृगयेकरितां वनांत आलों असतां, दैववशात् याला एक सिद्धतापसी भेटली. मीही तेव्हां याच्याजवळ होतों. तिनें या सर्व पूर्व वृत्तांताचें स्मरण करून देऊन–' तुझी हंसी महासागराच्या पलीकडे कर्पूरिका या नांवाची राजकन्या झाली आहे, तूं तिच्याकडे जा, म्हणजे ती तुझी भार्या होईल, ' असें सांगितलें. व ती आकाशांतून उडून गेली आहे असें पाहून, हा माझ्यासह, कोणाला न विचारतांच इकडे यावयास निघाला. तुझ्या स्नेहानें आकर्षण केल्यामुळें आपल्या जीविताचा पण करून, हा दिव्य पुरुष अनेक संकटांतून पार पडून, समुद्रतीरावरील हेमपुरास येऊन पोंचला. तेथें याला राज्यधर नांवाचा सुतार भेटला. त्यानें आमचें उचित आतिथ्य करून, या द्वीपास येण्याकरितां वातयंत्र दिलें. साक्षात् सागराप्रमाणें भयंकर असलेल्या त्या विमानांत बसून आम्ही घोर समुद्राचें उल्लंघन केलें, व या दिव्य नगरांत येऊन पोंचलों. राजकन्ये, एवढ्यासाठीं हा वारंवार ' हा हंसि ' असें म्हणत आहे. देवि, तुजजवळ येईपर्यंत हा माझा स्वामी वेडयासारखा झाला होता; पण आतां तुझ्या आननरूपी पूर्णचंद्राचें दर्शन झाल्यामुळें, याचा दुःखरूपी अंधकार पार नाहींसा झाला आहे. यास्तव, आतां तूं या अतिथीचें आपल्या दृष्टिरूपी नीलकमलांच्या मालेनें पूजन कर."

इतकें सांगून गोमुख मुकाट्यानें बसला, व तें सर्व ऐकून, पुष्कळ गोष्टींचा प्रत्यय आल्यामुळें तिचाही त्याच्या सांगण्यावर विश्वास बसला. ती मनांत म्हणाली,–" अरेरे, माझ्या प्रिय प्राणनाथाचा मजवर इतका स्नेह असतांना मीं उगीच त्याला दोष दिला, व त्याच्या विषयीं विरक्त झालें. या माझ्या आर्यपुत्रानें दोन्हीं जन्मांत मजकरितां इतके क्लेश सोशिले, त्या अर्थी मी खरोखरच धन्य आहें.–" असें मनांत बोलून, ती त्यास उघड म्हणाली–'मी आज तुमची प्रेमानें विकत घेतलेली दासी झालें आहें.'

## ७. राजपुत्राचा विवाह व कौशांबीस परत येणें.

त्यानंतर त्या भाग्यवतीनें नरवाहनदत्ताला स्नानादिकांच्या योगानें संतुष्ट केलें. परिजनांच्या तोंडून तिच्या पित्याला जेव्हां हा वृत्तांत कळला, तेव्हां तोही त्याच्यापाशीं आला. आपल्या कन्येला विवाहाची इच्छा झाली आहे, व नरवाहनदत्त हा तिला योग्य वरही अनायासानें व मोठ्या भाग्यानेंच मिळाला आहे; शंकराच्या वराप्रमाणें तो सर्व चक्रवर्ति चिह्नांनीं युक्त आहे असें जाणून, कर्पूरक राजा आपल्याला धन्य मानूं लागला त्यानें नरवाहनदत्ताला यथाविधि कन्यादान दिलें. त्याचा मोठा सत्कार केला. प्रत्येक अग्नि-प्रदक्षिणेच्या वेळीं एकेक कोटी याप्रमाणें त्यानें त्याला तीन कोटी सुवर्ण व तितकाच कापूर दिला. त्यांच्या राशीकडे पाहून पार्वतीचा विवाह पाहिलेले मेरू व कैलासच-तेथें आले आहेत, असा भास झाला. कर्पूरक राजानें असंख्य वस्त्रें, अलंकृत-दासी व अगणित वाहनें त्याला अर्पण केलीं.

साक्षात् प्रीतीच अशा त्या कर्पूरिकेशीं विवाह करून, उदयनसुत कांहीं दिवस तेथें आनंदानें राहिला. मोगरीची लता व वसंतसमय यांच्या संगमाप्रमाणें त्या दोघांचा संगम त्या सर्वांस प्रिय वाटला. श्वशुराच्या येथें कांहीं दिवस पाहुणचार घेतल्यावर तो आपल्या कर्पूरिका प्रियेला म्हणाला,—“ आपण आतां आपल्या कौशांबी राजधानीस जाऊं चला; कारण माझे सर्व आप्त मजकरितां सचिंत झाले असतील.”—आपल्या प्राणनाथाचें हें म्हणणें तिनें मान्य केलें, व ती लागलीच म्हणाली,—“ तर मग प्रिया, आपल्या त्या आकाशगामी विमानांतून आजच आपण सत्वर कां जाऊं नये ? तें लहान आहे असें वाटत असल्यास मी दुसरें मोठें करवितें; कारण प्राणधर या नांवाचा यंत्रविमानें करणारा एक कुशल सुतार परदेशांतून येऊन येथें राहिला आहे ”

तिच्या या योग्य सूचनेला नरवाहनदत्तानें अनुमोदन दिलें. तेव्हां कर्पूरिकेनें प्रतीहाराला पाठवून एक मोठें विमान तयार करण्याविषयीं प्राणधराला आज्ञा केली. व चेटीच्या तोंडून तो वृत्तांत आपल्या पित्याला कळविला. तेव्हां आपली प्राणाहून प्रिय असलेली कन्या आज सासरीं जाणार, असें जाणून मनांत अतिशय खिन्न झालेला कर्पूरक लागलाच तिच्या अंतःपुरांत यावयास निघाला. इकडे राज्यधरानें सांगितलेला, व राजाच्या

भीतीनें पळालेला तोच हा त्याचा भाऊ प्राणधर असावा, असें नरवाहनदत्त आपल्या मनांत जों म्हणत आहे, तोंच प्रथम राजा व त्याच्या मागोमाग साक्षात् तोच कारागीर तेथें आला व हात जोडून म्हणाला,–"हजार मनुष्यें सहज जातील एवढें मोठें एक विमान माझ्याजवळ तयार आहे." तें ऐकतांच 'ठीक ठीक; फार चांगलें,' असें म्हणून नरवाहनदत्त मोठ्या आदरानें 'राज्यधराचा ज्येष्ठ भ्राता व मोठमोठ्या अनेक विचित्र यंत्रकलांना जाणणारा प्राणधर तूंच काय?' असें विचारूं लागला. तेव्हां 'होय सरकार,' मीच तो. पण आपल्याला आमचीं नांवें कशीं कळलीं?' असें प्राणधर नम्रपणें म्हणाला. तेव्हां त्या राजपुत्रानें त्याची व आपली कोठें व कशी गांठ पडली, तें सांगून त्यानें वर्णिलेला सर्व वृत्तांतही संक्षेपतः त्यास निवेदन केला. तो ऐकून प्राणधराला मोठा आनंद झाला. त्यानें तें मोठें विमान त्याला आणून दिलें, व कर्पूरक राजाच्या आज्ञेनें निघण्याची सर्व तयारी झाली. नरवाहनदत्ताच्या श्वशुरानें कन्या व जामात यांचे सर्व मंगलकारक सोहाळे केले. राजानें प्राणधरालाही त्यांच्या बरोबर जावयाची आज्ञा दिली. त्यानें सज्ज केलेल्या विमानांत दासी, वाहनें, सोनें, कापूर इत्यादि सर्व पदार्थ घातले. सुमुहूर्तावर सर्वांनीं मोठ्या कष्टानें त्यांना जाण्याची आज्ञा दिली. आणि आईबापांना सोडतांना व्याकुल झालेली कर्पूरिका, केवल पतिस्नेहानें बलात्कारानें ओढल्यामुळेंच आपल्या अंतःपुरांतून बाहेर पडली. आजपर्यंत मीं या माझ्या लाडकीचें पुत्राप्रमाणें पालन केलें, आतां यापुढें तिचे धनी तुम्हीं आहां, तेव्हां तिला आमची आठवण येणार नाहीं, अशा अवस्थेत ठेवा, असें स्फुंदस्फुंदत सांगणाऱ्या सासूच्या व मनांतल्या मनांत व्याकुल झालेल्या श्वशुराच्या पायांवर आपलें उत्तमांग नम्र करून, नरवाहनदत्त, गोमुख व ती नववधू यांसह त्या अद्भुत विमानांत येऊन बसला. त्यावेळीं त्या उदारानें योग्य स्त्रीपुरुषांस वस्त्रादिदानें देऊन–'प्राणधरा, अगोदर समुद्राच्या तीरावरील तुझ्या राज्यधर भ्रात्याकडे व नंतर कौशांबीस चल'–अशी त्या वैमानिकास आज्ञा केली. त्याबरोबर तें यंत्रमय विमान आकाशांत उडून वेगानें उत्तरेकडे चाललें. तें दृष्टि–आड होईतों कर्पूरिकेची दृष्टि राजवाड्याकडे व राजा–राणी इत्यादिकांची दृष्टि त्याच्याकडे अगदीं एकसारखी लागली होती. खरोखर इष्टजनवियोग असह्य आहे.

थोड्याच वेळानें तें विमान समुद्राच्या उत्तर-तीरावरील हेमपुरास जाऊन पोंचलें. तेथें त्यांनीं राज्यधराची भेट घेतली. ज्येष्ठ भ्रात्याचें दर्शन झाल्यामुळें त्याला अतिशय आनंद झाला. राजपुत्रानें त्याच्या सेवेकरितां कांहीं दासी दिल्या, व त्याला विचारून, नेत्रांत अश्रू आणून त्यानें मोठ्या कष्टानें सोडलेल्या त्याच्या भावासह युवराज त्याच विमानांतून कौशांबीस जावयास निघाला.

बऱ्याच वेळानें तें वेगवान् वाहन कौशांबीस जाऊन पोंचलें, व नरवाहनदत्ताच्या आज्ञेनें प्राणधरानें तें भर नगरांत राजमंदिराच्या पुढील पटांगणांत उतरविलें. तेव्हां त्या विमानांतून अनुचर व नूतन स्त्री यांसह सुखरूपपणें आलेल्या राजपुत्रास पाहून तेथील सर्व जन विस्मित झाले. पौरांच्या उत्साहावरूनच पुत्र आला आहे, असें जाणून वत्सेश संतुष्ट झाला. पत्नी, स्नुषा व सचिव यांसह राजा त्याचें अभिनंदन करण्याकरितां पुढें आला. तों विमानवाहनावरूनच ज्यानें आपलें भावि खचर साम्राज्य सुचविलें आहे, असा तो सत्पुत्र नव्या वधूसह जवळ येऊन, त्याच्या चरणांवर नम्र झाला. पद्मावतीसह वासवदत्तेनें त्याला आलिंगन दिलें; व त्याच्या अदर्शनामुळें झालेलें दुःख नेत्राश्रूंच्या योगानें निःशेष काढून टाकलें. प्रेमामुळें ज्यांचा सवतीमत्सर पार नाहींसा झाला आहे, अशा आनंदित रत्नप्रभेनें व मदनमंचुकेनें आपापल्या हातांनीं त्याचे चरण व हृदयानें हृदय घट्ट धरिलें. यौगंधरायणादिक पितृसचिव व नम्र झालेले आपले सचिव यांस त्यानें योग्य सत्कारानें आनंदित केलें. साक्षात् लक्ष्मीसारख्या व तरुण शंभर दासींनीं युक्त असलेल्या नववधूचें वत्सेशादिकांनीं अभिनंदन केलें. तिच्या पित्याच्या प्रतीहारानें विमानांतून आणलेलें सोनें, वस्त्रें व कापूर यांचें समर्पण केलें असतां, उदयनानेंही त्याचा उचित सत्कार केला. नरवाहनदत्तानें विमान करणाऱ्या प्राणधराची व वत्सेशाची ओळख करून दिली. तेव्हां उपकार करणाऱ्या त्या सुताराचाही राजानें मोठा सन्मान केला. त्यानंतर वासवदत्तेच्या अंतःपुरांत सर्व परिवारासह स्वस्थ चित्तानें जाऊन बसल्यावर 'ही राजकन्या कशी प्राप्त झाली व तुम्ही दोघे येथून कसे गेलां' असें वत्सेश्वरानें मोठ्या हर्षानें विचारलें. तेव्हां गोमुखानें-'वनांत शिकारीला गेल्यापासून तपस्वीनीचें दर्शन कसें झालें, पहिल्या रात्रीं घोडे कसे मेले, दुसऱ्या

दिवशीं सायंकाळीं सुंदर सरोवर कसें लागलें; तेथें राजपुत्राला पहाटेस स्वप्न कसें पडलें; तिसऱ्या दिवशीं तें अद्भुत नगर कसें लागलें; राज्यधराची भेट कशी झाली, त्याच्या विमानयुक्तीनें समुद्र तरून कसे गेलों; विवाहाच्या विरुद्ध असलेल्या कर्पूरिकेला युक्तीनें कसें अनुकूल करून घेतलें, व प्राणधराच्या यंत्रयुक्तीनें फिरून तेथें कसे आलों, तो सर्व वृत्तांत आपल्या धन्याला सांगितला.'—तेव्हां–"शिकार कोठें, तापसी कोठली, समुद्रतीरीं यंत्रवेत्ता सुतार कोठचा, त्याच्या विमानयुक्तीनें सागराचें उल्लंघन करणें कोठें व पलीकडे दुसऱ्या तसल्याच कारागीराची गांठ पडून पुन: सत्वर परत येणें कोठें, कशास कांहीं ठिकाण नाहीं. भाग्यवानांच्या शुभ सिद्धींच्या उपायांची चिंता स्वत: विधीच करीत असतो."*–असें तेथील सर्वजण माना डोलवून कौतुकानें म्हणाले,–गोमुखाच्या प्रभु–भक्तीचीही त्या सर्वांनीं स्तुति केली. पतिव्रता–धर्मानें जिनें सर्वांस संतुष्ट केलें आहे, अशा रत्नप्रभा–राणीची, तिनें आपल्या विद्येची योजना करून पतीचें मार्गामध्यें संरक्षण केल्यामुळें, सर्व प्रशंसा करूं लागले. असो.

त्यानंतर कर्पूरक राजाकडून आलेल्या वस्तूंची योग्य व्यवस्था लावून सर्व स्त्रीपुरुष आपापल्या स्थानीं गेले. दीर्घ प्रवास करून आलेल्या सर्वांनीं स्नान–भोजनादि करून विश्रांति घेतली; व सर्व प्रकारचें स्वास्थ्य झाल्यावर प्राणधर प्रतीहारासह नरवाहनदत्ताकडे येऊन म्हणाला–" देव, कर्पूरक राजानें आम्हां दोघांना 'यांना पोंचवून सत्वर परत या' असें सांगितलें आहे. कारण आम्हीं गेलों म्हणजे कर्पूरिका आपल्या पतीच्या येथें सुखरूपपणें जाऊन पोंचली, असें त्याला कळेल. यास्तव आम्हाला आतां शीघ्र निघालें पाहिजे. कर्पूरिकेकडून एक स्वहस्तलिखित पत्र त्या राजाला देववा. त्यावांचून अपत्यवत्सल कर्पूरक महाराजांच्या हृदयास समाधान वाटणार नाहीं. मी तेथें जाऊन, पत्र देऊन, प्रतीहारीला तेथें सोडून व आपल्या कुटुंबाला घेऊन येथें परत येईन; कारण हे अमृतमय चरण सोडून रहाण्यास मी समर्थ नाहीं."

* भव्यानां शुभसिद्ध्युपायरचनाचिन्तां विधत्ते विधिः ।

प्राणधराचें हें युक्त वचन ऐकून वत्सराजपुत्रानें कर्पूरिकेला पत्र लिहावयास सांगितलें. तेव्हां 'बाबा, माझ्याबद्दल तुम्हीं तिळभरही काळजी करूं नका. माझ्या स्वामीच्या सौख्यगृहामध्यें मी यथेच्छ सुख भोगीत आहें, महासागरांतून निघून पुरुषोत्तमाचा आश्रय करणाऱ्या कमलेची कधीं कोणी काळजी केली आहे का?' अशा अर्थाचें एक पत्र आपल्या हातानें लिहून प्राणधराजवळ दिलें. नंतर वत्सेशाची आज्ञा घेऊन, युवराजानें सत्कारपूर्वक विसर्जन केलें असतां, ते दोघे कर्पूरसंभवपुरास गेले. तेथें पोंचतांच 'कर्पूरिका सुखरूपपणें जाऊन पोंचली ! असें सांगून त्यांनीं तिचें पत्र कर्पूरकराजाला दिलें. त्यांतील मजकूर वाचून त्या प्रेमळ पित्याला मोठा आनंद झाला; पण कन्येच्या वियोगाचें स्मरण झाल्यानें दुःखही वाटलें. आणि नेत्रांतून शीत आनंदाश्रूंबरोबर दुःखाचे उष्ण अश्रूही आले. असो, दुसऱ्या दिवशीं त्या आश्रयदात्याची आज्ञा घेऊन, प्राणधर आपल्या कुटुंबासह तेथून निघाला, व मार्गामध्यें राज्यधराला भेटून नरवाहनदत्ताकडे आला. तेव्हां कार्य करून परत आलेल्या प्राणधराला राजपुत्रानें आपल्या मंदिराजवळच रहावयास चांगली जागा व चांगल्यारीतीनें निर्वाह होईल इतकें वेतन नियत करून दिलें.

त्यानंतर त्या कुशल सुतारानें केलेल्या निरनिराळ्या विमानांतून आपल्या प्रिय भार्येसह तो युवराज नित्य विहार करीत असे. त्यामुळें पुढें प्राप्त होणाऱ्या विद्याधरांच्या चक्रवर्तित्वाच्या वेळीं अवश्य असलेल्या गगनगतीचा तो जणुं काय अभ्यासच करीत आहे, असें वाटे. याप्रमाणें सुहृत्, स्वजन व अंतःपुरवर्ग यांस आनंदित करीत वत्सेश्वराचा पुत्र आपल्या तीन दिव्य भार्यांसह सुखानें काल घालवूं लागला.


७. रत्नप्रभालंबक समाप्त.

वैष्णव दानवेंद्राचें तें भाषण ऐकून ' खरें आहे ' असें म्हणून इंद्राची निंदा करीत नारद तेथून निघून गेला. त्यानंतर शुक्र त्या दानवेश्वरास म्हणाला,–'या कार्यांत इंद्राशीं भयंकर वैर करावें लागणार, असें दिसतें; पण प्रसन्न झालेला शंकर आमच्या पक्षांत असल्यामुळें तो आम्हांला कांहीं करूं शकणार नाहीं.' शुक्राच्या या भाषणाची सर्वांनीं प्रशंसा केली, व बलीला विचारून ते सर्व स्वस्थानीं गेले. मय, सुनीथ व सूर्यप्रभादिकही बलीला प्रणाम करून आपल्या घरीं परत आले. तेथें उचित आहार-पानादि करीत असतांना लीलावती आपल्या सुनीथ पुत्राला म्हणाली,–' पुत्रा, या तुझ्या भार्या मोठमोठ्यांच्या कन्या आहेत, हें तुला ठाऊक आहे ना ? धनेशाची तेजस्वती, तुंबुरूची लीलावती, व चंद्रप्रभाच्या शरीरानें तूं जिच्याशीं विवाह केलास, तीही प्रभास वसूची कन्या कीर्तिमती, अशा या तिघी भार्यांचे ठायीं तूं समदृष्टि ठेव.' इतकें बोलून तिनें त्या तिन्ही भार्या त्याच्या स्वाधीन केल्या. नंतर त्या दिवशीं रात्रीं तो ज्येष्ठ भार्येसह शय्यागृहांत गेला, व फार दिवसांपासून उत्सुक झालेल्या तिच्याशीं यथेच्छ क्रीडा करीत राहिला.

## ८. सूर्यप्रभाचे दानवकन्यांशीं विवाह.

सूर्यप्रभ सचिवांसह दुसऱ्या एका वासगृहांत स्त्रीवांचूनच जाऊन निजला; पण आपल्या अनुरक्त भार्यांनाही बाहेर सोडून येणाऱ्या या निःस्नेह राजपुत्रापाशीं जाऊन काय करावयाचें आहे, असें म्हणून जणुं काय रागानेंच, निद्राही त्याच्याकडे आली नाहीं. कार्याच्या चिंतेंत पडलेल्या प्रहस्तालाही झोंप येईना. बाकीचे सगळे तेथें स्वस्थ घोरत पडले होते; इतक्यांत त्या दोघांना कोणी एक तरुण सुंदरी, सखीसह येथें येत आहे असें दिसलें. देवलोकच्या अप्सरा हिच्या पुढें निस्तेज होऊं नयेत, म्हणूनच ब्रह्मदेवानें तिला पाताळांत गुप्तपणें ठेविलें असावें, असें तिचें स्वरूप पाहून सूर्यप्रभाला वाटलें. पण ही कोण बरें असावी ? असें जों तो मनांत म्हणत आहे, तों ती त्याच्या मित्रांतील एकेका जवळ जाऊन व ते स्वस्थ निजले आहेत असें पाहून, चक्रवर्ति-चिह्नांनीं युक्त नसलेल्या त्यांना तिनें सोडलें, व त्यांच्या मध्यभागीं निजलेल्या आणि चक्रवर्ति–चिह्नांनीं युक्त असलेल्या सूर्यप्रभाला पाहून ती त्याच्या जवळ गेली, आणि सखीला म्हणाली,–' सखे, तोच हा. तर आतां तूं याच्या पायांना स्पर्श

करून याला उठीव.' त्याबरोबर तिच्या सखीनें त्याला स्पर्श केला. तेव्हां डोळे मिटून झोंपेचें सोंग घेऊन निजलेल्या सूर्यप्रभानें आपले विशाल नेत्र उघडले, आणि त्यांच्याकडे पाहून 'तुम्ही कोण व येथें कशाकरितां आलांत?' असें तो विचारूं लागला. तेव्हां त्या सुंदरीची सखी म्हणालीः—

"देव, ऐका; दुसऱ्या पाताळांत हिरण्याक्षाचा विजयी व शूर पुत्र अमील दानवाधिपति आहे. ही कलावती या नांवाची त्याची प्रिय कन्या आहे. तो आज बलीच्या येथून परत आल्यावर म्हणाला,—'मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं, पुनः जिवंत झालेला सुनीथ आज दृष्टीस पडला. सुमुंडीचा अवतार असा जो तरुण सूर्यप्रभ त्यालाही मीं पाहिलें. तो आतां विद्याधर-चक्रवर्ती होणार आहे. सुनीथाकरितां मी आज महोत्सव करितों, व ही आपली कलावती कन्या सूर्यप्रभाला देतों; कारण सुनीथ माझ्याच गोत्रांत उत्पन्न झालेला असल्यामुळें, त्याला हिचें समर्पण करितां येत नाहीं. सूर्यप्रभ त्याचा मानव जन्मांतील पुत्र आहे. यास्तव त्याच्याशीं हिचा विवाह होण्यास कांहीं प्रतिबंध नाहीं. शिवाय पुत्राचा सन्मान केला म्हणजे त्याचाच सन्मान केल्यासारखें होईल.' पित्याच्या तोंडचे हे शब्द ऐकून हिचें मन तुजकडे लागलें व त्यामुळें तुझें दर्शन घेण्याच्या लालसेनें ही येथें आली आहे."

तिच्या सखीनें सांगितलेलें हें वृत्त ऐकून, तिचा अभिप्राय जाणण्याकरितां, सूर्यप्रभ पुनः झोंपेचें सोंग घेऊन पडला. तेव्हां जागा असलेल्या प्रहस्ताजवळ जाऊन व त्याला आपला वृत्तांत सखीच्या तोंडून कळवून ती सुंदरी तेथून बाहेर पडली. इतक्यांत प्रहस्त सूर्यप्रभाजवळ आला व 'देव, जागे आहां, कीं झोंप लागली?' असें विचारूं लागला. त्याबरोबर सूर्यप्रभ डोळे उघडून म्हणाला,—"मित्रा, मी जागाच आहें. मी आज एकटाच असल्यामुळें मला झोंप येत नाहीं. शिवाय आणखी एक चमत्कार तुला सांगावयाचा आहे. कारण तुजपासून गुप्त ठेवण्यासारखें काय आहे? आतांच एक अतिशय रमणीय कन्या येथें आपल्या सखीसह आली, व मला आपलें दर्शन देऊन माझें मन हरण करून घेऊन बाहेर गेली. ती कोठें आहे पहा बरें."

तें ऐकतांच प्रहस्त बाहेर आला. तों त्याला ती सुंदरी दिसली. ती आपल्या सखीशीं हळू हळू कांहीं बोलत उभी होती. तिच्यापाशीं जाऊन

तो म्हणाला,—"मी तुझ्या सांगण्यावरून स्वामीचें मन वळविलें आहे. तर आतां तूंही त्याला माझ्या आग्रहामुळें पुनः दर्शन दे. नेत्रांस कृतार्थ करणारें त्याचें स्वरूप पुनः पहा. केवल दर्शनानेंच वश झालेला तोही तुला पुनः डोळे भरून पाहूं दे. त्याला चांगलें जागें करून जेव्हां मी तुजविषयीं सांगितलें, तेव्हां तो म्हणाला,—'तिला, ती असेल तेथून घेऊन ये. नाहींपेक्षां मी जिवंत रहाणार नाहीं.' असें सांगून त्यानेंच मला पाठविलें आहे. तर आतां तूं स्वतः आंत चल." प्रहस्ताचें हें म्हणणें ऐकून कन्यांना सुलभ असलेल्या लज्जेमुळें ती एकाएकीं आंत जाण्यास धजेना. तेव्हां त्यानें तिला आपल्या हातांत धरून सूर्यप्रभाजवळ नेलें. ती समीप आली आहे असें पाहून, सूर्यप्रभ म्हणाला,—'सुंदरि, मी निजलों असतांना मजजवळ येऊन माझें मन चोरून नेणें तुला शोभतें कां! आतां आम्हीं तुला येथें बांधून ठेवणार; कारण चोरांना आम्हीं नेहमीं तीच शिक्षा देत असतों.'

कामी सूर्यप्रभाचें तें युक्तिवचन ऐकून तिची चतुर सखी त्याला म्हणाली, "देव, ही मन हरण करणारी चोरी आहे, असें जाणून हिच्या पित्यानें पूर्वींच प्रेमरज्जूंनीं बांधून हृदय—कारागारांत अडकवून ठेवण्याकरितां हिला तुमच्या स्वाधीन करण्याचा निश्चय केला आहे. तेव्हां आतां आपल्याला, प्रतिबंध कोण करणार ? पण हिला चोरी करावयास लावणाऱ्या कामाचा निग्रह आपण प्रथम कां करीत नाहीं. कामनिग्रह केल्यावर तिचा निग्रह सहज होईल."

सखीचें हें अनुकूल भाषण ऐकून सूर्यप्रभ तिला आलिंगन देण्याची इच्छा करूं लागला. पण कलावती लज्जेनें—'नको नको, आर्यपुत्र, असें नको मी अद्यापि कन्या आहें,' असें म्हणून त्याचा निषेध करूं लागली. तेव्हां प्रहस्त म्हणाला,-'देवि, तूं कांहीं मनांत विकल्प धरूं नकोस. सर्व विवाहांत गांधर्वविवाह उत्तम आहे.' इतकें बोलून प्रहस्त सर्वांना घेऊन बाहेर गेला व सूर्यप्रभानें कलावतीला आपली पत्नी केलें. मनुष्यलोकीं दुर्लभ असें सुख त्या वीरानें त्या रात्रीं कलावतीच्या सहवासांत अनुभविलें. सकाळीं उजाडतांच कलावती आपल्या वसतिस्थानीं गेली, व सूर्यप्रभ, सुनीथ आणि मय जेथें होते तेथें आला. तेथून ते सर्व मिळून प्रह्लादाकडे गेले. तेव्हां त्यांचा यथोचित सत्कार करून प्रह्लाद

मयास म्हणाला,-'या सुनीथाच्या उत्सवांत आपल्याला सर्वांचें प्रिय केलें पाहिजे. आपण सर्व आज एकत्र भोजन करूं या.'-

प्रह्लादाच्या या म्हणण्यास मयानें आपली संमति दिली; व सर्व असुराधिपांस दूतांच्या द्वारा निमंत्रण पाठविलें. तेव्हां योग्य वेळीं आपापल्या अनेक अनुचरांसह क्रमानें बलि, अमील, दुरारोह, सुमाय, तंतुकच्छ, धूमकेतु इत्यादि सर्व असुरेश्वर आले. परस्पर वंदन करून ते बसले असतां, प्रह्लादानेंही त्यांचा योग्य सन्मान केला. भोजनाची वेळ झाली असतां, मयासह ते सर्व गंगास्नान करून एका रत्नजडितस्तंभयुक्त विशाल भोजन गृहांत गेले. तेथें त्या सर्वांनीं दिव्य नाना प्रकारचें षड्रस भक्ष्य-भोज्यादि अन्न यथेच्छ भक्षण केलें. उत्तम आसवादि पेय पदार्थांचें पान केलें. त्यानंतर ते रत्नजडित सभेंत बसून दैत्य-दानवकन्यांचें सुंदर गायन व नृत्य ऐकूं व पाहूं लागले.

त्यावेळीं पित्याच्या आज्ञेनें नाचत असलेल्या प्रह्लादाच्या महाल्लिका नामक कन्येस सूर्यप्रभानें पाहिलें. आपल्या कांतीनें दिशांस प्रकाशित करणारी व नेत्रांत अमृत-वर्षाव करणारी, ती त्याला कौतुकानें पातालांत आलेल्या साक्षात् चन्द्रमूर्तीप्रमाणेंच दिसली. तिनें आपल्या ललाटप्रदेशीं रमणीय तिलक लाविला होता; व तिच्या पायांत छुमछुम वाजणारे नूपुर होते. विधात्यानें ती जणुं काय नृत्यमयीच स्त्री निर्मिली होती. त्या सुंदरीनें, दृष्टादृष्ट होतांच, अन्य अनेक सुंदरींनीं स्ववश करून ठेवलेल्याही त्याच्या हृदयाला बलात्कारानें हरण केलें. आपलें मुग्ध चित्त दुसऱ्याच्या स्वाधीन कसें करतां येतें, हें तिला जरी त्या जन्मीं पूर्वी कधीं ठाऊक नव्हतें, तरी राक्षसांच्या सभेंत दूर बसलेल्या त्या रम्य कामतुल्य सूर्यप्रभाला पहातांच, तें नकळत निसटून गेल्यावर, तिला त्याचा अनुभव आला. त्या दोघांचीही चेष्टा (त्यांचा गूढ अभिप्राय) सर्वांच्या सहज ध्यानांत येईल, इतकी स्पष्ट होऊं लागली. तें पाहून 'ही राजकन्या आतां थकली आहे,' असें म्हणून मयादिकांनीं तिचें नृत्य पुरे करविलें, व पित्यानें 'जा' असें सांगितलें. तेव्हां सर्व असुरेश्वरांस वंदन करून सूर्यप्रभाकडे वांकड्या दृष्टीनें पहात ती आपल्या अंतःपुरांत गेली. सर्व दानवेंद्र परस्परांस विचारून आपापल्या घरीं गेले. सूर्यप्रभही सायंकाळीं आपल्या निवासस्थानीं परत आला. कलावती रात्रीं पुनः त्याच्याकडे

आली. तेव्हां सर्व अनुचरांस बाह्य कक्षेंत निजावयास सांगून तो तिच्या सहवर्तमान आंत जाऊन निजला.

इतक्यांत त्याच्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेली महल्लिका, दोघी विश्वासू सख्यांसह तेथें आली; पण त्यांची हालचाल ऐकूनच तत्क्षणीं जागृत झालेल्या सूर्यप्रभाच्या प्रज्ञाढ्य सचिवानें, आंत जाण्याची इच्छा करणाऱ्या तिला पाहिलें; व लागलाच उठून तो म्हणाला,–'देवि, जरा येथेंच उभी रहा, मी आंत जाऊन येतों.' तेव्हां 'मला हा आंत जाण्यास कां बरें प्रतिबंध करीत आहे,' असें मनांत आणून साशंक झालेल्या तिनें त्याला त्या विषयीं प्रश्न केला. तेव्हां तो चतुर मंत्री म्हणाला,–'देवि, स्वस्थपणें निजलेल्या मनुष्याजवळ एकाएकीं जाऊं नये. व्रतवशात् आमचा प्रभु एकटाच निजला आहे.' याप्रमाणें तिची समजूत करून व तिची संमति घेऊन प्रज्ञाढ्य आंत शिरला. कलावती स्वस्थ निजली आहे असें पाहून त्यानें हळुच सूर्यप्रभाला उठविलें. त्याच्या तोंडांतून महल्लिका आली आहे असें ऐकतांच, सूर्यप्रभ तेथून हळुच उठून बाहेर आला. दोघी जिवलग सख्यांसह आलेल्या त्या साक्षात् रतीसारख्या दानवकन्येला पाहून सूर्यप्रभ म्हणाला,–'या अभ्यागताला तर आज तुम्हीं कृतार्थ केलेंत. तसेंच या गृहाला व या आसनांनाही कृतार्थ केल्यास बरें होईल. असें म्हणून त्यानें त्यांना उचित आसनें दिलीं. त्यांवर त्या तिघीजणी बसल्या. त्यांच्या इच्छेप्रमाणें प्रज्ञाढ्यासह सूर्यप्रभही आसनावर विराजमान झाला. नंतर कांहीं वेळ थांबून म्हणाला,–'सुंदरि, सभेमध्यें मजकडे कटाक्षप्रचुर दृष्टीनें वारंवार पाहून तूं जरी माझी अवज्ञा केलीस, तरी तुझ्या सौंदर्याप्रमाणेंच नृत्यानेंही माझ्या नेत्रांस सफल केलें आहे.'

तें ऐकून प्रह्लादकन्या म्हणाली,–'आर्यपुत्र, त्यांत माझा मुळींच अपराध नाहीं. ज्यानें मला सभेमध्यें भग्न अभिनयामुळें लज्जित केलें, त्याचा ( म्हणजे तुझाच ) तो सर्व अपराध आहे. तिचें हें मार्मिक भाषण ऐकून 'मला तर तूं जिंकलेंस बुवा!' असें म्हणत सूर्यप्रभ हंसूं लागला. त्यानंतर राजपुत्रानें आपल्या हातानें तिचा हात धरला, त्याबरोबर त्या सुंदरीचें अंग कांपूं लागलें व सर्व शरीरास दरदरून घाम सुटला. व 'आर्यपुत्र हें काय? मला सोडा, मी पित्याच्या अधीन

आहे.' असें म्हणत ती आपला हात सोडवून घेऊं लागली. तेव्हां प्रज्ञाढ्य तिला म्हणाला,—' देवि, कन्यांचा गांधर्व विवाह होत नाहीं कीं काय ? तुझा अभिप्राय तुझ्या पित्याला कळला आहे. तेव्हां तो तुला दुसऱ्या कोणालाही देणार नाहीं. खचित तो याचाच सन्मान करील. व्यर्थ भिण्याचें कांहीं कारण नाहीं. हा तुमचा प्रथम समागम सफल झाला म्हणजे बरें.'

प्रज्ञाढ्य मल्लिकेला इतकें जों बोलत आहे, तों कलावती आंत जागी झाली. सूर्यप्रभ शय्येवर नाहीं, असें पाहून ती थोडीशी उद्विग्न व साशंक होऊन बाहेर आली, तों आपला वल्लभ मल्लिकेसह कांहीं प्रेमाच्या गोष्टी बोलत आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर कोप, भय आणि लज्जा यांच्या योगानें ती व्याकुल झाली. तिला पहातांच मल्लिकेलाही भय व लज्जा वाटली. सूर्यप्रभाला तर कांहीं सुचेना ! तो चित्राप्रमाणें स्तब्ध उभा राहिला. आतां मी पळून जाऊं, कीं लज्जित होऊन असा येथेंच उभा राहूं; कीं हिच्यावर रागावूं ? करूं तरी काय ? असें त्याला झालें. पण इतक्यांत तो त्या दोघींना घेऊन आंत गेला.

तेव्हां कलावतीही मल्लिकेजवळ जाऊन तिला टोंचून म्हणाली, ' कसें काय सखे, बरें आहे ना ? पण एवढ्या रात्रीं तूं येथें कशी आलीस ?' त्यावर मल्लिका म्हणाली,—'सखे, माझें हें घरच आहे. तूं मात्र पाताळांतून आज माझ्या येथें पाहुणी आली आहेस,' तें ऐकून कलावती हंसून म्हणाली,—' खरें आहे; तूं येथें येईल त्या पाहुण्याचें असेंच आतिथ्य करीत असतेस हें यावरून उघडच दिसतें आहे.' पण हें तिचें निष्ठुर भाषण ऐकून मात्र मल्लिकेला राग आला व ती म्हणाली, " मी तुझ्याशीं प्रेमानें बोलत असतांना तूं असे द्वेषाचे शब्द कां उच्चारतेस ? निर्लज्जे, मी तुझ्यासारखी का आहें ? रात्रीं एकांतांत गुप्त रीतीनें दुरून येऊन परस्थळीं परक्याच्या शय्येवर मी थोडीच निजलें आहें. मी आजच या दोघीजणींना बरोबर घेऊन आपल्या येथें आलेल्या या पाहुण्याला पहावयास आलें. आम्हांला बाहेर उभ्या करून जेव्हां हा मंत्री आंत आला, तेव्हांच मला संशय आला होता, तो तूं आतां पुढें येऊन घालविला आहेस."

महल्लिकेची ही दुरुक्ति ऐकून कलावती रागानें लाल झालेल्या नेत्रांनीं प्रियाकडे पहात लागलीच तेथून निघून गेली. महल्लिकाही ' हे बहुवल्लभ, (ज्याला पुष्कळ स्त्रिया प्रिय आहेत अशा) मी आतां जातें,' असें रागानें सांगून तेथून चालती झाली. हा सर्व अकस्मात् घडलेला प्रकार पाहून सूर्यप्रभाला फार वाईट वाटलें. त्याला कांहीं चैन पडेना. त्याचें चित्त दोघींच्याही ठिकाणीं एक सारखेंच आसक्त झालें होतें. आतां पुढें कलावती काय करते तें जाणण्याकरितां त्यानें प्रभासाला उठवून सत्वर मागोमाग धाडलें. त्याचप्रमाणें महल्लिकेचें पुढचें कृत्य पहाण्याकरितां प्रहस्ताची योजना केली, आणि त्यांची वाट पहात तो प्रज्ञाढ्या-सहवर्तमान जागत राहिला.

इतक्यांत कलावतीचा सर्व अभिप्राय व वृत्तांत जाणून प्रभास परत आला, आणि तो सूर्यप्रभास नम्रतेनें म्हणाला,—"देव, येथून दुसऱ्या पाताळांत असलेल्या कलावतीच्या येथें मी गेलों, व स्वविद्येनें आपल्याला झांकून घेऊन तेथें राहिलों. इतक्यांत बाहेरच्या बाजूला बोलत असलेल्या दोघी चेटींचा पुढील प्रमाणें संवाद मीं ऐकला-एक म्हणाली,—' सखे, आज तुझी कलावती अशी उद्विग्न कां झाली आहे ?' दुसरी—' सखे, त्याचें कारण सांगतें ऐक. चवथ्या रसातळांत सुमुंडीचा अवतार सूर्यप्रभ आला आहे. तो रूपानें मदनाहून अधिक रम्य असल्यामुळें हिनें स्वतः गुप्तपणें जाऊन त्याला स्वात्मा समर्पण केला. आज ही पुनः तेथें गेली असतां प्रह्लादाची कन्या महल्लिका ही तेथें आली. त्या दोघींचा तेथें कलह झाला वाटतें; त्यामुळें हिनें रागारागानें येथें येऊन आत्मघात करण्याचा निश्चय केला; पण तिच्या सुखावती नांवाच्या बहिणीनें तिला जीव देऊं दिला नाहीं. तिनें तिला मोठ्या कष्टानें आंत नेऊन शय्येवर निजविलें आहे, व तीही ' काय झालें, तूं इतकी खिन्न कां दिसतेस,' इत्यादि विचारीत तिच्याजवळ बसली आहे.

हा इतका वृत्तांत बाहेर ऐकून मी आंत शिरलों. तों कलावती व सुखावती मला अगदीं एकसारख्या दिसल्या. प्रभास इतकें सांगत आहे तों प्रहस्तही तेथें आला, व सूर्यप्रभानें प्रश्न केला असतां तो सर्व वृत्त सांगूं लागला—"देव, मी येथून जों जात आहें तों खिन्न झालेली महल्लिका बरोबरच्या दोघी दासींसह आपल्या अंतःपुरांत शिरली. मीही आपल्या

विद्यायुक्तीनें गुप्तपणें आंत गेलों. तों मला तेथें अगदीं तिच्याच सारख्या बारा सख्या दिसल्या. ती रत्नपर्यंकावर बसली असतां त्याही सर्वजणी तिच्या आजुबाजूंस बसल्या. नंतर त्यांतील एक म्हणाली,—'सखे, आज तूं अशी अकस्मात् उद्विग्न कां झालीस ? विवाहकाल समीप आला असतांनाही तुला खिन्न व्हावयास काय झालें ?' तें ऐकतांच थोडीशी विचारांत पडलेली महल्लिका म्हणाली,—'काय माझा विवाह ? आणि तो कोणाशीं होणार ? तुला अगोदर हें कळलें कसें ?'

हे तिचे प्रश्न ऐकून सर्व सख्या म्हणाल्या, "गडे, आम्ही खरेंच सांगतों. तुझा विवाह उद्यां होणार. सूर्यप्रभाला तुला देणार आहेत. तूं येथें नसतांना तुझ्या आईनें आजच आम्हांला हें सांगितलें, व तुझें मंगलकौतुक करावयाचीही आज्ञा दिली आहे. सूर्यप्रभ तुझा पति होणार, त्याअर्थी तूं धन्य आहेस. कारण त्याच्या रूपावर लुब्ध झालेल्या स्त्रीजनांना रात्रीं झोंपही येत नसते. पण आतां तूं कोठें व आम्हीं कोठें असें होणार, म्हणून आम्हांला फार वाईट वाटतें. तो भर्ता मिळाला म्हणजे तूं आम्हांला विसरशीलसुद्धां !"

हें त्यांचें हृदयहारि वचन ऐकून महल्लिका म्हणाली,—'तुम्ही त्याला पाहिलें आहे कां ? व तुमचें मन त्याच्यावर गेलें आहे कां ?' तें ऐकून त्या म्हणाल्या, 'आम्ही माडीवरून त्याला पाहिलें. त्याला पहातांच जिचें मन त्याच्यावर जाणार नाहीं अशी कोण स्त्री आहे ?' हें त्यांचें भाषण ऐकून ती दयाळु राजकन्या म्हणाली, 'तर मग मी बाबांची प्रार्थना करून तुम्हांला सुद्धां त्याला देववीन. म्हणजे आमचा परस्पर वियोग होणार नाहीं.' पण त्यावर त्या सर्वजणी म्हणाल्या,—'नको नको; तूं असें कांहीं करूं नकोस. असें करणें युक्त नव्हे. त्यामुळें आम्हांला लज्जा येईल.' तथापि महल्लिका त्यांस म्हणाली, 'सख्यांनो, तुम्ही अशा भिता कां ? त्याची मी एकटीच का भार्या होणार आहें ? येथले सर्व दैत्य व दानव त्याला आपापल्या कन्या देतील. भूलोकीं त्यानें आणखी किती तरी राजकन्या वरिल्या आहेत. विद्याधर-चक्रवर्ती झाल्यावर याला अनेक विद्याधरीही अनायासानें मिळतील. मग तुम्हीच काय अपराध केला आहे ? उलट आम्ही सर्व सख्या एकत्र सुखानें राहूं. माझ्या विरुद्ध असलेल्या दुसऱ्या सवतींशीं माझें सख्य कसें होणार ? शिवाय

तुम्हांला त्यांत लाज कसली ? सर्व व्यवस्था मी करीन.' प्रभो, अशा त्यांच्या कथा चालल्या असतांना मी निघून आलें.

प्रहस्तानें सांगितलेला हा वृत्तांत ऐकून सूर्यप्रभाला आनंद झाला व शय्येवर पडून झोंप न आल्यामुळें त्याचविषयीं नाना प्रकारचे संकल्प करीत त्यानें ती रात्र घालविली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सुनीथ, मय व सर्व सचिव यांसह तो प्रल्हादाच्या सभेंत गेला. तेव्हां प्रल्हाद मोठ्या आदरानें सुनीथास म्हणाला,–'मी आपली महल्लिका कन्या या सूर्यप्रभास देतों. कारण मला या पाहुण्याचें आतिथ्य व तुझें प्रिय केलें पाहिजे. सुनीथानेंही त्या गोष्टीला आपलें अनुमोदन दिलें. नंतर सूर्यप्रभानें महल्लिकेचें यथाशास्त्र पाणिग्रहण केलें. प्रल्हादानें जामातास अगणित द्रव्य देऊन संतुष्ट केलें. 'बाबा, माझ्या बारा प्रियसख्याही यालाच दे,' असें महल्लिका हळुच प्रल्हादाला म्हणाली,–'पण त्यावर तो म्हणाला,–'बाळे, माझ्या भावानें त्यांना बंदीवान करून आणलें आहे; तेव्हां मी त्यांना कसें देऊं ?'

असो; विवाहानंतर त्याच दिवशीं रात्रीं सूर्यप्रभ महल्लिकेसह अंतःपुरांत गेला. तें वासगृह सर्व सुंदर उपचारांनीं संपन्न होतें. तेथें त्यानें यथेच्छ सुखभोग घेतला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सभेंत गेल्यावर अमील सर्वांस म्हणाला,–'आज तुम्हीं सर्वांनीं माझ्या येथें यावें; मी सूर्यप्रभाचा योग्य सत्कार करणार आहें. तुमची संमति असल्यास मी आपली कलावती कन्या त्याला देईन.' या त्याच्या म्हणण्यास सर्वांनीं अनुमोदन दिलें, व त्याच्या येथें येण्याचें कबूल केलें. त्यानंतर योग्य समयीं ते दुसऱ्या पाताळांत गेले; तेथें पूर्वी स्वतःच जाऊन आपलें समर्पण केलेल्या कलावतीचें अमीलानें सूर्यप्रभास दान दिलें. यथाशास्त्र सर्व क्रिया झाल्या. भोजनोत्तर नाना प्रकारच्या क्रीडा करण्यांत त्यांचा तो दिवस गेला. त्याच्या दुसऱ्या दिवशीं दुरारोह असुरेश्वरानें सूर्यप्रभादिकांस आपल्या पांचव्या रसातळास नेऊन, तेथें कुमुदावती–कन्येचें दान सूर्यप्रभास दिलें; त्याच्या दुसऱ्या दिवशीं तंतुकच्छानें आपली मनोवती त्याला दिली; त्यानंतर क्रमानें सुमाय दानवेंद्राच्या सुभद्रा–कन्येशीं, बलीच्या सुंदरी कन्येशीं व मयाच्या सुमायानामक कन्येशीं त्याचा विवाह झाला. कन्येबरोबर प्रत्येक श्वशुरानें त्याला अगणित द्रव्यही दिलें. मोठा

धन्य व कृतकृत्य सूर्यप्रभ, त्यांच्याशीं अनेक मायिक देह निर्माण करून रममाण होत असे; पण प्रल्हादाच्या महल्लिकेवर त्याचें अतिशय प्रेम असल्यामुळें, तो आपल्या खऱ्या शरीरानें तिच्या येथेंच राही.

एकदां तो तिच्यासह एकांतांत बसला असतां म्हणाला,–' प्रिये, त्या दिवशीं रात्रीं तुझ्या बरोबर आलेल्या त्या दोघी सख्या कोण व कोठें आहेत ?' तेव्हां महल्लिका त्यास म्हणाली,–' आर्यपुत्र, आपण मला बरी आठवण केलीत, त्या दोघींचशा काय, पण माझ्या तसल्या बाराजणी सख्या आहेत. माझ्या चुलत्यानें त्यांना स्वर्गातून हरण करून आणलें आहे. त्यांत अमृतप्रभा व केशिनी अशा दोघी पर्वत मुनीच्या कन्या आहेत. कालिंदी, भद्रका व दर्पकमाला या तीन देवलाच्या मुली, सौदामिनी व उज्ज्वला या दोघी हाहा गंधर्वाच्या पुत्री; पीवरा, हुहूची दुहिता, अंजनिका ही विभु कालाची नंदिनी, पिंगल गणापासून झालेली केसरावली, कंबलाची मालिनी, व वसुकन्या-मंदारमाला अशा त्या बाराजणी आहेत. त्या सर्वजणी अप्सरांच्या उदरीं झाल्या आहेत, त्यामुळें त्यांचें स्वरूप अलौकिक आहे, हें निराळें सांगावयास नकोच. आपल्याला त्या योग्य स्त्रिया आहेत. माझा जेव्हां विवाह झाला, तेव्हांच मी बाबांना त्यांनांही द्यावयास सांगितलें; पण आपल्या भावाला विचारल्यावांचून त्यांचें दान करणें त्याला आवडलें नाहीं. यावेळीं त्या पहिल्या पाताळांत आहेत, आपण त्यांचें पाणिग्रहण करावें म्हणजे मला त्यांच्यापासून व त्यांना मजपासून दूर रहाण्याचा प्रसंग येणार नाहीं.'

प्रियेचें हें भाषण ऐकून, तिचें मन पहाण्याकरितां, तो जरा मुख म्लान करून तिला म्हणाला,–'प्रिये, तूं मोठी उदार आहेस, यांत कांहीं संशय नाहीं. पण मी कसें करूं ?' तें ऐकतांच महल्लिका म्हणाली,– 'माझ्या समक्ष दुसऱ्या कन्यांशीं तुम्ही विवाह करतां व माझ्या सख्यांशीं मात्र तो करण्यास आपल्याला शंका का येते ? त्यांच्या वांचून क्षणभर सुद्धां मला करमत नाहीं. यास्तव आपण ही माझी प्रार्थना मान्य करा.' सूर्यप्रभानें प्रियेच्या या म्हणण्यास अनुमोदन दिलें. व ती त्याला पहिल्या पाताळांत घेऊन गेली. तेथें तिनें त्या बाराही जणी त्यास अर्पण केल्या. त्यानेंही त्या रात्रीं तेथेंच राहून त्यांचा दिव्य उपभोग घेतला व प्रातः-

काळीं महल्लिकेच्या संमतीनें प्रभासाकडून त्यांना गुप्त रीतीनें आणून चवथ्या रसातळांत ठेविलें.

## ९. इंद्र व मय यांचा संवाद.

नंतर राजा सूर्यप्रभ, सुनीथ व मय यांच्याबरोबर प्रल्हादसभेंत गेला. तेव्हां त्या असुरेश्वरानें त्यांस दिति व दनु यांचें दर्शन घ्या, असें सांगितलें. तेव्हां 'बरें आहे,' असें म्हणून ते सर्व आपल्या अनुचरांसह बाहेर आले. स्मरण करतांच जवळ आलेल्या भूतासन विमानांत बसले, व सुमेरु पर्वताच्या शिखरावरील कश्यपमुनींच्या आश्रमास गेले. तेथें पोंचल्यावर मुनिजनांनीं दाखविलेल्या मार्गानें जाऊन त्यांनीं दिति व दनु यांस पाहिलें, व त्यांच्या चरणावर मस्तक ठेविलें. तेव्हां वंशधारण करणाऱ्या त्या सूर्यप्रभादिकांना पाहून त्या दोघी असुर-मातांच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. त्यांनीं त्यांना आलिंगन व आशीर्वाद दिले. नंतर त्या मयास म्हणाल्या,—"वत्सा, तुझा हा पुत्र सुनीथ पुनः सजीव झाला आहे, हें पाहून आम्हांला फार आनंद झाला. आमचे नेत्र सफल झाले. तूं मोठा पुण्यवान् आहेस, असें आम्हीं समजतों. सुमुंडीही सूर्यप्रभ झाला आहे. तो मोठा कुशल, दिव्यशरीरी व असाधारण गुणसंपन्न आहे. या त्याच्या लक्षणांवरूनच त्याचें भावि श्रेय सहज कळतें. याला पाहून झालेला आनंद आमच्या शरीरांत मावत नाहीं. बाळांनों, आतां उठा. सत्वर प्रजापति आर्यपुत्राकडे चला. त्याच्या दर्शनानें अर्थ सिद्ध होईल, व त्याचें वचन तुमचें हित करील."

त्या दोघींच्या आज्ञेप्रमाणें जाऊन दिव्य आश्रमांत असलेल्या गुरु-कश्यपाच्या चरणांवर त्यांनीं मस्तकें ठेविलीं. त्याची ती तेजोमूर्ति पाहून त्या दानवांनांही मोठी धन्यता वाटली. भगवान् कश्यपानें त्यांस आशीर्वाद देऊन मोठ्या संतोषानें बसावयास सांगितलें, व स्मित मुखानें म्हटलें, "आज तुम्हां सर्व पुत्रांना एकत्र पाहून मला फार संतोष वाटला. मया, सर्व विद्यांचें आस्पद होऊन राहिलेला व सन्मार्गापासून च्युत न झालेला असा तूं प्रशंसनीय आहेस. सुनीथा, तुला गेलेलेंही जीवित पुनः प्राप्त झालें आहे, तेव्हां तूं धन्य आहेस. सूर्यप्रभा, तूं मोठा पुण्यवान् आहेस, व त्यामुळेंच तुला विद्याधराधिपतित्व मिळणार आहे. यास्तव तुम्हीं आतां धर्ममार्गामध्यें रहा. मी काय सांगतों तें ऐका,

म्हणजे मोठी संपत्ति प्राप्त होऊन तुम्हीं सतत सुख भोगाल. शत्रूंपासून तुम्हीं पूर्वींप्रमाणें पराभव पावणार नाहीं. कारण धर्माचें उल्लंघन करणारे असुर मुरारीच्या चक्रानें नाहींसे होत असतात. सुनीथा, देवांनीं ज्यांना मारलें होतें तेच असुर हे मर्त्यप्रवीर झाले आहेत. सूर्यप्रभ पूर्वी सुमुंडी होता हें तर तुला ठाऊक आहेच. प्रहस्त शंबराचा अवतार आहे, त्रिशिरा सिद्धार्थ झाला आहे, वातापीच प्रज्ञाढ्य होय, उल्लूक दानव शुभंकर होऊन व वीतभीति काल होऊन मर्त्यलोकीं जन्मास आला आहे. हे सर्व याचे मित्र व सहायक झाले आहेत. प्रबल दैत्यच प्रभास झाला आहे. याचें शरीर रत्नमय होतें व याच्या शत्रूंनीं म्हणजे देवांनीं त्याच्यापाशीं त्याच्या शरीराची याचना केली, तेव्हां त्या महाउदारानें त्याचे तुकडे तुकडे करून त्यांपासून निघालेलीं रत्नें देवांस दिलीं. त्यामुळें देवी चंडी याच्यावर सुप्रसन्न झाली, व तिनें याला दुसऱ्या जन्मीं उपयोगी पडणारा वर दिला. त्या वरप्रभावानेंच हा इतका बलाढ्य व शत्रूंस असह्य झाला आहे. पूर्वी जे सुंद व उपसुंद या नांवाचे दोन दानव होते, तेच हे सर्वदमन व भयंकर या नांवाचे याचे मंत्री झाले आहेत. हयग्रीव व विकटाक्ष क्रमानें स्थिरबुद्धि व महाबुद्धि झाले आहेत, आणि असेच जे दुसरे याचे श्वशुर, आप्त व बांधव आहेत, तेही सर्व देवांच्या हातून पुष्कळ वेळां पराभूत झालेले व देवांनांही अनेकदां 'त्राहि त्राहि' करावयास लावणारे दानव आहेत. आतां तुमचा पक्ष पुनरपि वृद्धि पावला आहे. यास्तव धीर धरा, धर्ममार्ग सोडूं नका, म्हणजे तुमचें परम कल्याण होईल.'

कश्यपऋषि इतकें बोलत आहे, तों अदितिप्रभृति दक्षकन्या तेथें माध्यंदिनसवनसमयीं आल्या. मयादिकांनीं त्यांनांही वंदन केलें. तेव्हां त्यांनीं त्यांस उचित आशीर्वाद दिले. इतक्यांत भर्त्याची आज्ञा झाल्यामुळें त्या स्नानाकरितां निघत आहेत, तों देवराज, पत्नी शची व लोकपाल यांसह पित्याचें दर्शन घ्यावयास तेथें आला, त्यानें पिता व सर्व माता यांस नमस्कार केला. मयादिकांनींही त्याला वंदन केलें. तेव्हां सूर्यप्रभाकडे मोठ्या रोषानें पहात तो ( इंद्र ) मयाला म्हणाला,—'हा अर्भक विद्याधरचक्रवर्तित्वाची इच्छा करीत आहे, असें मी ऐकलें; पण हा एवढ्याशाच अल्प ऐश्वर्यानें संतुष्ट कां होतो ? माझ्या इंद्रत्वाची इच्छा कां करीत

नाहीं ?' तें ऐकून मय त्यास म्हणाला, ' देवेंद्रा, परमेश्वरानें इंद्रत्व तुला दिलें आहे, व याला खेचरेशत्वाची आज्ञा केली आहे.'

मयाचे हे शब्द ऐकून इंद्र हंसूं लागला व क्रोधानें म्हणाला, ' छेः याच्या या सुंदर व सुलक्षणसंपन्न आकृतीला विद्याधरेशत्व अगदींच थोडें आहे.' शक्रानें केलेली थट्टा ऐकून मय म्हणाला,–'श्रुतशर्मा खेचरेश्वरत्वाला जर योग्य असला तर हा इंद्रत्वालाही योग्यच आहे. हें ऐकून इंद्राला मोठा क्रोध आला व तो वज्र घेऊन मयाला मारावयास उठला. तें पाहून भगवान् कश्यपानें क्रोधानें ' हुं ' असा हुंकार केला. दितिप्रभृति कश्यप-स्त्रियांनीं इंद्राची ' धिक्, धिक् ' असें म्हणून रागानें निर्भर्त्सना केली. तेव्हां इंद्रानें शापाच्या भीतीनें आपलें आयुध खालीं ठेवलें. तो नम्र झाला. स्त्रीसह त्यानें सुरासुरगुरूच्या चरणांवर मस्तक टेंकलें. आणि त्यास प्रसन्न करून व हात जोडून तो अशी विनंति करूं लागला– ' बाबा, मी श्रुतशर्म्याला विद्याधरेशत्व दिलें आहे; पण हा मय तें त्याच्यापासून घेऊन या सूर्यप्रभाला देण्याची इच्छा करीत आहे, त्याकरितां यांचा मोठा उद्यम चालला आहे.' तें ऐकून कश्यप म्हणाला,–" इंद्रा, श्रुतशर्मा जसा तुला प्रिय आहे, तसाच सूर्यप्रभ शंभूला प्रिय आहे. शंकराच्या आज्ञेनेंच मय या खटपटींत पडला आहे. तेव्हां त्याचा यांत कोणता अपराध ! हा धर्ममार्गांत स्थित, ज्ञानी, कुशल व वडिलांस मान देणारा आहे. तूं जर आज येथें याला प्रहार करितास तर आमच्या क्रोधानें तुझें भस्म करून सोडलें असतें. याला तूं कांहीं करूं शकणार नाहींस. याचा प्रभाव तुला ठाऊक नाहीं कीं काय ?"

कश्यपाचें हें भाषण ऐकून इंद्राला लाज वाटली, व तो भयभीत होऊन खालीं मान घालून बसला. तेव्हां अदिति म्हणाली,–'बाळा, तुझा तो श्रुतशर्मा कसा काय आहे तें पाहूं या, त्याला येथें आणीव. आईच्या या आज्ञेप्रमाणें मातलीला पाठवून इंद्रानें श्रुतशर्म्याला आकाशमार्गानें आणविलें. तेथें येतांच त्यानें त्या सर्वांस वंदन केलें. तेव्हां सूर्यप्रभ व श्रुतशर्मा यांच्याकडे पाहून कश्यपपत्न्या आपल्या पतीस–' यांतील रूप-लक्षण-संपन्न कोण आहे ? '–असें विचारूं लागल्या. तें ऐकून मुनींद्र म्हणाला,–'श्रुतशर्मा याच्या प्रभासाइतकाही तेजस्वी व प्रभाववान् नाहीं. मग निरुपम सूर्यप्रभाची तो बरोबरी कशी करणार ? सूर्यप्रभ

अशा रूपलक्षणांनीं संपन्न आहे, कीं त्यानें निश्चय केल्यास त्याला इंद्रत्वही सुलभ होईल.'

कश्यप मुनीचें हें म्हणणें त्या दोघांनांही प्रत्यक्ष पहाणाऱ्या अदितिप्रभृतींस पटलें, व ' आपण म्हणतां तें खरें आहे ' असें त्या म्हणाल्या. नंतर त्या मुनीनें इंद्राच्या समक्ष मयाला असा वर दिला, कीं–" पुत्रा, इंद्रानें आयुध उचललें असतांही केवळ मजकडे पाहून, तूं व तुझे अनुयायी शांतपणें राहिले, यास्तव तूं, सूर्यप्रभ व सुनीथ असे तिघेही माझ्या वरास पात्र आहां. मया, तूं अजर व अमर हो. याच्या वज्रानेंही तुझ्या शरीराला कांहीं धक्का लागणार नाहीं. सुनीथ व सूर्यप्रभ शत्रूंस अजिंक्य होतील. तुम्ही जेव्हां जेव्हां स्मरण कराल, तेव्हां तेव्हां माझा सुवास कुमार पुत्र येऊन तुम्हां सर्वांना सहाय करील."

त्यानंतर त्या मुनीच्या भार्या, ऋषी व लोकपाल यांनींही मयादिकांस वर दिले, तेव्हां अदिति इंद्रास म्हणाली, ' बाळा, अजून तरी हा अविनय सोड. मयाशीं सख्य कर. विनयाचें फल आज याला कसें मिळालें तें तूं पाहिलेंसच आहेस. ' आईच्या या सदुपदेशास मान देऊन इंद्रानें मयाच्या हातांत हात घातला व त्याला संतुष्ट केलें. सूर्यप्रभाच्या तेजानेंच पराभूत झालेला श्रुतशर्मा दिवसा उगवलेल्या चंद्राप्रमाणें निस्तेज झाला. त्यानंतर देवेंद्र, कश्यप गुरूस प्रणाम करून लोकपालांसह आल्या मार्गानें परत गेला, व मयादि असुर कश्यपाची आज्ञा घेऊन आपल्या स्वीकृत कार्याच्या सिद्धीकरितां तेथून मोठ्या उत्साहानें निघाले.

---

## तरंग ३ रा.

### १. सूर्यप्रभाचा युद्धोद्यम.

त्यानंतर ते सर्व चंद्रभागा व ऐरावती यांच्या संगमावर आले. तेथें सूर्यप्रभाकरितां त्याचे आप्त, मित्र व बांधव वाट पहात होतेच. सूर्यप्रभ येतांच सर्व राजे त्याच्यापुढें रडत गेले व खिन्न आणि मरणोन्मुख होऊन उभे राहिले. तेव्हां चंद्रप्रभ न दिसल्यामुळें ते कदाचित् रडत असतील, असें समजून त्यानें त्यांना सर्व वृत्तांत सांगितला. तरी त्यांचीं मुखकमलें

प्रसन्न होईनात. म्हणून सूर्यप्रभ त्याच्या खेदाचें कारण विचारूं लागला. तेव्हां 'श्रुतशर्म्यानें तुझ्या भार्यांना हरण करून नेलें, त्या पराभवामुळें आम्हीं जीव द्यावयास तयार झालों होतों; पण आकाशवाणीनें आमचें निवारण केलें' असें त्यांनीं मोठ्या कष्टानें सांगितलें. तें ऐकतांच सूर्यप्रभाला अनिवार्य क्रोध आला. व 'ब्रह्मदेवादि सर्व देव जरी रक्षण करीत असले, तरी मी परस्त्रियांचें हरण करणाऱ्या त्या शठ श्रुतशर्म्याचें उन्मूलन करीन,' अशी त्यानें सत्य प्रतिज्ञा केली, आणि सत्वर त्याच्यावर चाल करून जावयास अनुकूल मुहूर्त पाहून गणकांच्या संमतीनें त्यानें सातव्या दिवशीं निघण्याचें ठरविलें.

सूर्यप्रभाचा तो निश्चय व उद्यम पाहून मयासुराला मोठा आनंद झाला. त्यानें त्याचा उत्साह आणखी अधिक वाढविला, व आतां तो आपल्या प्रतिज्ञेपासून ढळणार नाहीं, असें पाहून मय सूर्यप्रभाला म्हणाला,–" तूं आपला विजयोद्यम शिथिल करणार नाहींस, असें जाणून मी तुला एक गुप्त गोष्ट सांगतों. तुझ्या भार्यांना त्या दुष्टानें हरण केलें आहे, असें कळतांच मी त्याच्याजवळ गेलों व त्याला आपली माया दाखवून मोहित केलें. नंतर मीं तुझ्या भार्यांना पाताळांत सुरक्षित नेऊन ठेविलें आहे. तुला क्रोध येऊन तूं अशी कांहीं तरी घोर प्रतिज्ञा करावीस व उद्योगाला लागावेंस म्हणून मीं ही गोष्ट आजपर्यंत तुला कळविली नाहीं. कारण वायूनें प्रेरणा केल्यावर अग्नि जसा पेटतो, तसा तो पूर्वी (वायूचें सहाय नसतांना) पेटत *नाहीं. तर चला; आपण पाताळांत जाऊं. तेथें तूं आपल्या प्रियांना भेट, व त्यानंतर पुढच्या उद्योगास लाग."

मयाचें हें भाषण ऐकून सर्वांना आनंद झाला. ते पूर्वीच्या मार्गानेंच पाताळांत गेले. तेथें मयानें एका सुंदर मंदिरांत बंदोबस्तानें ठेवलेल्या मदनसेनादि भार्या सूर्यप्रभाला दाखविल्या. तेव्हां मोठया आनंदानें त्यांना व तेथील नवीन भार्यांना बरोबर घेऊन तो असुरेश्वर प्रल्हादाकडे भेटावयास गेला. मयही त्याच्या बरोबर होताच. सूर्यप्रभानें प्रणाम केला व मयानें कश्यपापासून प्राप्त झालेला वर त्या वृद्ध असुरास

* नैवमेव तथा ह्यग्निर्ज्वलेद्वातेरितो यथा ॥

सांगितला; पण सूर्यप्रभाला पहातांच प्रल्हादानें राग आला आहे असें दाखवून व शस्त्र उचलून. 'अरे दुरात्म्या, तूं माझ्या भावानें हरण करून आणलेल्या देवलोकच्या बारा कन्यांना कोणाला न विचारितां येथून नेलें आहेस; या तुझ्या घोर अपराधाबद्दल मी तुला मारून टाकतों पहा.' असें तो म्हणाला;—पण सूर्यप्रभ त्याच्यावर उलट रागावला नाहीं, व त्याचा प्रतीकार करण्याकरितां त्यानें शस्त्रही उचललें नाहीं; उलट वृद्धांना गोड बोलून कसें प्रसन्न करावें, हें त्याला चांगलें अवगत असल्यामुळें 'प्रभो, हें शरीर आपल्या अधीन आहे, त्याचें आपण काय हवें तें करा.' असें तो हात जोडून म्हणाला,—तेव्हां प्रल्हाद हंसून म्हणाला, 'पुत्रा, मी तुझें मन पाहिलें. तुझ्यामध्यें गर्वाचा लेशही नाहीं हें पाहून मी संतुष्ट झालों आहें, तुला हवा तो वर माग.'

तें ऐकून सूर्यप्रभानें 'शंकर व गुरुजन यांचे ठायीं अनन्य भक्ति असावी' हाच वर मागून घेतला, त्यामुळें सर्व प्रसन्न झाले. प्रल्हादानें त्याला आपली यामिनी नांवाची दुसरी कन्या दिली व त्याचें सहाय करावयास आपले दोन पुत्रही दिले. त्यानंतर तो अमीलाकडे गेला, त्यानेंही त्याच्या सर्वोत्तम गुणांवर प्रसन्न होऊन आपली सुखावती नांवाची दुसरी कन्या त्यास अर्पण केली, व त्याचें सहाय करावयाला दोन पुत्र दिले. याप्रमाणें त्यानें सर्व असुराधिपांचें सहाय मिळविलें. नंतर तो आणखी दोन चार दिवस तेथेंच राहिला. इतक्यांत सुनीथाच्या तीन पत्न्या व सूर्यप्रभाच्या सर्व पत्न्या गरोदर आहेत, असें मयासह त्यांना कळलें, तेव्हां त्यांनीं त्यांना 'कोणते डोहाळे लागले आहेत' असें विचारिलें असतां त्या सर्वजणींनीं 'आम्हांला मोठें युद्ध पहाण्याची इच्छा झाली आहे,' असें सांगितलें. तें ऐकून मयाला मोटा हर्ष झाला, व 'यांच्या उदरीं देवांनीं युद्धांत मारलेले असुर उत्पन्न होणार आहेत व त्यामुळेंच यांना हे असे डोहाळे होत आहेत,' असें तो हंसत बोलला. असो;

याप्रमाणें सहा दिवस आनंदांत जाऊन सातवा उजाडला. तेव्हां सूर्यप्रभादि सर्व भार्यादिकांसह रसातळांतून वर आले. त्यांना विघ्न करण्याकरितां शत्रूंनीं उत्पात माया दाखविली; पण स्मरण करतांच आलेल्या सुवास कुमारानें तिचें निवारण केलें. त्यानंतर चंद्रप्रभाच्या

रत्नप्रभ नांवाच्या बालकास पृथ्वीच्या राज्यावर बसवून ते सर्व भूतासन विमानांत आरूढ झाले, आणि मयासुराच्या सांगण्याप्रमाणें विद्याधरेश सुमेरूच्या घरीं गेले. गंगेच्या पूर्व तीरावरील तपोवनांत त्याचें निवासस्थान होतें. ते आपले मित्र आले आहेत, असें पाहून सुमेरूनें त्यांचें यथाविधि पूजन केलें. मयानें त्याला सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां सुमेरूलाही शंकराच्या आज्ञेचें स्मरण झालें. त्याच्या संमतीनेंच सूर्यप्रभादिकांनीं आपापलें सैन्य तेथें आणविलें. सप्तपातालवर्ती दानव व त्यांचें सैन्य तेथें आलें. सूर्यप्रभाचे मानुषसंबंधी राजे, त्यांचे 'पुत्र व इतर आप्त जमले. हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांची संख्या करणें अशक्य झालें; कारण प्रत्येक दानवेश्वर व मनुष्येश्वर जणुंकाय एकमेकांच्या स्पर्धेनेंच असंख्य लोक व वाहनें बरोबर घेऊन आला होता. उत्तम युद्धविद्या व भावि अलौकिक युद्धांत अवश्य असलेलें सामर्थ्य त्यांनीं तेथें संपादन केलें.

त्यानंतर स्मरण करतांच आलेल्या सुवास कुमारास, मयासुरानें 'आपल्या या इतस्ततः पसरलेल्या सैन्याला व्यवस्थितपणें उभें करतां येईल असें एकादें स्थान आम्हांला दाखीव' असें सांगितलें. तेव्हां 'येथून एक योजन अंतरावरच कलापग्राम म्हणून एक विस्तीर्ण प्रदेश आहे. तेथें आपलें सर्व सैन्य न्या व त्याला व्यवस्थितपणें उभें करून तें सर्व किती आहे तें पहा,' असें तो म्हणाला. मुनीच्या या आज्ञेप्रमाणें ते सर्व आपापल्या विशाल सैन्यासह तेथें गेले, व त्या विस्तीर्ण प्रदेशांत त्याला उभें करून मय, सूर्यप्रभ; सुनीथ, सुमेरु इत्यादि मुख्य वीर उंचवट्याच्या जागीं चढले. त्यांनीं आपल्या सैन्याची पहाणी केली. सुमेरु म्हणाला,—'मित्रांनो, अपलें हें सैन्य जरी अगणित आहे, तरी श्रुतशर्मा अधिक बलाढ्य आहे. त्याच्यापाशीं एकशें एक विद्याधराधीश आहेत. त्यांतील प्रत्येकापाशीं बत्तीस राजे असतात. यास्तव आपण उद्यां वल्मीक स्थानास जाऊन त्यांतील कित्येकांस आपल्या पक्षांत आणूं या. उद्यां फाल्गुन कृष्ण अष्टमी महातिथि आहे. त्या तिथीस तेथें भावी चक्रवर्ती राजाला अक्षय बाणभाता प्राप्त होत असतो. म्हणून त्याकरितां सर्व विद्याधर तेथें येतील.'

## २. दिव्य धनुष्य व तूणीर यांची प्राप्ति.

सुमेरूची ही युक्ति सर्वांस मान्य झाली व सैन्याची रचना करण्यांतच तो दिवस घालवून दुसऱ्या दिवशीं ते सर्व रथांत बसून वल्मीकास गेले. तेव्हां त्या हिमालयाच्या दक्षिण शिखरावर असंख्य सैन्यासह आलेले विद्याधराधिपति त्यांस दिसले. त्यांतील कित्येक कुंडें पेटवून होम करीत होते, व कित्येक जपामध्यें व्यग्र झाले होते. तेथें गेल्यावर सूर्यप्रभानेंही एक मोठें कुंड केलें. त्यांत विद्याप्रभावानें अग्नि आपोआप पेटूं लागला. तें पाहून सुमेरूला आनंद झाला व विद्याधरांना मोठा मत्सर वाटला. त्यांतील एक म्हणाला, ' अरेरे! धिक्कार असो, सुमेरो, विद्याधरेंद्रत्व सोडून तूं या मर्त्य सूर्यप्रभाच्या नादीं कसा लागला आहेस!' तें ऐकून सुमेरु त्याची निर्भर्त्सना करूं लागला आणि सूर्यप्रभानें 'हा कोण' असा प्रश्न केला असतां तो म्हणाला, " भीम म्हणून एक विद्याधर आहे. त्याच्या भार्येवर ब्रह्मदेवाचें मन गेलें व त्याच्यापासून हा झाला. ब्रह्मदेवाशीं याच्या आईचा गुप्त संबंध झाल्यामुळें ह्याचा जन्म झाला, म्हणून आम्ही याला ब्रह्मगुप्त असें म्हणतों. याच्या जन्माला अनुरूप असेंच हें याचें भाषण आहे."

त्यानंतर सुमेरूनेंही एक कुंड तयार केलें, व ते दोघेही होम करूं लागले; पण होमप्रभावामुळें, ते होम करीत असतांनांच, भूमींतून एक मोठा अजगर निघाला. त्याला पहातांच ब्रह्मगुप्त गर्वानें त्यास धरावयास धांवला; पण अजगरानें आपल्या फूत्कारानें सुकलेल्या पानाप्रमाणें त्याला शंभर हात दूर उडवून दिलें. नंतर तेजःप्रभ म्हणून एक विद्याधर त्याला धरण्याकरितां आला. त्यालाही त्यानें उडविलें. याप्रमाणें पुष्कळ विद्याधराधिपांना त्या सापानें उडविलें; व त्यामुळें त्यांचीं अंगें ठेंचलीं. शेवटीं मोठा गर्विष्ठ श्रुतशर्मा त्याला धरण्याकरतां मोठ्या डौलानें पुढें आला; पण त्यालाही त्यानें आपल्या श्वासवायूनें दूर फेंकून दिलें. तथापि श्रुतशर्मा पुनः वेगानें त्याला मारण्याकरितां धांवून आला; पण अजगरानें त्याला पुनरपि इतक्या जोरानें व दूर फेंकलें, कीं त्याचीं हाडें मोडलीं, व लज्जेनें त्याचें मुख काळें पडलें. तेव्हां सुमेरूनें सूर्यप्रभाला त्याला धरण्याविषयीं प्रेरणा केली. त्या बरोबर तोही वीर पुढें झाला. पण तें पाहून 'अहो, या मूर्खाकडे पहा, हा या सापाला धरावयास जात आहे!

खरोखर अविचारी मनुष्यें, मर्कटासारखीं, पहातील तें करावयास धांवतात' असें बोलून सर्व विद्याधर हंसूं लागले. परंतु सूर्यप्रभानें त्यांच्या हंसण्याकडे मुळींच लक्ष न देतां त्या अजगराला जाऊन धरलें व बिळांत शिरत असलेल्या त्याला बाहेर ओढून काढलें. त्या बरोबर तो सर्प एक सुंदर बाणभाता झाला; व सूर्यप्रभाच्या मस्तकावर आकाशां-तून पुष्पवृष्टि झाली, आणि 'सूर्यप्रभा, तुला हें अक्षय्य तूणीररत्न प्राप्त झालें आहे, तें तूं घे' अशी आकाशवाणीही ऐकूं आली.

त्यामुळें विद्याधरांचीं मुखकमलें म्लान झालीं; व मय, सुनीथ आणि सुमेरु यांचीं वदनें प्रफुल्लित दिसूं लागलीं. श्रुतशर्म्याला त्याचा तो उत्कर्ष इतका असह्य झाला, कीं तो तत्काल तेथून निघून गेला. नंतर त्याचा एक दूत सूर्यप्रभाजवळ येऊन म्हणाला,–'प्रभु श्रीमान् श्रुतशर्मा तुला अशी आज्ञा करीत आहे, कीं तुला जर आपलें जीवित हवें असलें, तर हा बाणभाता मला दे.' तें ऐकून सूर्यप्रभ म्हणाला, 'दूता, तूं त्याला जाऊन सांग, कीं हें तूणीर देण्याची तर गोष्टच राहूं दे. पण मी तुझ्या शरीरालाही आपल्या तीक्ष्ण बाणांचें तूणीर करणार आहें.'

हें प्रतिवचन ऐकून दूत एवढेंसें तोंड करून निघून गेला, आणि श्रुतशर्म्याच्या त्या उद्धटपणाची सर्व निंदा करूं लागले व त्याच्या मूर्ख-पणाचें त्यांना हंसूंही आलें. नंतर सूर्यप्रभाला आनंदानें आलिंगन देऊन सुमेरु म्हणाला, 'मोठ्या आनंदाची गोष्ट आहे, कीं शंभूचें वचन आज सफल झालें. या तूणीररत्नाच्या लाभामुळें तुझी चक्रवर्तिताच सिद्ध झाली आहे. तर आतां निश्चितपणें चल आणि असलेंच एक उत्तम धनुष्य मिळीव.'

इतकें बोलून सुमेरु पुढें झाला, तेव्हां सूर्यप्रभादिकही त्याच्या मागो-माग चालले. हेमकूट पर्वताचें उल्लंघन करून त्याच्या उत्तरेस असलेल्या मानस सरोवरावर ते जाऊन पोंचले. या विस्तीर्ण सरोवराकडे पाहूनच ब्रह्मदेवानें सागर निर्माण केला असावा, असें त्यांना वाटलें. तें सरोवर आपल्या मधील वाऱ्यानें हालणाऱ्या व फुललेल्या सुवर्ण-कमलाच्या योगानें त्यांत जलक्रीडा करणाऱ्या देवस्त्रियांच्या मुखास तुच्छ करीत होतें. असो; सूर्यप्रभादिक त्या अदृष्टपूर्व सरोवराची शोभा जों पहात आहेत तोंच तेथें श्रुतशर्माप्रभृति विद्याधर आले. सूर्यप्रभ व

तेही घृतयुक्त कमलांचा होम करूं लागले. इतक्यांत त्या सरोवरांतून एक मोठा ढग उठला व सर्व अंतरिक्ष व्यापून तो महावृष्टि करूं लागला. कांहीं वेळानें त्या घोर मेघांतून एक भयंकर नाग त्यांच्यामध्यें पडला, सुमेरूच्या सांगण्यावरून सूर्यप्रभानें त्याला वेगानें जाऊन धरलें, त्याबरोबर तो नाग धनुष्य झाला. त्याच्या मागोमाग तसलाच आणखी एक नाग पडला व त्याला धरतांच तो त्या धनुष्याचा गुण झाला. इतक्यांत मेघ कोठें नाहींसा होऊन आकाश स्वच्छ झालें. व 'सूर्यप्रभा, हें अक्षय धनुष्य व हा गुण तुला प्राप्त झाला आहे. हीं दोन रत्नेंच आहेत. यांचें तूं ग्रहण कर' अशी आकाशवाणी पुष्पवृष्टीसह झाली. सूर्यप्रभानें त्या दोन्हीं उत्तम वस्तूंचें ग्रहण केलें. हा सर्व चमत्कार प्रत्यक्ष पाहून श्रुतशर्मा व त्याचे अनुयायी अतिशय खिन्न होऊन तपोवनांत गेले व मयादि सर्व आनंदित होऊन सूर्यप्रभाच्या भाग्याचें वर्णन करूं लागले.

त्यानंतर सूर्यप्रभानें 'या धनुष्याची उत्पत्ति कशी झाली' असें विचारलें. तेव्हां सुमेरु म्हणाला,—" येथें वेळूचें मोठें वन आहे. त्यांतील वेळू तोडून या सरोवरांत टाकले, म्हणजे त्यांचीं अशीं मोठीं दिव्य धनुष्यें होत असतात. पूर्वीं देवांनीं, गंधर्वांनीं, असुरांनीं व विद्याधरांनीं आपापल्या करितां अशीं अनेक धनुष्यें तयार करून घेतलीं आहेत. त्यांचीं नांवेंही निरनिराळीं असतात. पूर्वीं देवांनीं अमृतबल या नांवाचीं चक्रवर्ति धनुष्यें येथें ठेविलीं आहेत. तीं असल्या मोठया क्लेशानें, कांहीं थोड्याशा भावी पुण्यवान् चक्रवर्ति-राजांना ईश्वराच्या इच्छेनेंच प्राप्त होत असतात. तसल्या धनुष्यांतील आज हें एक तुला मिळालें आहे. या तुझ्या मित्रांनाही त्यांच्या योग्यतेप्रमाणें येथें धनुष्यें मिळतील, कारण यांना विद्या सिद्ध झाली आहे, म्हणून तीं मिळविण्याची योग्यता यांच्यामध्यें आली आहे."

सुमेरूनें सांगितलेला हा वृत्तांत ऐकतांच सूर्यप्रभाचे प्रभासादिक अनुचर कीचकवनांत शिरले. तेथें वनाचें रक्षण करण्याकरितां राहिलेल्या राजाला त्यांनीं जिंकलें. तेथून वेळू तोडून आणून त्या सरोवरांत टाकले, आणि जप, उपवास व होम करीत ते त्याच्या कांठीं राहिले. सात दिवसांनीं त्या वेळूंचीं धनुष्यें होऊन त्यांना परत मिळालीं. तेव्हां कृतकृत्य

झालेला सूर्यप्रभ, त्या सर्वांसह सुमेरूच्या तपोवनाकडे जावयास निघाला. मार्गानें जात असतांना सुमेरु त्यास म्हणाला,–'तुझ्या या मित्रांनीं कीचकवनाच्या चंडदंड नांवाच्या रक्षकास जिंकलें, हें मोठेंच आश्चर्य आहे. त्याच्यापाशीं मोहिनी या नांवाची विद्या असल्यामुळें, तो अजेय झाला आहे; पण त्यानें मुख्य शत्रूकरितां ती विद्या जपून ठेविली आहे, नाहींतर त्यानें यांच्यावरही तिचा प्रयोग केला असता. ती एकदांच त्याच्या उपयोगीं पडणारी आहे. वारंवार तिचा उपयोग होणार नाहीं; कारण त्या मूर्खानें प्राप्त झालेल्या विद्येचा प्रभाव पहाण्याकरितां तिचा गुरूवरच प्रयोग केला, व त्यामुळें रागावलेल्या गुरूनें त्याला तसा शाप दिला. नाहींपेक्षां विद्यांचा प्रभाव असह्य असतो. त्याचें कारण या पूज्य मयाला विचार.

सुमेरूनें असें सांगितलें असतां मय सूर्यप्रभास म्हणाला,–" सुमेरु सांगतो तें खरें आहे. त्याचें कारण मी संक्षेपतः सांगतों तें ऐक. अव्यक्तापासून निरनिराळ्या प्रधान व गौण शक्ती उत्पन्न होतात, त्यांतील प्राणशक्तीपासून आकाशमार्गानें नाद उत्पन्न होतो, व परतत्त्वाच्या कलेनें युक्त झालेला तो नादच विद्यादिमंत्रत्वास प्राप्त होतो. ज्ञान, तप किंवा सिद्धांची आज्ञा, यांच्या योगानें मंत्रविद्यांचा प्रभाव असह्य होतो. पुत्रा, तुला बहुतेक सर्व विद्या प्राप्त झाल्या आहेत. आतां दोनच काय त्या राहिल्या आहेत. मोहिनी व परिवर्तिनी या विद्या तुला प्राप्त करून घेतल्या पाहिजेत. याज्ञवल्क्य मुनींना त्या अवगत आहेत. यास्तव तूं त्या मुनीकडे जाऊन त्या संपादन कर.

### ३. अवशिष्ट विद्या व विमान यांची प्राप्ति.

मयाच्या या उपदेशाप्रमाणें सूर्यप्रभ याज्ञवल्क्यांकडे गेला. तेव्हां मुनीनें त्याला सात दिवस भुजग-ह्रदांत (सर्पयुक्त डोहांत), व तीन दिवस अग्नींत ठेवून तप करविलें. त्यानें सात सर्पदंश सहन केले आहेत असें पाहून, मुनीनें त्याला मोहिनी विद्या दिली, व तीन दिवस अग्नीचा संताप सहन केल्यावर, त्याला विपरिवर्तिनी विद्या प्राप्त झाली. विद्या प्राप्त झाल्यावर मुनीनें त्याला पुनः अग्निकुंडांत प्रवेश करावयास सांगितलें, व त्यानेंही आज्ञेप्रमाणें तत्काल केलें. त्याबरोबर त्याला एक अद्भुत विमान प्राप्त झालें. इच्छेप्रमाणें आकाशांतून गमन करणारें तें विमान नाना प्रकारच्या रत्नांनीं अलंकृत केलेलें होतें. त्यांत शंभर निरनिराळ्या उत्तम खोल्या

होत्या. इतक्यांत 'हें चक्रवर्ति-विमान तुला प्राप्त झालें आहे. यांतील भिन्न भिन्न दालनांत तूं आपल्या अंतःपुरवर्गास सुरक्षित ठेवूं शकशील. यांतील स्त्रियांना तुझे शत्रूही कांहीं करूं शकणार नाहींत.' अशी आकाशवाणी झाली. त्यानंतर अति नम्र झालेला तो, याज्ञवल्क्य-गुरूस म्हणाला,-'प्रभो, मी आतां आपल्याला दक्षिणा कोणती देऊं?' त्यावर तो मुनि म्हणाला,- 'सूर्यप्रभा, आपल्या अभिषेकाच्या वेळीं तूं माझें स्मरण कर. हीच मला इष्ट असलेली दक्षिणा आहे. तूं आतां आपल्या सैन्यांत जा.'

उदार गुरूचें हें भाषण ध्यानांत धरून, सूर्यप्रभानें त्यांना साष्टांग प्रणाम केला, व विमानांत बसून सुमेरूच्या तपोवनाजवळ असलेल्या आपल्या सैन्यांत आला. त्यानें आपला आनंददायी वृत्तांत सर्व आप्तांना सांगितला. मयादिकांनीं त्याचें अभिनंदन केलें. त्यानंतर सुनीथानें स्मरण करितांच तत्काल तेथें आलेला सुवास कुमार, मयादिकांस म्हणाला,-' सूर्यप्रभाला सर्व विद्या व विमान प्राप्त झालें आहे. मग अजून तुम्ही असे उदासीन कां? शत्रूवर चाल करून कां जात नाहीं?'

तें ऐकून मय म्हणाला,-'तुम्ही म्हणतां तें खरें आहे; पण आपल्याला धर्म व नीति यांचें उल्लंघन करावयाचें नाहीं. यास्तव अगोदर त्याच्याकडे दूत पाठवूं या.' मयासुराच्या या न्याय्य बोलण्याला सर्वांनीं अनुमोदन दिलें. इतक्यांत सुवास कुमार म्हणाला, 'दूत पाठविण्यांत गुणच आहे. आणि मला वाटतें कीं या कामाला हा प्रहस्त योग्य आहे. कारण हा प्रतिभावान्, वक्ता, कार्य व काल यांचें महत्त्व ओळखणारा, कर्कश व सहिष्णु आहे. म्हणजे दूताचे सर्व गुण याच्यामध्यें आहेत.' मुनिपुत्राचें तें म्हणणें सर्वांना मान्य झालें. सर्वांनीं एकमतानें संदेश ठरवून प्रहस्ताबरोबर तो श्रुतशर्म्याकडे पाठविला.

## ४. सूर्यप्रभाचें स्वप्न व त्याचें फल.

तो निघून गेल्यावर सूर्यप्रभ आपल्या आप्तांस म्हणाला,-" मला आज पहांटेस एक चमत्कारिक स्वप्न पडलें, तें सांगतों ऐका. एका मोठ्या जलाच्या ओघांत सांपडून आम्हीं सर्व वाहून जाऊं लागलों; पण त्यांत आम्हीं बुडालों नाहीं. तर आनंदानें नाचतच होतों. पण इतक्यांत प्रतिकूल वायूनें त्या जलौघाला फिरविलें. इतक्यांत कोणी

एक देदीप्यमान पुरुष आला व त्यानें आम्हांला त्या जलांतून उचलून अग्नींत टाकलें; पण आम्हीं कांहीं जळलों नाहीं. कांहीं वेळानें आकाशांत एक मोठा मेघ दिसूं लागला व त्यानें रक्ताचा वर्षाव केला. त्या रक्तानें दश दिशा व्यापून गेल्या. इतकें जों मी पहात आहें, तों चांगलें उजाडलें व मी जागा झालों."

हा स्वप्नवृत्तांत ऐकून सुवास कुमार म्हणाला,–'मोठ्या आयासानें अभ्युदय होईल' असें या स्वप्नानें सुचविलें आहे. जलौघ म्हणजे संग्राम, त्यांत न बुडणें हें तुमचें धैर्य, नाचणें हा उत्साह, जलौघाला परतविणारा वायु हा तुमचा रक्षक देव, त्यांतून उठविणारा तेजस्वी पुरुष म्हणजे साक्षात् शंकर, त्यानें अग्नींत फेंकलें याचा अर्थ त्यानें तुम्हांला महा संग्रामांत नेलें. मेघाचा उदय म्हणजे पुनः ओढवणारें भय. रक्ताची वृष्टि हाच त्या भयाचा नाश, व दिशा रक्तमय होणें हीच तुमची भावी समृद्धि होय. स्वप्न, अन्यार्थ, यथार्थ व व्यर्थ असें तीन प्रकारचें असतें. तत्काल घडणारी गोष्ट सुचविणाऱ्या स्वप्नाला अन्यार्थ स्वप्न, प्रसन्न झालेल्या देवादिकांच्या आज्ञा हें यथार्थ स्वप्न, व दृढ अनुभव, चिंता, इत्यादिकांमुळें पडणारें जें स्वप्न तें व्यर्थ स्वप्न होय. (मेलेल्या माणसाचें दर्शन होणें इत्यादि प्रकारचीं स्वप्नें या तिसऱ्या प्रकारचीं असतात.) बाह्य विषयांपासून परावृत्त व रजोगुणानें मूढ झालेल्या मनानें, निद्रावश झालेला प्राणी निरनिराळ्या कारणामुळें स्वप्नें पहातो. स्वप्नाच्या कालाप्रमाणें त्याचें फळ लवकर किंवा उशिरानें मिळतें. रात्र संपतांना पाहिलेल्या या स्वप्नाचें फल शीघ्र मिळेल.

सुवास कुमारानें सांगितलेलें हें स्वप्नाचें कारण व फल ऐकून सर्वांना समाधान वाटलें. सूर्यप्रभादिक तेथून उठून दिनकृत्यें करावयास गेले, त्यांचें अनुष्ठान संपत आहे, तों श्रुतशर्म्याकडे गेलेला प्रहस्त परत आला, व मयादिकांनीं विचारतांच तो पुढील वर्तमान सांगूं लागला.

## ५. शत्रूकडील वृत्तान्त.

प्रभो, मीं आपल्या आज्ञेनें येथून निघालों, तो मोठ्या वेगानें त्रिकूट पर्वतावरील सुवर्णनिर्मित त्रिकूटपताका नामक नगरीस गेलों. त्यांतील राजमंदिरापाशीं जातांच द्वारपालानें, राजाज्ञेनें मला आंत सोडलें. मीं विद्याधराधिपांनीं परिवेष्टित झालेल्या श्रुतशर्म्यापाशीं गेलों. त्याचा पिता

त्रिकूटसेन, धुरंधर मंत्री–विक्रमशक्ति व दामोदरादि इतरही शूर तेथें बसले होते. त्यानें दाखविलेल्या उचित आसनावर बसून मी श्रुतशर्म्याला म्हटलें, " श्रीमान् सूर्यप्रभानें मला तुजकडे पाठविलें आहे, त्याचा संदेश मी तुला जशाचा तसाच सांगतों—श्रीशंकराच्या प्रसादानें मला विद्या, रत्नें, भार्या व सहाय हीं मिळालीं आहेत, यास्तव तूंही या आपल्या खेचरेश्वरांसह माझ्या सैन्यांत येऊन मीळ, कारण नम्र होणाराचें रक्षण, व विरोध करणाराचें शासन मला कर्तव्य आहे. सुनीथाच्या कन्येला तूं हरण करून नेलेंस तें चांगलें नव्हे. यास्तव ती परत दे."

माझ्या तोंडचे हे शब्द ऐकतांच ते सर्व रागावले, व ' आज आम्हांला गर्वानें असा निरोप पाठविणारा हा कोण मोठा जन्माला आला आहे ? मर्त्यांना पाहिजे तर तो असला निरोप खुशाल पाठवो; पण आम्हां विद्याधरांनाही असें सांगणारा तो दुष्ट मानव लवकरच नष्ट होईल, ' असें बोलूं लागले. तेव्हां मीही म्हणालों,–' काय, तो मर्त्य आहे ? असेना; पण शंकरानें त्याला तुमचें चक्रवर्तित्व दिलें आहे कीं नाहीं ? तुम्ही विद्याधरांनींही त्या मानवाचा पराक्रम पाहिलाच आहे. तो कदाचित् येथें आल्यास तुमचाच नाश होईल,' पण माझें हें उघड भाषण त्यांना आवडलें नाहीं. ती सर्व सभा मजवर रागावली. श्रुतशर्मा व धुरंधर मला मारावयास धांवले; पण मी मुळींच न भितां 'यावरूनच तुमचें शौर्य मला स्पष्ट दिसत आहे,' असें त्यांस म्हटलें. इतक्यांत दामोदरानें उठून 'शांत व्हा ! ब्राह्मण व दूत अशाला मारणें योग्य नव्हे ' असें म्हटलें, व त्याचें निवारण केलें. त्यानंतर विक्रमशक्ति मला म्हणाला,–' दूता, तूं जा बाबा, तुझ्या स्वामीप्रमाणें आम्हां सर्वांनांही ईश्वरानेंच निर्माण केलें आहे. त्याला येथें खुशाल येऊं दे, आम्ही त्याचें उचित आतिथ्य करण्यास समर्थ आहों.'

ही त्याची गर्वोक्ति ऐकून मी हंसून म्हटलें,–' कमलवनामध्यें स्वस्थपणानें बसलेले हंस, मेघाच्छादित झालेलें आकाश दृष्टीस पडेपर्यंतच रमणीय ध्वनि करितात' इतकें बोलून मी तेथून तिरस्कारानें निघालों व येथें आलों.

प्रहस्तानें सांगितलेला हा वृत्तांत ऐकून मयादिकांना फार आनंद वाटला. युद्धाचा निश्चय करून त्यांनीं प्रभासाला सेनापति नेमलें. सर्व

वीरांनीं रणदीक्षा घेतली, व दृढ व्रत धारण केलें. रात्रीं शय्यागृहांत सूर्यप्रभ शय्येवर पडला असतां एक दिव्य कन्या आंत येत असलेली त्याच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर त्यानें झोंपेचें सोंग घेतलें. त्याचे सचिव तर खरोखरच निद्रित झाले होते. सूर्यप्रभाजवळ जाऊन ती कन्या बरोबर आलेल्या सखीला म्हणाली,–" सखे, निजलेल्या व त्यामुळें विलासरहित अशाही याची जर ही इतकी रूपशोभा आहे, तर हा जागा झाल्यावर ती किती असेल ? असो; याला आतां जागें करूं नये, हेंच बरें. मी आपल्या नेत्रांचें कौतुक पुरें करून घेतलें आहे. माझें हृदय आणखी जरी येथें आसक्त झालें तरी त्याचा काय उपयोग ? श्रुतशर्म्याशीं याचा आतां संग्राम होणार आहे. तेव्हां त्यांत कोणाचें काय होईल तें कोणाला ठाऊक ? शूरांना प्राण घालविण्याकरितांच रणाची इच्छा होत असते. असो; त्या संग्रामांत याचें अगोदर कल्याण होवो. मग पुढें काय करावयाचें तें ठरवूं. ज्यानें आकाशांतून विहार करीत असतांना कामचूडामणीलाही अक्षुब्ध चित्तानें पाहिलें, त्याच्या हृदयाला माझ्यासारखी सामान्य स्त्री अनुरक्त कशी करूं शकेल ?"

## ६. महौषधींची प्राप्ति.

ती असें म्हणाली असतां, तिची सखी म्हणाली,–' गडे, तूं हें काय म्हणतेस ? तुझें चित्त याच्या ठिकाणीं आसक्त होणार नाहीं, अशी खात्री आहे का ? अग, ज्या सुंदरानें केवल दर्शनानेंच कामचूडामणीचें हृदय आकर्षण करून घेतलें, तो दुसऱ्या कोणाचें चित्त हरण करून घेणार नाहीं ? फार काय, पण साक्षात् अरुंधतीसारख्या महापतिव्रतेचें चित्तही याला पाहून क्षणभर क्षुब्ध झाल्यावांचून रहाणार नाहीं. संग्रामांत याचें कल्याणच होणार आहे, हें तुला विद्यासामर्थ्यानें सहज कळण्यासारखें आहे. सिद्धांनीं या उत्तम चक्रवर्ती राजाच्या-कामचूडामणी, सुप्रभा व तूं, अशा तिघी एका गोत्रांतील–भार्या होतील, असें सांगितलें आहे. त्यांतील सुप्रभा तर याला पूर्वींच मिळाली आहे. असें असतांना संग्रामांत याचें अकल्याण होण्याची शंका तूं कां घेतेस ? सिद्धांचें वचन कधींही असत्य होणार नाहीं. शिवाय सुप्रभेनेंही ज्याचें चित्त हरण करून घेतलें, त्याला स्ववश करणें तुला फारसें कठिण आहे, असें नाहीं; कारण गडे, तूं तिच्याहून

अधिक सुंदर आहेस. आपल्या बांधवांविषयीं तुला कांहीं वाटत असेल, तर साध्वींना पतीवांचून अन्य बांधवच नसतो *

आपल्या मैत्रिणीचें हें उचित भाषण ऐकून ती कन्या म्हणाली,—"सखे, तूं म्हणतेस तें खरें आहे. मला अन्य बंधूंना घेऊन काय करावयाचें आहे ? संग्रामांत याला जय मिळणार हेंही मला विद्यासामर्थ्यानें कळलें आहे. याला अनेक विद्या व रत्नें प्राप्त झालीं आहेत. पण औषधी अद्यापि सिद्ध झाल्या नाहींत. त्यामुळें माझें मन अतिशय दुःखी होत आहे. चंद्रपाद पर्वतावर गुहेमध्यें त्या सर्व आहेत. पुण्यवान् चक्रवर्ती राजाला त्या प्राप्त होत असतात. यास्तव तेथें जाऊन यानें जर त्या संपादन केल्या, तर याचें मोठें कल्याण होईल. कारण उद्यांच महा संग्रामाला आरंभ व्हावयाचा आहे."

त्या दोघींचा हा संवाद ऐकून सूर्यप्रभ, झोंपेचें सोंग सोडून उठला, व मोठ्या नम्रपणें त्या कन्येला म्हणाला,—"सुंदरि, तूं माझ्याविषयीं मोठाच स्नेह दाखविलास. त्या औषधी आणण्याकरितां हा मी तिकडे चाललों, पहा. पण प्रिये, तूं कोण आहेस, तें मला सांग. हा प्रश्न व भाषण ऐकून आणि आपलें सर्व बोलणें यानें ऐकलें असें जाणून, ती सुंदरी लज्जेनें अधोमुख होऊन राहिली. तेंव्हां तिची सखी म्हणाली,—"ही सुमेरु विद्याधरेंद्राची भाची म्हणजे बहिणीची मुलगी आहे. हिचें नांव विलासिनी. तुझ्या दर्शनाविषयीं ही अतिशय उत्सुक झाली होती.

नंतर सूर्यप्रभानें प्रभासादिकांना उठवून तिचें औषधीविषयींचें म्हणणें सांगितलें. व सुमेरु, मय आणि सुनीथ यांना कळविण्याकरितां त्यानें प्रहस्ताला पाठविलें. तें ऐकतांच त्यावर पूर्ण विश्वास ठेवणारे ते तिघे तेथें आले व त्यांच्या संमतीनें सूर्यप्रभ, रातोरात सचिवांसह चंद्रपादपर्वताकडे जावयास निघाला. मार्गांत सशस्त्र यक्ष, गुह्यक, कूष्मांड इत्यादिकांनीं त्याला फार विघ्नें केलीं. पण त्या सर्वांचें निवारण करून तो चंद्रपाद पर्वतावर जाऊन पोंचला. सूर्यप्रभ, सचिवांसह त्या गुहेच्या द्वारापाशीं गेला; तों शंकराच्या गणांनीं त्यांना अडविलें. त्यांचीं तोंडें विचित्र व विक्राळ होतीं. त्यांना पहातांच यांच्याशीं युद्ध केल्यास शंकर

* भर्तारं हि विना नान्यः सतीनामस्ति बान्धवः ।

रागावेल, यास्तव सहस्रनामानें आपण यांची स्तुति करूं या, म्हणजे हे भोळे गण प्रसन्न होतील.—असें सुवार कुमार सूर्यप्रभादिकांस म्हणाला, त्याच्या सांगण्याप्रमाणें सर्वांनीं स्थिरचित्तानें व अनन्य भक्तीनें वरद शंकराची नाम-स्तुति चालविली. कांहीं वेळानें आपल्या स्वामीची स्तुति ऐकून शिवगण प्रसन्न झाले, व त्यांस म्हणाले,-' आम्ही या गुहेचें द्वार सोडलें आहे, यांतल्या महौषधी तुम्ही खुशाल घ्या, पण सूर्यप्रभानें यांत स्वतः जाऊं नये, प्रभासानें हिच्यामध्यें प्रवेश करावा, कारण त्याला यांत जाणें सुलभ होईल.'

गणांच्या या म्हणण्याला सूर्यप्रभादिकांनीं आपलें अनुमोदन दिलें. व प्रभास गुहेंत जाऊं लागला. त्याबरोबर ती गाढ अंधकारानें जरी भरलेली होती तरी एकाएकीं प्रकाशयुक्त झाली. त्यांतून चार भयंकर राक्षस उठून आले; पण त्यांना हा महावीर मुळींच भ्याला नाहीं. ते म्हणाले,-' या, आम्ही तुमचे दास आहों.' असें म्हणून ते त्याला आंत घेऊन गेले. तेथें प्रभासाला सात दिव्य औषधी मिळाल्या. त्या घेऊन तो बाहेर आला व त्यानें त्या सर्व सूर्यप्रभाला दिल्या. त्याबरोबर- 'सूर्यप्रभा, तुला या सात दिव्य महौषधी मिळाल्या आहेत'—अशी आकाशवाणी झाली. ती ऐकून सूर्यप्रभादि सर्व आनंदित झाले, व लागलेच परतून आपल्या सैन्य-शिबिरांत आले.

तेथें पोंचल्यावर सुनीथ, सुवास कुमारास म्हणाला,-' मुने, गणांनीं सूर्यप्रभाला सोडून प्रभासाला आंत कां पाठविलें, व तेथील राक्षसांनींही त्याचा सत्कार कां केला ?' त्यावर मुनि म्हणाला,-'त्याचें कारण असें कीं, प्रभास हा तुमचा मोठा हितकर्ता आहे. सूर्यप्रभाचा जणुं काय तो आत्माच आहे. त्या दोघांमध्यें वास्तविक भेद मुळींच नाहीं. शिवाय याच्यासारखा शूर व प्रभावशाली पुरुष विरळाच सांपडेल. पूर्व पुण्यांमुळें ही गुहा त्याची आहे. हा पूर्वी कोण होता, कसा होता, इत्यादि सर्व मी तुम्हांला सांगतों, ऐका:—

### ७. प्रभासाचें पूर्ववृत्त.

पूर्वी नमुचि या नांवाचा एक उत्तम दानव होता. दानें देण्यामध्यें आसक्त झालेल्या त्या महावीराला, याचना करणाऱ्या शत्रूलाही अदेय असें कांहीं नव्हतें. त्यानें हजारों वर्षें तीव्र तप करून ब्रह्मदेवापासून

वर मिळविला. त्यानंतर त्यानें इंद्राला अनेकदां जिंकून भयानें पळावयास लाविलें. तेव्हां कश्यपमुनींनीं मध्यें पडून देवासुरांचें सख्य केलें. नंतर वैरभाव सोडून त्या दोघांनींही समुद्रमंथन करण्याचा संकेत केला. मंदरपर्वताच्या योगानें क्षीरसागराचें मंथन केल्यावर त्यांतून विविध रत्नें निघालीं. त्यांतील उच्चैःश्रवा घोडा नमुचीच्या वांट्यास आला. इतर देवासुरांनाही त्यांतून निघालेल्या वस्तूंचा उचित भाग मिळाला; पण शेवटीं निघालेलें अमृत देवांनींच हरण केलें. तेव्हां अर्थात्‌च पुनः वैर पडलें. त्यांचा मोठा संग्राम सुरू झाला. त्यांत देवांच्या शस्त्राघातानें जो जो असुर मरत असे, त्याला त्याला उच्चैःश्रवा आपल्या श्वास-वायूनें पुनः जिवंत करी. त्यामुळें देवांना, दैत्य व दानव अजिंक्य आहेत, असें वाटलें. तेव्हां खिन्न होऊन बसलेल्या इंद्राला बृहस्पति एकांतांत नेऊन म्हणाला,-"याला एक उपाय आहे, तो तूं सत्वर कर. तूं स्वतः जाऊन नमुचीपाशीं त्या अश्वाची याचना कर. तूं जरी शत्रु असलास तरी तो उदार पुरुष तुला अश्व देईल; कारण जन्मापासून संपादन केलेलें दातृत्व-यश तो अश्वाकरितां घालविणार नाहीं."

देवगुरूची ही युक्ति मान्य करून इंद्र, देवांसह नमुचीकडे याचक होऊन गेला, व उच्चैःश्रवाची याचना करूं लागला. तेव्हां 'माझ्या येथून कोणीही याचक विन्मुख होऊन परत जात नाहीं. त्यांतूनही आज हा इंद्र याचक होऊन आला आहे. तेव्हां मी नमुचि असतांना याला घोडा न देतां परत कसें पाठवूं? त्रिभुवनांत झालेली दातृत्व-कीर्ति व संपादन केलेलें यश हीं दोन्ही जर आज नष्ट झालीं, तर मला ही संपत्ति व हें जीवित यांना घेऊन काय करावयाचें आहे?' असा विचार करून, शुक्र 'नको, नको' म्हणत असतांनाही त्या महाउदारानें इंद्राला तें अश्वरत्न अर्पण केलें. तेव्हां अश्वाचें दान देणाऱ्या त्याला, विश्वास दाखवून इंद्रानें कपटानें मारलें. नमुचि शस्त्रांनीं मरणार नाहीं, असें जाणून त्यानें आपल्या वज्राला गंगेचा फेंस लाविला, व त्याच्या योगानें त्यानें त्याचा वध केला. हर! हर! या संसारांत भोगतृष्णा अति कठिण आहे. तिनें ज्यांना परवश केलें आहे, असे देवही अनुचित कृत्य व अपकीर्ति यांस भीत नाहींत.

---

१ अहो दुरन्ता संसारे भोग-तृष्णा यया हृताः ।
अनौचित्यादकीर्तेश्च देवा अपि न बिभ्यति ॥

नमुचीच्या मातेला तपोबलानें हें इंद्राचें दुष्कृत्य कळलें, व दुःखानें संतप्त होऊन तिनें शोक-शांतीकरितां–'तोच माझा बलाढ्य नमुचि पुनः माझ्या गर्भांत, युद्धामध्येंही सर्व देवांना अजिंक्य होऊन, निर्माण होवो'–असा संकल्प केला. त्याप्रमाणें तो पुनः तिच्या उदरीं जन्मास आला. अचिंत्य सामर्थ्यामुळें त्याला प्रबल हें योग्य नांव प्राप्त झालें होतें. तो सर्व रत्नमय होता. त्यानेंही मोठें तप केलें. तो धन्य पुरुष आपल्या प्राणांनींही याचकांची तृप्ति करण्यास नेहमीं सज्ज असे. त्या प्रबल दानवेश्वरानें इंद्राला शंभरदां जिंकलें. तेव्हां देव पुनः संकेत करून त्याच्यापाशीं याचना करावयास आले, व पुरुष-यज्ञाकरितां आम्हांला तूं आपला देह दे, अशी प्रार्थना करूं लागले. तें ऐकून त्या महादात्यानें आपला देहही शत्रूंना देऊन टाकला. उदार पुरुष आपले प्राण सोडतात; पण याचकांस विन्मुख जाऊं देत नाहींत.[1] असो; त्यानंतर देवांनीं त्या प्रबल दानवाचे तुकडे तुकडे केले. तोच हा आतां मनुष्यलोकीं प्रभास-शरीरानें उत्पन्न झाला आहे. याप्रमाणें हा पूर्वी नमुचि होता, पुढें प्रबल झाला व तोच आतां या सूर्यप्रभाचा मित्र प्रभास झाला आहे. हा पुण्यप्रभावामुळें शत्रूंस अजेय आहे. त्याच्या प्रबलसंज्ञक जन्मांत, ही औषधी-गुहा याची होती. ते राक्षसही याचेच किंकर. त्या गुहेच्या खालीं पाताळांत प्रबलाचें मोठें मंदिर आहे, तेथें याच्या बारा भार्या अतिशय सुंदर व उत्तमप्रकारें भूषित आहेत. तेथें नानाप्रकारचीं रत्नें, आयुधें, चिंतामणी, लक्षावधि योद्धे व घोडे आहेत. ती सर्व याची पूर्वार्जित संपत्ति आहे. सारांश; अशा प्रकारचा हा प्रभास आहे. याला अशक्य असें कांहीं नाहीं.

मुनिबालकानें सांगितलेला हा वृत्तांत ऐकतांच मय, प्रभास, सूर्यप्रभ इत्यादि सर्व, पाताळांतील ती सामग्री आणण्याकरितां तत्काल तेथें गेले, आणि प्रभासाच्या पूर्वपत्न्या, चिंतामणि, द्रव्य, घोडे, व असुर यांस घेऊन आपल्या सैन्यशिबिरांत परत आले. नंतर रणदीक्षा घेतल्यामुळें, दर्भशय्येवर पडून त्यांनीं राहिलेली रात्र घालविली.

---

१ प्राणानुदारा विसृजन्त्यर्थिनो न पराङ्मुखान् ॥

# तरंग ४ था.

## १. युद्धाची तयारी व सैन्य गणना.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं उठून व सर्व नित्य कृत्यें संपवून, सूर्यप्रभ, सर्व सैन्य व सचिव यांसह श्रुतशर्म्याला जिंकण्याकरितां तेथून निघाला. त्रिकूटपर्वतावर त्याचें निवासस्थान होतें; म्हणून तो त्याच्या जवळच्या एका सुरक्षित जागीं जाऊन उतरला. तेथें श्रुतशर्म्याचेंही सैन्य होतें; पण त्याला हाकलून देऊन यानें आपल्या सैन्याचा तळ त्या विस्तृत प्रदेशांत दिला. इतक्यांत मय—सुमेरु इत्यादि वीर जेथें बसले होते, तेथें त्रिकूटेश्वराचा दूत आला, व जवळ येऊन खेचरेश्वर सुमेरूस म्हणालाः— 'श्रुतशर्म्याच्या पित्यानें तुला असा निरोप सांगितला आहे, कीं तूं दूर रहात असल्यामुळें, आम्ही तुझा योग्य पाहुणचार आजपर्यंत कधींच केला नाहीं. आज तूं दुसऱ्या अनेक पाहुण्यांसह आमच्या देशांत आला आहेस, यास्तव आम्ही आतां तुमचें यथोचित आतिथ्य करणार आहों.'

शत्रूचा हा निरोप ऐकून सुमेरु त्यास उलट म्हणाला,—"फार चांगलें आहे. आमच्यासारखे सत्पात्र अतिथी तुम्हांला पुनः कधीं मिळावयाचे नाहींत. आतिथ्याचें फल येथेंच मिळतें. त्याच्याकरितां परलोकीं जावें लागत नाहीं.* तर हे आम्ही येथें तयार आहोंत. आमचें वाटेल तसें आतिथ्य करा." सुमेरूचा हा प्रतिसंदेश ऐकून दूत आल्या मार्गानें आपल्या स्वामीकडे गेला. नंतर सूर्यप्रभादिक, उंच प्रदेशीं उभे राहून आपल्या सैन्याची रचना कशी काय झाली आहे तें पाहूं लागले. इतक्यांत सुनीथ आपल्या मय नांवाच्या पित्यास,—'आमच्या या सैन्यांतील रथ्यादिकांचा पृथक् पृथक् विभाग कसा काय केला आहे, तें सांगा,'—अशी नम्रपणें प्रार्थना करूं लागला. तेव्हां, 'बरें आहे—सांगतों ऐक'—असें म्हणून बोटानें दाखवीत सर्वज्ञ मय म्हणाला,—" वत्सा, सुनाहु, निर्घात, मुष्टिक, गोहर, प्रलंब, प्रमाथ, कंकट, पिंगल, व वसुदत्तादि राजे, यांतील प्रत्येकजण अर्धरथ आहे. अंकुरी, सुविशाल, इत्यादिक पूर्णरथी आहेत. प्रकंपन, दर्पित इत्यादि राजे द्विरथी आहेत. विरोचनादिक तिप्पटरथी आहेत.

* आतिथ्यं न परे लोके दास्यतीहैव तत्फलम् ।

सुशर्म-प्रभृति राजपुत्र चतुर्गुण रथी आहेत, ( म्हणजे त्यांतील प्रत्येक चौघांशीं लढूं शकतो.) कुंजरी, वीरवर्मा, प्रवीरवर, सुप्रतिज्ञ, अमराराम, चंडदत्त, इत्यादि राजे, व राजपुत्र पंचगुण रथी आहेत. हा उग्रवर्मा राजपुत्र षड्गुण रथी आहे, राजपुत्र विशाख, सुतंतु, सुगम, व नरेंद्रशर्मा हे सप्तगुण रथी आहेत, सहस्रायु राजपुत्र महारथ आहे, शतानीक महारथांच्या सैन्याचा मुख्य आहे. सुभास, हर्ष, विमल, महाबुद्धि, अचल, प्रियंकर, शुभंकर, यज्ञरुचि, धर्मरुचि, हे सूर्यप्रभाचे मित्र महारथ आहेत. विश्वरुचि इत्यादि तिघे महारथांचे नायक आहेत. प्रहस्तादिक अतिरथांचे अधिपती होण्यास योग्य आहेत, तसेच हे अनेक राक्षस अतिरथांचे अधिपती आहेत. प्रभास स्वतः सूर्यप्रभासारखा असून, तो या सर्व सैन्याचा नायक होण्यास योग्य आहे. आपल्या या सैन्यांत असेच आणखी दुसरेही महावीर आहेत; पण शत्रूंच्या सैन्यांत आमच्यापेक्षां अधिक वीर आहेत. तथापि भगवान् शंकराचा आम्हांवर मोठा अनुग्रह असल्यामुळें ते आम्हांला जिंकूं शकणार नाहींत.'

मय, सुनीथाला असें सांगत आहे, तोंच श्रुतशर्माच्या बापाकडून दुसरा दूत आला. तो म्हणाला,–'त्रिकूटाधिपति तुम्हांला असें सांगत आहे कीं, संग्राम हा शूरांना मोठा उत्सव आहे; पण ही भूमि अतिशय संकुचित असल्यामुळें, आपण येथून कलापग्राम नांवाच्या विपुल प्रदेशीं जाऊं चला.' हा निरोप ऐकतांच 'बरें आहे,' असें म्हणून ते सर्व सैन्यासह कलापग्रामास गेले. युद्धाविषयीं उत्सुक झालेले श्रुतशर्मा इत्यादिकही विद्याधरांच्या सैन्यासह तेथें आले. त्यांच्या सैन्यांत अनेक हत्ती आहेत असें पहातांच, सूर्यप्रभानेंही विमान पाठवून आपलें विशाल गज–सैन्य आणविलें. श्रुतशर्म्याच्या दामोदर सेनापतीनें महासूचि–व्यूह रचला. त्याच्या बाजूस मंत्र्यांसह स्वतः श्रुतशर्मा उभा राहिला. अग्रभागीं स्वतः दामोदर राहिला, व इतर महारथ इतर महत्त्वाच्या जागीं उभे राहिले. सूर्यप्रभाच्या सैन्याचाही प्रभासानें अर्धचंद्र–व्यूह रचिला. त्याच्या मध्यभागीं तो स्वतः राहिला. कुंजर–कुमार व प्रहस्त त्याच्या दोन्ही कोनांमध्यें उभे राहिले, व सूर्यप्रभ, सुनीथ इत्यादि सर्व व्यूहाच्या मागें राहिले. सुमेरु व सुवासकुमारही त्यांच्याच जवळ होते. दोन्ही सैन्यांतील रणवाद्यें वाजूं लागलीं. इतक्यांत तो संग्राम पहाण्याकरितां इंद्र, अप्सरा व लोक-

पाल यांसह आलेल्या देवांनीं आकाश भरून सोडलें. देवता, गण, भूत, मातृ इत्यादि अनुचर व प्रिया अंबा यांसह भगवान् शंकरही तेथें आला. मूर्तिमान् वेद, शास्त्रें व सर्व महर्षी यांसह भगवान् ब्रह्मा, सावित्री, सरस्वती इत्यादिकांना घेऊन आला. लक्ष्मी, कीर्ति, इत्यादि देवींसह चक्रधर हरि गरुडावर बसून आला. भार्यांसह कश्यपमुनि, आदित्य, वसू, यक्ष, राक्षस, नागेंद्र, प्रह्लादादिक दैत्य इत्यादि सर्व आले, व त्यांच्या योगानें अंतरिक्ष आच्छादित झालें असतां, इकडे युद्धाला आरंभ झाला.

रणवाद्यांचा भयंकर नाद ऐकून, ज्यांच्या अंगांतील रक्त सळसळूं लागलें आहे, असे वीररसपूर्ण योद्धे एकमेकांवर अनेक शस्त्रास्त्रांचा प्रहार करूं लागले. एकमेकांवर आपटलेल्या शस्त्रांचाही कठोर नाद कानटाळ्या बसवूं लागला. बाणसमूहानें आच्छादित केलेल्या दिशा मेघाच्छादित असल्याप्रमाणेंच भासूं लागल्या. एकमेकांच्या बाणांच्या घर्षणामुळें उद्भवलेला अग्नि विजेप्रमाणें चमकत होता. शस्त्रांच्या योगानें छिन्नभिन्न झालेल्या गजांच्या, घोड्यांच्या व वीरांच्या रक्ताचे पाट वाहूं लागले, थोडक्याच अवकाशांत तें रणांगण वीर, मांसभक्षक कोल्हे, कुत्रे, इत्यादि पशू, व गिधाडे, घारी इत्यादि पक्षी, आणि भूतगण यांचें महोत्सवक्षेत्रच झालें. रणमद चढल्यामुळें तेथें कोणी नाचत होते, कांहीं हंसत होते व कित्येक ओरडत होते.

याप्रमाणें बराच वेळ तुमुल संग्राम होऊन असंख्य सैनिक मेले. तेव्हां सुबाहु राजा अट्टहासाशीं द्वंद्वयुद्ध करूं लागला; पण अट्टहासानें त्याचें मस्तक उडविलें. तेव्हां मुष्टिक त्याच्यावर धांवून आला; पण त्या विद्याधराधीशानें त्यालाही मारलें. मुष्टिक मेला आहे असें पाहून, राजा प्रलंब, क्रोधानें त्याच्यावर धांवून आला. पण त्या खेचरानें त्याच्या सैन्यास मारून त्यालाही वीरगतीस पाठविलें. शत्रूचे हे चार मोठे वीर मेलेले पाहून, श्रतशर्म्याच्या सैन्यामध्यें मोठा जयघोष सुरू झाला. तो ऐकून सूर्यप्रभाचा मित्र हर्ष, सैन्यासह अट्टहासावर चालला. त्या वीरानें विलक्षण बाण-वर्षाव करून त्याच्या सैन्यास जिंकलें. त्याच्या सारथ्यास मारलें, स्वतः अट्टहासाचें वारंवार सज्ज केलेलें धनुष्य तीन वेळां तोडलें, ध्वज मोडून पाडला, व तीक्ष्ण बाणांनीं त्याचें शिर तोडून टाकलें. त्यामुळें रक्तस्राव करीत तो विद्याधर भूमीवर पडला. तो वीर धारातीर्थी पडला.

तेव्हां दोन्ही सैन्यांत इतका भयंकर क्षोभ झाला, कीं थोड्याच वेळांत दोन्ही पक्षांचें अर्धें अर्धें सैन्य मरून अर्धें बाकी राहिलें. अश्व, गज, व पायदळांतील असंख्य लोक तेथें अस्ताव्यस्त पसरले होते. क्वचित् स्थळीं कबंधें नाचत होतीं. हर्षावर विकृतदंष्ट्र विद्याधर चालून आला; पण त्यालाही त्यानें मारलें. इतक्यांत चक्रवाल विद्याधर वेगानें हर्षावर चाल करून आला, पण तो थकलेला असल्यामुळें त्याचें धनुष्य वारंवार तोडून आपल्या तीक्ष्ण बाणांनीं यमसदनीं पाठविलें. त्याच्या मागोमाग क्रमानें आलेल्या आणखी चौघांस त्यानें भूमीवर लोळविलें. तेव्हां निर्घात नांवाचा राजा पुढें आला. तोही चक्रवालासारखाच बलाढ्य होता, त्यामुळें त्या दोघांचें युद्ध पहाण्यासारखें झालें. त्यांनीं एकमेकांचे घोडे मारिले, रथांचा चूर उडविला, धनुष्यें व आयुधें वारंवार तोडलीं, व दोघेही एकमेकांच्या शस्त्र-प्रहारांनीं मरण पावले. नंतर कालकंपन विद्याधरेंद्र रणाग्रभागीं आला, व शत्रूकडून धांवून येणाऱ्या प्रकंपनाला त्यानें एका क्षणांत मारलें. तें पहातांच त्याच्यावर आणखी पांच राजपुत्र धांवून आले; पण त्यांनांही त्यानें मृत्युमुखीं पाडलें. त्यावेळीं खेचरांच्या सैन्यांत मोठाच जयघोष झाला व मर्त्य आणि असुर आतिशय खिन्न झाले. कालकंपनानें आणखीही अनेक शूरांना मारून मोठें कदन केलें, इतक्यांत सूर्यास्त झाला. तेव्हां भूमि रक्ताच्या योगानें चित्रविचित्र झालेली आहे असें पाहून, जणुं काय अंतरिक्षानें तिचेंही अनुकरण केलें. आणि कबंधांबरोबर भूतेंही प्रदोषकालचें नृत्य करावयास तयार झालीं आहेत असें पाहून, दोन्हीं सेनाध्यक्षांनीं आपापलीं सैन्यें शिबिरांत परत नेलीं. त्या दिवशीं श्रुतशर्म्याकडचे तीन व सूर्यप्रभाकडचे तेतीस महावीर कामास आले. त्यामुळें आप्त व मित्र यांच्या मरणानें दुःखी झालेला सूर्यप्रभ, रात्रभर चिंता करीत अंतःपुरवर्गावांचूनच राहिला. मुख्य सचिवांशीं पुढील युद्धोद्योगाविषयीं संकेत करण्यांतच त्याची रात्र संपली. त्याच्या स्त्रियाही एकत्र जमून ज्यांचे आप्त मेले होते, त्या स्त्रियांचें सांत्वन करूं लागल्या; पण त्या दुःखप्रसंगीं त्यांच्या नानाप्रकारच्या गोष्टी चालूच होत्या. कारण बायका एकत्र जमल्या म्हणजे त्यांच्या आपल्या नगरादिकांविषयीं गोष्टी सुरू व्हावयाच्याच.*

---

* स्त्रीणां न स क्षणो यत्र न कथा स्वपुराश्रया ।

## २. सूर्यप्रभाच्या स्त्रियांच्या गोष्टी.

त्या वेळीं बोलतां बोलतां एक राजपुत्री म्हणाली,–' आज आर्यपुत्र एकटेच कसे राहिले आहेत कोण जाणे.' त्यावर दुसरी म्हणाली,– 'संग्रामांत स्वजनांचा क्षय झाल्यामुळें, दुःखित झालेल्या त्यांना आज विषयभोग कसे सुचणार ?' तिसरी हंसून म्हणाली,–' आतां जर एकादी नवी उत्तम कन्या मिळाली तर ते सर्व दुःख विसरतील.' तें तिचें थट्टेचें भाषण न आवडल्यामुळें चवथी सूर्यप्रभ-पत्नी म्हणाली,–'आमचे प्राण-नाथ जरी स्त्रीलंपट असले, तरी असल्या संकट-प्रसंगीं त्यांना स्त्रीसुख प्रिय वाटणार नाहीं. तें ऐकून आणखी एकजण विस्मयानें म्हणाली,– ' पण खरेंच बाई, आमचे आर्यपुत्र इतके शूर, वीर, मानी व विद्यावान् असतांना ते स्त्रियांवर इतके लुब्ध कसे होतात ! आम्हीं इतक्या जणी आहों, तरी सुद्धां त्यांना आणखी मिळतील तितक्या बायका हव्याच आहेत. तृप्ति म्हणून कशी ती नाहींच.' तें ऐकून त्यांतील एक शहाणी मनोवती नांवाची भार्या म्हणाली,–' सख्यांनो, राजे अनेक स्त्रिया कां करीत असतात तें मी सांगतें, ऐका. निरनिराळ्या देशांतील स्त्रियांमध्यें निरनिराळे गुण असतात. त्यांचें रूप, वय, चेष्टा, विज्ञान इत्यादिकांमध्येंही फरक असतो. याचा प्रत्यय पहावयाचा असल्यास आपल्या पैकींच कर्नाटक, कोंकण, महाराष्ट्र, गुजरात, कच्छ, सिंधु, पंचांबु ( पंजाब ) मध्यदेश, इत्यादि निरनिराळ्या देशांच्या स्त्रियांकडे पहा. म्हणजे मी काय म्हणतें तें कळेल. अनेक देशांच्या स्त्रिया आपापल्या देशादि-आचारांच्या योगानें राजांचें मनोरंजन करितात. कित्येक आपल्या सुंदर मुखांनीं त्यांचें मन हरण करितात. कित्येकींच्या शरीरांचे बांधे त्यांच्या आसक्तीस कारण होतात. कांहीं राजकन्या आपल्या रम्य वेषानेंच त्यांना स्ववश करितात. कांहीं जणींच्या पुष्ट अवयवांकडे पाहून ते लोलुप होतात. एकादी राजकन्या कला-कौशल्य व चातुर्य यांच्या योगानेंच पतीस आवडते. एकादीचा गौरवर्ण जसा विजयी राजाला प्रिय वाटतो, तसाच एकादीचा काळा-वर्णही त्याला रम्य भासतो. सारांश; निरनिराळ्या देशच्या इतर प्राण्या-

प्रमाणें स्त्रियांमध्येंही वैचित्र्य असतें. त्या सर्व गुण–वैचित्र्याचा अनुभव घेण्याच्या इच्छेनें भाग्यवान् नरेश्वर अनेक देशच्या राजकन्यांशीं विवाह करितात. द्रव्याचें आनुकूल्य असल्यावर स्त्रीसारखा उपभोग्य पदार्थ विवाहावांचूनही प्राप्त होणें शक्य आहे; पण उत्तम पुरुष परस्त्रियांना नागिणीप्रमाणें भीत असतात. यास्तव सर्व सामर्थ्यसंपन्न पतीविषयीं अशा भलभलत्याच कल्पना करीत बसूं नये. उलट त्यांच्या सुखानेंच स्वतः सुखी होऊन रहावें.' मनोवतीच्या या उपदेशास मदनसेनाप्रभृति इतर सुज्ञ सपत्नींनींही आपलें अनुमोदन दिलें. त्यामुळें इतर अल्लड मुलींची समजूत पडून त्यांनीं स्वपतीविषयीं कुत्सित कल्पना न करण्याचा निश्चय केला. त्यानंतर गोष्टींच्या भरांत आल्यामुळें त्यांनीं लज्जा सोडून आपापल्या विलासांचे प्रकार एकमेकींस सांगितले. कारण मनांतली गुप्त गोष्टही दुसऱ्याला सांगितल्यावांचून स्त्रियांनां रहावत नाहीं. असो;

याप्रमाणें सूर्यप्रभाच्या सर्व स्त्रिया एकत्र जमून अशा लांब लांब गोष्टी सांगत असतांना, व स्वतः सूर्यप्रभ आपल्या प्राणतुल्य मंत्र्यांशीं युद्ध-संकेत करीत असतांना, अगदीं लहान झालेली रात्र संपली, व वीरांना आपलें सामर्थ्य दाखविण्यास उचित अवसर प्राप्त झाला.

---

## तरंग ५ वा.

### १. दुसऱ्या दिवशींचें युद्ध, प्रभासाचा पराक्रम.

चांगलें उजाडल्यावर विजयाची इच्छा करणारे ते दोघेही आपापलें सैन्य सज्ज करून युद्धाकरितां समरांगणांत आले. इंद्रादि प्रेक्षकही अंतरिक्षांत गर्दी करून उभे राहिले. विद्याधरांच्या दामोदर सेनापतीनें चक्र-व्यूह व सूर्यप्रभाच्या प्रभास सेनापतीनें वज्र-व्यूह रचिला. त्यानंतर दोन्ही सैन्यांचें तुमुल युद्ध सुरू झालें. वाद्यांचा भयंकर घोष व सुभटांचा नाद यांच्यायोगानें दिशा बधिर झाल्या. शस्त्रप्रहारांच्या योगानें रणांत सन्मुख मेलेले वीर माझ्या मंडलाचा भेद करितील, म्हणूनच जणुंकाय सूर्य

---

१ तदस्ति न किमप्यहो यदिह नोद्वमन्ति स्त्रियः ।

मिळून बाणांच्या मार्गे लपून राहिला. दामोदरानें रचलेला हा चक्रव्यूह दुसऱ्या कोणालाही तोडतां येणार नाहीं असें जाणून, स्वतः प्रभास, सूर्यप्रभाच्या आज्ञेनें त्यांत शिरला. तेव्हां स्वतः दामोदरानें येऊन त्या व्यूहाचें द्वार बंद केलें. म्हणजे तो स्वतः तेथें उभा राहिला. प्रभास एकटाच त्याच्याशीं निकरानें लढूं लागला; पण तो आपला जिवलग सखा एकटाच व्यूहांत शिरला आहे असें पाहून, सूर्यप्रभानें त्याच्या मागोमाग आणखीं पंधरा महारथी पाठविले. ते सर्वही व्यूहद्वारावर धांवून गेले. पण दामोदर अपूर्व पौरुष दाखवून त्यांच्याशीं एकटाच लढूं लागला.

तें पाहून जवळच असलेल्या नारदाला इंद्र म्हणाला,–'देवर्षे, हे सूर्यप्रभादिक दानवांचे अंश आहेत, आणि श्रुतशर्मा माझा अंश, व विद्याधर देवांचे अंश आहेत. यास्तव हा देवासुरांचाच संग्राम आहे. देवांनां भगवान् हरि सदा सहाय करीत असतो. हा दामोदर त्याचाच अंश आहे. इंद्र इतकें सांगत आहे तोंच, दामोदर–सेनापतीच्या सहायास दुसरे चवदा वीर आले. त्या सर्वांनीं मिळून सूर्यप्रभाच्या वीरांस द्वारावरच अडवून धरलें. त्यांचीं परस्पर भयंकर द्वंद्वयुद्धें सुरू झालीं.

पण आपले प्रहस्तादि महावीर, शत्रूंच्या शूरांकडून व्यूहाच्या बाहेरच अडविले गेले आहेत असें पाहून, सुनीथ मयाला म्हणाला,–'प्रभास एकटाच आंत शिरला आहे; पण त्याचें संरक्षण कसें होईल तें कांहीं कळत नाहीं. त्याच्या सहायार्थ मागून गेलेल्या या वीरांचाही कांहीं उपाय चालत नाहीं, आतां काय करावें ? पुढचा मागचा चांगला विचार न करितां प्रभासानें हें साहस उगीच केलें.' सुनीथाचें हें अधैर्याचें भाषण ऐकून सुवासकुमार म्हणाला,–' तूं व्यर्थ कां चिंता करतोस ? प्रभासापुढें त्रिभुवनांतील एकही वीर उभा रहाण्यास समर्थ नाहीं. हे सर्व खेचर मिळून जरी त्याच्यावर गेले, तरी तो त्या सर्वांचा चांगला समाचार

१ विस्तारभयास्तव येथें या व दुसऱ्याही वीरांचीं नांवें दिलीं नाहींत.

२ जीवानंदाच्या कथासरित्सागर पुस्तकांत मागच्यातरंगांतील सूर्यप्रभ व त्याच्या स्त्रिया यांच्या भाषणाचा भाग येथें घेतला आहे. पण तो येथें असंबद्ध दिसतो. क्षेमेंद्राच्या बृहत्कथामंजिरींत तो भाग मुळींच नाहीं. कारण त्यांत युद्धवर्णनाचा अगदींच संक्षेप केला आहे.

घेण्यास समर्थ आहे. यास्तव तुम्ही कोणीही आतां भलभलत्याच शंका घेऊन उगीच उद्विग्न होऊं नका.'

मुनिकुमार इतकें सांगत आहे, तों आदल्या दिवशीं सूर्यप्रभाच्या अनेक वीरांना मारून विजयी झालेला कालकंपन विद्याधर प्रभासाच्या समोर आला. त्याबरोबर प्रभास मोठ्यानें ओरडून म्हणाला,–' अरे वीरा, काल तूं आमचा पुष्कळ नाश केलास, पण आज तुझा पराक्रम कितीसा आहे तें मी पहातों.' इतकें बोलून त्यानें त्याला एका क्षणांत जर्जर केलें. एकेका बाणानेंच त्यानें त्याचे घोडे, सारथी, व ध्वज यांस भूमीवर पाडलें. नंतर दोन तीक्ष्ण बाणांनीं त्याचे दोन्ही हात, दुसऱ्या दोन सामान्य शरांनीं दोन्ही कान, व एका दिव्य शरानें त्याचें डोकें एका निमिषांत उडविलें. तेव्हां कालच्या अपकाराचा सूड उगविण्याकरितांच त्या अद्भुत सामर्थ्यवानानें हें घोर कर्म केलें असावें, असें तेथल्या प्रेक्षकांनां वाटलें. तो विद्याधरेश मरून पडला आहे, असें पहातांच मानवांच्या सैन्यास हर्ष व खेचरांच्या सैन्यास मोठा विषाद वाटला. इतक्यांत प्रभासावर कालंजरगिरीश्वर विद्युत्प्रभ आला; पण त्या मानव वीरानें मोठ्या कौशल्यानें मायेनें लढणाऱ्याही त्याला धारातीर्थी पाडलें.

तें पाहून श्रुतशर्मा आपल्या वीरांस म्हणाला, ' यानें आपल्या दोघां महारथ्यांनां मारलें आहे, तेव्हां आतां याची उपेक्षा करूं नका. याला तुम्ही सर्व मिळून मारा.' राजाची ही आज्ञा शिरसा मान्य करून आठ महारथी प्रभासावर धांवले. त्यांनीं त्याला चोहोंबाजूंनीं वेढलें, पण त्या वीरानें सतत शर-वृष्टि करून प्रथम त्यांचे घोडे, सारथी, इत्यादिकांना व नंतर क्रमानें त्यांनां मारून टाकलें. त्याचें हें अद्भुत युद्धकौशल्य पाहून सिद्धादि आकाशचरांनीं पुष्पवृष्टि केली. असुर व मानव यांचीं सैन्यें आनंदित झालीं. विद्याधर दुःखानें निस्तेज दिसूं लागले. इतक्यांत श्रुत-शर्म्याच्या आज्ञेनें आणखीं पांच महारथी त्या यमस्वरूपी मानवावर चालून आले. पण त्यानें त्यांनांही दक्षिण दिशेच्या अधिपतीकडे पाठविलें. त्यांच्या मागून आणखी चौघेजण पुढें सरसावले. पण प्रभासानें नारायणास्त्राच्या योगानें त्यांच्या अस्त्रांचें निवारण करून त्यांचे सारथी घोडे, धनुष्यें, रथ व ध्वज यांचा विध्वंस केला. तेव्हां श्रुतशर्म्यानें आणखी दहा वीर त्यांच्या सहायास पाठविले. ते समीप येतांच विरथ झालेले पहिले चार त्यांच्या

पैकीं चौघांच्या रथावर चढले. तेव्हां प्रभास एकटाच निर्भयपणें त्यांच्याशीं लढूं लागला. पण सूर्यप्रभानें कुंजरकुमार व प्रहस्त यांना व्यूह-द्वारावरील युद्ध सोडून प्रभासाजवळ जावयास सांगितलें, तेव्हां ते महावीर आयुधां-सह आकाशमार्गानें व्यूहांत शिरले, व प्रभासाजवळ जाऊन त्याला सहाय करूं लागले. दम व नियम यांच्यावर त्यांनीं निकराचा मारा केला. त्यांच्या सारथ्यांना मारून टाकलें व ते भयभीत होऊन आकाशांत उडून गेले असतां, तेही त्याच्या मागोमाग धांवले. सूर्यप्रभानें त्यांना सहाय करावयास आणखी आपले दोन मंत्री पाठविले. तेव्हां मायेनें गुप्त राहून ते दोघे विद्याधर शरवर्षाव करूं लागले, तेव्हां प्रहस्तादिकांनींही सिद्धांजन प्रयोगानें त्यांस पाहून, असे तीक्ष्ण प्रहार केले, कीं त्याच्या योगानें व्याकुळ झालेले ते दोघेही खेचर जीव घेऊन कोठें पळून गेले.

इकडे प्रभास राहिलेल्या बाराजणांशीं मोठ्या शौर्यानें लढतच होता. त्यानें त्यांचीं धनुष्यें वारंवार तोडून टाकिलीं. इतक्यांत प्रहस्तानें येऊन त्यांच्या सारथ्यांना मारलें. कुंजरकुमारानें त्यांच्या घोड्यांना यमसदनीं-पोंचविलें, व ते तिघेही त्या बाराजणांवर अशा वेगानें व इतके तीक्ष्ण बाण सोडूं लागले, कीं त्यांना समरांगणांत क्षणभरही टिकाव धरणें अशक्य झालें. ते बाराहीजण पूर्वींच्या दोघांप्रमाणेंच पळून गेले आहेत असें पाहून, श्रुतशर्म्याला फार दुःख झालें. राग आला व लाजही वाटली. त्यानें चंद्रगुप्त व नगरंगम या नांवाच्या आपल्या अतिबलाढ्य सचिवांस त्यांच्यावर पाठविलें, पण त्या तिघांपुढें त्यांचा टिकाव लागला नाहीं. हां हां म्हणतां त्यांनीं त्यांचे घोडे व सारथी यांना धुळ खात पाडलें. तेव्हां विरथ झालेल्या त्यांना शत्रूंचा वेग असह्य वाटला, आणि त्यामुळें ते रणांगण सोडून निघून गेले. प्रभासादिकांचा हा उत्कर्ष पाहून, मयादिकांस अत्यंत हर्ष झाला. असुर व मानव यांच्या सैन्यांत सर्वत्र आनन्द पसरला, व त्यांच्या जयघोषानें दशदिशा व्यापून गेल्या.

आपल्या वीरांचा असा उत्तरोत्तर क्षयच होत आहे असें पाहून, श्रुत-शर्मा आणखी चार महारथी बरोबर घेऊन स्वतः प्रभासादिकांवर आला. तेव्हां तेही वीर त्यांच्या अंगावर धांवले. त्यावेळीं मोठें तुमुल युद्ध सुरू झालें. बाणांच्या योगानें अंतरिक्ष आच्छादित झालें. इतक्यांत एकदां पळून गेलेले निर्लज्ज विद्याधर पुनः श्रुतशर्म्याजवळ येऊन त्याला सहाय

करूं लागले. तें पाहून सूर्यप्रभानें प्रज्ञाढ्यप्रभृति मित्रांस भूतासन-विमानांतून, पूर्वी पायानें गेलेल्या प्रभासादिकांच्या रथांसह, त्यांच्या सहा-यार्थ आकाशमार्गानें पाठविलें, व तेही सर्व प्रभासादिकांजवळ येऊन पोंचले. योग्य प्रसंगीं दृढरथ व शूर सहायक येऊन पोंचल्यामुळें, त्या तिघांचाही उत्साह अतिशय वाढला. श्रुतशर्म्याचेही अवशिष्ट वीर त्याच गर्दीत येऊन मिळाले व त्यामुळें भयंकर कदन सुरू झालें. दोन्ही सैन्यां-तील असंख्य जीव मेले, भूतासनविमानांतून आलेल्या शतानीक राजानें श्रुतशर्म्याकडच्या दहा महावीरांस राजाच्या समक्ष मारलें. तेव्हां रागाव-लेला श्रुतशर्मा त्याच्या अंगावर धांवला. त्या दोघांचें देवांनांही आश्चर्य-कारक वाटणारें युद्ध दिवस मावळेपर्यंत चाललें होतें. सूर्यास्त होऊन अंधकार पडूं लागला आहे, असें पहातांच त्या दोघांनींही आपापलीं सैन्यें परत नेलीं, त्या दिवशीं विद्याधरांचा अकल्पित क्षय झाल्यामुळें त्यांच्या सैन्यांत हाहाकार व असुर-मानवांना विजय मिळाल्यामुळें त्यांच्या सेनानिवेशांत जयजयकार चालला होता.

## २. सूर्यप्रभाला विद्याधर येऊन मिळाले.

रात्रीं सुमेरूनें ज्यांची ओळख करून दिली आहे, असे दोघे विद्याधर श्रुतशर्म्याचा पक्ष सोडून सूर्यप्रभाकडे आले, व प्रणाम करून म्हणाले,— " प्रभो, महायान व सुमाय या नांवाचे आम्ही विद्याधर आहों. सिंह-बल या नांवाचा आमचा आणखी एक मित्र होता. आम्ही महाश्मशा-नाधिपतित्व सिद्ध करून घेतलें आहे, त्यामुळें दुसरे विद्याधर आम्हांला कांहीं करूं शकत नाहींत. एकदां श्मशानांत मोठया आनंदानें रहाणाऱ्या आम्हांजवळ एक शरभानना या नांवाची एक योगिनी आली. ती महा-प्रभावशालिनी असून आम्हांवर अतिशय प्रसन्न झाली होती. तिला प्रणाम करून आम्ही म्हटलें,—'तूं कोण? कोठें असतेस? जेथें तूं असतेस तेथें अपूर्व असें कांहीं पाहिलें आहेस काय?'

हा आमचा प्रश्न ऐकून ती म्हणाली, 'मी योगिनी आहें. माझ्या इतर योगिनी-मैत्रिणींसह प्रभु महाकालेश्वराचें दर्शन घ्यावयास मी गेलें होतें. इतक्यांत तेथें एक वेताळ येऊन म्हणाला, 'प्रभो, आमच्या अग्निक सेनापतीला विद्याधरेशांनीं मारलें, व त्यामुळें अनाथ झालेल्या त्या सेनापतीच्या कन्येला तेजःप्रभ, बलात्कारानें हरण करीत आहे; पण ती खेचर-

चक्रवर्ती राजाची पत्नी होईल, असा सिद्धांचा आदेश आहे. यास्तव सिद्धांचें वचन खरें होण्याकरितां तिला त्याच्या हातांतून सोडीव, असें केल्यानें आम्हांवर मोठा अनुग्रह होणार आहे.' हें त्या वेताळाचें भाषण ऐकून देवानें 'जा, तिला सोडवा.' अशी आम्हांला आज्ञा केली. त्याबरोबर आम्हीं वेगानें जाऊन आकाशचारी तेजःप्रभाला अडविलें. 'मी ही कन्या श्रुतशर्म्याकरितां नेत आहें' असें तो सांगत असतांनाही आम्ही बलात्कारानें तिला त्याच्यापासून सोडवून प्रभूकडे घेऊन गेलों. तेव्हां त्या दयाळु भगवानानेंही तिला तिच्या आप्तांच्या हवालीं केलें. ही एक अद्भुत गोष्ट पाहून, व तेथेंच कांहीं दिवस राहून ही मी आतांच प्रभूला प्रणाम करून येथें येत आहें.'

हें तिचें भाषण ऐकून आम्ही पुनः म्हटलें, 'योगिनि, तुला अज्ञात असें कांहीं नाहीं. यास्तव पुढें चक्रवर्ती कोण होणार तें सांग पाहूं?' आमची ही प्रार्थना ऐकून 'सूर्यप्रभ' असें ती आम्हांस म्हणाली. तें ऐकतांच सिंहबल म्हणाला,—'इंद्रादिक देव ज्याच्या पक्षाचे आहेत, त्या श्रुतशर्म्याचा पराजय होणें शक्य नाहीं.' पण त्यावर ती योगिनी उलट बोलली, 'माझ्या सांगण्यावर यावेळीं जरी तुमचा विश्वास बसत नसला, तरी लवकरच होणाऱ्या विद्याधर व असुर यांच्या संग्रामांत, या तुमच्या सिंहबलाला तुमच्या समक्ष एक मानव मारील, व तें घोरकर्म पाहिल्यावर माझ्या सांगण्यावर तुमचा विश्वास बसेल.' इतकें सांगून ती योगिनी स्वस्थानीं गेली. थोड्याच दिवसांनीं हा संग्राम उपस्थित झाला. त्यांत सिंहबल मेल्याचें आज आम्ही प्रत्यक्ष पाहिलें, व त्यामुळें तिचें म्हणणें सत्य आहे, असें जाणून आम्ही दोघे आपल्याला शरण आलों आहों."

सूर्यप्रभानें मयादिकांच्या समक्ष, त्यांच्या तोंडचा हा वृत्तांत ऐकला, त्यामुळें त्याला संतोष झाला. त्यानें त्या दोघांचाही उचित सत्कार केला. ही वार्ता ऐकून श्रुतशर्म्याला फार खेद झाला; पण इंद्रानें त्याच्याकडे विश्वावसूस पाठवून त्याचें समाधान करविलें. 'तूं धीर धर, उद्यां मी सर्व देवांसह तुझें साह्य करीन' असें इंद्रानें त्याला कळविलें होतें. इकडे सूर्यप्रभ, शत्रूंच्या सैन्यांत भेद उत्पन्न झाला आहे, (म्हणजे शत्रूंचे वीर फुटून आपल्या पक्षांत येऊं लागले आहेत.) असें पाहून आनंदित झाला. मत्त विद्याधरांना मारून प्रभासानें महाविजय

मिळविल्यामुळें, त्याचा उत्साह वाढला, व स्त्रीसुखपराङ्मुख होऊन, तो त्या रात्रींही आपल्या प्राणतुल्य प्रिय सचिवांसह शय्यागृहांत गेला.

## तरंग ६ वा.

शय्यागृहांत स्त्रीवांचून व युद्धाविषयीं उन्मुख असलेला सूर्यप्रभ, शय्येवर पडून आपल्या वीतभीत सचिवास म्हणाला,–' मित्रा, आज मला झोंप येत नाहीं. यास्तव एकादी अपूर्व कथा सांग.' तेव्हां–' बरें आहे ' असें म्हणून वीतभीत पुढील उत्कृष्ट कथा सांगूं लागला.

### १. गुणशर्म्याची कथा.

पूर्वी उज्जयिनींत महासेन या नांवाचा एक राजा होता. त्याची अशोकवती या नांवाची परम सुंदरी महिषी होती. तेथें गुणशर्मा या नांवाचा एक तरुण, सुंदर व सकल शास्त्रज्ञ ब्राह्मण होता. तो सतत राजाच्या बरोबर राहून त्याला आनंद देई. एकदां अंत:पुरांत असलेल्या राजानें, दुसरे सर्व जन तेथेंच असतांना, गुणशर्म्याला नाचावयास सांगितलें. तेव्हां ' प्रभो, मला नृत्य येतें; पण सभेमध्यें व विशेषत: राजा व राणी यांच्या समोर तें करणें मला उचित वाटत नाहीं, अशल्या नृत्याचा शास्त्रानें निषेध केला आहे. खरोखर आपल्या समोर नृत्य करण्याची मला लाज वाटते,'. असें तो हंसत बोलला; पण राणीनें आग्रह केल्यामुळें राजा त्याला पुन: म्हणाला,–' हें कांहीं रंगभूमींतील नृत्य नव्हे. येथें कोणी परकी नाहीं. आपण सर्व मित्र आहों. येथें नाचून दाखवावयाला लाज कसली ! मी तुझा राजा नसून जिवलग मित्र आहें, असें समज. तुझें नृत्य पाहिल्यावांचून आपण तर कांहीं बुवा आज अन्न घेणार नाहीं.

राजानें असा अति आग्रह केल्यामुळें, गुणशर्म्यानें त्याचें म्हणणें मान्य केलें. कारण आग्रही राजाची आज्ञा भृत्यांना शिरसा मान्य करावी लागते.* असो; त्यानंतर तो तरुण ब्राह्मण आपल्या अंगानें, असा सुंदर नाच करूं लागला कीं, त्याच्या योगानें राजा व राणी यांचीं चित्तेंही

* कथं हि लंघ्यते भृत्यैर्ग्रहिकस्य प्रभोर्वचः ।

आंतल्या आंत नाचूं लागली. त्यानंतर राजानें त्याला एक वीणा वाजवावयास दिली. ती लावीत असतांना तो राजाला म्हणाला,—' देव, ही वीणा अप्रशस्त आहे. हिच्या या एका तारेंत कुत्र्याचा केस आहे. तिच्या आवाजावरूनच मला हें कळतें. तें ऐकतांच राजानें ती तार सोडून व उलगडून पाहिली, तों त्यांत खरोखरीच कुत्र्याचा केस त्याला आढळला. त्यामुळें त्याच्या कौशल्याची चांगलीच परीक्षा होऊन, राजानें त्याला दुसरी वीणा आणून दिली. तेव्हां तो तिला लावून तिच्या रम्य सुरावर मनोहर गायन करूं लागला. तें ऐकून आश्चर्यचकित झालेल्या सपत्नीक राजाला, त्यानें आपलें शस्त्रास्त्रविद्या-नैपुण्यही क्रमानें दाखविलें. नंतर राजानें त्याचें युद्ध-कौशल्य पहाण्याच्या इच्छेनें त्याला बंधकरणा-विषयीं प्रश्न केला. तेव्हां त्या शूरानें राजाला शस्त्रें घेऊन आपल्यावर प्रहार करावयास सांगितलें, व राजानेंही अनेक शस्त्रांचे तीक्ष्ण प्रहार त्याच्यावर केले; पण ते सर्व चुकवून त्यानें त्याला बांधून सोडलें. हें त्याचें अद्भुत कौशल पाहून, राजा अतिशय प्रसन्न झाला. त्याची त्यानें पुष्कळ प्रशंसा केली, व हा आपला धुरंधर मंत्री होण्यास योग्य आहे असें जाणून, त्यानें त्याला मुख्य मंत्री केलें.

राणी अशोकवतीही त्याचें रूप व गुण पाहून त्याच्यावर आसक्त झाली. हा पुरुष जर मला न मिळाला तर माझ्या जीविताचा काय उपयोग? असें चिंतन करून ती युक्तीनें राजाला म्हणाली,—' देव, आज या गुणशर्म्याचें गायन व वादन ऐकून मला तें शिकावें, अशी फार इच्छा झाली आहे. यास्तव आपण कृपा करून त्याला तें शिकवावयास सांगा.' राणीची ही प्रार्थना राजानें मान्य केली, व गुणशर्म्याला तशी आज्ञा दिली. तेव्हां—' बरें आहे, आज्ञेप्रमाणें शुभ दिवशीं गायन सांगावयास आरंभ करीन.' असें सांगून गुणशर्मा आपल्या घरीं गेला.

त्यानंतर योग्य मुहूर्तावर तो तिला वीणा[1] वाजवावयास शिकवूं लागला. पण कांहीं दिवसांनीं तिची दृष्टि व मन चंचल झालें आहे असें पाहून, अन्यायास भ्यालेला तो एके दिवशीं भोजनाच्या वेळीं राजाजवळ येऊन बसला, व एक आचारी भाजी वाढावयास आला असतां ' नको, नको,

१ येथें वीणा म्हणजे सतार असें समजावें.

ती राजाच्या पानावर घालूं नको.' असें त्याला म्हणाला,—तेव्हां 'तें कां?' असें राजानें विचारलें. तेव्हां तो शहाणा ब्राह्मण त्याला म्हणाला,—'प्रभो, ही भाजी विषयुक्त असावी, असें मी ताडलें आहे. ती वाढावयास आलेल्या यानें माझ्याकडे साशंक व चकित दृष्टीनें पाहिलें. माझा तर्क खरा आहे, कीं खोटा आहे हें पहावयाचें असल्यास, आतांच ही भाजी कोणाला तरी खावयास घाला, म्हणजे काय तें समजेल. असलें विष उतरण्याची युक्ति मला माहीत आहे.'

तें ऐकून राजानें त्याच आचाऱ्याला ती भाजी खावयास सांगितलें, व सर्वांसमक्ष ती खातांच तो मूर्च्छित होऊन पडला. पण गुणशर्म्यानें मंत्र व औषधी यांच्या योगानें त्याचें विष तत्काल उतरलें. नंतर राजानें प्रश्न केला असतां, तो स्वयंपाकी सर्व खरा वृत्तांत सांगूं लागला,—'प्रभो, तुमचा शत्रु गौडपति राजा—विक्रमशक्ति यानें प्रेरणा केल्यामुळें, मी येथें आलों, व परदेशस्थ असलों तरी, आचाऱ्याच्या कामांत फार निपुण असल्यामुळें, मी आपल्या महानसांत आपल्याच आज्ञेनें शिरलों. विक्रमशक्तीच्या आज्ञेप्रमाणें मी आपल्याला आज विष देत होतों; पण या बुद्धिमानानें माझें कपट ओळखलें. हा खरा वृत्तांत आहे. याउपर आपल्याला वाटेल तें करा. सूदाचें हें भाषण ऐकून महासेन राजानें त्याचा निग्रह केला, व प्राण वांचविणाऱ्या गुणशर्म्याला सहस्र गांव इनाम दिले.

तो शुद्ध ब्राह्मण राणीला वीणा शिकवावयाला प्रत्यहीं जातच होता. ती, शिकतांना विलास-हास-इत्यादि अनेक चेष्टा करून, त्याचें चित्त आपल्याकडे ओढून घेण्याचा प्रयत्न करीतच होती; पण तो पापभीरु मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं असें पाहून, कामार्त झालेली ती एकदां एकांतांत असलेल्या त्याला, तो नको नको, म्हणून निवारण करीत असतांनाही चिमटे घेऊं लागली, व त्याला म्हणाली, 'हे सुंदरा, माझें तुजवर गाढ प्रेम बसलें आहे. त्याकरितांच वीणा शिकविण्याच्या निमित्तानें प्रत्यहीं येथें यावयास मी तुला राजाकडून सांगविलें. तूं माझें सेवन कर,' पण असा आपला पापी मनोरथ तोंडावाटे बाहेर काढणाऱ्या राणीला तो धर्मात्मा म्हणाला,—'छेः छेः असलें पाप मनांतही आणूं नकोस. तूं माझ्या स्वामीची भार्या आहेस. माझ्यासारखा पुरुष असला प्रभुद्रोह कधींही करणार नाहीं. तूं असल्या साहसांत पडूं नकोस.'

हें त्याचें अमृततुल्य भाषण विषाप्रमाणें कडू लागल्याकारणानें ती त्याला पुनः म्हणाली,–'अरे नीरस दुर्भाग्या, मग तुझ्या या सुंदर रूपाचा व कलाचातुर्याचा उपयोग काय ? माझ्यासारख्या अलभ्य पण स्वतः प्रेमवश होऊन पाठीस लागलेल्या स्त्रीची तूं उपेक्षा करतोस, या तुझ्या मूर्खपणाला काय म्हणावें ! त्यावर गुणशर्मा हंसून म्हणाला,–' देवि, रूप व चातुर्य याचा उपयोग काय तें मी सांगतों. परस्त्रियांचा अपहार करून अपकीर्तीनें मलिन न होणें, व परलोकीं गेल्यावर नरकांत न पडणें, हेंच त्याचें फल आहे.'

हें ऐकून अतिशय रागावलेली अशोकवती म्हणाली,–'तूं माझा मनोरथ पूर्ण न केल्यास मला मरण येणार, हें तर ठरलेलेंच आहे; पण तूं हा माझा मोठा अपमान करीत आहेस, यास्तव अगोदर तुला मारवून नंतर मी मरेन.' राणीचा हा भयंकर निश्चय ऐकूनही तो धीर घाबरला नाहीं. उलट ' बरें तर तसेंच होऊं दे.' अधर्मानें दीर्घकाल जिवंत रहाण्यापेक्षां धर्मानें एक क्षणभर वांचणेंही चांगलें. पाप न करितां मला जर अनिंद्य मृत्यु आला, तर तो प्रशस्त आहे. पण पाप करून राजाच्या आज्ञेनें फांसावर किंवा सूळावर चढणें अगदीं निंद्य होय.' असें म्हणाला. त्यावर राणी पुनः म्हणाली,–'तूं माझा व आपला द्रोह करूं नकोस. मी सांगतें तें ऐक. राजा माझें अशक्य म्हणणेंही मान्य करील. मी त्याची प्रार्थना करून तुला देश देववीन, सर्व सामंतांस तुझे अनुयायी करवीन, त्यामुळें तूंच गुणोज्ज्वल राजा होशील. मग तुला भय कसलें ? तुझा पराभव कोण करणार ? वीरा, माझे मनोरथ पूर्ण कर; नाहीं तर तूं जिवंत रहाणार नाहींस.'

असें मोठ्या आग्रहानें व प्रार्थनापूर्वक ती सांगत आहे असें पाहून, गुणशर्मा ती वेळ मारून नेण्याकरितां तिला युक्तीनें म्हणाला, ' देवि, तुझा जर फारच आग्रह असेल, तर मी तुझें म्हणणें मान्य करीन; पण आपलें हें पाप-कर्म बाहेर फुटण्याची भीति आहे. यास्तव असल्या कामांत

१ वरं यद्धर्मपाशेन क्षणमेकं हि जीवितम् ।
परं न यदधर्मेण कल्पकोटिशतान्यपि ॥

२ श्लाघ्यश्चाकृतपापस्य मम मृत्युरगर्हितः ।
न पुनः कृतपापस्य गर्हितं राजशासनम् ॥

एकाएकीं प्रवृत्त होणें चांगलें नव्हे. कांहीं दिवस धीर धर. मी तुला हें अगदीं खरें सांगतों, कारण तुझ्याशीं विरोध केल्यास माझा सर्वस्वीं नाश होणार, हें आतां मला कळून चुकलें आहे' इतकें सांगून व तिचें कसें तरी समाधान करून गुणशर्मा तेथून निघून गेला.

कांहीं दिवसांनीं महासेन राजानें कोट्टस्थ सोमकेश्वराच्या सैन्यास वेढा दिला. तेव्हां तो तेथें आला आहे असें जाणून, गौडपति विक्रमशक्तीही तेथें येऊन त्याच्या सैन्याला वेढा देऊन बसला. तें पाहून महासेन, गुणशर्म्याला म्हणाला,–'आम्ही एका शत्रूला वेढा दिला खरा, पण दुसऱ्यानें येऊन आम्हांलाच वेढलें. आतां काय करावें ? दोघांशींही लढावें तर तितकें सामर्थ्य आम्हांमध्यें नाहीं. बरें युद्धावांचून असेंच बसून रहावें, तर अशानें तरी आमचा किती दिवस निभाव लागणार आहे ? तेव्हां आतां या संकट–प्रसंगीं कोणता उपाय योजावा तें सांग.'

राजाचा हा प्रश्न ऐकून जवळच असलेला गुणशर्मा म्हणाला,– 'देव, आपण कांहीं चिंता करूं नका. धीर धरून रहा. मी युक्तीनें या संकटांतून सर्वांचें रक्षण करितों.' याप्रमाणें राजाचें समाधान करून, तो चतुर ब्राह्मण रात्रीं दिव्य उपायानें* विक्रमशक्तीच्या सैन्यांत गुप्तपणें शिरला, आणि स्वस्थपणें निजलेल्या राजाजवळ जाऊन त्याला उठवून म्हणाला,–' मी देवदूत आहें, भगवान् विष्णूच्या आज्ञेनें आकाशमार्गानें येथें आलों आहें. तूं या महासेनाशीं युद्ध करूं नको. सख्य करून परत जा. त्याच्याकडे तूं आपला दूत पाठविलास म्हणजे तोही तुझ्याशीं संधि करील; पण या माझ्या सांगण्याप्रमाणें न वागल्यास तुझा मोठा नाश होईल. तूं भक्त आहेस, व भक्तांचें रक्षण करणें हें माझें आद्य कर्तव्य आहे, म्हणून मी हें तुला सुचवीत आहें. हा त्याचा निरोप सांगण्याकरितां मी येथें मुद्दाम आलों.'

तें ऐकून राजा–विक्रमशक्ति मनांत म्हणाला, कीं हा सांगतो तें खरें दिसतें. सामान्य मनुष्याला अशा गुप्त जागीं येतां येणें शक्य नाहीं.

* आपल्या डोळ्यांत अन्तर्धानांजन घालून तो परसैन्यांत गेला; असें मूळग्रंथांत म्हटलें आहे. या अंजनाच्या योगानें मनुष्य दुसऱ्यांस दिसेनासा होतो.

यास्तव याच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून तसें करावें हें बरें. असा संकेत करून तो त्यास सत्कारपूर्वक म्हणाला,–'मी आज धन्य व कृत-कृत्य झालों आहें, देवाच्या आज्ञेप्रमाणें मी वागेन.' तें ऐकतांच गुण-शर्मा पूर्वीच्याच युक्तीनें तेथल्या तेथें गुप्त झाला; त्यामुळें तर 'हा खरा देवदूत आहे' असा राजाच्या मनाचा पूर्ण निश्चय झाला. नंतर गुण-शर्मा कोणाला न दिसतां त्या सेना-शिबिरांतून निघाला, व आपल्या गोटांत येऊन पोंचल्यावर महासेनाला भेटला. त्यानें केलेलें महत्कार्य त्याला सांगितलें, व त्यामुळें अतिशय आनंदित झालेल्या राजानें प्राण व राज्यही देणाऱ्या त्याला दृढ आलिंगन दिलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच विक्रमशक्तीचा दूत महासेनाकडे आला, व त्या दोघांचा संधि होऊन, गौडपति सैन्यासह निघून गेला. तेव्हां महा-सेनानें सोमकास जिंकलें व हत्ती, घोडे, इत्यादि अनेक अमूल्य पदार्थ घेऊन तो उज्जयिनीस परत आला. त्यानंतर एकदां नदींत पोहत अस-तांना राजाला एका मोठ्या नक्रानें धरलें; पण गुणशर्म्यानें मोठ्या शौर्यानें त्याला मारून राजाला सोडविलें. अरण्यांत शिकार करीत अस-तांना महासेनाला एकदां महाविषारी सर्प चावला; पण या गुणी गुण-शर्म्यानें मंत्र व औषधी यांच्या योगानें त्याला विषरहित केलें. पुढें कांहीं दिवसांनीं महासेनाला पुष्कळ सैन्य मिळालें. तेव्हां पूर्वीचें वैर आठवून तो विक्रमशक्तीवर चढाई करून चालला. तें वर्तमान कळतांच गौड-पतीही सज्ज होऊन पुढें झाला. दोघांच्या सैन्यांचा तुमुल संग्राम झाला. शेवटीं ते दोघे राजे द्वंद्वयुद्ध करूं लागले. त्यांत एकमेकांच्या शस्त्रास्त्रांनीं त्या दोघांचेही रथ मोडून गेले. तेव्हां क्रुद्ध झालेले ते दोघे पायांनींच एक-मेकांवर धांवले. त्यावेळीं त्या दोघांच्याही हातांत ढाल व तरवार होती. पण वेगानें शत्रूवर जात असतांना दुर्दैवानें महासेनाचा पाय अडखळून तो भूमीवर पडला. त्याबरोबर विक्रमशक्ति मोठ्या हर्षानें जवळ येऊन त्याचा शिरश्छेद करण्याकरितां वार करूं लागला. पण इतक्यांत महा-सेनाच्या बरोबर छायेप्रमाणें रहाणाऱ्या गुणशर्म्यानें चक्राच्या योगानें गौडपतीचा सशस्त्र हात तोडून पाडला, व त्याच्या उरावर परिघाचा भयंकर प्रहार करून स्वतः त्यालाही भूमीवर धाडकन लोळविलें. इतक्यांत महासेन राजा वर उठला. तों त्याला या वीराचें धैर्य व शौर्य प्रत्यक्ष दिसलें.

त्यामुळें राजाच्या आनंदास पार नाहींसा झाला. ' ब्राह्मणवीरा, तूं आज पांचव्यांदा हे माझे प्राण वांचविलेस ' असें तो मोठ्या संतोषानें त्याला वारंवार म्हणूं लागला. नंतर महासेनानें मेलेल्या विक्रमशक्तीच्या सैन्यास जिंकून त्याचें राष्ट्र घेतलें, परत येतांना मार्गातील दुसऱ्याही राजांना गुणशर्म्याच्या सहायानें त्यानें आपल्या अधीन आणलें, आणि शेवटीं असा मोठा विजय संपादन करून तो उज्जयिनीस येऊन सुखानें राहूं लागला.

राणी अशोकवती गुणशर्म्याविषयीं उत्तरोत्तर अधिक उत्सुक होतच होती. कांहीं केल्या ती आपला आग्रह सोडीना. गुणशर्माही त्या अकार्यास कबूल होईना. संत, देहनाशही पतकरतात; पण अविनय करावयास तयार होत नाहींत.* तो ब्राह्मण आपल्या निश्चयापासून ढळत नाहीं असें पाहून, खिन्न झालेल्या राणीनें त्याचा द्वेष करावयास आरंभ केला. एकदां ती मोठा खेद झाला आहे, असें दाखवून रडत बसली. अंतःपुरांत आलेल्या राजानें तिची दुःखी मुद्रा पाहून ' प्रिये, तूं आज अशी खिन्न कां ? ' असें विचारलें; पण ती कांहीं सांगेना. शेवटीं, ' तुझा ज्यानें अपराध केला असेल, त्याचा मी धन व प्राण यांच्या योगानें खचित निग्रह करीन ' असें राजानें शपथपूर्वक सांगितलें. तेव्हां ' ज्यानें मला दुःख दिलें आहे, त्याला आपण कांहीं करूं शकणार नाहीं, हें मला ठाऊक असतांनाही केवल तुमचा आग्रह आहे म्हणून सांगतें. असें म्हणून ती दुष्ट स्त्री राजास म्हणाली,—' आर्यपुत्र, गुणशर्मा आपल्याशीं द्रोह करीत असतो. धनलोभानें त्यानें आपला एक विश्वासु ब्राह्मण मित्र गौडपतीकडे पाठविला होता. त्याच्यापासून पुष्कळ धन घेऊन हा आपल्याला मारणार होता; पण विक्रमशक्तीच्या हितकर आचाऱ्यानें ' राजन्, उगीच द्रव्यक्षय कशाला करितां! मी जाऊन तुमच्या शत्रूला मारून येतों. ' असें सांगून व आपला संकेत बाहेर फुटूं नये म्हणून याच्या दूताला तेथेंच प्रतिबंधांत ठेवून तो आचारी येथें आला होता. पुढें याचा दूत युक्तीनें तेथून पळून आला, व त्याच्या सांगण्यावरून आचाऱ्याचें कपट याला कळलें. पुढें योग्य समयीं विष घालीत असतांनाच त्याला विषारी पदार्थांसह धरून आपल्याकडून मारविलें.

* देहपातमपीच्छन्ति सन्तो नाविनयं पुनः ।

आज त्या आचाऱ्याची आई, बायको व भाऊ अशीं तिघेजणें त्याचा शोध करण्याकरितां येथें आलीं. पण आपलें कपट उघडकीस येऊं नये, म्हणून त्यानें त्याच्या भार्येला व आईलाही मारविलें. त्याचा भाऊ मात्र जीव घेऊन माझ्या येथें आला, त्याच्या तोंडून मी हें सर्व ऐकलें. इतक्यांत गुणशर्माही माझ्या अंतःपुरांत आला. त्याला पहातांच तो बिचारा भिऊन कोठें निघून गेला. पण तो माझ्या येथें आला होता असें पहातांच, गुणशर्म्याचें तोंड उतरलें. तो कांहींसा विचार करूं लागला. तेव्हां 'आज तुझी चर्या अशी चंचल कां?' असा मी प्रश्न केला. त्या वेळीं अंतःपुरांत मी एकटीच होतें. म्हणून तो दुष्ट माझ्या पायांवर डोकें ठेवून 'देवि, कामपीडित झालेल्या माझा तूं स्वीकार कर,' असें म्हणूं लागला. त्या मेल्याच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच मला मोठा क्रोध आला. मी आपले पाय सोडवून घेऊन दूर झालें. तेथून निघून जावें असें माझ्या मनांत होतें; पण त्या चांडालानें मज अबलेला घट्ट धरलें. कांहीं केल्या सोडीना. 'देवि, तुझ्यासाठीं मदन देव मला जाळीत आहे, यास्तव मजवर अनुग्रह करून तूं मला जीवदान दे,' इत्यादि तो पुष्कळ बोलूं लागला. पण त्या निर्दयाच्या हातून कसें सुटावें याच विचारांत मी होतें. इतक्यांत माझी पल्लविका चेटी आंत आली. तिला पहातांच माझा हात सोडून तो अधम आपलें तोंड काळें करून कोठें निघून गेला. प्राणनाथ, पल्लविका जर आली नसती, तर त्या नीचानें आज मला भ्रष्ट केलें असतें. असें सांगून राणी मोठ्यानें रडूं लागली. खरोखर अगोदर असत्य वचन व नंतर कुस्त्रिया निर्माण झाल्या असाव्या, असें यावरून वाटतें.+

आपल्या प्रिय राणीचें हें दुःख-कारण ऐकून राजाला तत्काल असह्य क्रोध आला. स्त्रियांच्या वचनावर विश्वास ठेवला म्हणजे मोठ्या विद्वानांचाही विचार नाहींसा होतो.* तो आपल्या भार्येला म्हणाला,—'सुंदरि, शांत हो, आतां उगीच रडूं नकोस. मी त्या द्रोह करणाऱ्या दुष्टाला मारून टाकवितों. त्यानें पांचदा माझे प्राण वांचविले हें सर्वांना ठाऊक

+ आदावसत्यवचनं पश्चाज्जाता हि कुस्त्रियः ।

* स्त्रीवचःप्रत्ययो हन्ति विचारं महतामपि ।

आहे, यास्तव त्याला उघड उघड न मारतां युक्तीनेंच नाहींसा केला पाहिजे. शिवाय हा त्याचा दोष लोकांत सांगण्यासारखाही नाहीं.'

तें ऐकून राणी म्हणाली,–'हा अपराध जरी सभेंत सांगण्यासारखा नसला, तरी गौडेश्वराशीं सख्य करून आपल्याला मारण्याचा प्रयत्न तो करीत होता, हा आरोप भरसभेंत त्याच्यावर ठेवावयास कोणती हरकत आहे ? अशोकवतीचें हें सांगणें महासेनाला पटलें, व तो आपल्या सभेंत गेला. तेथें राजदर्शनाकरितां सामंत–राजे, राजपुत्र, मंत्री, इत्यादि सर्व आले. गुणशर्माही नेहमीप्रमाणें राजसभेकडे यावयास निघाला; पण त्या दिवशीं त्याला मार्गांत अनेक अपशकून झाले. कावळा त्याच्या डाव्या बाजूकडे गेला, कुत्रा डावीकडून उजवीकडे पळाला, व खांद्यासह डावी भुजा स्फुरण पावूं लागली. तेव्हां 'खरोखर हीं अनिमित्तें अशुभ सुचवीत आहेत; पण जें कांहीं अनिष्ट व्हावयाचें असेल तें मलाच होऊं दे. माझ्या स्वामीला कांहीं न होवो.' असें मनांत म्हणूनच तो राजसभेंत गेला. प्रभूला प्रणाम करून आपल्या आसनावर बसला; पण राजानें रोजच्यासारखें, त्याचें अभिनंदन केलें नाहीं. उलट त्याच्याकडे तो क्रोध–दृष्टीनें पाहूं लागला. पण 'हें आज आहे काय ?' असें जों गुणशर्मा मनांत म्हणत आहे, तोंच राजा आपल्या सिंहासनावरून उठून फिर्यादीच्या जागीं जाऊन बसला. तें पाहून सर्व सभासद आश्चर्यचकित झाले. इतक्यांत 'गुणशर्म्यानें माझा मोठा अपराध केला आहे, त्याचा तुम्ही न्याय करा.' असें तो सभासदांस म्हणाला. तें ऐकतांच स्वतः गुणशर्मा म्हणाला,– 'प्रभो, आपण स्वामी व मी भृत्य. तेव्हां आपली व माझी बरोबरी कशी होणार ! आपण सिंहासनावर बसा व पाहिजे ती आज्ञा करा.' मंत्र्यांनींही त्याला असाच बोध केला. तेव्हां महासेन सिंहासनावर बसला व सभासदांस त्याचा अपराध सांगूं लागला. दुष्ट राणीच्या उपदेशाप्रमाणें त्यानें त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवला, व इतर लोकांस बाहेर पाठवून, जे अगदीं आप्त होते त्यांना त्याचा दुसरा घोर अपराधही सांगितला; पण सत्याच्या बलानें निर्भय असलेला गुणशर्मा–'हे दोन्ही मिथ्या आरोप आहेत, मी यांतील एकही अपराध केलेला नाहीं, कोणी तरी माझ्या वैऱ्यानें सूड घेण्याकरितां तुम्हांला हें सर्व खोटेंच सांगितलें आहे'—असें द्वेषानें व [illegible]

होऊन म्हणाला. पण त्यावर राजा म्हणाला,–'अरे मूर्खा, हें जर खोटें आहे, तर तुला सुंदर भांड्यांतील भाजींत विष आहे हें कसें कळलें?' त्यावर 'राजन्, बुद्धिमानाला सर्व कळत असतें. उगीच मज निरपराध्यावर असले मिथ्या आरोप करूं नकोस' असें तो बोलला; पण सभेंतील इतर मंत्री, गुणशर्म्याशीं आंतून द्वेष करीत असल्यामुळें, 'छेः, केवढ्याही बुद्धिमानाला असल्या गुप्त गोष्टीचें ज्ञान कसें होणार?' असें म्हणाले. राजाही त्याला अद्वातद्वा बोलूं लागला. तेव्हां–'खरी गोष्ट काय आहे याचा निर्णय न करितां एकाद्या धार्मिकावर दोषारोप करणें अगदीं अनुचित आहे, प्रभूनें विचारशून्य होऊन रहाणें हें नीतिज्ञांस मुळींच आवडत *नाहीं,'–असें गुणशर्मा पुनः निर्भयपणें म्हणाला.

परंतु तें त्याचें भाषण ऐकतांच 'अपराध करूनही आणखी उलट उद्धटपणानें अधिक बोलतोस काय?' असें म्हणून अतिशय रागावलेल्या राजानें त्याच्यावर तरवारीचा प्रहार केला; पण गुणशर्म्यानें करणप्रयोगानें तो चुकविला. राजाचे दुसरे अनुचरही आपापलीं शस्त्रें उपसून त्यास मारण्याचा प्रयत्न करूं लागले; पण त्या शूर ब्राह्मणानें युद्ध-कौशल्यानें त्या सर्वांचें प्रहार चुकवून सर्वांचीं शस्त्रें हिसकावून घेतलीं, व आपल्या विचित्र चपलतेनें त्यांच्या शेंड्या एकमेकांच्या शेंडीशीं बांधून ठेवल्या, व तो महावीर मोठ्या वेगानें राजसभेंतून बाहेर पडला. राजाच्या आज्ञेनें त्याला धरण्याकरितां पुष्कळ शिपाई पुढें झाले, पण त्यांतील सुमारें शंभर वीरांस त्यानें राजसभेजवळच मारून पाडलें, आणि अंगवस्त्राच्या शेवटास बांधून ठेवलेलें अंतर्धानांजन डोळ्यांत घालून, तो अदृश्य झाला, व तत्काल तेथून निघाला.

नंतर मोठ्या दुःखानें स्वदेशाचा त्याग करून दक्षिणदेशाकडे जात असतांना, तो मनांत असा विचार करूं लागला कीं, त्या अशोकवतीनेंच प्रेमपरवश झालेल्या या मूढ राजाला अशी प्रेरणा केली असावी. स्त्रिया ज्याच्यावर आसक्त होतात, त्यानें अपमान केल्यास म्हणजे त्यांचा दुष्ट मनोरथ पूर्ण न केल्यास, त्या विषाहूनही अधिक भयंकर होतात.

* प्रभुश्च निर्विचारश्च नीतिज्ञैर्न प्रशस्यते ।

खरोखर अतत्त्वज्ञ राजे साधूंना असेव्य ‡असतात. याप्रमाणें विचार करीत करीत तो एका गांवापाशीं आला. तेथें त्याला एका वडाच्या झाडाखालीं शिष्यांस शिकवीत बसलेला एक उत्तम ब्राह्मण दिसला. त्याच्यापाशीं जाऊन गुणशर्म्यानें प्रणाम केला. तेव्हां योग्य सत्कार करून त्या ब्राह्मणानेंही 'तूं कोणती शाखा पढतोस?' असा त्याला प्रश्न केला. तो ऐकून गुणशर्मा म्हणाला,—'स्वामिन्, मी सामवेदाच्या दोन, ऋग्वेदाच्या दोन, यजुर्वेदाच्या सात व अथर्वणवेदाची एक, अशा बारा शाखा म्हटल्या आहेत. तें ऐकून 'तर मग तूं कोणी देवच आहेस' असें तो गुरु बोलला. आणि आकृतीवरूनच ज्याचा उत्कर्ष व्यक्त होत आहे अशा त्या ब्राह्मणाला, तो गुरु नम्र होऊन पुनः म्हणाला,— 'तुझा देश कोणता? स्वजन्मानें तूं कोणत्या वंशाला भूषित केलेंस? या तुझ्या शरीराचें नांव काय? व इतकें अध्ययन कोठें व कसें केलेंस? तें मला सांग.' त्यावर गुणशर्मा पुढीलप्रमाणें स्ववृत्त सांगूं लागला.

उज्जयिनींत आदित्यशर्मा या नांवाचा कोणी एक ब्राह्मणपुत्र होता. तो लहान असतानांच त्याचा पिता मेला, व आई सती गेली. त्यामुळें त्याच नगरींतील त्याच्या मामाच्या येथें तो जाऊन राहूं लागला. आदित्यशर्म्यानें वेद, विद्या व कला यांचा उत्तम अभ्यास केला. विद्वान् झाल्यावर तो जप-व्रतें इत्यादिकांमध्यें निरत असे; पण कर्मधर्मसंयोगानें त्याचें एका प्रव्राजकाशीं सख्य झालें. तेव्हां एकदां त्याला बरोबर घेऊन तो सन्यासी स्मशानांत गेला, व यक्षिणीला प्रसन्न करून घेण्याकरितां होम करूं लागला. कांहीं वेळानें त्याच्या पुढें सुवर्णविमानांत बसलेली व सुंदर कन्यांनीं परिवेष्टित असलेली, अशी एक दिव्य कन्या प्रकट झाली, व ती त्या संन्याशास मधुर वाणीनें म्हणाली—'मी विद्युन्माला या नांवाची यक्षिणी असून, ह्या दुसऱ्याही यक्षिणी आहेत. यांतील जी तुला हवी असेल ती एक घे. या तुझ्या मंत्रसाधनाचें इतकेंच फल आहे. कारण चांगल्या रीतीनें समजून न घेतां तूं तें आरंभिलेंस. म्हणून मी तुला प्राप्त झालें नाहीं. असो; आतां उगीच अधिक प्रयत्न करूं नकोस.'

---

‡ अहो विषादप्यधिकाः श्रियो रक्ताविमानिताः । अहो असेव्याः साधूनां राजानोऽतत्वदर्शिनः ।

तें तिचें म्हणणें मान्य करून संन्याशानें तिच्या परिवारांतील एक यक्षिणी घेतली, व लागलीच विद्युन्माला गुप्त झाली. तेव्हां आदित्यशर्मा, संन्याशाला प्राप्त झालेल्या त्या यक्षिणीला म्हणाला,–'विद्युन्मालेहूनही एकादी उत्तम यक्षिणी आहे का?' तो प्रश्न ऐकून ती म्हणाली,–'होय तर. सर्व यक्षिणींत विद्युन्माला, चंद्रलेखा व सुलोचना या उत्तम; व त्या तिघींत सुलोचना श्रेष्ठ होय.' त्यानंतर स्मरण करतांच येण्याचें मान्य करून ती गेली, व संन्यासी आदित्यशर्म्याबरोबर त्याच्या घरीं आला. तेथें योग्य समयीं येणारी ती यक्षिणी संन्याशाला इष्ट भोग देत असे. एकदां आदित्यशर्म्यानें संन्याशाच्या द्वारा तिला सुलोचना यक्षिणीला सिद्ध करून घेण्याचा उपाय कोणाला ठाऊक आहे?' असा प्रश्न केला. तेव्हां तिनें असें सांगितलें कीं, दक्षिणेंतील तुंबवनांत वेणा नदीच्या तीरीं विष्णुगुप्त नांवाचा एक संन्याशी रहातो. त्याला तो सर्व विधि ठाऊक आहे. तें ऐकून आदित्यशर्मा तिकडे जावयास निघाला. त्याचा मित्र संन्याशीही त्याच्याबरोबर चालला. पुष्कळ मार्ग चालून गेल्यावर त्या ब्राह्मणाला विष्णुदत्ताचें दर्शन झालें. तो त्याची सेवा करीत तीन वर्षें तेथें राहिला. त्याच्या संन्याशी मित्राच्या यक्षिणीनें आणून दिलेल्या उत्तमोत्तम पदार्थांच्या योगानें त्यानें त्याला प्रसन्न केलें, व प्रार्थनापूर्वक सुलोचनेच्या सिद्धीचा मंत्र मिळविला. त्याच्या अनन्य भक्तीनें अति संतुष्ट झालेल्या त्या दाक्षिणात्य संन्याशानें आदित्यशर्म्याला उत्तम अनुष्ठान-प्रकारही सांगितला.

त्यानंतर त्या ब्राह्मणानें एकांतांत बसून मंत्रजप केला, व योग्यसमयीं यथाशास्त्र हवन केलें. तेव्हां विमानांत बसलेली यक्षिणी सुलोचना अद्भुत रूपानें त्याच्या पुढें प्रकट झाली, आणि म्हणाली,–'अरे ब्राह्मणा, ये; मी तुला वश झालें आहें. पण माझ्या ठिकाणीं तुला महावीर, सुलक्षणी, श्रीमान्, अजिंक्य, गुणवान् व विद्वान् पुत्र व्हावा अशी जर तुझी इच्छा असेल, तर सहा महिने तूं माझा कन्याभाव नष्ट करूं नकोस.' त्यावर 'बरें आहे' असें म्हणून त्यानें अनुमोदन दिलें. तेव्हां ती त्याला आपल्या विमानांत बसवून अलकेस घेऊन गेली. तेथें आदित्यशर्मा, तिला नुसतें डोळ्यांनीं पाहूनच समाधान मानीत, सहा महिने दुश्चर असिधाराव्रत धरून राहिला. त्यामुळें कुबेर संतुष्ट झाला, व त्यानें स्वतः दिव्य विधीनें

आदित्यशर्म्याला सुलोचना समर्पण केली. तिच्याठायीं त्या ब्राह्मणास मी झालों. माझ्या सद्गुणांकडे लक्ष देऊन, पित्यानें गुणशर्मा असें माझें नांव ठेविलें. मी तेथेंच मणिधर नांवाच्या यक्षाधिपतीपाशीं वेद, विद्या व कला शिखलों. एकदां कांहीं कामाकरितां इंद्र कुबेराकडे आला. तेव्हां कुबेराजवळ त्यावेळीं जितके यक्षादि होते, ते सर्व एकदम उठले. पण दैवयोगानें माझ्या पित्याचें मन दुसरीकडेच वेधलेलें असल्यामुळें, तो उठला नाहीं. म्हणून-मूढा, तूं आपल्या मर्त्यलोकीं जा. तूं येथें रहाण्यास योग्य नाहींस,-असा इंद्रानें त्याला शाप दिला. तेव्हां सुलोचनेनें पायां-पडून त्याची पुष्कळ प्रार्थना केली. तेव्हां 'बरें तर, त्याच्याबद्दल याचा पुत्र मृत्युलोकीं जाऊं दे. कारण पुत्र व पिता ह्यांच्यामध्यें तात्त्विक भेद मुळींच नसतो' असें-आपलें भाषण खोटें न व्हावें, म्हणून-देवेंद्र बोलला. त्यानंतर दुःखी आदित्यशर्म्यानें मला उज्जयिनींतील आपल्या मामाच्या येथें आणून सोडलें. भवितव्यता चुकत नसते. असो; उज्जयिनींत आल्या-नंतर तेथें राजाशीं माझी मैत्री जमली; पण तिचा कसा अनिष्ट परिणाम झाला, तें मी तुला सांगतों ऐक. असें बोलून त्यानें पहिल्यापासून सर्व वृत्तांत सांगितला, व शेवटीं म्हटलें, 'गुरुवर्य, अशा रीतीनें केवल अलौकिक सामर्थ्यानें शरीराचें रक्षण करून मी तेथून निसटलों, आणि कोठें तरी देशांतरास जाण्याकरितां, मी या मार्गानें प्रवास करीत असतांना आपलें दर्शन झालें.'

हा सर्व वृत्तांत ऐकून ब्राह्मण त्याला उलट म्हणाला,-'प्रभो, तुझ्या आगमनानें मी कृतकृत्य झालों आहें. तूं आतां माझ्या येथें चल. माझें नांव अग्निदत्त असें असून हा ग्राम मला अग्रहार मिळाला आहे. तूं स्वस्थचित्तानें येथें रहा. असें सांगून अग्निदत्त त्याला आपल्या गायी, म्हशी, घोडे, दास, दासी, यांनीं संपन्न असलेल्या घरीं घेऊन गेला. तेथें स्नान, उट्या, वस्त्रें, आभरणें व नाना प्रकारचे भोज्य पदार्थ यांच्या योगानें त्यानें त्या अतिथीचा मोठा सत्कार केला. त्याला देवांनाही अतिशय आवडणारी अशी एक फारच सुंदर कन्या होती. तिचें लक्षण पहाण्याच्या निमित्तानें त्यानें ती गुणशर्म्याला दाखविली. तेव्हां तोही विद्वान्, तिचें असामान्य रूप पाहून अग्निदत्ताला म्हणाला,-' तिच्या नाकावर जसा आहे तसाच उरावरही एक तिळ असावा, व त्याचें फल

सवती होणें हें आहे. अर्थात् हिला सवती होतील.' तेव्हां त्याच्या म्हणण्याचा प्रत्यय पहाण्याकरितां अग्निदत्तानें आपल्या पत्नीला विचारलें. तेव्हां 'तिच्या उरावर तिळ आहे,' असें तिनें सांगितलें. तें ऐकून त्याला गुणशर्म्याच्या सर्वज्ञत्वाचें आश्चर्य वाटलें, व तो त्यास म्हणाला,-'तर मग हे तिळ कांहीं अशुभ नव्हेत. कारण पति श्रीमान् असला तरच सवती असणार! दरिद्री पुरुष एका भार्येला चांगल्या रीतीनें पोसूं शकत नाहीं, मग पुष्कळ जणींचें नांव कशाला घेणार.*' त्यावर-तुम्ही म्हणतां तें खरें आहे.-'शिवाय अशा सुलक्षण आकृतींचें अशुभ कसें होईल? †' असें म्हणून गुणशर्म्यानें त्याला स्त्रीपुरुषांच्या प्रत्येक अंगावरील तिळांचें फल सांगितलें. तें ऐकून अग्निदत्ताला तर त्याच्या सर्वज्ञत्वाचें मोठेंच कौतुक वाटलें. त्याची कन्याही त्या अतिथीकडे मोठ्या उत्सुकतेनें पहात राहिली. तिच्या आईलाही तो जांवई आवडला. तेव्हां अग्निदत्त त्याला एकांतांत म्हणाला,-'महा भाग्यवाना, मी ही आपली सुंदर कन्या तुला देतों, तूं आतां कोठें जाऊं नकोस, येथेंच आनंदानें रहा.'

तें ऐकून गुणशर्मा म्हणाला,-'तुम्ही सांगतां तें खरें आहे, त्यामुळें मला मोठें सुख होईल; पण राजानें खोटाच आरोप ठेवून अपमान केल्यामुळें मला आतां कांहीं नकोसें झालें आहे. कारण स्त्री, चंद्रोदय, व वीणेचा पंचम ध्वनि, इत्यादि जे पदार्थ सुखी पुरुषास आनंद देतात, तेच दुःखितांस दुःखी करतात;‡ असा नियम आहे. आपल्या प्रेमानें अनुरक्त झालेली स्त्री जशी अनन्यभावानें पतिपरायण होऊन रहाते, तशी पित्याच्या अधीन असून केवळ त्यानें दिल्यामुळें पतीच्या जवळ आलेली स्त्री रहात नाहीं. तर पुष्कळदां ती अशोकवतीसारखी व्यभिचारिणी होते. शिवाय उज्जयिनी नगरी येथून जवळ आहे. मी येथें आहें, असें कळल्यास, स्त्रीलंपट राजा मला पुनः उपद्रव देईल, यास्तव सर्व तीर्थांची

---

* दरिद्रो बिभृयादेकामपि कष्टं कुतो बहूः ॥

† सुलक्षणाया ईदृश्या आकृतेरशुभं कुतः ॥

‡ कान्ता चन्द्रोदयो वीणा पंचमध्वनिरित्यमी ।
ये नन्दयन्ति सुखितान्दुःखितान्व्यथयन्ति ते ॥

यात्रा करून व या शरीरानें जन्मप्रभृति घडलेलें पाप घालवून, मीं एखाद्या उत्तम क्षेत्रांत देहत्याग करीन व सुखी होईन.

त्यावर अग्निदत्त हंसून म्हणाला,—तुलाही जर असा मोह पडूं लागला, तर सामान्य मनुष्याविषयीं काय बोलावें ! त्या अज्ञ राजाच्या अपमानामुळें तुझ्यासारख्या शुद्धचित्ताच्या पुरुषाला खिन्न होण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं; कारण आकाशांत फेंकलेला चिखल फेकणाऱ्याच्याच डोक्यावर पडतो.* शुद्ध भृत्याची खरी योग्यता न जाणणाऱ्या राजालाच त्याचें उचित फल प्राप्त होईल. कारण मोहांध व अविवेकी पुरुषाजवळ श्री फार दिवस टिकत नाहीं.† अशोकवतीचें दुराचरण पाहून तूं सर्व स्त्रियांविषयीं विरस झाला आहेस; हें खरें; पण तूं सर्वज्ञ आहेस. स्त्रीलक्षणें तुला समजतात. एकादी साध्वी स्त्री पहा, व तिच्याशीं विवाह कर. माझ्या कन्येमध्यें जर तुला अशुभ चिह्न दिसत असलें तर तूं तिला वरूं नकोस. उज्जयिनी जवळ आहे म्हणून, तुला भय वाटत असलें तर मी तुमचा विवाह इतक्या गुप्त रीतीनें उरकून टाकीन, कीं तूं येथें आहेस, हें या गांवच्या लोकांनाही कळणार नाहीं. तीर्थयात्रा तुला इष्ट वाटत आहे खरी, पण ज्याच्यापाशीं यथाशास्त्र वैदिक विधि करण्याइतकें धन नसेल, त्यालाच ती विद्वानांनीं सांगितली आहे. पण ज्याच्यापाशीं द्रव्य किंवा तें मिळविण्याचें सामर्थ्य असेल, त्यानें गृहस्थाश्रमच स्वीकारणें उचित होय. कारण त्या आश्रमांत देव-पितृ-अग्नि-क्रिया, व्रतें, जप इत्यादिकांच्या योगानें जी पुण्यनिष्पत्ति होते, ती यात्रा करीत भटकणाराला कोठून होणार ?‡ कारण यात्रेकरी भिक्षान्न खाणारा, हात उशाला घेऊन भूमीवर शयन करणारा, व लंगोटीवांचून परिग्रह न करणारा जरी असला, व त्यामुळें तो जरी मुनितुल्य झाला, तरी त्याचे क्लेश नाहींसे होत नाहींत. देह-त्याग करून सुखी होण्याची इच्छा करणें हा निव्वळ भ्रम आहे. कारण आत्मघात करणारांना परलोकीं याहीपेक्षां अधिक दुःख होत असतें. यास्तव हा आपला दुराग्रह सोड. तूं विद्वान्

---

* पङ्को हि नभसि क्षिप्तः क्षेप्तुः पतति मूर्धनि ॥

† मोहान्धमविवेकं हि श्रीश्चिराय न सेवते ।

‡ गृहे या पुण्यनिष्पत्तिः साध्वनि भ्रमतः कुतः ॥

असलास तरी अजून तरुण आहेस, यास्तव माझें म्हणणें ऐक; चांगला विचार कर; मी तुझ्याकरितां एक असें सुंदर व विस्तृत भूगृह बनवितों, कीं तेथें या सुंदरीशीं विवाह करून सुख भोगणाऱ्या तुला स्वर्गाचेंही विस्मरण होईल.

अग्निदत्तानें याप्रमाणें पुष्कळ बोध केला. तेव्हां तो गुणशर्मा 'बरें आहे, मी तुमचें म्हणणें मान्य करतों; कारण असल्या सुंदर भार्येचा त्याग करणें उचित नव्हे, पण मी अशा अकृतकृत्य अवस्थेत तिच्याशीं विवाह करणार नाहीं. अगोदर यम-नियम-युक्त होऊन मी एकाद्या देवाची आराधना करितों. म्हणजे मला त्या कृतघ्न राजाचा चांगला सूड उगवितां येईल.' असें बोलला. अग्निदत्तानें त्याच्या त्या म्हणण्याला मोठ्या आनंदानें अनुमोदन दिलें. गुणशर्म्यानेंही रात्रभर तेथें राहून विश्रांति घेतली. दुसऱ्या दिवशीं त्याला सुखानें रहातां येईल, असें एक भूगृह अग्निदत्तानें करविलें. त्यांत जाऊन राहिल्यावर 'मी आतां कोणत्या देवाचें कोणत्या मंत्रानें अनन्य भक्तीनें आराधन करूं?' असें गुणशर्म्यानें एकांतांत अग्निदत्ताला विचारलें. तेव्हां, तो म्हणाला,—'गुरूनें मला स्वामिकुमाराचा मंत्र सांगितला आहे, तो मी तुला देतों. त्याच्या योगानें तूं त्या सेनानीचीच आराधना कर. त्या देवाचें माहात्म्य तुलाही ठाऊक आहेच. तारकासुराला मारून जगाला आनंदित करण्याकरितां, देवांनीं शंकराच्या क्रोधाला कामदेवाचा बळी देऊन, त्याला मोठ्या कष्टानें निर्माण केलें आहे. महेश्वरापासून, अग्निकुंडांतून, अग्नीपासून, शरवणांतून, व कृत्तिकांपासून त्यांचें विचित्र जन्म झालें, असें व्यासादिमुनी सांगतात. त्या महात्म्यानें उत्पन्न होतांच तारकासुराला मारलें.'

इतकें बोलून अग्निदत्तानें त्याला मंत्र दिला. तेव्हां, गुणशर्मा स्कंदाची आराधना करूं लागला. ती सुंदरी त्याची उपचर्या करूं लागली. कांहीं दिवसांनीं पार्वतीनंदनानें त्याला साक्षात् दर्शन दिलें, व त्याच्या इच्छेप्रमाणें 'तूं महासेन राजाला जिंकून राजा होशील, तुझा कोष कधींही क्षीण होणार नाहीं, कांहीं दिवसांनीं तुला सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त होईल.' असा वर देऊन तो देवांचा सेनापति गुप्त झाला. त्यानंतर गुणशर्म्याला मोठा कोष सांपडला. तेव्हां आपल्या ऋद्धीला शोभेल, अशा थाटानें अग्निदत्तानें यथाशास्त्र अर्पण केलेल्या व उत्तरोत्तर अधिक-प्रेम करणाऱ्या

रूपवती-सुंदरीशीं त्यानें विवाह केला. कधींही क्षीण न होणाऱ्या कोषाच्या सहायानें त्यानें चतुरंग सैन्य जमविलें. मोठमोठ्या देणग्या देऊन इतर राजांना अनुकूल करून घेतलें, व योग्य समयीं तो उज्जयिनी-वर चालून गेला. तेथील प्रजाजनांस अशोकवतीचें दुःशील कळवून, व समोरासमोर गांठ पडली असतां, रणांगणांत महासेनालाही तें सांगून, त्या शूरानें विजय मिळविला. स्त्रीपरवश होऊन उपकार करणाऱ्या भृत्याला व्यर्थ मारावयास तयार झालेल्या त्या कृतघ्नाला त्यानें राज्यावरून दूर केलें, व त्याच्या जागीं तो स्वतः पृथ्वीपति होऊन बसला. त्यानंतर त्यानें दुसऱ्याही पुष्कळ राजकन्यांशीं विवाह केला. त्याची आज्ञा सर्व शिरसा मानूं लागले, व याप्रमाणें सम्राट् झालेला तो गुणशर्मा राजा आपल्या प्रियसुंदरीसह दीर्घकाल अनेक इष्ट भोग भोगीत तेथें सुखानें राहिला.

प्रभो, याप्रमाणें मनुष्यांची योग्यता न जाणणारा मूढ महासेन पूर्वी अशा मोठ्या संकटांत पडला, व बुद्धिमान् आणि धार्मिक गुणशर्मा केवल एका धैर्याचा आश्रय करून परम ऋद्धीस प्राप्त झाला. रात्रीं अशी ही उत्कृष्ट कथा आपल्या वीतभीति-सचिवाच्या तोंडून ऐकून, वीर सूर्य-प्रभही महासमररूपी सागरास तरून जाण्याची इच्छा करूं लागला. त्याचा उत्साह अतिशय वाढला, व बऱ्याच वेळानें त्याला झोंप लागली.

---

## तरंग ७ वा.

### १. सूर्यप्रभाचा विजयी संग्राम.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सूर्यप्रभ, सचिव व सर्व दानवादि सैन्य यांसह युद्धभूमींत गेला. विद्याधरांच्या सैन्यांसह श्रुतशर्माही तेथें आला. युद्ध पहाण्याकरितां देव व असुरादिकही जमले. दोन्हीं सैन्यां-तील सेनापतींनीं अर्धचंद्र-व्यूह रचले. नंतर युद्ध सुरू झालें. सूं सणणण् असे शब्द करीत धांवणारे व एकमेकांस मध्येंच तोडणारे वेगवान् बाणही आपसांत लढत आहेत, असा भास झाला. म्यानांच्या तोंडांतून बाहेर पडलेल्या फार लांब, पिवळ्या व लाल, चंचल खड्गलता कृतां-ताच्या जिह्वांसारख्याच दिसूं लागल्या. त्या आहव-युद्ध-रूपी महा-

सरोवरांत शूरांच्या प्रफुल्लित मुखकमलांवर चक्र—( आयुध व पक्षी ) संघ पडत असून राजहंसाचा क्षय होत होता. वर उडालेल्या, खालीं पड-णाऱ्या व एकमेकांवर हापटणाऱ्या, मस्तकांच्या योगानें ती युद्धभूमि कृतांताच्या कंदुक-क्रीडास्थानाप्रमाणेंच दिसत होती. शूरांच्या रक्ताचा वर्षाव झाल्यामुळें, रणांगणांतील उडणारी धूळ खालीं बसली, व त्यामुळें अंधकार नाहींसा झाला, तेव्हां महारथ्यांचीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. त्या दिवशीं सूर्यप्रभ व श्रुतशर्मा, दामोदर व प्रभास, महोत्पात व सिद्धार्थ, ब्रह्मगुप्त व प्रहस्त, संगम व वीतभीति, चंद्रगुप्त व प्रज्ञाढ्य, अक्रम व प्रियंकर, धुरंधर व कुंजरकुमार आणि असेच दुसरेही मोठमोठे वीर एकमेकांशीं लढूं लागले.

महोत्पातानें सिद्धार्थाच्या बाणांचें आपल्या बाणांनीं निवारण करून त्याचें धनुष्य तोडलें, व अश्व आणि सारथी यांस मारलें. तेव्हां सिद्धा-र्थाला मोठा राग आला व त्यानेंही लोहदंडानें महोत्पाताच्या रथाचा चूर उडविला, व बाहुयुद्धानें त्यालाही भूमीवर लोळविलें; पण इतक्यांत त्याच्या भग ( सूर्य ) नांवाच्या बापानें येऊन त्याचें रक्षण केलें. प्रहस्तानें ब्रह्मगुप्ताशीं पुष्कळ युद्ध करून त्याला रणांगणांत पाडलें, व तो त्याचा शिरश्छेद करणार, इतक्यांत त्याचा पिता ब्रह्मा पुढें आला व त्यानें त्याचें संरक्षण केलें. तेव्हां तुम्हीं सर्व देव आपापल्या पुत्रांचें रक्षण करावयास आलां आहां, युद्ध पहावयास नव्हे, असें म्हणून दानव त्यांस हंसूं लागले. वीतभीतीनें संक्रमाच्या उरावर प्रद्युम्नास्त्राचा भयंकर प्रहार केला. प्रज्ञा-ढ्यानें चंद्रगुप्ताला मारलें असतां, क्रुद्ध झालेला देव चंद्रमा, त्या पुत्रघात-काशीं लढूं लागला. सूर्यप्रभाच्या इतर वीरांनींही असाच मोठा पराक्रम करून शत्रूंना जर्जर केलें व पुष्कळांना मारून पाडलें. सूर्यप्रभ श्रुतशर्म्याशीं घोर युद्ध करीत होता; पण दमानें विरोचनास मारलें आहे, असें पाहून रागवलेल्या त्यानें एका बाणानेंच दम—विद्याधरास यमसदनीं पाठविलें. तेव्हां आपल्या पुत्राचा वध झाला आहे असें पाहून, दुःखी झालेले व रागावलेले अश्विनीकुमार सूर्यप्रभावर धांवून आले. पण सुनीथानें त्यांना अडविलें. स्थिरबुद्धीनें स्वशक्तीनें आपल्या पराक्रमण पुत्राला मारलें आहे असें पाहून, अष्ट वसू त्याच्यावर धांवून आले. तेव्हां तोही वीर मोठ्या धैर्यानें त्यांच्याशीं लढूं लागला. मर्दनानें आपल्या पक्षाच्या भासाला विरथ केलें

आहे असें पाहून, प्रभासानें, दामोदराशीं घोर युद्ध करीत असतानांच एका बाणानें मर्दनाला मारलें. प्रकंपनानें अस्त्रप्रयोग करून तेजःप्रभाला मारलें, व त्यामुळें चिडून आलेल्या अग्नीशींही युद्ध केलें. यमदंष्ट्राला मारणाऱ्या धूमकेतु राक्षसावर यम धांवून आला. सिंहदंष्ट्रानें शिला फेंकून सुषेणाचा चूर उडविल्यामुळें, त्याचा पिता निरति पुढें आला. महारथ-कालचक्रानें आपल्या चक्रानें वायुबलाला मारलें, तेव्हां वायु कोपानें त्याला मारावयास धांवला. महामयानें मायेनें अनेक रूपें धारण करून कुबेरदत्ताचा प्राण घेतला. तेव्हां त्याचा पिता कुबेर त्या पुत्रघातकावर चवताळून आला. याप्रमाणें सर्व देव आपापल्या अंशावतार पुत्राला मारलें आहे असें पाहून, क्रोधानें रणांत उतरले. पण मानव व दानव यांच्याशीं युद्ध करणारे अनेक विद्याधर मरण पावले.

इतक्यांत प्रभास व दामोदर यांचें घोर युद्ध सुरू झालें. प्रभासानें त्याचें धनुष्य तोडलें व सारथ्याला मारलें. तेव्हां तोही वीर दुसरें धनुष्य घेऊन शत्रूशीं लढूं लागला, व हातांत घोड्याचे लगाम घेऊन रथही चालवूं लागला. तें पाहून ‘वाहवा शाबास’ असें म्हणून ब्रह्मदेव त्याची स्तुति करूं लागला. त्यावेळीं ‘या हीनबल झालेल्या दामोदराची स्तुति कां करितां’ असें इंद्रानें विचारलें. तेव्हां ब्रह्मा म्हणाला,—“प्रभासाशीं एवढा-वेळ नेट धरून युद्ध करणाऱ्या दामोदराची स्तुति केलीच पाहिजे. कारण तो हरीचा अंश आहे, व म्हणूनच याच्यापुढें उभा राहिला. नाहीं तर हा प्रभास म्हणजे देवांचाही साक्षात् काळच होय. याला आम्ही सर्व तृणासारखे वाटत असतों. प्रथम नमुचि व नंतर प्रबल या नांवांनीं प्रख्यात झालेला दानवच हा आतां प्रभास झाला आहे. याचा बाप भासही पूर्वी कालनेमि व नंतर हिरण्यकशिपु झाला होता. सुमुंडीकच हा सूर्यप्रभ असून, हिरण्याक्ष दानव आतां सुनीथ झाला आहे. हे सर्व दैत्य व दानव आहेत, म्हणूनच मयादि असुर यांच्या पक्षाला मिळाले आहेत. सूर्यप्रभादिकांनीं केलेल्या रुद्रयज्ञाच्या योगानें बलीचें बंधन तुटून, तोही आतां बंधनरहित झाल्यामुळें, हा संग्राम पहावयास आला आहे. पण आपलें सत्यवचन पाळण्याकरितां तो महात्मा तुझा राज्यकाल संपेपर्यंत पाताळांतच राहील. तुझ्या मागून तोच इंद्र होणार आहे. सांप्रतकालीं त्रिपुरारीनें यांचा पक्ष घेतला आहे, वास्तव यावेळीं

तुम्हांला जय मिळणार नाहीं. तुम्ही यांच्याशीं संधि करा, उगीच आग्रह कशाला करतां !'

ब्रह्मदेव इतकें सांगत आहे तों, प्रभासानें आपल्या भयंकर शत्रूवर पाशुपतास्त्र सोडलें. तेव्हां सर्वांचा संहार करणारें तें रौद्र अस्त्र प्रकट झालें आहे असें पाहून, भगवान् नारायणानें पुत्र-स्नेहवश होऊन आपलें सुदर्शन सोडलें. दोन्ही दिव्य अस्त्रांचा प्रादुर्भाव झाल्यामुळें त्रिभुवन कांपूं लागलें. तेव्हां अकालीं प्रलय होण्याचा प्रसंग आला आहे असें पाहून, 'तूं आपलें अस्त्र मागें घे, म्हणजे मीही चक्राला फिरवितों' असें भगवान् सौम्य वाणीनें प्रभासाला म्हणाला; पण त्यावर प्रभास म्हणाला,–'देवा, माझें अस्त्र व्यर्थ जाणार नाहीं, यास्तव हा दामोदर रण सोडून जाऊं दे, म्हणजे मी अस्त्र परत घेतों.' तें ऐकून नारायण म्हणाला, 'तर मग तूं सुद्धां माझ्या अमोघ चक्राला मान दे.' त्यावर प्रभास विचार करून म्हणाला,–'तुझ्या चक्राला माझ्या रथाचा नाश करूं दे.' तें ऐकून व ठीक आहे असें म्हणून, शौरीनें दामोदराला युद्धापासून परतविलें. तेव्हां प्रभासानें पाशुपतास्त्र परत घेतलें व भगवानाचें चक्र त्याच्या रथावर पडलें. तेव्हां दुसऱ्या रथावर बसून तो सूर्यप्रभाजवळ गेला. दामोदरही श्रुतशर्म्यापाशीं जाऊन उभा राहिला.

तों–'मी इंद्राचा अंशावतार आहें' असें समजून गर्वित झालेला श्रुतशर्मा, सूर्यप्रभाशीं घोर युद्ध करूं लागला. श्रुतशर्मा जें जें अस्त्र योजीत होता, त्याचा त्याचा प्रतीकार सूर्यप्रभ एका क्षणांत करूं लागला. श्रुतशर्म्यानें ज्या ज्या मायेचा प्रयोग केला, तिचें तिचें त्या मानवानें प्रतिमायेनें निवारण केलें. तेव्हां श्रुतशर्म्यानें अतिशय चिडून परिणामाकडे लक्ष न देतां ब्रह्मास्त्र सोडलें. सूर्यप्रभानेंही पाशुपतास्त्राचा प्रयोग केला. त्या महाअस्त्रानें ब्रह्मास्त्राचा पराभव केला, व श्रुतशर्म्याला जाळून टाकण्याकरितां, तें त्याच्याकडे चाललें. तेव्हां अतिशय भयभीत झालेल्या इंद्रादि लोकपालांनीं आपापलीं वज्रादि अस्त्रें सोडलीं; पण रौद्र अस्त्रानें त्या सर्वांना तुच्छ करून टाकलें. तें दीप्त अस्त्र श्रुतशर्म्याच्या अगदीं जवळ गेलें आहे असें पाहून, सूर्यप्रभानें हात जोडून त्याची अशी प्रार्थना केली कीं, महात्मा, तूं कृपा करून माझ्या शत्रूला मारूं नकोस. तर त्याला बांधून माझ्या स्वाधीन कर.

तें ऐकतांच इंद्रादि सर्व देव श्रुतशर्म्याच्या पक्षाला येऊन मिळाले. तें पाहून दैत्य व दानव सूर्यप्रभाकडे आले, व त्यांचें घनघोर युद्ध होण्याचा प्रसंग आला. इतक्यांत वीरभद्र नांवाचा शिवगण शंकराच्या आज्ञेनें येऊन देवांस म्हणाला,–' देवांनों, तुम्ही युद्ध पहाण्याकरितां आलां आहां, युद्ध करावयास नव्हे; पण तें विसरून जर कांहीं भलतेंच कराल, तर मोठा अनर्थ ओढवेल.'

पण या शंकरादेशाचा त्यांच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं. ते त्यास म्हणाले,–' आम्हां सर्वांचे हे सर्व पुत्र आमच्या समक्ष मारले जात आहेत, तेव्हां आमच्यानें युद्ध केल्यावांचून कसें रहावेल? पुत्रस्नेह दुस्त्यज आहे.' हें त्यांचें प्रत्युत्तर ऐकून वीरभद्र शंभूकडे परत गेला. इकडे देवासुरांचा संग्राम जुंपला. सुनीथाचा अश्विनीकुमारांशीं, प्रज्ञाढ्याचा चंद्राशीं, स्थिरबुद्धीचा अष्टवसूंशीं, कालचक्राचा वायूशीं, प्रकंपनाचा अग्नीशीं, सिंहदंष्ट्राचा निर्ऋतीशीं, प्रमथनाचा वरुणाशीं, धूमकेतूचा यमाशीं, व महामायाचा कुबेराशीं संग्राम चालला. त्यांनीं एकमेकांच्या शस्त्रास्त्रांचा प्रतीकार केला. शेवटीं ज्या ज्या देवानें जें जें अमोघ अस्त्र सूर्यप्रभाच्या अनुयायींवर सोडलें, त्याचें त्यांचें निवारण शंकरानें नुसत्या हुंकारानेंच केलें. गदा उचलून पुढें येणाऱ्या कुबेराचें त्यानें सौम्य शब्दांनींच सांत्वन केलें. तेव्हां शस्त्रांचा कांहीं उपयोग होत नाहीं, असें पहातांच देव पळाले.

स्वतः इंद्र सूर्यप्रभावर धांवून गेला, व क्रोधानें त्यानें त्याच्यावर अनेक शस्त्रास्त्रें सोडिलीं; पण सूर्यप्रभानें त्यांना अनायासानें निष्फल करून सोडलें, व प्रत्यंचा आकर्ण ओढून शंभर तीक्ष्ण बाण इंद्रावर सोडले. ते शरीरांत घुसतांच देवेंद्राला सूर्यप्रभाचा प्रभाव कळला, व त्यानें त्याला मारून टाकण्याकरितां आपलें वज्र उचललें. पण रुद्रानें हुंकार करून त्याला नाहींसें केलें. तेव्हां लज्जित झालेला इंद्र युद्ध सोडून गेला. नंतर भगवान् नारायण प्रभासाशीं युद्ध करूं लागला. त्यांचें युद्ध खरोखरच अति प्रेक्षणीय झालें. शेवटीं शूर प्रभास आपल्याला आटपत नाहीं असें पाहून, विष्णूनें चक्र सोडलें. प्रभासानेंही दिव्य खड्ग, मंत्रवून त्याच्यावर फेंकलें. त्या दोघां दिव्य शस्त्रांचा कलह फार वेळ

झाला; पण शेवटीं प्रभासाचें खड्ग, हीनबल होत आहे असें पाहून, शंकरानें हुंकार केला. त्याबरोबर तीं दोन्हीं अदृश्य झालीं.

## २ उभयपक्षांचा संधि.

तो चमत्कार पाहून असुर आनंदित झाले व सुर खिन्न झाले. पाशुपतानें श्रुतशर्म्याला बांधून सूर्यप्रभाकडे आणलें, त्यामुळें त्या शिवभक्तांचा मोठा विजय झाला. देवांनीं स्तुति करून शंकराला प्रसन्न केलें. तेव्हां 'सूर्यप्रभाला मी दिलेल्या आधिपत्यावांचून दुसरें काय इवें तें मागा' असें भगवानानें देवांना सांगितलें. तेव्हां देव म्हणाले,–' प्रभो, आपलें वचन अन्यथा करण्यास कोण समर्थ आहे? पण आम्हीही श्रुतशर्म्याला जें सांगितलें आहे तें खरें झालें पाहिजे. आमचा अंशक्षय न व्हावा, एवढीच इच्छा आहे.' असें प्रार्थनापूर्वक बोलून देव मुकाट्यानें बसले. तेव्हां श्रीशंकर म्हणाले,–' देवहो, संधि केल्यानें दोघांचेही मनोरथ सफल होतील, यास्तव दोन्ही पक्षांनीं कांहीं अटींवर संधि करावा हें बरें. पण अगोदर श्रुतशर्मा आपल्या अनुचरांसह सूर्यप्रभाला प्रणाम करूं दे, म्हणजे संधि कसा करावयाचा तें मी सांगेन.' शंकराच्या या आज्ञेला आपलें पूर्ण अनुमोदन देऊन देवांनीं श्रुतशर्म्याला सूर्यप्रभापुढें नम्र केलें. तेव्हां त्या दोघांनींही वैर सोडून एकमेकांस दृढ आलिंगन दिलें. नंतर आनंदित झालेल्या देवासुरांनींही परस्पर वैर सोडून, त्या दोघांचा संधि करून दिला. सर्व ऐकत असतांना शंभु सूर्यप्रभाला म्हणाला,–' विद्याधरांच्या सिंहासनावर दक्षिणबाजूच्या अर्ध्या वेदीवर बसून तूं आपलें चक्रवर्तित्व चालीव, व त्याच्या उत्तरार्धांत श्रुतशर्म्याला बसूं दे. थोड्याच कालांत तुला याहीपेक्षां चौपट चांगलें असलेलें किन्नरादि सर्व आकाशचरांचें साम्राज्य प्राप्त होईल. तें प्राप्त झाल्यावर तूं हें आपलें स्थान कुंजरकुमाराला दे. या संग्रामांत मेलेले दोन्ही पक्षांचे वीर अक्षत शरीरानें जिवंत होऊन उठोत.'

इतकें बोलून शंभु गुप्त झाला. इतक्यांत रणांत मेलेले वीर उठले. शंकराच्या आज्ञेप्रमाणें सूर्यप्रभानें उत्तरेकडील सिंहासनार्ध श्रुतशर्म्याला दिलें, व दक्षिणार्धावर तो स्वतः बसला. त्या दोघांचेही दामोदरादिक व प्रभासादिक सचिव त्यांच्या बाजूला बसले. सुनीथ, मय, इत्यादि दानव व विद्याधरेश्वर उचित स्थानांवर आरूढ झाले. त्यानंतर प्रह्लादादिक

सप्त पातालपती, लोकपाल व बृहस्पति यांसह इंद्रादि देव, सुवासकुमा
सह सुमेरुप्रभृति विद्याधर, दनुप्रभृति कश्यपाच्या सर्व स्त्रिया व भूतास
विमानांतून सूर्यप्रभाच्या सर्व भार्या तेथें आल्या. परस्परांचा उ
सत्कार करून तीं सर्वजणें उचित स्थानीं बसलीं असतां, दनूच्या सांगण
वरून तिची सखी सिद्धि म्हणाली:—

'देवांनो व असुरांनो, ही देवी-दनु काय सांगत आहे तें ऐका.
प्रीति-समागमामध्यें आज आपणां सर्वांना असें सुख व सौमनस्य हो
आहे, तसें आजपर्यंत कधीं तरी झालें होतें का? हें कशाचें फल आहे
अविरोधाचें. यास्तव भयंकर दुःख देणारा विरोध तुम्ही करूं न
हिरण्याक्षादि तुमच्या ज्येष्ठ भ्रात्यांनीं स्वर्गाच्या राज्याकरितां मोठा विरे
केला; पण ते त्यामुळेंच मरून गेले. आतां तुमच्यामध्यें इंद्रच ए
ज्येष्ठ आहे, तेव्हां आतां विरोध करण्याचें कारणच उरलें नाहीं. यास्त
परस्पर वैरभाव सोडून सर्वजण सुखानें रहा, म्हणजे आम्हांला संते
होईल व राजाचें हित होईल.'

सिद्धीनें सांगितलेलें हें दनूचें वचन ऐकून, इंद्रानें तोंडाकडे पा
असतां बृहस्पति म्हणाला,—'देवांचा असुरांशीं कोणत्याही प्रकार
विरोध नाहीं. असुर मात्र आमच्याशीं व्यर्थ विरोध करीत असता
तें ऐकून मय उलट म्हणाला,—'देवगुरो, असुरांच्या मनांत जर काप
असतें, तर नमुचीनें इंद्राला मृतप्राण्यास जिवंत करणारा उच्चैःश्रवा दि
नसता. प्रबलानें देवांस शरीर अर्पण केलें नसतें. बलीही त्रैलो
विष्णूला देऊन स्वतः पाताळांत राहिला नसता. अयोदेहानें विश्वकर्म्या
आपलें शरीर देऊन, आपल्या निष्कापट्याची पराकाष्ठाच दाखवि
नाहीं का? असुर नेहमींच सरळ व्यवहार करितात; पण देव का
करून वारंवार त्यांस पीडा देतात व पदोपदीं फसवितात.'

### ३. कामचूडामणीशीं विवाह.

मयानें असें म्हटलें असतां, सिद्धीनें मधुर वाणीनें देवासुरांस श
करून त्यांचें सख्य करून दिलें. त्यायोगें सर्वत्र आनंद पसरून त्यां
एकमेकांस आलिंगनें दिलीं. इतक्यांत गौरीची जया नांवाची स
आली, व सर्वांनीं योग्य सत्कार केल्यावर ती सुमेरूला म्हणाली
'देवीनें मला तुजकडे पाठविलें आहे. तिची तुला अशी आज्ञा झाली अ

कीं तूं आपली कामचूडामणी कन्या सूर्यप्रभाला दे. ती माझी परम-भक्ता आहे, म्हणून मला तिचें परमकल्याण केलें पाहिजे.' गौरीची ही आज्ञा ऐकून सुमेरु नम्र होऊन म्हणाला,–'देवीची ही आज्ञा नसून मोठा अनुग्रह आहे. देवानेंही मला मागें असेंच सांगितलें होतें.'

नंतर जया सूर्यप्रभाला म्हणाली,–'तूं आपल्या सर्व भार्यांत हिला मुख्य कर. तीही आपल्या गुणांनीं तुला सर्वांपेक्षां अधिक प्रिय होईल. देवी गौरीनें हें तुला सांगावयास मला मुद्दाम येथें धाडलें आहे.' हें ऐकून कृतकृत्य झालेल्या सूर्यप्रभानें त्याचा मोठा गौरव केला, व जया गुप्त झाली. सुमेरूनें त्याच दिवशीं विवाहलग्न ठरविलें. रत्नांचे स्तंभ व कट्टा यांनीं भूषित अशी सुंदर वेदी तयार केली, तिच्या मध्य-भागीं अग्नि प्रज्वलित केला; पण रत्नांच्या प्रभेपुढें तो निस्तेज झाल्या-सारखा दिसत होता. योग्यसमयीं त्या विद्याधरेश्वरानें आपल्या कामचूडामणी कन्येला मंडपांत आणविलें. तेव्हां देव व असुर तिचें लावण्य पहाण्यांत गुंग झाले. हिमालयापासून झालेल्या उमेप्रमाणेंच सुमेरूपासून झालेल्या तिचें सौंदर्य अप्रतिम होतें. सुमेरूनें सूर्यप्रभाला कन्यादान व विपुल वर-दक्षिणा दिली. कन्येला अनेक दिव्य भूषणें समर्पण केलीं. भवानीनें पाठ-विलेल्या जयेनें येऊन, प्रथम लाजा–होमाच्या वेळीं तिला कधींही म्लान न होणारी माला, दुसऱ्या लाजा–होमाच्या वेळीं क्षुधा, तृषा व मृत्यु यांचें निवारण करणारी रत्नमाला, व तिसऱ्या होमाच्या वेळीं यौवन क्षीण न होऊं देणारी एकावली दिली. सुमेरूनेंही ऐरावणापासून झालेला दिव्य गज, अमूल्य रत्नें, उच्चैःश्रव्यापासून झालेला उत्तम अश्व, व चिर-काल यौवन देणारी एक गोळी तिला दिली.

याप्रमाणें विवाहविधि निर्विघ्नपणें आटोपल्यावर सुमेरूनें, देव, असुर, विद्याधर, देवमाता इत्यादि सर्वांस हात जोडून–'आज तुम्ही सर्वांनीं माझ्या येथें भोजन करून मजवर मोठा अनुग्रह केला पाहिजे.'–अशी प्रार्थना केली; पण त्याच्या म्हणण्यास कोणी रुकार दिला नाहीं. तेव्हां शिवाचा अनुचर नंदी तेथें येऊन प्रणाम करणाऱ्या त्यांस म्हणाला,–'तुम्ही आज याच्या येथें भोजन करा, हा आमचा मोठा भक्त आहे. याचें अन्न खाल्यानें तुमची अक्षय्य तृप्ति होईल.' तें ऐकून सर्वांनीं तेथें भोजन करण्याचें मान्य केलें.

शंकराच्या आज्ञेनें अनेक शिवगण कामधेनूसह सुमेरूला सहाय करावयास आले. त्यांनीं सुंदर भोजनस्थान निर्माण केलें. त्यांत योग्य प्रदेशीं देव, विद्याधर, असुर व मानुष यांस मोठ्या सत्कारानें बसविलें. पानें मांडलीं. सुमेरूच्या विद्या–प्रभावानें व शंकराच्या कामधेनूपासून उत्पन्न झालेल्या षड्रस अन्नाचें भोजन घातलें. सर्व तृप्त झाले. भोजनाच्या वेळीं त्याच मंडपांत एकीकडे रम्य नृत्य व गायन चाललें होतें. भोजनोत्तर नंदि प्रभृति गणांनीं सर्वांस दिव्य पुष्पें, वस्त्रें व भूषणें दिलीं, व शेवटीं याप्रमाणें देवादिकांस संतुष्ट करून शिवगण स्वस्थानीं गेले. देवादिकही सूर्यप्रभाला विचारून आपापल्या घरीं गेले. सूर्यप्रभ, भार्या व सचिव यांसह विमानानें पहिल्या सुमेरु तपोवनांत गेला. त्यानें तेथें पोंचतांच युद्धांत मरून जिवंत झालेल्या आपल्या हर्ष नामक मित्राला, आपला उदय सर्व राजांना व रत्नप्रभ भ्रात्याला कळवावयास पाठविलें, व तो सायंकाळीं रत्नजडित पलंगावर सुंदर शय्या घालून, उत्तम प्रकारें सज्ज केलेल्या कामचूडामणीच्या वासगृहांत गेला. तेथें नूतन विवाहित कन्येला सुलभ असलेली लज्जा हळुहळु कमी करून, त्या भाग्यशाली पुरुषानें अनिर्वाच्य, अपूर्व व दुसऱ्या कोणत्याही स्त्रीपासून न झालेलें संगमसुख भोगलें. 'प्रिये, मला जरी अनेक भार्या असल्या तरी माझ्या अंतःकरणांत घर करून तेथें स्थिर रहाणारी तूंच एक आहेस ' इत्यादि पुष्कळ गोड गोड गोष्टी बोलून त्यानें तिचें चित्तरंजन केलें.

## ४. सूर्यप्रभाचा अभिषेक.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्यप्रभ, आपल्या एकत्र असलेल्या इतर भार्यांकडे गेला, व त्यांच्याशीं नानाप्रकारचीं भाषणें करीत त्यांचें मनोरंजन करूं लागला. इतक्यांत सुषेण नांवाच्या विद्याधरानें येऊन–' देव, त्रिकूटनाथादि सर्व विद्याधरेश्वरांनीं परवां आपणाला ऋषभ पर्वतावर शुभ अभिषेक करावयाचा निश्चय केला आहे, यास्तव सर्वांना आमंत्रण पाठवून तेथें आणवावें, '–असा निरोप कळविला. तेव्हां सूर्यप्रभ त्यास परत म्हणाला,–'दूता, तूं जाऊन त्या त्रिकूटाधिपति-प्रभृतींस सांग, कीं तुम्हींच सर्व तयारी व आमंत्रणादि करा. आम्हीं आयत्या वेळीं तेथें येऊं. कांहीं मुख्य मुख्य लोकांकडे मात्र माझें निमंत्रण जाईल.'

हा प्रतिसंदेश घेऊन सुषेण गेला. सूर्यप्रभानें आपल्या प्रभासादि मित्रांस देव, याज्ञवल्क्यादि मुनि, असुर व राजे यांच्याकडे पृथक् निमंत्रणें करावयास पाठविलें. तो स्वतः एकटाच कैलासावर हर व अंबा यांस आपल्या महोत्सव-प्रसंगीं येण्याविषयीं प्रार्थना करावयास गेला; पण शुभ्र भस्मानें भूषित झालेल्या शंकराप्रमाणेंच शुभ्र असलेल्या त्या पर्वतावर त्याच्यानें जाववेना. अर्धा अधिक पर्वत चढून गेल्यावर सूर्यप्रभाला पुढें जातां येणार नाहीं, असें वाटलें. त्याला तेथें एक विद्रुम-रत्न-जडित द्वार दिसलें, पण त्या सिद्धिमानालाही त्यांत प्रवेश करतां येईना. तेव्हां तो महाभक्त चित्त स्थिर करून आपल्या परम इष्ट देवाची स्तुति करूं लागला. कांहीं वेळानें तें द्वार उघडून बाहेर आलेला एक गजवदन पुरुष–'आंत ये, हेरंब भगवान् तुजवर प्रसन्न झाला आहे'–असें सांगून त्याला आंत घेऊन गेला. तेथें एका रत्नजडित आसनावर बसलेल्या आदित्यासारख्या दीप्त विनायकास त्यानें पाहिलें. त्याबरोबर सूर्यप्रभ त्याच्या चरणांवर लीन झाला. तेव्हां संतुष्ट झालेल्या विघ्नराजानेंही त्याला येण्याचें कारण विचारून 'या सोपान-मार्गानें वर चढून जा' असें प्रेमळ शब्दांनीं सांगितलें. सूर्यप्रभ नमस्कार करून पुढें निघाला. पुष्कळ दूर गेल्यावर त्याला आणखी एक मोठें रत्नद्वार लागलें, पण त्यांतही त्याला प्रवेश करतां येईना, म्हणून त्यानें देवाची पुनः स्तुति केली. तेव्हां एका षण्मुखानें तें उघडून त्याला आंत नेलें. तेथें त्याला कुमारस्वामीचें रमणीय दर्शन झालें. त्यानेंही लीन झालेल्या सूर्यप्रभाला येण्याचें कारण विचारून, पुढचा मार्ग दाखविला. तेव्हां तो त्या मार्गानें वर चढून जाऊं लागला. याप्रमाणें भैरव, महाकाल, वीरभद्र, नंदी व भृंगी, या पांच गणांनीं निरुद्ध करून ठेवलेल्या आणखी पांच द्वारांचें उल्लंघन, केवल भक्तिपूर्ण स्तुतीच्या योगानें करून, तो शंकरभक्त कैलास पर्वतावरील स्फटिक–रत्नमय द्वारापर्यंत जाऊन पोंचला. तेथेंही बाहेर राहूनच त्यानें महादेवाची स्तुति केली. तेव्हां एका रुद्रानें द्वार उघडून त्याला आंत नेलें. तेव्हां सूर्यप्रभानें स्वर्गाहून अधिक सुखकर असलेल्या त्या शंभूच्या स्थानाचें दर्शन घेतलें. तेथें दिव्यगंधयुक्त वायु वहात होता. तेथील वृक्षांवर पुष्कळ पुष्पें व फळें आलीं होतीं. गंधर्व गात होते, व अप्सरा सुंदर नृत्य करीत होत्या. त्या शिवालयाच्या मध्यभागीं स्फटि-

काच्या सिंहासनावर स्वच्छ स्फटिकासारखा शुभवर्ण त्रिलोचन बसला होता. त्यानें आपल्या मस्तकावरील पिंगट जटा बांधल्या होत्या. त्यांतून भगवती मंदाकिनी वहात होती. मस्तकावर सुंदर चंद्रकोर चमकत होती. डाव्याबाजूस बसलेली भगवती गिरिजा त्या परमेश्वराची सेवा करीत होती. सूर्यप्रभ त्या देवास पाहून अतिशय आनंदित झाला. जवळ जाऊन तो त्याच्या व गौरीच्या सुखद चरणांवर लोटांगण घालूं लागला. तेव्हां त्याच्या पाठीवरून हात फिरवून, व त्याला उचितस्थानीं बसवून 'तूं कशाकरितां आलास' असें शंकर विचारूं लागला. तेव्हां 'माझा अभिषेक–काल समीप आला आहे. यास्तव प्रभूचें तेथें सानिध्य व्हावें, म्हणून प्रार्थना करावयास या चरणापाशीं आलों,' असें त्यानें सांगितलें.

तें ऐकून महादेव म्हणाला,–'वत्सा, मग त्याकरितां तूं इतके क्लेश कशाला भोगलेस? तेथूनच माझें स्मरण कां नाहीं केलेंस? बरें आहे. आम्ही येऊं, जा.' इतकें सांगून देवानें एका गणाला बोलावलें,–व 'प्रणाम व प्रदक्षिणा करून सज्ज झालेल्या त्याला ऋषभ पर्वतावर नेऊन पोंचीव; कारण चक्रवर्ती राजांचें तें महाभिषेकस्थान आहे.'–असें सांगितलें. त्याबरोबर त्या गणानें त्याला आपल्या खांद्यावर बसवून इष्टस्थानीं नेऊन सोडलें व तो गुप्त झाला. इतक्यांत सूर्यप्रभाचे मित्र, कामचूडामणि-प्रभृति–भार्या, विद्याधराधिप, इंद्रादि देव, मयादि असुर, याज्ञवल्क्यादि मुनी, श्रुतशर्मा, सुमेरु, सुवासकुमार इत्यादि सर्व तेथें आले. सूर्यप्रभानें त्या सर्वांचा यथोचित सत्कार केला. शंकराच्या दर्शनाचा वृत्तांत सांगणाऱ्या त्याचेंही त्यांनीं अभिनंदन केलें.

प्रभासादिकांनीं स्वतः जाऊन सुवर्ण कलशांतून नद, नद्या, सागर व तीर्थें यांचें जल, विविध औषधींसह आणलें. इतक्यांत त्रिपुरारि भगवान् गौरीसह तेथें आला. सर्वांनीं त्याला वंदन केलें. सुमुहूर्तावर पुण्याह–घोष चालला असतां, ऋषींनीं सूर्यप्रभास विद्याधराधिपत्यावर अभिषेक केला. विज्ञानमय मयासुरानें त्याला पट्टा बांधून मस्तकावर मुकूट घातला. मंगलवाद्यांसह देवदुंदुभी वाजूं लागल्या. सुंदर अप्सरा नृत्य करूं लागल्या. महर्षि–संघानें कामचूडामणीलाही त्याच्याबरोबर अभिषेक करून सूर्यप्रभाची महादेवी केलें.

अभिषेक–महोत्सव आटोपल्यावर देवादि सर्व स्वस्थानीं गेले. सूर्यप्रभानें प्रभासादि मित्रांचा योग्य सन्मान करण्याकरितां पुनः मोठा उत्सव केला. शंकराच्या आज्ञेप्रमाणें सिंहासन-वेदीचा उत्तरार्ध श्रुतशर्म्याला अर्पण केला. आणखी दुसऱ्या पुष्कळ विद्याधर–कन्यांशीं विवाह केले व आपल्या प्रिय मित्रांसह तो खेचर राज्यलक्ष्मीचा चिरकाल उपभोग घेत राहिला. राजन्, याप्रमाणें पूर्वीं मानुष सूर्यप्रभाला शंकराच्या प्रसादानें विद्याधर–चक्रवर्तित्व प्राप्त झालें.

विद्याधरेश वज्रप्रभ, वत्सराजासमोर, नरवाहनदत्ताला अशी कथा सांगून व प्रणाम करून गगनांत उडून गेला. तदनंतर वीर नरवाहनदत्त–देव, देवी मदनमञ्चुकेसह वत्सराजाच्या येथें, विद्याधरेंद्र–पदाचा लाभ केव्हां होतो, म्हणून वाट पहात राहिला.

८ सूर्यप्रभलंबक समाप्त.

---

# १. अलंकारवतीलंबक.

## तरंग १ ला.

### १. अलंकारवतीचें वृत्त.

विद्याधराधीशांनीं याप्रमाणें पूर्वीच येऊन ज्याला वंदन करण्यास आरंभ केला आहे, असा वत्सराजपुत्र दिव्य स्त्रियांसह आपल्या पित्याच्या येथें आनंदानें रहात असतां, एकदां तो, सर्व सचिव व सैन्य यांसह अरण्यांत शिकारीस गेला. तेथें कांहीं वेळ मृगया केल्यावर स्फुरण पावणाऱ्या उजव्या नेत्रानें भावि कल्याणाची सूचना केल्याकारणानें सर्व अनुचरांना सोडून, तो गोमुखासह त्या मोठ्या वनांत शिरला. थोड्या अंतरावर जातांच दिव्य वीणा-रवासह गायनाचा ध्वनि त्याच्या कानीं पडला. तेव्हां तो कोणत्या दिशेनें येत आहे, याचा निश्चय करून, तो वीर तिकडे गेला. तों त्याला समोर स्वयंभू शिवाचें मंदिर दिसलें. घोडा बाहेर बांधून ठेवून तो आंत शिरला. तेव्हां, शंकरापुढें बसून सुंदर गायन करणारी एक दिव्य कन्या त्याला दिसली. तिच्या सभोंवार दुसऱ्याही अनेक कन्या बसल्या होत्या. त्या कांतिमतीनें केवल आपल्या दर्शनानेंच त्या राजपुत्राच्या हृदयाला क्षुब्ध करून सोडलें. तसेंच त्याला पहातांच त्या सुंदरीचेंही मन गडबडलें. ती वीणा वाजवितांना चुकूं लागली, गातांना अपस्वरानें गाऊं लागली, व स्नेहपूर्ण स्थिर नेत्रांनीं अनन्यचित्त होऊन, त्याच्याकडे पहात राहिली.

त्या दोघांचीही ती अवस्था पाहून, नरवाहनदत्ताचा अभिप्राय जाणणारा गोमुख 'ही कोण, कोणाची कन्या, इत्यादि जों तिच्या सख्यांना विचारीत आहे, तोंच एक प्रौढ विद्याधरी आकाशांतून उतरली, व त्या कन्येच्या जवळ जाऊन बसली. त्या कन्येनेंही उठून तिला नमस्कार केला. तेव्हां 'सर्व विद्याधरांचा ईश तुला पति प्राप्त होवो' असा आशीर्वाद देऊन, त्या प्रौढ विद्याधरीनें तिला जवळ बसवून घेतलें. हा सर्व चमत्कार पाहून नरवाहनदत्त हळूच समीप जाऊन प्रणामपूर्वक-' ही कोण, तुम्ही कोण व

हिचा तुमच्याशीं काय संबंध आहे?'–असें विचारूं लागला. तेव्हां ती विद्याधरी उचित आशीर्वाद देऊन सर्व वृत्त सांगूं लागली.

हिमालयावर श्रीसुंदरपुर आहे. त्यांत अलंकारशील या नांवाचा एक विद्याधरेश रहातो. त्याची महिषी कांचनप्रभा. तिच्या ठायीं त्याला एक पुत्र झाला. 'हा पुढें मोठा धार्मिक होईल' असें उमेनें स्वप्नांत सांगितल्यामुळें, पित्यानें त्याचें धर्मशील असें नांव ठेविलें. क्रमानें विद्वान् व तरुण झालेल्या त्या सत्पुत्राला यौवराज्य मिळालें. तो केवल धर्मपरायण असल्यामुळें त्यानें आपल्या पित्यापेक्षांही प्रजेचें अधिक अनुरंजन केलें. त्यानंतर अलंकारशीलाची भार्या पुनः गर्भवती होऊन सुंदर कन्या प्रसवली. तिच्या जन्मसमयीं 'ही चक्रवर्ति–नरवाहनदत्ताची भार्या होईल,' अशी आकाशवाणी झाली होती. त्यामुळें तिच्या आईबापांनीं अलंकारवती, असें तिचें नांव ठेविलें. शशिकलेप्रमाणें ती बाला दिवसें-दिवस वाढत जाऊन, योग्य समयीं तरुण झाली. बापापासूनच तिला सर्व विद्या प्राप्त झाल्या. व ती शंकराच्या भिन्न भिन्न स्थानीं भक्तीनें भ्रमण करूं लागली. इतक्यांत तिचा भ्राता, धर्मशील तरुण असूनही शांतचित्त होऊन एकांतांत आपल्या पित्याला म्हणाला–'बाबा, मला हे क्षणभंगुर भोग आवडत नाहींत. या संसारांत उपभोग घेतांच विरस न वाटणारें असें काय *आहे? भगवान् व्यासांचे सर्व संचय क्षयान्त (क्षय पावणारे) सर्व उन्नति पतनान्त, सर्व संयोग वियोगान्त, व जीवित मरणान्त आहे. अशा अर्थाचें वचन तुम्हीं ऐकलें नाहीं का? तेव्हां नश्वर पदार्थांमध्यें शहाण्याची आसक्ति कशी असणार? भोग व धनसंचय परलोकीं बरोबर येत नाहींत. धार्मिकाला सोडून एक पाउलभरही दूर§ न जाणारा एक धर्मच बांधव आहे.

आपला पुत्र विरक्त होऊन अशा परमार्थाच्या गोष्टी सांगूं लागला आहे असें पाहून, मनांतल्या मनांत अतिशय व्याकुल झालेला अलंकार-शील डोळ्यांत अश्रु आणून म्हणाला,–' पुत्रा, तुला अकस्मात् हा काय

---

* किं तदस्ति हि संसारे पर्यन्तविरसं न यत्।

§ परत्र च सहायान्ति न भोगा नार्थसंचयाः।
एकस्तु बान्धवो धर्मो न जहाति पदात्पदम्॥

भ्रम झाला आहे ! तारुण्याचा योग्य उपयोग केल्यावर मग शांतीचा स्वीकार करावा, असें संतांचें मत आहे. अनुरूप कन्येशीं विवाह करून राज्य-परिपालन करीत असतांना उचित भोग भोगण्याचा हा तुझा काल आहे. या वयांत तुला वैराग्य शोभत नाहीं.'

पित्याचें हें वचन ऐकून धर्मशील पुनः म्हणाला,-बाबा, शम व अशम यांना वयाचा कांहीं नियम नाहीं. ईश्वराच्या अनुग्रहामुळें एकादा बालकही शांतचित्त होतो; पण एकादा प्राकृत वृद्ध झाला तरी शांत होत नाहीं.* राज्य व स्त्री-परिग्रह यांमध्यें माझी रति नाहीं. शिवाराधन व तप हेंच माझ्या जीवितार्चे फळ आहे.

पुत्राचें हें निश्चयपूर्ण भाषण ऐकून व त्याचें निवारण करितां येणें अशक्य आहे असें जाणून, त्याचा पिता नेत्रांतून अश्रू ढाळून म्हणाला, 'बाळा, तूं तरुण असतांनाही जर तुला असें वैराग्य झालें आहे, तर मज वृद्धाला हें राज्यादि काय करावयाचें आहे ? मीही वनाचा आश्रय करतों.' असें बोलून अलंकारशील मर्त्यलोकीं गेला. तेथें त्यानें पुष्कळ ब्राह्मणांस सोनें व रत्नें दिलीं आणि आपल्या नगरास परत येऊन कांचनप्रभा भार्येला तो म्हणाला, 'प्रिये, माझ्या सांगण्याप्रमाणें तुला येथेंच राहिलें पाहिजे. तूं या आपल्या रम्य नगरांत राहून, अलंकारवतीचें रक्षण कर. आजपासून एका वर्षानें याच तिथीला उत्तम विवाह मुहूर्त आहे. त्या शुभ लग्नावर मी ही कन्या नरवाहनदत्ताला देईन. नंतर तो आमचा चक्रवर्ती जामात या आमच्या पुराचें रक्षण करील.'

इतकें सांगून व कन्येसह आपल्या प्रिय भार्येला परतवून, तो विद्याधरेश पुत्रासह वनांत गेला. कांचनप्रभा अलंकारवतीसह त्या पुरांत राहिली. कारण कोणती साध्वी स्त्री पतीच्या आज्ञेचें उल्लंघन करणार आहे ?§ असो. ती कन्या पुढें आपल्या प्रिय मातेसह पुष्कळ देवस्थानांतून हिंडली. एकदां प्रज्ञप्ति नामक विद्या तिला म्हणाली,-'मुली, काश्मीरांत स्वयंभू क्षेत्रें आहेत, त्यांची जाऊन तूं पूजा कर, म्हणजे तुला नरवाहनदत्त पति

---

* न शमाशमयोरत्र नियमोऽस्ति वयःकृतः । ईश्वरानुगृहीतो हि कश्चिद्बालोऽपि शाम्यति । वृद्धोऽपि न शमं याति कश्चित्कापुरुषः पुनः ॥

§ साध्वी स्त्री भर्त्राज्ञां का हि लंघयेत् ॥

निर्विघ्नपणें प्राप्त होईल.' विद्येच्या आज्ञेप्रमाणें ती नंदिक्षेत्र, विजयक्षेत्र, इत्यादि क्षेत्रांत मातेसह गेली. तिनें प्रतिक्षेत्रीं मोठ्या भक्तीनें गिरिजापतींचें पूजन केलें, व नंतर त्या दोघीजणी आपल्या नगरास परत आल्या.

राजपुत्रा, हीच ती अलंकारवती कन्या आहे, व मी तिची कांचनप्रभा माता आहें, असें तूं समज. आज ही मला न विचारतां या शिवालयास आली; पण मी विद्या-बलानें तें जाणून, व तूंही येथें आला आहेस असें समजून या स्थानीं आलें. सुंदर उदयनसुता, देवतांच्या आज्ञेनें प्राप्त झालेल्या हिचें तूं पाणिग्रहण कर. हिच्या पित्यानें सांगून ठेवलेला विवाहदिवस उद्यांच आला आहे. यास्तव आज तूं आतां कौशांबीस जा, आम्ही पण आपल्या नगरास जातों. उद्यां तपोवनांतून येऊन राजा अलंकारशील स्वतः तुला ही कन्या देईल.

कांचनप्रभेनें असें सांगितल्यावर, त्या दोघांही तरुणांची अवस्था कांहीं चमत्कारिक झाली. सायंकाळ झाला असतां, आतां रात्रभर विरहव्यथा भोगीत रहावें लागणार, असें मनांत येऊन चक्रवाक पक्ष्यांच्या जोडप्याची जशी स्थिति होते, तशीच त्या एकाच रात्रीचा वियोग सहन करण्यास असमर्थ झालेल्या त्यांची दशा झाली. त्या दोघांच्याही नेत्रांतून अश्रू आले. तें पाहून कांचनप्रभा त्या दोघांनाही म्हणाली,-तुम्ही इतकें अधीर कां होतां! आजची एक रात्र तुमच्यानें काढवत नाहीं का? तुमचा हा वियोग तर अगदींच अल्प आहे; पण धीर पुरुष व स्त्रिया, ज्याचा अवधि अनिश्चित आहे, असाही दीर्घ विरह सहन करतात. याविषयीं राम व सीतादेवी यांची कथा मी सांगतें, ती ऐका.—

## २. सीता व राम यांच्या विरहाचें वृत्त.

अयोध्याधिपति राजा-दशरथाचा, राम नामक पुत्र होता; तो भरत, लक्ष्मण व शत्रुघ्न यांच्या पूर्वी झालेला असल्यामुळें, त्यांचा अग्रज (ज्येष्ठ) भ्राता होय. रावणाचा उच्छेद करण्याकरितां तो भगवान् विष्णूचा अंशावतारच झाला. जनक-कन्या सीता त्याची प्राणप्रिया भार्या झाली. दैववशात् भरतावर राज्यभार टाकणाऱ्या पित्याच्या आज्ञेनें तो सत्पुत्र सीता व लक्ष्मण यांसह वनांत गेला, पण रावणानें कपट करून त्याच्या प्रियेला तेथून हरण केलें, व मार्गांत प्रतिबंध करणाऱ्या जटायूस मारून, त्यानें तिला लंकेस नेलें. तेव्हां विरह-दुःख भोगणाऱ्या रामानें सुग्रीवाशीं

सख्य करून वालीला मारलें, मारुतीला पाठवून सीतेचा शोध लाविला, सागरावर सेतू बांधून त्यावरून अगणित सैन्यासह लंकेस गेला, व मोठें घनघोर युद्ध केलें. सर्व दुष्ट राक्षसांसह रावणास मारलें. लंका, शरण आलेल्या बिभीषणाला दिली, व देवी सीतेला सोडविलें.

नंतर अयोध्येस परत येऊन भरतानें समर्पण केलेलें राज्य करीत असतांना सीता गर्भवती झाली. इतक्यांत प्रजेचा व्यवहार पहाण्याकरितां अल्प परिवारासह-हळूच नगरांतून फिरत असतांना रामराजानें एक पुरुष आपल्या पत्नीचा हात धरून तिला घराबाहेर ओढून घालवीत आहे, असें पाहिलें. शेजाऱ्यांनीं तिला घालविण्याचें कारण विचारलें असतां, 'ही दुसऱ्यांच्या घरीं जाऊन बसते ' असा तिचा दोष तो सांगूं लागला.' तेव्हां ती म्हणाली,-' रामदेवानें राक्षसाच्या येथें राहिलेल्या सीतेलाही सोडलें नाहीं; पण हा माझा नवरा मी नातेवाईकांच्या घरीं गेलें, म्हणून सोडीत आहे. म्हणजे त्या पुण्यवान् राजापेक्षांही हा अधिक झाला !'

वेष बदलून फिरणाऱ्या रामभद्रानें हें तिचें भाषण ऐकलें. तो मनांत अतिशय खिन्न झाला, व अंतःपुरांत जाऊन पुष्कळ विचार केल्यावर त्यानें लोकनिंदेच्या भीतीनें आपल्या साध्वी भार्येचाही त्याग केला. यशस्वी पुरुष विरहक्लेश सहन करतो; पण त्याला अयश सहन होत नाहीं.* असो; दैववशात् सीता वाल्मीकीच्या आश्रमास जाऊन पोंचली. तेव्हां त्या ऋषीनें सांत्वन करून तिला आपल्या आश्रमांत ठेवून घेतलें. पण तेथील इतर तापसी आपसांत असे कुतर्क करूं लागले कीं, 'ही जनकजा खरोखरच दोषी असेल, त्यावांचून राम हिचा त्याग कसा करील ? तेव्हां हिच्या दर्शनानें आम्ही पातकी नाहीं होणार म्हणून कशावरून ? वाल्मीकिमुनि मोठे कृपाळु आहेत, त्यामुळें ते कांहीं हिला 'येथून जा' असें म्हणणार नाहींत. ते हिच्या दर्शनानें लागणारें आपलें पाप तपाच्या योगानें नाहींसें करतील, पण आमच्या जवळ इतकें तप कोठें आहे ? वास्तव आपण येथून निघून दुसऱ्या आश्रमांत जाऊं चला.'

हा त्यांचा संकल्प जाणून भगवान् वाल्मीकि म्हणाले,-' ब्राह्मणांनो, ही रामभार्या अगदीं शुद्ध आहे, असें मी अंतर्दृष्टीनें जाणलें आहे.' पण

* सहते विरहक्लेशं यशस्वी नायशः पुनः ।

त्या मुनींचा त्यावर विश्वास बसेना. तेव्हां सीता हात जोडून त्यांस म्हणाली,–'भूदेवांनो, आपल्याला वाटेल तशा रीतीनें आपण मला शुद्ध करून घ्या. दिव्य करीत असतांना जर मी अशुद्ध आहें असें ठरलें, तर आपण माझा शिरश्छेदरूप निग्रह करा.' तें ऐकून त्यांना दया आली व ते म्हणाले, 'या वनांत टिटिभसर या नांवाचें एक मोठें सरोवर आहे. पूर्वीं परपुरुष-संगाविषयीं साशंक झालेल्या एका टिटिभानें आपल्या शुद्ध भार्येवर तसा दोषारोप केला, तेव्हां ती निराश्रित स्त्री ( पक्षीण ) भूमि व लोकपाल यांना उद्देशून आक्रोश करूं लागली असतां, त्यांनीं तिच्या शुद्धीकरितां तें सरोवर निर्मिलें आहे. तेथें ही राघवपत्नी आपल्या शुद्धी-विषयीं आमचा निश्चय करूं दे.'

त्यावर 'बरें आहे' असें म्हणून जानकी त्यांच्याबरोबर त्या सरो-वराच्या कांठीं गेली, व 'हे अंबे, वसुंधरे, जर एका आर्यपुत्राला सोडून दुसऱ्या कोणत्याही पुरुषावर माझें मन कधीं स्वप्नांतही गेलें असेल, तर हें सरोवर मला बुडवून टाको.' असें बोलून ती साध्वी सरोवरांत उतरली त्याबरोबर स्वतः भूमि स्त्रीरूपानें प्रकट झाली, व तिला मांडीवर बसवून सरोवराच्या पलीकडे घेऊन गेली. हा मोठा चमत्कार पाहून सर्व मुनी सीतेपुढें नम्र झाले, व राघवानें विनाकारण आपल्या शुद्ध धर्मपत्नीला सोडलें असें समजून, ते त्यास क्रोधानें शाप देण्यास तयार झाले. पण इतक्यांत जानकी हात जोडून त्यांस म्हणाली,– 'भगवन्, आपण आर्यपुत्राचें अनिष्ट करण्याचें मनांतही आणूं नका. त्यापेक्षां मलाच शाप द्या. मी तुम्हांला हात जोडतें.'

दयाळु मुनींनीं सीतेची ही प्रार्थना मान्य करून, तिला–'शूर पुत्र होवो,' असा आशीर्वाद दिला. त्यानंतर योग्यसमयीं तिला वाल्मीकीच्या आश्रमांत सुंदर पुत्र झाला. वाल्मीकींनीं त्या बालकाचें लव असें नांव ठेवलें. पुढें एकादां ती आपल्या लाडक्या पुत्राला घेऊन नदीवर स्नान करावयास गेली असतां, रामपुत्र पर्णशाळेंत नाहीं असें पाहून, भयभीत झालेल्या वाल्मीकींनीं, (परत आल्यावर आपला सुत नाहीं, असें कळल्यास सीता प्राण ठेवणार नाहीं असें जाणून,) लवासारखाच एक कुशाचा पुत्र केला, व तपःसामर्थ्यानें त्याला सजीव करून सीता रोज स्नानाला जातांना आपल्या अपत्याला जेथें ठेवीत होती तेथें ठेवलें.

कांहीं वेळानें ती साध्वी परत आली, तों तिला आपल्या पुत्रासारखाच दुसरा पुत्र तेथें दिसला. त्याला पाहून ती आश्चर्यचकित झाली, व 'माझा बालक तर माझ्या कडेवर आहे, मग हा दुसरा कोण ?' असें मुनींना नम्रपणें विचारूं लागली. तेव्हां त्या सत्यप्रतिज्ञ ऋषींनीं इत्थंभूत वृत्तांत सांगून–'आतां हा दुसरा पुत्रही तूंच घे. मी याला आपल्या प्रभावानें कुशांच्या योगानें निर्मिलें आहे, म्हणून याचें नांव 'कुश' असेंच मी ठेवितों.'–असें तिला म्हटलें.

नंतर त्या मुनींनीं त्यांचे संस्कार केले, विद्या शिकविली व उचित अन्नादिकांच्या योगानें वाढविलें. पुढें त्या क्षत्रिय बालकांचा खोडकर स्वभाव फार वाढला. एकदां त्यांनीं आश्रमांतील हरिणाला मारूनच त्याचें मांस आणलें, व मुनींचें पूजन करावयाचें शिवलिंग घेऊन त्याबरोबर ते खेळूं लागले. तें पाहून वाल्मीकींना मोठा खेद झाला. सीतेनें हात जोडून आपल्या बालकांना क्षमा करण्याविषयीं प्रार्थना केली, व प्रायश्चित्त विचारलें. तेव्हां मुनींनीं त्या दोघांनांही असें प्रायश्चित्त सांगि-तलें, कीं,–'अगोदर लवाला कुबेरसरोवरास जाऊन सुवर्णकमलें, व चैत्ररथ वनांतून मंदार पुष्पें आणूं दे. नंतर त्यांच्या योगानें या दोघांनीं शिवार्चन केलें म्हणजे यांचें पाप नाहींसें होईल.'

गुरूंची ही आज्ञा ऐकतांच लव, बाल असतांनाही कैलासपर्वतावर गेला. तेथें कुबेराच्या सरोवराचें व उपवनाचें रक्षण करावयास जे यक्ष ठेविले होते, त्यांस मारून त्यानें पाहिजे होतीं तितकीं कमलें व मंदार-पुष्पें घेतलीं, व परत येतांना थकल्यामुळें मार्गांतील एका वृक्षाखालीं तो विश्रांति घ्यावयास बसला. तों रामाच्या नरमेध यज्ञांत अवश्य लागणारा सुलक्षणी पुरुष हुडकण्याकरितां अयोध्येहून निघालेला लक्ष्मण तेथें आला. लवाला पहातांच हा उक्तलक्षण-संपन्न पुरुष आहे असें समजून, लक्ष्मणानें मोहनास्त्रानें मोहित करून त्याला अयोध्येस नेलें.

इकडे लव अजून परत कां आला नाहीं, म्हणून सीता दुःखित झाली. तेव्हां सीतेचें सांत्वन करून वाल्मीकि मुनि कुशाला म्हणाले,–'बाळा, लक्ष्मणानें लवाला मोहनास्त्रानें मोहित करून अयोद्धयेस नेलें आहे, तर तूं जा, व या अस्त्रांनीं लक्ष्मणाला जिंकून आपल्या भावाला सोडवून आण.' मुनींची आज्ञा शिरसा मान्य करून व त्यांनीं दिलेलीं दिव्य

शस्त्रें घेऊन कुश अयोध्येस गेला, व त्यानें यज्ञभूमीला रोध केला. त्यामुळें लक्ष्मण रागावला, व तो कुशावर धांवून गेला. पण कुशानें मुनीच्या दिव्य अस्त्रांनीं त्याला जिंकलें. तेव्हां स्वत: राम त्याच्यावर चालून आला, पण मुनि-प्रभावामुळें तोही त्या बालकाला जिंकूं शकला नाहीं. शेवटीं 'तूं कोण व येथें कोणत्या उद्देशानें येऊन आम्हांला असा उपद्रव देत आहेस,' असें रामानें विचारिलें. तेव्हां कुश म्हणाला,–'माझ्या लव या नांवाच्या मोठ्या भावाला लक्ष्मणानें बांधून आणलें आहे, त्याला सोडविण्याकरितां माझा हा सर्व प्रयत्न आहे. आम्हीं दोघेही रामाचे पुत्र आहों, असें आमची माता जानकी अम्हांला सांगत असते.'

कुशाच्या तोंडचे हे अकल्पित शब्द कानीं पडतांच राघवाच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यानें तत्काल लवाला बंधमुक्त करवून आपल्यापाशीं आणविलें. दोघांही पुत्रांना घट्ट आलिंगन दिलें, व 'मीच तो पापी राम आहे.' असें तो त्यांस म्हणाला. त्यानंतर सर्व पौरजन एकत्र जमून सीतेची प्रशंसा करूं लागले. त्या वीर बालकांस पाहूनच सीतेच्या शुद्धीविषयीं त्यांच्या मनाचा निश्चय झाला. नंतर रघुवीरानें पुत्रांचा स्वीकार करून वाल्मीकीच्या आश्रमांतून आपल्या प्रियेला आणविलें. पुढें योग्य समयीं पुत्रांवर सर्व भार टाकून तो रघुवीर सीतेसह आनंदानें राहूं लागला. सारांश धीर स्त्रीपुरुष याप्रमाणें दीर्घ-काल होणारा विरहही सहन करीतात, पण तुमच्यानें आजची एक रात्र धीर धरवत नाहीं, याला काय म्हणावें." असो; विवाहाविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या त्या दोघां तरुणांस असा सदुपदेश करून व दुसऱ्या दिवशीं पुन: येऊं असें सांगून, कांचनप्रभा अलंकारवतीसह गगनांत उडून गेली. तेव्हां नरवाहनदत्तही खिन्न मनानें कौशांबीस परत आला. तेथें प्रियेच्या चिंतेनें आपल्या प्रभूला निद्रा येत नाहीं असें पाहून, गोमुख त्याच्या चित्त-रंजनाकरितां पृथ्वीरूपाची कथा सांगूं लागला.

### ३. पृथ्वीरूप व रूपलता यांची कथा.

गोमुख म्हणाला,–'हे देव, दक्षिणेंत प्रतिष्ठान नगर आहे. तेथें पृथ्वीरूप नांवाचा एक अतिरूपवान् राजा होता. त्याच्याकडे दोघे जैन संन्यासी आले, व त्या राजाचें अद्भुत रूप पाहून म्हणाले, 'राजन्, आम्हीं सर्व पृथ्वीभर फिरलों आहों; पण तुझ्यासारखा रूपवान् पुरुष आम्हांला

कोठेंच आढळला नाहीं. एक मुक्तिपुर द्वीपांतील रूपधर राजाची कन्या मात्र तुला साजेशी आहे. हेमलता देवीच्या ठायीं तिचा जन्म झाला असून तिचें नांव रूपलता आहे. तेवढी ती मात्र तुझी भार्या होण्यास योग्य कन्या आहे, असें आम्हांला वाटतें.'

संन्याशाचें हें भाषण ऐकून राजाला त्या कन्येशीं विवाह करण्याची इच्छा झाली. त्यानें आपल्या कुमारीदत्त-चित्रकाराला वस्त्रावर आपलीं दोन चित्रें काढून घेऊन त्या संन्याशाबरोबर मुक्तिपुरास जाण्याची आज्ञा केली; व तेथें जाऊन रूपधर राजा व त्याची कन्या रूपलता यांना तीं चित्रें युक्तीनें दाखव, व तो राजा आपली कन्या मला देतो कीं नाहीं तें पाहून परत ये, असें पृथ्वीरूपानें त्याला सांगितलें; आणि 'येतांना त्या सुंदरीचें चित्रहि काढून आण' अशी राजानें त्याला सूचना केली.

राजाज्ञेप्रमाणें त्याचीं दोन चित्रें काढून घेऊन, तो चित्रकार दोघां संन्याशांबरोबर निघाला. कांहीं दिवसांनीं ते तिघेही समुद्रतीरावरील पत्रपुरास पोंचले. तेथून जल-मार्गानें पांच दिवस प्रवास करून ते मुक्तिपुर-द्वीपास जाऊन पोंचले. तेथें राजद्वारीं जाऊन कुमारीदत्तानें 'माझ्यासारखा चित्रकार सर्व जगांत नाहीं,' अशीं अक्षरें काढलेला भव्य पडदा भिंतीवर लोंबत सोडला. रूपधराला तें वृत्त कळतांच त्यानें त्याला आंत बोलाविलें. प्रतीहारीबरोबर तो आंत गेला, व राजास प्रणाम करून बसला. राजानें-'तूं कोण, कोठून आलास' इत्यादि प्रश्न केले. तेव्हां कुमारीदत्त म्हणाला,-'देव, मी सर्व पृथ्वीभर फिरून अनेक सुंदर पुरुष व रूपवती स्त्रिया पाहिल्या, व त्यांचीं चित्रेंही काढलीं. या कलेंत माझी बरोबरी करणारा अजून कोणी मला भेटला नाहीं. यास्तव देव, आपणही मला पाहिजे त्या देवादि स्त्रीपुरुषांचें चित्र काढावयास सांगून, माझें कौशल्य पहा.'

तें ऐकतांच राजानें आपल्या रूपलतेला आणून त्याच्यापुढें बसविलें, व 'ह्या माझ्या कन्येचें चित्र काढून दाखीव' असें म्हटलें. तेव्हां थोड्याच अवकाशांत त्या उत्तम चित्रकारानें वस्त्रावर अगदीं हुबेहुब तिची मूर्ति काढून राजाला दाखविली. तें चित्र पहातांच रूपधराला मोठा संतोष वाटला; व 'तूं खरोखरच अप्रतिम चित्रकार आहेस,' असें तो त्याला म्हणाला,-नंतर योग्य जांवयी मिळण्याच्या आशेनें तो पुन: त्याला

विचारूं लागला,—'भद्र, तूं सर्व पृथ्वी पाहिली आहेस, त्यांत माझ्या या कन्येसारखी सुस्वरूप स्त्री अथवा एकादा पुरुष तूं पाहिला आहेस का ?'

त्यावर तो चित्रकार म्हणाला,—'नाहीं महाराज, हिच्यासारखी रूपवती कन्या यालोकीं मीं पाहिली नाहीं. परंतु प्रतिष्ठानचा राजा पृथ्वीरूप मात्र हिच्या सारखाच अति सुस्वरूप आहे. ह्या भाग्यवतीचा जर त्याच्याशीं विवाह झाला, तरच दोघांच्याही उत्तम रूपाचें साफल्य झालें, असें मी मानीन. आपल्यासारखीच रूपवती राजकन्या मिळत नाहीं, म्हणून तो धीर पुरुष ऐन तारुण्यांतही अविवाहित राहिला आहे. देव, सुंदर पुरुषाला पहातांच केवळ रूपलालसेनें मी त्याचें चित्र काढून आपल्यापाशीं ठेविलें आहे.'

तें ऐकतांच 'तो चित्रपट तुजजवळ येथें आहे कां ?' असें रूपधरानें विचारिलें. त्यावर, 'होय स्वामिन्' असें म्हणून त्यानें पृथ्वीरूपाच्या चित्राचा पट त्याला दाखविला. त्यावरील सुंदर चित्र पाहून रूपधर चकित झाला; व तो म्हणाला,—'खरोखर या सत्पुरुषाचें वस्त्रावरील चित्र पाहूनच आम्ही धन्य झालों आहों. या रूपवानाला जे प्रत्यक्ष पहात असतील त्यांना नमस्कार असो;' आपल्या पित्याच्या तोंडून निघालेले हे शब्द ऐकतांच रूपलतेनेंही त्या चित्राचें दर्शन घेतलें, व ती त्याविषयीं इतकी उत्सुक झाली कीं, त्यानंतर तिनें दुसरें कांहीं ऐकलें किंवा पाहिलेंही नाहीं. कन्येची ती अवस्था पाहून राजा कुमारीदत्त-चित्रकारास म्हणाला,—'तूं माझ्या कन्येचें चित्र नेऊन राजाला दाखीव व पृथ्वीरूपाला जर ही आवडली तर हिच्याशीं विवाह करण्याकरितां व आमच्यावर अनुग्रह करण्याकरितां त्याला सत्वर येथें घेऊन ये.'

रूपधराची ती प्रार्थना मान्य करून व राजाचा उचित सत्कार घेऊन, त्या दोघां भिक्षूंसह कुमारीदत्त आल्या मार्गानें परत निघाला. रूपधरानें मुद्दाम पाठविलेला दूतही त्यांच्या बरोबर होता. योग्य समयीं ते चौघेही प्रतिष्ठानास येऊन पोंचले. राजाची भेट घेऊन चित्रकारानें सर्व वृत्तांत सांगितला. रूपधरानें दिलेली मूल्यवान् भेट राजापुढें ठेवली, व चित्रगत रूपलता त्याला दाखविली. तिची मूर्ति पहातांच पृथ्वीरूप देहभान विसरला. त्याचे नेत्र तिच्या ठायीं इतके आसक्त झाले, कीं ते कांहीं केल्या त्या चित्रपटास सोडून दूर होईनात. बराच वेळ त्या चित्राकडे

अनन्य मनानें पाहिल्यावर तो चित्रकारास म्हणाला,–' हिला उत्पन्न करणारा विधाता व चित्ररूपानें लिहिणारा तुझा हात असे दोघेही वंद्य आहेत. मी या कन्येशीं विवाह करण्यास तयार आहें.' त्यानंतर पृथ्वीरूपानें चित्रकार, दूत व दोघे भिक्षू, यांस धनादिकांच्या योगानें संतुष्ट करून, त्या चित्रपटाकडे पहातच तो दिवस घालविला.

दुसऱ्या दिवशीं उत्तम प्रयाण–मुहूर्त पाहून, रूपधराचा दूत, चित्रकार, भिक्षू, आपले मंत्री, आप्त, घोडे, रथ, इत्यादि सर्व परिवारासह तो मंगलघट नांवाच्या गजावर बसून निघाला. मार्गांत त्याला विंध्यारण्य लागलें. तेथें भिल्लांच्या टोळ्यांनीं त्याच्या वीरांना चोहोंकडून घेरलें; पण त्या शूर राजानें त्यांचा पराभव केला. पूर्वीं जयद्रथ–वधाच्या दिवशीं अर्जुनानें कौरव–सैन्याला जसें मारलें होतें, तसेंच पृथ्वीरूपानेंही त्या भिल्लसैन्याला भूमीवर लोळविलें. मुख्य मुख्य भिल्लांना त्या शूरानें यम–सदनीं पाठविलें असतां, आतां आमचा निभाव लागत नाहीं, असें जाणून सर्व भिल्ल दशदिशांस पळून गेले. त्यामुळें भयभीत झालेले राजाचे सैनिकही स्थिर झाले. राजाचा पराक्रम पाहून, रूपधराच्या दूताला मोठा अचंबा वाटला. लढाईत थकलेल्या व जखमी झालेल्या लोकांना विश्रांति मिळावी म्हणून त्या वीरानें त्या दिवशीं आपल्या सैन्याचा तळ त्याच भयंकर अरण्यांतील एका भव्य सरोवरावर दिला. दुसऱ्या दिवशीं तो विजयी राजा पुढें चालला व क्रमानें समुद्रकांठच्या पत्रपुरास जाऊन पोंचला. तेथें त्यानें एक दिवस राहून विश्रांति घेतली. इतक्यांत तेथल्या उदार चरित राजानें त्याची पुढें जलमार्गानें जाण्याची तयारी करून दिली. तेव्हां सर्व परिवारासह भव्य नौकांमध्यें बसून आठ दिवसांनीं तो मुक्तिपुर द्वीपास पोंचला. तो आला आहे असें कळतांच, रूपधर आनंदित होऊन त्याला सामोरा गेला. उभयतांनीं परस्परांस प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर रूपधरासह राजा पृथ्वीरूप त्या नगरांत जाऊं लागला. सर्व पौरजनांनीं त्या अनुरूप वरास पाहून आपल्या नेत्रांचें पारणें फेडून घेतलें. हेमलता राणीला तर, कन्येला असा सुस्वरूप व श्रीमान् नवरा मिळाल्यामुळें अवर्णनीय कृतार्थता वाटली. रूपधरानें आपल्या ऐश्वर्याला शोभेल अशा उपचारानें राजाचा सत्कार करून, एका उत्तम प्रासादांत त्याला सपरिवार ठेविलें. शुभ मुहूर्तावर त्याला साल-

कृत कन्येचें दान दिलें. अति उत्सुक झालेल्या पृथ्वीरूपानें त्या फार दिवसांपासून उत्कंठित होऊन राहिलेल्या रूपलतेचें यथाशास्त्र पाणिग्रहण केलें. होमाच्या वेळीं समीप बसलेल्या वधूवरांची दृष्टि परस्परांस पाहून कृतार्थ झाली. लाजाहोमाच्या वेळीं रूपधरानें कन्या व जामात यांना इतकीं रत्नें व मोत्यें दिलीं कीं, लोक त्याला रत्नाकरच समजूं लागले.

विवाहोत्सव संपतांच त्या कन्येच्या पित्यानें चित्रकार व भिक्षू यांचा वस्त्रें व अलंकार देऊन उचित सत्कार केला, व इतर पूज्यांचीही पूजा केली. नूतन विवाहित पृथ्वीरूप त्या द्वीपांतील सुंदर आहार व पेय पदार्थ यांचा अनुरागासह स्वाद घेत व सर्वोत्तम नवोढा भार्येशीं दिव्य विलास भोगीत, दहा दिवस तेथें मोठ्या सुखानें राहिला. अकराव्या दिवशीं जोशांनीं काढून दिलेल्या शुभ मुहूर्तावर तो रूपलतेसह प्रस्थान मंगल करून स्वदेशास परत यावयास निघाला. समुद्राच्या तीरापर्यंत त्याचा श्वशुरही त्याला पोंचवावयास आला होता. पूर्वीच्या भव्य नौकांतूनच त्यानें तो आठ दिवसांचा जलप्रवास केला. परिवारासह तो तीरावर सुखरूपपणें येऊन पोंचला आहे, असें ऐकतांच उदारचरित त्याला सामोरा आला. त्यानें पुष्कळ आग्रह केल्यामुळें तो तेथें दोनतीन दिवस राहिला. नंतर रूपलतेला जयमंगल हात्तिणीवर बसवून व आपण स्वतः कल्याणरूप हत्तीवर बसून पृथ्वीरूप पुढें जावयास निघाला. अनेक देश, अरण्यें व नद्या यांस ओलांडून तो आपल्या प्रतिष्ठानपुरास येऊन पोंचला. आपला स्वामी विवाह-मंगल करून सपत्नीक परत आला आहे असें कळतांच, सर्व पौरजनांनीं नगर सुशोभित केलें, व सर्वत्र ध्वजा उभारिल्या. हत्तिणीवर बसून राजाच्या मागोमाग आपल्या राजधानींत प्रवेश करणाऱ्या रूपलतेला पहातांच तेथील रूपवतींनीं माना खालीं घातल्या. राजमंदिरांत पोंचतांच राजानें राष्ट्रभर महोत्सव करावयाची आज्ञा दिली. चित्रकारास पुष्कळ गांव दिले, संन्याशांनाही उचित धन अर्पण केलें, दुसऱ्या मानकऱ्यांचा योग्य मान केला, व रूपलतेसह जीवलोकचें सुख भोगलें.

अशी उत्तम कथा सांगून गोमुख अतिशय उत्सुक झालेल्या नरवाहन दत्तास पुनः म्हणाला,—'देव, याप्रमाणें धीर पुरुष क्लेशयुक्त दीर्घ विरहही सहन करतात, पण आपल्याला ही एक रात्रही विरह-अवस्थेंत काढवत नाहीं, याचें मला आश्चर्य वाटतें. उद्यां सकाळीं आपल्याला अलंकार-

वती प्राप्त होईल.' गोमुख असें म्हणत आहे तोंच यौगंधरायणपुत्र तेथें आला, व उपदेश करणाऱ्या गोमुखाला म्हणाला,–' अरे बाबा, स्वतःवर प्रसंग येईपर्यंत दुसऱ्याला सर्व उपदेश करूं शकतात. तूं स्वस्थ आहेस, कामबाणांनीं अजून जर्जर झाला नाहींस, म्हणून या गोष्टी सांगत आहेस. पुरुष कामगोचर होईपर्यंत, धैर्य, विवेक व शील धारण करूं शकतो. खरोखर मदनाला अंगवस्त्रास चिकटलेल्या गवताच्या काडीप्रमाणें झाडून टाकणारा स्कंद, जिनदेव व देवीसरस्वती हीं तिघेंच धन्य होत.'

मरुभूतीचें हें भाषण ऐकून गोमुख थोडासा उद्विग्न झाला आहे असें पाहून, नरवाहनदत्तानें त्याला प्रसन्न करण्याकरितां म्हटलें, ' माझें चित्तरंजन करण्याकरितां गोमुखानें ही चांगली कथा सांगितली. स्निग्ध पुरुष विरहातुरास साधुवाद कसा देईल ? तो त्याचें यथाशक्ति सांत्वन करण्याचाच प्रयत्न करणार; हें उघड आहे. बाकी कामदेव विषमबाण-युक्त आहे, हें हाही जाणतो.' असो.

### ४. अलंकारवती व नरवाहनदत्त यांचा विवाह.

याप्रमाणें नानाप्रकारच्या गोष्टी बोलत व ऐकत नरवाहनदत्तानें ती रात्र कशी तरी घालविली. प्रातःकाळीं उठून त्यानें विक्षिप्त चित्तानेंच नित्य क्रिया केल्या. इतक्यांत आकाशांतून उतरणाऱ्या कांचन-प्रभेला त्यानें पाहिलें. तिच्याबरोबर तिचा भर्ता अलंकारशील, पुत्र धर्मशील व कन्या अलंकारवतीही होती. त्या सर्वांचें त्यानें योग्य स्वागत केलें. त्यांच्या मागोमाग सोनें, रत्नें, इत्यादिकांचे भार वहाणारे विद्याधरही आकाशांतून खालीं आले. हा वृत्तांत ऐकून पुत्राच्या उत्कर्षानें हर्षित झालेला वत्सराज, मंत्री व दोघी भार्या यांसह तेथें आला. त्यानें उचित आतिथ्य केलें असतां, राजा अलंकारशील प्रेमानें नम्र होऊन त्याला म्हणाला,–' राजन्, ही माझी अलंकारयुक्त कन्या जेव्हां जन्मास आली, तेव्हां आकाशवाणीनें ही तुझ्या पुत्राची भार्या होईल असें मला सांगितलें. त्याप्रमाणें आज या शुभ लग्नावर मी ही त्याला देतों. या शुभकार्या-करितांच मी या सर्वांसह येथें आलों आहें. हा तुझा पुत्र नरवाहनदत्त थोड्याच दिवसांनीं सर्व विद्याधरांचा चक्रवर्ती होईल.'

विद्याधरेंद्राचें हें सांगणें ऐकून ' आमच्यावर हा मोठाच अनुग्रह आहे,' असें वत्सराज बोलला. नंतर विद्या-प्रभावानें तळहातापासून

उत्पन्न केलेल्या जलानें त्या विद्याधरेशानें अंगण शिंपलें. त्याबरोबर तेथें सोन्याची वेदी व अकृत्रिम सुंदर मंडप उत्पन्न झाला. मंडपास दिव्य वस्त्राचें छत लावलें होतें, व त्याचे खांब रत्नजडित होते. त्यानंतर अलंकारशील–' ऊठ लग्नवेळ समीप आली. स्नान कर. '–असें नरवाहनदत्तास म्हणाला. त्याबरोबर पित्याच्या आज्ञेनें तो राजपुत्र स्नान करून आला. स्वस्तिवाचनादि सर्व पूर्वांगकर्में आटोपून सुमुहूर्तावर त्या धन्य विद्याधरानें वधूवेष धारण केलेल्या अलंकारवतीचें दान नरवाहनदत्तास दिलें. प्रिय कन्येच्या वियोगामुळें दुःखी होणाऱ्याही अलंकारवतीच्या आईबापांना सर्वोत्तम जामाताचा लाभ झाल्यामुळें फार संतोष वाटला. लाजा-होमाच्या वेळीं त्या उदारानें वधूवरांना अगणित धन दिलें. विवाहोत्सव आटपल्यावर तो कृती विद्याधरेश, भार्या व पुत्र यांसह वत्सराजाचा निरोप घेऊन आकाशमार्गानें स्वस्थानीं गेला. विद्याधरेश आपल्या उदयोन्मुख पुत्राची परिचर्या अशा अकल्पित रीतीनें करीत आहेत असें पाहून, वत्सराज आनंदित झाला, व त्यानें दीर्घकाल उत्सव चालविला. सुकवि जसा उत्तम वाणीमध्यें तल्लीन होऊन जातो, त्याप्रमाणें नरवाहनदत्तही सद्वृत्ताच्या योगानें मनोरम व उदार गुणयुक्त अलंकारवतीला प्राप्त होऊन केवल तत्परायण झाला.

---

# तरंग २ रा.

## १. नरवाहनदत्ताचे दिव्य भोग.

वत्सराजपुत्र आपल्या नव्या भार्येसह तिच्या चेटींचें दिव्य नृत्य–गायनादि पहात व ऐकत आणि सचिवांसह नानाप्रकारचीं पेयें पीत कांहीं दिवस कौशांबींतच राहिला. कांहीं दिवसांनीं त्याची सासू कांचनप्रभा तेथें आली, व त्यानें योग्य आतिथ्य केल्यावर ती म्हणाली,– ' वत्सा, आमच्या पुरास चल. तें पर्वतावरील सुंदर नगर पहा तर खरें. तेथील उपवनांतून अलंकारवतीसह रममाण हो. ' सासूबाईची ही प्रार्थना त्या विलासी राजपुत्राला अतिशय आवडली. त्यानें पित्याची व मातेची आज्ञा घेतली, व वसंतक व आपले सचिव यांसह सासूनें विद्या-प्रभावानें

मुद्दाम तयार केलेल्या उत्तम विमानांत बसून तो आकाशमार्गानें निघाला. विमान फार उंच गेल्यावर त्यानें जेव्हां खालीं पाहिलें, तेव्हां समुद्रवेष्टित पृथ्वी एका लहानशा जलयुक्त भूमीप्रमाणें त्याला दिसली. असो; कांहीं वेळानें श्वश्रू व भार्या यांसह तो हिमालयास जाऊन पोंचला. आकाशांतून सुंदरपुरास जात असतांना त्याला किन्नरींचें गायन ऐकूं आलें, व त्या पर्वतावर अनेक अप्सरांचे संघ त्याला दिसले. असेच आणखी अनेक चमत्कार पहात तो धन्य राजकुमार सुंदरपुरास पोंचला. त्या नगरांत अनेक रत्नजडित सुवर्ण-प्रासाद होते. विमान खालीं उतरतांच तोही त्यांतून निघून राज-मंदिरांत शिरला. सासूनें त्याचा मोठा सत्कार करून सर्व मंगलाचार केले. तेव्हां तोही अलंकारवती व अनुयायी यांसह तेथें त्या दिवशीं दिव्य भोग घेत राहिला. तें श्वशुर-गृह त्याला स्वर्गासारखें सुखकर वाटलें. दुसऱ्या दिवशीं त्याची सासू त्याला म्हणाली,–'वत्सा, या नगरांत स्वयंभू भगवान् उमापति आहे. त्याचें दर्शन घेऊन पूजन केलें असतां तो भोग व मोक्ष देत असतो. अलंकारवतीच्या पित्यानें तेथें मोठें उद्यान केलें आहे, व त्यांत गंगासर नांवाचें उत्तम तीर्थ आपल्या प्रभावानें आणलें आहे. यास्तव त्या देवाचें दर्शन व पूजन करण्याकरितां आणि त्या उद्यानांत विहार करण्याकरितां तुम्ही आज जा.'

सासूच्या आज्ञेप्रमाणें नरवाहनदत्त, प्रिया अलंकारवती व सचिव यांसह शर्वोद्यानास गेला. गंगासरस्तीर्थांत स्नान करून, उमापतीची अनन्यभावानें पूजा केली, व तो रत्नजडित सोपानयुक्त वापींवरून फिरूं लागला. त्यांतील वृक्षांचीं खोडें सोन्यासारखीं होतीं. शाखा रत्नजडित असल्यासारख्या दिसत होत्या. फुलझाडांवर मोत्यांच्या घोंसासारखे पुष्पगुच्छ आले होते, व पालवी विद्रुम मण्यासारखी लाल भडक दिसत होती. दिव्य पेयें व नृत्य गायन यांच्या योगानें त्याचा काल तेथें न कळत जाऊं लागला. याप्रमाणें सासूच्या विद्या-सामर्थ्यानें प्राप्त होणारे विविध भोग भोगीत व त्या उद्यानांत रम्य क्रीडा करीत त्यानें तेथें एक महिना घालविला, सुखांत निमग्न झालेल्या त्याचे व त्याच्या सचिवांचे ते तीस दिवस जरी तीस क्षणासारखे गेले, तरी त्याच्या आईबापांना व मदनमञ्चुकाप्रभृति नरवाहनदत्ताच्या प्रियांना ते तीस वर्षांसारखे दीर्घ वाटले. त्यानंतर कांचनप्रभा, देवांस उचित अशीं वस्त्रें व अलंकार यांच्यायो-

गानें जामाताची पूजा करून, त्याच्या सचिवांना योग्य देणग्या देऊन, व कन्येलाही हवें होतें तें सर्व दिव्य वस्तुजात अर्पण करून त्याच विमानांतून त्यांच्यासह परत यावयास निघाली. तीं सर्व कौशाम्बीस येऊन पोंचतांच तेथील आबालवृद्धांस परम आनंद झाला.

राज-मंदिरांत जाऊन व स्वस्थपणें बसून थोडीशी विश्रांति घेतल्यावर वत्सराज व वासवदत्ता यांच्या समक्ष कांचनप्रभा आपल्या अलंकारवती कन्येला म्हणाली,–'आपला पति अन्य स्त्रियांवर आसक्त आहे, या गोष्टीचा तूं खेद करूं नकोस; कारण त्यापासून सवतिमत्सर उत्पन्न होतो. सपत्नींचे कलह होतात. त्यामुळें पति दुःखित होतो. स्त्रिया जरी क्षणिक पण परम स्पर्श सुखाला कारण असल्या, तरी त्यांच्यापासून दुःख होऊं लागलें म्हणजे पुरुष विरक्त होऊन त्यांचा त्याग करितो. बाळे, पतिविरहाचें दुःख किती असह्य असतें, याचा अनुभव मी स्वतः घेतला आहे. मीही पूर्वी अशीच ईर्ष्या करून आपल्या पतीला दुःखी ठेवीत होतें, पण आतां तो विरक्त होऊन वनांत गेल्यावर पश्चात्तापानें जळत आहें.'

असा उत्तम उपदेश करून व तिला आलिंगन देऊन, जिचे नेत्र अश्रूंनीं भरले आहेत अशी कांचनप्रभा आकाशांत उडून गेली. नरवाहनदत्ताचा तो दिवस सुंदरपुरांतील चमत्कार, आईबापांस सांगण्यांतच गेला. दुसऱ्या दिवशीं सर्व उचित प्रातःक्रिया करून तो वीर सचिवांसह बसला असतां, एक विलासिनी स्त्री भयभीत होऊन अलंकारवतीपाशीं आली, व म्हणाली,–'देवि, मज अबलेचें तूं रक्षण कर. बाहेर एक ब्राह्मण मला मारावयास आला आहे, व त्यामुळें भयानें पळून मी तुजकडे आलें आहें.' हें तिचें भाषण ऐकतांच 'भिऊं नकोस, आपला वृत्तांत सांग. तूं कोण, व हा तुला मारण्याची इच्छा कां करीत आहे ?' असा त्या विद्याधरीनें आश्वासनपूर्वक प्रश्न केला. तेव्हां ती दीन स्त्री आपला वृत्तांत सांगूं लागली. ती म्हणालीः—

## २. हटशर्मा व अशोकमाला यांची कथा.

"मी याच नगरांतील बलसेननामक क्षत्रियाची औरस कन्या असून माझें नांव अशोकमाला असें आहे. मी कन्या असतांना एका हटशर्मा नांवाच्या धनवान् ब्राह्मणानें माझ्या रूपावर आसक्त होऊन पित्याजवळ माझी मागणी केली. पण मी पित्याला स्पष्ट सांगितलें, कीं या घोरमुख व

कुरूप पतीशीं विवाह करण्याची माझी इच्छा नाहीं. तुम्ही जरी दिलीत तरी मी याच्या येथें रहाणार नाहीं. पण तें ऐकून पित्यानें नाकारल्यावरही तो हटी ब्राह्मण प्रायोपवेशन करून, व धरणें धरून माझ्या बापाच्या येथें बसला. माझ्या सात्विक बापाचा कांहीं इलाज चालेना, तेव्हां त्यानें मोठ्या दुःखानें, माझी इच्छा नसतांही माझा त्याच्याशीं विवाह करून दिला, व मी जात नव्हतें तरी तो मला बलात्कारानें घेऊन गेला. पण मी त्याच्या येथें मुळींच राहिले नाहीं. मी तत्काल एका क्षत्रिय पुत्राचा आश्रय केला; पण द्रव्याच्या योगानें गर्वित झालेल्या हटशर्म्यानें त्याला तुच्छ करून सोडलें. तेव्हां मी एका श्रीमान् क्षत्रिय-पुत्राचा आश्रय धरिला. तेव्हां त्या शठ ब्राह्मणानें रात्रीं त्याच्या घराला आग लाविली म्हणून त्यानेंही मला सोडलें. तेव्हां मी तिसऱ्या एका क्षत्रिय-पुत्राकडे गेलें, तो मला आश्रय देण्याच्या विचारांत आहे, असें कळतांच त्या दुष्ट ब्राह्मणानें त्याच्याही घरावर विस्तव ठेवला. तेव्हां त्यानेंही माझा त्याग केला. त्यामुळें मी आश्रयहीन होऊन इतस्ततः पळूं लागलें. कोल्ह्याला जशी बकरी भिते, त्याप्रमाणें मी त्या हिंसक ब्राह्मणाला भिऊं लागलें. तो दुष्ट माझ्या मागें लागला. एक पाऊलभरही मला जाऊं देईना. पण इतक्यांत मोठ्या भाग्यानें मला तुमचा भृत्य जो बली राजपुत्र वीरशर्मा त्याचा आधार सांपडला. मी त्याची दासी होऊन राहिलें. त्यामुळें ब्राह्मण निराश होऊन माझ्या विरहानें अतिशय व्याकुळ झाला. तो दुर्बुद्धि वाळून कृश झाला. देवि, माझें रक्षण करावयास प्रवृत्त झालेल्या वीरशर्मा राजपुत्रानें त्या ब्राह्मणाला बांधून ठेवण्याचा विचार चालविला; पण मी त्याचें निवारण केलें. आज जरूरीच्या कामाकरितां मी बाहेर पडलें असतां, दैववशात् त्या निर्दयाच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर तो तरवार उपसून माझ्या मागें लागला. तेव्हां जिवाच्या आशेनें मी पळूं लागलें, इतक्यांत मला या अंतःपुराचा दरवाजा दिसला. यांत शिरल्यास माझे प्राण वांचतील असें वाटल्यामुळें मी आंत येऊं लागलें. माझ्या वरील कठिण प्रसंग जाणून दयार्द्र चित्ताच्या प्रतीहारीनेंही मला आंत सोडलें आणि त्या कारणानें मी या पायांपाशीं येऊं शकलें. मला वाटतें, कीं तो दुष्ट दारावर अजून उभा असेल.'

तें ऐकतांच नरवाहनदत्तानें त्याला आंत आणविलें. त्यावेळीं त्याचे डोळे क्रोधानें लालभडक झाले होते, तो क्रूरदृष्टीनें अशोकमालेकडे पहात होता, त्यानें नागवी तलवार हातांत घेतली होती, व कोपामुळें त्याचें शरीर कांपत होतें. त्याच्या रागिट मुद्रेकडे पाहून नरवाहनदत्त म्हणाला,–' अरे अधम ब्राह्मणा, तूं या स्त्रीचा वध काय म्हणून करतोस, व तिच्याकरितां दुसऱ्यांचीं घरेंही जाळतोस याचा अर्थ काय ? असा पापकारी तूं कां झाला आहेस ?' तें ऐकून हटशर्मा युवराजास म्हणाला,– 'ही माझी धर्मपत्नी आहे; पण ही मला सोडून अन्य पुरुषाकडे जाते, तेव्हां तें मला कसें बरें सहन होईल ?'

## शापनिवृत्ति.

त्या नीचाचें हें भाषण ऐकतांच मनामध्यें अतिशय खिन्न झालेली अशोकमाला म्हणाली,–' लोकपालांनो, सांगा; तुमच्या समक्ष मी जात नसतांना यानें बलात्कारानें विवाह करून मला नेलें कीं नाहीं ? मी तुझ्या येथें रहाणार नाहीं, असें त्याचवेळीं मी याला सांगितलें नव्हतें काय ? ' ती जों इतके शब्द तोंडावाटे काढीत आहे, तों अशी आकाशवाणी झाली कीं,–'ही अशोकमाला म्हणते तें खरें आहे. वस्तुतः ही मानुषी नव्हे. अशोककर म्हणून एक विद्याधरेश्वर आहे. पुत्ररहित असलेल्या त्याला दैवयोगानें एक कन्या झाली. तिचें नांव अशोकमाला. ती आपल्या पित्याच्या येथें प्रत्यहीं वाढूं लागली. योग्यसमयीं ती उपवर झाली, तेव्हां वंशवृद्धीची इच्छा करणारा पिता तिचा विवाह करण्याच्या उद्योगास लागला, पण अतिरूपाच्या अभिमानानें तिला कोणताच वर पसंत पडेना. तेव्हां तिचा हट्ट पाहून क्रुद्ध झालेल्या अशोककरानें 'मनुष्य योनींत पड, तेथेंही तुझें हेंच नांव ठेवतील, व एक कुरूप ब्राह्मण तुझ्याशीं बलात्कारानें विवाह करील; पण तूं त्याला सोडून त्याच्याच भीतीनें दुसऱ्या तीन पतींजवळ जाशील, त्यांच्यापाशींही तुला फारवेळ थारा मिळणार नाहीं. शेवटीं तूं एका बलाढ्य राजपुत्राची दासी होशील; पण त्या स्थितींतही एकदां तो ब्राह्मण तुला गांठून मारावयास धांवेल. त्यावेळीं राज-मंदिरांत शिरून युवराजाला आपलें सर्व वर्तमान सांगितल्यावर तूं शापमुक्त होशील. त्या शापाप्रमाणें मानुषी झालेली ही विद्याधरी आहे. आतां ही शापमुक्त होऊन आपल्या

मूळ शरीरांत प्रवेश करील, व हिचा अभिरुचित् नांवाच्या विद्याधरेशाशीं विवाह होईल; व त्याच्यापाशीं ही आतां सुखानें राहील.'

इतकें सांगून आकाशवाणी बंद झाली असतां, अशोकमाला एकाएकीं मरून पडली. तिची ती दशा पहातांच अलंकारवती, नरवाहनदत्त व त्याचे सचिव यांच्या नेत्रांत अश्रू आले. पण तो ब्राह्मण अतिशय आनंदित झाला. तेव्हां तेथल्या सर्वांनीं त्याला आनंदाचें कारण विचारलें. तेव्हां तो म्हणाला,–'मला यावेळीं पूर्व जन्माचें स्मरण झालें आहे. माझें पूर्ववृत्त ऐका. हिमालयावर मदनपुर या नांवाचें एक सर्वोत्तम पुर आहे. त्यांत प्रलंबभुज विद्याधरेश रहातो. त्याला स्थूलभुज पुत्र झाला. तो कल्याणलक्षणसंपन्न राजपुत्र क्रमानें तरुण झाला. इतक्यांत सुरभिवत्स या नांवाचा विद्याधरपति स्वतः कन्येसह त्याच्या येथें येऊन प्रलंबभुजाला म्हणाला, 'मी आपली ही सुरभिदत्ता कन्या तुझ्या स्थूलभुज पुत्राला दिली आहे. तो गुणी हिचा स्वीकार करो.' तेव्हां त्या गोष्टीला आपली संमति देऊन प्रलंबभुजानें पुत्राला बोलाविलें, व त्याला तिचें पाणिग्रहण करावयास सांगितलें. पण रूपदर्पानें मत्त झालेला स्थूलभुज पित्याला म्हणाला, 'बाबा, मी हिच्याशीं विवाह करणार नाहीं. कारण ही रूपानें मध्यम आहे.'

पुत्राचें हें भाषण ऐकून पिता म्हणाला, 'वत्सा, अगदीं उत्तम रूप घेऊन काय करावयाचें आहे? महाकुलांत उत्पन्न झालेली हीच मान्य आहे असें मला वाटतें. कारण तिच्या पित्यानें आपण होऊन घरीं येऊन ही तुला दिली आहे व तुझ्यासाठीं मीही तिचा अंगीकार केला आहे. तेव्हां उगीच कांहीं तरी हट्ट धरून बसून आमचा मनोरथ विफल करणें तुला उचित नव्हे.' पण आपल्या पूज्य पित्याचें तें मान्य वचनही त्या उद्धट पुत्रानें ऐकलें नाहीं. तेव्हां प्रलंबभुजाला मोठा क्रोध आला, व त्यानें त्याला असा शाप दिला कीं, 'रूपाच्या अभिमानानें तूं या साध्वीचा तिरस्कार करीत आहेस; पण त्याचें फल भोगण्याकरितां तूं मानुष योनींत कुरूप ब्राह्मण निर्माण होशील. तेथें तूं शापामुळेंच मानुष योनींत उत्पन्न झालेल्या व तुझ्याशीं विवाह करण्याची इच्छा न करणाऱ्या अशोकमालेशीं विवाह करशील, पण ती तुला सोडून वारंवार अन्य पुरुषाचे ठायीं आसक्त होते असें पाहून, तुला अतिशय दुःख होईल. त्वेषानें घरें जाळणें, स्त्रीवध

करावयास तयार होणें, इत्यादि पातकें करशील व संतापानें आंतल्या आंत जळून जाशील.'

याप्रमाणें उग्र शाप देऊन प्रलंबभुज स्वस्थ बसला असतां, साध्वी सुरभिदत्ता रडूं लागली. तिनें भावी श्वशुराचे पाय धरले, व-'प्रभो, मलाही असाच शाप द्या. आम्हीं दोघेंही एकत्र राहूं असें करा. माझ्या अपराधाचा दुष्परिणाम एकट्या माझ्या पतीलाच भोगावयास लागूं नये.' असें मोठ्या नम्रपणें व प्रेमानें म्हटलें. तें ऐकून त्या विद्याधरेशाचें हृदय द्रवलें, व त्यानें तिच्याकरितां असा शापांत ठरविला कीं, अशोकमाला जेव्हां शापमुक्त होईल तेव्हां यालाही आपल्या पूर्वजन्माचें स्मरण होईल, व हा तत्काल शापमुक्त होऊन आपल्या या शरीरास प्राप्त होतांच, सुरभिदत्तेशीं विवाह करील व त्यानंतर हीं दोघेंही परम सुख पावतील. हा उच्छाप ऐकून सुरभिदत्तेला कांहींसें धैर्य आलें. राजन्, तो स्थूलभुजच मी आहें. अहंकारामुळें मला फार दुःख भोगावें लागलें. दृष्ट अथवा अदृष्ट गुणांविषयीं अभिमान बाळगणाऱ्या पुरुषांचें कल्याण कसें * होणार ? असो. असें सांगून हठशर्म्यानें आपलें शरीर सोडलें, व तो विद्याधर कुमार झाला. त्यानें तत्काल आपल्या विद्याप्रभावानें अशोकमालेचें व आपलें मृतशरीर गंगेत नेऊन टाकलें, व अलंकारवतीचें अंतःपुर गंगाजलानेंच धुवून पवित्र केलें. नंतर भावी प्रभु नरवाहनदत्ताला प्रणाम करून तो स्वकार्यसिद्धीकरितां आकाशांत उडून गेला.

## ३. अनंगरतीची कथा.

हा चमत्कार पाहून सर्व विस्मित झाले असतां, गोमुख अनंगरतीची कथा सांगूं लागला. 'भूलोकीं शूरपुर म्हणून एक नगर आहे, त्यांत महावराह म्हणून एक अति मत्त राजा होता. गौरीची उत्तम आराधना केल्यामुळें पद्मरति राणीच्या ठायीं त्याला एक कन्या झाली. राजानें तिचें अनंगरति असें नांव ठेविलें. त्याला तेंच एक अपत्य होतें. कांहीं वर्षांनीं ती तरुण झाली, पण तिला आपल्या रूपाचा मोठा अभिमान वाटत असल्यामुळें, पुष्कळ राजे मागणी करीत असतांनाही तिनें विवाह करण्याचें नाकारलें. ती आपल्या बापाला

* पुंसामदृष्टे दृष्टे वा श्रेयोऽहंकारिणां कुतः ।

म्हणाली,—'बाबा, जो शूर, रूपवान् व अतिशय ज्ञानी असेल त्याच्या-शींच मी विवाह करीन.' महावराहानेंही कन्येच्या त्या म्हणण्यास आपलें अनुमोदन दिलें.

कांहीं दिवसांनीं दक्षिण देशचे चार वीर तेथें आले. त्यांना राज-कन्येचा निश्चय कळला. तिला इष्ट असलेले गुण त्यांच्यामध्यें होते, म्हणून तिला प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनें ते राजद्वारीं गेले. द्वार-पालांनीं राजाला कळवून त्याच्या आज्ञेनें त्यांना आंत नेलें. ते प्रणाम करून उचित स्थानीं बसले; तेव्हां महावराह राजा अनंगरति संनिध असतांना त्यांना म्हणाला,—'वीरहो, तुमचें नांव काय, तुम्ही कोणाचे कोण? तुमची जाति कोणती, व विज्ञान किती आहे?' तेव्हां त्यांतील एक म्हणाला,—'पंचपट्टिक या नांवाचा मी शूद्र आहें. मी प्रत्यहीं वस्त्रांचे पांच जोडे विणतों, त्यांतील एक ब्राह्मणांना देतों, दुसरा परमे-श्वराला अर्पण करतों, तिसरा जोडा स्वतः नेसतों, चवथा मला भार्या मिळाली म्हणजे तिला देण्याचा मी निश्चय केला आहे, व पांचवा वस्त्रांचा जोडा विकून मी आपला निर्वाह करितों.' दुसरा म्हणाला,—'राजन्, मी भाषाज्ञ नांवाचा वैश्य आहें; मी सर्व पशु व पक्षी यांची भाषा जाणतों.' तिसरा दाक्षिणात्य म्हणाला,—'मी खड्ग-धर या नांवाचा क्षत्रिय आहें. मी केवळ खड्गयुद्धावर आपला निर्वाह करतों' चवथा म्हणाला,—'भूपाला, मी जीवदत्त या नांवाचा ब्राह्मण आहें. गौरीचा प्रसाद व विद्या यांच्या योगानें मी मेलेल्या स्त्रीला जिवंत करितों.'

याप्रमाणें प्रत्येकानें आपापले गुण सांगितले, व त्यांतील तिघां ब्राह्मणे-तरांनीं रूप, शौर्य व बल यांची प्रशंसा केली; पण ब्राह्मणानें रूपावांचून बल व वीर्य या दोन गुणांचीच स्तुति केली. तेव्हां राजा आपल्या भृत्यास म्हणाला,—'बरें आहे, तूर्त तूं यांना विश्रांति घेण्याकरितां योग्य स्थानीं ने.' राजाच्या आज्ञेप्रमाणें प्रतीहार त्या चौघांना घेऊन गेला. नंतर एकांत स्थळीं बसलेल्या अनंगरतीला राजा म्हणाला,—'बाळे, तुला या चौघांपैकीं कोणता वीर आवडतो?' त्यावर ती म्हणाली,—'यांतील एकही मला पसंत नाहीं; कारण शूद्र नुसतीं वस्त्रें विणणार, तेव्हां त्याला घेऊन काय करावयाचें आहे? पशुपक्ष्यांचे शब्द जाणणाऱ्या वैश्याचा तरी व्यवहारांत कितीसा उपयोग होणार? शिवाय मी क्षत्रिय असून

त्यांच्याशीं विवाह कसा करूं ? तिसरा क्षत्रिय समानवर्णाचा व गुणी आहे, हें खरें; पण तो दरिद्री आहे. त्यामुळें त्याला सेवा करून शरीरयात्रा चालवावी लागते. म्हणजे तो प्राण विकणारा झाला. तेव्हां मी राजकन्या असतांना, त्याची भार्या कशी होऊं ? चवथा जीवदत्त ब्राह्मणही कुरूप, निषिद्ध कर्म करणारा, वेदविद्यारहित व त्यामुळेंच पतित असल्यामुळें मला मान्य नाहीं. तो मूर्ख तुझ्या दंडास पात्र आहे, तेव्हां असल्या दंड्य पाप्याला माझें दान करण्याची तूं कशी इच्छा करीत आहेस ? बाबा, तूं वर्णाश्रमधर्मांचा रक्षक ना ? खड्गशूर राजाहून धर्मशूर राजा अधिक प्रशस्त आहे. कारण धर्मशूर हजारों खड्गशूरांचा स्वामी* होतो. असो;

याप्रमाणें बोलणाऱ्या अनंगरतीला अंतःपुरांत जावयास सांगून, महावराह राजा स्नानादि करावयास उठला. दुसऱ्या दिवशीं ते चार वीर राजभृत्याच्या घरांतून निघून, त्या नगरांत मोठया कौतुकानें फिरूं लागले. तों पद्मकवल या नांवाचा एक मत्त हत्ती स्तंभ तोडून लोकांस मारीत गजशाळेंतून बाहेर पडला. दाक्षिणात्य वीरही त्याचवेळीं त्या मार्गानें जात होते. त्यांना पाहून तो मत्त गज त्यांच्यावरच धांवून येऊं लागला. तेव्हां स्वसंरक्षणाकरितां त्या चौघांनींही आपापलीं हत्यारें उपसलीं, पण त्यांतील वीर खड्गधर, इतरांचें निवारण करून त्या हत्तीवर चालला. जवळ पोंचतांच पुढें पसरलेली त्याची सोंड त्या क्षत्रियानें एकाच घावानें तोडली, व मोठी चपलता दाखवून त्याच्या पायांतून तो पार निघून गेला, व त्यानें त्याच्या पाठीवर वार केला. पुनः एका लांब हाताच्या वारानें त्या महागजाचे पाय तोडले. तेव्हां चीत्कार करून तो मत्त हत्ती भूमीवर पडला. खड्गधराचा तो विलक्षण पराक्रम पाहून नगरांतील लोक चकित झाले. राजा महावराहालाही तो वृत्तांत ऐकून चमत्कार वाटला.

दुसऱ्या दिवशीं राजा गजावर बसून अरण्यांत मृगया करावयास गेला. खड्गधरादि चार वीरही त्याच्या बरोबर होते. घोर अरण्यांत शिरून राजा व्याघ्र, रानडुकर, इत्यादिकांस मारूं लागला असतां, हत्तींचा शब्द ऐकून

* खड्गशूराच्च नृपतेर्धर्मशूरः प्रशस्यते ।
खड्गशूरसहस्राणां धर्मशूरो भवेत्पतिः ॥

रागावलेले सिंह चोहोंकडून त्याच्या अंगावर धांवले. तेव्हां वेगानें अगदीं समीप आलेल्या त्यांतील एका सिंहाला खड्गधरानें एकाच तीक्ष्ण खड्गप्रहारानें दोन तुकडे करून पाडलें. दुसऱ्याचे मागचे पाय डाव्या हातानें धरून गरगर फिरवून भूमीवर हापटून मारलें, व इतर तिघांनींही एकेका सिंहाला मारलें.

याप्रमाणें राजाच्या समक्ष त्या पादचारी वीरांनीं पुष्कळ पशू सहज मारले. नंतर मृगया करून थकलेला, पण त्यांचा पराक्रम पाहून विस्मित व संतुष्ट झालेला राजा आपल्या राजधानीस परत आला. ते चौघे वीरही राजमंदिरापर्यंत त्याच्या बरोबर परत आले व प्रभु अंतः-पुरांत शिरला असतां आपल्या बिऱ्हाडीं गेले. महावराह जरी अगदीं थकून आला होता, तरी आंत जातांच त्यानें अगोदर त्या चौघां वीरांचें प्रत्यक्ष पाहिलेलें शौर्य आपल्या कन्येला सांगितलें. आणि म्हणाला,–' बाळे, शूद्र, वैश्य व निषिद्ध कर्म करणारा ब्राह्मण, यांतील जरी कोणी तुला आवडला नाहीं, तरी क्षत्रिय व शूर खड्गधर तुला योग्य वर आहे असें मला वाटतें. कारण तो सुस्वरूप, बांधेसूद, उंच व महापराक्रमी आहे. सिंहांनाही पायांखालीं चुरडून टाकणाऱ्या हत्तीला कालच त्यानें मारलें. आज सिंहांना भूमीवर हापटून भराभर मारणाऱ्या त्याचें अंग-सामर्थ्य मी प्रत्यक्ष पाहिलें. आतां तो दरिद्री व सेवक आहे म्हणून म्हणशील व तोच दोष तुला खपत नसेल, तर मी त्याला एका क्षणांत इतरांचा धनी करतों, व तूं त्याला वर.'

पित्याचें हें म्हणणें लक्ष्यपूर्वक ऐकून घेऊन अनंगरति त्याला म्हणाली, ' बाबा, असें जर असेल तर त्या सर्वांना सभेंत आणून जोशाला विचारा, तो काय म्हणतो तें पाहूं या. ' कन्येच्या इच्छेप्रमाणें राजानें भोजनोत्तर त्या वीरांस आणविलें. व त्यांच्या समक्ष तो गणकांस म्हणाला, 'या चौघां-तील कोणत्या वीराशीं अनंगरतीचा ग्रहयोग जमतो तो पहा. व विवाहाला शुभ मुहूर्तही ठरवा. ' राजाची अशी आज्ञा होतांच त्यांतील उत्तम जोति-र्विदानें सर्वांचीं नक्षत्रें विचारून घेतलीं, व पुष्कळ वेळ गणित करून तो राजास म्हणाला, ' प्रभो, आपण जर रागावत नसाल तर मी स्पष्ट सांगतों, कीं यांतील एकाशींही राजकन्येचे ग्रह जमत नाहींत. ही शापा-मुळें मानुषी झालेली विद्याधरी आहे. हिचा शाप तीन महिन्यांनीं निवृत्त

होईल. यास्तव तोंपर्यंत यांना येथें राहूं दे. शापमुक्त झाल्यावरही जर ही आपल्या लोकाला गेली नाहीं, तर तिचा विवाह यांच्यापैकीं कोणा एकाशीं होईल.'

जोशाच्या या सांगण्यावर सर्वांनीं विश्वास ठेवला. ते वीरही तेथें राहिले. तीन महिने संपतांच राजानें ते चार दाक्षिणात्य, तो गणक व आपली कन्या-अनंगरति यांस आपल्या सभेंत आणविलें. त्या वेळीं तिचें सौंदर्य पहिल्यापेक्षां फारच रमणीय दिसत होतें. तें पाहून महावराह राजा अतिशय आनंदित झाला, व हिच्या शापान्ताची वेळ अगदीं जवळ आली आहे असें समजून, शांतचित्तानें बसलेल्या गणकाला म्हणाला, 'तुझ्या सांगण्याप्रमाणें तीन महिने तर होऊन गेले. आतां काय करावें तें सांग.' पण राजाच्या तोंडून जों इतके शब्द निघत आहेत, तों अनंगरतीला पूर्व जन्माचें स्मरण झालें. तिनें उत्तरीय वस्त्रानें आपलें मुख झांकून घेतलें, व प्राण सोडले. पण ही अशी कां राहिली आहे असें म्हणून, राजा जों तिच्या तोंडावरील पदर काढून पहातो तों ती मेली आहे, असें त्याला समजलें. तिचे डोळे पांढरें होऊन बुबुळें फिरलीं, व तोंड अगदीं निस्तेज झालें. तें पहातांच राजालाही असह्य दुःखावेगामुळें मूर्च्छा आली. पद्मरति राणीनेंही दुःखाघाताला भिऊन पतीचेंच अनुकरण केलें. राजाचे सर्व परिजन हाय हाय करूं लागले, त्यांच्या आक्रोशानें राजमंदिर भरून गेलें. दाक्षिणात्य वीरही दुःखित झाले. कांहीं वेळानें दुःखाचा आवेग कमी होतांच राजा सावध झाला, व जीवदत्ताला म्हणाला,-'याप्रसंगीं दुसऱ्या कोणाचेंही शहाणपण येथें चालण्यासारखें नाहीं, यास्तव आतां तूंच आपल्या बलाचा उपयोग कर. 'मृत स्त्रीला मी जिवंत करतों,' असें तूं पहिल्या भेटीच्या वेळीं मला सांगितलें होतेंस, तें खरें करून दाखीव. आपल्या विद्यासामर्थ्यानें हिला उठीव, म्हणजे जिवंत झालेली ही मी तुलाच देऊन टाकीन.'

राजाचें हें अनुकूल वचन ऐकून जीवदत्तानें मंत्रविलेलें जल त्या राजकन्येच्या अंगावर शिंपडलें, व 'अट्टहासानें हंसणारे व गळयांत नरमुंडमाला घालून भूषित झालेले विक्राळ चामुंडे, मला सत्वर सहाय कर' असें म्हटलें. पण जीवदत्ताच्या या प्रयत्नाला यश आलें नाहीं, त्यामुळें तो ब्राह्मण खिन्न झाला, आणि 'विंध्यवासिनीनें दिलेली विद्या निष्फल

झाली. तेव्हां आतां उपहासास कारण होणारें हें जीवित ठेवून काय करावयाचें आहे?' असें म्हणून त्यानें आपलें मस्तक कापून घेण्याकरितां तरवार उपसली. इतक्यांत अशी आकाशवाणी झाली, कीं-'जीवदत्ता, असें साहस करूं नकोस. ही अनंगप्रभा या नांवाची विद्याधरकन्या होती; पण आईबापांच्या शापामुळें तिला इतके दिवस मनुष्य-लोकीं रहावें लागलें. आतां ती आपल्या मूळ शरीरास प्राप्त झाली आहे. यास्तव तूं विंध्यवासिनीपाशीं जाऊन पुनः तिचें आराधन कर, म्हणजे तिच्या प्रसादानें तुला ही प्राप्त होईल. दिव्य भोग भोगावयास गेलेल्या हिच्याविषयीं राजालाही शोक करणें उचित नव्हे.'

इतकें सांगून आकाशवाणी शांत झाली असतां, राजानें शोकाचा त्याग केला. कन्येच्या मृत शरीराचा अंत्य संस्कार उरकून टाकला, तीन वीर आपापल्या इष्ट स्थळीं गेले, व जीवदत्त मोठ्या आशेनें विंध्यवासिनी-जवळ जाऊन तपश्चर्येच्या योगानें तिची आराधना करूं लागला. कांहीं दिवसांनीं त्या देवीनें त्याला स्वप्नांत सांगितलें कीं,-"वत्सा, मी तुझ्या या आराधनेनें अतिशय संतुष्ट झालें आहें, आतां मी सांगतें तें तूं ऐक. हिमालयावर वीरपुर नगर आहे. त्यांत समर या नांवाचा विद्याधरेश रहात असतो. त्याच्या अनंगवती देवीच्या ठायीं ही अनंगप्रभा कन्या झाली; पण रूप व तारुण्य यांविषयीं अति गर्व वहाणाऱ्या तिला कोणताच पति आवडेना, तेव्हां तिच्या दुराग्रहामुळें चिडलेल्या तिच्या आईबापांनीं तिला असा शाप दिला,-मूर्खे, मानुषयोनींत जा, पण तेथेंही पतिसुख न भोगतां, सोळाव्या वर्षीं तें शरीर सोडून तूं आपल्या शरीरांत परत येशील. खड्गसिद्ध या नांवाचा एक वीर, मुनिकन्येचा अभिलाष करून शाप झाल्यामुळें कुरूप मनुष्य झाला आहे, तो तुझी इच्छा नसली तरी तुला मर्त्यलोकीं घेऊन जाईल, पण तेथूनही तुला दुसराच कोणी उपटून नेईल, व त्यामुळें त्याला मोठें विरहदुःख भोगावें लागेल, पूर्व-जन्मीं त्यानें आठ परस्त्रियांचें हरण केलें होतें; यास्तव त्या तुझ्या पतीला आठ जन्म घेऊन भोगावें लागणारें दुःख याच जन्मीं अनुभवावें लागेल. विद्यारहित होऊन मनुष्ययोनींत उत्पन्न झालेल्या तुलाही एकाच जन्मांत आठ जन्मांचें दुःख भोगावें लागेल. पाप्याशीं संपर्क केला असतां, पाप फलाचाच अनुभव घ्यावा लागतो. पापी भर्त्यांचा

संगम स्त्रियांनाही तितकेंच पाप लावतो.* तूं उचित वराचा द्वेष करून, शिवाय त्याविषयींच आग्रह धरून बसली आहेस नव्हे ! मूर्खे, या दुष्कृत्याचें फल भोग. तुझी सर्व स्मृति नष्ट होईल. तुला अनेक मानुष पति होतील. तुला अनुरूप असलेल्या आकाशचर मदनप्रभानें तुझ्याविषयीं मागणी केली होती. तो मनुष्य लोकीं राजा होईल व तुझें सर्व पाप फल भोगून संपलें, म्हणजे शेवटीं तो तुला वरील. त्यानंतर तूं शापमुक्त होऊन पुनः आपल्या लोकास येशील व मानुष शरीर सोडून आकाशचर झालेला तोच उचित पुरुष तुझा येथें पति होईल."

ह्या शापाप्रमाणें भूलोकीं अनंगरति होऊन, आतां शापमुक्त झालेली ती अनंगप्रभा आपल्या आईबापांकडे गेली आहे. यास्तव तूं आतां हें माझें खड्ग घेऊन वीरपुरास जा. तिच्या अजिंक्य पित्याला याच्या प्रभावानें जिंक, व तिच्याशीं विवाह कर. तूं हें खड्ग आपल्या हातांत घेतलेंस म्हणजे तुला आकाशांतूनही हवें तेथें जातां येईल, असें सांगून ती विंध्यवासीनी गुप्त झाली, व जीवदत्त जागा झाला. त्यानें आपल्या हातांत असलेलें दिव्य खड्ग पाहिलें व त्यामुळें स्वप्नावर त्याचा पूर्ण विश्वास बसला. लागलाच तो देवीला नमस्कार करून आकाशांत उडून गेला. थोड्याच वेळांत हिमालयावरील वीरपुरांत जाऊन त्यानें श्वशुराला जिंकलें, व पराभवानंतर त्यानें होऊन दिलेल्या अनंगप्रभेशीं विवाह करून जीवदत्तानें दिव्य भोग भोगले. त्यानंतर कांहीं काल तेथें राहून तो आपल्या समर नांवाच्या श्वशुराला व प्रियेला म्हणाला,—' आम्हीं आतां मनुष्य लोकास जाऊं या. कारण मला तिकडे जाण्याची फार उत्कंठा लागली आहे. प्राण्यांना आपली निकृष्ट जन्मभूमीही फार प्रिय असते.‡ '

जामाताच्या या म्हणण्यास श्वशुरानें रुकार दिला; पण अनंगप्रभेनें मोठ्या कष्टानें ती गोष्ट कबूल केली. कारण तिला पुढें काय होणार तें ठाऊक होतें. तथापि तो तिला मांडीवर बसवून आकाशमार्गानें मर्त्य-

* सर्वस्यैव हि पापिष्ठसंसर्गः पापभागदः ।
समपापः पुनः स्त्रीणां भर्त्रा पापेन संगमः ॥

‡ प्राणिनां हि निकृष्टाऽपि जन्मभूमिः परा प्रिया ॥

लोकास यावयास निघाला. कांहीं वेळानें श्रांत झालेली त्याची प्रिया खालीं एक रम्य पर्वत पाहून पतीला म्हणाली,–' या पर्वतावर थोडी विश्रांति घ्या ' त्याबरोबर प्रियेचें म्हणणें मान्य करून जीवदत्त खालीं उतरला, व नानाप्रकारच्या विद्याप्रभावानें प्राप्त झालेल्या भक्ष्य व भोज्य पदार्थांच्या योगानें त्या दोघांनींही जठराग्नीस तृप्त करून घेतलें. त्यानंतर दैवानें प्रेरणा केल्यामुळें तो ब्राह्मण तिला गावयास सांगूं लागला. तिनेंही पतीची आज्ञा मान्य करून शंकराचीं भक्तिरस-प्रचुर पद्यें मधुर स्वरानें म्हटलीं. तिचें उत्तम गायन ऐकतां ऐकतांच त्याला झोंप लागली. इतक्यांत मृगया करून थकलेला हरिवर राजा, जलाचा शोध करीत त्याच मार्गानें आला. तिच्या गाण्याचा मंजुळ ध्वनि त्याच्या कानीं पडला. त्याबरोबर रथांतून उतरून तो एकटाच जिकडून गानस्वर येत होता तिकडे चालला. त्यावेळीं पक्षी त्याला शुभ सुचवूं लागले. थोड्या अंतरावर जातांच साक्षात् मदनाची प्रभाच अशी ती अनंगप्रभा त्याच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर तिचें गायन व रूप यांच्या योगानें निराधार झालेल्या त्याच्या हृदयांत काम यथेच्छ शर-प्रहार करूं लागला. त्या सुंदर राजाला पहातांच तीही परवश झाली, व मनांत म्हणाली,–' हा कोण ? पुष्प धनुष्याचा त्याग करून मजपुढें आलेला प्रत्यक्ष मदन आहे, कीं माझें गायन ऐकून प्रसन्न झालेल्या त्या शंकराचा मूर्तिमान् प्रसाद आहे ?' असा क्षणभर विचार करून ती त्या राजास म्हणाली,–' तूं कोण, व या अरण्यांत कां आलास ?' त्यावर आपला वृत्तांत सांगून तो तिला उलट म्हणाला,–'सुंदरि, तूं कोण आहेस, व हा निजलेला पुरुष कोण ?' राजाचा हा प्रश्न ऐकतांच अनंगप्रभेनें थोडक्यांत सांगितलें:—

'मी विद्याधरी असून हा खड्गसिद्ध माझा पति आहे. पण मी तुला पहातांच सप्रेम झालें आहें. यास्तव चल, हा उठण्याच्या पूर्वीं आपण येथून निघून जाऊं या. तुझ्या नगरास जाऊन पोंचल्यावर मी आपला सविस्तर वृत्तांत सांगेन.'

हें तिचें अनुकूल भाषण ऐकून राजा हरिवराला त्रैलोक्याचें राज्यच मिळालें आहे, असें वाटलें. तो अतिशय आनंदित झाला. ' या राजाला आपल्या अंकावर घेऊन आकाशमार्गानें याच्या नगरास जावें ' असें जों ती मनांत आणीत आहे, तों पति-द्रोहामुळें तिच्या विद्या नष्ट

झाल्या. त्यामुळें तिला पित्याच्या शापाचें स्मरण झालें, व ती एकाएकीं अतिशय खिन्न झाली. हें पाहून व खेदाचें कारण विचारून घेऊन राजा म्हणाला, 'प्रिये, विषाद करीत बसण्याचा हा काळ नव्हे. इतक्यांत हा जागा होईल. या सर्व गोष्टी दैवाधीन आहेत. चल आपण सत्वर जाऊं या.' इतकें बोलून व तिला घेऊन तो वेगानें आपल्या रथावर जाऊन बसला, आणि मनोवेगानें चालणाऱ्या त्या यानांतून परिजनासह तो आपल्या नगरास पोंचला. मृगया करावयास गेलेला आपला पालक एक रमणीय स्त्री घेऊन परत आला आहे असें पाहून, त्याचे प्रजाजन विस्मित झाले. राज-मंदिरांत गेल्यावर हरिवर तिच्यासह दिव्य सुखाचा अनुभव घेत आनंदानें राहिला. अनंगप्रभेचेंही त्याच्यावर अतिशय प्रेम जडलें. शापामुळें मोहित झालेली ती आपला सर्व प्रभाव विसरली.

इकडे पर्वतावर निजलेला जीवदत्त जागा झाला; पण त्याची प्रिया त्याला तेथें कोठें दिसली नाहीं. देवीनें दिलेलें खड्गही नाहींसें झालें होतें. तेव्हां तो व्याकुल होऊन अनेक तर्क करूं लागला. ती कपटी विद्याधरीच तर माझें उत्तम खड्ग घेऊन गेली नसेल ? अथवा दुसऱ्याच कोणी बलाढ्यानें मी निजलों आहे असें पाहून, त्या दोघांनांही पळवून नेलें असावें ! अशा आणखी अनेक कल्पना करीत कामाग्नीनें संतप्त झालेला तो तीन दिवस कांहीं न खातां न पितां त्या पर्वतावर तिला हुडकीत राहिला; पण त्याला ती सांपडली नाहीं. तेव्हां अतिशय खिन्न होऊन तो ब्राह्मण, पर्वतावरून खालीं उतरला, व तेथील अरण्यांत कोठें तरी तिचा थोडासा सुगावा लागेल, या आशेनें आणखी दहा दिवस शोधीत राहिला. पण त्या दुर्भाग्याला तिचें पाऊलही भूमीवर कोठें उठलेलें आढळलें नाहीं. शेवटीं तो अतिशय दुःखी होऊन 'अरे दुर्दैवा, मोठ्या संकटानें मिळविलेल्या अनंगप्रभेसह माझ्या खड्गसिद्धीलाही तूं हरण करून नेलेंस काय ?' असें म्हणत व रडत तेरा दिवस उपाशीं असलेला तो एका गांवांत गेला, व तेथील एका संपन्न ब्राह्मणाच्या भव्य घरांत शिरला. त्यांतील गृहिणी मोठी सात्त्विक, तेजस्विनी व सुंदर वेषवती होती. तिचें नांव प्रियदत्ता असें होतें. तिनें त्या ब्राह्मणाला बसावयास आसन देऊन 'या, बसा' असें मंजुळ वाणीनें म्हटलें,

व लागलीच ती आपल्या चेटींना म्हणाली,–' या जीवदत्ताचे सत्वर पाय धुवा, प्रियाविरहामुळें दुःखी झालेला हा आज तेरा दिवसांचा उपाशी आहे, याला सत्वर जेवावयास घाला.'

त्या साध्वीचे हे शब्द कानीं पडतांच जीवदत्त विस्मित झाला. 'माझी अनंगप्रिया येथें तर आली नसेल ? कीं ही कोणी सिद्ध योगिनी आहे ?' असा मनांत विचार करीत त्यानें अगोदर पाय धुवून जेवण केलें, व नंतर प्रियदत्तेपुढें नम्र होऊन दीनवाणीनें तो म्हणाला,–' माते, मला या दोन प्रश्नांचे उत्तर दे, (१) माझा हा वृत्तांत तुला कसा समजला ? व (२) माझी प्रिया व खड्ग कोठें आहे ?' तें ऐकून ती महापतिव्रता म्हणाली, ब्राह्मणा, माझ्या चित्तांत माझ्या पतीवांचून दुसऱ्या कोणत्याही पुरुषास स्वप्नांतही अवकाश मिळत नाहीं; कारण मी इतर सर्व पुरुषांस बाप व भाऊ यांसारखे पहातें. माझ्या घरीं आलेला कोणताही अतिथि पूजेवांचून विमुख जात नाहीं. या परम धर्माच्या प्रभावानें मला त्रिकालज्ञान झालें आहे. तुझ्या अनंगप्रभेला हरिवरराजानें नेलें. तो हरिवर पुरांतच रहातो. प्रियेचें गाणें ऐकतां ऐकतां तूं निजलास, व तें ऐकून मोहित झालेला तो राजा तेथें आला, आणि तुझ्या पत्नीला रथांत बसवून आपल्या राजधानीस घेऊन गेला. आतां ती तुला प्राप्त होणार नाहीं, कारण तो राजा महाबलाढ्य आहे. पण ती कुलटा त्यालाही सोडून जाईल. देवीनें तुला आपलें खड्ग तिची प्राप्ति करून घेण्याकरितां दिलें होतें. त्यानें आपलें काम केलें; पण तुझ्या स्त्रीला दुसऱ्यानेंच हरण केलें, तेव्हां तें, आपल्या स्वामिनीकडे निघून गेलें. देवीनें स्वप्नांत खड्ग देतांना अनंगप्रभेच्या शापादिकांचा वृत्तांत तुला सांगितला होता; तो तूं विसरलास वाटतें. असो; आतां त्या अवश्य होणाऱ्या गोष्टींविषयीं तूं व्यर्थ मोहित होऊं नकोस. वारंवार दुःख देणाऱ्या या पापेचा संबंध सोड. परपुरुषावर अनुरक्त होणाऱ्या त्या पापी स्त्रीला घेऊन तुला काय करावयाचें आहे ? सज्जना, तुझ्याशीं द्रोह करून सामान्य मानुषी झालेली ती आपल्या विद्यांपासूनही भ्रष्ट झाली आहे.

त्या साध्वीनें केलेला उत्तम उपदेश ऐकून जीवदत्त अनंगप्रभेविषयीं अतिशय निराश झाला. तिच्या चापल्याची त्याला ग्लानि आली, व तो त्या पुण्यशील पतिव्रतेला म्हणाला,–' आई, तुझ्या या सत्य व

हित वचनानें माझा मोह नष्ट झाला. पुण्यकर्मे करणारांशीं झालेला समागम कोणाच्या अत्यंत कल्याणाला कारण होत नाहीं* ? पूर्व पापामुळें मला हें दुःख भोगावें लागलें, यास्तव आतां मत्सर सोडून अवशिष्ट पापाचें क्षालन करण्याकरितां मी तीर्थावर जातों. दुष्ट अनंगप्रभेकरितां मला इतरांशीं मत्सर करून काय करावयाचें आहे ? ज्यानें क्रोधाला जिंकलें आहे तो सर्व जगाला जिंकतो.†'

जीवदत्त जों इतकें बोलत आहे, तों प्रियदत्तेचा धार्मिक व अतिथिवत्सल पति घरीं आला. त्यानेंही पुष्कळ आतिथ्य व उपदेश करून त्याचें दुःख घालविलें. नंतर कांहीं वेळ विश्रांति घेऊन त्या उभयतांच्या आज्ञेनें तो तीर्थयात्रेस गेला. पृथ्वींतील अनेक पवित्र तीर्थांचें दर्शन घेत, व भ्रमण करीत असतांना कंद, मूळें व फळें खाऊन देहयात्रा करणाऱ्या त्याला अरण्यादिकांतून पुष्कळ क्लेश झाले. शेवटीं तो विंध्यवासिनीच्या दर्शनार्थ विंध्यारण्यांत आला, व देवीच्यापुढें दर्भासनावर निराहार राहून तीव्र तप करूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याच्या तपानें संतुष्ट झालेली देवी साक्षात् त्याच्यापुढें आली; व म्हणाली,–'वत्सा, ऊठ. पूर्वी तुम्ही चौघे माझे गण गंगेच्या कांठीं एकदां विहार करावयास गेला होतां; तेव्हां तेथें स्नान करीत असलेली चापलेखा तुमच्या दृष्टीस पडली, ती कपिलजट मुनींची कन्या होती. तिला पहातांच तुम्ही सर्व कामातुर झालां, व तिची प्रार्थना करूं लागलां; पण 'मी कन्या आहें,' असें तिनें सांगतांच तिघे गण मुकाट्यानें बसले, व तूं बलात्कारानें तिला धरलेंस, त्याबरोबर 'बाबा, धांवा, माझें रक्षण करा.' असें म्हणत ती मोठ्यानें ओरडूं लागली. तें ऐकून जवळच असलेला तिचा पिता अतिशय रागावून तेथें आला. त्याला पहातांच तूं तिला सोडलेंस. पण–'तुम्ही सर्व पापी गण मनुष्य-योनींत पडा,'–असा त्या तपस्व्यानें चौघांनांही शाप दिला. तो ऐकून तुझे सोबती फार दुःखी झाले, व त्यांनीं त्याची प्रार्थना केली. तेव्हां त्या महाप्रभावशाली मुनीनें असा शापान्त केला कीं, 'तुम्ही सर्व जेव्हां अनंगरतीची इच्छा कराल, तेव्हां ती शापमुक्त होऊन विद्याधरपदास

* कामं न श्रेयसे कस्य संगमः पुण्यकर्मभिः ।

† जितक्रोधेन सर्वं हि जगदेतद्विजीयते ।

गेल्यावर तुम्ही तिथे मुक्त व्हाल, व माझ्या कन्येला प्रत्यक्ष स्पर्श करणारा हा दुष्ट, अनंगप्रभा झालेल्या तिची प्राप्ति करून घेऊनही पुनः तिला हरवील. तिला तिसराच एक उपटून नेईल, व त्यामुळें हा फार दुःखी होईल. याच्यावर अनेक बिकट संकटें येतील, व दीर्घकाल देवीचें आराधन केल्यावर हा शापांतून मुक्त होईल. कारण परस्त्रीला स्पर्श करणें यासारखें घोर पाप यानें केलें आहे.'

या शापप्रमाणें तुम्ही माझे चारी गण दक्षिण देशांत झालांत. पंचपट्टिक भाषाज्ञ, व खड्गधर या नांवाचे तुझे मित्र अनंगरतीच्या मागून कांहीं दिवसांनीं निजधामास प्राप्त झाले. आतां तूंही माझी निष्काम आराधना केली आहेस. त्यामुळें तुझ्या शापाचा अंतही आतां अगदीं समीप आला आहे. आठ जन्म घेऊन भोगावयाचें पाप या जन्मांतच जाळून टाक, ही आग्नेयी धारणा घे, व स्वतनूचा त्याग कर. असें सांगून व धारणा देऊन देवी गुप्त झाली. तेव्हां जीवदत्तानेंही त्या उत्तम धारणेच्या योगानें आपलें पाप व पापी शरीर जाळून टाकलें. याप्रमाणें तो फार दिवसांनीं शापमुक्त झाला. परस्त्रीसंग दोषानें देवांनाही जर असे क्लेश भोगावे लागतात, तर हाय हाय, मनुष्याची काय गति होईल*!

असो; इकडे हरिवर पुरांतील त्याच नांवाच्या राजाच्या अंतःपुरांत अनंगप्रभा मुख्य राणी झाली. आपल्या सुमंत्र–मंत्र्यावर सर्व राज्यभार टाकून राजा अहोरात्र तिच्याठायीं आसक्त होऊन राहूं लागला. एकदां त्या अनंगप्रभामय झालेल्या राजाकडे मध्यदेशांतील लब्धवर या नांवाचा एक नवीन नाटकाचार्य आला. वाद्य व नाट्य यांतील त्याचें कौशल पाहून संतुष्ट झालेल्या राजानें त्याला आपल्या अंतःपुरांत नाट्याचार्य करून ठेवलें, व त्याचा मोठा सन्मान केला. त्याच्या उत्तम शिक्षणाच्या योगानें अनंग-प्रभा नृत्यांत इतकी कुशल झाली कीं, नाचत असतांना ती सवतींचीं मनेंही हरण करीत असे. सहवास व नृत्यशिक्षेची गोडी यांच्या योगानें अनंगप्रभा त्या नाटकाचार्यावर आसक्त झाली. तिचें रूप व नृत्य पाहून हळू हळू तो नाट्याचार्यही कामी झाला. एकदां एकांतांत ती त्याच्यापाशीं गेली,

---

* देवानामप्यहो येन पापेन क्लेश ईदृशः ।
परस्त्रीसंगमोत्थेन ह्यन्येषां तेन का गतिः ॥

व सुरत-क्रीडेनंतर त्याच्यावर फारच प्रसन्न झालेली ती त्याच्या गळ्यांत मिठी मारून त्याला म्हणाली,–'प्रिया, तुजवांचून मी एक क्षणभरही राहूं शकत नाहीं. पण आमचा हा संबंध राजा हरिवराला जर कळला तर तो मुळींच क्षमा करणार नाहीं. यास्तव, त्याला समजणार नाहीं अशा एकाद्या स्थानीं आपण जाऊन राहूं या. राजानें प्रसन्न होऊन दिलेलें धन व वाहनें तुजजवळ आहेत. मजपाशींहि पुष्कळ अमूल्य अलंकार आहेत. त्यावर आपला निर्वाह होईल. यास्तव सुखानें व निर्भयपणें रहातां येईल, अशा एकाद्या स्थानीं आपण जाऊं या.'

प्रियेची ही युक्ति ऐकून नाट्याचार्य अतिशय संतुष्ट झाला. त्यानें तिच्या म्हणण्यास रुकार दिला. तेव्हां अनंगप्रभा पुरुष वेष घेऊन एका अगदीं जिवलग सखीसह लब्धवराच्या येथें गेली. त्याबरोबर त्या नाटक्यानें आपली संपत्ति उंटाच्या पाठीवर लादून, तिच्यासह घोड्यावर बसून तेथून प्रयाण केलें. हर हर! धिःक्कार असो स्त्रियांच्या चापल्याला. पहा ही मूर्ख स्त्री! अगोदर विद्याधरांची संपत्ति सोडून राजलक्ष्मीच्या मागें लागली, व आतां तिचाही त्याग करून एका नटाच्या मागें नाचून मिळविलेल्या धनाचा उपभोग घ्यावयास निघाली! असो. त्या नाटक्याबरोबर फार दूर गेल्यावर ती एका वियोगपुर नांवाच्या नगरास पोंचली, व तेथें तीं दोघेंही मोठ्या आनंदानें राहूं लागलीं.

इकडे ती पळून गेली आहे असें कळतांच, राजा हरिवर शोकानें व्याकुल होऊन प्राण द्यावयास तयार झाला. तेव्हां त्याचा सुमंत्र प्रधान त्याला सांत्वनपूर्वक म्हणाला,–'देव, आपण सर्व जाणतां आहां, तेव्हां मी अधिक काय सांगणार? जी खड्गधर विद्याधर-पतीला सोडून दृष्टादृष्ट होतांच तुमच्या बरोबर यावयास सज्ज झाली, ती कुलटा आपल्यापाशीं तरी स्थिर कशी रहाणार! सद्वस्तूंविषयीं निःस्पृह झालेली ती, हलकट पुरुषाच्या नादीं लागून गेली आहे. खचित नाट्याचार्यानें तिला नेलें असावें. कारण तो या नगरांत कोठें दिसत नाहीं. आज सकाळीं तीं दोघें नाट्यशाळेंत होतीं, असें मी ऐकलें आहे. यास्तव तिच्याविषयीं अधिक खिन्न होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. विलासिनी स्त्रिया अशाच क्षणभर प्रेम करणाऱ्या असतात.'

मंत्र्याच्या या उपदेशामुळें राजाच्या मनांत विचार उत्पन्न झाला. 'हा बुद्धिमान् मंत्री सांगतो तें खरें आहे. विलासिनी स्त्रिया खरोखरच चंचल स्वभावाच्या असतात. संसारस्थिति परिणामीं कष्ट देणारी आहे. आपल्यामध्यें पडलेल्या पुरुषाला बुडविणाऱ्या अगाध नदीप्रमाणें अगाध स्त्रीच्या ठायींही सुज्ञ पुरुष संसक्त होत नाहींत. जे संकटाच्या वेळीं उद्वेगशून्य, ऐश्वर्य मिळालें असतां गर्वशून्य, व कार्यप्रसंगीं भयशून्य असतात, तेच धीर होत. त्यांनींच जगाला जिंकलें आहे.'* असा विचार करून त्यानें शोकाचा त्याग केला; व मंत्र्याच्या सांगण्यास योग्य मान देऊन तो स्वभार्येच्या ठायींच संतुष्ट राहिला.

तिकडे अनंगप्रभाही वियोगपुर नगरांत नाट्याचार्याबरोबर कांहीं दिवस राहिली; पण त्या नाटक्याच्या दुर्दैवानें तिची सुदर्शन नांवाच्या एका तरुण द्यूतकाराशीं मैत्री जमली. त्या अट्टल जुगाऱ्यानें थोड्याच दिवसांत अनंगप्रभेच्या समक्ष लब्धवराला द्यूतांत हरवून त्याचें धन घेतलें. तेव्हां त्या दरिद्री पुरुषाला सोडून अनंगप्रभेनें सुदर्शनाचा आश्रय धरिला. धन व स्त्रीही गेल्यामुळें विरक्त झालेला लब्धवर खरोखर तपस्वी होऊन व जटा धारण करून गंगेच्या कांठीं जाऊन बसला. नव्या नव्या पुरुषाची इच्छा करणारी ती कुलटा सुदर्शन द्यूतकाराशीं संगत होऊन तेथेंच राहिली. एके रात्रीं सुदर्शनाच्या घरीं चोर शिरले, व सर्व धन घेऊन गेले. त्यामुळें अनंगप्रभेला फार दुःख झालें, पण सुदर्शन 'प्रिये, तूं रडूं नकोस. हिरण्यगुप्त या नांवाचा माझा एक महाश्रीमान् मित्र आहे, त्याच्याकडे जाऊन आपण कर्ज काढूं-या, चल.' असें म्हणून तिला घेऊन तो त्याच्या येथें गेला, व तो दुर्दैवी त्याच्यापाशीं ऋण मागूं लागला. हिरण्यगुप्त व अनंगप्रभा एकमेकांस पाहून साभिलाष झालीं. थोडा वेळ विचार करून तो वैश्य, सुदर्शनास मोठ्या आदरानें म्हणाला, 'मित्रा, आज तुम्हीं दोघें येथेंच राहा. माझ्या येथें भोजन करा. उद्यां सकाळीं मी तुला द्रव्य देईन.' त्या दोघांची चंचल वृत्ति, पाहून सुदर्शन म्हणाला, 'मित्रा, मला आज फारशी भूक नाहीं. त्यावर वैश्य म्हणाला,-'बरें

* व्यसनेषु निरुद्वेगा विभवेष्वप्यगर्विताः ।
कार्येष्वकातरा ये च ते धीरास्तैर्जितं जगत् ॥

तर या तुझ्या प्रियेला तरी आज आमच्या घरचा पाहुणचार घेऊं दे. ती येथें प्रथमच आली आहे,' तें ऐकून तो महाधूर्त असूनही द्रव्यलोभानें गप्प बसला. तेव्हां तिला घेऊन हिरण्यगुप्त अंतर्गृहांत गेला, व अकस्मात् आलेल्या तिच्याशीं खान-पान-विलास इत्यादि करून मोठें सुख भोगूं लागला. सुदर्शन, ती बाहेर केव्हां येते म्हणून एकेक क्षण मोजीत पुष्कळ वेळ राहिला. शेवटीं हिरण्यगुप्ताचे भृत्य येऊन त्यास म्हणाले,–'तुझी स्त्री तर जेवण होतांच आपल्या घरीं निघून गेली; मग तूं येथें बसून काय करतोस ? तूंही घरीं जा.' पण तो शठ तें ऐकून घाबरला, व 'ती गेली नाहीं, आंतच आहे; त्या माझ्या भार्येला घेतल्यावांचून मी येथून हालणार नाहीं' असें म्हणूं लागला. पण अनंगप्रभेच्या संमतीनें हिरण्यगुप्तानें आज्ञा केल्या बरोबर, त्याच्या सेवकांनीं त्या जुगाऱ्याला लाथा मारून घरांतून घालवून दिलें.

तेव्हां गत्यंतरच नाहींसें झाल्यामुळें तो बिचारा दुःखी होऊन आपल्या घरीं गेला, व आपल्याशींच विचार करूं लागला कीं, हा हिरण्यगुप्त माझा परम मित्र; पण असें असतांनाही त्यानें माझ्या भार्येला कसें हरण केलें ? अथवा माझ्या पापाचें फळ मला येथल्या येथेंच मिळालें म्हणावयाचें. मी दुसऱ्याशीं जसें आचरण केलें होतें, तसेंच त्यानें माझ्याशीं केलें.* तेव्हां मी त्याच्यावर कशाला रागावूं ! आपल्या कर्मावरच मला रागावलें पाहिजे. मी आतां अगोदर माझ्या कर्मालाच तोडून टाकतों, म्हणजे पुनः माझा असा पराभव होणार नाहीं. असा विचार करून तो द्यूतकार बदरिकाश्रमास गेला, व तेथें संसारच्छेद करणारें घोर तप करूं लागला.

एकादी भ्रमरी एका पुष्पावरून उठून दुसऱ्यावर जशी येऊन बसते, त्याप्रमाणें अनंगप्रभाही, दरिद्री व ज्याचा अनुभव घेतला आहे, अशा त्या जुगाऱ्याला सोडून त्याच्याहून अधिक रूपवान् व श्रीमान् वैश्यापाशीं सुखानें राहूं लागली. कांहीं दिवसांनीं ती त्या कामी व श्रीमान् हिरण्यगुप्ताच्या प्राणाची व धनाचीही स्वामिनी झाली. त्या नगरांतील वीरबाहु राजाला त्या लोकैकसुंदरीची वार्ता कळली होती; पण धर्माचा लोप न व्हावा म्हणून तो तिच्या वाटेस गेला नाहीं. त्याला सुंदर स्त्रीपेक्षां स्वधर्म

* यन्मया कृतमन्यस्य तदन्येन कृतं मम ॥

अधिक प्रिय वाटत होता. कांहीं दिवसांनीं हिरण्यगुप्ताचें धन क्षीण झालें. घरांत कुलटा शिरली म्हणजे कुलस्त्रीप्रमाणेंच लक्ष्मीही म्लान होते.†

तेव्हां भांडवल जमवून व्यापार करण्याकरितां हिरण्यगुप्त सुवर्णभूमिसंज्ञक द्वीपास निघाला. वियोगदुःखास भिऊन त्यानें अनंगप्रभेलाही आपल्या बरोबर घेतलें होतें. जातां जातां तो सागराच्या कांठीं असलेल्या एका सागरपुरास जाऊन पोंचला. तेथील सागरवीर नांवाच्या धीवर-राजाशीं त्यानें सख्य केलें, व प्रियेसह त्याच्या नौकेंत बसून तो समुद्र तरून जाऊं लागला. स्वतः सागरवीरही त्या नौकेंत होता. कांहीं वेळ त्यांचा जलप्रवास सुखानें झाला. पण एकदां अकस्मात् मोठें वादळ सुरू झालें, झंझावात सुटला, व ती नौका बुडण्याच्या बेतांत आली. ती जोरानें हालूं लागली, व त्यामुळें आंत पाणी शिरून ती बुडाली. तेव्हां हिरण्यगुप्त कंबरेस अंगवस्त्र बांधून अनंगप्रभेकडे पहात व 'हा प्रिये' असें म्हणत समुद्रजलांत तरंगूं लागला. लाटांबरोबर वहात जातां जातां शेवटीं त्याला दुसरी एक नांव भेटली, व तिच्यावर चढून तो पांच दिवसांनीं परत समुद्रकांठीं येऊन पोंचला, आणि प्रियाविरहानें अतिशय व्याकुल झालेला तो आपल्या घरीं परत आला.

सागरवीरानें अनंगप्रभेसह एका फळकटाचा आश्रय करून दोघांच्याही प्राणांचें रक्षण केलें. तशा भयंकर स्थितींतही त्यानें त्या भ्यालेल्या अबलेला धीर दिला. थोड्याच अवकाशांत वादळ बंद होऊन आकाश निर्मळ झालें, तेव्हां ज्याचा कोप शांत झाला आहे, अशा साधूप्रमाणें सागरही निश्चल झाला. तें पाहून तर सागरवीराला अधिकच बल आलें, व तें फळकट मोठ्या वेगानें चालवून एकाच दिवसांत आपल्या घरीं त्यानें तिला आणून सोडलें. तीही त्याच्या येथें मोठ्या आनंदानें राहिली. कारण प्राणदान देणारा तो कोळीही राजासारखा मोठा श्रीमान्, शूर, तरुण व सुस्वरूप होता. त्यामुळें कांहीं दिवस त्यालाच पति करून ती त्याच्या आज्ञेंत वागूं लागली. स्त्री सद्वृत्तापासून एकदां चलित झाली म्हणजे मग ती उच्चनीच पहात नाहीं.* असो; कांहीं दिवस ती त्या कैवर्तपतीच्या येथें त्याच्या ऐश्वर्याचा उपभोग घेत राहिली.

---

† म्लायति श्रीः कुलस्त्रीव गृहे बन्धक्यधिष्ठिते ॥

* न स्त्री चलितचारित्रा निम्नोन्नतमवेक्षते ॥

एकदां सागरवीराच्या घराच्या माडीवरून तिनें मार्गानें जाणाऱ्या एका विजयवर्म-नांवाच्या सुलक्षणी क्षत्रियपुत्रास पाहिलें, त्याबरोबर त्याच्या रूपावर लुब्ध होऊन ती खालीं उतरून आली, व त्याच्याजवळ जाऊन म्हणाली,-'वीरा, तुला पहातांच माझें मन तुजवर गेलें आहे. यास्तव आपण होऊन आसक्त झालेल्या माझा अंगीकार कर' तेव्हां तें तिचें रम्य भाषण ऐकून आकाशांतून पडल्याप्रमाणें अकस्मात् प्राप्त झालेल्या तिचा स्वीकार करून तो स्वगृहीं गेला. कारण आपोआप चालून आलेल्या त्रैलोक्यसुंदरीचा कोणता विषयी पुरुष अव्हेर करणार आहे?

पण ती कोठें निघून गेली आहे, असें समजतांच शोकविह्वल होऊन सागरवीरानें सर्वस्वाचा त्याग केला. शरीर-त्याग करण्याकरितां तो गंगातीरीं गेला. त्याला इतकें असह्य दुःख कसें बरें नाहीं होणार? कारण मासे मारून व होड्या चालवून कसा तरी निर्वाह करणारी कोळ्यांची जात कोठें, व तो विद्याधरीचा संग कोठें? अनंगप्रभा विजयवर्म्यासह त्याच नगरांत मोठ्या आनंदानें व निर्भयपणें राहिली. एकदां तेथला सागरवर्मा राजा हत्तिणीवर बसून नगरांत फिरावयास निघाला. विजय-वर्म्याच्या घराजवळ येतांच, त्याला पहाण्याकारितां माडीवर येऊन उभी राहिलेली ती सुंदरी त्याच्या दृष्टीस पडली. तरुण राजाची रम्य मूर्ति पहातांच अनंगप्रभाही मोहित झाली. ती माहतास म्हणाली, 'बाबा, मी कधींही हत्तिणीवर बसलेली नाहीं. यास्तव कांहीं वेळ मला आपल्या हत्तिणीवर बसवितोस का? पाहूं दे तर खरें, त्यांत काय सुख आहे तें.' तिचें तें चमत्कारिक भाषण ऐकून महात राजाच्या तोंडाकडे पाहूं लागला. राजा तिला पहातांच काम-शरपीडित झालाच होता. त्यामुळें त्यानें आपल्या महातास, हत्तीण तिच्या माडीजवळ नेऊन तिचे मनोरथ पूर्ण करावयास सांगितलें. त्या कुशल हस्त्यारोहानेंही तत्काल तसें केलें व ती दुराचारिणी स्त्री लागलीच हत्तिणीच्या पाठीवर उडी टाकून राजाच्या अंकापाशीं जाऊन बसली. हर! हर! पूर्वीचा तो पतिद्वेष कोठें व आई-बापांच्या शापामुळें प्राप्त झालेली ही पतिविषयींची अतृप्ति कोठें! 'या उंच हत्तिणिवरून मी पडेन' असा खोटाच बहाणा करून तिनें राजाला घट्ट धरलें, व तिचा स्पर्श होतांच अमृतसेकाप्रमाणें परम तृप्त झालेला राजाही तिच्या अधीन झाला. असो.

याप्रमाणें युक्तीनें जिनें आपलें समर्पण केलें आहे, अशा त्या कामिनीला घेऊन सागरवर्मा सत्वर आपल्या मंदिरांत गेला. तेथें पोंचतांच तिचा सर्व वृत्तांत ऐकून व ही विद्याधरी आहे, असें जाणून त्यानें तिला महाराणी केलें. पण तिला राजानें नेलें आहे असें कळतांच तरुण क्षत्रिय विजयवर्मा राजद्वारीं जाऊन तेथील राज-भृत्यांशीं लढूं लागला, व पराङ्मुख न होतां त्यानें धारातीर्थीं प्राण दिले. स्त्रीसंबंधी पराभव शूरांना सहन होत नाहीं.* ही दुष्ट स्त्री तुला काय करावयाची आहे. तूं नंदन वनांत चल, व आमचा यथेच्छ उपभोग घे.' असें म्हणूनच जणुं काय देव-स्त्रिया रणांत सन्मुख मेलेल्या त्याला स्वर्गलोकास घेऊन गेल्या.

नदी सागरास जाऊन पोंचेपर्यंत जरी सरळ मार्गानें न गेली, तरी भव्य समुद्रास पोंचल्यावर ती त्याच्याशीं अनन्य होऊन रहाते. त्याप्रमाणें अनंगप्रभाही सागरवर्म्यास प्राप्त होतांच त्याच्यावर अनन्य प्रेम करूं लागली. ती तेथें स्थिर राहिली. दैववशात् त्या राजाच्या समागमानेंच ती आपल्याला कृतार्थ समजूं लागली. त्या अलौकिक भार्येच्या प्राप्तीमुळें राजालाही आपल्या जन्माचें सार्थक्य झालेंसें वाटलें. कांहीं दिवसांनीं ती अनंगप्रभा राणी त्या राजापासून गर्भवती झाली. योग्यसमयीं तिला पुत्र झाला. सागरवर्म्यानें त्याचें नांव समुद्रवर्मा ठेविलें. तो क्रमानें मोठा होऊन गुणवान्, व विद्वान्, झाला. तेव्हां पित्यानें त्याला यौवराज्य दिलें. समरवर्म राजाच्या कमलवती कन्येला हरण करून आणून त्यानें पुत्राचा विवाह मोठ्या थाटानें केला, व शेवटीं सागरवर्म्यानें त्याला आपलें राज्यही दिलें. राज्य मिळतांच तो बलाढ्य वीर पित्याला प्रणाम करून दिग्विजयाकरितां आज्ञा मागूं लागला. तो म्हणाला—' बाबा, स्त्रीच्या षंढ पतीप्रमाणें विजयाची इच्छा न करणारा पृथ्वीपति निंद्य होय. परराष्ट्रें जिंकून आपल्या बाहुबलानें संपादन केलेली राजांची लक्ष्मीच धर्म्य व कीर्तिकरी आहे. क्षुद्र राजे मांजरांप्रमाणें आपल्या प्रजेलाच खात रहातात. यास्तव मला आज्ञा करा, म्हणजे मी सर्वांना जिंकून येतों.'

पुत्राचें हें भाषण ऐकून सागरवर्मा म्हणाला, 'बाळा, तुझें राज्य अजून नवें आहे. यास्तव अगोदर तें तूं वश करून घे. त्याचें चांगल्या

* न शूरा विषहन्ते हि स्त्रीनिमित्तं पराभवम् ॥

रीतीनें रक्षण कर. उगीच हिंसाप्रधान कलह न माजवितां धर्मानें प्रजा पालन करणाऱ्या राजाला कांहीं पाप लागत नसतें. त्यामुळें त्याची अपकीर्तिही होत नाहीं. आपल्या शक्तीचा चांगला विचार न करितां राजांशीं लढावयास तयार होणें अगदीं प्रशस्त नव्हे. वत्सा, तूं शूर आहेस. तुजपाशीं सैन्यही पुष्कळ आहे हें खरें, पण रणांत जयश्रीचा कांहीं विश्वास नसतो.'

सागरवर्म्यानें त्याला आणखी असाच पुष्कळ उपदेश केला, पण तेजस्वी समुद्रवर्म्यानें कशी तरी त्याची आज्ञा घेऊन दिग्विजयार्थ प्रयाण केलें. क्रमानें सर्व दिशा जिंकून व राजांना आज्ञांकित करून पुष्कळ हत्ती, घोडे व धन यांसह तो आपल्या सागरपुरास परत आला. राजमंदिरांत येतांच पुत्राच्या उत्कर्षामुळें अतिशय संतुष्ट झालेल्या आईबापांच्या चरणांवर, देवब्राह्मणांवांचून दुसऱ्या कोणापुढेंही नम्र न झालेलें मस्तक ठेवून, त्या धन्य सत्पुत्रानें नाना देशच्या रत्नांनीं त्यांच्या चरणांची पूजा केली. वडिलांच्या आज्ञेनें त्या उदारानें ब्राह्मणांस मोठ्या सत्कारानें व आदरानें हत्ती, घोडे, सुवर्ण व रत्नें यांचीं महादानें दिलीं. याचक व सेवकवर्ग यांच्यावर त्यानें द्रव्याचा वर्षाव केला. आपल्या पुत्राचें तें माहात्म्य प्रत्यक्ष पाहून, अनंगप्रभेसह सागरवर्मा आपल्याला धन्य मानूं लागला, व कांहीं दिवस पुत्रासह मोठ्या आनंदानें घालवून, वृद्ध राजा मंत्र्यांसमक्ष आपल्या सुज्ञ पुत्राला म्हणाला,—'बाळा, या जन्मांतील माझें कर्तव्य मी केलें आहे. राज्यसुख भोगलें, कोणाकडूनही पराभव पावलों नाहीं, व तूं सम्राट् झाला आहेस, असेंही पाहिलें. आतां हें शरीर असें सुस्थित असेपर्यंतच मला तीर्थांचा आश्रय करूं दे. ही जरा [वृद्धावस्था] शुभ्र केशांच्या मिषानें कानांपाशीं येऊन 'या विनश्वर शरीरावरील आस्था न सोडतां अजून तूं घरांत राहून काय करीत आहेस,' असेंच मला सांगत आहे. असो;

असें सांगून पुत्राची इच्छा नव्हती तरी तो राजा भार्येसह प्रयागास गेला. आपल्या पूज्य मातापितरांना पोंचवीत फार दूरवर जाऊन शेवटीं त्यांनीं मोठ्या आग्रहानें परतविलें असतां, डोळ्यांत पाणी आणून त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवल्यावर तो कृती पुत्र परतला, व आपल्या नगरास येऊन पोंचल्यावर यथाशास्त्र राज्य करूं लागला.

अनंगप्रभेसह राजा सागरवर्म्यानेंही प्रयागांत जाऊन उग्र तप केलें. त्यामुळें भगवान् वृषध्वज संतुष्ट झाला, व एकदां पहाटे त्यांच्या स्वप्नांत येऊन त्रिपुरारि म्हणाला,–' तुझ्या व भार्येच्या तपानें मी संतुष्ट झालों आहें. ही अनंगप्रभा व तूंही विद्याधर असून, शापामुळें मानव झालां आहां; पण उद्यां सकाळीं शापमुक्त व्हाल, व आपल्या लोकास जाल.'

हा साक्षात्कार होतांच, सागरवर्मा जागा झाला; अनंगप्रभेलाही तसेंच स्वप्न पडलें. तीही खडबडून जागी झाली. त्या दोघांनींही आपापलें स्वप्न एकमेकांस सांगितलें. त्यानंतर आनंदित झालेली अनंगप्रभा आपल्या पतीला म्हणाली,–'आर्यपुत्र, मला पूर्वजन्माचें आतां चांगलें स्मरण झालें आहे. मी वीरपुरांतील समर विद्याधराची अनंगप्रभा कन्या, पित्याच्या शापानें येथें येऊन मी मानुषी झालें. माझ्या विद्या नष्ट झाल्या, त्यामुळें मी आपल्या विद्याधरी भावास मुकलें; पण आतां मला पूर्वींचें सर्व आठवलें.'

ती जों इतकें सांगत आहे, तों तिचा पिता समर आकाशांतून खालीं उतरला. त्याला पहातांच सागरवर्म्यानें उठून प्रणाम केला. अनंगप्रभेनेंही त्याच्या चरणावर मस्तक ठेविलें. तेव्हां ' कन्ये, ये; ह्या आपल्या विद्या घे, तुझा शाप निवृत्त झाला आहे. आठ जन्मींचें दुःख तूं या एका जन्मांत भोगलें आहेस. असें बोलून त्यानें तिला आपल्या उजव्या मांडीवर बसवून घेतलें, व विद्या दिल्या. नंतर तो राजा सागरवर्म्याला म्हणाला, ' तूं मदनप्रभ नांवाचा विद्याधरेश; मी समर व ही माझी कन्या अनंगप्रभा आहे. आपल्या रूपाविषयीं अतिशय गर्व वहाणाऱ्या हिनें मी आणलेल्या पुष्कळ वरांतील एकालाही वरलें नाहीं. तूं हिच्या अगदीं अनुरूप होतास; पण या मूर्ख कन्येनें तुझाही अपमान केला. तेव्हां मी रागानें हिला शाप दिला. त्यामुळें ही भूतळीं गेली. तूं मनानें गौरीपतीचें ध्यान करून ' मर्त्यलोकीं तरी ही माझी भार्या होवो ' या इच्छेनें योगमार्गानें विद्याधर-शरीर सोडून मर्त्यदेह घेतलास. भूलोकीं ही तुझी भार्या झाली, आतां आपल्या लोकीं चला.'

समराच्या तोंडचा हा वृत्तांत ऐकतांच सागरवर्म्यानें गंगा व यमुना या संगमामुळें पवित्र झालेल्या प्रयाग क्षेत्रीं मानव देहाचा त्याग करून, तत्काल आपला मदनप्रभ-देह धारण केला. अनंगप्रभेलाही आपल्या

उज्ज्वल स्वरूपाची प्राप्ति झाली, त्यामुळें त्या सर्वांना अत्यानंद झाला. अनंगप्रभा व मदनप्रभ यांना एकमेकांच्या त्या नूतन दिव्य शरीराला दृढ आलिंगन देण्याची फार उत्कंठा लागली, त्यामुळें तीं तिघेंही आकाशमार्गानें वीरपुरास गेलीं. तेथें पांचतांच शुभ मुहूर्तावर समरानें आपली कन्या विद्याधरेश मदनप्रभाला दिली, व जिचा शाप क्षीण झाला आहे अशा त्या सुंदरीसह तोही आपल्या पुरास जाऊन सुखानें काल घालवूं लागला. याप्रमाणें दिव्य स्त्रिया आपल्या पापकर्मवशात् शापच्युत होऊन भूलोकीं येतात, व येथें उचित फल भोगून पूर्व पुण्यामुळें पुन: निजगतीस जातात. याप्रमाणें गोमुख सचिवानें सांगितलेली उत्तम कथा ऐकून, अलंकारवतीसह नरवाहनदत्त संतुष्ट झाला, व त्यानंतर त्यानें उठून दिनकृत्य केलें.

## तरंग ३ रा.

दुसऱ्या दिवशीं मरुभूति अलंकारवतीसह बसलेल्या नरवाहनदत्तास म्हणाला,–' देव, हा जटिल संन्यासी चामडें नेसून थंडी, वारा इत्यादिकांचीही फारशी गणना न करितां अहोरात्र तुमच्या द्वारावर निश्चल उभा आहे. त्याच्यावर आपण प्रसाद कां करीत नाहीं ? योग्य समयीं थोडेंसें दिलेलेंही चांगलें, अकालीं पुष्कळ दिलें तरी त्याचा काय उपयोग ?§ यास्तव हा मेला नाहीं तोंच त्याच्यावर कृपा करा.'

हें ऐकून गोमुख म्हणाला,–'मरुभूतीनें चांगलें सांगितलें; पण हे देव, यांत तुमचा कांहीं अपराध नाहीं. कारण याचकाच्या विरोधी पापाचा क्षय होई तों दानप्रवृत्त प्रभुही देऊं शकत नाहीं. पण तेंच पाप क्षीण झालें म्हणजे दात्याला कोणी नको जरी म्हणत असलें तरी तो देतोच. खरोखर हें सर्व कर्माधीन आहे.* याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.

§ काले दत्तं वरं ह्यल्पमकाले बहुनाऽपि किम् ॥

* क्षयो यावन्न वृत्तो हि पापस्य परिपन्थिनः ।
तावद्दानप्रवृत्तोऽपि दातुं शक्नोति न प्रभुः ॥
परिक्षीणे पुनः पापे वार्यमाणोऽपि यत्नतः ।
ईश्वरः प्रददात्येव कर्मायत्तमिदं किल ॥

## १. लक्षदत्त राजा व दरिद्री यांची कथा.

पूर्वी एक लक्षपुर म्हणून नगर होतें. तेथें लक्षदत्त नांवाचा राजा होता. तो दानशीलांचा अग्रणीच होता, यांत कांहीं संशय नाहीं. याचकास एक लक्षाहून कमी द्रव्य द्यावयाचें त्याला ठाऊकच नव्हतें. ज्याच्याशीं त्याचें क्षणभर संभाषण होई; त्याला तर तो पांच लक्ष रुपयें देत असे. मग ज्याच्यावर संतुष्ट होई, त्याला तो दारिद्र्यशून्य करीत असे, यांत आश्चर्य कोणतें ? या त्याच्या स्वभावामुळेंच लक्षदत्त असें त्याचें नांव पडलें होतें. त्याच्या सिंहद्वारावर लब्धदत्त या नांवाचा एक दरिद्री भिक्षुक कंबरेला चामडें गुंडाळून जटा वाढवून थंडी, पाऊस, वारा व ऊन यांस सहन करीत, अहोरात्र फार दिवस उभा होता. तो तेथून हालतही नसे. राजा त्याला नित्य पहात असे, व तो मोठा दयाळुही होता, पण मोठ्या क्लेशानें तेथें रहाणाऱ्या त्याला त्यानें कांहीं दिलें नाहीं.

एकदां राजा मृगया करण्याकरितां अरण्यांत गेला. त्याच्या मागून तोही दरिद्री हातांत दंड घेऊन गेला. तेथें सैन्यासह वाहनावर बसून राजा बाणवर्षावाच्या योगानें अनेक पशूंस मारूं लागला. तेव्हां हाही पादचारी पुढें होऊन आपल्या हातांतील दांडक्यानेंच अनेक डुकरांस व हरणांस भूमीवर लोळवूं लागला. हा त्याचा पराक्रम पाहून राजा मनांत चकित झाला व–हा केवढा शूर आहे,-असेंही म्हणाला. पण त्यानें त्याला कांहीं दिलें नाहीं. याप्रमाणें बराच वेळ शिकार खेळून राजा परत आला व विश्रांति घेण्याकरितां आपल्या मंदिरांत शिरला. जटाधारी दरिद्री पूर्वीप्रमाणें द्वारावर उभा राहिला. त्यानंतर एके वेळीं सीमेवरील एका गोत्रज राजाशींच कलह उत्पन्न होऊन, त्याला जिंकण्याकरितां लक्षदत्त सैन्यासहवर्तमान निघाला. हाही पायांनींच त्याच्या मागून गेला. नियत-स्थानीं पोंचतांच घोर संग्राम सुरू झाला. त्या वेळीं राजाच्या समक्ष शत्रूंवर तुटून जाऊन त्या बैराग्यानें आपल्या हातांतील दांडक्यानें अनेक वीरांना मारून पाडलें. लक्षदत्ताचा विजय झाला. तो सर्व सैन्यासह आपल्या राजधानीस परत आला; पण अद्भुत पराक्रम पाहूनही त्यानें त्याला कांहीं दिलें नाहीं, व तो दरिद्री पुनः स्वस्थानीं उभा राहिला.

याप्रमाणें तो क्लेश भोगीत असतांना पांच वर्षें निघून गेलीं. तेव्हां एकदां दैववशात् राजाला त्याची दया आली, व तो मनांत म्हणाला,

'फार दिवसांपासून माझ्या मुख्य द्वारावर उभा राहून हा क्लेश भोगीत आहे; पण मी याला अद्यापि कांहीं दिलें नाहीं. वास्तव याला आतां कांहीं देऊं कीं नको? या दीन पुरुषाचें पाप अजून संपलें कीं नाहीं? व अजून तरी लक्ष्मी ह्याला दर्शन देते कीं नाहीं, तें मला युक्तीनें पाहिलें पाहिजे.' असा विचार करून लक्षदत्त भांडागारांत गेला, व एका माहाळुंगांत पुष्कळ रत्नें भरून, सर्वांसमक्ष त्यानें लब्धदत्तास बोलाविलें. राजाज्ञेनें तोही तत्काल समीप आला. तेव्हां 'एकादें सुभाषित म्हण' असें राजानें सांगितलें असतां, त्यानें पुढील आर्या म्हटली:—

पूरयति पूर्णमेषा तरंगिणीसंहतिः समुद्रमिव ।
लक्ष्मीरधनस्य पुनर्लोचनमार्गेऽपि नायाति ॥

[अर्थ—नद्यांचा समुदाय जसा अगोदरच तुडुंब भरलेल्या समुद्रालाच अहर्निश भरीत रहातो, त्याप्रमाणें ही लक्ष्मीही धनसंपन्न पुरुषालाच आणखी आणखी भरीत असते; पण निर्धनाच्या डोळ्यांपुढेंही येत नाहीं.]

ही आर्या ऐकून व ती त्याच्याकडून वारंवार म्हणवून राजा अतिशय संतुष्ट झाला, व त्यानें सद्रत्नांनीं भरलेलें महाळुंग त्याला दिलें. तें पाहून त्या वेळीं सभेंत बसलेले सर्व सज्जन खरा प्रकार माहीत नसल्यामुळें, मनांत खिन्न झाले, व 'हा राजा ज्याच्यावर संतुष्ट होतो त्याला श्रीमान् करून सोडतो, त्याच्या दारिद्र्याचा नाश करतो, असा याचा नियम आहे. पण या संन्याशाचें दैव कसें खडतर आहे तें पहा. राजानें स्वतः त्याला बोलावून आदरानें भाषण करून व अतिशय संतुष्ट होऊन महाळुंग दिलें. कल्पवृक्षही प्रायः दुर्दैवी पुरुषांना पळसासारखा होतो,* म्हणून म्हणतात तें खोटें नव्हे' असें आपसांत बोलूं लागले. तो दरिद्री संन्यासीही मनांतल्या मनांत खिन्न होऊन तें फळ घेऊन बाहेर गेला. इतक्यांत एक राजबंदी नांवाचा भिक्षु आला, व एक शाटी देऊन त्यानें या दरिद्र्याजवळचें मनोहर महाळुंग विकत घेतलें, व तेंच राजापुढें नेऊन ठेवलें. तेव्हां 'हें फळ तुला कोठें सांपडलें.' असा लक्षदत्तानें प्रश्न केला. तेव्हां त्यानें खरा वृत्तांत सांगितला. तो ऐकून राजाला

* कल्पवृक्षोऽप्यभव्यानां प्रायो याति पलाशताम् ॥

मोठा खेद व विस्मय वाटला. 'हरहर! अद्यापि त्या बिचाऱ्याचें पाप संपलें नाहीं!' असें म्हणून, व तें महाळुंग घेऊन तो दिनकृत्य करावयास सभेतून उठून गेला.

इकडे तो दरिद्रीही सिंहद्वारावर पूर्वीप्रमाणें जाऊन बसला. ती शाटी विकून मिळालेल्या पैशांवर त्यानें भोजनादि केलें. दुसऱ्या दिवशीं राजाची सभा पुनः भरली. पौरजन उचित स्थानीं जाऊन बसले. तो दरिद्री आंत आला आहे असें पहातांच, राजानें त्याला आदरानें बोलावून जवळ बसावयास सांगितलें. आदल्या दिवशींची आर्या पुनः म्हणून घेतली, व संतुष्ट होऊन त्यानें तेंच रत्नपूर्ण फळ त्याला दिलें. तेव्हां 'आज सुद्धां राजाचा संतोष व्यर्थ झाला याचें कारण काय बरें असावें!' असें म्हणून सर्व सभासद चकित झाले. तो दरिद्रीही खिन्न होऊन व राजानें दिलेलें फळ हातांत घेऊन राजाचा प्रसाद सफळ झाला असें समजून, बाहेर जावयास निघाला. तों राजदर्शनाकरितां सभेंत जाण्याची इच्छा करणारा एक मांडलिक तेथें आला. फलासह बाहेर आलेल्या त्याला पाहून, व हा चांगलाच शकुन झाला आहे असें समजून, त्यानें दोन वस्त्रांस तें फळ त्याच्यापासून विकत घेतलें, तो आंत गेला, राजाच्या पायांवर डोकें ठेवून त्यानें अगोदर तें फळ व नंतर इतर भेट त्याच्यापुढें ठेविली. तेव्हां राजानेंही आपल्या महाळुंगाला ओळखून 'हें कोठून आणलेंस' असा त्याला प्रश्न केला. तेव्हां त्या मांडलिकानें खरा प्रकार सांगितला. तो ऐकून 'हर! हर! लक्ष्मी अद्यापि त्या गरीबाला दर्शन देत नाहीं, काय करावें!' असा विचार करीत तो खिन्न झाला. त्यानंतर कांहीं वेळानें राजा तें फळ घेऊन अंतःपुरांत गेला. सभेंतील लोक आपापल्या स्थानीं गेले. त्या दरिद्र्यानें बाजारांत जाऊन त्यांतील एक वस्त्र विकलें व त्या दिवशीं पुरेल इतकी अन्नसामग्री घेतली, आणि दुसरें वस्त्र फाडून त्याचीं दोन नेसावयाचीं वस्त्रें केलीं.

तिसऱ्या दिवशींही राजानें सर्व सभा भरविली, आणि पूर्वीप्रमाणेंच त्या दरिद्र्याला बोलावून व ती आर्या त्याच्याकडून म्हणवून घेऊन तेंच महाळुंग त्याला दिलें. तेव्हां तोही सभेंतून बाहेर गेला, व त्यानें राजाच्या एका विलासिनीला तें फळ दिलें. त्या राजप्रियेनें त्याला उलट जणुं काय पुढच्या ऐश्वर्याचें सूचकच असें एक सोन्याचें फूल

दिलें. तें विकून त्या दरिद्यानें तो दिवस सुखानें घालविला. विलासिनी राजाकडे आली, व तिनें तेंच मोठें व सुंदर फळ राजाला दिलें. फळ पहातांच 'तुला तें कोठून मिळालें' असा राजानें तिला प्रश्न केला. तिनें त्या दरिद्याचें नांव सांगितलें. तें ऐकून राजा मनांत म्हणाला,–' लक्ष्मीनें अजून त्याच्याकडे कृपादृष्टीनें पाहिलें नाहीं. त्या दुर्भाग्याला 'माझा प्रसाद निष्फल कधींही नसतो,' हें अजून कसें कळत नाहीं कोण जाणे! काय चमत्कार आहे, हीं महारत्नें पुनःपुनः मजकडेच येतात.' असा मनांत विचार करून त्यानें तें फळ घेऊन सुरक्षित स्थानीं ठेवलें. त्यानंतर लक्षदत्तानें आपलें दिनकृत्य केलें.

चवथ्या दिवशीं त्यानें पुनः सभा भरविली. दरिद्याला बोलाविलें, व आपल्यापाशीं आदरानें बसविलें. नंतर आर्या म्हणावयास सांगितलें व नेहमींप्रमाणें महाळुंग त्याच्या हातांत वरून टाकिलें. पण त्या दिवशीं त्याच्या सुदैवामुळें तें फळ त्याच्या हातांतून निसटून खालीं पडलें व त्याचीं दोन शकलें झालीं. त्याबरोबर त्यांतील महामूल्यवान् अनेक रत्नें चमकूं लागलीं. तीं पहातांच 'हा खरा प्रकार न जाणल्यामुळें आज तीन दिवस आम्हीं उगीच भ्रमांत पडलों आहों, पण या आमच्या प्रभूचा प्रसाद हा अशा तऱ्हेचा असतो,' असें सर्व मोठ्यानें म्हणूं लागले. तें त्यांचें आनंदाचें भाषण ऐकून लक्षदत्त म्हणाला,–'या युक्तीनें लक्ष्मी याला दर्शन देते कीं नाहीं, तें मीं पहात होतों, तीन दिवस याच्या पापाचा अंत झाला नव्हता, त्यामुळें स्वतः लक्ष्मीनेंही याला दर्शन दिलें नव्हतें.'

इतकें बोलून लक्षदत्तानें त्याला हत्ती, घोडे, सुवर्ण व ग्राम दिले आणि एका क्षणांत त्याला सामंत राजा केलें. नंतर लोक आनंदानें साधुवाद देऊं लागले. तो उदार राजा सभेंतून उठून आन्हिक कर्मे करावयास गेला. सिंहद्वारावर उभा राहून राजाची अनन्यसेवा करणारा दरिद्रीही श्रीमान् होऊन घरीं गेला. कनकाच्या मागोमाग कांताही त्याला मिळाली, व याप्रमाणें तो सुखी झाला. सारांश प्रभो, पापाचा अंत होईतों शेकडों कष्ट करूनही भृत्यांना प्रभुप्रसाद प्राप्त होत नाहीं. अशी ही आख्यायिका सांगून मंत्रिमुख्य गोमुख आपल्या नरवाहनदत्त प्रभूस पुनः म्हणाला,–' देव, आपल्या द्वारावर रहाणाऱ्या भिकाऱ्याच्या पापाचा क्षय

अद्यापि झालेला नसावा आणि त्यामुळेच आपल्याला त्याच्यावर प्रसाद करावा असें वाटत नाहीं.'

गोमुखाच्या तोंडची ही कथा ऐकून नरवाहनदत्त 'वा, फार उत्तम.' असें म्हणाला,—त्यानें आपल्या द्वारावरील कार्पटिकाला तत्काल बोलावून गांव, हत्ती, घोडे, सोनें व उत्तम वस्त्रें दिलीं. त्यामुळें तो कार्पटिक राजासारखा झाला. ज्याचा परिवार चांगला आहे अशा कृतज्ञ राजाची सेवा निष्फल कशी होईल ?* असो; अशा रीतीनें तेथें अनेक उत्तम कार्यें करीत राहिलेल्या नरवाहनदत्ताची सेवा करण्याकरितां एक प्रलंबबाहु नांवाचा दाक्षिणात्य तरुण ब्राह्मण—वीर त्याच्यापाशीं येऊन म्हणाला,—' हे प्रभो, तुझ्या कीर्तीनें ओढून आणल्यामुळें मी या चरणापाशीं आलों आहें. भूमीवर गज, वाजी व रथ यांतून जाणाऱ्या तुला सोडून मी एक पाऊलभरही दूर सरणार नाहीं. पायानेंच मी तुझ्या मागोमाग छायेप्रमाणें जाईन. आकाशांत मात्र माझी गति होणार नाहीं. तुज प्रभूला विद्याधरेंद्रता प्राप्त होणार आहे, असें मीं ऐकलें; म्हणून मी असें सांगतों कीं, माझ्या वृत्तीकरितां रोज शंभर सुवर्ण द्यावें.'

तें ऐकतांच नरवाहनदत्तानेंही कांहीं एक विचार न करतां त्याचा मनोरथ पूर्ण केला. त्यानें त्या अति तेजस्वी पुरुषाला शतसुवर्णरूप वृत्ति प्रत्यहीं देण्याची आज्ञा केली. तेव्हां गोमुख म्हणाला,—'देव, राजांचे असेच मोठे सेवक असतात, या विषयीं एक कथा सांगतों ती ऐका.†

## २. वीरवराची कथा.

विक्रमपुर म्हणून एक नगर असून त्यात पूर्वी विक्रमतुंग या नांवाचा राजा राज्य करीत होता. त्या नयशाली राजाच्या तरवारींत मात्र तीक्ष्णता हा गुण असून दंडांत तो मुळींच नसे. (म्हणजे अपराध्यांस तो अगदीं सौम्य दंड देत असे. ) त्याची अत्यासक्ति धर्मामध्यें होती. स्त्री, मृगया इत्यादिकांमध्यें नव्हे. एकदां अशा त्या मोठ्या उदार व शूर राजाकडे एक मालव

---

* कृतज्ञे सत्परीवारे प्रभौ सेवाऽफला कुतः ।

† हीच कथा थोडी बदलून हितोपदेशांत घेतली आहे. पहा हितोपदेश. विग्रह कथा ८.

देशांतील वीरवर या नांवाचा शूर ब्राह्मण आला. त्याची आकृतीही फार रमणीय असून तो त्या राजाची सेवा करण्याकरितां तेथें आला होता. धर्मवती भार्या, वीरवती कन्या व सत्त्ववर पुत्र, अशीं तीनच मनुष्यें त्याच्या कुटुंबांत होतीं. कंबरेला बांधलेली तरवार, एका हातांत घेतलेली ढाल व दुसऱ्या हातांतील एक चांगला आरसा, हीं तीनच त्याचीं सेवेचीं साधनें होतीं. तो राजाजवळ येऊन प्रत्यहीं पांचशें दीनार वेतन मागूं लागला. राजानेंही त्याच्यामध्यें मोठें गूढ तेज दिसत आहे, असें जाणून व 'याच्यामधील विशेष पाहूं या तर खरा,' असा विचार करून त्याला तेवढी मोठी वृत्ति दिली, व तो त्या द्रव्याचा व्यय कसा करितो हें पहाण्याकरितां आपले हेर त्याच्यामागें ठेविले.

वीरवर प्रत्यहीं त्या पांचशें दीनारांतील शंभर दीनार भोजनादिकांकरितां भार्येच्या हातीं देत असे. शत दीनारांचीं वस्त्रें, पुष्पें, इत्यादि सामग्री घेई. स्नान केल्यावर शंभर दीनार हरिहरादिकांच्या पूजनाकडे खर्च करी. व बाकी राहिलेल्या दोनशें दीनारांचें दान–ब्राम्हण, दरिद्री–इत्यादिकांस देत असे. याप्रमाणें तो प्रत्यहीं पांचशें दीनारांचा विनियोग करी, व एवढें आन्हिक आटोपलें म्हणजे अहोरात्र राजद्वारावर येऊन सशस्त्र उभा राही. चारांनीं अशा प्रकारची ही त्याची दिनचर्या राजास कळविली, तेव्हां राजा विक्रमतुंग फार संतुष्ट झाला, व त्यानें 'आतां तुम्ही त्याच्यामागें लागूं नका' असें म्हणून हेरांचें निवारण केलें.

इतक्यांत जणुं काय त्या वीरवराला जिंकण्याची इच्छा करूनच मोठया गर्जनेनें उग्र झालेला व शूरांचा प्रताप सहन न करणारा वर्षा–ऋतु आला. घोर मेघ मुसळधारांनीं वृष्टि करूं लागले; पण तो वीरवर राजद्वारावरून हालला नाहीं. राजा आपल्या मंदिरांतून त्यास नेहमीं पहात असे, एकदां त्याची परीक्षा पहाण्याकरितां रात्रीं उंच मांडीवर चढून 'येथें सिंहद्वारावर कोण उभा आहे ?' असें तो वरून विचारूं लागला. तें ऐकतांच 'मी वीरवर' असें हा उलट बोलला. तेव्हां 'वाहवा, एवढा मोठा पाऊस सतत पडत असतांनाही आपलें स्थान न सोडणारा, हा महा धैर्यशाली पुरुष फार मोठया पदाला योग्य आहे,' इतकें जों राजा मनांत चिंतन करीत आहे, तों एक स्त्री दूर कोठें मोठा आक्रोश करीत आहे असें त्याला ऐकूं आलें, स्त्रीचा दीन स्वर ऐकतांच त्याचें हृदय करुणेनें विरघळून गेलें, हें

निराळें सांगावयास नकोच. 'माझ्या राष्ट्रांत दुःखाचें नांवही नसतांना आज अपरात्रीं ही कोण रडत आहे ? या गोष्टीचा निर्णय केला पाहिजे,' असा विचार करून तो वीरवराला म्हणाला,–'बा वीरा, ही पहा कोणशी स्त्री दूर रडत आहे, तिच्याजवळ जा, व ती कोण, कां रडते, इत्यादि विचारून मला येऊन सांग.'

राजाची ही आज्ञा तत्काल मान्य करून, व ढाल तरवार सरसावून तो शूर जिकडून तो रडण्याचा ध्वनि येत होता, तिकडे एकटाच चालला. पण मेघ भयंकर वर्षाव व गर्जना करीत असतांना व विजा चमकत असतांना, त्याला एकटेंच जाऊं देणें बरें नव्हे असें समजून, दयाळु विक्रमतुंगही हातांत ढाल तरवार घेऊन माडीवरून खालीं उतरला, व गुपचुप त्याच्या मागून चालला. वीरवर तशा भयंकर रात्रींही मुळींच न भीतां त्या पुराच्या बाहेर पडून, जेथें ती स्त्री रडत होती तेथें एका मोठ्या सरोवराच्यां कांठीं गेला. 'हा नाथ, हे कृपासागरा, हे शूरा, तुजवांचून मी कशी राहूं ? ' असें म्हणून मोठयानें आक्रोश करणाऱ्या त्या स्त्रीजवळ पोंचतांच–' कल्याणि, तूं कोण आहेस ? व कोणत्या नाथाकरितां रडत आहेस ? '–असें तो तिला विचारूं लागला. तेव्हां ती सुंदरी, डोळे पुसून व तोंडावर आलेले केंस मागें सारून म्हणाली,–'पुत्रा, मी पृथ्वी आहें. सांप्रतकाळीं माझा नाथ धार्मिक विक्रमतुंग आहे, पण तो आजपासून तिसऱ्या दिवशीं मरणार. तेव्हां मला पुनः असला पति कोठून लाभणार ? म्हणून मी त्याच्याकरितां रडत आहें. स्वर्गस्थ देव–पुत्र सुप्रभाप्रमाणें दिव्यदृष्टीनें मला भावि शुभाशुभ दिसत असतें. त्या दिव्यदृष्टि देव–कुमारानें पुण्यक्षयामुळें, सात दिवसांनीं आपला होणारा अधःपात व सूकरीच्या गर्भाशयांतील जन्म पाहिला. तेव्हां त्या डुकरीच्या योनींतील क्लेशांचा विचार करून तो स्वर्गांतील दिव्य भोगांसह आपल्याकरितां शोक करूं लागला. ' हाय, हाय, अरे स्वर्गा, हे अप्सरांनो, अहो नंदनवनांतील लतागृहांनो, तुम्हांला सोडून मी आतां अगोदर सूकरयोनींत व नंतर घाण चिखलांत कसा राहूं ? '

हा त्याचा आक्रोश ऐकून इंद्र त्याच्यापाशीं आला व दुःखाचें कारण विचारून घेऊन–' ॐ नमः शिवाय ' या मंत्राचा सतत जप कर, म्हणजे तूं या दुःखांतून मुक्त होशील–असें म्हणाला. सुप्रभानेंही ' बरें

आहे ' असें म्हणून 'नमः शिवाय ' या पंचाक्षरी मंत्राचा जप चालविला. याप्रमाणें सहा दिवस अनुष्ठान झालें असतां, महादेवाच्या कृपेनें सातव्या दिवशीं त्याला सूकरयोनीबद्दल स्वर्गाहून अधिक सुखकर लोक मिळाला. त्या देवपुत्राप्रमाणेंच मीही राजाचें भावि मरण जाणून रडत आहें. पृथ्वीचें हें भाषण ऐकून वीरवर म्हणाला,–' देवि, इंद्राच्या सांगण्यावरून सुप्रभानें जसा उपाय योजिला, तसा या राजाच्या रक्षणाचा जर कांहीं उपाय असेल तर मला सांग.' त्यावर पृथ्वी म्हणाली,–'वत्सा, एक उपाय आहे, व तो तुझ्याच स्वाधीन आहे.' हे शब्द कानीं पडतांच आनंदित झालेला वीरवर म्हणाला,–' तर मग देवि, तो मला सत्वर सांग. माझ्या किंवा माझ्या बायकांपोरांच्या प्राणांनींही राजाचें जर हित होईल, तर मी आपलें जिणें सफल झालें असें समजेन.'

त्या शूराचें हें धैर्याचें भाषण ऐकून पृथ्वी म्हणाली,–'बाळा, राजकुला-पाशींच चंडिका देवी आहे, तिला आपल्या सत्त्ववर पुत्राचा जर बळि देशील, तर राजा जिवंत राहील. यावांचून दुसरा कांहीं उपाय दिसत नाहीं.' पृथ्वीचें हें भाषण ऐकून, वीरवर ' बरें आहे, भूतधात्रि, हा मी आतांच जाऊन तो उपाय योजतों ' असें म्हणाला, व तिला वंदन करून तडक आपल्या घराकडे निघाला. ' तुझ्यासारखा स्वामीचें हित करणारा दुसरा कोण आहे बाबा ? जा, देव तुझें कल्याण करो ' असें म्हणून ती देवीही तेथें गुप्त झाली.

विक्रमतुंगानें तें सर्व ऐकलें होतें; म्हणून मनांत चकित व खिन्न झालेला तोही त्याच्यामागून जाऊं लागला. वीरवर तसाच आपल्या मुक्कामावर आला, व आपल्या धर्मवती भार्येला उठवून त्यानें तें वर्तमान तिला सांगितलें. तेव्हां ' ज्याचें अन्न खातों त्या स्वामीचें हित अवश्य केलें पाहिजे. ' असें म्हणून त्या साध्वीनेंही पुत्रवधास अनुमोदन दिलें. नंतर त्यानें आपल्या गुणी, सुंदर व लाडक्या बाळाला जागें केलें, व नेत्रांतून अश्रूंच्या धारा वहात असून, कंठ दाटून आल्याकारणानें बोलतां येत नव्हतें, तरी तें वृत्त त्याला सांगितलें. तें ऐकतांच तो खरा सत्त्व-धीर बालक आपल्या पित्याला म्हणाला, ' बाबा, प्रभुकार्यामध्यें ज्याचे प्राण जात आहेत, तो मी मोठा पुण्यवान् नव्हे का ? मी त्याचें अन्न

खालें आहे, तेव्हां त्या ऋणांतून मला मुक्त झालें पाहिजे. यास्तव चंडीला माझा बळि आपण निःशंकपणें द्या.'

याप्रमाणें मृत्यूला अगदीं न भितां उच्चारलेले हे त्याचे शब्द कानीं पडतांच वीरवराच्या अंगावर रोमांच उठले; व 'शाबास, तूं माझा खरा पुत्र आहेस,' असें म्हणून त्यानें त्या बालकाला खांद्यावर घेतलें, व तो ब्राह्मण तसाच घराच्या बाहेर पडला. त्याच्या मागोमाग त्याची धर्मपत्नीही मुलीला कडेवर घेऊन चंडीच्या मंदिराकडे चालली. त्या सर्वांचें एकसारखें धैर्य पाहून आश्चर्यचकित झालेला राजाही त्यांच्या मागून गुपचीप चालला होता. देवळांत पोंचतांच वीरवरानें पुत्राला खांद्यावरून खालीं उतरलें. तेव्हां तो अल्पवयस्क बालक देवीला नमस्कार करून म्हणाला, " देवि, मी आपलें मस्तक तुला अर्पण करीत आहें. याच्यायोगानें आमचा प्रभु विक्रमतुंग जिवंत राहो, व निष्कंटक पृथ्वीचें राज्य दीर्घकाल करो.' बालकाची ही प्रार्थना ऐकून 'शाबास बाळा तूं धन्य आहेस' असें वीरवरानें म्हटलें, व लागलीच आपली तरवार म्यान्यांतून बाहेर काढून, तत्काल पुत्राचें मस्तक कापलें, व देवीला समर्पण करून 'राजाचें कल्याण होवो' असें म्हटलें. अहाहा, स्वामिभक्तांना पुत्राची किंवा आपल्या शरीराचीही इच्छा नसते.* 'शाबास वीरवरा, तूं पुत्राच्या प्राणांनीं आपल्या स्वामीला वांचविलें आहेस' अशी आकाशवाणी तेथें त्याला ऐकूं आली. पण आपला भाऊ मरून पडला आहे, असें पहातांच, मोठ्यानें ओरडूं लागलेली वीरवती भूमीवर पडली, व तिनेंही भावाच्या मस्तकास कवटाळून, हृदयस्फोट झाल्यामुळें, प्राण सोडले. पुत्राबरोबर प्रिय कन्याही गेली असें पहातांच धर्मवती दीनवाणीनें हात जोडून वीरवरास म्हणाली, 'स्वामिन्, राजाचें तर कल्याण झालेंच आहे. आतां मला आज्ञा द्या म्हणजे मी आपल्या या दोघां लाडक्यांना बरोबर घेऊन अग्नींत प्रवेश करतें. ही माझी प्रिय कन्या एवढीशी असतांनाही जर भ्रातृप्रेमानें मेली आहे, तर दोन अपत्यें डोळ्यांदेखत गेल्यावर मला तरी जगून काय करावयाचें आहे!'

---

* नास्त्यहो स्वामिभक्तानां पुत्रे वात्मनिवा स्पृहा।

वीरवरालाही तिचें तें म्हणणें खरें वाटलें, व अपत्यांच्या मृत्यूनें अतिशय कष्टकर झालेल्या संसारांत मरेपर्यंत पोळत रहाण्यापेक्षां, कांहीं क्षण बाह्यअग्नीचा दाह सहन करणें बरें, असें समजून 'प्रिये, पण थांब, मी तुला चिता तयार करून देतों' असें तो म्हणाला, व देवीच्या मंदिराच्या कामाकरितां आणून ठेवलेल्या लांकडांतीलच कांहीं लांकडें एकत्र रचून त्यानें तीं पेटविलीं. नंतर धर्मवतीनें प्रथम दोघां बालकांचे देह अग्नीवर ठेवले, व स्वतः पतीच्या पायांवर मस्तक ठेवून जन्मोजन्मीं तूंच माझा पति व्हावेंस आणि राजाचें कल्याण होवो, असें म्हणून तिनें अग्नींत प्रवेश केला. त्या साध्वीला तो प्रखर अग्निदेवही त्यावेळीं अति शीतल वाटला. तें साहस पाहून 'मी आतां यांच्या ऋणांतून मुक्त कसा होऊं?' असा विचार करीत असतांना राजा देहभान विसरला. तों वीरवर आपल्या मनांत म्हणाला,—'मी सर्वस्वभूत अशा आपल्या पुत्राचा बळि देऊन स्वामीच्या अन्न-ऋणांतून तर मुक्त झालों आहें. राजाच्या जीविताविषयीं तर आतां संशय राहिलेला नाहीं. कारण स्वतः आकाशवाणीनेंच तसें सांगितलें आहे. तेव्हां आतां सर्व इष्ट जीवांचा क्षय करून जिवंत रहाणें मला शोभत नाहीं. तसें केल्यास आपलपोटेपणा, निर्दयता, कृतघ्नता, इत्यादि दुर्गुणांला थारा देण्यासारखेंच होईल. पण तसलें जीवित घेऊन काय करावयाचें आहे? त्यापेक्षां या देवीला स्वतःचाच बळि देऊन तृप्त करावयास काय हरकत आहे?'

असा पुष्कळ विचार करून त्या धीरानें स्वशिरश्छेदाचा निश्चय केला, आणि हातांत पुत्राच्या रक्तानें भरलेली तीक्ष्ण तरवार घेऊन तो देवीपुढें गेला आणि नम्रपणें चंडिकेची स्तुति करूं लागला. तो म्हणाला,—"शरणागतांस अभय देणारे देवि, तुला नमस्कार असो. संसारसागरांत बुडणाऱ्या माझा उद्धार कर. तूं सर्व भूतां-प्राण्यां-ची प्राणशक्ति आहेस. तुझ्यामुळें हें सर्व जग चेष्टा करितें. तूं सृष्टीच्या अगदीं आरंभीं उत्पन्न झालीस व शंभूनें स्वतः तुला पाहिलें. तूं आपल्या विलक्षण तेजानें जगास प्रकाशित करतेस. कोटिसूर्यांहून तुझी प्रभा अधिक आहे. आपल्या सहस्र भुजसमूहानें तूं सर्व दिशांस आच्छादित केलें आहेस. त्रिशूल धारण करणाऱ्या देवानेंही तुझी अशी स्तुति केली आहे. हे शुभे, नारायणि, सरस्वति, भद्रकालि, महालक्ष्मि, सिद्धे तुला नमस्कार असो. गायत्री

महाराज्ञी, रेवती, विंध्यवासिनी, उमा, कात्यायिनी व कैलासवासिनी, असा नामोच्चार करून शंकर तुझी स्तुति करण्यास प्रवृत्त झाला आहे, असें पाहून स्कंद-वसिष्ठ प्रभृति इतरांनींही तुझें तसेंच स्तोत्र केलें. आणि त्यामुळें ते उत्तम देव, ऋषि व मनुष्य झाले. त्यांना हवें होतें त्याहून अधिक सुखभोग प्राप्त झाले, व अजून होत आहेत. यास्तव भगवति, मजवर प्रसन्न हो. स्वशरीराचा बळि समर्पण करून मी करीत असलेल्या या पूजेचाही स्वीकार कर, व माझ्या राजाचें कल्याण होऊं दे."

इतकें बोलून तो आपलें मस्तक कापण्याकरितां जोरानें तलवार उचलीत आहे, तों आकाशवाणी झाली कीं,–'पुत्रा, असें साहस करूं नकोस. हें तुझें धैर्य पाहून मी संतुष्ट झालें आहें. तुला हवा तो वर माग.' तें ऐकून तो म्हणाला,–' असें जर असेल तर राजा विक्रमतुंग आणखी शंभर वर्षें वांचो व माझीं हीं तीन प्रिय माणसें जिवंत होवोत.' त्यावर ' ठीक आहे ' असें म्हणून आकाशवाणी स्तब्ध झाली. इतक्यांत वीरवराची स्त्री धर्मवती, पुत्र सत्त्ववर व कन्या वीरवती, अशीं तिघेंही पूर्वींपेक्षां अधिक तेजस्वी व अक्षत शरीरें धारण करून उठलीं. तेव्हां वीरवराला मोठा आनंद झाला, व देवीला नमस्कार करून, आल्या मार्गानें तो त्यांना घेऊन परत आपल्या घरीं गेला. नंतर त्या सर्वांना घरांत सोडून पुनरपि तो राजद्वारांत येऊन उभा राहिला.

हें सर्व पाहून अतिशय संतुष्ट झालेला राजा विक्रमतुंग, वीरवर यावयाच्या पूर्वींच राजवाड्यांत जाऊन बसला होता. तो पुनः आपल्या जागीं येऊन स्थित आहे, असें पहातांच राजा माडीवरून–'येथें सिंहद्वारांत कोण आहे?' असें पुनः विचारूं लागला. तेव्हां खालीं असलेला तो वीर म्हणाला,–'देव, मी आपल्या पायांचा सेवक वीरवर आहें. त्या रडणाऱ्या स्त्रीकडे मी गेलों होतों, पण ती कोणी देवता होती. ती मला पहातांच कोठें नाहींशी झाली.' त्याचें हें मिथ्या भाषण ऐकून त्या एकांतस्थळीं एकटाच बसलेला राजा मनांत म्हणाला,–'खरोखर हा कोणी अपूर्व महापुरुष आहे. एवढें मोठें परोपकाराचें कृत्य केलें असूनही हा त्याचा नुस्ता उल्लेख सुद्धां करीत नाहीं. सागराप्रमाणें गंभीर, विशाल व महासत्त्ववान् असूनही शिवाय हा महावायूनें सुद्धां चंचल न होणारा आहे. (सागर थोड्याशा वायूनेंही कसा चंचल होतो तें प्रसिद्धच आहे.) अपरात्रीं कोणालाही न कळ-

वितां पुत्र व स्त्री यांचा व्यय करून ज्यानें माझे प्राण वांचविले, त्याचे उपकार मी कसे फेडूं ? असा विचार करीत राजा माडीवरून खालीं उतरला, व अंतःपुरांत जाऊन आश्चर्यचकितमनानें त्यानें ती रात्र घालविली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सभेंत जातांच त्या उदारानें रात्रीं प्रत्यक्ष पाहिलेलें वीरवराचें अद्भुत कृत्य प्रशंसापूर्वक सर्वांना सांगितलें. तें ऐकून सर्व सभासदांना मोठें आश्चर्य वाटलें, व त्यांनींही त्या वीराची स्तुति केली. नंतर राजानें वीरवर व त्याचा धीर पुत्र यांना मोठ्या सन्मानानें सभेंत आणून उच्च स्थानीं बसविलें, व त्यांना शेला पागोटें देऊन अनेक गांव, हत्ती, घोडे व अगणित द्रव्य दिलें, व त्याचें वेतन साठपट वाढविलें. त्यामुळें तो ब्राह्मण एका क्षणांत राजासारखा मोठा मानकरी झाला. राजसेवक त्याच्यावर चवऱ्या वारूं लागले. सारांश, प्रभो, याप्रमाणें तो आपल्या कुटुंबांतील माणसांसह कृतार्थ झाला, पण अशा प्रकारचे महावीर भृत्य राजांना मोठ्या पुण्ययोगानेंच प्राप्त होतात, व ते आपल्या स्वामीकरितां देहादिकांची अपेक्षा न करितां दोन्ही लोक जिंकतात. देव, आपला हा ब्राह्मण सेवकही अशाच उच्च कोटींतील दिसतो. त्याची सुंदर आजानुबाहु आकृतीच त्याचें सत्त्वाधिक्य सुचवीत आहे.

गोमुखाच्या तोंडची अशी ही कथा ऐकून राजपुत्र नरवाहनदत्त मनांत अतिशय संतुष्ट झाला.

---

## तरंग ४ था.

### १. युवराजाची मृगया.

एकदां नरवाहनदत्त गोमुखासह रथारूढ होऊन मृगयेकरितां अरण्यांत गेला. संन्यासी प्रलंबबाहुही अश्वादिकांचें उल्लंघन करून पायींच त्याच्यापुढें चालला. राजा रथावर बसूनच बाणांनीं सिंहव्याघ्रादिकांस मारीत सुटला. पण प्रलंबबाहूनें पायीं चालत जाऊन केवल तरवारीच्या सहायानें अनेक सिंहादिकांस भूमीवर मारून पाडलें. तें त्याचें शौर्य व जंघांचा वेग पाहून नरवाहनदत्ताला फार विस्मय वाटला. कांहीं वेळानें

मृगया करून थकलेला तो राजपुत्र तहान लागल्यामुळें पाण्याचा शोध करीत एका मोठया अरण्यांत शिरला. त्यांत फुललेल्या सुवर्णकमलांनीं सुशोभित असें एक अपूर्व सरोवर त्याला दिसलें. त्याच्या तीरावर थोडी विश्रांति घेऊन त्या सर्वांनीं त्यांत स्नान केलें, व त्याचें मधुर जल प्राशन केलें.

## २. श्वेतद्वीपगमन, व अप्सरांसह परतणें.

इतक्यांत नरवाहनदत्ताला त्या सरोवराच्या एका बाजूस चार दिव्य पुरुष दिसले. आकृतीप्रमाणेंच त्यांचीं वस्त्रें व भूषणें होतीं. ते त्या सरोवरांतील सुवर्णकमलें उपटून घेत होते. युवराज कौतुकानें त्यांच्यापाशीं गेला. तेव्हां त्यांनीं 'तूं कोण आहेस?' असा त्याला प्रश्न केला. तेव्हां राजपुत्रानें आपला वंश व वृत्तांत सांगून त्यांना उलट प्रश्न केला. तेव्हां ते म्हणाले,—'महासागरामध्यें नारिकेलद्वीपांत मैनाक, वृषभ, चक्र व बलाहक असे चार पर्वत आहेत. त्यांवर आम्ही चौघे रहातों. आमच्यांतील एकाचें नांव रूपसिद्धि असून तो विविधरूपें धारण करितो. दुसरा प्रमाणसिद्धि, त्याला मोठें व लहान प्रमाण कळतें. तिसरा भूत, वर्तमान व भविष्य जाणणारा ज्ञानसिद्धि, व चवथा सर्व देवतांची सिद्धि धारण करणारा देवसिद्धि आहे. आम्ही हीं सुवर्ण कमलें घेऊन श्वेतद्वीपांतील श्रीपतीचें पूजन करावयास जाणार आहों. आम्हीं सर्व त्याचे भक्त असून त्याच्या प्रसादानें आपापल्या पर्वताचें रक्षण करीत असतों. आम्ही सिद्धिमान् आहों. पाहिजे असल्यास तूंही आमच्या बरोबर आकाशमार्गानें चल म्हणजे तुलाही त्या प्रभूचें दर्शन होईल.

युवराजानें त्यांचें म्हणणें मान्य केलें, व जेथें जल आणि फळें विपुल आहेत, अशा त्या सरोवराच्या कांठींच गोमुखादिकांस आपली वाट पहावयास सांगून तो त्यांच्याबरोबर श्वेतद्वीपास निघाला. त्यांतील देवसिद्धीनें त्याला आपल्या मांडीवर बसवून घेतलें होतें. आकाशांत फार दूर उडून गेल्यावर ते एकाएकीं खालीं उतरले. ज्याच्या बाजूस लक्ष्मी उभी आहे, पायांपाशीं पृथ्वी आहे, मूर्तिमान् शंख. चक्र, गदा व पद्म ज्याची सेवा करीत आहेत, गंधर्व व नारदादिक भागवत ज्याच्या पुढें भक्तीनें गात आहेत, देव सिद्ध व विद्याधर ज्यास प्रणाम करीत

आहेत व गरुड ज्याच्यापुढें बसला आहे, अशा शेषशय्यागत हरीला पाहिलें. साधुसमागम कोणाच्या अभ्युदयास कारण होत नाहीं.'*

त्यानंतर देवपुत्रांनीं व कश्यपादिकांनीं ज्याची स्तुति केली आहे, अशा ह्या प्रभूची स्वतः नरवाहनदत्तही हात जोडून स्तुति करूं लागला. हे भगवन् भक्तकामकल्पद्रुम, तुला नमस्कार असो. लक्ष्मीरूपी कल्पलतेनें तुझा आश्रय केला आहे. तूं आपल्या भक्तांचे मनोरथ पुरवीत असतोस. सज्जन-मानसीं रहाणाऱ्या तुज दिव्य हंसाला नमस्कार असो. गुणातीत, सर्वांतर्यामी, षड्गुणैश्वर्यसंपन्न व पराकाशांत विहार करणाऱ्या तुला मी प्रणाम करितों. ब्रह्मदेव सहस्रपाद् असतांनाही तुझ्या नाभिकमलीं वेदाध्ययनरूप मधुर गुंजारव करीत षटपदा-भ्रमरा-प्रमाणें आसक्त होऊन रहातो. भूमि हे तुझे पाद, आकाश मस्तक, दिशा कर्ण, चंद्र-सूर्य नेत्र व ब्रह्माण्ड उदर आहे. हे नाथ, दीप्त अग्नीपासून जशीं किटाळें, त्याप्रमाणें तुज तेजोनिधीपासून हा सर्व भूतसमुदाय व्यक्त होतो. सायंकाळीं सर्व प्राणी जसे आपापल्या निवासस्थानीं येऊन रहातात, त्याप्रमाणें प्रलय समयीं सर्व जीव तुझ्यामध्यें येऊन विश्रांति घेतात. क्षुब्ध झालेला सागर जसा अनेक तरंग उत्पन्न करतो, त्याप्रमाणें तूं आपल्या अंशभूत अशा या अनेक भुवनेश्वरांस निर्मितोस. तूं विश्वरूप ( सर्वरूप ) असूनही अरूप, सर्व कर्मा असूनही अक्रिय, व विश्वाधार असूनही अनाधार आहेस. तेव्हां अशा तुझें तत्त्व कोण जाणणार ? तुझ्या प्रसन्न नेत्रकटाक्षानेंच देवांना विविध ऋद्धि प्राप्त होत असते. प्रभो, या शरणागतावर प्रसन्न हो. दयार्द्र दृष्टीनें मजकडे पहा.

याप्रमाणें अनन्य मनानें स्तुति करणाऱ्या नरवाहनदत्ताकडे प्रसन्न दृष्टीनें पाहून, हरि नारदास म्हणाला,-'नारदा, पूर्वी क्षीरसागरामध्यें उत्पन्न झालेल्या श्रेष्ठ अप्सरा मी इंद्रापाशीं ठेविल्या आहेत, त्यांस रथांत घालून सत्वर येथें आण.' भगवानाच्या या आज्ञेप्रमाणें नारदानें त्या सर्वजगींना तेथें आणलें. जवळ येतांच मातलीनें रथ उभा केला, व त्या त्यांतून उतरून भगवानापाशीं जाऊन, प्रणाम करून उभ्या राहिल्या. तेव्हां तो नारायण, वत्सराजपुत्रास म्हणाला, 'नरवाहनदत्ता, तूं विद्याधरांचा

* कस्य नाभ्युदये हेतुर्भवेत्साधुसमागमः ।

चक्रवर्ती होणार आहेस, म्हणून मी या अप्सरा तुला देत आहें. तूं यांना उचित भर्ता व त्या तुला योग्य भार्या आहेत. शंकरानें तुला कामावतार निर्मिलें आहे' भगवानाची ही आज्ञा शिरसा मान्य करून, ज्याला भगवत्प्रसाद मिळाला आहे, अशा वत्सराजसुतानें त्याच्या चरणांवर आनंदानें मस्तक ठेविलें. तेव्हां हरि मातलीस म्हणाला, 'अप्सरांसह या नरवाहनदत्ताला तो सांगेल त्या मार्गानें नेऊन त्याच्या येथें पोंचीव.'

त्यावर 'बरें आहे' असें म्हणून व प्रणाम करून, मोठ्या प्रेमानें हरिचरणीं लीन झालेल्या वत्सराजपुत्राला अप्सरांसह इंद्राच्या रथांत बसवून तो देवसारथि वेगानें रथ हांकीत निघाला. ते चौघे देवपुत्रही त्याच्याबरोबर रथांत येऊन बसले होते. त्यांनीं आपल्या नारिकेलद्वीपास चलण्याविषयीं त्याला मोठा आग्रह केला, म्हणून तो तेथें गेला. चारी देवपुत्रांनीं आपापल्या पर्वतावर नेऊन त्याची पूजा केली. मैनाकादि पर्वतांवर तो क्रमानें अप्सरांसह रममाण झाला. वसंतऋतूप्रमाणें निरंतर प्रफुल्लित झालेल्या वनांत तो आपल्या रमणींसह विहार करूं लागला. 'राजपुत्रा, या पहा, वृक्षमंजिऱ्या आपल्या प्रफुल्लित व मोठ्या पुष्परूपी नेत्रांनीं येणाऱ्या वसंताकडे पहात आहेत. हीं फुललेलीं असंख्य कमलें आपल्या जन्मभूमीला सूर्यकिरणांचा ताप होऊं नये, म्हणूनच सरोवराला सर्वतः आच्छादित करीत आहेत; पहा! नुकत्याच फुललेल्या तेजस्वी कर्णिकार पुष्पाजवळ येऊनही त्याला सुवास नाहीं, असें कळतांच हे भ्रमर, साधू जसे नीच श्रीमानाला सोडतात त्याप्रमाणें त्यांना सोडून जात आहेत; पहा! कोकिलांचे ध्वनी, किन्नरींचें गायन व भ्रमरांचे गुंजारव यांच्या योगानें हीं उपवनें कशीं नादयुक्त झालीं आहेत, पहा!' इत्यादि बोलत व अनेक चमत्कार दाखवीत त्या चारी देवदूतांनीं आपापल्या उपवनपंक्तींचा अप्सरांसह त्या धन्य राजपुत्रास परिचय करून दिला. त्यांच्या नगरादिकांचीही उत्तम शोभा त्यानें पाहिली व अप्सरांसह दिव्य भोग भोगले. पुण्यवान् जेथें जातात तेथें त्यांच्यापुढें ऋद्धी पळत असतात.*

असो; याप्रमाणें तीन चार दिवस तेथें आनंदानें राहून तो आपल्या चौघां मित्रांस म्हणाला, 'मी आतां पितृदर्शनाकरितां आपल्या कौशांबीस

* सुकृतो यत्र गच्छन्ति तत्रैषामृद्धयोऽग्रतः ।

जातों, तुम्ही सुद्धां तेथें चला. ती आमची राजधानी पहा व आम्हांला कृतार्थ करा.' त्यावर ते म्हणाले, 'त्या नगरीचें सर्वस्व अथवा सार अशा तुला आम्ही पाहिलें आहे, तेव्हां आतां आणखी त्या नगरीस पाहून काय करावयाचें आहे ? विद्या प्राप्त झाल्या म्हणजे तूं आमचें स्मरण कर, एवढेंच तुला सांगणें आहे.' तें ऐकून व 'बरें आहे' असें म्हणून तो अप्सरांसह इंद्राच्या रथांत येऊन बसला व–' गोमुखादिक ज्या सरोवरावर बसले आहेत त्यावरून आपला रथ कौशांबीकडे घेऊन चल '–असें तो मातलीस म्हणाला,–मातलीनेंही त्याच्या इच्छेप्रमाणें केलें. त्या सरोवरापाशीं येतांच आपलीच क्षणोक्षणीं चातकाप्रमाणें वाट पहात बसलेल्या गोमुखादिकांस 'आपल्या मार्गानें तुम्ही घरीं या, तेथें सर्व वर्तमान सांगेन,' असें म्हणून तो वेगानें तसाच पुढें कौशांबीस गेला.

आपल्या पूज्य राजधानीपाशीं येतांच मातलीला रथ भूमीवर न्यावयास सांगून अप्सरांसह नरवाहनदत्त खालीं उतरला, व त्या देवसारथ्याला मोठ्या आदरानें परत पाठवून दिव्य स्त्रियांसह अंतःपुरांत गेला. अप्स-रांना तेथें ठेवून तो पिता व वासवदत्ता आणि पद्मावती माता यांच्याकडे गेला. त्याला पहातांच तीं तिघेंही आनंदित झालीं. चरणावर मस्तक ठेवणाऱ्या त्याचें त्यांनीं अभिनंदन केलें. इतक्यांत रथारूढ गोमुख व प्रलंबबाहु तेथें येऊन पोंचले. नंतर सर्व मंत्री बसले असतां पित्याच्या आज्ञेनें युवराजानें सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून 'ईश्वर ज्या पुण्य-वानावर अनुग्रह करण्याची इच्छा करतो त्याला आधीं तो उत्तम मित्रांचा समागम देतो,* ' असें सर्व म्हणूं लागले. गोमुखानें अंतःपुरांतून त्या नव्या दिव्य सुनांना श्वशुर व सासू यांच्या पाया पडण्याकरितां आणलें. तेव्हां वत्सराजानें हरीच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या त्यांचीं नांवें विचारिलीं असतां त्यांच्या चेटींनीं देवरूपा, देवरति, देवमाला व देवप्रिया अशीं त्यांचीं नांवें सांगितलीं. तेव्हां 'मी कोठें व या अप्सरा कोठें ! खरोखर या नरवाहन-दत्त–पुत्रानें भूलोकीं असलेल्या मला अमरावती केलें आहे' असें म्हणूनच जणुं काय कौशांबी लाल पताकांच्या योगानें आनंदानें नाचूं लागली.

---

* ददाति तस्य कल्याणमित्रसंयोगमीश्वरः ।
इच्छत्यनुग्रहं यस्य कर्तुं सुकृतकर्मणः ॥

असो; याप्रमाणें आईबापांच्या नेत्रांस ज्यानें आनंद दिला आहे, असा नरवाहनदत्त आपल्या अंतःपुरांत गेला, व त्यानें अतिशय उत्सुक झालेल्या आपल्या भार्यांना आनंदित केलें. चार वर्षांच्या विरहव्यथेचा अनुभव आल्यामुळें कृश झालेल्या त्यांनींही आपल्या विरहव्यथेचें वर्णन करून त्याचें अभिनंदन केलें. गोमुखानें वनवासांत रथांच्या घोड्यांचें रक्षण करणाऱ्या प्रलंबबाहूच्या शौर्याचें वर्णन केलें. याप्रमाणें तो महाभाग्यशाली राजपुत्र कानांस आनंद देणारे अनेक आलाप ऐकत, नेत्रांस तृप्त करणारें रमणीय कांतांचें रूप पहात, सचिवांसह अनेक प्रेमाच्या गोष्टी बोलत व मधून मधून चित्ताला उत्साह देणारें मद्य प्राशन करीत पित्याच्या येथें काल घालवूं लागला.

## ३. रुद्र-वैश्याची कथा.

एकदां सचिवांसह राजपुत्र अलंकारवतीच्या अंतःपुरांत बसला असतां त्यानें बाहेर झालेला वाद्यांचा कोलाहल ऐकला; व 'अकस्मात् हा ध्वनि कोठून बरें येत आहे ?' असें आपल्या हरिशिख सेनापतीला विचारलें. तेव्हां तो बाहेर जाऊन एका क्षणांत परत आला, व म्हणाला, "देव, रुद्र म्हणून एक वैश्य या नगरांत आहे. तो व्यापाराकरितां सुवर्णद्वीपास गेला होता, पुष्कळ धन मिळवून परत येत असतांना समुद्रांत त्याचें जलयान बुडालें, त्यामुळें मूळ भांडवल व लाभ या सर्वांचा नाश होऊन तो स्वतः मरतां मरतां वांचून कसा तरी सहा दिवसांनीं घरीं येऊन पोंचला. पुढें त्याला आपल्याच बागेंत दैववशात् मोठा निधि सांपडला. तेव्हां त्याच्या भाऊबंधांच्या तोंडून वत्सराजाला ती गोष्ट कळली. त्यानंतर रुद्रानेंही स्वतः येऊन 'मला मोठा निधि सांपडला आहे, आपली आज्ञा होत असेल तर आणून देतों' असें राजाला म्हटलें. पण त्यावर महाराज म्हणाले, 'समुद्रानें तुझें अगणित द्रव्य लुबाडून घेतलें व त्यामुळें तूं दीन झाला आहेस, असें पाहून दयाळु ईश्वरानेंच तुला तो निधि अर्पण केला आहे. तेव्हां कोणता शहाणा त्याचा अपहार करणार आहे ? यास्तव जा. आपल्या भूमींत देवाच्याच इच्छेनें मिळालेल्या त्या धनाचा तूं यथेच्छ उपभोग घे.' वत्सेश्वराची ही आज्ञा ऐकून अतिशय आनंदित झालेल्या रुद्रानें राजचरणांवर मस्तक ठेवलें, व आतां तो अनुगांसह मोठ्या हर्षानें वाद्यें वाजवीत आपल्या घरीं परत जात आहे."

हें ऐकून व आपल्या पित्याच्या असामान्य उदारतेची प्रशंसा करून विस्मित झालेला नरवाहनदत्त सचिवांस म्हणाला, 'दैव अगोदरच धन-हरण करतें कां, व मग देतें कां, खरोखर तें प्राण्यांच्या उच्च नीच दशांच्या द्वारा खेळतच असतें!' तें ऐकून गोमुख म्हणाला—'प्रभो, अगदीं खरें आहे. दैवाची गति अशीच आहे. याविषयीं समुद्रशूराची कथा सांगतों ती ऐका.'—

## ४. समुद्रशूराची कथा.

पूर्वी हर्षपुर नगरांत समुद्रशूर म्हणून एक श्रीमान् व धार्मिक वैश्य रहात होता. तो एकदां वाणिज्याकरितां सुवर्णद्वीपास जात असतांना समुद्र-तीरावर पोचतांच एका होडींत बसला. बराच मार्ग चालून जाऊन सुवर्णद्वीप थोडेंसेंच दूर राहिलें असतां एकाएकीं मोठें वादळ सुटलें. समुद्र खवळला, अतिवृष्टि होऊं लागली व तरंगांच्या असह्य वेगांत सांपडलेली ती नौका मकराच्या पुच्छाच्या आघातानें फुटून बुडाली. तेव्हां कंबर बांधून तो पोहूं लागला. इतक्यांत त्याला एक वहात आलेलें मृत शरीर सांपडलें. त्याचा त्या वैश्यानें आश्रय केला. कांहीं वेळानें वादळ थांबलें, अनुकूल वारा वाहूं लागला, समुद्र शांत झाला, व तो सुवर्णद्वीपाजवळ येऊन पोंचला. तीरावर येतांच तो शवावरून उतरला; व त्याच्या कंबरेस गांठ मारलेलें एक वस्त्र घट्ट बांधलेलें आहे असें पाहून, समुद्रशूरानें तें सोडलें. तों त्यांत त्याला दिव्य रत्नमय हार सांपडला. त्यांतील प्रत्येक रत्न अमूल्य असल्यामुळें समुद्रांत बुडालेलें धन त्याला कस्पटासारखें तुच्छ वाटलें. समुद्रस्नान करून तो तसाच पुढें निघाला. कांहीं वेळानें त्याला कलशपुर लागलें. तेव्हां त्यांत शिरून तो एका मंदिरांत गेला, व मोठ्या कष्टकर जलप्रवासामुळें अतिशय थकलेल्या त्याला शीतल छायेंत झोंप लागली. नंतर नगररक्षक तेथें आले. त्यांनीं त्याच्या हातांतील कंठा पाहिला; व हाच आमच्या चक्रसेना-राजकन्येच्या कंठांतून चोरीस गेलेला कंठा आहे, असें ओळखलें. अर्थात् हाच चोर आहे, असें जाणून त्याला ते राजकुलांत घेऊन गेले.

न्यायासनापुढें उभा करून स्वतः राजानें प्रश्न केला, तेव्हां समुद्रशूरानें त्याला खरी वार्ता सांगितली. पण क्षुब्ध झालेल्या राजाला ती खरी वाटली नाहीं. 'हा चोर खोटें सांगत आहे, हा पहा त्याच्या हातांतील

हार ' असें बोलून राजा जों हात पसरून सर्व सभासदांस दाखवीत आहे, तों एकाएकीं एक गृध्र वेगानें आला व तो हार घेऊन पार कोठें निघून गेला. पण राजानें त्या वैश्यास वधदंड सांगितलाच. त्याबरोबर राजदूत त्याला वधस्थानीं नेऊं लागले. बिचारा वाणी धाय मोकलून रडूं लागला, व या प्रसंगीं श्रीशंकरावांचून दुसऱ्या कोणाचा आधार नाहीं, असें जाणून तो त्याची स्तुति करूं लागला. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं,–'राजन्, याला मारूं नकोस. हा हर्षपुराहून तुझ्या देशांत आलेला सज्जन वाणी आहे. ज्या चोरानें तुझ्या कन्येचा कंठा चोरला होता, तो नगररक्षकांच्या भीतीनें विव्हल होऊन रात्रीं समुद्रांत जाऊन पडला व मेला. होडी फुटून संकटांत पडलेल्या याला त्याचें शव सांपडलें, व त्याच्यावर बसून हा या द्वीपास येऊन पोंचला. तीरावर आल्यावर त्याच्या कंबरेस वस्त्रांत गुंडाळून बांधलेला हार सांपडला. यास्तव या निरपराध्याला न मारतां सन्मानपूर्वक सोडून दे, हा मोठा धार्मिक व गुणी पुरुष आहे.'

ही अशरीरिणी वाणी ऐकून राजा संतुष्ट झाला, व त्याला बंधापासून सोडवून आणि सन्मानपूर्वक पुष्कळ धन देऊन स्वदेशीं जावयास सांगितलें. तेव्हां अनायासानेंच धन मिळालें आहे असें पाहून, तो पुनः भयंकर समुद्रांतून नौकेच्या आश्रयानें परत येऊं लागला. सुदैवानें त्याचा जलप्रवास निर्विघ्नपणें पार पडला. उत्तरतीरावर पोंचल्यावर व्यापाऱ्यांच्या संघाबरोबर हर्षपुरास परत येऊं लागला. एके दिवशीं संध्याकाळीं तो सर्व संघ एका अरण्यांत उतरला असतां रात्रीं चोरांच्या टोळीनें त्याला गांठलें. निर्दय लुटारूंनीं त्यांतील पुष्कळ लोकांना मारलें. तेव्हां समुद्रशूर जिवाच्या आशेनें धनादि सर्व सोडून तेथून पळून गेला व जवळच्याच एका वटवृक्षावर चढून बसला. चोरांनीं राहिलेल्या लोकांना मारून सर्व धन लुटून नेलें. तो सर्व भयंकर प्रकार प्रत्यक्ष पाहून भयभीत झालेल्या समुद्रशूरानें ती रात्र मोठ्या चिंतेनें त्या वृक्षावरच घालविली. उजाडल्यावर आतां पुढें काय करावें, कोठें जावें, असें जों तो म्हणत आहे, तोंच त्याची दृष्टि झाडाच्या मागच्या बाजूला गेली. तेथें दाट पानांमध्यें दिव्याच्या ज्योतीसारखी एक ज्योत दिसली. म्हणून तें काय आहे तें पहाण्याकरितां तो जवळ गेला. तों त्याला तेथें एक गृध्राचें घरटें आढळलें. त्यांत अनेक अमूल्य रत्नांचा संग्रह होता. तो सर्व त्यानें

काढून घेतला. तों त्यामध्ये गृध्रानें स्वर्णद्वीपांतील राजाच्या हातांतून नेलेला कंठाही त्याला दिसला. असो; याप्रमाणें अमित द्रव्य मिळालें असतां तें सर्व घेऊन तो खालीं उतरला, व मोठ्या हर्षानें हर्षपुरास जाऊन सर्व परिवारासह मोठ्या सुखानें काल घालवूं लागला.

प्रभो, या वैश्यानें समुद्रांत बुडणें, त्यांतून तरून पार जाणें, हाराची प्राप्ति होणें, चोरीचा आळ व वधदंड होणें, व आकाशवाणीमुळें त्यांतून सुटून धन मिळणें, परत येतांना चोरांचा त्रास, धननाश व शेवटीं अकस्मात् अमूल्य रत्नांचा लाभ, अशा क्रमानें अनेक इष्टानिष्ट अवस्थांचा अनुभव घेतला, तेव्हां विधिचेष्टित कसें विचित्र असतें, तें पहा! पण जो पुण्यवान् असतो तो महत् दुःख भोगूनही शेवटीं सुखी होतो.*

गोमुखानें सांगितलेली ही गोष्ट ऐकून व 'खरें आहे' असें म्हणून राजपुत्र उठला व स्नान–संध्यादि नित्य–नैमित्तिक क्रिया करूं लागला. दुसऱ्या दिवशीं सभेमध्यें बसलेल्या त्याच्याजवळ समरतुंग नांवाचा एक शूर व बालसेवक येऊन म्हणाला, "देव, माझ्या संग्रामवर्ष–दायादानें आपल्या वीरजितादि चार पुत्रांसह माझा देश उध्वस्त करून सोडला आहे. यास्तव मी आतां जाऊन त्या पांची जणांना बांधून आणतों. आपल्याला हें कळलेले असूं दे." असें बोलून तो तसाच तेथून निघाला. पण याच्यापाशीं अल्प सैन्य असून याच्या शत्रूपाशीं पुष्कळ सैन्य आहे, असें जाणून राजपुत्रानें आपले शूर शिपाई त्याच्या साह्यास पाठविले. परंतु त्यांचें सहाय न घेतां त्या मानी बालकानें पांची जणांस जिंकलें, व एकेठिकाणीं बांधून आणिलें. विजयी होऊन आल्यावर त्याचा नरवाहनदत्तानें मोठा सन्मान केला, व त्या आपल्या सेवकाची त्यानें प्रशंसाही केली. 'सर्व देश जिंकून स्थिर होऊन राहिलेल्या आणि पांच प्रबल इंद्रियांप्रमाणें प्रबल असलेल्या शत्रूंना यानें जिंकलें हें मोठेंच आश्चर्य होय.' असें त्यानें मोठ्या आनंदानें म्हटलें. तेव्हां गोमुख म्हणाला,–'देव, चमरबाल राजाची कथा सांगतों ती ऐका.'

---

* सुकृती चानुभूयैव दुःखमप्यश्नुते सुखम् ॥

## ५. चमरबाल राजाची कथा.

हस्तिनापुरांत चमरबाल या नांवाचा कोष, दुर्ग व सैन्य यांनीं युक्त असा एक राजा होता. समरबलादि त्याच्या पांच दायादांच्या राज्यांच्या सीमा याच्या राज्यास भिडल्या होत्या. म्हणून त्या सर्व शेजारच्या राजांनीं मिळून असा संकेत केला कीं, आमच्या पैकीं एकेकाला हा चमरबाल सतत पीडा देत असतो. यास्तव आपण सर्व मिळून याचा पराभव करूं या. हा संकेत सर्वांस मान्य झाला. नंतर उत्तम ज्योतिष्यांस त्यांनीं चांगला मुहूर्त विचारला. तेव्हां पुष्कळ गणित केल्यावर ते त्यास म्हणाले,-" या वर्षांत एकही विजयी लग्न नाहीं. त्यांतूनही शुभ लग्नाची अपेक्षा न करितां जर तुम्ही जाल, तर तुमचा पराभव होईल. उगीच युद्धाचा आग्रह कशाला धरतां ? आहे त्या समृद्धीचाच चांगला उपभोग घ्या. दोघां वाण्यांची कथा तुम्हांला ठाऊक नसल्यास आम्ही सांगतों ती ऐका.'

## ६. यशोवर्म्याची कथा.

कौतुकपुर म्हणून एक नगर आहे. तेथें पूर्वी बहुसुवर्णक राजा राज्य करीत असे. यशोवर्मा म्हणून त्याचा एक तरुण क्षत्रिय सेवक होता. पण त्या उदार राजानें त्याला कधीं कांहीं दिलें नाहीं. अतिशय दुःखी होऊन त्यानें कधीं कांहीं मागितल्यास तो सूर्याकडे बोट दाखवून 'मी कांहीं द्यावें असें नेहमी मनांत आणतों, पण हा भगवान् मला देऊं देत नाहीं. काय करूं, सांग ?' असें म्हणत असे. तेव्हां योग्य अवसराची वाट पहात तो द्रव्याभावीं फार दुःखित होऊन काल घालवीत असतां एकदां सूर्यग्रहण आलें. तेव्हां उदार हातानें दानें देण्यांत निमग्न झालेल्या बहुसुवर्णकापाशीं जाऊन तो सतत सेवा करणारा यशोवर्मा हात जोडून म्हणाला,-'प्रभो, तुम्हांला जो सूर्य मला कांहीं देऊं देत नाहीं, तो हा आतां वैऱ्याकडून ग्रस्त झाला आहे. यास्तव तो या अरिष्टांतून सुटला नाहीं तोंच मला कांहीं तरी द्या.' तें त्याचें युक्तीचें भाषण ऐकून व हंसून राजानें सर्व दानें देऊन झाल्यावर त्याला वस्त्रें व धन दिलें. पण कांहीं दिवसांनीं तें धन संपलें, व राजाही पुनः कांहीं देईना. इतक्यांत दारिद्र्यानें पीडलेली त्याची पत्नीही मेली. त्यामुळें अति विरक्त झालेला तो विंध्यवासिनीकडे गेला. ' जिवंत अस-

तांनाही मृततुल्य अशा या व्यर्थ शरीराला घेऊन मला काय करावयाचें आहे, मी आतां या शरीराचा या भवानीपुढें त्याग तरी करितों, अथवा तिच्यापासून इष्ट संपादन करितों.' असा विचार करून तो त्या देवीपुढें दर्भ हांतरून त्यावर एकाग्र मनानें बसला; व कांहीं एक न खातां मोठें तप करूं लागला. कांहीं दिवसांनीं देवी त्याच्या स्वप्नांत येऊन म्हणाली,– 'वत्सा, मी तुला अर्थश्री देऊं, कीं भोगश्री देऊं?' देवीचा हा प्रश्न ऐकून यशोवर्मा हात जोडून म्हणाला,–'आई, या दोन प्रकारच्या श्रींतील भेद मला कळत नाहीं' त्यावर देवी म्हणाली–तर मग तुझ्या देशांत भोगवर्मा व अर्थवर्मा म्हणून जे दोन वैश्य आहेत त्यांची श्री तूं जाऊन पहा, व त्यांतील जी तुला हवी असेल ती मागून घे.–तें ऐकून यशोवर्मा जागा झाला. सकाळीं त्यानें पारणें केलें, व परतून आपल्या कौतुकपुरास आला.

## ७. भोगवर्मा व अर्थवर्मा यांचा वृत्तांत.

स्वदेशास येऊन पोचतांच तो अगोदर अर्थवर्म्याच्या येथें गेला. असंख्य सुवर्ण, रत्नें, इत्यादिकांचा व्यापार करून त्यानें विपुल संपत्ति मिळविली होती. त्याची सर्व संपत्ति पाहून तो स्वत: यजमानाकडे गेला. तेव्हां त्यानेंही उचित आतिथ्य करून यशोवर्म्याला जेवावयास बोलाविलें. घृत, मांस, शाक, भाजी, चटण्या, कोशिंबरी, भात, पोळी, वरण, लिंबु, क्षीर, कढी, इत्यादि पदार्थांचें सुग्रास भोजन त्यानें त्याच्या पंक्तीला बसून खाल्लें. पण स्वतः अर्थवर्मा अगदीं थोडें तूप, सातु, दोन घास भात, थोडेंसेंच मांस व भाजी जपून जपून खात आहे, असें पाहून यशोवर्मा म्हणाला 'हें काय, तुम्ही असें अगदीं थोडेंसें कां जेवतां?' त्यावर तो वैश्य म्हणाला, 'आज तुमच्या अनुरोधानें मी मांस, भाजी, रोजच्यापेक्षां दुप्पट तूप व हे सातू खात आहें. पण माझा अग्नि मंद असल्यामुळें मला यापेक्षां अधिक अन्न पचतच नाहीं.' तें त्याचें म्हणणें ऐकून यशोवर्मा मनांत म्हणाला–'असल्या निष्फल संपत्तीला घेऊन काय करावयाचें आहे? असल्या संपत्तीला धिक्कार असो.' नंतर सायंकाळींही अर्थवर्म्यानें यशोवर्म्याकरितां दूध–भात आणविला, व त्यानेंही त्याचा यथेच्छ समाचार घेतला. अर्थवर्म्यानें मात्र एकच घोट दूध घेतलें. त्यानंतर रात्रीं ते दोघे एकाच मोठ्या दालनांत निजले. मध्यरात्रीच्या सुमारास यशोव-

र्म्यानें स्वप्नांत हातांत काठ्या घेऊन निःशंकपणें आंत आलेले चार भव्य पुरुष पाहिले. ते भयंकर दुष्ट आंत येऊन 'आज तूं अधिक तूप, मांस व दूध कां खाल्लेंस ? मूर्खा, तुला धिक्कार असो ' असें म्हणाले व त्या दीन वैश्याला रागानें काठ्यांनीं मारूं लागले. त्याच्या पोटांत जेवढें घृत, मांस व दूध अधिक गेलें होतें, तेवढें सर्व त्यांनीं ओढून काढलें.

हें स्वप्न पाहून यशोवर्मा जों जागा होत आहे, तों जागा झालेल्या अर्थवर्म्याच्या पोटांत शूल उठला आहे व त्यामुळें तो मोठ्यानें ओरडत असून नोकर लोक त्याच्या पोटाला तेल चोळीत आहेत, असें दिसलें. कांहीं वेळानें त्याला उलटी झाली व खाल्लेल्या अन्नादिकांतील बराच भाग पडला. त्यामुळें त्याचा शूलही थांबला. हा सर्व चमत्कार पाहून यशोवर्मा म्हणतो–'जिच्या भोगापासून हा असा भयंकर ताप होतो, त्या अर्थश्रीला धिक्कार असो. मला असल्या संपत्तीची मुळींच गरज नाहीं.' त्यानंतर राहिलेली रात्र तेथेंच घालवून दुसऱ्या दिवशीं उजाडतांच अर्थवर्म्याचा निरोप घेऊन तो भोगवर्म्याकडे गेला. त्यानेंही या पाहुण्याचा योग्य सत्कार केला, मोठ्या आदरानें त्यानें त्यास जेवावयास बोलाविलें. पण यशोवर्म्याला त्याची मोठी संपत्ति कोठें दिसली नाहीं. एक चांगलें घर, वस्त्रें व आभरणें मात्र त्याच्या येथें होतीं. नंतर यशोवर्म्यासमक्षच तो आपला उचित व्यापार करूं लागला. त्याच्यापाशीं मूळ भांडवल मुळींच नव्हतें; पण एकापासून थोड्या व्याजाची रक्कम घेऊन दुसऱ्याला अधिक व्याजानें द्यावयाची व त्यांत जो फायदा होईल त्यावर सचोटीनें निर्वाह करावयाचा, असा त्याचा व्यवहार चालला होता. त्याच्या शुद्ध व्यवहाराचा फायदा पुष्कळ लोक घेत होते. त्यामुळें त्याला प्रत्यहीं जो लाभ होई तो, तो आपल्या भार्येकडे घरखर्चाकडे पाठवी व तीही साध्वी घरची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवून पतीसह आनंद भोगीत असे. असो, भोजनाची वेळ होतांच त्याचा एक इच्छाभरण नांवाचा मित्र आला व म्हणाला, ' मित्रा, चल, आपले सर्व मित्र एकत्र जमून व तुझीच वाट पहात आहेत. ' पण त्यावर भोगवर्मा म्हणाला–'मित्रा, आज मी येत नाहीं. आमच्या येथें हा पाहुणा आला आहे, त्याला सोडून मी कसा येऊं ? आज मला सोड. मी पुनः कधीं तरी येईन.'

पण त्यावर इच्छाभरण म्हणाला—'नाहीं आजच आलें पाहिजे. पाहुण्यालाही घेऊन चल, मग तर झालें. कारण हा जसा तुझा तसा आमचाही मित्रच आहे. असें म्हणून आग्रहानें तो त्या दोघांनांही घेऊन गेला. तेथें पोचल्यावर मित्रसमाजांत बसून त्यांनीं यथेच्छ भोजन केलें. उत्तम पेयें प्यालीं व सायंकाळीं घरीं आल्यावरही पुनः फराळ केला. रात्रीं निजतांना भोगवर्मा पहाटे पाणि प्यावयास कांहीं आहे कीं नाहीं, असें सेवकांस विचारूं लागला. तेव्हां त्यांनीं ' स्वामिन्, आज कांहीं उरलें नाहीं ' असें म्हटलें. तें ऐकून ' तर मग मी पहाटेस काय खावूं ? ' असें म्हणून मोठ्या कष्टानें शय्येवर निजला. यशोवर्माही त्याच्याच बाजूस निजला. रात्रीं त्याला तेथेंही स्वप्न पडलें. त्यांत दोन पुरुष पुढें येत असून त्यांच्या मागून दुसरे दोघे तिघे हातांत काठ्या घेऊन आंत येत आहेत असें त्याला दिसलें. त्यांनीं पुढें आलेल्या दोघांस काठ्यांनीं मारून ' भोगवर्म्याला लागणारें भक्ष्य तुम्ही तयार करून कां दिलें नाहीं. ' म्हणून दरडावून विचारलें. तेव्हां ' महाराज चुकलों, पुनः असें करणार नाहीं. ' असें म्हणून त्या दोघांनीं त्यांची क्षमा मागितली. इतक्यांत यशोवर्मा जागा झाला, व अगदीं स्वस्थपणें निजलेल्या भोगवर्म्याकडे पाहून मनांत म्हणाला—' खरोखर अनायासानें अकस्मात् मिळालेली व यथेच्छ सुखोपभोग देणारी या भोगवर्म्याची अल्प संपत्तीच प्रशस्त असून अर्थवर्म्याची फार मोठीही संपत्ति कांहीं कामाची नाहीं.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं उजाडतांच त्या सुखी भोगवर्म्याचा निरोप घेऊन यशोवर्मा विंध्यवासिनीकडे गेला. तिच्यापाशीं त्यानें भोगवर्म्याची श्री मागितली, व प्रसन्न झालेल्या देवीनेंही ती त्याला तत्काल दिली. नंतर आपल्या घरीं येऊन तो अकस्मात् प्राप्त होणाऱ्या संपत्तीचा यथेच्छ उपभोग घेत राहिला. सारांश, प्रभो, भोगसंपन्न अति अल्प संपत्तीही उत्तम असून भोगरहित असलेली फार मोठी संपत्तीही व्यर्थ आहे.* यास्तव चमरबालराजाच्या कृपण संपत्तीला जिंकून काय करावयाचें आहे ? यापेक्षां दान व भोग यांनीं संपन्न असलेल्या आपल्याच संपत्तीचें

* तदेवं भोगसंपन्ना श्रीरप्यल्पतरा वरम् ।
न पुनर्भोगरहिता सुविस्तीर्णाप्यपार्थका ॥

चांगलें निरीक्षण करा. त्या राजावर चाल करून गेल्यास तुमचें मुळींच हित होणार नाहीं. कारण या वेळीं उचित यात्रालग्न मिळत नाहीं, व जयही मिळेलसें वाटत नाहीं.

ज्योतिष्यांनीं असें सांगितलें होतें तरी ते पांची असहिष्णु राजे चमरबालावर चाल करून निघाले. आपले वैरी लढण्याकरितां सीमेवर आले आहेत असें कळतांच त्यानेंही युद्धाची तयारी केली; पण बाहेर निघायाच्या पूर्वी स्नान करून त्यानें शंकराची पूजा व उत्तम स्तुति केली. त्यामुळें तो भोलानाथ प्रसन्न झाला, व-' राजन् तूं निःशंकपणें युद्ध कर, तुला विजय मिळेल ' असा आकाशवाणीच्या द्वारा त्यानें त्याला इष्ट वर दिला. त्यामुळें अधिकच हृष्ट झालेला तो ससैन्य सज्ज होऊन शत्रूंवर गेला. त्याच्या सैन्यापेक्षां शत्रुसेना पांच पट अधिक होती, पण दैव व पुरुषार्थ या दोघांचा आश्रय करून चमरबालानें आपल्या वीरनामक अग्रगामी प्रतीहाराच्या मागोमाग शत्रुसैन्यांत प्रवेश केला, व जवळ थोडें सैन्य असतांनाहि त्यानें शत्रूचे घोडे, हत्ती, पायदळाचे शिपाई व रथ यांना मारून ढीग घातले. बलदेव सेनापति व वीर प्रतीहारी यांच्या सहायानें कालपाशासारख्या पाशांचा उपयोग करून त्यानें आपल्या समरबालादि सर्व शत्रूंस क्रमानें बांधून आपल्या स्वाधीन करून घेतलें. आपले पांची स्वामी शत्रूच्या हातीं सांपडले आहेत, असें पाहून त्यांची राहिलेली सेना वाट फुटेल तिकडे पळून गेली. त्यामुळें चमरबालाला अगणित धन, वाहनें व सेवकवर्ग मिळाला. प्रतापसेन राजाची महादेवी यशोलेखाही त्याच्या हातीं सांपडली. साक्षात् विजयलक्ष्मीप्रमाणेंच असलेल्या त्या उत्तम कामिनीच्या लाभानें चमरबालाला परम संतोष झाला. असो; त्यानंतर तो विजयी राजा आपल्या नगरांत गेला. प्रतीहार वीर सेनापति देवबल यांना शेला पागोटें देऊन त्यानें पुष्कळ धनही अर्पण केलें. मी हिला क्षात्रधर्मानें जिंकलें आहे, असें समजून प्रतापसेनाच्या राणीला म्हणजे यशोलेखेला त्यानें आपली अवरोधवधू केलें, व मला यानें आपल्या भुजबलानें जिंकून आणलें आहे, असें समजून तीही त्याला अनुकूल झाली. काम व मोह यांच्या द्वारा कोणत्याही व्यवहारांत प्रवृत्त झालेल्या लोकांची धर्मवासना मलिन होते.*

---

* काममोहप्रवृत्तानां शबला धर्मवासना ॥

कांहीं दिवसांनीं यशोलेखेनें प्रार्थना केल्यामुळें चमरबाल राजानें बांधून आणलेल्या पांची शत्रूंस अगदीं नम्र करून सोडून दिलें. त्यानंतर तो देवभक्त राजा आपल्या निष्कंटक व समृद्ध राज्याचा यथेच्छ उपभोग घेऊं लागला. युवराज, याप्रमाणें एकटा पुण्यवान् धीरही अनेक पापी, अधीर व अविचारी शत्रूंस सहज जिंकूं शकतो.

गोमुखाची ही गोष्ट ऐकून वत्सराजसुत प्रसन्न झाला. त्यानंतर त्या सर्वांनीं स्नानादि नित्य क्रिया केल्या व अवशिष्ट काल गायनादि मनोरंजक कलांच्या परिचयांत घालविला.

---

## तरंग ९ वा.

### १. मरुभूतीचा वृत्तांत.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं अलंकारवतीच्या अंत:पुरांत बसलेल्या युवराजाकडे मरुभूतीचा सेवक आला. तो त्याच्या अंतःपुररक्षक कंचुकीचा सख्खा भाऊ होता. तो सर्व मंत्र्यांसमक्ष युवराजास म्हणाला–' देव, मी दोन वर्षें मरुभूतीची सेवा केली. यानें मला व माझ्या भार्येला अन्न–वस्त्र दिलें, पण नोकरीस ठेवतांना ठरविल्याप्रमाणें हा माझा पगार देत नाहीं. दरसाल पन्नास दीनार देण्याचें यानें कबूल केलें होतें, पण मागावयास गेलों असतां यानें मला आज लाथा मारिल्या. यास्तव मीं आतां या तुमच्या सिंहद्वारांत बसून प्रायोपवेशन करितों. पण इतकें करूनही आपण माझी दाद न घ्याल तर मी अग्निकाष्ठें भक्षण करीन, यापेक्षां अधिक काय बोलूं, किती झालें तरी हा माझा स्वामी आहे.'

इतकें बोलून तो थांबला असतां मरुभूति म्हणाला, ' मला याचे दीनार द्यावयाचे आहेत, पण यावेळीं मजजवळ नाहींत.' हें त्याचें मूर्खपणाचें भाषण ऐकून सर्व हसूं लागले. तेव्हां नरवाहनदत्त आपल्या त्या मंत्र्याला म्हणाला, ' कोण हा तुझा मूर्खपणा ! हें कांहीं तुला शोभत नाहीं. अगोदर ऊठ व याला सत्वर शंभर दीनार दे.' हें प्रभूचें म्हणणें ऐकून लज्जित झालेला मरुभूति लागलाच घरीं गेला व शंभर दीनार आणून त्यानें त्याला दिले. तेव्हां गोमुख म्हणाला, ' यांत मरुभू-

तीचा कांहीं अपराध नाहीं. कारण प्रजापतीची सृष्टीच अशी विलक्षण आहे, याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.:—

## २. चिरदाता राजाची कथा.

पूर्वी चिरपुराचा अधिपति चिरदाता म्हणून होता. तो स्वतः फार सुजन होता हें खरें, पण त्याचा परिवार दुर्जन होता. एकदां देशान्तराहून आलेला एक प्रसंग नांवाचा मनुष्य दोघां मित्रांसह त्या राजापाशीं सेवक होऊन राहिला. त्याला सेवा करावयास लागून पांच वर्षे झालीं, पण राजानें उत्सवादि प्रसंगींही त्याला कधीं कांहीं दिलें नाहीं. त्यालाही मागावयास योग्य अवसर मिळेना. एकदां त्या राजाचा 'अल्प' पुत्र मेला, तेव्हां सर्व भृत्य दुःखित झालेल्या राजाकडे आले, व त्याच्या सभोंवार बसले. त्यांत हा 'प्रसंग'ही होताच. त्याचे मित्र नको नको म्हणत होते तरी शोकानें व्याकुल झालेला तो राजास अशी विनंति करूं लागला,—' प्रभो, आम्ही तिघेजण फार दिवसांपासून आपली सेवा करीत आहों; पण स्वामीनें आम्हांला आजपर्यंत कांहीं दिलें नाहीं, तरी सुद्धां तुझ्या या बालकाकडे दृष्टि देऊन आम्ही आजवर राहिलों. तूं नाहीं दिलेंस तर तुझा बालक देईल, अशी जी आमची आशा होती, ती आतां आमच्या दुर्भाग्यानें नाहींशी झाली आहे. तेव्हां यापुढें आम्हांला येथें राहून काय करावयाचें आहे, आम्ही आतां येतों.

इतकें बोलून व राजाच्या पायांवर मस्तक ठेवून, दोघां मित्रांसह प्रसंग तेथून निघून गेला. तेव्हां राजा मनांत म्हणतो,—' अहो ! हे माझे दृढ सेवक आहेत. माझ्या पुत्रावरही हे आस्था ठेवून बसले होते; यास्तव असल्या सेवकांना जाऊं देणें बरें नव्हे. असा विचार करून त्यानें त्यांना परत आणविलें व इतकें धन दिलें, कीं पुनः त्यांना दारिद्र्यानें स्पर्श केला नाहीं. तात्पर्य, हे देव, सृष्टींतील प्राण्यांचे असे विचित्र स्वभाव असतात. पहा त्या राजानें योग्य प्रसंगीं थोडेंसेंही दिलें नाहीं; पण तेंच अवेळीं किती तरी दिलें !'

अशी कथा सांगून वत्सेश्वरपुत्राच्या आज्ञेनें गोष्टी सांगण्याच्या कामांत फार चतुर असलेला गोमुख पुनः दुसरी कथा सांगूं लागला—

## १. कनकवर्ष व मदनसुंदरी यांची कथा.

पूर्वी गंगेच्या तीरावर एक नगर होतें. कनकपुर असें त्याचें नांव असून त्यांतील पौरजन गंगाजलानें सदा पवित्र होत असत. तेथील राजाही फार चांगला होता. तो वासुकीनागराजाच्या प्रियदर्शन पुत्रापासून यशोधरा नामक राजकन्येच्या ठायीं झालेला कनकवर्ष नांवाचा महा यशस्वी पुत्र होता. तो सर्व भूभार वाहणारा असूनही सर्व गुणांनीं भूषित असे. त्याला यशाचा फार लोभ असून द्रव्याचा मुळींच नव्हता. तो शत्रूला जरी अगदीं भीत नव्हता, तरी पापाला फार भीत असे. परनिंदेविषयीं तो अगदींच मूर्ख होता हें जरी खरें आहे, तरी शास्त्रामध्यें त्याच्यासारखा निपुण पुरुष विरळाच आढळत असे. त्या महात्म्याचा कोप अगदीं अल्प असून प्रसाद फार मोठा होता. त्याची धनुष्य धारण करावयाच्या वेळीं जशी बद्ध मुष्टि असे, तशी ती दानप्रसंगीं मुळींच नसे. तर दानाच्या वेळीं त्याचा हात मोकळा असे. तो अद्भुतरूपवान् वस्तुतः जरी सर्व जगाचा रक्षक होता, तरी त्याला पाहून स्त्रीजन अतिशय दुःखी होत असे.

एकदां शरदृतूंत गजेंद्र मत्त झाले आहेत, राजहंसकुलास परम आनंद झाला आहे व सर्वजण महोत्सवयुक्त झाले आहेत, अशा वेळीं तो राजा आपल्या सारख्याच गुणवान् मित्राबरोबर करमणूक करण्याकरितां चित्रशाळेंत गेला. कमलांचा सुवास वाहून आणणाऱ्या मंद वायूच्या योगानें तो चित्रप्रासाद अगदीं शीतल झाला होता. तेथील निरनिराळ्या चित्रांकडे पाहून, राजा कनकवर्ष जों त्यांची प्रशंसा करीत आहे, तों प्रतीहार येऊन त्याला म्हणाला,–' प्रभो, विदर्भाहून एक अपूर्व चित्रकार आला आहे. चित्रकर्मामध्यें माझ्यासारखा कोणी नाहीं, असें तो म्हणतो. रोलदेव असें त्याचें नांव असून, त्यानें आपल्या सिंहद्वारावर तशा अर्थाचा एक पडदा लाविला आहे.'

हें त्याचें भाषण ऐकून, राजानें मोठ्या आदरानें त्याला आंत आणावयास सांगितलें. आज्ञेप्रमाणें प्रतीहारानें एका क्षणांत त्याला राजापाशीं आणलें. तेव्हां चित्रकारानें–एका तरुण विलासिनीच्या खांद्यावर डावा हात ठेवून, उजव्या हातानें दुसऱ्या एका पानपात्र धारण करणाऱ्या तरुणीनें दिलेला विडा घेत असलेल्या व चित्रें पाहणाऱ्या–राजाचें दर्शन

घेतलें. अति नम्रपणें वंदन करून तो त्यास हळुच म्हणाला,–' देव, आपल्या या चरणापर्यंत दीनाची दाद लागावी म्हणून मी आपल्या सिंहद्वारावर माझ्या प्रशंसेनें युक्त असा पडदा लाविला. कलाज्ञानाच्या मदानें नव्हे. यास्तव माझ्या त्या उद्धत आचरणाची मला क्षमा करा. मला कांहीं आज्ञा व्हावी. म्हणजे मी एकादें चित्र काढून दाखवीन, व त्यामुळें माझा कलाशिक्षण-प्रयत्नही सफल होईल.'

तें ऐकून राजा म्हणाला, ' उपाध्याय, तूं आपल्याच इच्छेनें पाहिजे तें चित्र काढून दाखीव, म्हणजे आम्ही आमच्या नेत्रांची तृप्ति करून घेऊं. तुझ्या कौशल्याविषयीं आम्हांला मुळीं संशयच नाहीं.' राजाचें हें भाषण संपतांच त्याच्यापाशीं असलेले त्याचे मित्र म्हणाले, ' उपाध्याय, तूं या राजाचें चित्र काढ, दुसऱ्या विरूप आकृतींना काढून काय करावयाचें आहे ? ' तें ऐकून रोलदेव चित्रकार अतिशय संतुष्ट झाला, व त्यानें उंच नाक, दीर्घ व आरक्त नेत्र, विस्तीर्ण ललाट, काळे कुरळे केस, बाणादिकांच्या व्रणांनीं शोभणारें विस्तृत उरःस्थल, दिग्गजांच्या दांतां-प्रमाणें लांब चिंचाळे हात, कृश उदर, स्तंभासारख्या दृढ मांड्या व कोमल पल्लवांप्रमाणें आरक्त वर्ण पादयुगुल, यांच्या योगानें रम्य व सर्व–अवयव-संपन्न असें राजाचें चित्र काढलें. त्यानें मोठ्या कौशल्यानें अगदीं हुबेहुब काढलेलें तें चित्र पाहून राजासह सर्व संतुष्ट झाले. त्यांनीं त्या चित्रकाराला धन्यवाद दिला, व राजाचे मित्र त्याला म्हणाले,–' उपाध्याय, एकट्या राजाला पाहून आमची तृप्ति होत नाहीं. यास्तव या चित्रभिंतीवर लिहि-लेल्या राण्यांतील तुला जी राजाच्या अनुरूप वाटत असेल, तिच्यासह याचें चित्र आम्हांला दाखीव.'

पण राजमित्रांचें तें भाषण ऐकून व राण्यांचीं चित्रें पहून, रोलदेव म्हणाला,–येथें पुष्कळ राण्या काढल्या आहेत; पण त्यांत या राजाला योग्य अशी एकही राणी दिसत नाहीं. फार काय पण याच्या रूपाला अनुरूप अशी एकच कन्या मीं या पृथ्वींत पाहिली आहे. तिची वार्ता मी थोडक्यांत सांगतों ती ऐका. वैदर्भदेशांत कुंडिनपुर आहे, त्यांत देवशक्ति म्हणून प्रसिद्ध राजा आहे. त्याची अनन्तवती म्हणून प्राणाहून प्रिय राणी असून, तिच्या उदरीं त्याला मदनसुंदरी कन्या झाली. तिच्या रूपाचें वर्णन करावयास माझ्यासारखा, एका जिव्हेचा मनुष्य तर अस-

मर्थच आहे. पण तिच्याविषयीं मी इतकेंच सांगतों, कीं तिला निर्माण केल्यावर पुनः तसलीच कन्या उत्पन्न करावी, असें जरी रूप-पक्षपाती ब्रह्मदेवानें मनांत आणलें, तरी तो तसें करण्यास समर्थ होणार नाहीं. तसली दुसरी मूर्ति बनवावयास त्याला कांहीं युगेंच घालवावीं लागतील. ती एक राजकन्या मात्र रूप, लावण्य, विनय, वय व कुल या सर्वांच्या योगानें या प्रभूला उचित भार्या आहे. एकदां मी तिच्या चेटीनें मला बोलावून नेल्यामुळें मी तिच्या अंतःपुरांत गेलों होतों. तों ती अबला कमलपत्रशय्येवर लोळत होती. सख्या तिच्या अंगाला चंदनाच्या ओल्या कल्काचा लेप लावीत होत्या. कमल-नालाचा हार तिच्या गळ्यांत होता. दासी तिला केळीच्या पानानें वारा घालीत होत्या. ती फिकट व कृश झाली होती. तात्पर्य, त्यावेळीं मदन-ज्वराचीं सर्व चिन्हें तिच्याठायीं दिसत होतीं. मी आंत जात आहें तों ती आपल्या सखींना-'बायांनो, तुम्ही चंदनाची उटी, कदलीच्या पानांचा वारा, इत्यादि उपचारांच्या योगानें व्यर्थ श्रम कशाला करितां? हे सर्व उपाय स्वभावतःच जरी थंड आहेत, तरी मज अभागिणीला ते संततच करितात.' असें बोलून त्यांचें निवारण करीत आहे, असें पाहिलें. तिची ती अवस्था पाहून माझ्या मनांत अनेक तर्क उठले. पण जवळ जाऊन व प्रणाम करून मी तिच्या समोर बसलों असतां 'उपाध्याय, मला एक असें रूप काढून दे,' असें म्हणून व कांपणाऱ्या हातांत कुंचला घेऊन तिनें भूमीवर हळू हळू एक आकृति काढली, व तिच्या-प्रमाणें मजकडून सुंदर चित्र काढविलें. प्रभो, तिच्या सांगण्याप्रमाणें तें चित्र काढून झाल्यावर मला वाटलें, कीं हिनें मजकडून हा कामदेवच काढविला आहे. पण त्याच्या हातांत तिनें पुष्प-धनुष्य देवविलें नव्हतें. तेव्हां हा मदन नसून दुसरा कोणी सुंदर पुरुष असावा. या पुरुषाला हिनें कोठें तरी पाहिलें असेल, अथवा त्याचें रूप कोणाच्या तोंडून ऐकलें असेल, व त्या भाग्यवानाकरितांच हिचा हा सर्व संताप असावा; पण आपण आतां येथून निघून जावें, हें बरें. कारण हिचा पिता देवशक्ति अपराध्यांना उग्र दंड देत असतो. मी हिला असलें चित्र काढून दिलें आहे, असें कळल्यास तो क्षमा करणार नाहीं.

असा विचार करून तिला प्रणाम केल्यावर मी लागलाच तेथून निघालों. त्या गुणज्ञ कन्येनेंही माझा उचित सन्मान केला. जातां जातां मी तिच्या सखीच्या तोंडून 'ही आपल्या कनकवर्षावर आसक्त आहे.' असें ऐकलें. तिनें आपल्या स्वरूपाची ख्याति कोणा ब्राह्मणाच्या तोंडून ऐकली व तेव्हांपासून ती मदनसुंदरी खरोखरीच वेडी झाली आहे. प्रभो, आपलें नांव ऐकतांच मलाही आपल्या दर्शनाची इच्छा झाली, व त्याबरोबर त्या सुंदरीची मूर्ति एका चित्रपटावर गुप्तरीतीनें काढून घेऊन मी आपल्या चरणापाशीं आलों. प्रभूचा आकार प्रत्यक्ष पाहिल्यावर माझा संशय निवृत्त झाला. तिनें माझ्या हातानें आपलेंच चित्र काढविलें होतें. तिचें चित्र वारंवार काढतां येण्यासारखें नाहीं, म्हणून, मी तिची मूर्ति या आपल्या चित्राजवळ आतांच काढीत नाहीं.'

तें सर्व ऐकून रोलदेवाला कनकवर्ष म्हणाला, 'तुजपाशीं तिचें चित्र आहेना, तेंच आम्हांला दाखीव पाहूं!' राजाच्या आज्ञेप्रमाणें त्यानें आपल्या चित्रें ठेवावयाच्या नळकंड्यांतून तिचें चित्र काढून दाखविलें. चित्रगत मदनसुंदरीचें स्वरूप पाहून कनकवर्ष तत्काल कामवश झाला. चित्रकाराला पुष्कळ धन देऊन व त्याच्यापासून चित्रपट घेऊन तो अंतःपुरांत गेला. तेथें तिचें रूप व लावण्य पहात असतांना त्याच्या नेत्रांची तृप्तीच न झाल्यामुळें सर्व कर्तव्य कर्मेंही सोडून तो तन्मय होऊन राहिला. तेव्हां ज्याला अवकाश मिळाला आहे, असा मन्मथ आपल्याहून यांचें रूप-लावण्य अधिक आहे असें पाहून, जणुं काय मत्सर वाटल्यामुळेंच, आपल्या अमोघ बाणांचे प्रहार करून त्याला पीडा देऊं लागला. त्याचें सर्व धैर्य पार नाहींसें झालें. त्यानें आजवर रूपावर लुब्ध झालेल्या स्त्रियांना जी मदनपीडा दिली होती, तिचाच जणुं काय हा त्याला मोबदला मिळत होता. त्यानंतर कांहीं दिवसांनीं तो विरहानें कृश व पांढरा फिक्कट झाला आहे, असें पाहून आप्त सचिव विचारूं लागले; तेव्हां त्यानें त्यांस आपलें मनोगत सांगितलें, व त्यांच्याशीं योग्य संकेत करून, मदनसुंदरी कन्येविषयीं मागणी करण्याकरितां, देवशक्ति राजाकडे संगमस्वामी नांवाच्या कालज्ञ कार्यज्ञ, ब्राह्मण, आप्त, कुलीन व मधुर आणि उदात्त भाषण करणाऱ्या दूतास पाठविलें. तेव्हां तोही मोठ्या श्रीमंती थाटानें विदर्भदेशास जाऊन कुंडिनपुरांत शिरला. रीतीप्रमाणें त्यानें देवश-

कीचें दर्शन घेतलें, व आपल्या स्वामीकरितां त्याच्या कन्येविषयीं प्रार्थना केली. तेव्हां 'मला ही कोणाला तरी द्यावयाचीच आहे, त्यांतून हा राजा सर्वप्रकारें आपल्या बरोबरीचा असून स्वतः याचना करीत आहे, आणि मदनसुंदरीला अनुरूप वरही आहे, यास्तव त्यालाच ही द्यावी' असा मनांत विचार करून त्यानें संगमस्वामीची प्रार्थना मान्य केली; आणि त्यानंतर देवशक्तीनें आपल्या प्रियकन्येच्या अलौकिक रूपाप्रमाणेंच अप्रतिम असलेलें तिचें नृत्यही त्या ब्राह्मणाला दाखविलें. त्या देवकन्येसारख्या राजकन्येला पाहून संगमस्वामी संतुष्ट झाला. नंतर देवशक्तीनें त्याच्या बरोबरच आपला प्रतिदूत पाठविला, व 'लग्नाचा निश्चय करून विवाहाकरितां येथें यावें' असा निरोप सांगण्याविषयीं त्यानें त्याला आज्ञा केली.

संगमस्वामी त्या प्रतिदूतासह स्वदेशास परत आला, व राजाची गांठ घेऊन कार्यसिद्धि झाली, असें सांगूं लागला. देवशक्तीच्या दूतानेंही राजाज्ञेप्रमाणें त्याला निरोप कळविला. तेव्हां कनकवर्षानें जोशांना बोलावून लग्ननिश्चय करविला. प्रतिदूताचा सन्मान करून त्याला परत पाठविलें. व मदनसुंदरी आपल्यावर अनुरक्त आहे असें जाणून, तो महा वीर्यवान् तिच्याशीं विवाह करण्याकरितां निःशंक मनानें अशोकलता नांवाच्या हत्तिणीवर बसून निघाला. मार्गानें जातांना आसपासच्या अरण्यांतील दुष्ट शबरांप्रमाणेंच प्राण्यांचे प्राण घेणाऱ्या अनेक सिंहांनाही त्यानें मारलें. योग्य समयीं तो विदर्भदेशास येऊन पोंचला. सामोरा आलेल्या देवशक्तीसह तो सपरिवार मोठ्या उत्साहानें कुंडिनपुरांत शिरला. नगरींतील मोठ्या मार्गानें जात असतांना पौरजनांच्या स्त्रियांच्या नेत्रोत्सवास त्यानें वाढविलें. शेवटीं तो ज्यांत विवाहमंगलसंभार सज्ज करून ठेविला आहे, अशा राजमंदिरांत गेला, आणि देवशक्तीनें ज्याची सर्वोत्तम व्यवस्था ठेविली आहे, अशा त्या राजानें सर्व परिवारासह तेथें विश्रांति घेतली.

दुसऱ्या दिवशीं कन्येच्या पित्यानें सुमुहूर्तावर आपलें राज्य मात्र ठेवून घेऊन बाकीच्या सर्व सर्वस्वासह आपली प्रिय मदनसुंदरी त्या विष्णुरूपी वराला दिली. त्यानंतर सात दिवस श्वशुराच्या घरचा पाहुणचार घेऊन राजा कनकवर्ष त्या नव्या वधूसह आपल्या नगरास परत आला. तेव्हां त्याच्या सर्व नगरभर परम आनंद व मोठा उत्सव झाला. भगवान्

श्रीकृष्णाच्या अनेक स्त्रियांमध्यें जशी रुक्मिणी, त्याप्रमाणें त्याच्या इतर सर्व स्त्रियांत मदनसुंदरी कनकवर्षाला प्राणांहून अधिक प्रिय झाली. तीं दोघेंही एकमेकांवर अतिशय प्रेम करूं लागलीं.

कांहीं दिवसांनीं फुललेलीं पुष्पें हेंच ज्याचें विखुरलेलें आयाळ आहे, असा, मानिनी स्त्रियांच्या मानरूपी हत्तीचें विदारण करणारा वसंतसिंह आला. त्या कुसुमाकरानें आसक्त भ्रमरांची माला, हीच दोरी व फुललेल्या मोहोरानें युक्त असलेली आम्रशाखा हीच दांडी, यांच्या योगानें केलेलें मदनाचें पुष्पचाप सज्ज केलें. मलयवायु (दक्षिणेचा वारा) उपवनाप्रमाणेंच, प्रवासास गेलेल्या लोकांच्या स्त्रियांचीं कामोद्दीपित मनें कांपवीत वाहूं लागला. ‘अरे बावांनो नद्यांचे पूर, वृक्षांचीं फुलें, व चंद्राच्या कला जरी क्षीण झाल्या तरी त्या पुनः येतात, पण एकदां गेलेलें तारुण्य पुनः परत येत नाहीं; यास्तव मान कलह सोडून प्रियांसह रममाण व्हा—’ असेंच जणुंकाय कोकिला आपल्या मधुर आलापांनीं लोकांना सांगूं लागल्या. असो; अशा वसंतसमयीं राजा कनकवर्ष सर्व अंतःपुरवर्गासह विहार करण्याच्या इच्छेनें मधुवनांत गेला. त्यानें आपल्या परिजनांच्या रंगित वस्त्रांनीं अशोक वृक्षांची शोभा व श्रेष्ठ स्त्रियांच्या गाण्यानें कोकिला व भ्रमर यांचे ध्वनी यांस तुच्छ करून सोडलें. सर्व स्त्रीवर्ग जरी तेथें होता, तरी राजा, देवी मदनसुंदरीबरोबर पुष्पें वेंचणें इत्यादिकांच्या योगानें खेळला. उपवनांत पुष्कळ वेळ मनमुराद क्रीडा केल्यावर तो स्त्रियांसह स्नान करावयास गोदावरींत शिरला व जलक्रीडा करूं लागला. त्याच्या स्त्रियांनीं आपल्या मुखांच्या योगानें नदींतील कमलांस, नेत्रांच्या योगानें उत्पलांस, स्तनांच्या योगानें चक्रवाक पक्ष्यांच्या जोडप्यांस व नितंबप्रदेशांच्या योगानें पुलिनास जिंकलें, व तरंगांच्या द्वारा जणुंकाय कपाळाला आंठ्या घालूनच जिनें आपला क्रोध व्यक्त केला आहे, अशा त्या नदीच्या मध्य भागास त्यांनीं क्षुब्ध करून सोडलें. जलविहाराच्या योगानें वस्त्रें चंचल झाल्याकारणानें राजाला स्त्रियांची अंगरचना स्पष्ट दिसूं लागली, व त्या कारणानें त्या लोलुप पुरुषाचें मन त्यांच्याठायीं आसक्त झालें. जलक्रीडा करीत असतांना एका स्त्रीचें उत्तरीय वस्त्र खालीं सरकलें, त्याबरोबर राजानें तिच्या उघड्या अंगावर जोरानें जल शिंपडलें. पण तें पाहून मदनसुंदरीला राग आला, व ‘नदीला आणखी

किती क्षुब्ध करणार ?' असें मोठ्या उद्वेगानें म्हणून ती मानी राणी पाण्यांतून वर आली, आणि दुसरें वस्त्र नेसून क्रोधानें लागलीच आपल्या मंदिरांत गेली. तिच्या सख्यांनीं रागाचें कारण विचारिलें असतां तिनें आपल्या प्रिय पतीचा पूर्वोक्त अपराध त्यांना सांगितला. राजानें तिचा आशय ओळखिला, व जलक्रीडा सोडून तोही तत्काल तिच्या अंतःपुरांत आला. पण काय चमत्कार सांगावा, तिच्या अंतःपुरांतील पिंजऱ्यामध्यें बसलेले पोपट व सारिकाही, रागानें त्याला–' आंत येऊं नको, बाहेर जा, जिच्यावर तुझें मन आसक्त झालें आहे तिच्याकडेच जा,' असें म्हणून त्याला आंत जावयास प्रतिबंध करूं लागल्या. तथापि तो राजा हंसतच आंत शिरला. तों अतिशय रागावलेली देवी त्याच्या दृष्टीस पडली. आपलें खिन्न मुखकमल डाव्या हातावर ठेवून ती स्वच्छ व स्थूल मोत्यांएवढाले अश्रु–बिंदु ढाळीत होती. तोंडानें 'अरे माझ्या प्रिय हृदया, तुला प्रिय-विरह जर सहन होत नसेल, तर मान सोडला पाहिजे; व विरह सहन करण्याचें सामर्थ्य जर तुजमध्यें असेल तर मान हवा तितका वाढीव. चांगला विचार करून यांतील एकाचा आश्रय कर, नाहींपेक्षां दोन्ही डगरींवर (तीरांवर) पाय देऊन राहिलेल्या पुरुषाप्रमाणें तूं खचित मध्यें पडून नष्ट होशील.' अशा अर्थाचें पद्य म्हणत होती. पण कंठ सरळ सद्गदित झाल्यामुळें त्याचीं अक्षरें अगदीं स्पष्ट उमटत नव्हतीं. अशा कोपावस्थेंत असलेल्या पण त्या वेळींही अतिशय रम्य दिसणाऱ्या तिच्या-पाशीं राजा सलज्ज व सभय होऊन गेला. तो, तोंड फिरवून बसलेल्या प्रियेला आलिंगन देऊन प्रेम व विनय यांनीं युक्त असलेल्या वचनांनीं तिचें सांत्वन करूं लागला. तिच्या सख्यांनीं वक्रोक्तींनीं त्याचा अपराध सुचविला असतां राजानें तो मान्य केला, व तिच्या चरणांवर मस्तक ठेविलें. तेव्हां अश्रुजलाच्या रूपानें सर्व क्रोध गळून गेला असतां ती प्रसन्न झाली. तिनें आपल्या प्रियाला दृढ आलिंगन दिलें. तेव्हां तोही कोप सोडून प्रसन्न झालेल्या प्रियेच्या आश्लेषानें अति हृष्ट झाला. त्यानंतर तिच्या सहवर्तमान यथेच्छ विलास करून तो तेथेंच निजला.

तों–एका विक्राळ स्त्रीनें आपल्या गळ्यांतील मोत्यांची एकपदरी माळ व मस्तकावरील चूडामणि हरण करून नेला आहे, व एक भयंकर वेताळ पुढें येऊन बाहुयुद्धास प्रवृत्त झाला आहे, पण त्याला भूमीवर पाडलें

असतांही त्यानें आपल्याला पाठीवर घेऊन, व पक्ष्याप्रमाणें आकाशमार्गानें जाऊन समुद्रांत टाकलें आहे, तथापि मोठ्या कष्टानें आपण समुद्रांतून उडून वर आलों आहों; व पूर्वीप्रमाणेंच मोत्यांची माळ गळ्यांत व चूडामणि मस्तकावर आहे,-असें त्यानें स्वप्नांत पाहिलें. त्याबरोबर तो जागा झाला. इतक्यांत उजाडलें. प्रातःकाळीं एक संन्यासी राजदर्शनाकरितां आला. तेव्हां त्याला आपलें स्वप्न सांगून राजा इष्टानिष्ट फल विचारूं लागला असतां, तो म्हणाला-'राजन्, अप्रिय वार्ता सांगूं नये; पण आतां तूं विचारीतच आहेस म्हणून सांगणें भाग आहे. गळ्यांतील माळ व चूडामणि म्हणजे तुझी प्रिय राणी व पुत्र होत. त्यांची व तुझी ताटातूट होणार आहे. समुद्रांतून वर आल्यावर तूं तीं दोन्ही योग्य स्थानीं आहेत, असें पाहिलेंस. त्याचा अर्थ तूं मोठ्या दुःखांतून स्ववीर्यानें पार पडलास म्हणजे त्यांचा तुझा पुनः समागम होईल.'

संन्याशानें सांगितलेलें स्वप्नफल ऐकून व विचार करून राजा म्हणाला-"भगवन्, मला अद्यापि पुत्रच नाहीं. तो तर आधीं होऊं दे, मग पुढें वियोग. त्यानंतर परदेशांतून आलेल्या एका रामायण-पाठकाच्या तोंडून दशरथानें पुत्राकरितां किती क्लेश केले तें त्यानें ऐकलें, व त्यामुळें त्याला पुत्रप्राप्ति कशी होईल म्हणून मोठी चिंता लागली. कनकवर्षानें तो दिवस खिन्नचित्तानेंच घालविला. रात्रीं तो अकस्मात् जागा झाला, व एकटाच शय्येवर उठून बसला. तों सर्व दारें जशींच्या तशींच बंद असतांनाही आंत आलेली एक स्त्री त्याला दिसली. ती अति नम्र व सौम्यरूप होती. राजानें उठून नमस्कार केला असतां आशीर्वाद देऊन ती म्हणाली, ' पुत्रा, मी नागराज वासुकीची कन्या व तुझ्या पित्याची ज्येष्ठ भगिनी असून माझें नांव रत्नप्रभा आहे. तुझ्या रक्षणाकरितां मी नेहमीं तुजपाशीं असतें. आज तूं सचिंत आहेत असें मला दिसल, व त्यामुळें मी तुजपुढें साक्षात् आलें. तुझी खिन्न मुद्रा माझ्यानें पाहवत नाहीं, यास्तव चिंतेचें कारण सांग. '

आतेचें हें सांत्वनवचन ऐकून तो म्हणाला,-' आई, तूं मजवर असा अनुग्रह करतेस त्याअर्थी मी धन्य आहें. पुत्राकरितां मी अस्वस्थ झालों आहें. दशरथादि राजर्षींही जर स्वर्गाकरितां पुत्राची इच्छा करीत होते, तर माझ्यासारख्या सामान्य राजालाही ती झाल्यास त्यांत नवल कसलें ?'

भाचाचें हें चिंताकारण ऐकून, नागी त्याला उलट म्हणाली,–तर मग बाळा, मी सांगतें तसें कर. तूं स्वामिकुमाराची आराधना कर, तुझ्या सेवेंत विघ्न करण्याकरितां दुःसह कुमारधारा तुझ्या मस्तकावर पडेल, पण मी तुझ्या शरीरांत प्रवेश करीन, व माझ्या प्रभावामुळें तूं ती सहन करशील, व सर्व विघ्नांचें निवारण करून तूं इष्ट मनोरथ संपादन करशील.

इतकें सांगून नागी गुप्त झाली. राजानेंही राहिलेली रात्र त्यासंबंधींच विचारांत घालविली. दुसऱ्या दिवशीं सर्व राज्यभार मंत्र्यांवर ठेवून, तो स्वामिकुमाराच्या चरणकमलापाशीं गेला. तेथें त्यानें त्या प्रभूस प्रसन्न करण्याकरितां तीव्र तप चालविलें. त्या नागीनें त्याच्या शरीरांत प्रवेश करून, त्याला बळकट केलें होतें. कांहीं दिवसांनीं विजेसारखी प्रखर कुमार–जलधारा त्याच्या मस्तकावर सतत पडूं लागली; पण नागीच्या प्रभावानें त्यानें ती सहन केली. तेव्हां कार्तिकस्वामीनें हेरंबाला त्यास विघ्न करावयास सांगितलें. हेरंबानेंही त्या जलधारांमध्येंच महाविष सोडलें. तेंही त्यानें सहन केलें. तेव्हां विनायक साक्षात् पुढें येऊन, त्याच्या उरावर दंतप्रहार करूं लागला. पण तो देव देवांनाही अजिंक्य आहे, असें जाणून राजानें त्याचे दंतप्रहार सोसले, व स्तुतीच्या योगानें त्याचें पूजन आरंभिलें. 'हे विघ्नेशा! लंबोदरा! तुला नमस्कार असो. तूं सर्वार्थसिद्धींचें निधान आहेस, तुझ्या अंगावर सर्व–भूषणें असतात, ब्रह्मदेवालाही कंपायमान करणाऱ्या गजानना, तुला मी वंदन करितों. हे शंकरप्रिया! तूं असंतुष्ट असलास तर, सुर, असुर व मुनींद्र यांनांही सिद्धि मिळत नाहींत; कारण तूं सर्व लोकांचा मुख्य आश्रय आहेस. उत्तम देव तुझी घटोदर, शूर्पकर्ण, गणाध्यक्ष, मदोत्कट, पाशहस्त, अंबरीष, जंबुक, त्रिशिखायुध इत्यादि पापनाशक अष्टुसष्ट नांवांनीं स्तुति करितात. तुझें स्मरण व स्तुति करणाऱ्या पुरुषाचें-रण, राजकुल, द्यूत, चोर, अग्नि, व पश्वादि यांच्यापासून उद्भवलेलें भय आपोआप नष्ट होतें.'

असो; या व अशाच दुसऱ्याही नाना प्रकारच्या स्तुतिवचनांनीं कनकवर्षानें, विघ्नराजाची स्तुति केली. तेव्हां-'पुत्रा, मी संतुष्ट झालों आहें, आतां तुला विघ्न करणार नाहीं. तुला पुत्र होवो!'–असें सांगून विघ्नकर्ता निघून गेला. नंतर त्या धारा धारण करणाऱ्या राजास स्वामिकुमार म्हणाला,–'वत्सा, तुजवर मी संतुष्ट झालों आहें वर माग.' तेव्हां

'आपल्या कृपेनें मला पुत्र होवो' अशी प्रार्थना राजा करूं लागला. त्यावर 'तथास्तु, माझ्या गणाच्या अंशापासून तुला पुत्र होईल. राजा, तो हिरण्यवर्ष या नांवानें प्रख्यात होईल.' असें वरदान देऊन कुमारानें त्याच्यावर विशेष अनुग्रह करण्याकरितां त्याला आपल्या मंदिराच्या गर्भागारांत बोलाविलें. तेव्हां शापाला भ्यालेली नागी त्याच्या शरीरांतून निघून कोणाला न दिसतां तेथून गेली. त्यामुळें राजा मानुष तेजानें त्याच्या मंदिरांत गेला; पण त्याच्यामध्यें पूर्वीसारखें तेज दिसत नसल्यामुळें आतां हा असा कां बरें दिसतो, असा देव विचार करूं लागतांच त्याला सत्य वर्तमान कळलें, व नागीच्या प्रभावानें यानें असह्य दुःखें सोसलीं असें जाणून, देवसेनानीनें त्याला शाप दिला कीं,–' माझ्या आराधनेच्या वेळीं तूं कपट केलेंस, त्याअर्थी तुला पुत्र होतांच त्याच्याशीं व महादेवीशींही तुझा वियोग होईल.'

हा भयंकर शाप ऐकून महा ज्ञानी राजानें पुनः त्याला प्रसन्न करण्याकरितां सूक्तांनीं स्तुति आरंभिली. तेव्हां त्या सुभाषितांच्या योगानें संतुष्ट झालेला षडानन त्यास पुनः म्हणाला,–' राजन्, तुझ्या या सूक्तांनीं मी अतिशय प्रसन्न झालों आहें, तुझ्या शापाचा अंत सांगतों. पत्नी व पुत्र यांच्याशीं होणारा तुझा वियोग एक वर्षभरच टिकेल. तीन अपमृत्यूंतून सुटल्यावर तुला तीं दोन्ही प्रिय माणसें भेटतील.' पार्वतीपुत्राचा हा उःशाप ऐकून व साष्टांग प्रणाम करून राजा हृष्ट चित्तानें आपल्या नगरास परत आला. कांहीं दिवसांनीं त्याच्या चित्तास आल्हाद देणारा पुत्र मदनसुंदरीच्या ठायीं झाला. पुत्रमुख पाहून राजा व राणी या दोघांचाही आनंद गगनांत मावेनासा झाला. ह्या उत्सवप्रसंगीं राजानें धनदानांचा वर्षाव करून आपलें कनकवर्ष नांव सार्थ केलें. पांच दिवस आनंदांत गेले. सहाव्या दिवशीं रात्रीं षष्ठीपूजनानंतर पुत्राचें रक्षाविधान केल्यावर एकाएकीं आकाशांत मेघ उठला. तो क्रमानें इतका वाढला, कीं थोड्याच अवकाशांत त्यानें सर्व नभःस्थल झांकून सोडलें. अंधकाराचें साम्राज्य झालें, व सोसाट्याचा झंझावात सुटला. इतक्यांत कडी लावून बंद केलेलें दार उघडून एक सशस्त्र राक्षसी सूतिकागृहांत शिरली, व मदनसुंदरीच्या अंगावर पोत असलेल्या बालकाला तिच्या हातांतून हिसकावून घेऊन वेगानें निघून गेली. त्यावेळीं राजाच्या सर्व परिवारास

तिनें आपल्या मायेनें मोहित करून सोडलें होतें. 'हाय, हाय, या राक्षसीनें माझ्या बाळाला ओढून नेलें' असें म्हणून शोकाकुल झालेली मदनसुंदरीही त्या भयंकर अंधकारांतूनच, तिच्या मागोमाग धांवत चालली. राक्षसी जातां जातां एका सरोवरांत बालकासह पडली. अपत्यतृष्णेनें राणीही त्याच सरोवरांत पडली. तों इतक्यांत इकडे पाऊस थांबला, आकाश निरभ्र झालें, रात्र संपली; व सूतिकागृहांत बालकासह राणी नाहीं, असें पाहून अंतःपुरांतील सेवकवर्ग हाहाकार करूं लागला. राजा कनकवर्षही तो आक्रोश ऐकून सूतिकागृहांत आला, व तें पत्नी-पुत्रविरहित आहे, असें पाहून दुःखित झाला. भूमीवर पडलेला तो सावध होऊन शापाचें स्मरण झाल्यामुळें असा विलाप करूं लागला. 'भगवन् स्कंद, विषयुक्त अमृताप्रमाणें तू हा शापमिश्रित वर मला कां दिलास? हाय हाय, देवीवांचून सहस्रयुगतुल्य वाटणारें हें वर्ष मी कसें घालवूं?'

राजा अगदीं शोकवश होऊन असा विलाप करीत आहे, तों त्याचे महाबुद्धिमान् मंत्री तेथें आले. त्यांनीं त्याला पुष्कळ बोध केला; पण मदनसुंदरीबरोबर गेलेलें त्याचें धैर्य परत आलें नाहीं. मदनवेगवशात् वेड्यासारखा झालेला तो नगरांतून बाहेर पडून भटकूं लागला. तो विंध्यारण्यांत येऊन पोंचला. तेथें बालहरिणींच्या नेत्रांकडे पाहून, आपल्या प्रियेच्या नेत्रश्रीस; चमरी नामक हरिणीच्या केसांकडे अवलोकन करून, तिच्या वेणीच्या सौंदर्यास; व हत्ती आणि हत्तिणी यांच्या गमनांकडे पाहून, त्या साध्वीच्या मंदगतीस आठवून तो अतिशय संतप्त झाला. तसाच भटकतां भटकतां, तृषा व ऊन यांनीं पीडित झालेला तो विंध्यपर्वताच्या पायथ्याशीं आला. तेथें त्याला एक स्वच्छ पाण्याचा झरा दिसला. त्याचें मधुर जल प्राशन करून, तो जों एका शीतल छायायुक्त वृक्षाखालीं बसत आहे, तोंच विंध्यपर्वताच्या गुहारूपी मुखांतून, जणुं काय अट्टहास (मोठ्यानें हंसणें) च असा एक सिंह निघाला, व त्याला मारावयास त्याच्या अंगावर धावून आला. पण त्याच क्षणीं आकाशांतून एक विद्याधर मोठ्या वेगानें खालीं आला, व त्यानें आपल्या तीक्ष्ण खड्गाच्या एकाच वारानें, त्या भयंकर पशूचे दोन तुकडे केले; आणि राजापाशीं येऊन-'प्रभो कनकवर्ष, तूं या ठिकाणीं अशा दीन-अवस्थेंत कसा आलास?' असें विचारूं लागला. तेव्हां त्याचा तो प्रश्न

ऐकून, जरासा शुद्धीवर आलेला राजा म्हणाला,–'मी विरहाग्नीनें पोळलों आहें; पण तूं मला कसें ओळखलेंस?' त्यावर विद्याधर म्हणाला,– 'मी पूर्वी मानुष असतांना तुझ्या नगरांत रहात होतों; माझें नांव बंधुमित्र असें होतें. माझ्या प्रार्थनेस मान देऊन तूं मला साहाय्य केलेंस, व त्यामुळें वेताळाचें साधन करून मी विद्याधरत्वास प्राप्त झालों. त्या तुझ्या उपकारांची फेड कशी करावी, या चिंतेंतच मी होतों. तो आज अकस्मात् आकाशांतून जात असतांना, सिंह तुला मारावयास धांवून येत आहे, व तूं तर त्याचा प्रतीकार करणाऱ्या अवस्थेंत नाहींस, असें पाहून सत्वर येथें आलों, व त्या दुष्टाला मारून तुझ्या उपकाराची यत्किंचित् फेड केली आहे. मित्रा, मी आतां बंधुप्रभ या नांवाचा विद्याधर झालों आहें."

तो सांगत असलेला हा वृत्तांत ऐकून, राजाला त्याच्याविषयीं मोठें प्रेम वाटलें, व तो म्हणाला,–' मित्रा, खरेंच; मला आतां मागचें सर्व आठवलें. तूं आज माझें मोठेंच मित्रकार्य केलेंस, यांत संशय नाहीं. पण गड्या, भार्या व पुत्र यांच्यांशीं माझा समागम केव्हां होईल तें सांग पाहूं!' कनकवर्षाचा हा प्रश्न ऐकून, व विद्याप्रभावानें सर्व जाणून तो त्यास म्हणाला,–' राजन्, विंध्यवासिनीचें तुला दर्शन झालें म्हणजे तीं दोघें भेटतील. यास्तव तूं तेथें जा, मीही आपल्या लोकीं जातों.'

इतकें सांगून विद्याधर आकाशांत गेला असतां, कनकवर्षही धैर्य धरून विंध्यवासिनीचें दर्शन घेण्याकरितां निघाला. इतक्यांत त्याच्या अंगावर एक वन्य मत्त गज सोंड लांब करून, मस्तक हालवीत आला. पण त्याला पाहून कनकवर्ष खांच–खळग्यांतून असा धांवूं लागला कीं, तो हत्ती त्यांतील एका मोठ्या खळग्यांत पडला, व त्याला कांहीं केल्या वर निघतां येईना. पुढें अरण्यांतून चालतांना अतिशय थकलेला तो राजा, एका सुंदर प्रफुल्लित कमलयुक्त सरोवरावर येऊन पोंचला. त्याच्या शीतल, सुगंधित व स्वच्छ जलांत त्यानें स्नान केलें. कमलनाल खाऊन पाणी प्याला, व त्याच्याच कांठच्या एका वृक्षाखालीं दाट छायेंत तो बसला. पण दैवयोगानें इतक्यांत त्याला झोंप आली, म्हणून तो भूमीवरच निजला. तों मृगया करून परतलेले भिल्ल त्याच मार्गानें आले, व त्या निजलेल्या सुलक्षणी राजास पाहून, देवीला बळी देण्याकरितां, ते त्याला आपल्या मुक्ताफल नांवाच्या शबरराजाकडे घेऊन गेले.

त्यानेंही तो सर्वलक्षणसंपन्न पुरुष, देवीला अर्पण करावयास योग्य आहे, असें जाणून त्याला बांधून विंध्यवासिनीच्या मंदिरांत नेलें. त्या देवीला पाहतांच कनकवर्ष तिला प्रणाम करूं लागला. त्याबरोबर त्या महामायेच्या अनुग्रहानें, व स्कंदाच्या प्रसादानें तो बंधमुक्त झाला. तो चमत्कार पाहून व या श्रेष्ठ पुरुषावर देवीचा मोठा अनुग्रह आहे असें समजून, मुक्ताफलानेंही राजाला सोडलें. याप्रमाणें या वेळीं हा कनकवर्ष तिसऱ्यानें मृत्युमुखांतून सुटला. इतक्यांत त्याच्या शापाचें वर्षही पूर्ण झालें.

तों त्याची आते नागकन्या, देवी मदनसुंदरी व पुत्र यांस घेऊन त्याच्यापाशीं आली व म्हणाली,–' राजन्, कुमारस्वामीचा शाप ऐकून, मींच युक्तीनें तुझ्या भार्येला व पुत्राला आपल्या घरीं नेऊन तेथें त्यांचें संरक्षण केलें. आतां या दोघांचाही तूं स्वीकार कर, व पृथ्वीच्या राज्याचा यथेच्छ उपभोग घे. आतां तुझा शाप निवृत्त झाला आहे.' इतकें सांगून राजानें मोठ्या विनयानें तिचें म्हणणे मान्य केलें असतां, ती नागी गुप्त झाली. राजाही भार्या-पुत्र-समागमास, क्षणभर स्वप्नाप्रमाणें असत्यच मानूं लागला.

त्यानंतर फार दिवसांनीं एकमेकांस आलिंगन दिलेल्या त्या दोघां राजा–राणींचा विरहक्लेश हर्षशोकजन्य अश्रूंबरोबर गळून गेला. मुक्ताफल–शबरराजानें कनकवर्षाला ओळखिलें. त्याबरोबर तो त्याच्या पायांवर पडला. आपल्या अपराधाची क्षमा मागून तो त्याला आपल्या पल्लीस घेऊन गेला आणि नानाप्रकारच्या उचित उपचारांच्या योगानें त्यानें पुत्र व स्त्री यांसह, त्या राजाची सेवा केली. त्यानंतर दूत पाठवून तेथेंच राहिलेल्या कनकवर्षानें आपल्या देवशक्ति श्वशुरास कुंडिनपुराहून आणविलें. षडाननानें सांगितल्याप्रमाणें ज्याचें हिरण्यवर्ष असें नांव ठेविलें आहे, अशा पुत्रासह आपल्या प्रिय मदनसुंदरीला हत्तीणीवर बसवून तो राजा सासुरवाडीस जावयास निघाला.

कांहीं दिवसांनीं विदर्भ देशांतील कुंडिनपुरास पोंचल्यावर, तो श्वशुरगृहीं गेला व त्याच्या समृद्धिमान् गृहामध्यें, श्वशुर ज्याचा उत्तम सत्कार करीत आहे, असा राजा कनकवर्ष, पुत्र, स्त्री व इतर परिवार यांसह; आनंदानें थोडे दिवस तेथें राहिला. त्यानंतर श्वशुर व सासू यांची आज्ञा

घेऊन, तो तेथून निघाला, व आपल्या कनकपुरास परत आला. तेव्हां अनेक संकटांतून पार पडून, सुखी झालेल्या त्या राजाचें अभिनंदन, पौरजनांनीं मोठ्या उल्हासानें केलें. प्रमोद व शोभा यांसहवर्तमान असलेल्या साक्षात् उत्सवाप्रमाणेंच हिरण्यवर्ष व मदनसुंदरी यांसह कनकवर्ष, आपल्या सुंदर राजधानींत शिरला. राजमंदिरांत जातांच त्यानें मदनसुंदरीला पट्टराणी केलें, व मंत्रिवर्गाचा सन्मान केला. नंतर तो भाग्यशाली राजा, पुत्र व प्रियपत्नी यांसह, सतत आनंदाचा उपभोग घेत राहिला. पुनः त्यांना तसलें असह्य वियोग–दुःख, सहन करावें लागलें नाहीं.

गोमुख सचिवानें सांगितलेली ही रम्य कथा ऐकून, नरवाहनदत्त व अलंकारवती संतुष्ट झाली.

---

## तरंग ६ वा.

### १. महीपाल ब्राह्मणपुत्राची कथा.

पण गोमुखानें सांगितलेली ही कथा ऐकून, युवराज विद्याधरी–भार्येसह संतुष्ट झाला आहे, असें पाहून मरुभूतीला कोप आला. त्याला त्याच्याविषयीं ईर्ष्या वाटली, आणि त्यामुळें त्याची मुद्राही बदलली आहे असें पाहून, त्याचें अनुरंजन करण्याकरितां, ‘ मरुभूते, तूं एक कथा सांग,’ असें. नरवाहनदत्त त्यास म्हणाला. तेव्हां ‘ बरें आहे, सांगतों, ’ असें म्हणून तो संतुष्टचित्तानें पुढीलप्रमाणें कथा सांगूं लागला.—

राजन्, कमलवर्मराजाच्या कमलपुरांत मागें एक चंद्रस्वामी या नांवाचा उत्तम ब्राह्मण होता. त्या महामतीच्या लक्ष्मीला व सरस्वतीला शोभेल अशी तिसरी देवमती या नांवाची विनयवती भार्या होती. तिच्या ठायीं त्या ब्राह्मणाला सुलक्षण पुत्र झाला. त्याच्या जन्मसमयीं–‘ चंद्रस्वामिन्, तूं याचें नांव महीपाल असें ठेव, कारण हा राजा होऊन फार दिवस पृथ्वीचें पालन करील ’ अशी आकाशवाणी झाली. ब्राह्मणानेंही मोठा उत्सव करून बाराव्या दिवशीं त्याचें महीपाल असेंच नांव ठेविलें. पुढें तो बालक क्रमानें मोठा झाला. इतर सर्व विद्यांसह शस्त्रास्त्र विद्येंतही

तो मोठा निपुण झाला. इतक्यांत चंद्रस्वामीच्या देवमती भार्येला सर्वावयव सुंदर कन्या झाली. पित्यानें तिचें नांव चंद्रवती असें ठेविलें. तीं दोघें भावंडें बापाच्या घरीं मोठीं झालीं.

एकदां त्या देशांत अनावृष्टि झाल्यामुळें सूर्यकिरणांच्या योगानें सर्व शेतें वाळून गेलीं व भयंकर दुष्काळ पडला. राजा सन्मार्गाचें उल्लंघन करून तसल्या कष्टकर प्रसंगींही प्रजेपासून अधर्मानें द्रव्य घेऊं लागला. त्यामुळें सर्व देशभर दुःख पसरलें असतां, देवमती पतीस म्हणाली, 'आपण सर्व येथून निघून माझ्या माहेरीं जाऊं या. कारण येथेंच राहिल्यास कदाचित् हीं अपत्यें नष्ट होतील.' भार्येचें हें म्हणणें ऐकून चंद्रस्वामी म्हणाला–' प्रिये, दुष्काळ पडला असतां घर सोडून जाणें महत् पातक आहे. यास्तव मी या दोघां बालकांना तुझ्या बापाच्या येथें सोडून येतों, तोंपर्यंत तूं येथेंच रहा. भार्येला असें सांगून व तिला घरीं ठेवून ब्राह्मण दोघां मुलांस बरोबर घेऊन सासऱ्याच्या येथें जावयास निघाला.

हळूहळू जात असतांना तीन चार दिवसांनीं त्याला एक मोठें अरण्य लागलें. त्यांतील वाळु सूर्यकिरणांनीं अतिशय तापली होती. त्यांत कोठें कोठें शुष्क झाडें उभीं होतीं. त्यांतील एका झाडाच्या खालीं तान्हेलेल्या त्या दोघांना बसवून चंद्रस्वामी त्यांच्यासाठीं पाणी आणण्याकरितां कांहीं दूर गेला. तों कामाकरितां कोठेंसा जात असलेला सिंहदंष्ट्र नांवाचा शबराधिप आपल्या अनुगांसह त्याच्या पुढें आला. तेव्हां त्या सरळ स्वभावाच्या ब्राह्मणानें आपली हकीकत सांगून 'मला पाणी कोठें मिळेल' म्हणून त्याला प्रश्न केला. तेव्हां त्या निर्दय शबराधिपानें आपल्या अनुगांतील दोघां-तिघांस खूण करून 'याला पाणी दाखवा' असें सांगितलें. त्या बरोबर त्या नीचाचा अभिप्राय जाणणाऱ्या त्यांनीं त्याला आपल्या पल्लीस नेऊन बांधून ठेविलें. देवीला बलि देण्याकरितां यांनीं आपल्याला बांधलें आहे, असें त्यांच्याच तोंडून ऐकून तो दीन पुरुष अरण्यांतील आपल्या दोघां अपत्यांकरितां अतिशय शोक करूं लागला. 'वत्सा महीपाला, लाडके चंद्रावती, मी तुम्हांला व्याघ्र-सिंहांचें जणुं काय मांस भक्षणाचें घरच अशा महा अरण्यांत सोडून कसा दूर झालों, व या चोरांच्या हातीं सांपडलों ! आतां माझें रक्षण कोण करणार ?' असा विलाप करीत आहे तों त्याची दृष्टि आकाशांतील सूर्याकडे गेली, व लागलीच 'मी आतां

आपत्तींतून तारणाऱ्या याच प्रभूला शरण जातों,' असें बोलून तो ब्राह्मण सूर्याची स्तुति करूं लागला—

भूताकाश व हृदयाकाश यांत रहाणाऱ्या ज्योतीरूप नारायणा, तुला मी नमस्कार करितों. तूं बाह्य व आंतर तमाचा नाश करीत असतोस. तूंच त्रिजगद्यापी विष्णु, सर्व कल्याणांचा निधि शंकर व निजलेल्या जगाला जागें करणारा परम प्रजापति आहेस. प्रकाशरहित चंद्र व अग्नि यांनीं प्रकाशित व्हावें म्हणून दयेनें त्यांच्यामध्यें आपलें तेज ठेवून रात्रीं अस्त पावणाऱ्या तुला नमस्कार असो. भास्करा, तूं उदय पावलास म्हणजे राक्षस पळून जातात, चोर तोंडें लपवितात व गुणी आनंदित होतात. हे त्रैलोक्यदीपा, मज शरणागताचें रक्षण कर, या दुःखांधकाराचें विदारण कर, व मजवर सत्वर दया कर.

चंद्रस्वामीनें सूर्याची मोठया भक्तीनें अशी स्तुति केली असतां अकस्मात् आकाशवाणी झाली–' चंद्रस्वामिन्, मी तुजवर प्रसन्न झालों आहें, भिऊं नकोस. तूं यांच्या हातून मरणार नाहींस. माझ्या प्रसादानें अपत्येंही तुला भेटतील. ही वाणी ऐकून त्या ब्राह्मणाला आनंद झाला व तिच्यावर विश्वास ठेवून तो शबरांनीं दिलेलें अन्न खाऊन तेथें राहिला.'

तिकडे आपल्या पित्याला जाऊन फार वेळ झाला; पण तो अजून कां येत नाहीं, असें म्हणून भयभीत झालेलीं तीं दोघें भावंडें रडूं लागलीं. तों सार्थधर नांवाचा एक मोठा सार्थवाह त्याच मार्गानें आला. त्यानें त्यांना पाहिलें,.व सर्व वर्तमान विचारिलें; आणि महीपाल हा फार सुलक्षणी पुत्र आहे, असें जाणून व त्या अनाथांचें कांहीं अनिष्ट होऊं नये म्हणून तो दयाळु वैश्य त्यांना आपल्या बरोबर घेऊन गेला. त्याच्या घरीं पोंचल्यावर वैश्य ज्याच्यावर पुत्रप्रेम करीत आहे, असा महीपाल, बालक असूनही अग्निक्रियेमध्यें रत झाला.

एकदां तारापुरच्या ताराधर्म नामक राजाचा मंत्री कांहीं कामाकरितां त्याच मार्गानें आला. अनंतस्वामी असें त्याचें नांव असून त्याच्याबरोबर हत्ती, घोडे व पायदळही होतें. सार्थवाहाचा व त्याचा स्नेह असल्यामुळें तो विश्रांति घेण्याकरितां त्याच्या येथें आला. तेथें हा शुभाकृति महीपाल त्याच्या दृष्टीस पडला. जप व होम हवन यांत निमग्न असलेल्या त्याचें

ब्राह्मण मंत्र्याला मोठें कौतुक वाटलें. त्यानें त्याचा वृत्तांत विचारून घेतला आणि स्वतःला अपत्य नसल्यामुळें व तो तेजस्वी पुत्र सवर्ण आहे असें जाणून, अनन्तस्वामीनें वैश्यापाशीं चंद्रावती भगिनीसह त्याची याचना केली. वैश्यानेंही आपल्या मित्राचा मनोरथ पुरविला. तेव्हां मंत्री त्या दोघांस घेऊन आपल्या तारापुरास गेला. तेथें अनंतस्वामीनें त्याला आपला पुत्र केलें, व तोही महीपाल विद्या व संपत्ति यांनीं पूर्ण असलेल्या त्याच्या येथें आनंदानें राहूं लागला.

इतक्यांत इकडे पल्लीमध्यें बांधून ठेविलेल्या चंद्रस्वामीकडे भिल्लांचा राजा सिंहदंष्ट्र आला व म्हणाला, 'ब्राह्मणा, भगवान् भानूनें स्वप्नांत येऊन तुला न मारतां सत्कारपूर्वक सोडण्याविषयीं सांगितलें आहे. यास्तव तूं आतां ऊठ व वाटेल तेथें जा.' असें बोलून त्यानें त्याला बंधमुक्त केलें, व मोत्यें व कस्तूरी देऊन आणि त्याला पोंचवावयास आपले लोकही बरोबर दिले. तेव्हां मृत्यूच्या मुखांतून सुटलेला तो आपल्या प्रिय अपत्यांस अरण्यभर शोधूं लागला. अन्नजलही सोडून अहोरात्र रडत व 'महीपाला, अग चंद्रावती' अशा मोठमोठ्यानें हाक मारीत भ्रमण करितां करितां तो समुद्रतीरावरील जलपुरास आला. तेथें एका ब्राह्मणाच्या येथें तो अतिथिरूपानें गेला असतां भोजनानंतर ज्यानें आपला कष्टकर वृत्तांत सांगितला आहे, अशा चंद्रस्वामीला गृहपति म्हणाला,–'ब्राह्मणा, कनकवर्म नांवाचा कोणी एक वैश्य कांहीं दिवसांपूर्वीं येथें आला होता. त्याला अरण्यांत मुलगा व मुलगी अशीं ब्राह्मणाचीं दोन अपत्यें सांपडलीं. त्या सुलक्षणी बालकांना घेऊन तो येथून नारिकेल महाद्वीपास गेला. त्यानें त्यांचीं नावें कांहीं मला सांगितलीं नाहींत. पण त्या सुंदर मुलांना मीं पाहिलें आहे.'

गृहस्थ ब्राह्मणानें सांगितलेलें हें वर्तमान ऐकून चंद्रस्वामी 'माझींच तीं अपत्यें आहेत' असें म्हणाला, व त्या उत्तम द्वीपास जाण्याचा विचार करूं लागला. त्यानें ती रात्र त्याच ब्राह्मणाच्या येथें घालविली व दुसऱ्या दिवशीं नारिकेलद्वीपास जाणाऱ्या विष्णुवर्मा वैश्याशीं मैत्री करून त्याच्या बरोबर तोही नौकेंत बसून चालला. पुत्रस्नेहवश झालेला तो त्या द्वीपांत जाऊन पोंचतांच तेथील वैश्यांना आपली दुःखदायिनी वार्ता सांगून कनकवर्म्याविषयीं विचारूं लागला. तेव्हां ते म्हणाले,–'तो वैश्य अरण्यांत

सांपडलेल्या दोघां ब्राह्मणबालकांना घेऊन येथें आला होता खरा; पण आतां तो त्यांना घेऊन कटाहद्वीपास गेला आहे.' तें ऐकून चंद्रस्वामी दानवर्म-वैश्यासह नौकेंत बसून कटाहद्वीपास आला. पण तेथेंही तो कर्पूर द्वीपास गेला आहे, असें कळलें. त्यानंतर तो अपत्य-मोहवश झालेला ब्राह्मण क्रमानें कर्पूर, सुवर्ण व सिंहलद्वीपास निरनिराळया वैश्यांच्या नौकांतून गेला. पण त्याला तेथेंही कनकवर्मा वैश्य भेटला नाहीं. सिंहल-द्वीपांत-तो आपल्या देशास गेला-असें त्यानें वैश्यांच्या तोंडून ऐकलें. तेव्हां कोटीश्वर नांवाच्या वैश्यासह त्याच्याच नावेंत बसून चंद्रस्वामी चित्रकूट नगरास गेला. कारण कनकवर्म्याचें तेंच नगर होतें. तेथें त्या ब्राह्मणाला कनकवर्मा भेटला. पुत्राविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या त्यानें आपला वृत्तांत त्यास सांगितला. तेव्हां त्याचें दुःख जाणून कनकवर्म्यानें अरण्यांत सांपडलेलीं दोन्हीं अपत्यें त्याला दाखविलीं. पण त्यांना जों तो पहात आहे, तों तीं आपलीं प्रिय बालकें नसून दुसऱ्याच कोणाचीं आहेत असें त्याला कळलें. तेव्हां त्याला फार दुःख झालें. तो दीन ब्राह्मण रडूं लागला. 'हाय हाय, मी इतका भटकलों, पण मला माझीं लाडकीं अपत्यें भेटलीं नाहींत. एकाद्या कुप्रभूप्रमाणें दैवानें मला आशा लावून शेवटीं फसविलें. निर्दय प्रारब्धानें मला कोठल्या कोठें भ्रमण करावयास लावलें.' असें बोलून, ऐकणाराला दया येईल अशा रीतीनें तो विलाप करूं लागला. कनकवर्म्यानें त्याचें पुष्कळ सांत्वन केलें; पण शोकानें व्याकुल झालेला तो म्हणाला, 'पृथ्वीभर भ्रमण करणाऱ्या मला जर तीं माझीं प्रिय अपत्यें एका वर्षाच्या आंत न भेटलीं तर मी गंगातीरीं तप करून या शरीराचा त्याग करीन.'

ही त्याची निग्रहाची प्रतिज्ञा ऐकून तेथें असलेला एक ज्ञानी त्याला म्हणाला, 'नारायणीच्या प्रसादानें तुला तुझीं बालकें प्राप्त होतील, जा.' तें ऐकून व त्याच वेळीं सूर्याच्या वराचें स्मरण झाल्यामुळें प्रहृष्ट झालेला चंद्रस्वामी कनकवर्म्यानें केलेल्या पूजेचा स्वीकार करून तेथून निघाला. लहान मोठें गांव व नगरें यांतून शोध करीत जात असतांना, एकदा सायंकाळीं तो उंच वृक्षांनीं युक्त असलेल्या वनांत आला, व तेथेंच रात्र घालविण्याचा प्रसंग आल्यामुळें वृक्षांवरील पिकलेलीं फळें व झऱ्याचें निर्मळ पाणी यांच्या योगानें शरीर-यात्रा करून सिंह-व्याघ्रादिकांच्या

भीतीनें तो एका वृक्षावर चढून बसला. पण त्याला तेथें झोंप येईना. मध्यरात्रीच्या सुमारास, त्याच झाडाखालीं, नारायणी देवी ज्यांत मुख्य आहे असें एक मोठें मातृदेवतांचें मंडल आलेलें त्याला दिसलें. आपल्याला उचित असे अनेक उपहार एकत्र जमवून तें मंडल भैरवदेवाच्या आगमनाची वाट पहात होतें. त्याला पुष्कळ उशीर लागला असें पाहून, मातृदेवता नारायणीस म्हणाल्या, 'आज देव अजून कां आला नाहीं ?' तें ऐकून नारायणी हंसली, पण कांहीं बोलली नाहीं. तेव्हां सख्या आग्रहानें विचारूं लागल्या. तेव्हां ती म्हणाली, 'सख्यांनो, देवाला उशीर लागण्याचें कारण सागणें जरी थोडेंसें लज्जावह आहे तरी मी सांगतें.'

### २. विद्याधरी व प्रभाकर यांची कथा.

सुरपुरांत सुरसेन राजा आहे. त्याची विद्याधरी म्हणून अति रूपवती कन्या आहे. उपवर झाल्याकारणानें तिला देऊन टाकण्याचा प्रसंग आला असतां, विमल राजाचा प्रभाकर पुत्र हिला योग्य वर आहे, असें जाणून त्याला ही द्यावी अशी सुरसेनाला इच्छा झाली. तिकडे विमलराजानेंही त्या कन्येची ख्याति ऐकली; व ती आपल्या पुत्राला योग्य भार्या आहे असें जाणून, त्यानें दूतमुखानें तिच्याकरितां सुरसेनापाशीं मागणी केली. तेव्हां सुरसेनानें प्रभाकराला जामात करावयाचें मान्य करून त्या दोघांचा मोठया थाटानें विवाह झाला. त्यानंतर विद्याधरी आपल्या श्वशुराच्या विमलपुरास आली, व रात्रीं पतीच्या शय्येवर जाऊन निजली. पण संभोग न घेतां निजलेल्या पतीकडे उत्सुक झालेली विद्याधरी जों पहाते, तों तो नपुंसक आहे, असें तिला कळलें. व 'हाय हाय माझा घात झाला. मला हा षंढ पति कसा मिळाला ?' असें म्हणून मनांतल्या मनांत खिन्न झालेल्या तिनें ती रात्र कशी तरी घालविली. दुसऱ्या दिवशीं सकाळींच-'चांगला शोध न करितां तूं मला असल्या षंढ पतीला कसें दिलेंस'-असें एक पत्र लिहून तें तिनें आपल्या बापाकडे पाठविलें. कन्येचा तो लेख वाचून व विमलानें कपट करून मला फसविलें असें समजून, तिचा पिता अतिशय रागावला, व 'ज्याअर्थी तूं खोटें सांगून आपल्या नपुंसक पुत्राला माझी कन्या द्यावयास लावलेंस त्याअर्थी तूं आतां त्याचें फल भोग. मी तुला मारणार आहें, सावध रहा.' असें त्यानें त्याला लिहिलें.

बलाढ्य सुरसेनाचें हें पत्र हातीं येतांच तें वांचून विमल राजा सचिंत झाला. मंत्र्यासह त्यानें पुष्कळ विचार केला; पण त्या दुर्जयापासून आत्मसंरक्षणाचा उपाय त्याला सुचेना. तो खिन्न झाला आहे असें पाहून त्याचा पिंगलदत्त मंत्री त्यास म्हणाला,–' देव याला एकच उपाय आहे. तो केल्यास तुमचें हित होईल. स्थूलशिरा म्हणून एक यक्ष आहे, व त्याच्या आराधनेचा मंत्र मला ठाऊक आहे. त्याच्या योगानें प्रसन्न होऊन तो इष्ट वर देतो. यास्तव तुम्ही त्याची आराधना करून, पुत्राकरितां पुरुषत्व मागून घ्या; म्हणजे हा विरोध आपोआप शांत होईल.'

मंत्र्याची ही युक्ति राजाला आवडली. त्यानें त्याच्यापासून मंत्र घेऊन यक्षाची आराधना केली, व पुत्राकरितां पुरुषत्वाची याचना केली. तेव्हां त्या वरद स्थूलशिरा यक्षानें त्याच्या पुत्राला, आपलें पुरुषत्व दिलें; त्यामुळें प्रभाकर विद्याधरीला प्रसन्न करण्यास समर्थ झाला. त्यानंतर आपल्याला इष्ट पतिसुख मिळत असून मी व्यर्थ आपल्या प्रियावर घाणेरडा आरोप करून त्याचा अपमान केला, असें मनांत म्हणून ती साध्वी लज्जित झाली. व तिनें तो वृत्तांत आपल्या पित्यालाही लेखाच्या द्वारा कळविला. त्यामुळें सुरसेन व विमल यांचा विरोध शांत झाला. ते दोघेही राजे परस्परांवर पूर्वीप्रमाणें प्रेम करूं लागले.

परंतु भैरवाला आज हा वृत्तांत कळला. तेव्हां त्यानें क्रोधानें त्या गुह्यकाला आणवून 'ज्या अर्थी तूं आपलें पुंस्त्व दुसऱ्याला देऊन स्वतः षंढत्व पतकरलें आहेस, त्या अर्थी तूं यावज्जीव असाच रहा व तो प्रभाकर पुरुष होऊं दे !' असा शाप दिला. त्यामुळें तो गुह्यक षंढ झाला असून प्रभाकर स्त्रीसुख घेण्यास योग्य झाला. या कारणानें देवाला आज यावयास थोडासा उशीर लागला; पण तो इतक्यांत येईल.

नारायणी मातृदेवतांना इतकें जों सांगत आहे, तोंच देवचक्रेश्वर भैरव तेथें आला. त्याबरोबर मातृकांनीं सर्व उपाहारांनीं त्याचें पूजन केलें. तो योगिनींचा सखा कांहीं वेळ तांडव नृत्य करून खेळला. चंद्रस्वामी झाडावरून तें सर्व पहात होता. त्याची नारायणीच्या एका दासीकडे दृष्टि गेली. तिनेंही त्याला पाहिलें. दैववशात् तीं दोघेंही परस्परांविषयीं साभिलाष झालीं. पण नारायणीला त्यांची ती चंचल वृत्ति

कळली. म्हणून क्रीडा आटोपल्यावर मातृ-देवतांसह भैरव निघून गेला असतांही ती मुद्दाम मागें राहिली व तिनें वृक्षावर बसलेल्या चंद्रस्वामीला बोलाविलें. तो खालीं उतरून जवळ आला असतां ती देवी आपल्या दासीला 'तुमचें एकमेकांवर मन गेलें आहे वाटतें,' असें हंसत विचारूं लागली. तेव्हां त्या दोघांनींही ती गोष्ट कबूल केली. तेव्हां नारायणीनें त्यांच्यावर कोप न करितां चंद्रस्वामीस म्हटलें,-' तुमच्या या सत्य भाषणानेंच मी संतुष्ट झालें आहें. आणि त्यासाठींच मी तुम्हांला शाप देत नाहीं. उलट मी ही आपली दासी तुला देतें. तुम्हीं दोघेंही सुखी व्हा.'

देवीचें हें भाषण ऐकून चंद्रस्वामी म्हणतो,-भगवति, चंचल मन मला जरी अतिशय पीडा देत आहे, तरी मी परस्त्रीला स्पर्शही करीत नाहीं. पापकर्मामध्यें प्रवृत्त होणें, हा मनाचा स्वभाव आहे. तथापि कायिक पापापासून स्वतःचें रक्षण केलें पाहिजे. तेव्हां असें सांगणाऱ्या त्याला देवी म्हणाली,-वाहवा, धीर ब्राह्मणा, तूं खरा साधु आहेस. मी तुला वर देतें. तुझीं दृष्ट अपत्यें तुला सत्वर भेटतील. हें कधींही न कोमेजणारें व विषाचा नाश करणारें कमल तूं घे. असें बोलून व त्याला कमल देऊन नारायणी दासीसह गुप्त झाली. रात्र संपल्यावर तो ब्राह्मणही पुढें निघाला. फिरतां फिरतां तो तारापुरास आला. याच नगरांतील अनंतस्वामी नांवाच्या ब्राह्मण-मंत्र्याच्या येथें त्याचीं दोन्हीं अपत्यें होतीं. विचारपूस केल्यावर तो मंत्री मोठा धार्मिक असून, शिवाय त्याला अतिथी अति प्रिय आहेत, असें त्यास कळलें व त्यामुळें तो भोजनाच्या आशेनें त्याच्या दारावर मोठयानें अध्ययन करूं लागला. तेव्हां द्वारपालांनीं मंत्र्याची आज्ञा घेऊन त्याला आंत नेलें. त्या विद्वान् व तेजस्वी ब्राह्मणाला पहातांच मंत्रिवर्गानें त्याला भोजनाचें निमंत्रण दिलें. तेव्हां तें मान्य करून चंद्रस्वामी अनंतह्रद या नांवाच्या पापनाशक सरोवरावर स्नान करावयास गेला. पण स्नान करून जों तो परत येत आहे, तों मार्गांतच त्यानें हाहाकार ऐकला. तेव्हां सर्व नगरभर हाहाकार होण्याचें कारण काय ? असें तो विचारूं लागला असतां, त्यास दयाळु लोक असें सांगूं लागले.

येथें महीपाल म्हणून एक ब्राह्मणपुत्र होता. तो आपल्या धाकट्या बहिणीसह सार्थधर नांवाच्या एका मोठया सार्थवाहाला अरण्यांत सांपडला. पण तो सुलक्षण आहे असें पाहून, अनंतस्वामी-मंत्र्यानें मोठया कष्टानें

त्याच्यापासून बहिणीसह त्याला मागून घेतलें; आणि स्वतःला पुत्र नसल्या-मुळें त्या उत्तम गुणवान् व त्यामुळेंच अतिशय प्रिय झालेल्या महीपालाला त्यानें आपला पुत्र केलें. आपल्या सद्गुणांमुळें तो ब्राह्मणपुत्र त्या राष्ट्राच्या तारावर्मराजालाही अतिशय प्रिय झाला होता. पण त्याला आज कृष्णसर्प चावला, म्हणून सर्व नगरभर हाहाकार झाला आहे.

हें वर्तमान ऐकतांच तोच माझा पुत्र आहे, असें मनांत चिंतन करीत चंद्रस्वामी सत्वर मंत्र्याच्या येथें गेला, व तेथें सर्व परिजनांनीं परिवेष्टित झालेल्या पुत्राला व कन्येलाही त्यानें पाहिलें. पुत्राची ती दुर्दशा पाहून तत्काल त्यानें देवीनें दिलेलं कमल त्याच्या नाकापाशीं नेलें. त्याबरोबर त्याच्या सुवासानें महीपाल विषरहित होऊन उठला. तें ऐकतांच राजासह सर्व आनंदित झाले, व नगरभर मोठा उत्सव सुरू झाला. हा चंद्रस्वामी मनुष्य नसून कोणी देवांश आहे, असें जाणून अनंतस्वामीनें, राजानें व पौरजनांनीं त्याला पुष्कळ धन दिलें. तो त्या मंत्र्याच्या येथें उत्तम प्रकारें सत्कार घेत आणि आपला पुत्र व कन्या यांस पहात सुखानें राहिला. त्या तिघांनींही एकमेकांस ओळखिलें होतें; पण तीं कांहीं दिवस मुका-ट्यानें बसलीं. कारण कार्याची अपेक्षा करणारे सुज्ञ लोक अवेळीं आप-ल्याला प्रकट करीत *नाहींत.

महीपालाच्या गुणांनीं संतुष्ट झालेल्या राजानें त्याला आपली बंधुमती कन्या दिली. तारावर्म्यालाही पुत्र नव्हता. म्हणून आपलें अर्धें राज्य त्याला देऊन, बाकी राहिलेल्या अर्ध्या राज्याचाही भार त्यानें त्याच्यावरच टाकला आणि तो राजा सुखानें राहिला. राज्य मिळालें असतां मही-पालानें चंद्रस्वामी माझा पिता आहे, असें सर्वांस कळविलें; आणि आपल्या बहिणीला योग्य स्थानीं देऊन तो सुखानें राहूं लागला. एकदां त्याचा पिता त्याला हळुच म्हणाला, "बाळा, तुझ्या मातेला आणण्याक-रितां स्वदेशीं जाऊं या चल. कारण तूं राज्यावर बसला आहेस, असें जर तिला कळलें तर–' तो मला विसरला कसा!'–असें म्हणून ती रागावेल, बाळा, पुष्कळ दिवसांपासून दुःख भोगीत राहिलेली ती कदाचित् ला शापही देईल. आईबापांनीं शाप दिला असतां मुलांचें हित कधींच होत नाहीं. या विषयीं मी एक कथा सांगतों ती ऐक."

* कुर्वन्त्यकालेऽभिव्यक्तिं न कार्यापेक्षिणो बुधाः ।

## ३. चक्र-वैश्यपुत्राची उपकथा.

पूर्वी धवल नगरांत चक्र म्हणून एक वैश्य-पुत्र होता. तो आईबापांची इच्छा नसतांना एकदां व्यापाराकरितां स्वर्णद्वीपास गेला. पांच वर्षांत त्यानें तेथें पुष्कळ धन मिळविलें, व तें सर्व एका सुदृढ नौकेंत घालून तो समुद्रांतून परत यावयास निघाला. पुष्कळसा जलमार्ग संपून थोडासाच अवशिष्ट राहिला असतां, एकाएकीं मोठें वादळ झालें; मेघ मोठमोठ्या गर्जना करून अतिवृष्टि करूं लागले; विजांचा चकचकाट सुरू झाला; समुद्र खवळला, व 'आपल्या आईबापांच्या इच्छेविरुद्ध तूं कां आलास' म्हणून रागावूनच जणुं काय, त्यानें महातरंगांनीं त्याचें तारूं फोडून टाकलें. तेव्हां त्यांतील कित्येक लोक पाण्यांत बुडून मेले, कित्येकांस मकरादि जल-जंतूंनीं खाल्लें, व चक्र-वैश्यपुत्र आयुष्य संपलेलें नसल्यामुळें कसा-तरी तीरापर्यंत येऊन पोंचला. तो अतिशय व्याकुल झाला, व त्यानें स्वप्नांतल्या प्रमाणें एक भयंकर, काळा व हातांत पाश घेतलेला पुरुष पाहिला. त्यानें त्या चक्राला पाशानें बांधून दूर नेला, व सिंहासनावर बसून न्याय करीत असलेल्या एका पुरुषाच्या सभेंत उभा केला. नंतर त्या सिंहासनस्थ पुरुषानें आज्ञा केली असतां, त्या पाशधारी पुरुषानें चक्र-वैश्याला लोखंडाच्या घरांत नेऊन अडकविलें. तेथें त्याला एक पुरुष दिसला. त्याच्या डोक्यावर तापवून लाल केलेलें एक लोखंडी चक्र सतत फिरत असून, त्यामुळें त्याला आंतल्या आंत पीडा होत होती. तें पाहून 'कोणत्या दुष्कर्मामुळें तुझी अशी गति झाली आहे बुवा?' असें चक्र-वैश्य त्याला विचारूं लागला. तेव्हां तो म्हणाला,—"मी खड्ग या नांवाचा वैश्य आहे. मी आईबापांचें म्हणणें ऐकलें नाहीं, त्यामुळें त्यांनीं रागावून 'ज्या अर्थी तूं आम्हांला तापलेल्या लोखंडी चक्राप्रमाणें आपल्या दुर्वर्तनानें संताप देत आहेस, त्या अर्थी तुलाही अशीच यातना होईल.' असा मला शाप दिला, तेव्हां मी रडूं लागलों असतां 'वत्सा, रडूं नकोस. तुला एक महिनाभरच अशी यातना भोगावी लागेल.' असें तीं पुनः बोललीं, तथापि मी अतिशय खिन्न होऊन हांतरुणावर जाऊन पडलों. रात्रीं स्वप्न जसें पडावें, त्याप्रमाणें मला एक भयंकर पुरुष दिसला, व त्यानें बलात्कारानें मला येथें आणून ठेवलें; आणि हें दीप्त चक्र माझ्या डोक्यावर दिलें. पण आईबापांच्या शापामुळें इतकी यातना भोगीत

असतांनाही माझे प्राण जात नाहींत. येथें येऊन एक महिना तर होऊन गेला; पण अजून मी या आपत्तींतून कां सुटत नाहीं कोण जाणे!"

खड्गाच्या तोंडची ही वार्ता ऐकून तो चक्रवश्य कृपेनें म्हणाला, "भद्र, मीही धनाच्या लोभानें प्रवासास निघून आईबापांचें म्हणणें ऐकलें नाहीं. तेव्हां त्यांनीं–' तुला मिळालेलें सर्व नष्ट होईल '–असा मला शाप दिला. त्यामुळें व्यापार करून परदेशांत मिळविलेलें माझें सर्व धन समुद्रांत बुडून गेलें. यास्तव मी आतां आपल्या जीविताला कंटाळलों आहें. तें चक्र तूं माझ्या मस्तकावर ठेव, तुझा शाप तरी नष्ट होऊं दे."

चक्र–वैश्य इतकें बोलत आहे तों–' खड्गा, तूं शापापासून मुक्त झाला आहेस. तूं आपलें चक्र या चक्राच्या डोक्यावर ठेव. ' अशी आकाशवाणी झाली. त्याबरोबर एका अदृश्य भूतानें तें चक्र खड्गाच्या डोक्यावरून काढून चक्राच्या मस्तकावर ठेवलें, व खड्गाला पित्याच्या येथें पोंचविलें. त्या दिवसापासून तो आपल्या आईबापांच्या अर्ध्या वचनांत राहूं लागला. चक्र–वैश्य तें चक्र आपल्या मस्तकावर घेऊन–' पृथ्वींतील दुसरे सर्व पापीही आपापल्या पापांपासून मुक्त होवोत, व हें चक्र सर्वांचा पापक्षय होई तों माझ्या मस्तकावर फिरत राहो '–असें म्हणाला. त्याबरोबर आकाशस्थ देवांनीं त्याच्यावर पुष्पवृष्टि केली, व संतुष्ट झालेले ते देव 'शाबास वत्सा शाबास, या तुझ्या करुणेनें तुझें सर्व पाप नष्ट झालें आहे. तूं आतां स्वगृहीं जा, तुला वित्त मिळेल. ' असें त्यास म्हणाले. त्याबरोबर त्याच्या डोक्यावरील चक्र कोठें गुप्त झालें. इतक्यांत आकाशांतून एक विद्याधर कुमार त्याच्यापाशीं आला, आणि संतुष्ट झालेल्या इंद्रानें पाठविलेला रत्नसंचय त्याला अर्पण करून आपल्या अंकावर बसवून घेऊन त्यानें त्या चक्र–वैश्याला आकाशमार्गानें धवलपुरास पोंचविलें. तेव्हां चक्रानेंही आईबापांजवळ येऊन सर्व आप्तांस आनंदित केलें, व आपला सर्व दुःखकर वृत्तांत त्यांना सांगितला. चंद्रस्वामी म्हणतो,–' तात्पर्य, बालका महीपते, आईबापांचा द्रोह, असें कष्टतर फल देत असतो. त्यांची भक्ति केवळ कामधेनुच आहे, याविपर्यीही मी एक कथा सांगतों ऐक.

### ४. पतिव्रता व धर्मव्याध यांची उपकथा.

पूर्वी कोणी एक महातपस्वी वनवासी मुनि होता. एकदां वृक्षाखालीं बसलेल्या त्याच्या अंगावर एका बगळीनें विष्ठा टाकली. तेव्हां रागाव-

लेल्या त्यानें तिच्याकडे पहातांच ती मरून खालीं पडली. त्यामुळें त्या महात्म्याला आपल्या तपः-प्रभावाविषयीं मोठा अभिमान वाटला. एकदां तो मुनि एका नगरांतील ब्राह्मणाच्या येथें दुपारीं भिक्षा मागावयास गेला. तों त्या घरची पतिव्रता बाई-' महाराज, मी पतीची सेवा संपवितें, तोंपर्यंत थांबा '-असें त्याला म्हणाली; पण त्यामुळें त्या तपस्व्याला क्रोध आला. व तो क्रोधदृष्टीनें तिच्याकडे पाहूं लागला. तेव्हां ती साध्वी हंसून म्हणाली,-' मुने, मी कांहीं बलाका नव्हे. उगीच रागावतां कशाला ? शांत व्हा.' तें ऐकून मुनीला आश्चर्य वाटलें; व तो ' बलाकेचें वृत्त हिला कसें कळलें. ' असा विचार करीत तेथेंच बसून राहिला. कांहीं वेळानें होमादि अग्निकार्य करणाऱ्या पतीची शुश्रूषा करून ती साध्वी भिक्षा घेऊन मुनीकडे आली. तेव्हां तो हात जोडून म्हणाला-'आई, दुसऱ्या कोणालाही माहीत नसलेला बलाकेचा वृत्तांत तुला कसा कळला, तें मला अगोदर सांग, म्हणजे मग मी भिक्षा घेईन.'

तो त्याचा प्रश्न ऐकून साध्वी म्हणाली,-'मुने, एका भर्तृशुश्रूषेवांचून मी दुसरा कोणताही धर्म करीत नाहीं, व त्यामुळेंच मला असलें अद्भुत ज्ञान प्राप्त झालें आहे. तूं आतां येथून या नगरांतील धर्मव्याध नांवाच्या मांस विकणाऱ्या शूद्राकडे जा आणि त्याला विचार, म्हणजे तुझें कल्याण होईल, व सर्व अहंकारही जाईल.' याप्रमाणें त्या सर्वज्ञ पतिव्रतेनें सांगितलें असतां मुनि भिक्षा घेऊन तेथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं तो मुनि, मांस विकीत बसलेल्या धर्मव्याधाजवळ विचारीत विचारीत गेला. त्याला पहातांच-'पतिव्रतेनें तुला मजकडे पाठविलें आहे काय ? '-असें तो विचारूं लागला. तें ऐकून मनांत चकित झालेला मुनि त्याला म्हणाला-'मांस विकणाऱ्या तुला असलें अद्भुत ज्ञान कसें झालें ? ' त्यावर धर्मव्याध आपली सर्व हकीकत सांगूं लागला:-'ब्राह्मणा, मी आईबापांचा भक्त आहें. तींच माझें परम दैवत आहेत. त्यांना अगोदर स्नान घालून नंतर मी स्नान करितों, त्यांना जेवूं घालून नंतर मी जेवतों, त्यांना निजवून नंतर मी निजतों. त्यामुळें मला असलें ज्ञान झालें आहे. दुसऱ्यांनीं मारून आणलेल्या हरिणादिकांचें मांस मी केवल स्वधर्म समजून उदरभरणार्थ विकतों. धनसंग्रह करण्याकरितां नव्हे. शिवाय बा मुने, मी व ती पतिव्रता ज्ञानास विघ्न करणाऱ्या

अहंकाराला थाराही देत नाहीं; त्यामुळें आम्हांला हें अशा प्रकारचें ज्ञान झालें आहे. तूंही अहंकार सोडून स्वधर्माचरण कर. धर्मव्याधानें केलेला हा उपदेश ऐकून संतुष्ट झालेला मुनि त्याच्या घरीं गेला, व त्याची सर्व दिनचर्या पाहून प्रसन्न झाला. त्याच्या उपदेशाप्रमाणें वागल्याकारणानें मुनीलाही सिद्धि मिळाली. पतिव्रता व धर्मव्याधही धर्माचरणामुळें परम सिद्धीस प्राप्त झालीं. पातिव्रत्य व पितृपरायणता यांचा असा प्रभाव आहे. यास्तव बाळा, चल व आपल्या दर्शनोत्सुक मातेला सुखी कर.

पित्याच्या या सांगण्याप्रमाणें मातृदर्शनोत्सुक महीपालानें स्वदेशास जाण्याचें मनांत आणलें, व धर्मपिता जो अनंतस्वामी त्याला तें सर्व सांगून व त्याच्यावर राज्यभार ठेवून पित्याबरोबर तो रात्रीं तेथून निघाला. क्रमानें स्वदेशास जाऊन पोंचल्यावर वसंत ऋतु जसा कोकिलेला आनंद देतो, त्याप्रमाणें त्यानें आपल्या जननीला आनंदित केलें, आणि बांधवांनीं ज्याचा सत्कार केला आहे असा तो, आई व बाप यांसह तेथें राहिला.

तिकडे तारापुरांत महीपालाची प्रिया राजकन्या बंधुमती, रात्र संपतांच जागी झाली. पण आपला प्रिय पति कोठेंसा गेला आहे असें पाहून, विरहातुर झाली. तिला कोठेंच चैन पडेना. मोत्या एवढाले अश्रू ढाळून ती साध्वी रडूं लागली. यापेक्षां मला मृत्यु आला तरी बरें होईल, असें बडबडूं लागली. पण अनंतस्वामी मंत्र्यानें पुष्कळ बोध करून तिचें सांत्वन केलें. 'पुत्रि, तो तुझा प्रिय,–'मी कांहीं कार्याकरितां जात आहें, सत्वर परत येईन'–असें सांगून गेला आहे. यास्तव तूं उगीच शोक करूं नकोस.' असें त्यानें सांगितलें असतां तिनें कसेंबसें धैर्य धरलें, व त्या दिवसापासून ती भर्त्याची वार्ता कळावी म्हणून देशान्तराहून आलेल्या ब्राह्मणश्रेष्ठांची दानांनीं सदा पूजा करूं लागली.

### ५. एका पाशुपताची उपकथा.

एकदां फार दुरून आलेल्या संगमदत्त नांवाच्या एका ब्राह्मणास पतीचें नांव व खूण सांगून ती त्याची वार्ता विचारूं लागली. तेव्हां तो द्विज म्हणाला, " अशा तऱ्हेचा कोणी पुरुष मीं पाहिला नाहीं; तथापि त्याविषयीं तूं भिऊं नकोस. शुभ कर्मांच्या योगानें लवकरच तुझा प्रिय-

समागम होईल. मी पाहिलेला एक चमत्कार तुला सांगतों तो ऐक.— तीर्थाटन करीत असतांना मी एकदां हिमालयावरील मानस सरोवराच्या तीरीं गेलों. तेथें आरशासारखें एक रत्नमय मंदिर मला दिसलें. त्यांतून एक स्त्रीपरिवारानें परिवेष्टित झालेला सशस्त्र पुरुष आला, व त्या सरोवराच्या तीरावरील उद्यानांत त्या सुरसुंदरीसह मद्यपान करून क्रीडा करूं लागला. मी दुरून मोठ्या कौतुकानें त्याची ती लीला लपून पहात होतों. इतक्यांत माझ्यापाशीं आणखी एक रमणीय पुरुष आला. मी जसें पाहिलें होतें तसें त्याला सर्व वृत्त सांगून, दिव्य स्त्रियांसह क्रीडा करीत असलेल्या त्या पुरुषालाही दाखविलें. त्यावरोबर तो आपला वृत्तांत सांगूं लागला.

" मी त्रिभुवन संज्ञक नगरांत त्रिभुवन नांवाचा राजा होतों. तेथें एका पाशुपत व्रत धारण केलेल्या साधूनें माझी पुष्कळ दिवस सेवा केली. तेव्हां ' तूं माझी इतकी सेवा कां करितोस ? ' असा प्रश्न त्याला एकदां हळूच विचारला असतां तो म्हणाला–' बिळांतील खडग साधावयाच्या कामांत तूं माझें साह्य कर. ' मी त्याच्या या प्रार्थनेचा अंगीकार केला. त्यानंतर तो पाशुपत माझ्या सहवर्तमान रात्रीं अरण्यांत जाऊन व होमादिकांच्या योगानें विवर प्रकट करून मला म्हणाला, " वीरा, अगोदर तूं यांत शीर, व आंतील खड्ग प्राप्त करून घेऊन बाहेर ये, व मलाही आंत ने; पण मी असें करीन असें मला वचन दे. " त्याच्या या म्हणण्याप्रमाणें त्याला वचन देऊन मी विवरांत गेलों. तेथें मला एक दिव्य रत्नमय गृह दिसलें. त्यांतून एकाएकीं एक श्रेष्ठ देव–स्त्री निघाली व प्रेमानें मला आपल्या अंतःपुरांत घेऊन गेली. तिनें मला तें खड्ग दिलें, आणि 'हें खड्ग सर्वसिद्धि व आकाशांतील गति देणारें आहे, यास्तव याचें मोठ्या यत्नानें रक्षण कर,' असें तिनें सांगितलें. नंतर तिच्यासहवर्तमान मी तेथें सुखानें राहूं लागलों. कांही दिवसांनीं आपलें वचन आठवून मी खड्गासह त्या विवरांतून बाहेर आलों व त्या पाशुपतालाही आंत नेलें. त्यालाही तेथें एक कन्या मिळाली. तेव्हां मी व तो असे दोघेही आपापल्या दासीयुक्त प्रियांसह तेथें सुखानें राहूं लागलों. एकदां मी मद्याचे धुंदींत असतां माझ्या हातांतील तें खड्ग त्या पाशुपतानें कपटानें काढून घेतलें. त्यामुळें महासिद्धि त्याला प्राप्त झाल्या व खड्गाभावीं मी सिद्धिरहित होऊन राहिलों. तेव्हां त्यानें मला त्या विवरांतून बाहेर घालवून दिलें, व तो एकटाच आंत

आनंदानें राहिला. त्यानंतर तो केव्हां तरी बाहेर पडेल या आशेनें मी त्या गुहेच्या द्वाराशीं बारा वर्षे राहिलों; पण तो बाहेरच आला नाहीं. आज तोच हा शठ माझ्या प्रियेसह माझ्या दृष्टीस पडला आहे."

राजकन्ये, त्रिभुवन राजा इतकें सांगत आहे, तों तो पाशुपत मद्यपानानें मत्त होऊन त्या उद्यानांतच निजला. तेव्हां राजा हळुच त्याच्यापाशीं गेला, व त्यानें त्याच्या हातांतून तें खड्ग हिसकावून घेतलें. त्याबरोबर तो पुनः पहिल्यासारखा दिव्य सिद्धिमान् झाला. त्यानंतर त्या पाशुपतास लाथ मारून त्यानें त्याची अतिशय निर्भर्त्सना केली. प्राण मात्र घेतला नाहीं, एवढेंच काय तें. त्यानंतर तो साक्षात् सिद्धीसारख्या आपल्या प्रियेसह त्या मंदिरांत निघून गेला. नंतर सिद्धीपासून भ्रष्ट झालेला तो पशुपत अति कष्टी झाला. कृतघ्न* पुरुष फार दिवसांपासून जरी सिद्धिसंपन्न झालेले असले, तरी शेवटीं खचित भ्रष्ट होतात. असो; हा चमत्कार या आपल्या डोळ्यांनीं पाहून मी येथें आलों आहें. त्रिभुवन राजाप्रमाणें, देवि, तुझाही आपल्या प्रियपतीशीं समागम होईल. कारण शुभाचरण करणाऱ्या प्राण्यांचें अशुभ कधींही होत नाहीं.‡ ब्राह्मणाच्या तोंडून हा वृत्तांत ऐकून बंधुमती फार संतुष्ट झाली व त्याला पुष्कळ धन देऊन तिनें कृतार्थ केलें.

दुसऱ्या दिवशीं आणखी एक ब्राह्मण दुरून आला. बंधुमतीनें त्यालाही नांव व खूण सांगून पतीची वार्ता विचारली. तेव्हां तोही म्हणाला "देवि, मला तुझा भर्ता कोठें आढळला नाहीं; पण मी सुमना नामक ब्राह्मण आज तुझ्या येथें आलों आहें. तुला लवकरच सुख होईल, असें माझें मन मला सांगत आहे. व तुझ्यासारख्या पतिव्रतांना पतिसमागमावांचून दुसऱ्या कशानें सुख होणार ? याविषयीं मी तुला एक कथा सांगतों ती ऐक.

### ६. नल-दमयंतीची उपकथा.

पूर्वी नल म्हणून एक निषधाधिपति राजा होता. मला वाटतें कीं त्याच्या रूपानें पराभूत झाल्यामुळेंच कामानें शंकराच्या तृतीयनेत्रजन्य

---

* कृतघ्नाश्चिरसिद्धार्था अपि भ्रश्यन्ति हि ध्रुवम् ॥

‡ शुभकृन्नहि सीदति ॥

अग्नींत आपलें शरीर जाळून घेतलें. त्याचा विवाह व्हावयाचा होता. त्याकरितां तो योग्य वधूचा शोध करूं लागला असतां, भीमकन्या दमयंती आपल्याला अनुरूप भार्या आहे, असें त्यानें ऐकलें. सर्व पृथ्वीभर शोध करणाऱ्या भीमालाही नलावांचून दुसरा अनुरूप वर आढळला नाहीं. इतक्यांत दमयंती जलक्रीडा करावयाकरितां एका सरोवरांत उतरली असतां, कमल खात असलेल्या राजहंसाला पाहून व त्याच्यावर आपलें उत्तरीय वस्त्र टाकून कौतुकानें त्याला धरूं लागली. जठराग्नीला तृप्त करण्यामध्यें निमग्न झालेला तोही तिला अनायासें सांपडला. पण तो हंस दिव्य वाणीनें तिला म्हणाला—'राजपुत्रि, मला कृपा करून सोड. मी तुजवर मोठा उपकार करीन. निषध देशांत नल या नांवाचा एक राजा आहे, त्याला तूं सदृश भार्या व तुला तो सदृश पति आहे. तुम्हां दोघांचा योग्य समागम करून देण्याकरितां मी कामदूत होईन. तें ऐकून व तो हंस सत्यवादी आहे असें जाणून, तिनें त्याला सोडून दिलें. आणि 'मला नलावांचून दुसऱ्या कोणाला वरावयाचेंच नाहीं.' असें ती म्हणाली.

त्यानंतर तो हंस तसाच निषध देशास गेला, व नलराजा ज्या सरोवरामध्यें जलक्रीडा करीत होता, त्याच सरोवरांत उतरला. तेव्हां नलानेंही त्या अपूर्व राजहंसास पाहून कौतुकानें आपल्या उत्तरीय वस्त्रानें धरलें. तेव्हां राजहंस मनुष्यवाणीनें त्याला म्हणतो-'राजन्, तुजवर उपकार करावयास आलेल्या मला तूं सोड व अगोदर मी काय सांगतों तें ऐक.'

'विदर्भदेशांत भीमराजाची दमयंती म्हणून एक कन्या आहे. ती या भूलोकची तिलोत्तमाच असून देवही तिची इच्छा करीत असतात. पण तुझ्या गुणांनीं जिच्या चित्तास तुजकडे ओढून घेतलें आहे, अशी ती तुलाच वरण्याची इच्छा करीत आहे, व हें वर्तमान कळविण्याकरितां मी येथें आलों आहें.' राजकन्ये, हंसाच्या या शब्दांबरोबर मदनाचे बाणही नलाच्या हृदयांत शिरले, व तो हंसास म्हणाला,—'बा पक्ष्या, साक्षात् अर्थसिद्धीसारखी ती मला वरीत आहे, त्याअर्थीं मी धन्य होय' नंतर राजानें सोडलें असतां तो हंस, दमयंतीस झालेला वृत्तांत सांगून स्वस्थानीं गेला. उत्कंठित झालेल्या दमयंतीनें आईच्या द्वारा नलप्राप्तीकरितां

१ शुभकृन्नहि सीदति ॥

बापापाशीं स्वयंवराची प्रार्थना केली. भीमराजालाही ती मान्य झाली व त्यानें पृथ्वींतील सर्व राजांकडे दूत पाठविले. त्यावेळीं दमयंतीच्या आज्ञेनें राजेही भराभर विदर्भास येऊं लागले. नलही रथावर बसून निघाला. इतक्यांत इंद्रादि लोकपालांनीं नारदाच्या तोंडून दमयंतीचें स्वरूप, तिचें नलावरील प्रेम व तिचा होणारा स्वयंवरसमारंभ यांची वार्ता ऐकिली. तेव्हां इंद्र, अग्नि, यम, वरुण व वायु या पांच लोकपालांनीं संकेत करून दमयंतीला प्राप्त करून घेण्याचा निश्चय केला. तिच्याकरितां अतिशय उत्सुक झालेले ते पांची देव नलापाशीं आले, आणि विदर्भदेशास जात असलेल्या त्या नल राजास म्हणाले, 'राजन्, तूं आमच्या सांगण्यावरून दमयंतीकडे जाऊन तिला सांग कीं, 'आम्हां पांचांपैकीं कोणाला तरी वर, मर्त्य नलाला कशाला वरतेस ? कारण मर्त्य मरतात, व देव अमर असतात.' असें सांगून त्यांनीं त्याला 'तूं कोणाला न दिसतां तिच्या पाशीं जाऊं शकशील.' असा वर दिला.

नलानेंही त्या देवांची ही आज्ञा शिरसा मान्य केली, व तो कोणालाही न दिसतां तिच्या अंतःपुरांत जाऊन देवांचा निरोप तिला सांगूं लागला. तेव्हां तो सर्व ऐकून घेऊन ती म्हणाली, 'देव जरी अमर असले तरी माझा भर्ता नळच. मला देवांचें कांहीं प्रयोजन नाहीं.' हें तिचें निग्रहाचें भाषण ऐकून संतुष्ट झालेल्या नलानें, आपण कोण ? हें तिला सांगितलें; व विवाहापूर्वीच तिला दर्शन देऊन तो देवांकडे परत आला, आणि घडलेला वृत्तान्त सांगूं लागला. तेव्हां संतुष्ट झालेले देव त्याला म्हणाले, 'राजन्, आम्ही तुझ्या अधीन झालों आहों, तूं जेव्हां स्मरण करशील तेव्हां आम्ही तुजकडे येऊं.' देवांच्या या वरामुळें नळाला फार आनंद झाला, व तो रथारूढ होऊन कुंडिनपुरास गेला. दमयंतीला फसविण्याची इच्छा करणाऱ्या त्या पांची देवांनींही नळाचें रूप घेऊन स्वयंवर प्रसंगीं भीमाच्या सभेत प्रवेश केला, व तेही मनुष्य होऊन नळाजवळ बसले.

स्वतः पतीला वरण्याची इच्छा करणारी दमयंती, तिचा भाऊ प्रत्येक राजापुढें तिला नेऊन दाखवीत असतांना त्या सर्वांना सोडून नळापर्यंत येऊन पोंचली. तों तिला तेथें सहा नळ दिसले. मनुष्याप्रमाणेंच त्या सर्वांची छाया पडत होती व नेत्रांचे निमिषोन्मेषही होत होते. त्यामुळें ती

शहाणी कन्या मनांत घाबरली. यांतील खरा नळ कोणता हें तिला कळेना. देवांनीं हें कपट केलें आहे, असें तिनें लागलेंच ताडलें, व ती सूर्याभिमुख होऊन हात जोडून म्हणाली,–'लोकपालांनो, माझें मन स्वप्नांतही जर नलाला सोडून अन्यत्र गेलें नसेल, तर त्या सत्याच्या व पातिव्रत्याच्या प्रभावानें तुम्ही मला दिसाल. कन्येनें पूर्वींच वरलेल्या पुरुषाहून इतर पुरुष तिला परपुरुषासारखे असतात व पुरुषांनांही ती परस्त्रीसारखी असते. मग असा न्याय व धर्म असतांना तुम्हांला हा मोह कसा झाला ?

दमयंतीचें हे चातुर्याचें भाषण ऐकून इंद्रादि देव लज्जित झाले व त्यांनीं आपापलें स्वरूप प्रकट केलें. खरा नळ नळरूपानेंच विराजमान झाला. तेव्हां आनंदित झालेल्या भीमक बालेनें त्या धन्य राजाच्या मुखाकडे फुललेल्या नीलकमलासारखी दृष्टि फेंकून गळ्यांत सुवासिक पुष्पांची माळ घातली. त्यावेळीं आकाशांतून पुष्पवृष्टि झाली. नंतर भीमराजानें नल व दमयंती यांचें विवाह-मंगल केलें. इतर राजांचा व महेंद्रादि देवांचा यथोचित सत्कार करून त्या सर्वांचें विसर्जन केलें.

इकडे महेंद्रादि पांच लोकपाल परत जात असतांना कलि व द्वापर यांनां त्यांनीं मार्गांत पाहिलें, तेव्हां ते म्हणाले,–' तुम्ही आतां कशाला जातां ? दमयंतीचें स्वयंवर होऊन गेलें. तिनें नळाला वरलें. आम्ही हे आतां तेथूनच येत आहों.' त्यांचें हें भाषण ऐकून ते दोघे पापी अतिशय रागावले व म्हणाले,—' काय, तुम्हां देवांनाही सोडून तिनें मर्त्य नळाला वरलें ! बरें आहे, आम्ही त्यांचा अवश्य वियोग करणार ! ' राजपुत्रि, अशी घोर प्रतिज्ञा करून ते दोघे दुर्जन स्वस्थानीं निघून गेले. तिकडे नल सात दिवस श्वशुरगृहीं राहून व कृतार्थ होऊन दमयंतीसह निषध देशास परत आला. तेथें त्या दोघांचें प्रेम, गौरी-शंकरांच्या प्रेमाहूनही अधिक वाढलें, कारण गौरी-शंकराचें अर्धें अंगच होती; पण दमयंती नलाचा आत्मा झाली.

कांहीं दिवसांनीं नळाला दमयंतीच्या ठायीं चंद्रसेन पुत्र व इंद्रसेना कन्या अशीं दोन अपत्यें कांहीं वर्षांच्या अंतरानें झालीं. आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्याचा ज्यानें निश्चय केला आहे असा कलि, शास्त्रीय मार्ग सोडून रेसभरही न जाणाऱ्या नळाचें छिद्र पहात फार दिवस राहिला. एकदां पुष्कळ मद्य प्राशन केल्यामुळें नळ मत्त झाला व कर्तव्यस्मृति नष्ट झा-

त्याकारणानें हातपाय धुवून संध्योपासना न करितांच निजला. फार दिवसांपासून टपून बसलेल्या कलीला हें ऐवढेसें छिद्र मिळतांच तो त्याच्या शरीरांत शिरला. मग काय विचारतां, देहगतकलीच्या प्रभावानें ज्याचें सर्व ज्ञान नष्ट झालें आहे, असा राजा धर्ममार्ग सोडून यथेच्छ वागूं लागला. फाशांनीं खेळणें, दासीशीं रत होणें, खोटें बोलणें, दिवसा निजून रात्रीं जागणें, निष्कारण रागावणें, अन्यायानें द्रव्य संपादन करणें, संतांचा अवमान व असज्जनांचा मान करणें, इत्यादि सर्व अक्रिया तो करूं लागला. तिकडे द्वापरानेंही छिद्र मिळतांच नळराजाच्या पुष्कराक्ष नांवाच्या भावाच्या शरीरांत प्रवेश करून त्याला उन्मार्गी केलें.

एकदां नलराजानें आपल्या त्या कनिष्ठ भ्रात्याच्या येथें ‘ दान ’ या नांवाचा सुंदर शुभ्र बैल पाहिला, व लोभानें तो त्याची याचना करूं लागला. पण द्वापरानें ज्याची भक्ति पार नाहींशी करून टाकली आहे, असा पुष्कराक्ष त्याला तो बैल देईना. तो म्हणाला, ‘ जर तुला तो हवा असला तर द्यूत करून याला जिंकून घे. ’ नळाला त्याचें म्हणणें मान्य झालें, व त्या दोघां भावांचें द्यूत सुरू झालें. पुष्करानें केवल बैलच पणाला लाविला व नळानें हत्ती-घोडे इत्यादिकांनीं युक्त असलेली सर्व संपत्ति लाविली. पुष्कराक्ष वारंवार जिंकून घेऊं लागला व नळ क्रमानें हरवूं लागला. याप्रमाणें तें द्यत चाललें असतां दोन तीन दिवसांत नळानें सर्व सैन्य व कोश घालविला. आतां हें द्यूत पुरें झालें असें म्हणून दमयंती व इतर आप्त निवारण करीत असतांनाही ज्याची मति कलिप्रभावानें नष्ट झाली आहे, असा नळ द्यूत सोडीना.

नंतर पुष्कराक्षानें राज्यही जिंकून घेतलें; तेव्हां दमयंतीनें आपल्या दोघां प्रिय अपत्यांना रथावर बसवून बापाच्या घरीं पाठवून दिलें. त्यानंतर नलानें सर्वस्व हरविलें आहे, असें पाहून पुष्कराक्ष म्हणाला-‘ तूं सर्व हरविलें आहेस, आतां माझ्यासमक्ष दमयंतीला आणून तिचा पण लाव. या भाषणानें नळाला फार क्रोध आला. पण काल प्रतिकूल असल्यामुळें तो त्या वेळीं कांहीं बोलला नाहीं, व त्यानें तिचा पणही लाविला नाहीं. तेव्हां पुष्कराक्ष पुनः म्हणाला,-भार्येचा पण जर लावीत नसशील, तर माझ्या राज्यांतून भार्येसह सत्वर निघून जा. भ्रात्याचें तें म्हणणें मान्य करून नल दमयंतीसह तेथून निघाला. सीमेपर्यंत राजपुरुष त्याला घालवावयास

आले होते. अरेरे, कलीनें नलाचीही जर अशी दुर्दशा केली, तर कृमी-सारख्या इतर जीवांची तो याहूनही अधिक दुर्दशा करील यांत काय संशय आहे ? असल्या राजर्षीनाही विपत्तींत पाडणाऱ्या, निःस्नेह व निर्धर्म द्यूताला धिक्कार धिक्कार असो.

भ्रात्यानें ज्याचें ऐश्वर्य हरण करून घेतलें आहे, असा नल, दमयंतीसह क्षुधेनें पीडित होत्साता रानोमाळ फिरूं लागला. दर्भादिकांचीं अग्रें टोंचल्यामुळें जिच्या सुकुमार पायांची चाळण झाली आहे, अशा दमयंतीसह एका नदीच्या तीरीं विश्रांति घेत असतां त्यानें चरणाऱ्या दोन हंसांस पाहिलें, व उत्तरीय वस्त्राच्या योगानें त्यांना तो धरूं लागला; पण ते दोघे पक्षी त्याचें उत्तरीय वस्त्र घेऊन आकाशांत उडून गेले; तेव्हां विस्मित झालेल्या नळाला, 'कलि व द्वापर हंसरूपानें तुझें उत्तरीय वस्त्र घेऊन गेले आहेत.' अशी आकाशवाणी ऐकूं आली. नंतर ज्याच्यापाशीं एकच वस्त्र राहिलें आहे, असा खिन्न राजा, दमयंतीला पित्याच्या घरीं जाण्याकरितां युक्तीनें मार्ग दाखवूं लागला.—'प्रिये, हा तुझ्या विदर्भदेशास जावयाचा मार्ग आहे. हा अंगदेशाकडे जाण्याचा मार्ग व हा कोसल देशाचा मार्ग.' तें ऐकून दमयंतीला शंका आली. 'मला सोडून जाण्याच्या इच्छेनें आर्यपुत्र मला मार्ग दाखवीत आहे,' असें तिला वाटलें. त्यानंतर फळें व मुळें खाऊन त्या दोघांनीं रात्रीं दर्भावर शयन केलें. वनांत चालून थकलेल्या दमयंतीला थोड्याच अवकाशांत गाढ झोंप लागली. दमयंतीला झोंप लागली आहे, असें पाहून व तिच्या उत्तरीयांतील अर्धें वस्त्र फाडून घेऊन तो तेथून निघाला. दमयंती पहाटे जागी झाली, तो तिला पति दिसला नाहीं. आपल्या उत्तरीयांतील अर्धें वस्त्र पांघरावयास घेऊन, आपल्याला एका वस्त्रानिशी असल्या या अरण्यांत सोडून, व तो वस्तुतः दयाळु असतानांही मंदभाग्यामुळें असा निष्ठुर होऊन गेला आहे, असें तिच्या ध्यानांत येतांच त्या साध्वीच्या दुःखाला पार नाहींसा झाला. कांहीं वेळ आसपास शोध केल्यावर तिची पूर्ण निराशा होऊन ती विलाप करूं लागली. ती म्हणाली—"शत्रूंवरही दया करणाऱ्या आर्यपुत्रा, हे महासत्त्व राजा, हे माझ्या जिवलगा, तुला मजविषयीं निर्दय कोणी केलें. तूं एकटाच अरण्यामध्यें पायांनीं कसा फिरशील ! तुझे श्रम घालविण्याकरितां जलादि देऊन तुझी सेवा कोण करील ! जे

तुझे दोन्ही पाय राजांच्या मस्तकावरील पुष्पांच्या परागांनीं सतत पूजित होत असत, त्यांनांच आतां धूळ मलीन करून सोडील. ज्या तुझ्या अंगाला हरिचंदनाची उटीही सहन होत नसे, तेंच आतां सूर्याचें प्रखर ऊन कसें सहन करील ! मला पुत्र, कन्या, किंवा शरीर यांस घेऊन काय करावयाचें आहे. मी जर साध्वी असेन तर देव तुझें हित करोत.'

असा विलाप करीत ती एकटीच नलानें पूर्वी दाखविलेल्या मार्गानें हळु हळु निघाली. नद्या, वनें व डोंगर यांचें तिनें कसें तरी उल्लंघन केलें; पण पतिभर्त्ताचें उल्लंघन तिला मुळींच करवेना. पातिव्रत्यतेजानेंच तिला मार्गांत रक्षिलें. कारण एकदां एका भुजंगानें तिला ग्रासलें असतां, एका लुब्धकानें त्या दुष्ट सर्पाला मारून तिला सोडविलें; पण त्यानंतर तिच्या रूपावर मोहित झालेला, तो तिची कामना करूं लागला असतां, जळून नष्ट झाला. नंतर दैववशात् मार्गांत भेटलेल्या एका वैश्यसमूहा-बरोबर, ती सुबाहु नामक राजाच्या नगरास जाऊन पोंचली. राजवाड्या-पुढील मार्गानें जात असतांना, तिला राजकन्येनें आपल्या मंदिरांतून पाहिलें व तिच्या सौंदर्याचें मोठें कौतुक वाटल्यामुळें, तिला प्रेमानें आपल्या अंतःपुरांत आणवून आपल्या आईपाशीं नेलें. सुबाहूच्या महादेवीनें मोठ्या आदरानें तिला आपल्यापाशीं ठेवून घेतलें, व तिनें विचारिलें असतां, डोळ्यांत पाणी आणून 'माझा प्राणनाथ मला सोडून कोठें निघून गेला' एवढेंच तिनें सांगितलें. आपलें नांव, गांव व मी कोणाची कोण, हें कांहीं तिनें तिला सांगितलें नाहीं.

तों इतक्यांत इकडे भीमक राजाला नलाचा वृत्तांत कळला, व त्यानें आपली कन्या व जामात यांच्या शोधाकरितां, आप्त ब्राह्मणांस देशोदेशीं धाडलें. त्यांत भीमक राजाचा सुषेण नामक एक अमात्य, ब्राह्मणरूपानें भ्रमण करीत असतांना, सुबाहूच्या राजधानीस आला. तेथें आगंतु-कांचा सत्कार करणाऱ्या, अति दुःखित दमयंतीला त्यानें, व त्याला तिनें पाहिलें. त्यांनीं एकमेकांस ओळखिलें, व तीं दोघेंही सुबाहु राजाच्या राणीला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें, शोकाचा वेग आवरून न धर-विल्यामुळें रडूं लागलीं. नंतर राणी रडण्याचें कारण विचारूं लागली असतां, ही साध्वी आपल्या बहिणीची कन्या आहे, असें तिला कळलें. त्यानंतर राणीनें तिचा तो वृत्तांत आपल्या पतीला कळवून, सन्मानपूर्वक

तिला रथांत बसवून व सुषेण मंत्र्याबरोबर तिच्या संरक्षणाकरितां, थोडेसें सैन्यही देऊन पित्याच्या येथें पाठविलें. तेथें गेल्यावर तिला दोन्हीं प्रिय अपत्यें भेटलीं. पित्यानेंही तिचें पुष्कळ शांतवन केलें. तथापि ती सतत आपल्या पतीची वार्ता कशी कळेल, या विचारांत निमग्न होऊन राहिली.

तिची ती चिंता जाणून भीमक राजानें, सूद व रथ यांची विद्या उत्तम प्रकारें जाणणाऱ्या नलाला शोधण्याकरितां, पृथ्वीभर दूत पाठविले व जेथें जेथें तो आहे अशी तुम्हांला शंका येईल, तेथें तेथें 'हे निष्ठुर चंद्रा! वनामध्यें निजलेल्या आपल्या प्रिय कुमुदिनीला सोडून, व एक अंबराचा (म्ह० वस्त्राचा अथवा अभ्राचा) तुकडा घेऊन, तूं कोठें अदृश्य होऊन गेलास?' अशा अर्थाचें—

बालां वने प्रसुप्तां नृशंस संत्यज्य कुमुदिनीकान्ताम् ।
प्राप्यैवाम्बरखण्डं चन्द्रादृश्यः क यातोऽसि ॥ १ ॥

हें पद्य म्हणा, असें त्यानें त्यांना सांगून ठेवलें.

तिकडे नलानें तें अर्धे उत्तरीय पांघरून वनांतून जात असतां वणवा लागलेला त्यानें पाहिला, व 'हे महावीर पुरुषा! या दावाग्नीनें मी जळलों नाहीं, तोंच यांतून मला काढ' असें म्हणत असलेला एक सापही त्याला दिसला. तो महासर्प आपल्या भव्य शरीराचें वेटोळें करून व फणा वर काढून त्याच्याकडे करुण-मुद्रेनें पहात होता. त्याच्या मस्तकांतील उत्तम रत्नाचें तेज वर पसरलें; पण त्यामुळें दावाग्नीनें जणुं काय आपल्या ज्वालारूपी हातांनीं त्याची शेंडीच धरली आहे, असा भास होत असे. असो; अशा त्या सर्पाला पहातांच नलाला दया आली, व त्यानें त्याला खांद्यावर घेऊन दूर नेलें, व खालीं सोडण्याचा विचार करूं लागला, तों नागराज म्हणाला,—'सत्पुरुषा, एक, त्रीणिद्वे, इत्यादि तोंडानें म्हणत मला आणखी दहा पावलें पुढें घेऊन चल. नळानेंही त्याचें म्हणणें मान्य करून त्याला पावलें मोजीत पुढें नेलें व दश (म्ह० दहा), असें दहावें पाऊल टाकतांना त्यानें म्हटलें असतां, दश म्हणजे चाव असाही अर्थ होत असल्यामुळें खांद्यावर बसलेल्या नागानें त्याच्या मस्तकावर दंश केला. त्यामुळें राजा विद्रूप झाला. तेव्हां त्याला खालीं उतरून नळ म्हणाला,—'तूं कोण, व हा असा

तूं माझ्यावर प्रत्युपकार कां केलास ?' तें ऐकून नाग म्हणाला,–' राजन्, मी कर्कोटक या नांवाचा नागराज आहें, असें तूं समज. माझा हा दंश तुझें मोठें हित करील, व तें तुला पुढें आपोआप कळेल. मोठ्या पुरुषांना गुप्त रहाण्याचा प्रसंग आला असतां, असें विद्रूप होणें त्यांच्या पथ्यावरच पडत असतें. अग्निशौच या नांवाची ही मी दिलेली वस्त्रांची जोडी तूं घे. हीं वस्त्रें पांघरलीं असतां तुझें मूळ रूप तुला प्राप्त होईल.' असें सांगून व वस्त्रयुग्म देऊन कर्कोटक गेला असतां नल तेथून निघून कोसलास गेला. तेथें कोसलाधिपति ऋतुपर्णराजापाशीं तो ऱ्हस्वबाहु या नांवाचा स्वयंपाकी होऊन राहिला. थोड्या अवकाशांत दिव्य रसयुक्त भोजन व रथचर्या यांतील नैपुण्यामुळें तो तेथें प्रख्यात झाला.

याप्रमाणें बरेच दिवस निघून गेले असतां एकदां विदर्भराजाच्या हेरांतील एक हेर तेथें आला. त्यानें सूद व रथ यांच्या विद्येमध्यें नळासारखा एक ऱ्हस्वबाहु या नांवाचा सूद येथें आला आहे, असें लोकांच्या तोंडून ऐकलें, व त्याबरोबर त्याला पहाण्याच्या इच्छेनें तो राजसभेंत गेला. तेथें बसलेल्या ऱ्हस्वबाहूस त्यानें पाहिलें व हाच कदाचित् नल असावा असें समजून भीमराजानें सांगितलेलें पद्य म्हटलें. तें ऐकून तेथील इतर लोक ही वेड्याची बडबड आहे असें समजून त्याविषयीं उदासीन झाले; पण सूद होऊन राहिलेल्या नळाला त्या पद्याचें मर्म कळल्यामुळें तो–' क्षीण झालेला चंद्र अंबरखंड घेऊन दुसऱ्या मंडलांत प्रवेश करूं लागल्यामुळें जर कुमुदिनीला अदृश्य झाला, तर त्यांत त्याची निष्ठुरता ती कोणती ?' अशा अर्थाचें—

क्षीणोऽम्बरैकदेशं चन्द्रः प्राप्यान्यमण्डलं प्रविशन् ।
कुमुदिन्या यद्दृश्यो जातस्तत्का नृशंसता तस्य ॥ १ ॥

हें पद्य म्हणाला. तें प्रत्युत्तर ऐकून व 'खचित हाच नळ आहे, विपत्तीमुळें हा असा विरूप झाला असावा,' असें मनांत म्हणून हेर तेथून निघून गेला.

नळाचा शोध लागला असें समजून आनंदित झालेला तो हेर तसाच वेगानें विदर्भास परत आला, व राजाचें दर्शन घेऊन त्यानें राणी व दमयंती यांच्या समक्ष सर्व पाहिलेलें व ऐकलेलें वर्तमान त्यांना निवेदन

केलें. त्याबरोबर दमयंती डोळ्यांत पाणी आणून पित्याला म्हणाली,- " बाबा, सूदाच्या मिषानें राहिलेला तोच माझा प्राणनाथ आहे, यांत कांहीं शंका नाहीं. त्याला आणण्याकरितां मी सांगतें ती युक्ति करा. ऋतुपर्ण राजाकडे दूत पाठवा व त्याला असें कळवा, कीं नळ राजा कोठें निघून गेला कांहीं कळत नाहीं. दमयंती उद्यां सकाळीं स्वयंवर करणार आहे. यास्तव आजच्याआज येथें ये. हा आपला निरोप ऐकून खचित तो राजा रथज्ञानवान् आर्यपुत्राच्या साह्यानें एका दिवसांत येथें येईल."

दमयंतीची ही युक्ति राजालाही मान्य झाली व त्याप्रमाणें संदेश सांगून त्यानें आपला दूत ऋतुपर्णाकडे पाठविला. दूतानेंही सत्वर जाऊन कोसलेश्वराला तसेंच सांगितलें. तें ऐकून तो राजा दमयंतीकरितां अतिशय उत्सुक झाला व जवळच असलेल्या सूदरूपी नळाचा मोठा सन्मान करून म्हणाला,-' हे ऱ्हस्वबाहो, मला रथज्ञान आहे असेंही तूं मला सांगितलें होतेस. यास्तव तुझ्या हातून होत असेल तर मला सत्वर आजच्याआज विदर्भास नेऊन पोंचीव.' त्यावर ' बरें आहे, मी आपल्याला तेथें नेऊन पोंचवितों,' असें बोलून व लागलेच उत्तम घोडे जोडून त्यानें रथ सज्ज केला; आणि ' ही स्वयंवराची युक्ति तिनें केवल माझ्या प्राप्तीकरितां केली आहे; कारण ती स्वप्नामध्येंही परपुरुषाची इच्छा करणार नाहीं, हे मला ठाऊक आहे. असो; मी आतां अगोदर तेथें जातों व तिला भेटतों,' असा मनांत विचार करून त्यानें तो रथ राजमंदिरापाशीं आणून उभा केला. तेव्हां राजा ऋतुपर्णही मोठ्या उल्हासानें त्यांत येऊन बसला. लागलाच नलानें रथ हाकलला. तो गरुडाच्या वेगालाही जिंकणाऱ्या वेगानें चालला होता. मार्गामध्यें ऋतुपर्ण राजाचें वस्त्र रथवेगामुळें खालीं पडलें, तेव्हां तें घेण्याकरितां रथ उभा करावयास तो सांगूं लागला असतां नळ म्हणाला,-' राजन्, तुझें वस्त्र कोठल्या कोठें राहिलें आहे. तें खालीं पडल्यापासून या वेळेपर्यंत आपला हा रथ अनेक योजनें चालून आला आहे. तें ऐकून ऋतुपर्ण म्हणाला,- ' ऱ्हस्वबाहो, मला तूं आपलें रथज्ञान दे, व मी त्याबद्दल तुला अक्षज्ञान देतों. त्याच्या योगानें फांसे खेळणाराच्या स्वाधीन राहतात, व संख्याज्ञानही होतें. मी आतांच तुझ्या मनाचा निश्चय करवितों पहा.

हा जो वृक्ष समोर दिसत आहे, त्याच्या वरील पानांची व फळांची संख्या मी सांगतों, व तूं ती बरोबर आहे कीं नाहीं हें मोजून पहा. असें म्हणून ऋतुपर्णानें आपल्या अक्षविद्येच्या बलानें त्या वृक्षावरील पानांची व फळांची जितकी संख्या सांगितली होती, तितकीच ती बरोबर भरली आहे, असें जाणून नलाला आश्चर्य वाटलें. त्यानें त्या राजाला रथज्ञान देऊन, त्याच्यापासून अक्षज्ञान घेतलें व आपलें ज्ञान बरोबर आहे कीं नाहीं याचा निर्णय दुसऱ्या एका वृक्षाचीं पानें व फळें मोजून केला. इतक्यांत त्याच्या शरीरांतून एक काळा पुरुष निघाला. त्याला पहातांच 'तूं कोण आहेस.' असा नलानें त्याला प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला,-" मी कलि आहें. दमयंतीनें वरलेल्या तुझ्या शरीरांत मीं ईर्ष्येनें प्रवेश केला, त्यामुळें तुझ्या सर्व संपत्तींची दुर्दशा झाली. पण वनामध्यें कर्कोटकानें तुला जरी दंश केला होता, तरी त्यामुळें तुला पीडा न होतां आंत असलेल्या माझेंच अंग विषानें भाजलें. उगीच दुसऱ्याला अपकार केल्यानें कोणाचें हित होणार आहे ?‡ असो; मी आतां जातों, तुझें कल्याण होवो."

असें सांगून कलि गुप्त झाला असतां नलाला पहिल्यासारखी धर्मबुद्धि झाली. नंतर रथावर बसून त्यानें त्याच दिवशीं तशाच वेगानें रथ चालवून सायंकाळीं ऋतुपर्णाला विदर्भास पोंचविलें. नगरांत जातांच तेथील लोक हा राजा एकाएकीं कां आला म्हणून चवकशी करूं लागले, व येण्याचें कारण ऐकून, सर्व मनांतल्या मनांत हसूं लागले. ऋतुपर्ण राजमंदिरासमीप जाऊन पोंचला, व भीमराजानें त्याच्याकरितां नियत केलेल्या उच्च गृहांत तो उतरला. रथाचा आश्चर्यकारक शब्द ऐकून, व आपला प्राणनाथ आला असावा असा तर्क करून, दमयंतीनें आपल्या चेटीला,-या रथानें कोण कशाकरितां आला आहे; याची-चवकशी करण्याकरितां पाठविलें. तेव्हां सर्व वार्ता समजून घेऊन चेटी परत आली व आपल्या नाथाकरितां, उत्सुक झालेल्या दमयंतीला म्हणाली,-" देवि, हा कोसलेश्वर तुझ्या स्वयंवराची मिथ्या वार्ता ऐकून आला आहे. एका रथविज्ञानवान् ऱ्हस्वबाहु नांवाच्या सूदानें, त्याला येथें एका दिवसांत

‡ मिथ्या परापकारो हि कुतः स्वात्कस्य शर्मणे ।

आणलें आहे. सूदशाळेंत जाऊन मी त्या स्वयंपाक्यालाही पाहिलें, त्याचा वर्ण काळा असून रूप अगदीं वाईट आहे; पण त्याचा प्रभाव कांहीं विलक्षण दिसतो. कारण पाणी न घालतांही तें चरूमध्यें आपो-आप आलें, काष्ठें अग्नीवांचूनच जळूं लागलीं, व क्षणामध्यें त्याचा तो दिव्यरसयुक्त स्वयंपाक तयार झाला. देवि, हें महदाश्चर्य मी प्रत्यक्ष पाहून तुजकडे आलें आहें.

चेटीच्या तोंडून हें वृत्त ऐकून दमयंती म्हणाली,–“ज्या अर्थीं हा पुरुष रथज्ञानवान् आहे, व त्याला अग्नि आणि वरुण वश झाले आहेत, त्या अर्थीं तो माझा प्राणनाथच होय. मला वाटतें कीं, माझ्या वियोगा-मुळें तो असा विद्रूप झाला असावा. असो; त्याला ओळखण्याकरितां आणखी एक युक्ति करून पाहूं या. असें म्हणून त्या शहाण्या राजकन्येनें त्याच चेटीबरोबर आपलीं दोन्हीं अपत्यें त्याच्याकडे पाठविलीं. तेव्हां त्या आपल्या बालकांस पाहून, व लागलीच त्यांना मांडीवर बसवून, तो सूद ढळढळां रडला. चेटी त्यास रडण्याचें कारण विचारूं लागली असतां, ‘असलींच माझींही दोन अपत्यें आजवळीं आहेत. त्यांचें स्मरण झाल्यामुळें मला रडूं आलें’ असें तो म्हणाला. नंतर चेटी बालकांना घेऊन दमयंतीकडे आली, व तिला तें सर्व वर्तमान सांगूं लागली. तें ऐकून दमयंतीला हाच माझा नाथ आहे, असें निश्चयपूर्वक वाटलें.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं ती आपल्या चेटीला म्हणाली,–“तूं माझ्या आज्ञेनें त्या सूदाकडे जा व त्याला म्हण कीं, तूं फार उत्तम स्वयं-पाक करतोस, तुझ्यासारखा स्वयंपाकी या जगांत नाहीं, असें मीं ऐकलें आहे. यास्तव येथें येऊन, आज मला एकादा उत्तम पदार्थ करून दे.’’ राजकन्येच्या या आज्ञेप्रमाणें चेटीनें त्याला जाऊन सांगितलें. तेव्हां ऋतुपर्णाची आज्ञा घेऊन, नलही दमयंतीकडे आला. तेव्हां ती त्याला म्हणाली,–‘सत्पुरुषा, खरेंच सांग, तूं सूदाचा वेष घेतलेला नलराजा तर नव्हेस ! मला खरें काय तें सांगून या चिंतासागरांतून पार कर.’

प्रियेचा प्रश्न ऐकून नल स्नेह, हर्ष, दुःख व लज्जा यांच्या योगानें आकुल झाला व तोंड खालीं घालून कंठ दाटून आल्यामुळें अस्पष्ट व घोगऱ्या स्वरानें म्हणाला, “खरेंच, राजकन्ये, वज्राप्रमाणें कठोर व

पापी नल मीच आहें. मोहामुळें तुला संताप देणाऱ्या मीं, नल असतांनाही अनला ( अग्नी ) सारखें आचरण केलें." त्यावर दमयंती म्हणाली,- 'असें जर आहे तर तुमचें रूप असें बदललें कशानें?' प्रियेनें उत्कंठेनें केलेला असा प्रश्न ऐकून नलानें कर्कोटकाच्या दंशापासून, कलि शरीरांतून निघून जाईपर्यंत घडलेला वृत्तान्त तिला सांगितला आणि तत्काळ कर्कोटकानें दिलेलीं अग्निशौच नांवाचीं दोन वस्त्रें अंगावर घेतलीं. याबरोबर त्याला पूर्वरूप प्राप्त झालें.

आपल्या जीवितनाथाला सुंदर स्वरूप प्राप्त झालेलें पाहून दमयंतीचें मुखकमल प्रफुल्लित झालें, व नेत्रजलानें दुःखाग्नीला विझवून ती अनुपम हर्षाचा अनुभव घेऊं लागली. मोठ्या गडबडीनें येऊन सांगणाऱ्या परिजनांच्या तोंडून तो आनंदकारक वृत्तान्त भीमराजास समजतांच त्यास फार समाधान वाटलें व तो तसाच कन्येच्या अंतःपुरांत आला. त्यानें संकटांतून पार पडलेल्या जामाताचें अभिनंदन करून त्याचा उचित सत्कार केला, व आपल्या नगरीला महोत्सवमय करून सोडलें. नंतर योग्य सत्कार करून व प्रार्थना करून ऋतुपर्ण-राजाला त्यानें कोसल देशाकडे परत पाठविलें. कांहीं दिवस श्वशुरगृहीं राहून व त्यास घडलेला सर्व वृत्तान्त सांगून नळराजा आपल्या देशास गेला व अक्ष विद्येच्या बळानें पुष्कराक्षास जिंकून त्यानें आपलें राज्य परत मिळविलें. पण त्या धर्मात्म्यानें ज्याच्या शरीरांतून द्वापर निघून गेला आहे, अशा पुष्कराक्षाला योग्य विभाग दिला, व नंतर सर्वांचें सांत्वन करून तो पूर्वीप्रमाणें दमयंतीसह राज्यसुख भोगूं लागला.

देव, याप्रमाणें त्या सुमना ब्राह्मणानें तारापुरस्थ बंधुमती-राजकन्येला कथा सांगून पुनः म्हटलें-" देवि, महाजन याप्रमाणें मोठें दुःख सहन करून शेवटीं सुख भोगीत असतात. सूर्यचंद्रादि ज्योतीही अस्ताचा अनुभव घेऊनच उदय* पावतात. हे निष्पापे, प्रवासास गेलेला तुझा पति ही सत्वरच येऊन तुला भेटेल. धैर्य धर, अरतीचा परिहार कर, व लवकरच पतिसमागम-सुख भोग."

---

* एवं देवि महान्तो विषह्य दुःखं भजन्ति कल्याणम् ।
अनुभूयास्तमनं किल दिनकृत्प्रमुखा व्रजन्त्युदयम् ॥

याप्रमाणें अगदीं योग्य भाषण करणाऱ्या त्या सद्गुणी ब्राह्मणाला पुष्कळ धन देऊन व त्याच्या सांगण्याप्रमाणें धैर्य धरून बंधुमती महीपालाची प्रतीक्षा करीत राहिली. पुढें थोड्याच दिवसांनीं महीपाल देशान्तरीं असलेल्या आपल्या आईला घेऊन पित्यासह तारापुरास परत आला. पूर्ण चंद्र जसा समुद्रजललक्ष्मीस, त्याप्रमाणें जनसमूहाच्या नेत्रांस आनंद देणाऱ्या त्यानें बंधुमतीला संतुष्ट केलें, आणि श्वशुरानें दिलेल्या राज्यलक्ष्मीचा व इष्ट भोगांचा आपल्या प्रियेसह यथेच्छ उपभोग घेतला.

याप्रमाणें मरुभूतिमंत्र्याच्या तोंडची ही अनुपम व विचित्र कथा ऐकून अलंकारवतीसह वत्सेश्वरपुत्र नरवाहनदत्त अतिशय प्रसन्न झाला.



# १०. शक्तियशलंबक.

## तरंग १ ला.

वर वर्णन केल्याप्रमाणें वत्सेश्वरपुत्र नरवाहनदत्त, आपल्या भार्यासह-वर्तमान सुख भोगीत कौशांबींत सचिवांसह आनंदानें राहिला. एकदां तो आपल्या पित्याच्या म्हणजे वत्सेश्वराच्या सभेंत बसला असतां, तेथें रहाणारा एक वैश्य वत्सराजाला कांहीं विनंति करण्याकरितां आला. त्याचें रत्नदत्त असें नांव होतें. प्रतीहारानें राजाची अनुज्ञा घेऊन त्याला आंत जावयास सांगतांच, तो सभेंत जाऊन व राजाला प्रणाम करून पुढील-प्रमाणें वृत्तान्त सांगूं लागला.

### १. वसुधर भारवाहकाचा वृत्तान्त.

प्रभो, या आपल्या नगरींत वसुधर या नांवाचा एक दरिद्री भारवाहक ( ओझीं वाहणारा, मजूर ) आहे; पण तो अलीकडे पुष्कळ दानें देत, खात, पीत व मौज करीत असल्याचें मला आढळलें. तेव्हां मनांत संशय आल्यामुळें मी त्याला आपल्या घरीं नेलें; यथेच्छ मद्यपान व मांसभोजन दिलें आणि त्याला मत्त करून त्याविषयीं प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला, ' मला राजद्वारांत उत्तम रत्नजडित कडें मिळालें. त्यातील एक रत्न उपटून काढून मी तें बाजारांत विकलें, व एक लक्ष दीनार किंमत घेऊन मी तें हिरण्यगुप्त वैश्याला दिलें. त्यामुळें मी हल्लीं असा सुखी झालों आहें. ' असें सांगून त्यानें मला आपलें नांव असलेलें कडें दाखविलें. देव, हा खरा वृत्तान्त मी आपल्या चरणापाशीं निवेदन केला आहे. आतां आपण उचित दिसेल तें करा.

तें ऐकून वत्सेश्वरानें कड्यासह त्या भारवाहकाला व रत्नासह हिरण्य-गुप्ताला आपल्या सभेंत आणविलें. त्या कड्याला पाहून राजा म्हणाला; ' खरेंच आतां मला आठवलें. एकदां नगरांतून फिरत असतांना हें माझ्या मणगटांतून गळून पडलें होतें. ' नंतर राजाचें ज्याच्यावर नांव आहे, असें हें कडें तूं कां नेलेंस ? असें सभासदांनीं राजासमक्ष त्या दरिद्र्यास विचारलें. तेव्हां तो म्हणाला, " महाराज, मी मोलमजुरी करून

निर्वाह करणारा मनुष्य. मला याच्या वरचें राजाचें नांव कसें ओळखणार ? दारिद्र्य-दुःखानें पीडलेल्या मला तें मिळतांच मी घेतलें." हें त्याचें निष्कपट भाषण ऐकून सभासदांनीं हिरण्यगुप्ताला त्याविषयीं प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला,-' महाराज, मी किंमत देऊन भर बाजारांत हें एक रत्न विकत घेतलें. तें राजाचें आहे, असें ओळखतां येण्यासारखी यावर कांहीं खूण नाहीं; कारण तें एकच रत्न कड्यांतून उपटून काढून यानें बाजारांत आणलें होतें. मी दिलेली याची किंमत परत मिळाली म्हणजे मी तें देण्यास तयार आहें; पण या भारवाहकानें त्यांतील पांच हजार दीनार खर्च केले आहेत.'

हिरण्यगुप्ताचें हें भाषण ऐकून सभेंत बसलेला यौगंधरायण म्हणाला- 'यांत कोणाचाच कांहीं दोष नाहीं. अक्षराचीही ओळख नसलेल्या या मजुराविषयीं काय बोलावें ? तो तर धडधडीत दरिद्री. दारिद्र्यानें पीडलेले दीन लोक चोऱ्याही करितात ! मग अनायासानें मिळालेली वस्तु कोण सोडणार ? योग्य किंमत देऊन रत्न विकत घेणारा हा वैश्यही अपराधी नाहीं.' महामंत्र्याचें हें म्हणणें राजाला पटलें व त्यानें, भारवाहकानें खर्च केलेले पांच सहस्र रुपये हिरण्यगुप्ताला स्वतः देऊन त्याच्यापासून तें रत्न घेतलें. आपलें कडें परत घेऊन भारवाहकालाही दोषमुक्त करून सोडून दिलें. तेव्हां पांच सहस्र दीनारांचा ज्यानें यथेच्छ भोग घेतला आहे, असा तो दरिद्रीही निर्भय होऊन आपल्या घरीं गेला. पण चाहाडखोर रत्नदत्त विश्वासघातकी आहे, असें मनांत ओळखून वत्सेशानें बाह्यतः त्या कार्याकरितां त्याचा मान केला. नंतर ते सर्व राजाच्या पुढून निघून गेले असतां वसन्तक म्हणाला-" वा ! काय चमत्कार आहे ! ! दुर्दैव्यांना मिळालेला धनादि-पदार्थही त्यांच्यापासून दूर पळून जातो.* या भारवाहकाची अवस्था भद्रघटाच्या अवस्थेसारखीच झाली. ती कशी म्हणून म्हणाल तर सांगतों."—

## २. भद्रघटाची कथा.

पूर्वी पाटलीपुत्र पुरांत शुभदत्त या नांवाचा कोणी एक गरीब मनुष्य होता. तो प्रत्यहीं वनांतून लाकडांचा भारा आणून व तो विकून आपल्या

* अहो दैवाभिपन्नानां प्राप्तोऽप्यर्थः पलायते ॥

कुटुंबाचें पोषण करीत असे. एकदां तो वनांत फार दूर गेला असतां त्यानें दैववशात् तेथें चार यक्ष पाहिले. ते दिव्य वस्त्राभरणांनीं भूषित होते. पण त्यांना पहातांच तो खुळा भयभीत झाला. तेव्हां त्यांनीं त्याला धीर देऊन त्याचा वृत्तान्त ऐकून घेतला. त्यांत तो फार दरिद्री आहे, असें जाणलें. त्या सर्वांनां त्याची दया आली आणि ते म्हणाले,–' बाबा, तूं येथें आमच्यापाशीं सेवक होऊन रहा. आम्ही, तुझा गृहनिर्वाह क्लेशां· वांचून होईल असें करूं. ' तें ऐकून व ' बरें आहे ' असें म्हणून शुभदत्त त्यांच्यापाशीं राहिला. त्यानें त्यांची स्नानादि सर्व परिचर्या केली. पुढें भोजनाची वेळ झाली असतां, ते त्याला म्हणाले, ' आम्हांला या भद्रघटांतून आहार दे. ' पण त्यांत कांहीं नाहीं, असें पाहून तो मुक्रा· स्यानें बसला. तेव्हां गुह्यक पुनः हंसून म्हणाले,–" शुभदत्ता, तुला ठाऊक नाहीं ? त्या घटांत हात घाल म्हणजे तुला पाहिजे तें यांतून मिळेल; कारण हा इच्छिलेला पदार्थ देणारा आहे. " तें ऐकून तो घटामध्यें जों हात घालीत आहे, तों खानपानादि सर्व इष्ट पदार्थ त्याला त्यांत सांपडले. तेव्हां मनांत आश्चर्यचकित झालेल्या शुभदत्तानें यक्षांना भोजन दिलें व आपणही जेवला. याप्रमाणें भीतीनें व भक्तीनें प्रत्यहीं त्यांची सेवा करीत कुटुंबाच्या चिंतेनें आर्त झालेला शुभदत्त बरेच दिवस तेथें राहिला. तिकडे दुःखानें आर्त झालेलें त्याचें कुटुंब यक्षांनीं स्वप्नामध्यें कांहीं आशा करून सांत्वन केल्यामुळें कसे तरी दिवस ढकलीत राहिलें.

याप्रमाणें एक महिना लोटला असतां ते चारी यक्ष शुभदत्ताला म्हणाले, ' आम्ही तुझ्या या भक्तीनें संतुष्ट झालों आहों, यास्तव तुला काय देऊं तें सांग ?' तें ऐकून तो म्हणाला,–' तुम्ही खरोखर जर मजवर संतुष्ट झालां असाल तर हा भद्रघट मला द्या.' त्यावर ते यक्ष म्हणाले, ' बाबा, तूं याला संभाळूं शकणार नाहींस. कारण तो फुटला असतां पळून जातो. यास्तव तूं दुसरा एखादा वर माग. ' पण पुष्कळ आग्रह करून दुसरा वर मागण्याविषयीं सांगितलें असतांही तो अन्य वराची इच्छा करीत नाहीं, असें पाहून यक्षांनीं त्याला भद्रघट दिला. तेव्हां आनंदित झालेला शुभदत्त त्यांस प्रणाम करून व घट घेऊन आपल्या घरीं परत आला. त्याला पहातांच त्याच्या कुटुंबांतील माणसें अतिशय आनंदित झालीं. नंतर त्या दिव्य घटांतून भोजनादि काढून घेऊन,

त्याचें चांगलें संरक्षण व्हावें म्हणून, त्याला दुसऱ्या एका मोठ्या भांड्यांत त्यानें घालून ठेविलें व तो स्वजनासह भोजन करिता झाला. याप्रमाणें त्याचे कांहीं दिवस आनंदांत गेले. पण काष्ठांच्या भारापासून सुटलेल्या व यथेच्छ भोग भोगणाऱ्या त्याला मद्यपानाची चटक लागली. एकदां मद्यपानानें मत्त होऊन तो बरळूं लागला असतां, त्याच्या आप्तांनीं 'तुला ही भोगश्री कशी मिळाली?' असा प्रश्न केला. तेव्हां त्या मूर्खानें सर्व हकीकत सांगून व इष्ट मनोरथ पूर्ण करणाऱ्या त्या भद्रघटाला खांद्यावर घेऊन गर्वानें नाचण्यास आरंभ केला; पण मदोन्मत्त झाल्यामुळें नाचतांना अडखळणाऱ्या त्याच्या खांद्यावरून तो घट भूमीवर पडला व त्याचे तुकडे झाले. त्याबरोबर यक्षांच्या सांगण्याप्रमाणें तो घट पहिल्यासारखा होऊन, जिकडच्या तिकडे पळून गेला. हा प्रकार पाहतांच तो शुभदत्त दुःखित झाला, व पूर्वावस्थेस पुनः पोंचला. सारांश, याप्रमाणें दुर्दैवी लोक मद्यपानादिदोषजन्य प्रमादांमुळें, हतबुद्धि होऊन मिळालेला उत्तम पदार्थही संभाळूं शकत नाहींत.*

असो; अशा प्रकारचें हें हंसण्यासारखें भद्रघटाख्यान वसंतकाच्या तोंडून ऐकल्यानंतर वत्सेशानें स्नान–भोजनादि क्रिया केल्या. नरवाहनदत्तानेंही स्नान करून व बापाच्या पंक्तीलाच भोजन केलें व सर्व दिवस तेथेंच घालवून, सायंकाळीं आपल्या मित्रासह आपल्या निवासस्थानीं गेला. रात्रीं शय्येवर पडलेल्या त्याला झोंप येत नसल्यामुळें इतर सर्व सचिव ऐकत असतांना मरुभूति म्हणाला, "देवा, मला वाटतें, कीं एखाद्या दासीच्या समागमेच्छेनें आज आपण अंतःपुरांतील एखाद्या राणीला बोलाविलें नाहीं, व त्या दासीलाही हाक मारली नाहीं, म्हणून आज आपल्याला झोंप येत नाहीं; पण सर्व कांहीं कळत असतांनांही वेश्याजनांचे ठायीं आपण अजून अनुरक्त होतां हें काय? त्यांचा अभिप्राय कधींही चांगला नसतो. याविषयीं मी एक कथा सांगतों."

---

* तदेवं पानदोषादिप्रमादाहतबुद्धयः ।
अभव्याः प्राप्तमप्यर्थं नैव जानन्ति रक्षितुम् ॥

## ३. आल-जाल-कथा.

या पृथ्वीवर चित्रकूट नांवाचें एक मोठें संपन्न नगर आहे. तेथें मागें एक रत्नवर्म-नांवाचा मोठा धनाढ्य वैश्य रहात असे. ईश्वराच्या आराधनेनें एक त्याला पुत्र झाला. म्हणून रत्नवर्म्यानें त्याचें ईश्वरवर्मा असें नांव ठेविलें. त्याचा विद्याभ्यास पूर्ण होऊन तो आतां तरुण झाला आहे असें पाहून, ज्याला एकुलता एकच पुत्र आहे, असा श्रीमान् रत्नवर्मा मनांत म्हणाला,-" स्रष्टयानें वेश्या ही, श्रीमान् व यौवनान्ध पुरुषांचें धन व प्राण हरण करणारी साक्षात् दुर्गतिच निर्मिली आहे, यास्तव मी आतां अगोदर या आपल्या पुत्राला, वेश्यांचीं कपट-कृत्यें चांगलीं ओळखतां यावींत म्हणून, एखाद्या कुंटिणीच्या स्वाधीन करितों. म्हणजे पुढें हा त्यांच्याकडून फसविला जाणार नाहीं."

असा विचार करून रत्नवर्मा आपल्या ईश्वरवर्म-पुत्रासह यमजिव्हा नामक कुंटिणीच्या येथें गेला. तेथें जिची हनुवटी स्थूल आहे, दांत लांब आहेत व नाक वांकडें आहे, अशा आपल्या कन्येला शिक्षण देत असलेल्या कुंटिणीला त्यानें पाहिलें. ती म्हणाली,-" पुत्रि, धनानें सर्व पूज्य होतात. विशेषत: वेश्या तर धनानें पूज्य असते. पण तीच वेश्या प्रेमामध्यें आसक्त झाली, कीं तें ( धन ) मिळेनासें होतें. यास्तव वेश्येनें प्रेमाचा त्याग करावा. राग, ( लालवर्ण व प्रेम ) सायंकाळ व वेश्या यांच्या दोषांचा ( निर्धनत्व व रात्री यांचा ) अग्रदूत आहे.* यास्तव उत्तम प्रकारें शिक्षित नटीप्रमाणें वेश्येनें मिथ्या प्रेम दाखवावें. प्रथम तरुण धनाढ्य पुरुषाला खोट्या प्रेमानें आपल्यावर अनुरक्त करून घ्यावें. नंतर आसक्त झालेल्या त्याचें धन निघेल तितकें काढून घ्यावें. धार काढलेल्या गायीच्या ओटीप्रमाणें तो रिक्त ( रिकामा धनशून्य ) झाला म्हणजे शेवटीं त्याचा त्याग करावा. पण पुन: त्याला धन मिळाल्यास, पुन: खोटें प्रेम दाखवून तें काढून घ्यावें. तरुण, बालक, वृद्ध, कुरूप

---

* सायंकाळचा लालवर्ण जसा रात्रीचा अग्रदूत, त्याप्रमाणें प्रेम हा वेश्येच्या दारिद्र्यादि दोषांचा अग्रदूत ( पुढें जाणारा दूत, सूचक ) आहे.

व सुरूप यांच्या ठिकाणीं समदृष्टि ठेवणारा वेश्याजन, समत्वामुळेंच मोक्ष मिळविणाऱ्या मुनीप्रमाणें पुष्कळ धन संपादन करतो.*"

कुंटीण आपल्या कन्येला असा उपदेश करीत आहे, तोंच रत्नवर्मा तिच्यापाशीं गेला. त्याला पहातांच तिनें त्याचें योग्य आतिथ्य केलें. नंतर उचितस्थानीं बसलेला रत्नवर्मा तिला म्हणाला,—"आर्ये, तूं माझ्या या पुत्राला वेश्याश्रीची कला शिकीव. म्हणजे हा मोठा चतुर होईल. या कामगिरीकरितां मी तुला एक सहस्र दीनार देईन." तें त्याचें म्हणणें कुंटिणीनें मान्य केलें. नंतर तिला दीनार देऊन व पुत्राला तिच्या स्वाधीन करून वैश्य घरीं गेला.

तेव्हां ईश्वरवर्मा यमजिव्हेच्या येथें राहून ती कला शिकूं लागला. एक वर्षानें शिक्षण पुरें झालें व तो पित्याच्या येथें परत आला. त्याला त्यावेळीं सोळावें वर्ष लागलें होतें. एकदां तो आपल्या बापाला म्हणाला,—"बाबा, द्रव्यापासून धर्म व काम हे पुरुषार्थ प्राप्त होतात. द्रव्यामुळेंच आमचा सत्कार व प्रख्याति होते. यास्तव तें मिळविण्याकरितांच आपणाला प्रयत्न केला पाहिजे." पुत्राचें हें म्हणणें मान्य करून व 'खरें आहे,' असें म्हणून संतुष्ट झालेल्या रत्नवर्म्यानें ईश्वरवर्म्यास पांच कोटी भांडवल दिलें. तें घेऊन तो वैश्यपुत्र व्यापाऱ्यांच्या मोठ्या संघासह शुभ दिवशीं सुवर्णद्वीपास जाण्याच्या इच्छेनें निघाला. हळू हळू जात असतां मार्गामध्यें त्याला कांचनपुर लागलें. त्या नगराजवळच्या उद्यानांत तो उतरला. स्नान, भोजन करून व उट्या वगैरे लावून तो तरुण नगरांतील प्रेक्षणीय स्थलें व पदार्थ पाहण्याकरितां निघाला. रस्त्यांत त्याला एक रमणीय व भव्य देवस्थान आढळलें, त्यांत तो शिरला. तों तारुण्यवायूनें उठविलेली रूपसागराची जणुं काय लाटच, अशी एक नाचत असलेली सुंदर नर्तकी त्याला दिसली. तिला पहातांच तो तदेकचित्त झाला. त्यामुळें जणुं काय रागावलेली कुंटिणीची शिक्षा (विद्या—कला) त्याच्यापासून दूर निघून गेली. नाच संपतांच ईश्वरवर्म्यानें आपल्या एका मित्राला पाठवून तिची प्रार्थना केली. तेव्हां तिनेंही नम्रपणें 'मी धन्य आहें' असें म्हणून त्याच्या प्रार्थनेचा स्वीकार केला.

---

* समो यूनि शिशौ वृद्धे विरूपे रूपवत्यपि ।
वेश्याजनो यो मुनिवत्स चार्थं परमश्नुते ॥

नंतर उद्यानांतील आपल्या निवासस्थानीं हुषार द्रव्यरक्षक ठेवून ईश्वरवर्मा सुंदरी-वेश्येच्या येथें गेला. तेथें मकरकटी या नांवाच्या तिच्या आईनें त्या कालाला उचित अशा निरनिराळया उपचारांनीं त्याचें आतिथ्य केलें. रात्र होतांच ज्याचें रत्नजडित छत चमकत आहे व ज्यांत पर्यंकशयन सज्ज केलें आहे, अशा अंतःपुरांत तिनें त्याला धाडलें. तेथें नृत्य, गायन व सुरत यांमध्यें चतुर असलेल्या व प्रिय अशा त्या सुंदरीशीं तो रममाण झाला. दुसऱ्या दिवशीं गाढ प्रेम दाखविणाऱ्या व क्षणभरही जवळून दूर न होणाऱ्या तिला सोडून, तो उद्यानांतील आपल्या वसतिस्थानीं जाऊं शकला नाहीं. त्या तरुण वैश्यानें दोन दिवसांत मिळून तिला सोन्याचीं पंचवीस नाणीं व रत्नें दिलीं. पण सुंदरी म्हणाली, " महाराज, मला धन पुष्कळ मिळालें आहे. तुमच्या सारखा इष्ट पुरुष मात्र आजवर मिळाला नव्हता. तेव्हां त्याचा जर आज मोठ्या भाग्यानें लाभ झाला आहे, तर मला धन घेऊन काय करावयाचें आहे ? " त्यावर तिची माता मकरकटी त्या सुंदरीला म्हणाली, 'बाळे, आतां आमच्यापाशीं जें आहे तें सर्व यांचेंच असल्यामुळें, हेंही धन घेऊन तूं त्यांच्याच धनांत घालून ठेव, त्यांत कोणता दोष आहे ? ' आईनें असें सांगितलें असतां सुंदरीनें तें धन मोठ्या नाखुषीनें घेतलें. मूढ ईश्वरवर्मा ती खरोखरच आपल्यावर अनुरक्त आहे, असें समजला. तिचें रूप, नृत्य व गायन यांनीं त्याचें चित्त हरण करून घेतलें. आणि तो वैश्यपुत्र दोन महिने तेथें राहिला. तेवढ्या अवकाशांत त्यानें तिला हळू हळू दोन कोटी सुवर्ण पोचविलें. तेव्हां त्याचा अर्थदत्त नांवाचा सुहृद् हळूच त्याच्यापाशीं येऊन म्हणाला, " मित्रा, मोठ्या यत्नानें कुंटिणीपासून संपादन केलेली विद्या, प्रसंगीं व्यर्थ होणाऱ्या भित्र्या मनुष्याच्या अस्त्रविद्येप्रमाणें निष्फळ कशी झाली ? या वेश्येचें प्रेम खरें आहे, असें तुला वाटत आहे; पण बाबारे, माळावर जलाचा अंश तरी असणें शक्य आहे काय ? यास्तव तुझें हें सर्व धन येथेंच क्षीण झालें नाहीं, तों आपण येथून जाऊं या. नाहीं पेक्षां तुझा पिता या गोष्टीची क्षमा करणार नाहीं. "

त्या मित्राचें हें हितकर वचन ऐकून ईश्वरवर्मा म्हणाला,–'वेश्यांचा कांहीं विश्वास नाहीं, हें खरें; पण ही सुंदरी मात्र तशी नाहीं. मित्रा, फार काय

सांगू! मी एक क्षणभरही जर हिच्या दृष्टीस पडलों नाहीं तर ही आपले प्राणही ठेवणार नाहीं. यास्तव कांहीं झालें तरी, येथून जाणेंच अवश्य असेल तर, तूं जाऊन तिची समजूत कर.'

ईश्वरवर्म्याचें हें भाषण ऐकून अर्थदत्त त्याच्या व मकरकटीच्या समक्ष सुंदरीला म्हणाला, " तुझी या माझ्या मित्रावर असामान्य प्रीति आहे, हें खरें. पण व्यापाराकरितां आम्हांला आतां स्वर्णद्वीपास अवश्य गेलें पाहिजे. तेथें याला पुष्कळ लक्ष्मी मिळेल. नंतर तो येथें येऊन हवे तितके दिवस सुखानें राहील. यास्तव हे सखि, याला आतां जावयास अनुमोदन दे." तें ऐकतांच सुंदरीनें डोळ्यांत पाणी आणलें व ईश्वरवर्म्याचें तोंड पहात मोठ्या कष्टानें म्हटलें, "तुम्हांला सर्व कांहीं कळत आहे. मी काय बोलूं! एकाद्या गोष्टीचा शेवट ( परिणाम ) दिसेपर्यंत तिच्यावर कोणाचा विश्वास बसत नसतो. यास्तव मी अधिक कांहीं बोलत नाहीं. दैवाला माझें काय हवें तें करूं दे." त्यावर तिची आई म्हणाली–'बाळे, अशी दुःखी होऊं नकोस. धैर्य धर. हा तुझा प्रिय धन मिळवून परत येईल. तुला सोडणार नाहीं.' असें बोलून मकरकटीनें तिचें समाधान केलें. नंतर सुंदरीशीं संकेत करून, त्याच्या मार्गावरील एका कूपांत गुप्तपणें पाण्याबरोबर एक जाळें बांधविलें. ईश्वरवर्म्याचें मन साशंक झालें. सुंदरी जणुं काय दुःखानेंच प्रत्यहीं आहार व पान कमी कमी करूं लागली. गायन, वादन व नृत्य यांकडे तिचें मन लागेना. ईश्वरवर्मा नानाप्रकारच्या प्रार्थना करून तिची समजूत घालूं लागला; पण कांहीं केल्या तिचें समाधान होईना. शेवटीं मित्रानें सांगितलेल्या दिवशीं तो सुंदरीच्या येथून निघाला. तेव्हां मकरकटीनें त्याचें प्रस्थानमंगल केलें. आईसहवर्तमान सुंदरी रडत त्याला पोंचवावयास मागून निघाली. नगराबाहेरील पूर्वीच जाळें बांधलेल्या कूपापर्यंत येऊन पोंचतांच ईश्वरवर्म्यानें सुंदरीला परत जावयास सांगून, मित्र व परिवार यांसह पुढील मार्ग धरिला. पण तो थोडासा दूर जात आहे तोंच सुंदरीनें ज्याच्या पाण्यावर जाळें बांधलें आहे अशा त्या कूपांत उडी टाकली. त्याबरोबर 'हा स्वामिनि, व हा पुत्रि' असा दुःखाचा मोठा आक्रोश सुंदरीच्या सेवकांनीं व आईनें केला. तो कानीं पडतांच मूर्ख ईश्वरवर्मा मित्रासह परतला व सुंदरीनें आपल्याला विहिरींत घालवून घेतलें आहे,' असें पहातांच तत्काल मूर्च्छित होऊन पडला. मकर-

कटी मोठा आक्रोश करूं लागली. शेवटीं पूर्वीच ज्यांच्याशीं संकेत केला आहे असे तिचे नोकर दोऱ्यांवरून विहिरींत उतरले व ' घाबरूं नका; रडूं नका; आमची स्वामिनी जिवंत आहे. असें म्हणून त्यांनीं तिला वर काढलें. कांहीं वेळ ती मेल्याचें सोंग करून पडली होती. पण ' तुझा प्रिय गेला नाहीं, परत आला आहे, डोळे उघडून त्याच्याकडे पहा ' असे आईचे शब्द ऐकून ती हळू हळू सावध झाली. आपल्या करितां कष्टी होणाऱ्या ईश्वरवर्म्याला पाहून व आनंदित झाल्याचें दाखवून ती हळू हळू बोलूं लागली. कांहीं वेळानें ती चांगली सावध झाली आहे असें पाहून, वैश्यपुत्र मित्रांसहवर्तमान तिला घेऊन तिच्याच घरीं परत आला. सुंदरीच्या निःसीम प्रेमाविषयीं पूर्ण निश्चय झाल्याकारणानें तिची प्राप्ति हेंच जन्माचें फल आहे असें समजून, त्या तरुणानें पुनः पुढें जाण्याचा विचार सोडला.

पण ईश्वरवर्म्याचा तो संकल्प जाणून अर्थदत्त पुनः त्याला म्हणाला,- ' मित्रा, मोहानें तूं आपला घात कसा करून घेत आहेस ? सुंदरीनें विहिरींत उडी टाकली, एवढ्याच वरून तूं तिच्या प्रेमाविषयीं निश्चय करूं नकोस; कारण कुंटिणीची कपटरचना ब्रह्मदेवालाही अतर्क्य असते.* हिच्या नादीं लागून सर्व द्रव्य खर्चून टाकल्यावर तूं आपल्या बापाला काय सांगशील, व कोठें जाशील ? यास्तव तुला जर आपल्या कल्याणाची इच्छा असेल तर अजून येथून नीघ.'

परंतु त्या मित्राच्या या हितकर बोधाचा तिरस्कार करून ईश्वरवर्म्यानें एका महिन्यांतच राहिलेलें तीन कोटी धन खर्च करून सोडलें. आतां याच्यापाशीं कांहीं एक राहिलें नाहीं असें जाणून, मकरकटीनें त्या मूर्खाला धक्के देऊन आपल्या घराबाहेर घालविलें. तेव्हां अर्थदत्तादिक सत्वर आपल्या नगरास परत जाऊन, घडलेला सर्व वृत्तांत रत्नवर्म्याला सांगूं लागले. तो ऐकून अर्थातच ईश्वरवर्म्याच्या पित्याला अतिशय दुःख झालें. तो यमजिव्हा कुंटिणीकडे जाऊन तिला म्हणाला,-' तूं इतकें धन घेऊन माझ्या मुलाला असें शिक्षण दिलेंस, कीं मकरकटीनें त्याचें सर्वस्व सहज लुबाडून घेतलें.' असें बोलून त्यानें घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगितला,

---

* अतर्क्या कुट्टिनीकूटरचना हि विधेरपि ।

तो ऐकून वृद्ध कुंटीण यमजिव्हा त्याला म्हणाली,–' शेटजी, आपल्या मुलाला येथें आणवा, म्हणजे मी असें करीन कीं, तो मकरकटीचें सर्वस्व हरण करील. "

ही त्या धूर्त बाईची प्रतिज्ञा ऐकून, रत्नवर्म्यानें अर्थदत्तालाच पुनः मोठें पारितोषिक वगैरे देऊन ईश्वरवर्म्याला परत आणावयास पाठविलें. मित्राचें हित इच्छिणारा तो कांचनपुरास गेला व पित्याचा सर्व निरोप सांगून म्हणाला,–" मित्रा, ईश्वरवर्म्या, मी सांगत होतों तें ऐकलें नाहीस. पण वेश्येचा चांगुलपणा आतां तरी तुझ्या प्रत्ययास आला कां? पांच कोटी धन देऊन तूं अर्धचंद्र मिळविलास; पण बाबारे, वेश्या व वाळू यांच्या ठायीं स्नेहाची ( प्रेमाची व तेलाची ) आशा कोण शहाणा करणार ?* अथवा तुलाच काय म्हणून दोष द्यावा? वस्तुधर्मच हा असा आहे. स्त्रियांच्या विलासजाळ्यांमध्यें पडेपर्यंतच पुरुष चतुर, वीर व शुभभागी असतो.§ यास्तव बापाकडे चल व युक्तीनें क्रोधाचा बदला ( सूड ) घे." असें पुष्कळ सांगून व समजूत घालून अर्थदत्त ईश्वरवर्म्याला चित्रकूटास परत घेऊन गेला. एकुलता एकच पुत्र असल्यामुळें रत्नवर्म्यानेंही प्रेमानें त्याचें सांत्वन केलें. नंतर तो त्याला यमजिव्हेकडे घेऊन गेला. तिनें विचारिलें असतां, ईश्वर-वर्म्यानें अर्थदत्ताच्या तोंडून आपला सर्व वृत्तान्त सांगविला. सुंदरीनें विहिरींत कसें घालवून घेतलें, तेंही त्यानें तिला सांगितलें. तेव्हां यमजिव्हा म्हणाली,–' मीच अपराधिनी आहें. कारण विसरून मीच याला ही माया शिकविली नव्हती. मकरकटीनें विहिरीमध्यें पाण्याबरोबर जाळें बांधविलें असावें, म्हणून सुंदरी आंत उडी टाकूनही मेली नाहीं. बरें; झालें तें झालें. यालाही उपाय आहे.' असें बोलून त्या कुंटिणीनें आपल्या दासी-कडून आपलें ' आल ' नांवाचें माकड आणविलें. नंतर आपल्या जवळचे हजार दीनार त्याच्यापुढें ठेवून ' हे गीळ ' असें ती म्हणाली. त्याबरोबर शिकवून ठेवलेल्या त्यानें ते सर्व गिळले. नंतर ' बाळा, त्या दीनारांतील

---

* कः प्राज्ञो वाञ्छति स्नेहं वेश्यासु सिकतासु च ।

§ तावद्विदग्धो वीरश्च नरो भागी शुभस्य च ।
यावत्पतति नैवासौ रामाविभ्रमभूमिषु ॥

वीस याला दे; पंचवीस याला दे,' इत्यादि ती जसें जसें सांगत असे त्या त्याप्रमाणेंच तें मांकड गिळलेल्या दीनारांतील मेजके दीनार वर काढून देऊं लागलें. ही माकडाची युक्ति दाखवून यमजिव्हा ईश्वरवर्म्यास म्हणाली,–" बाळा, हें माकड तूं घे, आणि त्या सुंदरीच्या घरीं जा. रोज याच्या पोटांत गुप्त रीतीनें ठेवलेलें द्रव्य याच्याकडून तिला व इतरांना देवीव. कांहीं दिवस हा चमत्कार पाहून त्या वेश्येलाही ह्याचा लोभ सुटेल. ती आपलें सर्वस्व देऊन चिंतामणीसारखें हें माकड तुजपासून विकत घेईल. तिच्या स्वाधीन करतांना तूं याला दोन दिवस खर्चास पुरतील इतके दीनार खावूं घाल, व तिचें सर्व धन घेऊन त्वरेनें इकडे निघून ये.'' असें सांगून यमजिव्हेनें ईश्वरवर्म्याला आपलें 'आल' माकड दिलें. त्याच्या बापानेंही खर्चाकरितां त्याला दोन कोटी भांडवल दिलें. तें घेऊन तो तरुण वैश्यपुत्र कांचनपुरास निघाला.

तेथें पोंचतांच पुढें दूत पाठवून मागून, ईश्वरवर्मा–आल–माकडासह सुंदरीच्या घरीं गेला. तो पुनः मोठ्या थाटानें व द्रव्य घेऊन आला आहे असें पाहून, सुंदरीनें लोभानें त्याला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें, व अर्थदत्तादि त्याच्या मित्रांचेंही गोड शब्दांनीं स्वागत केलें. ईश्वरदत्तानेंही तिला मोठा विश्वास दाखवून तिच्या समक्ष 'आल–माकडाला आण' असें अर्थदत्तास म्हटलें. त्यावर ' बरें आहे ' असें म्हणून अर्थदत्त गेला व आलाला घेऊन आला. त्या माकडाला पूर्वींच एक सहस्र दीनार खावयास दिले होते. तें जवळ येतांच ईश्वरवर्मा म्हणाला,–" बाळा आला, आज आम्हांला तीनशें दीनार खानपानाकरितां दे. शंभर पान–सुपारी–अत्तर–गुलाब इत्यादिकांकरितां दे. शंभर या मकरकटीला दे.' शंभर ब्राह्मणांना दे. हजारांतून राहिलेले चारशें या सुंदरीला दे.''

ईश्वरवर्म्याची ही आज्ञा ऐकून, मर्कटानें दीनार पोटांतून तोंडावाटे काढ काढून दिले. याप्रमाणें पंधरा दिवस एकसारखा क्रम चालू होता. धन्याच्या आज्ञेप्रमाणें आल–मर्कट लागेल तितकें द्रव्य सर्वांसमक्ष तोंडांतून काढून देत असे. तो चमत्कार पाहून मकरकटी व सुंदरी आपसांत असा विचार करूं लागल्या, खरोखर याला हा मर्कटरूपी चिंतामणिच लाधला आहे. काय चमत्कार सांगावा ! हें माकड याला रोज एक हजार दीनार देतें. हें जर आपल्याला मिळालें तर फार चांगलें होईल.

याप्रमाणें पुष्कळ विचार करून सुंदरीनें तें मागण्याचा निश्चय केला; आणि एकदां भोजनोत्तर सुखानें एकांतांत बसलेल्या ईश्वरवर्म्यापाशीं येऊन, ती वेश्या लडिवाळपणानें त्याची प्रार्थना करूं लागली कीं,–' प्रिया, मजवर जर आपला खरा लोभ असेल, तर मला हें माकड द्या.' तें ऐकून ईश्वरवर्मा हंसून म्हणाला,–' हा वानर माझ्या बापाचें सर्वस्व आहे. तेव्हां त्याला देतां येत नाहीं.' त्यावर ती पुनः म्हणाली,–'महाराज, मी आपल्याला पांच कोटी मोहरा देतें. पण मला कसेंही करून हें माकड द्या.' पण ईश्वरवर्मा दृढ निश्चयानें तिला म्हणाला,–" छे छे, तें नांवही घेऊं नकोस. पांच कोटी मोहरांचशा काय, पण तूं आपलें सर्वस्व किंवा हें नगर जरी दिलेंस; तरी मी हें माकड देणार नाहीं. तें दिल्यावर बाबा मला घरांत पाय ठेवूं देणार नाहींत." हें त्याचें निग्रहाचें भाषण ऐकून सुंदरीची इच्छा प्रबल झाली, व ती म्हणाली,–' प्रिया, मी आपलें सर्वस्व तुमच्या चरणीं अर्पण करतें. आई रागावेल, पण तेंही मला पत्करलें. कांहीं झालें तरी तो आल वानर मला पाहिजे. मला नाहीं म्हणूं नका.' असें म्हणून व अगदीं रडकुंडीस येऊन तिनें ईश्वरवर्म्याचे पाय धरले.

हा सर्व प्रकार पाहून अर्थदत्तादिक म्हणाले,–' मित्रा, बाबा अतिशय रागावतील हें तर खरेंच; पण या तुझ्या प्रियेचें प्रेम आलावर फार बसलें आहे. यास्तव जाऊं दे, देऊन टाक. बाबांना, कांहीं तरी सांगूं!' तें ऐकून ईश्वरवर्म्यानें मोठ्या संकटानें माकड देण्याचें कबूल केलें. नंतर अतिशय संतुष्ट झालेल्या सुंदरीसह त्यानें तो दिवस मोठ्या आनंदानें घालविला. दुसऱ्या दिवशीं सकाळींच दोन सहस्र दीनार चारून आलाला सुंदरीच्या हवालीं केलें व तत्काल तिचें सर्वस्व घेऊन तो वेगानें तेथून निघाला, आणि व्यापाराकरितां स्वर्णपुरास गेला. रोज सहस्र दीनार देणारें माकड मिळाल्यामुळें सुंदरीला अवर्णनीय हर्ष झाला. तिनें मागितले असतां त्यानें दोन दिवस हजार हजार दीनार दिले. पण तिसऱ्या दिवशीं सुंदरीनें प्रेमानें वारंवार मागितलें असतांही सहस्र दीनार देईना. तेव्हां त्या वेश्येनें त्याला मुठीनें मारण्यास आरंभ केला. त्याबरोबर तें चिडलें व आपणास मारणाऱ्या तिचें व तिच्या आईचें तोंड नखें व दांत यांच्या योगानें उभ्या मार–मारून फाडून सोडलें. त्यामुळें जिच्या तोंडांतून रक्त गळत आहे, अशा मकरकटीनें त्या बिचाऱ्याला काठीनें

मारलें असतां तें मरून पडलें. मग काय विचारतां ! वानर मरून पडला आहे, व आपलें सर्वस्व नष्ट झालें आहे असें पाहून, अतिशय दुःखित झालेली सुंदरी व तिची आई प्राणत्याग करण्यास तयार झाल्या. ‘ विहिरींत जाळें बांधून मकरकटीनें ज्याचें धन हरण केलें होतें, त्याच बुद्धिमानानें आतां असें कपट करून तिचें सर्वस्व हरण केलें. तिनें दुसऱ्या करितां जें जाळें केलें होतें, तें आपल्यालाच बाधक होईल हें या कुंटिणीला कळलें नाहीं. ’ असें, नगरांतील जो तो त्या दोघींस उद्देशून हंसून म्हणूं लागला. नंतर जिचें धन नष्ट झालें आहे, व तोंड फाटलें आहे, अशा सुंदरीला व तिच्या आईला त्यांच्या आप्तांनीं मोठ्या कष्टानें प्राणत्यागापासून परतविलें. तिकडे अशा युक्तीनें अधिक धन मिळविलेला ईश्वरवर्मा लवकरच स्वर्णद्वीपांतून परतून चित्रकूटांतील आपल्या पित्याच्या घरीं परत आला. अमित धन मिळवून आपला पुत्र सुखरूपपणें परत आलेला पाहून, आनंदित झालेल्या रत्नवर्म्यानें यमजिह्वा कुंटिणीचा पुष्कळ धनानें मोठा सत्कार व महोत्सव केला. ईश्वरवर्म्यालाही वेश्यांचें अगम्य कपट कसें असतें, त्याचा चांगलाच अनुभव आल्यामुळें त्याला विलासिनी स्त्रीचा मोठा तिटकारा आला, व तो योग्य वधूशीं विवाह करून आपल्या येथेंच सुखानें काल घालवूं लागला.

हे प्रभो, याप्रमाणें वेश्या स्त्रीच्या हृदयांत कपटावांचून आणखी कांहीं नसतें. सत्याचा तर लेशही नसतो. यास्तव कोणत्याही धनवानास उपभोग्य असलेल्या त्यांच्या ठायीं, पुष्कळांनीं मिळून जाण्यासच योग्य अशा शून्य अरण्याप्रमाणें," आपलें हित इच्छिणाऱ्या पुरुषानें रममाण होऊं नये.*

मरुभूतीच्या तोंडची ही अशा प्रकारची आल-जाल-कथा ऐकून व त्याच्या उपदेशास मान देऊन नरवाहनदत्त गोमुखादिकांसह हंसूं लागला.

---

* एवं नरेश वनिताहृदये न जातु कूटाहते वसति सत्यकथालवोऽपि ।
तत्सार्थसाध्यगमनासु सदैव तासु शून्याटवीष्विव रमेत न भूतिकामः ॥

## तरंग २ रा.

मरुभूतीनें याप्रमाणें वेश्यांचा असद्भाव वर्णिला असतां गोमुखानें पुढील-प्रमाणें कुमुदिका-कथा सांगितली—

### १. कुमुदिका कथा.

प्रतिष्ठानामध्यें विक्रमसिंह या नांवाचा राजा होता. विधात्यानें त्याला नांवाप्रमाणें खरोखरच सिंहासारखा पराक्रमी केलें होतें. त्याची शशिलेखा या नांवाची सुंदर भार्या होती. एकदां आपल्या नगरामध्यें असलेल्या त्याला त्याच्या पांच-सहा एकमत झालेल्या गोत्रजांनीं ( भाऊबंदांनीं ) त्याच्या घरीं येऊन वेढलें. महाभट, वीरबाहु, सुभट, सुबाहु-राजा प्रतापादित्य हे त्यांतील मुख्य होते. ते सर्व महाबलाढ्य होते. म्हणून विक्रमसिंहाचा मंत्री त्यांच्याशीं संधि करण्याचा विचार करूं लागला; पण त्याचें निराकरण करून विक्रमसिंह त्यांच्याशीं युद्ध करण्याकरितां बाहेर पडला. दोन्ही सैन्यांचें युद्ध सुरू होण्याचा प्रसंग आला असतां, तो राजा शौर्यानें व गर्वानें गजावर आरूढ होऊन स्वतः सैन्यांत शिरला आणि हातांत धनुष्य घेऊन शत्रुसैन्याचें विदारण करूं लागला. त्याला पाहून महाभटादि पांचही वीर एकदम त्याच्या सैन्यावर तुटून पडले. त्यांचें अपरिमित सैन्य एकाच वेळीं वेगानें धांवून येत आहे असें पाहून, विक्रमसिंहाचें सैन्य भिऊन पळूं लागलें. तेव्हां अनन्तगुण नांवाचा मंत्री त्या राजाला म्हणाला, "आमचें सैन्य तर पराभूत होऊन सैरावैरा पळत सुटलें आहे. आतां आपल्याला जय येणें शक्य नाहीं. आमच्या योग्य संमतीचा अंगीकार न करितां हें भयंकर युद्ध आपण आरंभिलें, व त्याचा हा असा परिणाम झाला आहे. यास्तव अजून तरी कल्याणाकरितां माझें म्हणणें ऐका. या हत्तीवरून उतरून घोड्यावर बसा, आपण दोघे कोठें निघून जाऊं, जीव वांचल्यास पुनः शत्रूंना जिंकतां येईल."

मंत्र्याचें हें म्हणणें मान्य करून विक्रमसिंह हत्तीवरून उतरला, व हळूच घोड्यावर बसून अनन्तगुण मंत्र्यासह सैन्यांतून निघाला. नगराच्या बाहेर आल्यावर वेष बदलून ते दोघेही उज्जयिनीकडे चालले. त्या उत्तम नगरीस पोंचल्यावर राजा विक्रमसिंह मंत्र्यासह, कुमुदिनी नांवाच्या

प्रसिद्ध व अतिशय श्रीमती विलासिनीच्या येथें गेला. अकस्मात् आलेल्या त्याला पाहून ती मनांत म्हणाली, ' हा कोणी महापुरुष माझ्या येथें आला आहे. तेज व लक्षणें यांवरून हा महाराजा असावा, असें वाटतें. यास्तव याचा स्वीकार केल्यास माझें अभिलषित सिद्ध होईल.' असा विचार करून कुमुदिनीनें त्याचें स्वागत करून मोठें आतिथ्य केलें; त्याचा स्वीकार करून थोडीशी विश्रांति घेऊन ते स्वस्थचित्त झाले. नंतर राजाला ती वेश्या म्हणाली, ' मी आज धन्य झालें आहे. माझें प्राक्तन पुण्य फलास आलें, देवानें स्वतः येऊन माझें गृह पवित्र केल्यामुळें मी आज आनंदाच्या शिखरावर आरूढ झालें आहें. या अनुग्रहानें विकत घेतलेली ही मी आपली दासी आहें. शंभर हत्ती, वीस सहस्र घोडे, रत्नांनीं भरलेलें हें घर, इत्यादि माझें सर्वस्व मी तुमच्या स्वाधीन केलें आहे.' असें बोलून कुमुदिकेनें मंत्र्यासह राजाची स्नानादि उपचारांनीं परिचर्या केली. राजाही सर्वस्व अर्पण केलेल्या कुमुदिकेच्या येथें खिन्न मनानें राहिला. तिच्या धनाचा त्यानें यथेच्छ उपभोग घेण्यास व याचकांस दानें देण्यास आरंभ केला, पण ती वेश्या त्याला कांहीं बोलली नाहीं; उलट संतुष्टच झाली.

तेव्हां ' ही वेश्या असून मजवर कितीहो अनुरक्त आहे ! ' असें म्हणून संतुष्ट होणाऱ्या राजाला अनन्तगुण मंत्री एकांतांत म्हणाला, ' देव, वेश्यांचे ठायीं सद्भावाचा गंधही असत नाहीं; पण ही कुमुदिका आपणावर इतका स्नेह कां करते, कांहीं कळत नाहीं.' तें ऐकून राजा बोलला, 'छे, छे; असें म्हणूं नको, मजकरितां ती प्राणही सोडील. माझ्या या बोलण्यावर तुझा विश्वास बसत नसेल, तर तुला मीं प्रत्यय आणून देतों ' असें सांगून राजानें शारीरिक व्यथेनें पीडल्याचा बहाणा केला. शेवटीं एकाएकीं मेल्याचें सोंग करून त्यानें आपलें शरीर ताठविलें. कांहीं वेळानें वेश्येच्या सेवकांनीं त्याला शिबिकेंत घालून स्मशानांत नेलें. अनन्तगुण मंत्रीही मोठें दुःख झाल्याचें दाखवीत त्यांच्या मागोमाग गेला. कुमुदिकेला मात्र राजाच्या या मिथ्या मरणामुळें अतोनात दुःख झालें. ती ' हाय, हाय ' करीत तिचे आप्त ' नको नको ' म्हणून निवारण करीत असतांनाही स्मशानांत येऊन राजाकरितां तयार केलेल्या चितेवर आरूढ झाली, व कांहीं केल्या राजाजवळून हालेना. तेव्हां आतां तिचे सेवक

चिता पेटविणार व ही तर कांहीं येथून हालत नाहीं, असें पाहून राजा विक्रमसिंह हळू हळू श्वास सोडूं लागला. कांहीं वेळानें त्यानें जांभई दिली, तें पहातांच सर्वजण आनंदित झाले. वाहवा, फार चांगलें झालें, हा महात्मा जिवंत झाला असें म्हणून, सर्वजण कुमुदिकेच्या भाग्याची प्रशंसा करूं लागले. त्याला चितेवरून उतरून वेश्येसह मोठ्या आनंदानें घरीं नेलें. कुमुदिकेनें मोठा उत्सव केला व दोन चार दिवसांतच राजा स्नान-पानादिकांच्या यथेच्छ सेवनानें पूर्व स्थितीवर आला. नंतर एकांतांत तो आपल्या मंत्र्याला म्हणाला,–'कां ? पाहिलेंस हिचें मजवर किती प्रेम आहे तें ?' त्यावर मंत्री बोलला,–'प्रभो, माझा अजून हिच्यावर विश्वास बसत नाहीं. त्याचें कारणही आहे; तथापि आपण याविषयीं निश्चय करूं ! अगोदर आपण कोण हें तिला सांगून तिचें सैन्य, मित्रांचें सैन्य व आपलें सैन्य जमवून शत्रूंना रणांगणांत मारूं या' अनन्तगुण मंत्री इतकें जों बोलत आहे तों पूर्वी पाठविलेला गुप्त हेर आला व असें वर्तमान सांगूं लागला,–'प्रभो, शत्रूंनीं सर्व देश व्यापून साडला आहे. देवी शशिलेखा लोकांच्या तोंडून 'राजा मेला' असें खोटेंच ऐकून अग्नींत प्रविष्ट झाली.'

हेराचें हे भाषण ऐकून राजा शोकरूपी वज्राचा प्रहार झाल्यामुळें, 'हा देवि, हा सति,' असें मोठ्यानें म्हणून रडूं लागला. तेव्हां कुमुदिका धावरून त्याच्यापाशीं आली व क्रमानें तिला सर्व खरी हकीकत कळली. तेव्हां ती वेश्या विक्रमसिंह राजास म्हणाली,–"मला आपण पूर्वीच आज्ञा कां केली नाहीं, अथवा अजून काय झालें आहे ? माझें सर्व धन व सैन्य घेऊन शत्रूचा निग्रह करा." कुमुदिकेनें असें बोलून प्रोत्साहन दिलें असतां, तिचें धन खर्च करून राजानें सैन्य वाढविलें व तो आपल्या बलवान् मित्राकडे गेला. नंतर त्याचें सैन्य व आपलें सैन्य एकत्र करून विक्रमसिंहानें त्या पांची मुख्य शत्रूंस रणांत मारलें. त्यामुळें त्यांचीं राज्येंही त्याला मिळालीं. नंतर संतुष्ट झालेला तो राजा कुमुदिकेस म्हणाला,–'प्रिये, मी तुजवर प्रसन्न झालों आहें, तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग.' तें ऐकून कुमुदिका म्हणाली,–'प्रभो, आपण खरे-खरच जर मजवर प्रसन्न झालां असाल, तर फार दिवसांपासून माझ्या हृदयांत सलत असलेलें हें एक शल्य उपटून काढा. उज्जयिनींत श्रीधर या

नांवाचा एक ब्राह्मणपुत्र माझा प्रिय होता. त्याला राजानें अगदीं अल्प अपराधाकरितां कैद करून ठेवलें आहे. त्याला प्रतिबंधांतून सोडवा. उत्तम राजलक्षणांवरून आपलें पुढें मोठें कल्याण होणार आहे, व या कामास आपणच योग्य आहां, असें जाणून मी आपली इतके दिवस अनन्य चित्तानें सेवा केली. माझ्या अभीष्ट सिद्धीविषयीं निराश झाल्या-मुळेंच मी आपल्या चितेवर आरोहण केलें. त्या ब्राह्मणपुत्रावांचून मला माझें जीवित विफल वाटतें.'

विलासिनीचें हें भाषण ऐकून विक्रमसिंह राजा तिला उलट म्हणाला,— 'सुंदरि, तूं धीर धर. मी तुझें अभीष्ट पूर्ण करीन.' नंतर आनंदित झालेली वेश्या त्याच्या जवळून उठून दूर गेली. तेव्हां राजा मंत्र्याचें मागचें भाषण आठवून मनांत म्हणाला,—'वेश्यांचे ठायीं सद्भाव नसतो, म्हणून सांगितलें तें खरं आहे; पण ह्या बिचारीची कामना मला पूर्ण केली पाहिजे.' असा विचार करून तो सैन्यासह उज्जयिनीस गेला, व श्रीधराला सोडवून आणि पुष्कळ धन देऊन, कुमुदिकेला प्रियसमागमानें सुखी केल्यावर, आपल्या राजधानीस परत आला. नंतर मंत्र्याच्या म्हण-ण्याचें उल्लंघन न करितां विक्रमसिंहानें क्रमानें सर्व पृथ्वीचा उपभोग घेतला. याप्रमाणें वारस्त्रियांचें हृदय अज्ञेय असतें.

नरवाहनदत्तासमोर अशी कथा सांगून गोमुख स्वस्थ बसला असतां तपन्तक म्हणाला, 'देव, कोणत्याही चपल स्वभावाच्या स्त्रीचा कांहीं विश्वास नाहीं. वारयोषितांप्रमाणेंच ऋतुप्राप्तीनंतर दीर्घकाल माहेरीं राहणाऱ्या स्त्रियांवरही कांहीं विश्वास नाहीं. याविषयीं मी स्वतः पाहिलेलें एक आश्चर्य सांगतों; तें ऐका.

## २. बलवर्मा व चंद्रश्री यांची कथा.

"याच नगरांत पूर्वी एक बलवर्मा या नांवाचा वैश्य होता. चंद्रश्री या नांवाची त्याची भार्या होती. तिनें खिडकींतून एका सुंदर शीलहर नामक वैश्यपुत्रास पाहिलें. नंतर सखीच्या द्वारा त्याला तिच्याच येथें आणवून मदनाक्रांत झालेल्या चंद्रश्रीनें गुप्तपणें त्याच्याशीं यथेच्छ क्रीडा केली. ती दुष्ट स्त्री प्रत्यहीं याच रीतीनें त्याच्याशीं रम-माण होत असे. कांहीं दिवसांनीं हें तिचें कृत्य सर्व सेवक व बांधव यांस

कळलें, तिच्या बलवर्म–पतीला मात्र ती असाध्वी आहे, हें कळलें नव्हतें. स्नेहान्ध झालेला जन भार्येची दुःशीलता प्रायः पाहूं शकत नाहीं.* कांहीं दिवसांनीं बलवर्म्याला दाहज्वर येऊं लागला, व त्यामुळेंच तो वैश्य क्रमानें अन्त्य अवस्थेस पोंचला; पण पति मरणोन्मुख झाला असतांही त्याची भार्या प्रत्यहीं सखीच्या येथें जाऊन आपल्या उपपतीशीं रममाण होत असे. पुढे एके दिवशीं चंद्रश्री सखीच्या येथेंच असतांना इकडे तिचा पति मरण पावला. तें वर्तमान कळतांच उपपतीला विचारून ती गड-बडीनें आपल्या घरा परत आली. नंतर पतिशोकानें व्याकुल झालेल्या व दृढ निश्चय केलेल्या तिनें, तिचें शील जाणणारे बांधव निवारण करीत असतांनाही, पतीच्या चितेवर आरूढ होऊन सहगमन केलें. याप्रमाणें स्त्री-चित्ताची गति कोणाला कळत नाहीं. त्या गुप्तपणें व्यभिचारासारखीं महत् पापे करितात व उघडपणें पतीवांचून प्राण देतात."

तपंतकानें असें सांगितलें असतां हरिशिख म्हणाला,–' याविषयीं देव-दासाचें वर्तमान तुम्ही ऐकलें नाहीं का? नसल्यास मी सांगतों तें ऐका'–

## ३. देवदास व दुःशीला यांची कथा.

पूर्वी एका गावामध्यें कुटुंबी देवदास म्हणून एकजण होता. दुःशीला ही त्याची भार्या होती. नांवाप्रमाणेंच तिचें शील होतें. ती अन्यपुरुषाचे ठायीं आसक्त झालेली आहे, असें तिचे शेजारी जाणत होते. एकदां तो देवदास कांहीं कामाकरितां राजकुलांत गेला असतां, त्याच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या दुष्ट स्त्रीनें आपल्या जारास आणून माडीवर गुप्तपणें बसविलें. नंतर रात्रीं तिचा पति घरीं परत आला व भोजनादि करून निजला. मध्यरात्र उलटून गेल्यावर त्या चांडालीनें जाराकडून त्याला मारविलें व त्या हिंसकाला मुकाट्यानें बाहेर घालवून रात्र संपेतों ती तशीच राहिली; पण उजाडतांच घराबाहेर येऊन मोठ्यानें ओरडत व रडत–'या माझ्या पतीला चोरांनीं ठार मारलें'–असें सर्वांस सांगूं लागली. तिचा हा आक्रोश ऐकून सर्व शेजारी धांवून आले, व म्हणाले, " याला जर चोरांनीं मारलें म्हणून म्हणावें, तर त्यांनीं घरांतील कांहींच कसें

* प्रायेण भार्यादौःशील्यं स्नेहान्धो नेक्षते जनः ॥

नेलें नाहीं ?' इतकें बोलून त्यांनीं लागलीच तेथें असलेल्या देवदासाच्या लहान मुलाला,—' बाळा, तुझ्या बापाला कोणी मारलें ?' म्हणून विचारिलें. तेव्हां तो लहान बालक अगदीं स्पष्टपणें म्हणाला, "बाबा राजगृहीं गेल्यावर काल संध्याकाळीं कोणसा एकजण तरुण पुरुष आमच्या माडीवर येऊन लपून बसला, व त्यानें रात्रीं खालीं उतरून माझ्यासमक्ष बाबांना मारलें. आई मला घेऊन अगोदरच त्यांच्या अंथरुणावरून दूर झाली होती.' हें त्या अर्भकाचें भाषण ऐकतांच देवदासाच्या भार्येच्या जारानें या गरीबाला मारलें, असा त्यांचा ग्रह झाला. त्यांनीं त्या हिंसकाला शोधून काढून ठार केलें आणि बालकाला ठेवून घेऊन दुःशीलेला तेथून घालवून दिलें. याप्रमाणें व्यभिचारिणी स्त्री सर्पिणीप्रमाणें निःसंशय पतीला मारते. असें सांगून हरिशिख गप्प बसला असतां, गोमुख म्हणाला,—'फार लांब कशाला ? आपल्या थोरल्या महाराजांच्या ( वत्सेश्वराच्या ) वज्रसार सेवकाची नुकतीच कशी हंसण्यासारखी अवस्था झाली ती ऐका.'—

## ४. वज्रसाराची कथा.

"त्या शूर, सुरूप व प्रेमळ वज्रसाराची मालव देशांतील एक सुंदर स्त्री भार्या होती. ती त्याला आपल्या शरीराहूनही अधिक प्रिय वाटत असे. एकदां तिचा पिता पुत्रासह मोठ्या उत्कंठेनें तिला माहेरीं नेण्याकरितां आला. वज्रसारानें त्याचा चांगला सत्कार केला, व श्वशुरानें आग्रह केल्यामुळें राजाज्ञा घेऊन तोही भार्येसह मालवदेशास गेला. तेथें श्वशुरगृहीं एक महिनाभर विश्रांति घेऊन, वज्रसार राजसेवेकरितां भार्येला माहेरींच ठेवून परत आला. कांहीं दिवसांनीं त्याचा एक क्रोधन नांवाचा सुहृद् अकस्मात् त्याच्यापाशीं येऊन म्हणाला, "मित्रा, भार्येला पित्याच्या गृहीं सोडून तूं आपलें घर नाहींसें कसें करून घेतलेंस ? त्या पापेनें तेथें परपुरुषसंग केला. तिकडून आलेल्या एका सत्यवक्त्यानें मला आजच हें वर्तमान सांगितलें. ही गोष्ट खोटी आहे, असें समजूं नकोस. त्या दुष्ट स्त्रीचा निग्रह करून तूं दुसरीशीं विवाह कर."

क्रोधन असें सांगून गेला असतां, वज्रसार क्षणभर वेड्यासारखा होऊन स्तब्ध राहिला; व लगेच म्हणाला, 'मला वाटतें कीं हें वर्तमान

खरें असावें, म्हणूनच मी परवां माघारी पाठविला असतांही ती आली नाहीं. आतां मी स्वतः तिला आणावयास जातों, म्हणजे खरा प्रकार काय आहे तें तरी समजेल.' असा बराच विचार करून तो मालवास गेला; आणि सासू व सासरा यांना विचारून भार्येसह परत यावयास निघाला. पुष्कळ दूरवर चालून आल्यावर, बरोबर आलेल्या सेवकांना चुकवून आड मार्गानें तो भार्येला घेऊन एका घोर अरण्यांत शिरला. तेथील एका मोठ्या झाडाखालीं बसून वज्रसार एकांतांत आपल्या पत्नीला म्हणाला—'तूं अन्य पुरुषाचे ठायीं आसक्त आहेस, असें मी एका विश्वासु मित्राच्या तोंडून ऐकलें आहे. मी माघारी पाठविला असतांही तूं त्याच्या बरोबर आली नाहींस. तर आतां खरें काय आहे तें सांग. नाहींतर मी तुला कडक शिक्षा करीन.'

हा त्याचा प्रश्न ऐकून ती म्हणाली,—'मी व्यभिचारिणी आहें, असा जर तुझ्या मनाचा निश्चय झाला असेल, तर मला काय विचारतोस ! तुला जें वाटेल तें कर.' हें तिचें उद्धटपणाचें भाषण ऐकून वज्रसाराला अतिशय कोप आला. त्यानें तिला वृक्षाशीं बांधून वेलींनीं झोडपून काढलें. पण तो जों तिचें वस्त्र सोडून घेत आहे, तों तिला नग्न पाहून त्या मूर्ख विषयासक्त वज्रसाराला तिच्या संभोगाची इच्छा झाली; पण ती त्याच्या म्हणण्यास अनुकूल होईना. शेवटीं 'तूं जसें मला बांधून मारिलेंस तसें मला जर उलट बांधून मारूं देशील, तर मी आपल्या अंगाला हात लावूं देईन, त्यावांचून नाहीं.' असा तिनें आग्रह धरिला. त्यानें पुष्कळ प्रार्थना केली; पण तिचें मन कांहीं केल्या वळेना. म्हणून त्या विषयलोलुपानें तिचें म्हणणें मान्य केलें. खरोखर मदनानें वज्रसाराला तुच्छ करून सोडलें होतें. असो; त्याचें अनुमोदन मिळतांच त्या असाध्वीनें त्याचे हात-पाय झाडाला घट्ट बांधले व त्याच्याच शस्त्रानें त्याचे दोन्ही कान व नाक कापलें. नंतर ती पापिनी त्याचें शस्त्र व वस्त्रें घेऊन आणि स्वतः पुरुषवेष धारण करून मनास वाटेल तिकडे निघून गेली.

इकडे त्या निर्जन वनांत ज्याचे कान व नाक कापलें आहे, असा वज्रसार तशाच कष्टकर अवस्थेंत बराच वेळ राहिला, नाकांतून गळणाऱ्या रक्ताबरोबर त्याचा सर्व मानही गळून गेला, व तोंड खालीं झालें. इतक्यांत तेथें कोणी एक वैद्य औषधीकरितां

आला. वज्रसाराची दुर्दशा पाहून त्या सज्जनाला दया आली. त्यानें बंधनें सोडून त्यास आपल्या घरीं नेलें. तेथें कांहीं दिवस ठेवून घेऊन वैद्यानें त्याचें सांत्वन केलें. नंतर तो हळूहळू आपल्या घरीं परत आला. त्यानें त्या दुष्ट स्त्रीचा पुष्कळ शोध केला; पण त्याला ती सांपडली नाहीं. स्वगृहीं आल्यावर वज्रसारानें घडलेला सर्व वृत्तांत क्रोधन मित्राला सांगितला. त्यानेंही तें सर्व वत्सराजाला कळविलें; पण 'पौरुष व क्रोध यांनीं रहित आणि त्यामुळेंच बायको झाला आहे असें जाणून, याच्या स्त्रीनें याचा पुरुषवेष हिरावून घेतला व उचित दंडही केला.' असें म्हणून राजवाड्यांतील सर्वजण थट्टा करीत असतांनाही वज्रसार वज्रासारखें दृढ हृदय करून येथेंच राहिला आहे. तेव्हां प्रभो, चपल स्त्रियांवर कोण विश्वास ठेवणार ! "

गोमुख इतकें बोलून आपली कथा संपवीत आहे तोंच मरुभूति म्हणाला,-' देव, स्त्रियांचें मन अस्थिर असतें, याविषयीं मी एक दुसरी कथा सांगतों ऐका.'—

### ५. सिंहबल व कल्याणवती यांची कथा.

पूर्वी दक्षिण देशांत सिंहबल नांवाचा राजा होता. त्याची कल्याणवती या नांवाची भार्या होती. ती मालव सामन्त राजाची कन्या राजाला सर्व अंतःपुर-स्त्रियांहून अधिक आवडत असे. तिच्या सहवर्तमान तो राज्य करीत असतांना, एकदां त्याच्या बलाढ्य गोत्रजांनीं एकमत करून त्याला देशांतून घालवून दिलें. तेव्हां देवीला बरोबर घेऊन राजा सिंहबल आयुधें व थोडासा परिवार यांसह सासऱ्याच्या मालव देशाकडे जावयास निघाला. मार्गानें जात असतांना एका अरण्यांत एक मोठा सिंह त्यांच्या अंगावर धांवून आला; पण त्या शूरानें खड्ग-प्रहार करून त्याचे सहज दोन तुकडे केले. पुढें गेल्यावर एक वन्य हत्ती गर्जना करीत त्या सर्वांच्या समोर आला; पण मंडलावर भ्रमण करणाऱ्या राजानें आपल्या तीक्ष्ण तरवारीनें त्याच्या सोंडेचा शेंडा उडवून त्याला ओरडत भूमीवर लोळविलें. कांहीं वेळानें त्यांच्यावर चोरांची सेना चालून आली; पण एकट्याच शूरानें तिचा पराभव केला. याप्रमाणें पुष्कळ मार्ग चालून गेल्यावर तो धैर्यसागर मालव देशास पोंचला. नंतर ज्याचा पराक्रम प्रत्यक्ष अनुभवास आला आहे, असा तो आपल्या

देवीला म्हणाला,–' तूं हें माझें मार्गांतील शौर्य पित्याच्या घरीं कोणाला सांगूं नको; कारण क्षत्रियानें असले पराक्रम करणें यांत श्लाघा कसली? उलट ती कोणी करूं लागल्यास त्याला लज्जाच आली पाहिजे.' असो, इतकें सांगून तो तिच्या सहवर्तमान श्वशुरगृहीं गेला.

आपला जामात एकाएकीं आला आहे असें पाहून, सासरा घाबरून अशा दीन अवस्थेत येण्याचें कारण विचारूं लागला. तेव्हां सिंहबलानें आपलें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून मालवराजानें त्याचें सांत्वन केलें, व धीर देऊन योग्य सन्मान केला. कांहीं दिवस त्याला आपल्या येथें ठेवून घेतलें. नंतर त्या श्वशुरानें त्याला आपले घोडे व हत्ती दिले; आणि दुसरें सैन्य जमवून शत्रूंना जिंकावयास सांगितलें. तेव्हां तो पराक्रमी राजा गजानीक नांवाच्या एका अतिबलाढ्य राजापाशीं गेला. जातांना तो शत्रूंना जिंकावयास उद्युक्त झाला असल्यानें त्यानें आपल्या कल्याणवती भार्येला तिच्या बापाच्या येथेंच ठेविलें.

तो जाऊन कांहीं दिवस झाले असतां, एकदां त्याच्या देवीनें खिडकींतून एका पुरुषास पाहिलें, व तत्काल त्यानें तिचें मन हरण केलें. स्मरवश झालेली ती लगेच आपल्या मनांत विचार करूं लागली कीं, 'माझ्या आर्यपुत्राहून [पतीहून] दुसरा कोणताही पुरुष अधिक सुरूप व शूर असणें शक्य नाहीं, हें मी जाणतें; पण या पुरुषाकडे माझें मन धांव घेत आहे! काय करूं? याच्या समागमावांचून माझ्यानें राहवत नाहीं. यास्तव काय होईल तें होवो, मी त्याचें सेवन करणार! असा मनांत विचार करून, तिनें एका विश्वासु व गुप्त गोष्ट बाहेर न फोडणाऱ्या सखीला तो आपला अभिप्राय सांगितला. तिच्या द्वारा राणीनें त्या पुरुषाला आणवून, व खिडकींतून दोरी सोडून तिच्यावरून त्याला आपल्या अंतःपुरांत घेतलें; पण आंत आल्यावर तो धैर्यानें तिच्या पर्यंकावर बसूं शकला नाहीं. तर खालींच निराळ्या आसनावर बसला. तें पाहून हा कोणी नीच आहे असें समजून, ती जों मनांत खिन्न होत आहे, तों वरून फिरत फिरत एक सर्प खालीं उतरला. त्याला पाहतांच एकाएकीं तो भयानें व्याकुल होऊन उठला. धनुष्य घेऊन त्यानें त्याला बाणानें मारलें, व तो मरून पडला आहे असें पाहून, त्या भित्र्यानें त्याला बाणानेंच उचलून खिडकींतून बाहेर फेंकून दिलें आणि नंतर भय-

शून्य झालेला तो आनंदानें नाचूं लागला. हा त्याचा भितरा स्वभाव पाहून, कल्याणवती मनांत अतिशय खिन्न झाली; व म्हणाली,–' धिक् धिक्, या अधम व अधीर मनुष्याला घेऊन मला काय करावयाचें आहे !'

राणीच्या चर्येवरून ती या पुरुषाविषयीं विरस झाली आहे असें ताडून, तिचा अभिप्राय ओळखणाऱ्या चाणाक्ष सखीनें बाहेर गेल्यासारखें करून, व त्वरेनें आंत येऊन राणीस म्हटलें,–'देवि, तुझा पिता आला आहे, यास्तव आतां या तरुणाला आल्या मार्गानेंच सत्वर आपल्या घरीं जाऊं दे.' सखीच्या तोंडांतून निघालेले हे शब्द ऐकून, तो भितरा थरथर कांपतच उठला व खिडकींतील दोरीवरून खालीं उतरूं लागला; पण भयानें व्याकुळ झालेल्या त्याच्या हातांतील दोरी अर्धा मार्ग उतरून झाल्यावर सुटली व तो खालीं पडला. आयुष्य संपलेलें नसल्यामुळें प्राण गेला नाहीं इतकेंच !

तो गेल्यावर कल्याणवती आपल्या सखीला म्हणाली,–' गडे, तूं त्या नीचाला बाहेर घालविलेंस, हें बरें केलेंस. तूं माझा अभिप्राय ओळखलास. सखे, माझें मन या गोष्टीविषयीं अत्यंत खिन्न व दुःखित झालें आहे. माझा पति व्याघ्र–सिंहादिकांस मारून ती गोष्ट कोणाला कळावी, असें इच्छितही नाहीं; पण हा अधीर, सापाला मारतांच, वेड्यासारखा नाचूं लागतो ! तेव्हां त्या तसल्या शूराला सोडून माझें मन या पामरावर कसें आसक्त झालें, कांहीं कळत नाहीं. जिची मति अस्थिर आहे अशा मला धिक्कार असो. अथवा कापूर सोडून विष्ठेकडे धांवणाऱ्या माशांसारख्या, सर्व स्त्रियांनाच धिक्कार असो ! *' असें म्हणून जिला अतिशय पश्चात्ताप झाला आहे, अशी ती राणी ती रात्र मोठ्या दुःखांत घालवून, दुसऱ्या दिवसापासून आपल्या शूर भर्त्याची वाट पहात पित्याच्या घरीं राहिली.

इकडे गजानीक राजानें त्याला आणखी पुष्कळ सैन्य दिलें. त्या सर्व सैन्यासह अकस्मात् जाऊन सिंहबलानें सर्व पापी गोत्रजांस मारलें. त्यामुळें त्याला त्यांच्याही राज्यासह स्वराज्य परत मिळालें. नंतर त्यानें आपल्या

---

* तदप्रतिष्ठितमतिं धिङ् मां धिगथवा स्त्रियः ।
या धावन्त्यशुचिं हित्वा कर्पूरं मक्षिका इव ॥

प्रियेला पित्याच्या येथून परत आणलें, श्वशुराला पुष्कळ धन दिलें, व निष्कंटक पृथ्वीचा उपभोग घेतला.

हे देव, याप्रमाणें महावीर व महाभाग्यशाली सत्पति असतांनांही, विवेकी स्त्रियांचें सुद्धां चंचल चित्त परपुरुषाकडे धांवतें. अति शुद्ध चित्ताच्या स्त्रिया फारच विरळा असतात.

मरुभूतीनें सांगितलेली ही कथा ऐकून वत्सराजपुत्र नरवाहनदत्तानें सुखानें शयन करून ती रात्र घालविली.

## तरंग ३ रा.



### १. शक्तियशेचें वृत्त.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं नित्य–कर्म करून तो नरवाहनदत्त सचिवांसह विहार करीत आपल्या उद्यानास गेला. तेथें असतांना त्यानें आकाशांतून अगोदर एक मोठा प्रभापुंज व नंतर अनेक विद्याधरी उतरतांना पाहिल्या. अंगकांतीनें देदीप्यमान असलेल्या त्यांच्यामध्यें, तारागणांतील चंद्रकलेप्रमाणें नेत्रांना आकर्षण करून घेणारी एक कुमारी त्याच्या दृष्टीस पडली. तिचें मुख विकास पावलेल्या कमलाप्रमाणें असून, तिच्या चंचल नेत्रांकडे पाहिल्यावर, हे त्या कमलावर भ्रमण करणारे भ्रमरच आहेत; अशी भ्रांति होत असे. तिचें गमन हंसाच्या गमनाप्रमाणें होतें. तिच्या अंगास कमलाचा सुवास येत होता. तिचा कटिप्रदेश तरंगाकार त्रिवलीनें अलंकृत झाला होता. मदनोद्यानांतील पुष्करिणीच्या शोभेची जणुं काय अधिदेवताच, अशा त्या कामसंजीविनीला पाहून, चंद्रमूर्तीला पाहून जसा सागर, त्याप्रमाणें राजपुत्र क्षुब्ध झाला. व ‘ अहाहा, खरोखर ही स्त्री म्हणजे ब्रह्मदेवाची सुंदर वस्तु निर्माण करण्याची साक्षात् चतुरताच आहे, ’ असें म्हणत सचिवांसह तिच्याजवळ गेला. नंतर वांकड्या प्रेमार्द्र दृष्टीनें पहाणाऱ्या तिला ‘ कल्याणि, तूं कोण व तुझें येथें आगमन कां झालें ? ’ असें तो विचारूं लागला, तेव्हां ती कन्या म्हणाली.—

"हिमालयावर कांचनशृंग या नांवाचें सुवर्णाचें पुर आहे. त्यांत स्फटिकयश या नांवाचा एक विद्याधरेश आहे, तो धार्मिक आणि कृपण, अनाथ व शरणागत यांवर प्रेम करणारा आहे. त्याच्या हेमप्रभा देवीच्या ठायीं गौरीच्या वरामुळें झालेली मी शक्तियशा नांवाची कन्या आहें, असें जाण. पांच भावांच्या पाठीवर झाल्यामुळें, मी आपल्या पित्याला प्राणाहून प्रिय आहें. त्याच्या आज्ञेनें व्रतें व स्तोत्रें यांच्या योगानें मी पार्वतीस संतुष्ट केलें. तेव्हां तुष्ट झालेली ती देवी मला सर्व विद्या देऊन म्हणाली,–' पुत्रि, पित्यापेक्षां दसपट अधिक विद्याबल तुला प्राप्त होईल. नरवाहनदत्त तुझा भर्ता होईल; तो वत्सराजपुत्र आकाशचारी प्राण्यांचा राजा पुढें चक्रवर्ती होणार आहे.' इतकें सांगून शर्वपत्नी गुप्त झाली. तिच्या प्रसादानें मी संपन्न झालें असून, आतां क्रमानें यौवनावस्थेस प्राप्त झालें आहें. गेल्या रात्रीं स्वप्नांत मला दर्शन देऊन, तिनें अशी आज्ञा केली–'पुत्रि, उद्यां सकाळीं तूं जाऊन तो आपला पति पहा. तो या उद्यानांत तुला भेटेल, व हाच विचार तुझ्या पित्याच्याही मनांत येऊन एक महिन्यानें तुमचा विवाह होइल.'

'इतकें सांगून देवी गुप्त झाली व रात्र संपली. नंतर हे प्राणनाथ, आपण येथें आलां आहां असें विद्याबलानें जाणून मी आपल्याला पहाण्याकरितां येथें आलें. आतां स्वस्थानीं जातें.' असें म्हणून ती आपल्या सख्यांसह आकाशांत उडाली व योग्यवेळीं पित्याच्या नगरास जाऊन पोंचली. इकडे तिच्या विवाहाविषयीं अतिशय उत्सुक झालेला नरवाहनदत्त खिन्न मनानें आपल्या घरीं गेला. त्याला तो एक महिना युगासारखा वाटला. पण तो खिन्नचित्त झाला आहे असें पाहून, गोमुख म्हणाला,–' देव, मी एक कथा सांगतों; ती ऐका '—

## २. दोघी विद्याधरींची कथा.

पूर्वीं* कांचनपुरी या नांवाची एक नगरी होती. त्या नगरींत सुमना नांवाचा एक मोठा राजा होता. काय चमत्कार सांगावा, त्या विराज-

* महाकवि बाणभट्टाची कादंबरी, या कथेच्या आधारानेंच लिहिलेली आहे. कादंबरीचा कथाभाग या कथेशीं बराचसा जुळत असला तरी यांतील नांवें अगदीं निराळीं आहेत.

मान होणाऱ्या राजानें आपले दुर्गम वनप्रदेश आपल्या स्वाधीन ठेवून, शत्रूंचे दुर्गम प्रदेशही आपलेसे करून ठेवले होते. तो राजा एकदां आपल्या सभेमध्यें बसला असतां, प्रतीहार जवळ येऊन त्याला असें सांगूं लागला.–'देव, मुक्तालता या नांवाची निषादाधिपाची कन्या पिंजऱ्यांत ठेवलेल्या एका पोपटाला बरोबर घेऊन, द्वारावर येऊन उभी आहे. तिचा वीरप्रभ या नांवाचा भ्राता, तिच्या बरोबर आला आहे. देवाला भेटण्याची तिची इच्छा आहे.' तें ऐकून–'तिला आंत येऊं दे'–असें राजानें सांगितलें असतां, प्रतीहाराच्या आज्ञेनें ती भिल्लकन्या राजसभेच्या अंगणांत आली. तिचें अद्भुत रूप पाहून, सभेंतील सर्वजण–'खचित, ही मानुषी नव्हे; कोणी दिव्यस्त्री आहे,'–असें मनांत म्हणूं लागले. इतक्यांत ती राजाला प्रणाम करून म्हणाली,–'देव, हा शास्त्रगंज या नांवाचा चार वेदांस धारण करणारा पोपट आहे. हा मोठा कवि आणि सर्व विद्या व कला यामध्यें निपुण आहे. हा आपल्या उपयोगाचा आहे, असें समजून मीं याला येथें आणलें आहे; तर आतां याचें ग्रहण करावें. इतकें बोलून तिनें अर्पण केलेल्या त्या पोपटाला घेऊन, प्रतीहार कौतुकानें राजापुढें गेला. तों पोपटानें राजाला उद्देशून पुढील श्लोक म्हटला,—

राजन्युक्तमिदं सदैव यदयं देवस्य संधुक्ष्यते ।
धूमश्याममुखो द्विषद्विरहिणीनिःश्वासवातोद्गमैः ॥
एतत्त्वद्भुतमेव यत्परिभवाद्बाष्पाम्बुपूरप्लवैः ।
आसां प्रज्वलतीह दिक्षु दशसु प्राज्यः प्रतापानलः ॥१॥

याचा सारांश—हे राजन्, शत्रूंच्या विरहदुःख भोगणाऱ्या स्त्रियांच्या निःश्वास-वायूच्या प्रवाहांनीं, आपला धूमाच्या योगानें श्याममुख झालेला प्रतापाग्नि सतत पेटविला जातो, हें योग्यच आहे. पण त्यांच्या पतींच्या पराभवामुळें, नेत्रांतून वहाणाऱ्या बाष्पजल-प्रवाहांनींही तो दशदिशांमध्यें अतिशय प्रज्वलित होतो, हें मोठें आश्चर्य आहे.

अशा अर्थाचा हा श्लोक म्हणून व त्याचें व्याख्यान करून, तो शुक म्हणाला,–'मी कोणत्या शास्त्रांतील कोणतें प्रमेय सांगूं, त्याची आज्ञा करा.'

पोपटाची ही प्रार्थना ऐकून, राजाला अतिशय विस्मय वाटला. तेव्हां त्याचा मंत्री बोलला,–" प्रभो, मला वाटतें कीं, हा पूर्वजन्मीं कोणी मोठा ऋषि असून, शापानें पोपट झाला आहे. धर्मवशात् हा जातिस्मर निपजलेला असल्यामुळें, पूर्वीं शिकलेलें सर्व ज्ञान याला आठवत आहे.'' मंत्र्यानें असें सांगितलें असतां, राजा त्या पोपटाला म्हणाला–' भद्र, मला तुझें मोठें कौतुक वाटत आहे. यास्तव तूं अगोदर आपला वृत्तांत मला सांग. तुझें जन्म कोठें झालें? पोपट असूनही तुला शास्त्रज्ञान कसें स्फुरलें? व तूं कोण आहेस?' तेव्हां नेत्रांतून अश्रु ढाळीत तो पक्षी हळूच म्हणाला,–'हे देव, माझें वृत्त जरी सांगण्यासारखें नसलें तरी आपली आज्ञाच होत आहे, म्हणून सांगतों.'

हिमालयापाशीं एक आपल्या शाखांनीं, दश दिशांस व्यापणारा एक वटवृक्ष आहे. त्याच्या शाखांचा आश्रय करून अनेक पक्षी राहतात. त्यावर एक शुक शुकीसह घर करून राहत असे. त्याच्यापासून दुष्कर्मयोगा-मुळें, हा मी उत्पन्न झालों. मी उत्पन्न होतांच, माझी माता शुकी मेली. म्हणून आपल्या पंखांखालीं झांकून, माझा वृद्ध तात माझें रक्षण करूं लागला. जवळ राहणाऱ्या पोपटांनीं आणलेलीं, व खाऊन टाकलेलीं उष्टीं फळें स्वतः खाऊन व मला देऊन, तो तेथें कसे तरी दिवस घालवीत असे. एकदां रणवाद्यें व शिंगें वाजवीत एक भयंकर भिल्लसेना, त्याच अरण्यांत मृगयेकरितां आली. त्यामुळें तें महाअरण्य एकाएकीं आकुल झालें. त्यांतील हरणें चंचल नेत्रांनीं इतस्ततः पाहत पळूं लागलीं; धुळीचा भयंकर लोट उठला, चमरी-हरणें आपले सुंदर केस उभारून वाट फुटेल तिकडे उधळलीं; शिकारी लोकही सावजांच्या मागें धावूं लागले; त्या अरण्यांत सर्व दिवसभर अशी धांव-पळ चालली होती. शेवटीं सर्व दिवसभर कृतांताची क्रीडा करून थकलेलें तें शबर–सैन्य बरोबर मांसभार घेऊन परतलें; पण त्यांतील एका वृद्ध शबराला त्या दिवशीं कांहीं मिळालें नाहीं. सायंकाळीं भुकेलेल्या, त्याची आमच्या वृक्षाकडे दृष्टि गेली. या झाडावर पुष्कळ पक्षी आहेत असें कळतांच, तो यमस्वरूपी भिल्ल भराभर वर चढला, आणि पोपट व इतर पक्षी यांनां घरट्यांतून ओढ–ओढून मारून खालीं टाकूं लागला. अशा प्रकारचें घोर कृत्य करीत येत असलेल्या त्याला मीं पाहिलें, व ' हा साक्षात् यम-

दूतच आहे;' असें समजून भयानें कांपत आपल्या बापाच्या पंखांत शिरलों. इतक्यांत तो पातकी आमच्या घरट्यापाशीं आला. त्यानें निर्दयपणानें माझ्या पित्याला ओढून घेऊन, व त्याची मान मुरगळून खालीं फेंकून दिलें. प्राणत्याग करणाऱ्या पित्याच्या पंखाखालीं लपून राहणारा, मीही त्याच्याबरोबर भूमीवर येऊन आदळलों; आणि जीवाच्या आशेनें पितृप्रेमाला विसरून, गवत व पानें यांच्या आंत प्रवेश केला. त्या वेळीं माझें अंग व हृदय भयानें थरथर कांपत होतें. इतक्यांत तो दुष्टही आणखी बऱ्याच पक्ष्यांना मारून टाकून, खालीं उतरून आला. त्यानें वाळलेलें गवत व पानें पेटवून त्यांत त्या सर्व पक्ष्यांना भाजलें, व त्यांतील कित्येकांच्या मांसानें आपलें दुष्पूर जठर भरून, बाकीच्या पक्ष्यांस घेऊन तो आपल्या घराकडे निघून गेला. तो गेला आहे असें पाहून, माझ्या जिवांत जीव आला व मी ती रात्र मोठ्या चिंतेंत घालविली.

दुसऱ्या दिवशीं उजाडून, भगवान् जगचक्षु सूर्य उगवला असतां, तृषेनें व्याकुल होऊन, पंख नुक्तेच फुटत असल्यामुळें, भूमीवरून अडखळत व पडत मी जवळच्याच पद्मसरोवराच्या कांठीं जलप्राशन करण्याकरितां गेलों. तों जणुं काय माझें पूर्वपुण्यच, अशा स्नान करून त्या सरोवराच्या कांठीं बसलेल्या मरीचि नामक मुनीस मीं पाहिलें. त्या कारुणिकानें मला उचलून हातांत घेतलें. माझ्या चोंचींत स्वच्छ जलाचे थेंब सोडले, व मला एका पानाच्या द्रोणांत घालून, आपल्या आश्रमास नेलें. तेथें जातांच, कुलपति पुलस्त्य मला पाहून हंसला. तेव्हां इतर मुनींनीं हंसण्याचें कारण विचारिलें असतां, तो दिव्यदृष्टि ऋषि म्हणाला,– 'शापामुळें पोपट झालेल्या या महात्म्यास पाहून, मला दुःखानें हंसूं आलें. अग्निकार्य करून मी तुम्हांला याची कथा सांगेन; म्हणजे ती ऐकून यालाही पूर्वजन्माचें स्मरण होईल.' असें सांगून पुलस्त्य आह्निक कर्म करावयास गेला. तीं संपवून तो पुनः स्वस्थानीं येऊन बसला असतां, मुनींनीं पुनः त्याची प्रार्थना केली. तेव्हां तो महात्मा मजविषयीं पुढीलप्रमाणें कथा सांगूं लागला.—

## ३. पोपटाची उपकथा.

" रत्नाकर नगरांत ज्योतिष्प्रभ नांवाचा राजा होता. ज्याचें शासन फार कडक आहे असा तो रत्नाकरां ( समुद्रा ) पर्यंत सर्व पृथ्वीचें राज्य

करीत असे. तीव्र तपानें संतुष्ट झालेल्या शंकराच्या वरामुळें, त्याच्या हर्षवती महाराणीच्या उदरीं त्याला एक पुत्र झाला. तो गर्भांत येण्यापूर्वी, राणीनें एकदां स्वप्नांत चंद्रबिंब तोंडांत शिरलें असें पाहिलें, व लागलीच ती गर्भवती झाली. पुढें राजानें आपल्या पुत्राचें नांव सोमप्रभ असें ठेविलें. प्रजाजनांच्या नेत्रांस आनंद देणारा तो राजपुत्र क्रमानें, शरीरानें व सुंदर गुणांनींही वाढूं लागला. योग्य समयीं तो शूर, तरुण, राज्यभार वहाण्यास योग्य व प्रजेला प्रिय झाला आहे असें पाहून, आनंदित झालेल्या ज्योतिष्प्रभ राजानें त्याच्यावर यौवराज्याचा अभिषेक केला; आणि प्रभाकर नांवाच्या आपल्या मंत्र्याच्या सद्‌गुणी व प्रियकर पुत्राला त्याचा मंत्री केलें. त्याचवेळीं आकाशांतून दिव्य अश्व घेऊन मातलि खालीं उतरला, व सोमप्रभापाशीं येऊन म्हणाला,–' तूं या लोकीं इंद्राचा सखा विद्याधर अवतरला आहेस. म्हणून देवेंद्रानें उच्चैःश्रवा-अश्वाचा हा आशुश्रवा पुत्र, पूर्व स्नेहाला आठवून तुजकडे पाठविला आहे. हा घोडा सर्वोत्तम असून, राजपुत्रा, तूं यावर आरूढ होऊन शत्रूंना अजिंक्य होशील.' असें सांगून त्याला तें अश्वरत्न दिलें; आणि त्याच्या सत्काराचा स्वीकार करून तो इंद्राचा सारथि निघून गेला.

नंतर तो दिवस मोठ्या आनंदानें घालवून दुसऱ्या दिवशीं सोमप्रभ आपल्या पित्याला म्हणाला,–' बाबा, विजयेच्छा न करणें हा क्षत्रियांचा धर्म नव्हे. यास्तव मला आज्ञा द्या; म्हणजे मी दिग्विजयास जातों.' पुत्राचें तें उचित भाषण ऐकून राजाला संतोष वाटला व त्यानें त्याला मोठ्या आनंदानें अनुमोदन दिलें. प्रवासाची सर्व तयारी झाल्यावर, शुभ दिवशीं सोमप्रभ मातापितरांस प्रणाम करून इंद्रानें दिलेल्या घोड्यावर बसून सैन्यासह दिग्विजयास गेला. ज्याचा विक्रम दुर्वार आहे, अशा सोमप्रभानें त्या श्रेष्ठ अश्वाच्या योगानें सर्व दिशांतील राजांस जिंकिलें. प्रथम त्याचें धनुष्य व शत्रूंचीं मस्तकें बरोबरच नम्र झालीं; पण पुढें दिग्विजयानंतर त्याचें धनुष्य मात्र सरळ झालें. शत्रूंचीं मस्तकें वर उचललीं नाहींत. याप्रमाणें दिग्विजयकार्य संपवून परत येत असतांना, त्या राजपुत्रानें त्या हिमालयाजवळच्या मार्गांत आपलें सैन्य ठेवून आसपासच्या अरण्यांत मृगया करण्यास आरंभ केला. इतक्यांत एकाएकीं त्याला एक उत्तम रत्नभूषित किन्नर दिसला. त्याबरोबर तो तरुण इंद्राच्या

घोड्यावरून त्याला धरावयास धांवला. पण तो किन्नर पर्वतगुहेंत शिरून गुप्त झाला. त्या थोड्याशा अवकाशांतच इंद्राच्या घोड्यानें सोमप्रभाला वाहून नेलें होतें. इतक्यांत सायंकाळ होऊन भगवान् सूर्य पश्चिम दिशेस गेला. तें पाहून थकलेला राजपुत्र मोठ्या कष्टानें परतला. तों त्याला एक मोठें सरोवर दिसलें. तें फारच रम्य असल्यामुळें, ती रात्र त्याच्या कांठींच काढण्याचा निश्चय करून, सोमप्रभ घोड्यावरून खालीं उतरला. दिवसभर चालून थकलेल्या त्या उत्तम अश्वाला एका झाडाशीं बांधून त्याला तृण आणि जल दिलें; व राजपुत्रानें सायंसंध्यादि केल्यावर स्वतः-करितां फळें, मूळें व जल आणलें आणि एका झाडाखालीं बसून थोडीशी विश्रांति घेतली. तों त्याला अकस्मात् मंजुळ गायनध्वनि ऐकूं येऊं लागला. त्याबरोबर तेथून उठून जिकडून ध्वनि येत होता तिकडे तो गेला. थोड्याच अंतरावर त्याला गात असलेली एक दिव्य कन्या दिसली. तेव्हां 'ही अद्भुतरूपयुक्त कन्या कोण बरें असावी ?' असें मोठ्या आश्चर्यानें तो जों मनांत म्हणत आहे, तों त्या उदार–आकृति पुरुषास पाहून तिनें त्याचें आतिथ्य केलें; व म्हटलें,–'तूं कोण व एकटाच या दुर्गम भूमीस कसा प्राप्त झालास ?' हें ऐकून व आपला वृत्तांत सांगून तोही तिला–'तूं कोण ? व या घोर वनांत एकटीच कां राहतेस ? तें मला सांग,' असें उलट बोलला. त्याचा हा प्रश्न ऐकून ती दिव्य कन्या म्हणाली,–'हे महाभागा, तुला फारच कौतुक वाटत असेल, तर मी आपला वृत्तांत सांगतें, तो ऐक.' असें बोलून नेत्रांतून अश्रू ढाळीत ती आपला पुढीलप्रमाणें वृत्तांत सांगूं लागली.—

'हिमालयाच्या एका शिखरावर कांचनाभ या नांवाचें नगर आहे. त्यांत पद्मकूट या नांवाचा विद्याधरेश्वर असतो. त्या राजाच्या हेमप्रभा राणीच्या उदरीं मी झालें. माझें नांव मनोरथप्रभा. माझ्या आईबापांना मी पुत्राहून अधिक प्रिय आहें. मी प्रत्यहीं तीन प्रहर आपल्या सख्यांसह; आश्रम, द्वीपें, कुलपर्वत, वनें, उपवनें इत्यादि प्रदेशीं विहार करून, पित्याच्या भोजनाच्या वेळीं आपल्या घरीं येत असें. एकदां विहार करीत मी या सरोवराच्या कांठीं आलें; तों आपल्या समवयस्क मित्रासह, येथें असलेला एक मुनिपुत्र मला दिसला. एकाचा वृत्तीप्रमाणेंच त्याच्या रूपसंपत्तीनें मला ओढून नेल्यामुळें, मी त्याच्यापाशीं गेलें. त्यानेंही

साभिप्राय–दृष्टीनेंच पाहून माझें स्वागत केलें. मी खालीं बसलें; तेव्हां आम्हां उभयतांचा आशय जाणून; माझी एक सखी त्याच्या मित्राला,–'तूं कोण?' असें विचारूं लागली. तें ऐकून त्याचा मित्र म्हणाला,–"येथून जवळच एका आश्रमांत, दीधितिमान् या नांवाचा मुनि राहतो. तो ब्रह्मचारी, एकदां या सरोवरांत स्नान करण्याकरितां आला असतां, त्याच वेळीं येथें आलेल्या श्रीनें त्याला पाहिलें. पण तो अति शांत मुनि शरीरानें अप्राप्य आहे असें जाणून, त्या सकाम देवीनें त्याची मनानेंच इच्छा केली; त्यामुळें तिला मानस–पुत्र झाला. तेव्हां–'तुझ्या दर्शनामुळें मला झालेला हा पुत्र तूं घे,'–असें म्हणून श्रीनें दीधितिमानाला तो पुत्र दिला, व ती स्वतः गुप्त झाली. मुनीनेंही अनायासानें मिळालेल्या त्या पुत्राचें मोठया आनंदानें ग्रहण केलें; व रश्मिमान् असें त्याचें नांव ठेविलें. त्याला लहानाचा थोर केलें, व योग्य वेळीं उपनयन करून त्यानें त्यास प्रेमानें सर्व विद्या शिकविल्या. तोच हा मुनिपुत्र रश्मिमान् आहे, असें जाण. हा श्रीचा पुत्र माझ्यासहवर्तमान, विहार करीत येथें आला आहे."

इतकें बोलून त्याच्या मित्रानें प्रश्न केला असतां, माझ्या सखीनेंही मीं आतां सांगितलेलेंच माझें नांव, गोत्र, इत्यादि सर्व त्याला कळविलें. नंतर एकमेकांचे वंश परस्परांस कळल्यामुळें, आम्हीं दोघेंही परस्परांच्या प्रेमामध्यें जो आसक्त होत आहों; तों माझी दुसरी एक सखी घरून एकाएकीं मजजवळ आली, व 'गडे चल; तुझा बाप भोजनाच्या स्थानीं तुझी वाट पहात बसला आहे.' असें सांगूं लागली. त्याबरोबर–'मी आतां येतें, तोंपर्यंत आपण येथेंच रहा' असें सांगून व त्या मुनिपुत्राला तेथें बसवून मी भीतीनें पित्यापाशीं आलें. तेथें थोडासा आहार करून मी जों बाहेर येत आहें, तों माझी ती पहिली सखी मजजवळ येऊन हळूच म्हणाली,–'सखे, त्या मुनिपुत्राचा मित्र येथें आला आहे. तो बाहेरच्या अंगणद्वारांत उभा असून, मोठया त्वरेनें मला म्हणाला,–"रश्मिमानानें आपल्या पित्याची आकाशगति देऊन मला मनोरथप्रभेकडे पाठविलें आहे, मदनानें त्याची दुर्दशा करून सोडली आहे. या प्राणेश्वरीवांचून तो एक क्षणभरसुद्धां प्राण धारण करण्यास समर्थ नाहीं." तें ऐकतांच मी तशीच निघालें, व माझी सखी आणि पुढें चालणारा तो मुनिपुत्र–मित्र, यांसहवर्तमान या स्थळीं आलें. पण येथें

येऊन पहातें तों माझ्या विरहानें चंद्रोदय होतांच प्राणोत्क्रमण झाल्या-कारणानें तो चेष्टारहित होऊन पडला आहे, असें माझ्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्या मुनिपुत्राच्या वियोगानें आर्त झालें; व त्याचें शरीर घेऊन अग्नींत प्रवेश करण्याची इच्छा करूं लागलें.

तों इतक्यांत एक तेजःपुंजाकार पुरुष आकाशांतून उतरला, व त्याच्या शरीरास घेऊन पुनः अंतरिक्षांत उडून गेला. तेव्हां मी एकटीच अग्नींत प्रवेश करण्यास तयार झालें आहें, असें पाहून आकाशवाणी मला म्हणाली,–' मनोरथप्रभे, असें साहस करूं नको. कांहीं कालानें या मुनिपुत्राशीं तुझा पुनः समागम होईल. ' तें ऐकून मीं मरणाचा निश्चय सोडला, व त्या कालाची प्रतीक्षा करीत आशा धरून शंकराच्या पूजनांत तत्पर होऊन, येथें राहिलें आहें. तेव्हांपासून त्या मुनिपुत्राचा सुहृत्‌ही मला दिसला नाहीं; तोही कोठें नाहींसा झाला !

त्या विद्याधरीचें हें वर्तमान ऐकून सोमप्रभ म्हणाला,–' पण तूं येथें एकटीच कां राहिली आहेस ! तुझी ती सखी कोठें गेली ! ' तें ऐकून विद्याधरकन्या म्हणाली,–'सिंहविक्रम या नांवाचा एक विद्याधरेश्वर आहे. त्याची मकरन्दिका या नांवाची एक अतिप्रिय कन्या आहे. ती माझी प्राणासारखी प्रिय सखी असून, ती अद्यापि कन्याच ( अविवाहित ) राहिली आहे. ती माझ्या दुःखानें दुःखित झाली आहे. माझी वार्ता जाणण्याकरितां, तिनें आज येथें आपली सखी पाठविली होती, म्हणून मीही तिच्या सखीबरोबर आपल्या सखीला, तिच्याकडे पाठविलें आहे; त्यामुळें मी आतां येथें एकटीच आहें.'

मनोरथप्रभा इतकें सांगत आहे, तोंच तिची सखी आकाशांतून खालीं उतरूं लागली. तेव्हां मनोरथप्रभेनें सोमप्रभाला ती आपली सखी आकाशांतून उतरत असतांनांच दाखविली. जवळ आल्यावर सखीनें मकरंदिकेची वार्ता सांगितली. ती ऐकून विद्याधर–कन्येनें सखीकडून सोमप्रभाची शय्या तयार करविली. त्याच्या घोड्याला गवत घालविलें व ती रात्र सुखानें घालवून सकाळीं तीं सर्वजणें उठलीं. तों आकाशांतून एक विद्याधर उतरून येत आहे असें त्यांना आढळलें. त्याचें नांव देवजय असें होतें. जवळ येतांच तो नमस्कार करून बसला, व

मनोरथप्रभेस म्हणाला, "मनोरथप्रभे, तुला राजा सिंहविक्रमानें असें सांगण्याकरितां पाठविलें आहे कीं, तुझा विवाह होईतों आपलाही विवाह करून घ्यावयाचा नाहीं, असा आग्रह धरून मकरंदिका बसली आहे. तुझ्यावरील स्वाभाविक स्नेहामुळें ही तुझी सखी विवाहाची इच्छा करीत नाहीं. आम्ही पुष्कळ सांगून पाहिलें. यास्तव तूं स्वतः येऊन हिला बोध कर, म्हणजे ती विवाह करण्यास प्रवृत्त होईल."

देवजयानें सांगितलेला हा निरोप ऐकून सखीवरील प्रेमामुळें तिच्याकडे जावयास तयार झालेल्या विद्याधर-कन्येस राजा सोमप्रभ म्हणाला,– 'हे निष्पाप कन्ये, विद्याधरांचा लोक पहाण्याची मला फार इच्छा आहे, यास्तव मलाही तेथें ने. ज्याच्यापुढें पुरेसें गवत घातलें आहे, असा हा माझा घोडा येथेंच राहूं दे.' ही त्याची प्रार्थना मनोरथप्रभेनें मान्य केली, व त्याला देवजयाच्या मांडीवर बसवून सखीसह ती आकाशमार्गानें निघाली. योग्य समयीं सिंहविक्रम राजाच्या नगरांत जाऊन पोंचतांच मकरंदिकेनें तिचें आतिथ्य केलें, व सोमप्रभाला पाहून 'हा कोण?' असा हळूच प्रश्न केला. तेव्हां मनोरथप्रभेनें तिला त्याचा सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकतांच मकरंदिकेचें सर्व चित्त तत्काल सोमप्रभावर बसलें, तोही साक्षात् लक्ष्मीसारख्या तिला पाहून 'कोण महा पुण्यवान् हिचा वर होणार आहे, कांहीं कळत नाहीं,' असें हळूच मनांत म्हणाला. नंतर हळू हळू गोष्टी सांगत असतांना मनोरथप्रभा मकरंदिकेला म्हणाली, 'गडे, तूं आपल्या विवाहाची इच्छा कां करीत नाहींस?' यावर मकरंदिका म्हणाली, 'गडे, तूं माझी प्राणाहून प्रिय असलेली मैत्रीण, तेव्हां तुझा विवाह झाल्यावांचून मी आपला विवाह कसा करून घेऊं?'

मकरंदिकेनें असें मोठ्या प्रेमानें म्हटलें असतां मनोरथप्रभा म्हणाली,–'गडे, मी वराला वरलें आहे. केवल त्याच्या समागमाची वाट पहात आहें.' तें ऐकतांच मकरंदिका म्हणाली–'तर मग तूं सांगशील तसें मी वर्तन करीन.' तेव्हां तिचा सर्व अभिप्राय ओळखून मनोरथप्रभा म्हणाली,–'सखे, हा सोमप्रभ सर्व पृथ्वीभर पर्यटन करून आज तुझ्या येथें अतिथिरूपानें आला आहे. यास्तव हे सुंदरि, तूं याचा अतिथिसत्कार करावास.' मकरंदिका म्हणाली,–'सखे, या शरीरा-

पर्यंत मी हें सर्व यावेळीं याला अर्पण करण्याकरितां अर्घ्यपात्रांत घातलें आहे, त्यांतील काय पाहिजे असेल तें हा स्वच्छेनें घेवो.'

तिच्या तोंडचे हे शब्द ऐकून मनोरथप्रभेनें सोमप्रभावरील तिची प्रीति तिच्या पित्याला कळविली व विवाहाची तयारी करावयास सांगितलें. पण इतक्यांत विवाह–निश्चयानें संतुष्ट झालेला सोमप्रभ, मनोरथप्रभेला म्हणाला,–' सुंदरि, मी आतां अगोदर तुझ्या आश्रमास जातों. कारण मंत्र्यांसह, सर्व सैन्य माझा माग काढीत कदाचित् तेथें आलें असेल व माझा घोडा मात्र असून मी नाहीं, असें पाहून माझ्या अहिताची शंका येऊन तें परत जाईल, यास्तव; आतां अगोदर तेथें जाऊन व निश्चय करून परत आल्यावर शुभ दिवशीं मी या मकरंदिकेशीं विवाह करीन.' तें त्याचें सयुक्तिक भाषण ऐकून व त्याच्या म्हणण्यास अनुमोदन देऊन मनोरथप्रभा पूर्वींप्रमाणेंच देवजयाच्या मांडीवर बसवून त्याला आपल्या आश्रमास घेऊन आली.

तों त्या सोमप्रभाचा मंत्री प्रियकर सैन्यासह आपल्या राजाला शोधीत तेथें आला होता. त्याला भेटून सोमप्रभ मोठ्या आनंदानें आपला वृत्तांत सांगत आहे, तोंच त्याच्या पित्याचा लेख घेऊन एक दूत आला. त्यांत ' शीघ्र परत यावें ' अशी आज्ञा होती. ती शिरसा मान्य करून व सचिवाच्या अनुमतीनें सैन्य बरोबर घेऊन सोमप्रभ आपल्या नगरीस जावयास निघाला. जातांना त्यानें मनोरथप्रभा व देवजय यांस ' मी आपल्या बाबांना भेटून सत्वर परत येतों ' असें सांगितलें होतें. सोमप्रभ निघून गेल्यावर देवजय मकरंदिकेकडे परत आला व त्यानें सोमप्रभ आपल्या पित्याला भेटण्याकरितां गेला आहे, असें सांगितलें. तें ऐकून मकरंदिका विरहातुर झाली. उद्यानामध्यें तिचें मन रमेना, गायन ऐकावेसें वाटेना, व सखीजनांचा सहवास आवडेना. पोपटाच्या विनोद करणाऱ्या वाणीहि तिला ऐकवेनात. तिनें आहारही सोडला, मग मंडनादिकांची गोष्ट तर दूरच राहिली. तिची ही अवस्था पाहून तिच्या आईबापांनीं तिला पुष्कळ बोध केला, पण तिचें मन स्वस्थ होईना. मातापितरांस उद्विग्न करणारी ती–कमलपत्रांची शय्या सोडून, वेड्यासारखी इतस्ततः भटकूं लागली. आई-

बापांनीं तिची परोपरीनें समजूत घातली, अनेक उपायांनीं तिचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. तेव्हां सिंहविक्रम व त्याची भार्या यांनां तिचा मोठा राग आला. त्यांनीं तिला-'याच शरीरानें निष्कांचन निषादांमध्यें कांहीं काल जाऊन राहशील, पण तुला या जन्माची आठवण राहणार नाहीं,' असा शाप दिला.

त्याबरोबर मकरंदिका निषादाच्या येथें जाऊन निषाद-कन्या झाली. त्यामुळें सिंहविक्रम विद्याधरेश व त्याची पत्नी यांनां मोठें दुःख व पश्चात्ताप झाला आणि तीं दोघेंही मरण पावलीं. तो विद्याधरेंद्र प्रथम सर्व शास्त्रार्थवेत्ता ऋषि झाला. नंतर कांहीं अवशिष्ट राहिलेल्या पापदोषामुळें शुक झाला. त्याचप्रमाणें त्याची भार्या अरण्यसूकरी (रान डुकरीण) झाली. तो हा शुक पूर्वी अध्ययन केलेलें सर्व तपोबलानें जाणतो. याची ही अशी विचित्र कर्मगति पाहून मी हंसलों. हा आपली कथा राजसभेमध्यें सांगून मुक्त होईल. सोमप्रभ, आकाशचर योनींत जन्म घेतल्यावर याच्या निषाद-कन्या झालेल्या मकरंदिकेला प्राप्त होईल. मनोरथप्रभाही सांप्रतकाळीं राजा झालेल्या त्या रश्मिमान् मुनिपुत्राला तेव्हांच प्राप्त होईल. सोमप्रभही पित्याकडे येऊन व त्याचें दर्शन घेऊन पुनः मनोरथप्रभेच्या आश्रमास जाऊन प्रियेच्या प्राप्तीकरितां शंकराची आराधना करीत बसला आहे.

इतकी कथा सांगून पुलस्त्य मुनि स्वस्थ बसला; व मला तत्काल पूर्वजन्माचें स्मरण झालें. त्यामुळें माझें चित्त हर्ष व शोक यांनीं भरून गेलें. नंतर ज्या मरीचिमुनीनें मला कृपेनें त्या आश्रमाला नेलें होतें, त्यानेंच मला तेथें वाढविलें. कांहीं दिवसांनीं मला पंख फुटले, तेव्हां पक्ष्यांच्या स्वाभाविक चापल्यास अनुसरून आपलें विद्याश्चर्य दाखवीत मी इतस्ततः परिभ्रमण करूं लागलों. शेवटीं निषादांच्या हातांत सांपडून तुमच्यापाशीं आलों आहें. माझें पक्षियोनिजन्य पाप क्षीण झालें आहे.

राजसभेंत अशी कथा सांगून ज्याची वाणी विचित्र आहे, असा तो विद्वान् पोपट शांत झाला असतां, तत्क्षणीं सुमन राजा आनंदाचा पूर आल्यामुळें देहभान विसरला. इतक्यांत शंभूनें संतुष्ट होऊन सोमप्रभाला

स्वप्नांत अशी आज्ञा केली.-राजन्, ऊठ सुमनोराजापाशीं जा, तेथें तुला तुझी कांता प्राप्त होईल. कारण ती आईबापांच्या शापानें मुक्तालता नांवाची निषादी झाली आहे, व या वेळीं पोपट झालेल्या आपल्या बापाला घेऊन ती त्या राजापाशीं गेली आहे. तुला पाहून तिचा शाप निवृत्त होईल, व तिला आपल्या विद्याधरीत्वाचें स्मरण होईल. त्यामुळें तुला तुमचा तो समागम, एकमेकांस ओळखल्यामुळें, अतिशय वाढलेल्या आनंदानें फारच शोभेल. याप्रमाणें भूमिपतीला सांगून भक्तकृपालु भगवान् शंकर आश्रमांत असलेल्या मनोरथप्रभेला म्हणाला,-"तुला इष्ट असलेला वर जो रश्मिमान् मुनिपुत्र तोच या वेळीं सुमन या नांवाचा राजा झाला आहे. यास्तव हे शुभे, तूं तेथें जाऊन त्याला प्राप्त करून घे. तुला पहातांच त्याला पूर्व जन्माचें स्मरण होईल."

याप्रमाणें शंकरानें स्वप्नांत पृथक् आज्ञा केल्या असतां सोमप्रभ व मनोरथप्रभा, अशीं तीं दोघेंही सुमनो राजाच्या सभेंत गेलीं. तेथें सोमप्रभाचें दर्शन होतांच मकरंदिकेला आपल्या पूर्व जन्माचें स्मरण झालें. फार दिवसांनीं शापापासून मुक्त झालेल्या तिला तिचें दिव्य शरीर प्राप्त झालें, व तत्काल तिनें सोमप्रभाला दृढ आलिंगन दिलें. तेव्हां गिरिजापतीच्या प्रसादानें विद्याधर राजकन्येचा लाभ झाला असतां सोमप्रभही कृतकृत्य झाला. त्यानें साक्षात् दिव्यभोगलक्ष्मीप्रमाणेंच तिला आलिंगन दिलें. मनोरथप्रभेला पहातांच सुमनोराजालाही आपल्या पूर्व जन्माचें स्मरण झालें. त्याच वेळीं आकाशांतून खालीं आलेल्या आपल्या शरीरांत प्रवेश करून तो रश्मिमान् मुनिपुत्र झाला. नंतर फार दिवसांपासून उत्सुक झालेला तो आपल्या कांतेशीं संगत होऊन आपल्या आश्रमास गेला. सोमप्रभ राजा आपल्या प्रियेला घेऊन आपल्या नगरास गेला. शुकही पक्ष्याचें शरीर सोडून आपल्या तपानें संपादन केलेल्या धामास गेला. सारांश, हे देव, याप्रमाणें या लोकीं प्राण्यांचा दूर अंतरित झालेलाही समागम अवश्य होतो.

शक्तियशेविषयीं उत्सुक झालेला नरवाहनदत्त आपल्या गोमुख सचिवाच्या तोंडून अशी ही अद्भुत कथा ऐकून, संतुष्ट झाला.

---

## तरंग ४ था.

याप्रमाणें दोघी विद्याधरींची कथा सांगून सचिवांचा अग्रणी गोमुख नरवाहनदत्ताला पुनः म्हणाला, 'देव, कांहीं थोडेसेच, निश्चयी व दोन्हीं लोकीं हित व्हावें अशी इच्छा करणारे सामान्य स्थितींतले लोकही, कामादिकांचा वेग सहन करितात. याविषयीं एक कथा सांगतों.'

### १. शूरवर्म–कथा.

"शूरवर्म या नांवाचा एक कुलपुत्र होता. तो कुलधर नांवाच्या राजाचा सेवक असून त्याचा पराक्रम प्रख्यात होता. तो एकदां परगांवाहून आला व निशंकपणें आपल्या घरांत गेला. तों आपली भार्या आपल्याच मित्राशीं स्वैर रीतीनें संगत झाली आहे, असें त्याला आढळलें. पण त्यानें आपल्या क्रोधाचें धैर्यानें नियमन करून मनांत असा विचार केला,–'या पशूसारख्या मित्रद्रोह करणाऱ्या दुष्टाला मारून मला काय मिळणार? किंवा या पापी दुराचारिणीचा निग्रह करून तरी मला कोणता लाभ होणार? कांहीं नाहीं. उलट यांना शिक्षा केल्यास मी यांच्या पापाचा भागीदार मात्र होईन!' असा प्रौढ विचार करून तो त्या दोघांस म्हणाला,–"तुम्हीं दोघेंही येथून आपापलीं काळीं तोंडें घेऊन निघून जा. तुमच्यापैकीं एकही कोणी जर पुनः माझ्या दृष्टीस पडलें तर मी त्याला मारून टाकीन. यास्तव माझ्यासमोर पुनः येऊं नका." याप्रमाणें त्या व्यभिचारिणी स्त्रीस घालविल्यानंतर शूरवर्म्यानें दुसऱ्या स्त्रीशीं विवाह करून सुखानें काल घालविला." याप्रमाणें हे देव, ज्यानें क्रोधाला जिंकलें आहे, तो दुःखास्पद होत नाहीं. बुद्धिमानाला विपत्ति पीडा देऊं शकत नाहीं. पशुपक्ष्यादि तिर्यग्योनींतील प्राण्यांनाही बुद्धिच श्रेयस्कर होते, नुसता पराक्रम नाहीं,* याविषयीं सिंहादिकांची कथा ऐका:—

---

* एवं देव जितक्रोधो न दुःखस्यास्पदी भवेत् ।
कृतप्रज्ञश्च विपदा देव जातु न बाध्यते ।
तिरश्चामपि हि प्रज्ञा श्रेयसे न पराक्रमः ॥

## २. सिंहादिकांची कथा.*

एका नगरांत एक श्रीमान् वणिक् होता. तो एकदां व्यापाराकरितां मथुरानगरीस जात असतां त्याचा भरलेला गाडा ओढणाऱ्या बैलांतील एक संजीवक नांवाचा बैल जूं मोडल्यामुळें व दलदलीच्या जागीं पाय निसरल्यामुळें खालीं पडला, त्याकारणानें त्याच्या अंगाचा खुर्दा झाला. त्याचें सर्व अंग ठेंचलें. तो बिचारा बैल मूर्च्छित होऊन पडला. त्याच्या व्यापारी धन्यानें त्याला शुद्धीवर आणण्याचा बराच प्रयत्न केला, पण तो व्यर्थ झाला. शेवटीं त्याविषयीं निराश होऊन तो वैश्यपुत्र त्याला तेथेंच सोडून गेला; पण आयुष्य संपलें नसल्यामुळें व दैव अनुकूल असल्यामुळें कांहीं वेळानें संजीवक सावध झाला. हळू हळू उठला व कोंवळें कोंवळें गवत खाल्यावर त्याला जरा बरें वाटलें. पुढें तो यमुनेच्या तीरीं गेला, व तेथील हिरवें गवत खाऊन स्वच्छंदानें संचार करूं लागला असतां पुष्ट व बळकट झाला. त्याच्या पाठीवरील वशिंड पुष्कळ वाढलें; त्याला मस्ती आली, व शंकराच्या नंदीप्रमाणें दिसणारा, तो शिंगांनीं नदीच्या कांठची माती उकरीत, वारंवार डुरकण्या फोडूं लागला.

त्या वेळीं तेथील जवळच्याच वनांत एक पिंगलक नांवाचा सिंह रहात होता. त्यानें आपल्या पराक्रमानें तें अरण्य आपलेंसें करून सोडलें होतें. त्या मृगराजाचे दोन कोल्हे मंत्री होते. त्यांतील एकाचें नांव दमनक व दुसऱ्याचें नांव करटक होतें. एकदां तो सिंह पाणी पिण्याकरितां यमुनेच्या तीरावर जात होता, तेव्हां जवळच झालेला संजीवक बैलाचा नाद त्याच्या कानीं पडला. चारी दिशांमध्यें घुमणारा व पूर्वीं कधीं न ऐकलेला असा तो घोर नाद ऐकून सिंह मनांत विचार करूं लागला, कीं, 'ही अशा प्रकारची गर्जना कोणाची बरें असावी ? खचित येथें कोणी तरी बलाढ्य प्राणी रहात असावा. तो मला पहातांच मारील किंवा घालवून देईल.' अशा प्रकारें भ्यालेला तो पिंगलक सिंह पाणी न पितांच वनांत शिरला, व आपली भीति आपल्या सेवकांना समजूं नये म्हणून तो आपल्या मुखचर्येवर कांहीं परिणाम न होऊं देतां स्वस्थ बसला.

---

* हीच कथा हितोपदेशाच्या सुहृद्भेद या नांवाच्या दुसऱ्या प्रकरणांत आहे.

पण त्याचा दमनक या नांवाचा जो मुख्य मंत्री होता, तो एकांतांत करटक नांवाच्या दुसऱ्या मंत्र्याला म्हणाला,–' आमचा स्वामी पाणी प्यावयास गेला होता; पण तो तें न पितांच सत्वर परत आला; तेव्हां याचें कारण त्याला विचारलें पाहिजे.' त्यावर करटक म्हणाला,–' आम्हांला या भानगडींत पडून काय करावयाचें आहे ? ' पाचर उपटणाऱ्या वानराचा वृत्तांत तूं ऐकला नाहींस का ?'

## १. खुंटी उपटणाऱ्या वानराची उपकथा.

एका नगरांत कोणा एका वाण्यानें देवालय बांधण्यास आरंभ केला; व त्याकरितां पुष्कळ लांकडें जमविलीं. चिरकाम करणारे लोक त्यांतील कांहीं काष्ठें कापूं लागले. एकदां त्यांतील एक मोठें लांकुड अर्धेंच कापून व त्यांत पाचर ठोकून, ते कामकरी घरीं जेवावयास गेले. इतक्यांत एक मोठा हुपट उड्या मारीत तेथें आला. पाचरीमुळें कापलेल्या लांकडाचें तोंड पसरलें होतें; तरी तो मृत्यूच्या उघडलेल्या तोंडासारख्याच त्यावर बसला; व कांहीं प्रयोजन नसतांना, ती पाचर दोन्ही हातांनीं उपटूं लागला. तेव्हां ती खुंटी अकस्मात् वर उडाली व चिरलेल्या लांकडाचें तोंड मिटलें. त्याबरोबर त्या मूर्ख पशूचें नाजुक अंग त्यांत गेलेलें असल्यामुळें तें चिरडून तो मेला.

यास्तव ज्याचें जें काम नव्हे, तें त्यानें करूं नये. कारण तें करूं लागल्यास असा विनाश होतो.* सारांश, सिंहाचा आशय जाणून आम्हांला काय करावयाचें आहे. करटकाचें हें म्हणणें ऐकून; बुद्धिमान् दमनक म्हणाला,–शहाण्यांनीं प्रभूच्या गुह्य कारस्थानांत शिरून, सदा विशेष संपादन करावा. केवळ उदरभरण कोण करीत नाहीं !† तें ऐकून साधु करटक पुनः म्हणाला,–'आपल्या इच्छेनें मर्यादेच्या बाहेर जाणें, हा सेवकाचा धर्म नव्हे,'‡ पण त्यावर दमनक म्हणाला,–' छे, असें बोलूंही नकोस. प्रत्येक प्राणी आपल्या योग्यतेप्रमाणें फळाची इच्छा करीत असतो. कुत्रा एका हाडा-

---

* एवं न यस्य यत् कर्म स तत्कुर्वन्विनश्यति ।

† कोहि नाम न कुर्वीत केवलोदरपूरणम् ।

‡ स्वेच्छयातिप्रवेशो यो न धर्मः सेवकस्य सः ।

नेंच संतुष्ट होतो व सिंह हत्तीवर धांवतो.* तें ऐकून करटक म्हणाला,— पण आपण त्याला विचारलें व तो स्वामी आपल्यावर रागावला; तर त्यांत कोणता लाभ आहे? ईश्वर (प्रभु, राजे) पर्वतांप्रमाणें अतिशय कर्कश, स्तब्ध, हिंस्रप्राण्यांनीं आवृत्त, दुरासद व विषम असतात.' त्यावर दमनक म्हणाला,—' खरें आहे; पण शहाणा आपल्या अभिप्रायानुरूप स्वामीच्या मनांत युक्तीनें प्रवेश करून, त्याला आपलासा करून घेतो.'

दमनकाचा हा असा अत्याग्रह पाहून,—' बरें तर तुला उचित दिसेल तसें कर.' असें करटकानें सांगितलें. नंतर दमनक आपल्या सिंह-स्वामीकडे गेला. जवळ जातांच प्रणाम करून बसला, व ज्यानें सत्कार केला आहे, अशा आपल्या पिंगलकस्वामीस तो तत्काल अशी विनंति करूं लागला,—'हे देव! मी तुमचा वंशपरंपरागत व हितकर सेवक आहें. हितकर असलेला परका प्राणीही संग्राह्य, व अहित करणारा आपला आप्तही त्याज्य असतो.† हितकर असलेलें मांजर दुसऱ्यापासून पैसे देऊन, विकत घेऊनही घरांत बाळगितात; व आपल्याच घरांत जन्मास आलेल्या पण अहित करणाऱ्या उंदराला मारवितात. ऐश्वर्याची इच्छा करणाऱ्या प्रभूनें हितैषी सेवकांचेंही म्हणणें ऐकावें. प्रभूनें आज्ञा केलेली नसली, तरी सेवकांनीं प्रसंगी त्याचें हित करावें,§ अशी नीति आहे. यास्तव हे प्रभो! मजवर जर आपला विश्वास असेल, आपण जर रागा-वत नसाल व नाहीं म्हणत नसाल, तर मी आपल्याला कांहीं विचारणार आहें. पण आपण उद्विग्न होणार असाल, तर मी आपला स्वस्थ बसतों.

मंत्र्याचें हें भाषण ऐकून पिंगलक म्हणाला,—' दमनका, तूं विश्वासास पात्र व भक्त आहेस. यास्तव निःशंकपणें काय तें विचार.' प्रभूचें हें

---

* श्वा तुष्यत्यस्थिमात्रेण केसरी धावति द्विपे।

† हितः परोऽपि स्वीकार्यो हेयःस्वोऽप्यहितः पुनः।

§ क्रीत्वान्यतोऽपि मूल्येन मार्जारः पोष्यते हितः।
अहितो हन्यते यत्नाद् गृहजातोऽपि मूषकः॥
श्रोतव्यं च हितैषिभ्यो भृत्येभ्यो भूतिमिच्छता।
अपृष्टैरपि कर्तव्यं तैश्च काले हितं प्रभोः॥

उत्तम वचन ऐकून दमनक म्हणाला,–' देव, आपण तृषित होऊन, पाणी पिण्याकरितां गेलां होतां, पण तें न पितांच परत येऊन, असे खिन्नचित्त होऊन कां बसलांत ?' त्या शहाण्या मंत्र्याचा हा प्रश्न ऐकतांच, सिंह मनांत म्हणाला,–' यानें माझा अभिप्राय ताडला आहे. तेव्हां आतां या भक्तापासून तो लपवून ठेवण्यांत काय अर्थ आहे ?' असा विचार करून तो उघड म्हणाला,–' त्यांत गुप्त असें कांहींच नाहीं. पाहिजे तर सांगतों ऐक. मी जलाच्या अगदीं समीप गेलों असतां, एक अपूर्व नाद ऐकला. तो उग्र ध्वनि आमच्यापेक्षां अधिक बलाढ्य अशा एकाद्या प्राण्याचा असावा, असा माझा तर्क आहे. त्याच्या त्या गर्जनेवरून तो कोणी महाप्राणी असावा, याविषयीं तर मला मुळींच शंका वाटत नाहीं. प्रजापतीचा प्राणिसर्ग उत्तरोत्तर अधिक व विचित्र आहे. तो येथें प्रविष्ट झाला म्हणजे मग माझें शरीरही नाहीं व वनही नाहीं, असें होणार ! यास्तव, तो येण्यापूर्वीच येथून दुसऱ्या एकाद्या अरण्यांत निघून जावें असा मी विचार करीत आहें.

मृगराजाचें हें अधैर्याचें भाषण ऐकून दमनक म्हणाला,–'हे देव ! स्वतः शूर असतांना, एवढ्याशा कारणानें वन सोडण्याची इच्छा करितां, हें काय ! पाण्याच्या ओघानें सेतु ( बांध, धरण ) फुटतो, चहाड्यांनीं स्नेह कमी होतो, गुप्त न ठेवल्यास मंत्र बाहेर फुटतो, व भितरा नुसत्या ध्वनींनेंच घाबरतो.* याविषयीं मी एक कथा सांगतों; ती ऐका.—

### ४. नगारा व कोल्हा यांची उपकथा.

पूर्वी एका वनांत एक कोल्हा होता. तो एकदां भक्ष्य हुडकीत फिरत असतांना, नुकतेंच युद्ध होऊन गेलेल्या एका जागीं गेला. तों त्याला तेथें एका बाजूनें गंभीर ध्वनि ऐकूं आला. त्याबरोबर तो भ्याला; पण हा कशाचा ध्वनि आहे, हें कळावें म्हणून त्यानें जिकडून तो आला होता तिकडे पाहिलें. तों त्याला एकीकडे पडलेली एक दुंदुभी

---

* जलेन भज्यते सेतुः स्नेहः कर्णजपेन तु ।
अरक्षणेन मन्त्रश्च शब्दमात्रेण कातरः ॥

दिसली. तेव्हां हा अशा प्रकारचा शब्द करणारा कोणी प्राणीच आहे कीं काय, असें म्हणून, व ती दुंदुभी कांहींच हालचाल करीत नाहीं असें पाहून, तो तिच्याजवळ गेला. त्याबरोबर हा कोणी सजीव प्राणी नसून निर्जीव नगारा आहे व वायूनें हालणाऱ्या शर संज्ञक गवताच्या काड्यांचा त्याच्या चामड्यावर प्रहार झाल्यामुळें तो वाजत आहे, असें जाणून कोल्हा निर्भय झाला. नंतर यांत कांहीं भक्ष्य असेल अशा लोभानें त्यानें त्याच्यावरील चामडें फाडलें व आंत शिरून पहातो तों त्याला लांकूड व वाळलेलें चामडें यांवाचून कांहीं सांपडलें नाहीं.'

'यास्तव, हे देव, नुसत्या शब्दानें आपल्यासारखे शूर भीत नाहींत. आपली इच्छा असेल तर तो कोणाचा शब्द आहे, हें पहावयास मी जातों.' दमनकाचें हें भाषण ऐकून,–'तुझ्या अंगांत सामर्थ्य असेल तर जा.' असें पिंगलक म्हणाला,–व ती आज्ञा शिरसा मान्य करून दमनक यमुनातीरीं गेला. जिकडून तो शब्द येत होता, तिकडे हळूहळू गेल्यावर गवत खाणाऱ्या बैलाला त्यानें पाहिलें. त्याच्यापाशीं जाऊन त्यानें संकेत केला, व सिंहाकडे येऊन खरें वर्तमान सांगितलें. तेव्हां पिंगलक म्हणाला,–'त्या महा वृषभाला जर तूं खरेंच पाहिलें आहेस व त्याच्याशीं स्नेह केला आहेस, तर युक्तीनें त्याला येथें आण जा बरें; पाहूं या तर खरें तो कसकासा आहे तें?' असें बोलून अतिशय हृष्ट झालेल्या सिंहानें दमनकाला पुनः संजीवकाकडे पाठविलें. तेव्हां तो त्याच्याकडे जाऊन म्हणाला,–'आमचा स्वामी मृगाधिप संतुष्ट होऊन तुला भेटावयास बोलावीत आहे; तर चल, वृषभेश्वरा;' व पण संजीवक भयानें त्याचें म्हणणें मान्य करीना. तेव्हां दमनक पुनः वनांत परत आला. त्यानें आपल्या स्वामीकडून त्याला अभय देवविलें, व पुनः संजीवकाकडे जाऊन आणि त्याला विश्वास दाखवून सिंहापाशीं आणलें. जवळ येतांच प्रणाम केलेल्या त्याच्याकडे पाहून सिंहानें त्याचा चांगला सत्कार केला, व म्हटलें, 'तूं आतां निर्भयपणें येथेंच माझ्या आश्रयानें रहा.' त्यावर 'बरें आहे,' असें म्हणून संजीवक सिंहापाशीं राहूं लागला. पुढें क्रमानेंच त्या बैलानें आपल्या अंगच्या गुणांनीं सिंहाचें चित्त आकर्षण करून घेतलें. त्यामुळें तो केसरी अन्य भृत्यांपासून विन्मुख होऊन त्याच्या अधीन झाला.

तें पाहून खिन्न झालेला दमनक करटकाला एकांतांत म्हणाला,— "पहा, संजीवकानें वश करून घेतलेला हा स्वामी आतां आम्हांकडे पहातही नाहीं. सर्व मांस एकटाच खाऊन टाकतो. आम्हांला त्यांतला तुकडाही देत नाहीं. हा आमचा मूढबुद्धि स्वामी, बैल सांगेल त्याप्रमाणें हल्लीं वागूं लागला आहे. पण हा सर्व माझाच अपराध आहे. मी त्याला येथें आणलें हेंच मुळीं चुकलें. यास्तव आतां हा मूर्ख बैल मरेल अशी कांहीं युक्ति योजतों; म्हणजे आमचा प्रभु या अस्थान व्यसनापासून आपोआप निवृत्त होईल."

दमनकाच्या तोंडचें हें पश्चात्ताप-वचन ऐकून करटक म्हणाला,—मित्रा; आतां तुला सुद्धां हें करतां येणें शक्य नाहीं.' पण त्यावर दमनक म्हणाला,—'मी आपल्या बुद्धीनें खचित हें घडवून आणीन. आपत्समयींही ज्याची प्रज्ञा कुंठित होत नाहीं तो काय इच्छे तें इष्ट कार्य घडवून आणूं शकतो.* या विषयीं बगळ्याला मारणाऱ्या एका मकराची‡ कथा मी सांगतों ती ऐक—'

### ५. बगळा व मकर यांची उपकथा.

माशांनीं भरलेल्या एका सरोवरापाशीं पूर्वी एक बगळा रहात होता; पण त्याला पहातांच मासे भिऊन त्याच्या डोळ्यांपुढून पळून जात, त्यामुळें त्याला ते खावयास सांपडत नसत. म्हणून तो त्यांना म्हणाला,— "आतांच येथें एक माशांना धरणारा जाळेवाला आला होता; तो लवकरच तुम्हां सर्वांना जाळ्यांत धरून मारील. यास्तव मजवर विश्वास असल्यास मी सांगतों तसें करा. एकान्त स्थळीं एक मोठें स्वच्छ जलाचें सरोवर आहे, तें धीवरांनीं अद्यापि पाहिलेलें नाहीं. यास्तव मजबरोबर चला; म्हणजे मी तुम्हांपैकीं एकेकाला तेथें नेऊन टाकीन." तें ऐकून ते जडबुद्धि मासे भयभीत झाले; व 'बरें तर असेंच कर. आम्हीं तुजवर पूर्ण विश्वास ठेविला आहे.' असें त्याला म्हणाले. नंतर तो धूर्त बक

---

* न स शक्नोति किं यस्य प्रज्ञा नापदि हीयते ।

‡ येथें मकर म्हणजे खेंकडा असें समजावयाचें; कारण मकर म्हणजे नक्र असें समजल्यास अर्थसंगति लागत नाहीं. हितोपदेशांत हीच कथा आहे व त्यांत खेंकड्याचें स्पष्ट नांव आहे.

त्यांतील एकेका माशाला नेऊन व थोड्याशा अंतरावर असलेल्या शिलेवर ठेवून खाऊं लागला, याप्रमाणें त्यानें पुष्कळांस फसवून मारिलें.

पण तो रोज येथील माशांना नेत आहे असें पाहून, त्या सरोवरांतील एक मकर 'यांना तूं कोठें नेतोस,' म्हणून विचारूं लागला. तेव्हां त्या लबाडानें माशांना जें सांगितलें होतें तेंच त्यालाही सांगितलें. तें ऐकून भ्यालेला तो मकरही त्याला म्हणाला,—'तर मग कृपा करून मलाही घेऊन चल.' तेव्हां त्याच्या मांसाची ज्याला इच्छा झाली आहे, असा तो बक त्याला घेऊन निघाला. पण त्याला त्या मारण्याच्या शिलेपाशीं नेत आहे तों, तेथें पडलेलीं माशांचीं हाडें पाहून मकरानें त्याची लबाडी ओळखिली; व हा आतां आपल्यालाही मारणार, असें जाणून, तत्काल त्या बुद्धिमानानें त्याची मान आपल्या तीक्ष्ण दांतांनीं तोडली. नंतर हळू हळू आपल्या सरोवरांत परत येऊन त्यानें तें घातुक वर्तमान माशांना सांगितलें. तेव्हां तेही सर्व, प्राण वांचविणाऱ्या त्याचें मोठ्या आनंदानें अभिनंदन करूं लागले. सारांश, प्रज्ञा (बुद्धि) हेंच बल आहे. ज्याला प्रज्ञाच नाहीं, त्याच्या बलाचा काय उपयोग? याविषयीं सिंह व ससा यांची एक कथा आहे, ती ऐक'—

## ६. सिंह व ससा यांची उपकथा.

एका वनांत एक महावीर सिंह होता. तो कधींही कोणाकडून पराभूत होत नसे. तो ज्या ज्या प्राण्याला पाही, त्याला त्याला तत्काल मारी तेव्हां हरणादि सर्व पशूंनीं मिळून त्याची प्रार्थना केली; कीं, 'प्रभो, तुझ्या आहाराकरितां प्रति दिवशीं आम्ही एक एक पशू पाठवीत जाऊं, त्याला खावून तूं तृप्त व्हावेंस. आम्हां सर्वांना एकदांच मारून आपल्या स्वार्थाची हानि कां करून घेतोस?' सिंहानें हें त्याचें युक्त वचन मान्य केलें. त्या दिवसापासून रोज एकेक पशु त्याच्याकडे येऊं लागला व त्याला खाऊन सिंह स्वस्थ राहूं लागला. कांहीं दिवसांनीं एका सशाची त्याच्याकडे जाण्याची पाळी आली. त्याची इच्छा नसतांनाही सर्व पशूंनीं बलात्कारानें पाठविलेला तो बुद्धिमान् विचार करूं लागला, कीं जो आपत्समयींही मोहित होत नाहीं; तोच खरा धीर (धीमान्) होय.*

* स धीरो यो न संमोहमापत्कालेऽपि गच्छति ।

यास्तव, यावेळीं माझा अंतकाल जवळ येऊन ठेपला आहे, तरी मी एक युक्ति योजून पहातों. असा मनांत निश्चय करून तो ससा थोडा विलंब करून सिंहापाशीं गेला. तेव्हां उशीरानें आलेल्या त्याच्याकडे पाहून सिंह म्हणाला,–' अरे, माझ्या आहाराच्या वेळेचें तूं अतिक्रमण कसें केलेंस ? अरे शठा, मी तुला आतां वधापेक्षां आणखी कोणती मोठी शिक्षा देऊं ? ' हें भाषण ऐकून ससा त्या सिंहाला अगदीं नम्र होऊन म्हणाला,–' देव, यांत माझा कांहीं अपराध नाहीं; कारण मी एवढा वेळ स्वाधीन नव्हतों. मार्गांत दुसऱ्या एका सिंहानें मला बराच वेळ धरून ठेविलें होतें. त्यानें सोडलें तेव्हां मी येथें आलों.' तें ऐकतांच शेपुट फुगवून व क्रोधानें डोळे लाल करून, तो सिंह म्हणाला,–' तो कोण दुसरा सिंह आहे, तें मला तूं दाखीव !' त्यावर ' ठीक आहे, माझ्या मागून या महाराज;' असें बोलून ससा त्या मूर्ख सिंहाला दूर एका विहिरीपाशीं घेऊन गेला; व ' तो पहा, आंत बसला आहे,' असें म्हणून विहिरींत दाखवूं लागला. तेव्हां रागानें मोठी गर्जना करून सिंहही आंत पाहूं लागला. तों त्यांतील स्वच्छ जलांत पडलेलें आपलेंच प्रतिबिंब त्याला दिसलें. तें पाहून, त्यानें गर्जना केली. तों त्याच्या गर्जनेचा प्रतिध्वनि त्याला ऐकूं आला, व आंत खरोखरच दुसरा सिंह असून, तो उलट गर्जना करीत आहे, असें त्याला वाटलें. नंतर मोठ्या क्रोधानें त्याला मारण्याकरितां, त्या सिंहानें विहिरींत उडी टाकली, व तो मूढ त्यांतच मेला. याप्रमाणें तो ससा स्वतः मृत्यूच्या दाढेंतून निसटून, व दुसऱ्यांनांही सोडवून इतर पशूंकडे आला, व आपलें सर्व वर्तमान सांगून; त्यानें सर्वांना आनंदित केलें. याप्रमाणें प्रज्ञा हेंच उत्कृष्ट बल आहे; पराक्रम नव्हे. सशानेंही प्रज्ञाबलानेंच सिंहाला मारलें; यास्तव मी सुद्धां हें आपलें अभीष्ट, प्रज्ञेनेंच साधून घेतों.

दमनकानें असें सांगितलें असतां, करटक गप्प बसला. तेव्हां धूर्त दमनक अतिशय खिन्नचित्त होऊन, पिंगलक नांवाच्या आपल्या सिंहप्रभूकडे गेला. सिंहानें त्याच्या खेदाचें कारण विचारिलें असतां, तो एकांतांत हळुच म्हणाला,–" देव, एकादी अनिष्ट वार्ता ऐकल्यावर गप्प बसवत नाहीं, म्हणून सांगतों. स्वामीचें हित व्हावें अशी इच्छा अस-

त्यास भृत्यानें न विचारतांही सांगावें; अशी नीति आहे. यास्तव हे देव, विपरीत ग्रह न करितां माझी ही विज्ञप्ति ऐका. हा बैल संजीवक, तुम्हांला मारून राज्य करण्याची इच्छा करीत आहे. तुमचें मंत्रित्व प्राप्त करून घेतल्यावर तुम्ही भितरे आहां, असा त्यानें निश्चय केला आहे. तुम्हांला मारण्याची इच्छा करणारा तो आपलीं आयुधें, म्हणजे दोन्हीं शिंगें वारंवार हालवीत असतो. 'मी गवत खाणारा व त्यामुळेंच निरुपद्रवी आहें, यास्तव मी राजा झालों म्हणजे तुम्ही दीर्घकाल सुखानें नांदाल; तर या आतां, आपण युक्तीनें या मांसभक्षक मृगेंद्राला मारून टाकूं.' असें प्रत्येक वनांतील प्राण्यांना, तो विश्वास दाखवून सांगत असतो. यास्तव प्रभो, त्याच्याविषयीं आपण लवकर कांहीं विचार करा. तो जिवंत असेपर्यंत आपल्याला सुख मिळणार नाहीं.'

दमनकानें असें खोटेंच सांगितलें असतां, पिंगलक त्याला म्हणाला,–'हा मूर्ख गवत खाणारा बैल मला काय करणार? शरण आलेल्या त्याला अभय देऊन मी आतां मारूं कसा?' तें ऐकून दमनक हात जोडून म्हणाला,–'प्रभो अशी आशा करूं नका. राजाच्या बरोबरीचा एकादा झाल्यास राजलक्ष्मी राजावरच अनुरक्त होऊन रहात नाहीं. तर स्वभावतःच चपल असल्यामुळें, उच्च अवस्थेस पोंचलेल्या त्या दोघांचाही आश्रय करून रहाणारी ती शेवटीं त्यांतील एकाला अवश्य सोडते. जो प्रभु–हिताचा द्वेष करून सदा अहिताचेंच सेवन करतो त्याला विद्वानांनीं, दुष्ट रोग्याला जसे वैद्य सोडतात, त्याप्रमाणें सोडावें. प्रथम अप्रिय; पण परिणामीं हितकर असें भाषण बोलणारा व ऐकणाराही जेथें असतो, तेथें लक्ष्मी निवास करिते.* पण याच्या उलट जो संतांचा हितोपदेश न ऐकतां, असंतांच्या सांगण्याप्रमाणें चालतो, तो लवकरच विपत्तींत पडून पश्चात्ताप पावतो.‡ यास्तव हे प्रभो, या बैलावर आपला स्नेह कसला? व द्रोह करणाऱ्या त्याला दिलेल्या अभयाचा व शरणागततेचा विचार

* अप्रियस्य प्रथमतः परिणामे हितस्य च ।
वक्ता श्रोता च यत्र स्यात्तत्र श्रीः कुरुते पदम् ॥

‡ न शृणोति सतां मन्त्रमसतां च ।
शृणोति यः अचिरेण स संप्राप्य विपदं परितप्यते ॥

ध्याय करावयाचा आहे? शिवाय स्वामिन्, सतत आपल्यापाशीं अस-णाऱ्या या बैलाच्या मूत्रामध्यें व गोमयामध्यें जे किडे होतात, ते ज्याला मत्त हत्तींच्या दांतांच्या आघातांनीं व्रण झाले आहेत, अशा आपल्या शरीरांत शिरल्यास युक्तीनेंच व अनायासानें आपला वध नाहीं का होणार! विद्वान् व साधु पुरुषानें स्वतः जरी दोष न केला, तरी दुष्टाच्या संगतीनें त्याच्या दोषाचें फल साधूला भोगावें लागतें. याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐका.

### ७ ऊ व ढेंकूण यांची उपकथा.

"कोणा एका राजाच्या शयनांत (बिछान्यांत) मंदविसर्पिणी या नांवाची एक ऊ कोठूनशी येऊन फार दिवसांपासून, कोणाला न दिसतां रहात होती. एकदां वाऱ्यानें उडवून आणलेला एक टिटिभ नांवाचा ढेकूण अकस्मात् त्या शयनांत येऊन शिरला; पण त्याला पहातांच 'माझ्या रहाण्याच्या जागीं तूं कां आलास? दुसरीकडे जा.' असें मंदविसर्पिणीनें म्हटलें. तेव्हां 'बाई, आजपर्यंत कधीं न प्यालेलें राजाचें रक्त मला पिऊं दे, मजवर कृपा कर. कांहीं दिवस मला येथें राहूं दे.' असें तो टिटिभ तिला म्हणाला. त्याचा असा फारच आग्रह पाहून स्वभावतःच मृदु असलेली ऊ, 'बरें तर रहा. पण गड्या, अकालीं राजाला दंश करूं नकोस. तो निजला अथवा रतासक्त झाला म्हणजे हळूच डांस मार.' असें त्याला म्हणाली. त्यावर 'बरें आहे,' असें म्हणून टिटिभ तेथें राहिला. रात्रीं राजा शय्येवर येऊन निजतांच तो त्याला सत्वर॰ चावला. त्याबरोबर 'हाय, मला कोणी चावलें' असें म्हणून ओरडत राजा उठला. तेव्हां तो शठ ढेकूणही सत्वर पळून गेला. राजाचे सेवक गडबडीनें येऊन अंथरुणांत पाहूं लागले. तों त्यांना ती मंदविसर्पिणी ऊ सांपडली. तिला धरून त्यांनीं लगेच मारून टाकलें. याप्रमाणें दुष्ट टिटिभाच्या संसर्गामुळें निरपराधिनी ऊ जिवास मुकली." तसाच या संजीवकाचा संग तुमच्या क्षेमाला कारण होणार नाहीं. माझ्या या सांगण्यावर आपला विश्वास बसत नसेल, तर झुलास-रल्या तीक्ष्ण शिंगांच्या दर्पानें मस्तक हालवीत, तुमच्यापाशीं येणाऱ्या त्याला पाहिल्यावर माझ्या म्हणण्याचा प्रत्यय येईल. असें बोलून दमनकानें सिंहाच्या मनांत विकार उत्पन्न केला असतां, पिंगलक संजीवकाला वध्य

समजूं लागला. तो त्याचा निश्चित अभिप्राय जाणून लागलाच दमनक खिन्न होऊन संजीवकापाशीं हळू हळू गेला. त्याची ती उद्विग्न अवस्था पाहून ' मित्रा, असा कां दिसतोस ? तुझें शरीर कुशल आहे ना ?' असें बैलानें विचारलें असतां, तो धूर्त कोल्हा म्हणाला,—' सेवकाचें कुशल कसचें ? राजाचा सदा प्रिय कोण असणार ? कोणता याचक लघुतेस प्राप्त होत नाहीं, व कालाचा विषय कोण होत नाहीं ? "*

असें संदिग्ध बोलणाऱ्या त्याला संजीवक पुनः खोदखोदून विचारूं लागला, कीं–'मित्रा, तूं असा आज उद्विग्न कां ? त्याचें कारण सांग.' तेव्हां दमनक बोलला,—' ऐक, केवळ तुझ्या प्रेमानें मी हें तुला सांगत आहें. मृगराज पिंगलक आतां तुझ्या विरुद्ध झाला आहे. ज्याला कोणाची अपेक्षा नाहीं व ज्याचा स्नेह अस्थिर आहे, असा तो तुला मारून खाण्याची इच्छा करीत आहे. त्याचे व्याघ्रादि हिंस्र भृत्य त्याला नेहमीं याविषयीं प्रेरणा करीत असावे, असें मला वाटतें.'

मागच्या अनुभवावरून दमनकाचें तें म्हणणें खरें असावें, असें त्या सरळ स्वभावाच्या बैलाला वाटलें, व तो मनांत खिन्न होऊन त्याला म्हणाला,—' अरेरे धिक्कार असो; ज्याचा परिवार क्षुद्र आहे, अशा क्षुद्र प्रभूची कितीही जरी उत्तम सेवा केली तरी तो वैरी होतो.' याविषयीं एक कथा सांगतों, ती ऐक.—

## ८. सिंह व उंट यांची उपकथा.

एका वनांत मदोत्कट नांवाचा सिंह होता. व्याघ्र, कोल्हा व कावळा असे तिघे त्याचे अनुचर होते. सिंहानें एकदां पूर्वीं कधीं न पाहिलेला व आपल्या संघांतून चुकून मागे राहिलेला एक उंट पाहिला. त्याची आकृति हसूं येण्याजोगी होती. त्याला पाहून ' हा कोण प्राणी ' असें मदोत्कटानें आश्चर्यानें विचारलें. तें ऐकून अनेक देश पाहिलेला कावळा ' हा उंट आहे ' असें म्हणाला. तेव्हां सिंहानें त्याला अभय देऊन आपल्याजवळ आणविलें, व कौतुकानें त्याला आपला अनुचर करून, ठेवून

---

* किं सेवकस्य कुशलं कश्च राज्ञां सदा प्रियः ।
कोऽर्थी न लाघवं यातः कः कालस्य न गोचरः ॥

घेतलें. एकदां हत्तीशीं युद्ध करीत असतांना सिंहाला मोठे व्रण झाले, त्यामुळें तो अस्वस्थ झाला. तेव्हां त्या स्वस्थ अनुगांसह त्याला पुष्कळ दिवस उपवास करावा लागला. नंतर थोडेंसें बरें वाटतांच तो भक्ष्य मिळविण्यासाठीं पुष्कळ फिरला; पण त्याला कांहीं सांपडलें नाहीं. अगदीं थकून गेला, व उंट तेथें नसतांना एकांतांत तो आपल्या अनुचरांस 'आतां पुढें काय करावें' असें विचारूं लागला. तेव्हां ते म्हणाले, 'प्रभो, आपत्कालीं जें युक्त असेल तेंच आम्हांला सांगितलें पाहिजे. या उंटाशीं आपलें सख्य कसलें ? यालाच कां खात नाहीं ? गवत खाणारा हा आम्हां मांसभक्षकांचें भक्ष्य आहे. पुष्कळांचे प्राण वांचविण्यासाठीं एकाचा त्याग करण्यास काय प्रत्यवाय आहे ? त्याला आपण अभय दिलें आहे, तेव्हां मारावें कसें, म्हणून म्हणाल, तर आम्ही युक्तीनें त्याच्याकडूनच आपल्याला त्याचें शरीर अर्पण करवितों.'

हें त्यांचें भाषण ऐकून, सिंहानें अनुमोदन दिलें असतां, कावळा उंटाच्या वधाविषयीं संकेत करून त्याला म्हणाला, "हा आमचा स्वामी क्षुधेनें व्याकुल झाला आहे; तरी आम्हांला कांहीं बोलत नाहीं. यास्तव आपण होऊनच आतां आपलें समर्पण करूं या. आमच्याप्रमाणें तूंही त्याला आत्मसमर्पण कर, म्हणजे तो तुजवर फार प्रसन्न होईल." धूर्त कावळ्यानें भोळ्या उंटाला असें सांगितलें असतां त्यानें तें मान्य केलें. तो त्या कावळ्याबरोबर सिंहापाशीं आला. जवळ जातांच कावळा सिंहाला म्हणाला, 'प्रभो, मी तुमचा किंकर आहें, यास्तव मला खा.' पण त्यावर सिंह बोलला,–'तुझ्या एवढ्याशा शरीराला खाऊन माझी तृप्ति कशी होणार ?' तें ऐकून जंबूक म्हणाला,–'तर मग मला खाऊन आपण आपले प्राण वांचवा, पण सिंहानें त्याचेंही निराकरण तसेंच केलें. व्याघ्रही 'मला खा' असें म्हणाला. पण सिंहानें त्यालाही खाल्लें नाहीं. तें पाहून खुळा उंट 'मला खा' असें बोलला. तेंच त्याचें अनुमोदन आहे, असें समजून सिंहानें त्याचे तुकडे उडविले व त्या सर्वांनीं मिळून त्याला खाऊन टाकलें.

याच न्यायानें कोणी तरी चहाडखोरानें पिंगलकाला माझ्या विरुद्ध उठविलें असावें. त्यावांचून त्या राजाला मजवर इतका क्रोध करण्याचें कांहीं कारणच दिसत नाहीं. असो; आतां दैव प्रमाण आहे,

तें काय करील तें खरें. हंस ज्याचे सेवक व साहाय्यक आहेत, असा गृध्र राजाही पतकरतो; पण गृध्र ज्याचा अनुयायी वर्ग आहे असा हंस राजाही पतकरत नाहीं. मग इतरांची तर गोष्टच राहूं* दे.

संजीवकाचे हे उद्गार ऐकून, कपटी दमनक म्हणाला,–' धैर्यानें सर्व साध्य होतें.†' याविषयीं मी एक कथा सांगतों, ती ऐक.—

## ९. टिट्टिभांच्या जोडप्याची उपकथा.

समुद्राच्या तीरावर कोणी एक टिट्टिभ पक्षी, भार्येसह रहात होता. जिनें गर्भ धारण केला आहे, अशी त्याची सती भार्या टिट्टिभी त्याला म्हणाली,–' चल, आतां आपण दुसरीकडे कोठें जाऊं. कारण मी येथें प्रसूत झालें, तर कदाचित् हा समुद्र आपल्या लाटांबरोबर, माझीं अपत्यें नेईल.' भार्येचें हें भाषण ऐकून, टिट्टिभ तिला म्हणाला,–' समुद्र माझ्याशीं विरोध करण्यास समर्थ नाही.' त्यावर टिट्टिभी म्हणाली,– 'नाथ, हें काय ? आपण समुद्राशीं आपली तुलना कशी करितां ? एका-द्यानें केलेल्या हितोपदेशाप्रमाणें अवश्य वागावें; नाहींपेक्षां विनाश होतो. याविषयीं मी एक गोष्ट सांगतें; ती ऐका.—'

## १०. कंबुग्रीव कांसवाची गोष्ट.

एका सरोवरांत कंबुग्रीव नांवाचा कांसव होता. विकट व संकट या नावाचे दोघे हंस त्याचे मित्र होते. एकदां अनावृष्टीमुळें त्या सरोवरां-तील पाणी आटलें. तेव्हां दुसऱ्या सरोवरांत जाण्याची इच्छा करणाऱ्या त्या दोघां हंसांना कूर्म म्हणाला,–' तुम्ही जेथें जावयास निघाला आहां, तेथें मलाही न्या.' तें ऐकून हंस, कूर्म-मित्राला म्हणाले,–' आम्ही जेथें जावयास तयार झालों आहों, तें सरोवर अति दूर आहे. यास्तव तेथें जाण्याची जर तुझी इच्छा असेल, तर आमच्या सांगण्याप्रमाणें कर. आम्ही दोन्हीकडून धरलेल्या एका काठीस, तूं आपल्या तोंडांत धरून आमच्याबरोबर आकाशमार्गानें चल; पण कांहीं झालें तरी एक शब्द-

---

* गृध्रोऽपि हि वरं राजा सेव्यो हंसपरिच्छदः ।
न गृध्रपरिवारस्तु हंसोऽपि किमुतापरः ॥

† धैर्येण साध्यते सर्वम् ॥

सुद्धां तोंडावाटे काढूं नकोस; अगदीं गप्प-चुप बस, नाहीं तर तोंडां- तील काठी सुटून तूं खालीं पडशील, व मरशील.' त्यावर 'ठीक आहे, मी मुळींच बोलणार नाहीं,' असें म्हणून कांसवानें एक काठी आपल्या तोंडांत धरली, व तिचीं दोन्हीं टोकें दोन्ही बाजूंनीं आपल्या चोंचींत धरून ते दोघे हंस आकाशमार्गानें निघाले. ते ज्या मार्गानें जात होते, त्याच्या खालीं नगर असून, त्यांतील लोकांनीं आकाशांतून जाणाऱ्या यांनां पाहिलें, व आश्चर्यानें-'अरे! ही काय मौज आहे पहा! हे हंस कांहींसें नेत आहेत.' असेंही म्हटलें. तो त्यांचा कलकल चपल कांसवानें ऐकला, व 'हा खालीं गलका कसला ऐकूं येत आहे,' असें तोंडांतील काठी सोडून हंसांनां विचारिलें. तोंच तो दीन व मूढ कांसव खालीं पडला, व लोकांनींही तत्काल त्याला मारलें.

सारांश, काठीला सोडलेल्या या कूर्माप्रमाणें बुद्धीपासून भ्रंश पाव- लेल्या प्राण्याचा विनाश होत असतो. टिट्टिभीनें सांगितलेली ही गोष्ट ऐकून टिट्टिभ तिला म्हणाला,-'प्रिये, तूं म्हणतेस तें खरें आहे; पण तूं सुद्धां मी सांगतों ती कथा ऐक.'

## ११. तीन माशांची गोष्ट.

मागें एका नदीच्या डोहांत तीन मासे होते. त्यांतील एकाचें नांव अनागतविधाता, दुसऱ्याचें प्रत्युत्पन्नमति व तिसऱ्याचें यद्भविष्य. ते तिघेही एकत्र रहात होते. त्यांनीं एकदां त्या मार्गानें जाणाऱ्या कोळ्यांचें- 'अहो, या डोहांत किती मासे आहेत हे!' असें भाषण ऐकलें. त्या- बरोबर बुद्धिमान् अनागतविधाता,-ते आपल्याला जाळें लावून धरतील, या भीतीनें लागलाच नदीच्या प्रवाहांत शिरून, दुसरीकडे गेला. प्रत्यु- त्पन्नमति-'जेव्हां ते आपणास धरावयास येतील, तेव्हां मीं आपल्या संर- क्षणाचा उपाय योजीन, आतांपासून उगीच चिंता करण्यांत काय अर्थ आहे?' असें म्हणून तेथेंच राहिला. यद्भविष्य-'माझें जें व्हावयाचें असेल तें होईल.' असें म्हणून दैवावर हवाला ठेवून राहिला. दुसऱ्या दिवशीं कोळ्यांनीं तेथेंच येऊन जाळें टाकलें व कांहीं वेळानें तें वर काढलें; त्यांत प्रत्युत्पन्नमति अडकला होता. पण तो मोठा शहाणा असल्यामुळें मेल्याचें सोंग घेऊन, निश्चेष्ट होऊन राहिला. तेव्हां हा आपणच मेला आहे असें समजून, कोळ्यांनीं इतर माशांप्रमाणें त्याला

मारलें नाहीं. इतक्यांत अवकाश मिळतांच, तो खोल पाण्यांत उडी मारून दूर निघून गेला. यद्भविष्यही त्यांच्या त्या जाळ्यांत सांपडला होता; तो खुळा पाण्यांतून जाळें वर काढतांच तडफड करूं लागला, म्हणून धीवरांनीं त्याला धरून, व मान मुरगळून मारून टाकलें. यास्तव मी प्रसंग आला म्हणजे त्याचा प्रतीकार करीन; पण समुद्राच्या भीतीनें दुसरीकडे जाणार नाहीं.

भार्येला असें सांगून टिट्टिभ तिच्यासहवर्तमान तेथेंच आपल्या घरट्यांत राहिला. त्याचें तें अहंकारयुक्त भाषण सागरानें ऐकलें. कांहीं दिवसांनीं टिट्टिभी प्रसूत झाली. 'हा क्षुद्र टिट्टिभ मला काय करतो, तें पाहूं या तर खरें,' असें म्हणून कौतुकानें समुद्रानें लाटांबरोबर तिचीं अंडीं नेलीं. तेव्हां 'पहा मी म्हणत होतें तसेंच झालें' असें बोलून पक्षीण रडूं लागली. तें ऐकून धीर टिट्टिभ भार्येला म्हणाला, 'मी या पापी समुद्राची आतां कशी दुर्दशा करतों ती पहा,' असें बोलून त्यानें सर्व पक्ष्यांना एकत्र जमविलें; त्यांना समुद्रानें केलेला आपला पराभव सांगितला व त्यांच्या सहवर्तमान तो गरुडाला शरण जाऊन रडूं लागला. सर्व पक्षी गरुडाला म्हणाले, 'हे प्रभो, तूं आमचा नाथ असतांना समुद्रानें आमच्यांतील एका पक्ष्याचीं अंडीं नेऊन अनाथाप्रमाणें आमचा पराभव केला आहे.' तें ऐकून गरुडालाही मोठा क्रोध आला. त्यानें भगवान् विष्णूची प्रार्थना केली. तेव्हां त्या गरुडवाहनानें आग्नेय अस्त्रानें समुद्राला सुकवून टिट्टिभाचीं अंडीं परत देवविलीं. यास्तव बुद्धिमानानें आपत्कालीं धैर्य सोडूं नये.* आतां पिंगलकाशीं तुझें युद्ध तर उपस्थित झालें आहे. यास्तव जेव्हां तो आपलें पुच्छ वर उचलून चारी पायांनीं एकदम उभा राहील, तेव्हां तो तुजवर प्रहार करण्याची इच्छा करीत आहे असें तूं समज; आणि युद्धाकरितां सज्ज होऊन, मस्तक खालीं वांकवून, दोन्ही शिंगें पोटांत खुपसून त्या आपल्या शत्रूला मारून भूमीवर पाड.

याप्रमाणें संजीवक बैलाला सांगून दमनक करटकापाशीं गेला. त्यानें दोघांमध्यें भेद उत्पन्न झाला, असें करटकास सांगितलें. त्यानंतर संजीवक

* तस्मादत्यक्तधैर्येण भाव्यमापदि धीमता ।

त्या मृगराजाचें हृद्गत त्याच्या आकारादिकांवरून जाणण्याच्या इच्छेनें हळू हळू त्याच्यापाशीं गेला. तेव्हां पुच्छ उचलून व चारी पाय सारखे टेकून सिंह युद्ध करण्याची इच्छा करीत आहे, असें त्याला आढळलें. सिंहानेंही भयानें डोकें हालवीत असलेल्या बैलाला पाहिलें व तत्काल उडी टाकून त्याच्या अंगावर नखांचा प्रहार केला. बैलानेंही शिंगें खुपसून सिंहाला जर्जर केलें. त्या दोघांची झटापट सुरू झाली; तें पाहून साधु करटक दमनकास म्हणाला, 'स्वार्थसिद्धीकरितां तूं आपल्या प्रभूवर केवढें संकट आणलेंस हें! मित्रा, प्रजेला संताप देऊन संपादन केलेली संपत्ति, कपटानें संपादिलेली मैत्री व बलात्कारानें हरण करून आणलेली कामिनी हीं फार दिवस टिकत नाहींत.‡ अथवा तुला उपदेश करणें पुरें झालें; कारण एकाद्याची इच्छा नसतांना उगीच त्याला अधिक सांगूं लागल्यास हितवाक्याचा अनादर करणाऱ्या त्याच्यापासून दोषाचा मात्र लाभ होतो. एका वानरापासून सूचीमुखाला असाच दोष-लाभ झाला. त्याचा वृत्तांत ऐक'—

### १२. वानर व सूचीमुख यांची उपकथा.

पूर्वी एका वनांत कळप करून रहाणारे वानर होते. शीत समयीं ते एका काजव्याला पाहून हा अग्नीच आहे असें समजले आणि त्याच्यावर गवत व वाळलेलीं पानें घालून अंग शेकूं लागले. त्यांतील एक वानर त्या काजव्यावर तोंडानें वारा घालूं लागला. तें पाहून सूचीमुख नांवाचा एक पक्षी त्याला म्हणाला,—' अरे बाबा, हा अग्नि नव्हे, काजवा आहे. उगीच कष्ट करूं नकोस.' पण तें ऐकूनही मूर्ख वानर काजव्यास फुंकीतच राहिला. म्हणून तो पक्षी वृक्षावरून खालीं येऊन आग्रहानें त्याला त्या व्यर्थ व्यापारापासून निवृत्त करूं लागला. त्यामुळें वानराला क्रोध आला आणि दगड फेंकून त्यानें सूचीमुखाला मारून टाकलें. यास्तव, हितवचन न ऐकणाराला तें सांगूं नये* असा नियम आहे. म्हणून मी तुला दोषी होण्याकरितां उगीच कशाला सांगूं ? पण तूं या दोघांमध्यें

‡ संपत्प्रजानुतापेन मैत्री शाठ्येन कामिनी ।
पारुष्येणाहृता मित्र न चिरस्थायिनी भवेत् ॥

* तस्मान्न तस्य वक्तव्यं यः कुर्यान्न हितं वचः ।

वैर उत्पन्न केलेंस. दुष्ट बुद्धीनें केलेल्या कर्मांचा शुभ परिणाम कधींही होत नसतो * याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐक—

## १३. दोघां भावांची उपकथा.

एका नगरांत धर्मबुद्धि व दुष्टबुद्धि या नांवाचे दोघे वैश्यपुत्र चुलत भाऊ होते. ते द्रव्य संपादन करण्याकरितां बापाच्या येथून निघून देशांतरास गेले. तेथें त्यांनां मोठ्या कष्टानें दोन सहस्र दीनार सुवर्ण मिळालें. तें धन घेऊन ते आपल्या घरीं परत आले. त्यांतले शंभर दीनार काढून व ते बरोबर वांटून घेऊन, त्यांनीं बाकीचे सर्व दीनार एका झाडाखालीं पुरून ठेविले, आणि बापाच्या घरीं जाऊन ते सुखानें राहूं लागले.

एकदां अयोग्य रीतीनें व्यय करणारा दुष्टबुद्धि एकटाच त्या झाडाखालीं गेला व कोणाच्या नकळत त्यानें सर्व दीनार काढून घेतले. नतर एका महिन्यानें तो धर्मबुद्धीस म्हणाला,–'दादा, चल, आपण ते पुरून ठेवलेले दीनार वांटून घेऊं. मला खर्चावयास द्रव्य पाहिजे आहे.' तें ऐकून, 'बरें आहे,' असें म्हणून धर्मबुद्धि त्याच्याबरोबर त्या झाडापाशीं गेला व जेथें ते पुरून ठेवले होते, तेथें त्याच्या समक्ष उकरून पाहूं लागला. पण त्याला तेथें ते दीनार आढळले नाहींत. तेव्हां शठ दुष्टबुद्धि त्या सत्पुरुषाला म्हणाला,–'तूंच ते काढून नेले असावेस, यास्तव माझा अर्धभाग मला दे.' पण निष्कपट धर्मबुद्धि त्यास म्हणाला,–'बाबारे, मी कांहीं त्यांना स्पर्शसुद्धां केलेला नाहीं. कदाचित् तूंच ते काढून नेले असशील.' याप्रमाणें त्या दोघांचा कलह सुरू झाला. दुष्टबुद्धीनें दगडानें आपलें मस्तक फोडून घेतलें, व धर्मबुद्धीला राजपुरुषांकडे नेलें. तेथें त्या दोघांनींही आपापलें म्हणणें सांगितलें; पण त्यावरून त्या गोष्टीचा निर्णय होईना. राजाच्या अधिकाऱ्यांनीं त्या दोघांनांही दिवस मावळेपर्यंत अडकवून ठेविलें. तेव्हां दुष्टबुद्धि त्यांस म्हणाला–'ज्या झाडाखालीं ते दीनार पुरून ठेवले होते, तें झाडसुद्धां 'या धर्मबुद्धीनेंच द्रव्य काढून नेलें' अशी साक्ष देत आहे.

---

* दुष्टया क्रियते यत्र बुद्धया तत्र शुभं भवेत् ।

हें त्याचें चमत्कारिक भाषण ऐकून अतिशय विस्मित झालेले राजाधिकारी म्हणाले, 'असें जर असेल तर बरेंच झालें. उद्यां सकाळीं आपण जाऊन या गोष्टीची प्रतीति पाहूं.' नंतर जामीन देऊन ते दोघेही घरीं गेले. दुष्टबुद्धीनें खरी गोष्ट आपल्या बापाला एकांतांत सांगितली. त्याला धन दिलें, व 'वृक्षाच्या ढोलींत बसून माझ्या बाजूची साक्षी दे,' असें म्हटलें. म्हाताऱ्या वेश्यानेंही धनलोभानें त्याचें म्हणणें मान्य केलें. तेव्हां रातोरात त्याला त्या झाडाच्या ढोलींत बसवून तो पापी घरीं आला व दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजपुरुषांसह ते दोघे भ्राते त्या झाडाखालीं गेले. राजपुरुषांतलि मुख्य अधिकाऱ्यानें 'येथें पुरून ठेवलेले दीनार कोणी नेले ?' असें विचारलें असतां, 'धर्मबुद्धि त्यांना घेऊन गेला' अशी दुष्टबुद्धीच्या बापानें उच्चारलेली स्पष्ट वाणी त्यास ऐकूं आली; पण वृक्षानें असें बोलणें शक्य नाहीं, खचित दुष्टबुद्धीनें या वृक्षाच्या ढोलींत कोणाला तरी बसविलें असावें,-असें म्हणून त्यानें त्या ढोलीच्या तोंडाशीं खूप धूर केला. त्यामुळें आंतील म्हातारा गुसमटला व त्वरेनें बाहेर येत असतांना खालीं पडून मेला. तें पाहून राजपुरुषांना खरी गोष्ट काय आहे, ती कळली. त्यांनीं दुष्टबुद्धकिडून धर्मबुद्धीला त्याच्या हिश्शाचे दीनार देवविले, व हात आणि जीभ कापून त्याला आपल्या देशांतून घालवून दिलें. यथार्थ भाषण करणाऱ्या धर्मबुद्धीचा त्यांनीं मोठा सन्मान केला. याप्रमाणें अन्यायबुद्धीनें केलेलें कर्म अशुभावह होत असतें. यास्तव बकानें सर्पाशीं जसें आचरण केलें तसें न्याय्य बुद्धीनें सदा वर्तन करावें, हें उत्तम.

## १४. बक व सर्प यांची उपकथा.

पूर्वी कोणा एका बकाचें झालेलें प्रत्येक पोर एक सर्प खात असे, त्यामुळें बकाला फारच दुःख झालें. पुढें त्यानें एका माशाच्या उपदेशावरून मुंगसाच्या बिळापासून सर्पाच्या बिळापर्यंत माशांचें मांस पसरून ठेविलें. तेव्हां मुंगुस आपल्या घरापासून तें खात खात सर्पाच्या बिळापाशीं येऊन पोंचलें. तेथें सापाचें बिळ पहातांच तें आंत शिरलें, व सर्व परिवारासह त्यानें त्या सापाला मारलें. याप्रमाणें न्याय्य उपायानें कार्य सिद्ध होत असतें. अशीच आणखी एक गोष्ट ऐक.

## १५. वैश्यपुत्र व लोखंडी तागडी यांची उपकथा.

मागें कोणी एक वैश्यपुत्र होता. त्याच्यापाशीं पित्याच्या धनांतील एक तागडी मात्र शिल्लक राहिली होती. एक सहस्र पलभार लोखंडानें केलेली ती कोणा एका वाण्यापाशीं ठेवून, तो देशान्तरास गेला. कांहीं दिवसांनीं परत आल्यावर त्यानें ती मागितली. तेव्हां तो वाणी म्हणाला– 'काय सांगूं बाबा, उंदरांनीं तुमची ती तागडी खाऊन टाकली.' त्यावर वैश्य-पुत्रही मनांत हंसत, 'खरेंच, तें लोखंड अतिशय गोड होतें, म्हणून उंदरांनीं ती खाल्ली,' असें म्हणाला. नंतर त्यानें त्या वाण्यापाशीं भोजन मागितलें. तेव्हां त्यानेंही मोठ्या संतोषानें तें देण्याचें कबूल केलें. त्यानंतर तो वैश्यपुत्र स्नान करावयास निघाला. जातां जातां हातांत एक आवळा देऊन त्यानें त्याच्या लहानशा अपत्यालाही आपल्याबरोबर नेलें; पण स्नानादि आटोपून परत येत असतांना त्या बालकाला आपल्या एका मित्राच्या येथें गुप्त रीतीनें ठेवून तो एकटाच परत आला. तेव्हां बरोबर नेलेलें माझें अर्भक कोठें आहे ! असें वाण्यानें विचारलें असतां, 'काय सांगूं शेटजी, तुमच्या मुलाला एका श्येनपक्ष्यानें आकाशांत नेलें.' असें त्यानें सांगितलें. पण वाण्याला तें खरें वाटलें नाहीं. 'तूंच त्याला कोठें तरी लपवून ठेवलें आहेस.' असें बोलून तो त्याला राजकुलांत घेऊन गेला. तेथेंही त्यानें तसेंच सांगितलें. त्यावर 'हें तुझें म्हणणें असंभाव्य आहे, श्येन पक्षी अर्भकाला उचलून कसा नेईल !' असें सभासदांनीं वैश्यपुत्राला विचारलें. तेव्हां तो त्यांस उलट बोलला, 'महाराज, ज्या देशांत लोखंडाची मोठी तराजू उंदीर खातात, तेथें श्येन पक्षी अर्भका-लाचसा काय, पण मोठ्या हत्तीलाही उचलून नेईल.'

हें त्याचें आश्चर्यकारक भाषण ऐकून विस्मित झालेल्या सभासदांनीं विचारलें असतां, वैश्यपुत्रानें तागडीची हकीकत सांगितली. ती ऐकून सभासदांनीं त्याची तागडी त्याला देवविली व त्यानेंही वाण्याचा मुलगा आणून दिला. याप्रमाणें बुद्धिशाली पुरुष उपायानें आपलें अभीष्ट साधीत असतात. तूं तर साहसाच्या योगानें प्रभूला जीवित–संदेहांत पाडलें आहेस.

करटकाचें हें भाषण ऐकून दमनक हंसत म्हणाला,–'असें काय म्हणतोस ! बैलाशीं युद्ध करतांना सिंहाला जय मिळेल कीं नाहीं;

याविषयीं संशय काय घ्यावयाचा आहे ? मत्त हत्तींच्या दांतांच्या आघातांनीं झालेले मोठमोठे व्रण हींच ज्याचीं भूषणें आहेत, असा सिंह कोठें* व खची केलेला व पाठीवर चाबकांचे व्रण वाहणारा बैल कोठें ! '

याप्रमाणें ते दोघे कोल्हे आपसांत जों बोलत आहेत, तों तिकडे संजीवक बैलाला पिंगलक सिंहानें युद्धांत मारलें. शत्रु ठार मेला असें पहातांच दमनक करटकासह मृगाधिप पिंगलकापाशीं आला; व त्यादिवसापासून ज्याला सिंहाचें अप्रतिहत मंत्रित्व पुनः मिळालें आहे, असा तो पुष्कळ दिवसपर्यंत मोठ्या संतोषानें राहिला.

नीतिमान् व मंत्रिश्रेष्ठ गोमुखाच्या तोंडून अशी विचित्र व बुद्धिवभवानें संपन्न कथा ऐकून नरवाहनदत्त अतिशय आनंदित झाला.

---

## तरंग ५ वा.

पुनः शक्तियशेविषयीं उत्कंठित झालेल्या नरवाहनदत्ताच्या चित्तविनोदाकरितां गोमुख मंत्री म्हणाला,–' देव, आपण एवढावेळ शहाण्यांच्या कथा ऐकल्यात. आतां खुळ्यांच्या ऐका.—'

### १. अनेक मूर्खांच्या कथा.

' कोणा एका श्रीमान् वैश्याचा एक मुग्धबुद्धि पुत्र होता. तो एकदां एका व्यापाराकरितां कटाहद्वीपास गेला. त्याच्या नौकेमध्यें अगुरूचा मोठा संचय होता. पण तो तेथें जाऊन पोंचल्यावर त्याचा माल कोणी घेतला नाहीं. कारण तेथल्या लोकांना अगुरूचा उपयोग व योग्यता यांतील एकाचेंही ज्ञान नव्हतें. तेव्हां काष्ठें विकणाऱ्या लोकांपासून तेथले लोक कोळसेही घेत आहेत असें पाहून, त्या मूर्खानें आपला कालागुरु जाळला व त्या सर्वांचे कोळसे केले. नंतर त्याला कोळशांच्या भावानें विकून आणि आपल्या घरीं परत येऊन तो तें आपलें कौशल्य सर्वांस

---

* मत्तेभदशनाघातघनव्रणविभूषणः ।
क्व केसरी क्व दान्तश्च प्रतोदक्षतविग्रहः ॥

सांगूं लागला; पण तें ऐकून सर्वजण त्याला हंसले.' याप्रमाणें अगुरूचे कोळसे करून विकणाऱ्या मूर्खाची कथा मी सांगितली. आतां तिळ पेरणाऱ्या शेतकऱ्याची कथा ऐक. 'कोणी एक खेड्यांत रहाणारा मूर्ख शेतकरी होता. त्यानें एकदां भाजलेले तिळ खाल्ले. ते त्याला फार गोड लागले. म्हणून तसेच गोड तिळ उत्पन्न व्हावे, या उद्देशानें त्यानें भाजलेले तिळच शेतांत पेरले, पण ते उगवले नाहींत. सर्व मातींत सडून गेले. तेव्हां केवल मूर्खपणामुळें पुष्कळ तिळांना आंचवलेल्या त्याला सर्व हसूं लागले.' आतां पाण्यांत अग्नि ठेवणाऱ्या एका मूर्खाची गोष्ट ऐका. 'कोणी एक मंदबुद्धि पुरुष होता. तो एकदां रात्रीं, दुसऱ्या दिवशीं सकाळींच देवपूजा करावयाची असल्यामुळें असा विचार करूं लागला. स्नान-धूप दीप इत्यादिकांकरितां मला पाणी व अग्नि यांची अत्यंत आवश्यकता आहे. यास्तव मी त्यांना एकाच ठिकाणीं ठेवितों. म्हणजे तीं मला शीघ्र सांपडतील. असा विचार करून व पाण्याच्या घागरींत अग्नि टाकून तो निजला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून जों पहातो तों अग्नि विझाला व जल नष्ट झालें. घागरींतील जल कोळशांच्या योगानें मलिन झालें आहे असें पाहून, त्याचें तोंड त्या पाण्यासारखेंच झालें; पण तें पाहून व ऐकून हंसणाऱ्या लोकांचीं तोंडें मात्र विकसित होतीं.' आतां नासिकारोपण करणाराची गोष्ट ऐका. 'कोणी एक अतिमूर्ख पुरुष होता. आपल्या भार्येचें नाक नकटें आहे व गुरूचें नाक उंच आहे असें पाहून, त्यानें निजलेल्या गुरूचें नाक कापून घेतलें, व भार्येपाशीं जाऊन, गाढ झोंपेंत असलेल्या तिचेंही नाक कापून त्यावर तें गुरूचें नाक बसवूं लागला; पण तें कांहीं केल्या चिकटेना.' सारांश याप्रमाणें त्यानें भार्या व गुरु या दोघांनाही नकटें करून सोडलें.

## २. धनगराची गोष्ट.

आतां एका वनवासी धनगराची गोष्ट ऐका. एका वनांत एक अतिमूर्ख पण धनवान् धनगर होता. कांहीं धूर्त त्याचे मित्र होऊन त्याच्या जवळ जमले. ते त्यास म्हणाले, 'एका नगरवासी भीमानाची कन्या आम्ही तुजकरितां त्याच्यापाशीं मागितली, व त्यानें ती देतों, असें आम्हांला वचन दिलें आहे.' तें ऐकून त्या मूर्खानें त्यांना मोठ्या आनंदानें पुष्कळ धन दिलें. कांहीं दिवसांनीं ते त्याला म्हणाले,

तुझा विवाह झाला.' तें ऐकून तर त्याला फारच आनंद झाला, व त्यानें त्या आपल्या मित्रांना आणखी पुष्कळ धन दिलें. कांहीं दिवस लोटल्यावर त्या शठांनीं 'तुला पुत्र झाला आहे' असें त्याला सांगितलें. तें ऐकतांच त्याला परम आनंद झाला. त्यानें आपलें सर्वस्व त्यांना देऊन टाकलें. दुसऱ्या दिवशीं मी पुत्राकरितां अतिशय उत्सुक झालों आहें, असें म्हणून रडत बसलेल्या त्याला पाहून सर्व लोक हसूं लागले.' या प्रमाणें पशूंच्या संगतीनेंच जणुं काय ज्याच्यामध्यें जडता आली आहे अशा त्या पशुपालकाला धूर्तांनीं फसविलें. हे देव, आतां अलंकार-लंबकाची गोष्ट ऐका.—

## ३. आणखी अनेक मूर्खांच्या कथा.

एका खेडवळास भूमि खणीत असतांना एक मोठें भूषणांचें गाठोडें मिळालें. चोरांनीं रात्रीं राजकुलांतून चोरून नेऊन, तें तेथें ठेवलें होतें. त्या खुळ्यानें त्याविषयीं मुळींच विचार न करितां तेथेंच त्या दागिन्यांनीं आपल्या भार्येला भूषित केलें. मेखला तिच्या मस्तकावर बांधली, हार कंबरेंत बांधला, नुपुरें दोन्ही हातांत घातलीं व कंकणें कानांत अडकविलीं. पण त्याचा तो भूषणप्रकार पाहून लोक पोट धर-धरून हसूं लागले, व त्यांनीं तें वर्तमान राजकुलांत जाऊन सांगितलें. तेव्हां राजानें आपले सर्व अलंकार परत घेतले व त्या पशुतुल्य मनुष्यास सोडून दिलें. आतां कापूसवाल्याची गोष्ट सांगतों, ती ऐका.—' कोणी एक मूर्ख मनुष्य कापसाच्या बाजारांत आपला कापूस विकण्याकरितां गेला. पण हा तुझा कापूस अशुद्ध आहे, असें म्हणून कोणी घेईना. तेव्हां आतां याला शुद्ध कसें करावें, असा जों तो विचार करीत आहे, तों त्याचें लक्ष्य जवळच्याच एका सोनाराच्या दुकानाकडे गेलें. त्यांत सोनार सोन्याला भट्टींत तापवून शुद्ध करीत आहे, असें त्याला दिसलें. तापवून शुद्ध केलेलें सोनें गिऱ्हाईकही त्या सोनारापासून भराभर विकत घेत आहेत, हें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें. नंतर त्या मूर्खानें अशुद्ध वस्तूला शुद्ध करण्याचा हाच उत्तम उपाय आहे, असें जाणून आपला कापूसही अग्नींत टाकला. त्याबरोबर तो जळाला. तें पाहून लोक हसूं लागले.' ही कापूसवाल्याची गोष्ट झाली. आतां खजूरी-छेदकांची कथा ऐका—' एका राजाच्या अधिकारी लोकांनीं

कित्येक अडाणी गांवढळांस आणून, राजाच्या परिवारांतील लोकांनीं सांगितलेलीं खजुराचीं फळें आणावयासाठीं नियुक्त केलें. तेव्हां ते सर्व खजुरीच्या बागेंत गेले. तों त्यांना तेथें एक झाड वाऱ्यानें उपटून पडलें आहे असें दिसलें. तिचीं फळें अनायासें काढतां आलीं. तेव्हां बाकीच्या सर्व झाडांनाही तोडून त्यांनीं त्यांचीं फळें काढून घेतलीं व ते पुनः त्यांना तशीं उभीं करून ठेवूं लागले; पण तीं कांहीं केल्या उभीं रहात ना. पुष्कळ प्रयत्न करून थकल्यावर, ते मूढ काढलेलीं खजुरीचीं फळें घेऊन राजवाड्यांत परत आले; पण त्यांनीं खजुरींना तोडून हातांनींच फळें काढून आणिलीं आहेत, असें कळतांच राजाला मोठा क्रोध आला. त्यानें फळें आणल्याबद्दल त्यांना पारितोषिक तर दिलें नाहींच; पण उलट दंड मात्र केला.' ही झाली खजुरींना तोडणारांची गम्मत. आतां निधीच्या अवलोकनाची मौज ऐका.--'कोणी एका राजानें एका निधान पहाणाराला आणलें; पण त्यानें कोठें पळून जाऊं नये म्हणून त्या निधानस्थान पहाणाऱ्याचे दोन्ही नेत्र राजाच्या दुष्ट मंत्र्यानें उपटून काढविले. त्यामुळें तो दीन निधानदर्शी कोठें जाण्या-येण्यास असमर्थ व भूमीचीं लक्षणें पहाण्यास अयोग्य झाला आहे असें पाहून, लोक त्या मंत्र्याला हंसूं लागले.' आतां लवण भक्षणाची गोष्ट सांगतों ती ऐका. 'गव्हर नांवाचा एक गांवठी मनुष्य होता. त्याला त्याच्या एका नगरवासी मित्रानें आपल्या घरीं नेलें. तेथें मीठ घालून अगदीं रुचकर केलेल्या भाज्या, कोशिंबिरी, इत्यादि त्यास खाऊं घातल्या. तेव्हां 'तुमचें हें अन्न इतकें गोड व रुचकर कशानें होतें,' असें तो गव्हर मित्राला विचारूं लागला. तेव्हां 'मुख्यत्वें करून मिठाच्या योगानें हे सर्व पदार्थ इतके रुचकर लागत आहेत,' असें नगरवासी मित्रानें त्याला सांगितलें, तें ऐकून 'तर मग मीठच खाल्लें म्हणजे झालें, इतके सर्व पदार्थ काय करावयाचे आहेत,' असें बोलून दळलेल्या मिठाची एक मूठ भरून त्यानें तोंडांत घातली. त्याबरोबर त्याचें तोंड खारट झालें, त्याला ओकाऱ्या येऊं लागल्या आणि दाढी व मिशा पांढऱ्या झाल्या. त्याचा तो सर्व अवतार पाहून तेथले सर्व स्त्री-पुरुष हंसूं लागले.' आतां गायीचें दूध काढणाऱ्या मूर्खांची कथा ऐका.--

## ४. गो-दोहनाची गोष्ट.

एक खुळा-भोळा गांवठी मनुष्य होता, त्याच्यापाशीं एक गाय होती. ती प्रत्यहीं शंभर पलभार दूध देत असे. एकदां त्याच्या येथें कांहीं उत्सव व्हावयाचा होता, म्हणून त्याला एक महिना अवकाश राहिला असतां, रोज रोज दूध काढावयाचें तें आतां एकदमच एका महिन्याचें सर्व काढूं; असा विचार करून त्यानें तिची महिनाभर धारच काढली नाहीं. पुढें उत्सवाचा दिवस उजाडला असतां, मोठें थोरलें भांडें घेऊन तो तिचें दूध काढावयास गेला. पण महिनाभर धार न काढल्यामुळें तें आटलें. त्या मूढाला पावशेरभरही दूध मिळालें नाहीं. लोकही हसूं लागले.' आतां, दोघां मूर्खांची गोष्ट ऐका.—

## ५. टकल्या व तरुण यांची गोष्ट.

"कोणी एक टकल पडलेला मनुष्य होता. त्याचें मस्तक तांब्याच्या घागरीसारखें होतें. एका झाडाखालीं बसलेल्या, त्याला त्याच मार्गानें कवठें घेऊन आलेल्या व भुकेलेल्या एका तरुणानें पाहिलें; व हातांतील एक कवठ त्याच्या गुळगुळीत डोक्यावर सहज लीलेनें मारलें. पण त्यानें तें सहन केलें. तो ( टकल पडलेला ) त्याला कांहीं बोलला नाहीं. तेव्हां त्या तरुणानें आपल्याजवळचीं दुसरींही कवठें, त्याच्या डोक्यावर मारलीं. त्यामुळें त्याच्या डोक्यांतून रक्त वाहूं लागलें; पण तो गृहस्थ त्या तरुणाला कांहीं एक बोलला नाहीं. शेवटीं निष्फल तारुण्याच्या मदानें केलेल्या क्रीडेनें ज्यानें, जवळचीं सर्व कवठें फोडून टाकलीं आहेत, असा तो मूर्ख तरुण तसाच उपाशीं घरीं गेला व गोड कवठांचे आघातही मी सहन करूं नये कीं काय, असें म्हणणारा तो टकल्या मूर्ख रक्तबंबाळ झालेलें डोकें घेऊन आपल्या घरीं गेला. तेव्हां मूर्खत्वाच्या साम्राज्याचें जणुं काय लाल पागोटेंच, अशा प्रकारच्या रक्तानें त्याचें मस्तक आच्छादित झालें आहे असें पाहून, सर्व लोक हंसूं लागले.'

तात्पर्य; हे देव, याप्रमाणें मूर्ख लोक जगांत उपहासास पात्र होतात, व त्यांचें इष्ट सिद्ध होत नाहीं. पण तेंच, सुबुद्धिमानांविषयीं जर पाहिलें, तर त्यांचा मोठा सत्कार होत असतो.

गोमुखानें सांगितलेल्या मूर्खांच्या या सर्व हास्यकारक कथा ऐकून, नरवाहनदत्त उठला; त्यानें आपल्या सर्व आन्हिक-क्रिया केल्या; व रात्रीं गोमुखाला पुनः बुद्धिमानांच्या कथेविषयीं प्रश्न केला. तेव्हां तो उत्तम सचिव बुद्धिमानांची कथा सांगूं लागला—

## ६. काक, कपोत, मूषक व कूर्म यांची कथा.

कोणा एका वनामध्यें एक मोठा शिवरीचा वृक्ष होता. त्यावर लघुपाती या नांवाचा कावळा घरटें करून रहात असे. तो एकदां आपल्या घरट्यांत बसला असतां, त्याच झाडाखालीं एक भयंकर पुरुष आला. त्याच्या हातांत जाळें व काठी होती. लघुपातीनें त्या यमासारख्या हिंसकाला पाहिलें. इतक्यांत त्यानेंही भूमीवर जाळें पसरून तांदूळ पेरले, आणि तो दुष्ट स्वतः लपून राहिला. कांहीं वेळानें चित्रग्रीव या नांवाचा पारव्यांचा स्वामी शेंकडों पारव्यांच्या परिवारासह, आकाशमार्गानें भ्रमण करीत तेथें आला. त्यानें खालीं भूमीवर पडलेले तांदुळ पाहिले. ते खाण्याच्या इच्छेनें तो सर्व पारव्यांसह तेथें बसला व जाळ्यांत अडकला. तें पाहून तो शहाणा राजा आपल्या परिवारास म्हणाला,–'आपापल्या चोंचीनें जाळें धरून एकदम वेगानें आकाशांत उडून जा. त्यावांचून आतां प्राण वांचणार नाहींत. चित्रग्रीवाची आज्ञा मान्य करून सर्व कपोत जाळें तोंडांत धरून एकदम उडाले, व भयभीत मनानें मोठ्या वेगानें पळत सुटले. तो चमत्कार पाहून पारधीही लपून बसलेल्या जाग्यावरून उठला व वर पाहूं लागला; पण इतक्यांत ते पक्षी त्यांच्या दृष्टीआड झाले. तेव्हां मनांत खिन्न होऊन व्याधाला आपल्या घरीं परत जावें लागलें.

तो पुरुष परतला आहे असें पाहून, निर्भय झालेला चित्रग्रीव आपल्या अनुचरांना म्हणाला,–आतां आपण सर्व माझ्या हिरण्य नांवाच्या उंदीर मित्राकडे जाऊं या, म्हणजे तो हे आमचे पाश तोडून आम्हांला मुक्त करील. इतकें बोलून कपोतराजा जाळें उचलून नेणाऱ्या सर्व पारव्यांसह मूषकराजाच्या बिळापाशीं आला व एकदम आकाशांतून खालीं उतरला. नंतर 'अरे अरे हिरण्या, बाहेर ये, मी चित्रग्रीव आलों आहें' असें म्हणून

* या तरंगांतील ही व अशाच दुसऱ्याही यापुढील कथा हितोपदेशांत व पंचतंत्रांत आहेत.

आपल्या मित्राला त्यानें हांक मारली. तेव्हां द्वारांतूनच कोण आलें आहे तें हळुच पाहून, चित्रग्रीवच आपल्या परिवारासह आला आहे, असा निश्चय झाल्यावर हिरण्य आपल्या शंभर द्वारांनीं युक्त असलेल्या बिळांतून बाहेर पडला. मित्राच्या जवळ जाऊन व त्याला सर्व वृत्तांत विचारून घेऊन मूषकानें मोठ्या वेगानें त्या सर्वांचे पाश तोडले. नंतर त्या साक्षात् मृत्युपाशांतूनच सुटलेला चित्रग्रीव, प्रिय वचनांनीं मूषकाचा निरोप घेऊन, सर्व अनुचरांसह, आकाशांत उडून गेला.

चित्रग्रीवाच्या मागोमाग येऊन हा सर्व प्रकार पहाणारा लघुपाती कावळा बिळांत शिरलेल्या हिरण्याच्या दारापाशीं जाऊन म्हणाला, ' हिरण्या, मी लघुपाती कावळा आहे, आपत्तींतून सोडविणाऱ्या तुजकडे आलों आहे, मी तुजपाशीं तुझ्या मित्रत्वाची याचना करितों ' तें ऐकून व आंतूनच कावळ्याला पाहून उंदीर म्हणतो,–' अरे जा, तूं भक्षक व मी तुझें भक्ष्य असा संबंध असल्यामुळें, तुझ्याशीं काय मैत्री करावयाची आहे ?' त्यावर कावळा म्हणाला–' मित्रा, छेः छे; असें म्हणूं नकोस. मी तुला खाल्यास माझी क्षणिक तृप्ति होईल, व तुझा मित्र झाल्यास माझें यावज्जीव जीवितरक्षण होईल.' असें सांगून आणि शपथ पूर्वक त्याला विश्वास देऊन बिळांतून बाहेर आलेल्या त्याच्याशीं कावळ्यानें सख्य केलें. नंतर उंदीर मांसपेशी आणी, व कावळा धान्यादि आणीत असे. ते एकत्र बसून व एकमेकांचा आहार एकमेकांस देऊन, आनंदानें भोजन करीत. याप्रमाणें ते दोघे तेथें पुष्कळ दिवस सुखानें राहिले.

एकदां कावळा मूषकास म्हणाला, 'मित्रा, येथून जवळच वनांतून वाहणारी एक नदी आहे. तिच्यामध्यें मन्थरक नांवाचा कूर्म सुहृद् आहे, यास्तव मी तेथें जातों. तेथें मांसभोजन अनायासानें मिळत असतें. येथें आहार मोठ्या कष्टानें मिळून शिवाय व्याधाचें माठें भय वाटतें.' तें ऐकून मूषक म्हणाला–'तर मग आपण एके ठिकाणींच राहूं या, मीही तेथें येतों, मला घेऊनच चल. मला सुद्धां येथें मोठा कंटाळा आला आहे. त्याचें कारण मी तेथें गेल्यावर सांगेन. असो; त्याप्रमाणें हिरण्याला चोंचींत धरून लघुपाती आकाशमार्गानें भराऱ्या मारीत थोड्याच वेळांत त्या वननदीच्या तीरावर जाऊन पोंचला. मंथरक कूर्माला भेटून, त्यानें

त्याचें उचित आतिथ्य केलें असतां, कावळा हिरण्यक मित्रासह तेथें सुखानें राहिला. नंतर बोलतां बोलतां लघुपातीनें आपल्या येण्याचें कारण व हिरण्यकाशीं मैत्री झाल्याचा वृत्तांत त्या कांसवाला सांगितला आणि उंदिराची अतिशय स्तुति केली. ती ऐकून कूर्मानेंही त्याच्याशीं मैत्री केली आणि देशत्याग करण्याचें कारण विचारिलें. तेव्हां कूर्म व काक ऐकत असतांना हिरण्यक आपली कहाणी सांगूं लागला.—

## ७. उंदराची कहाणी.

मी नगराच्या समीपच असलेल्या एका मह बिळांत रहात असें. एके रात्रीं मीं राजकुलांतून एक हार आणून आपल्या बिळांत ठेविला. तो नेहमीं डोळ्यांपुढें दिसत असल्यामुळें मला मोठें बल आलें, तेव्हां अन्न आणण्यास समर्थ असलेल्या माझ्या सभोंवार अनेक उंदीर जमले. आमच्या त्या महाबिळापाशींच अनेकांच्या घरची भिक्षा आणून खाणारा एक संन्यासी मठ करून राहिला होता. तो खाऊन उरलेलें अन्न भिक्षा मागण्याच्या भांड्यांत घालून दुसऱ्या दिवशीं खाण्याकरितां खुंटीला टांगून ठेवीत असे. पण रात्रीं तो निजला. म्हणजे मी बिळांतून त्याच्या मठांत शिरून व वर उडी मारून, रोज तें नेत असें. एकदां त्याचा एक सुहृत् संन्यासी तेथें आला. भोजनोत्तर ते दोघे पुष्कळ वेळ गोष्टी बोलत बसले; पण इतक्यांत मी अन्न न्यावयास प्रवृत्त झालों असतां, अन्नपात्राकडेच कान लावून बसलेला तो, तें भांडें जुन्या वेळूच्या काठीनें वारंवार वाजवूं लागला. तें पाहून 'मध्येंच तूं हें असें काय करतोस?' असें त्या आगन्तुक संन्याशानें विचारिलें. तेव्हां संन्यासी त्याला म्हणाला, 'येथें मला एक उंदीर शत्रु निर्माण झाला आहे. तो इतक्या उंचीवर ठेवलेल्या भांड्यांतूनही माझें अन्न रोज घेऊन जातो. त्याला भिवविण्याकरितां मी हें पात्र वेळूच्या काठीनें वारंवार ठोकीत आहें.' हें त्याचें भाषण ऐकून तो दुसरा संन्यासी म्हणाला, 'लोभ हा प्राण्यांच्या दोषाला कारण होत असतो.* याविषयीं मीं एक कथा सांगतों ती ऐक.'—

* लोभो नामैष जन्तूनां दोषाय.......... ।

## ८. लोभी ब्राह्मणाची गोष्ट.

'मी तीर्थाटन करीत असतांना एका नगरास येऊन पोंचलों, व वस्तीकरितां त्यांतील एका ब्राह्मणाच्या घरीं गेलों, तेव्हां माझ्या समक्ष तो ब्राह्मण आपल्या गृहिणीला म्हणाला, 'आज पर्व आहे, यास्तव या ब्राह्मणाकरितां खिचडी कर;' पण त्यावर ती म्हणाली-'तुज निर्धनाच्या येथें खिचडी होणार कशी ?' तें ऐकून तो ब्राह्मण पुनः म्हणाला, 'प्रिये, संचय करावा, हें जरी खरें आहे, तरी अति संचयाची हांव धरूं नये. याविषयीं एक गोष्ट ऐक.'

### ९. संचयशील कोल्ह्याची गोष्ट.

कोणी एक व्याध एका वनांत शिकार करून झाल्यावर बरोबर मांसाचा भार घेऊन व धनुष्याला बाण लावून पुनः एका रानडुक-रावर धांवून गेला; पण त्याच्या बाणानें व्याकुल झालेल्याही सूकरानें त्याला इतक्या जोरानें धक्का दिला कीं, सूकराबरोबर व्याधही मरून पडला. मेलेल्या त्या दोघांनां एका कोल्ह्यानें दुरून पाहिलें. तो त्यांच्या प्रेतांजवळ आला, व पोटांत फार भूक लागली होती, तरी मांस-संग्रह कर-ण्याच्या इच्छेनें त्या मूर्खानें व्याध व डुकर यांच्या शरीरांस स्पर्शही न करितां धनुष्याच्या टोंकास व्याधानें अडकविलेलें मांस खावयास गेला; पण त्यामुळें तें धनुष्य हाललें व त्याला लावलेला बाण जोरानें उडून लोभी कोल्ह्याच्या उरांत शिरला; त्यामुळें तो तडफडून मेला. यास्तव अति-संचय करण्याकडेच नेहमीं लक्ष्य ठेवूं नये.

ब्राह्मणानें असें सांगितलें असतां त्याच्या भार्येनें तिळ घालून खिचडी करण्याचें मान्य केलें, व तिळ उन्हांत वाळत घातले. पण ती घरांत गेली असतां, मागें एका कुत्र्यानें येऊन ते चाटले. तेव्हां कुत्र्याचें तोंड लागून भ्रष्ट झालेले ते खिचडीच्याही उपयोगी नाहींत व विकण्याच्याही कामाचे नाहींत, असें झालें. 'मित्रा, याप्रमाणें लोभ उपभोगाच्या उपयोगीं पडत नाहीं. केवळ क्लेश मात्र देतो.'* असें सांगून तो आगंतुक संन्यासी मठांतील भिक्षूला म्हणाला, 'एकादी कुदळ किंवा फावडें असलें तर दे. म्हणजे तुला होत असलेल्या या उंदरांच्या उपद्रवाचें मी युक्तीनें निवारण करितों.'

* तदेवं नोपभोगाय लोभः क्लेशाय केवलम् ।

तें ऐकून तेथल्या संन्याशानें त्याला एक कुदळ दिली. मीही लपून हें सर्व पहात व ऐकत होतोंच. आगंतुकाच्या हातांत कुदळ पहातांच मी आपल्या बिळांत जाऊन बसलों; पण तो दुष्ट माझ्या संचाराचें बिळ शोधून काढून, कुदळीनें खणूं लागला. तें पाहून मी आंत आंत पळूं लागलों असतां, तोही शठ हार मिळेपर्यंत खणीत राहिला. हारापाशींच सांठवून ठेवलेला माझा दुसरा संचयही त्याच्या हातीं लागला. तेव्हां 'या धनाच्या तेजामुळें त्या उंदराला इतकें बल होतें.' असें तो आगंतुक संन्याशी तेथल्या संन्याशाला माझ्या समक्ष म्हणाला. मित्रांनो, याप्रमाणें सर्वस्व हिरावून घेऊन व हार मस्तकावर घालून ते दोघेही यती आनंदानें निजले.

नंतर त्यांना झोंप लागली असतां, माझें तें धन पुनः परत नेण्यासाठीं मी आलों; पण इतक्यांत तेथला संन्यासी जागा झाला व त्यानें काठीनें माझ्या मस्तकावर प्रहार केला. त्यामुळें मला मोठी पीडा झाली; पण आयुर्मर्यादा संपलेली नव्हती, म्हणून मेलों नाहीं. मी मोठ्या दुःखानें आपल्या बिळांत गेलों. त्यावेळेपासून त्याचें अन्न हरण करण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें राहिलें नाहीं. कारण धन हेंच पुरुषांचें तारुण्य असून त्याचा अभाव हेंच वार्धक्य आहे. त्यामुळें धननाश झाला, कीं त्याचें ओज, बल, रूप, व उत्साहही नष्ट होतो.* नंतर नुस्तें माझें पोट भरणेंही मला कठिण झालें आहे असें पाहून, सर्व मूषक-परिवार मला सोडून गेला. निर्वाहाचें साधन न देणाऱ्या प्रभूला भृत्य ( सेवक ), पुष्परहित वृक्षाला भ्रमर, व ज्यांच्यांतील जल सुकून गेलें आहे अशा सरोवराला हंस, फार दिवसांचा परिचय असला तरी सोडून जातात.† असो; हे उत्तम कांसवा, नंतर बरेच दिवस मी तेथेंच मोठ्या उद्विग्न चित्तानें रहात होतों. कांहीं दिवसांनीं मोठ्या भाग्यानें हा लघुपाती माझा मित्र झाला, व त्याच्या संबंधानेंच हा मी आतां तुझ्यापाशीं आलों आहें.

---

* अर्थो हि यौवनं पुंसां तदभावश्च वार्धकम् ।
तेनास्योजो बलं रूपमुत्साहश्चापि हीयते ॥

† अवृत्तिकं प्रभुं भृत्या अपुष्पं भ्रमरास्तरुम् ।
अजलं च सरो हंसा मुञ्चन्त्यपि चिरोषितम् ॥

हिरण्यकानें अशी आपली दुःखकर कथा सांगितली असतां मन्थरक त्याला धीर देऊन म्हणाला, " मित्रा, हें तुझेंच घर आहे. असा अधीर होऊं नकोस. कारण गुणवानाला विदेश कोणताच नाहीं. सर्व स्वदेशच ज्याचें चित्त संतुष्ट असतें त्याला असुख मुळींच होत नाहीं. धीरपुरुषाला विपत्ति कशी ती भासतच नाहीं, व उद्योग्याला असाध्य असें कांहीं नाहीं."* कांसव इतकें जों बोलत आहे, तोंच व्याधांस भ्यालेला चित्रांग नांवाचा हरिण फार दुरून त्या वनांत आला. त्याला पाहून व त्याच्या मागून व्याध येत नाहीं असा निश्चय करून, कूर्मादिकांनीं त्याच्याशींही सख्य केलें. त्याला धीर व विश्वास दिला. नंतर काक, कूर्म, मृग व उंदीर असे ते चौघे मित्र तेथें राहूं लागले. एकमेकांचा आहारादि दानानें, उचित सत्कार करणाऱ्या त्या परम मित्रांचा काल सुखानें जाऊं लागला. एके दिवशीं चित्रांगदाला यावयास फारच उशीर झाला, म्हणून कावळा उंच झाडावर बसून व दूरवर दृष्टि पोंचवून तो कोठें आहे, तें वांकड्या डोळ्यानें पाहूं लागला. तों नदीच्या पलीकडे तो पाशांत अडकून पडला आहे, असें त्याला दिसलें. त्याबरोबर लघुपाती मोठ्या वेगानें कूर्म व उंदीर यांच्यापाशीं येऊन तें दुःखकर वर्तमान सांगूं लागला. नंतर त्या आपल्या मित्राला संकटांतून सोडविण्याविषयीं काय उपाय करावयाचा तें ठरवून लघुपाती, हिरण्यकाला चोंचींत धरून चित्रांगाजवळ गेला. तेथें पोंचतांच कठिण पाशांत अडकल्यामुळें अतिशय दुःख भोगणाऱ्या हरणाला, उंदरानें आपल्या तीक्ष्ण दातांनीं दोऱ्या तोडून बंधमुक्त केलें. इतकें होत आहे तों, मंथरकही नदीच्या पात्रांतून पोहत, त्या तीरावर आला. मित्रांच्या प्रेमामुळें तटावर चढून तेथें ते तिघे होते, तेथपर्यंत तो जाऊन पोंचला.

पण इतक्यांत हरणाला धरण्याकरितां पाश लावणारा व्याध तेथें आला. त्याला पहातांच हरिण, कावळा व उंदीर पळून गेले; पण कूर्म त्याच्या हातीं लागला. तेव्हां हरिण हातचा निसटून गेला, म्हणून दुःखी झालेला तो दुष्ट त्या कांसवालाच जाळ्यांत टाकून, व तें खांद्यावर घेऊन निघाला.

* गुणिनो न विदेशोऽस्ति न संतुष्टस्य चासुखम् ।
धीरस्य च विपन्नास्ति नासाध्यं व्यवसायिनः ॥

कावळ्यानें उंच वृक्षावर बसून हें सर्व पाहिलें. नंतर उंदिरानें सांगितलेली युक्ति योजण्याकरितां हरीण बराच दूर जाऊन, नदीच्या प्रवाहाजवळच मेल्याचें सोंग घेऊन पडला. कावळा त्याच्या डोक्यावर बसून जणुं काय त्याचे डोळेच खात असल्याप्रमाणें दाखवूं लागला. तें पाहून आपल्याच पाशांनीं पीडल्यामुळें हा मृग येथें मरून पडला आहे, असें त्या व्याधाला वाटलें, व तो त्याला उचलून नेण्याकरितां जाळयांत घातलेल्या कांसवाला नदीच्या तीरावर ठेवून स्वतः हरिणापाशीं जाऊं लागला. तों इतक्यांत मागून उंदरानें येऊन जाळ्याच्या दोऱ्या तोडून कांसवाला मोकळें केलें. त्याबरोबर तो ( कांसव ) पाण्यांत उडी टाकून दुसऱ्या तीराकडे वेगानें जावयास निघाला. तें पाहून व व्याधही अगदीं जवळ आला आहे असें जाणून कावळा ' कॉ कॉ, ' असा कर्कश शब्द करीत हरणाच्या अंगावरून उठून उंच झाडावर जाऊन बसला. हरिणही तत्काल उठून वेगानें पळून गेला. त्यामुळें मनांत खिन्न झालेला व्याध, कांसवाला घेऊन जाण्याकरितां जाळयाजवळ परत येऊन जों पहातो, तों जाळयाच्या दोऱ्या तुटलेल्या असून कूर्मही त्यांतून निसटून गेला आहे, असें त्याला कळलें. तेव्हां हातीं लागलेल्या दोन्ही शिकारी गेल्यामुळें, अधिकच खिन्न झालेला तो त्या दिवशीं आपल्या प्रतिकूल दैवाला दोष देत घरीं गेला.

कांहीं वेळानें निरनिराळ्या मार्गानें येऊन ते चौघेही मित्र आपल्या रहावयाच्या जागीं एकत्र जमले. सर्व सुखरूप असल्यामुळें त्या सर्वांनाच मोटा आनंद झाला. मृत्यूच्या दाढेंतून सुटलेल्या हरिणाला तर अत्यानंद वाटला. तो कूर्मादिकांस म्हणाला,–'खरोखर मी मोठा पुण्यवान् आहें, म्हणूनच तुमच्या सारखे परम मित्र मला मिळाले. आज तुम्ही आपल्या प्राणांचीही उपेक्षा करून मला मृत्यूच्या तोंडातून बाहेर काढलेंत. असो; याप्रमाणें प्रशंसा करणाऱ्या त्या हरणासह काक, कूर्म व उंदीर परस्परांवर अतिशय प्रेम करीत तेथें सुखानें राहिले.

देव, याप्रमाणें पशु–पक्ष्यादि तिर्यक् प्राणीही उत्तम बुद्धीनें आपलें इष्ट संपादन करितात, तेही आपत्कालीं मित्राला, प्राण गेला तरी सोडीत नाहींत. वास्तव मित्रांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवणें अतिश्रेयस्कर असून स्त्रियांचे ठिकाणीं ती ठेवणें अगदीं अयोग्य आहे. कारण स्त्रीयांवरील आसक्तीमुळें ईर्ष्या वाढते. याविषयींही मी एक कथा सांगतों ती ऐका:—

## १०. ईर्ष्यावान् पुरुषाची कथा.

हे प्रभो, एका नगरांत एक ईर्ष्यावान् पुरुष होता. त्याची भार्या त्याला अतिशय प्रिय व तशीच रूपशालिनी होती; पण त्याला तिचा विश्वास मुळींच येत नसे. तो तिला एकटीला कधींच सोडीना. चित्रांतील पुरुषही तिला शीलभ्रष्ट करतील अशी भीति त्याला वाटत असे. एकदां कांहीं अवश्य कार्याकरितां तो तिला बरोबर घेऊनच दुसऱ्या देशीं जावयास निघाला; पण जातांना मार्गांत एक अरण्य लागलें. त्यांत अनेक क्रूर भिल्ल रहात असत, तें वर्तमान ऐकून व त्या भिल्लांना भिऊन त्यानें त्या अरण्याच्या अलिकडेच एका खेडवळ वृद्ध ब्राह्मणाच्या घरीं तिला ठेवलें व तो एकटाच पुढें गेला. तेथें असतांना तिनें त्याच मार्गानें येत जात असलेल्या अनेक भिल्लांना पाहिलें, व त्यांतील एका अति तरुण भिल्लाबरोबर ती साहसी स्त्री निघून गेली. त्याच्या घरीं पोंचल्यावर संशयी पतीच्या हातांतून सुटलेली ती स्त्री, धरण फुटलेल्या नदीप्रमाणें स्वैर वर्तन करूं लागली.

इतक्यांत तिचा पति काम आटोपून, त्या वृद्ध ब्राह्मणाच्या येथें आला, व आपली भार्या मागूं लागला. तेव्हां तो खेडवळ ब्राह्मण म्हणाला,—'बाबा, ती कोठें गेली तें कांहीं मला ठाऊक नाहीं. एकदां या रस्त्यानें बरेच भिल्ल आले होते; तेव्हां त्यांतील एकाद्या तरुणानें तिला नेलें असावें, असें मला वाटतें. त्यांची पल्ली येथून जवळच आहे; तेथें तूं सत्वर जा म्हणजे ती भेटेल. भलतीच कांहीं कल्पना करूं नकोस.' वृद्ध ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून, तो मूर्ख रडत व आपल्या विपरीत बुद्धीची निंदा करीत भिल्लांच्या पल्लीस गेला. तेथें त्यानें आपल्या पत्नीला पाहिलें. तीही पापीण त्याला पाहून भ्याली व त्याच्यापाशीं येऊन म्हणाली,—'माझा कांहीं दोष नाहीं. मला या भिल्लानें बलात्कारानें आणलें.' तेव्हां तो म्हणाला,—'असें जर असेल तर कोणी पाहिलें नाहीं, तोंच आपण येथून निघून जाऊं चल.' पण असें बोलणाऱ्या व विषयासक्तीनें अंध झालेल्या पतीला ती म्हणाली,—'ज्यानें मला येथें आणलें आहे तो भिल्ल शिकारीस गेलेला असून, त्याची आतां येण्याची वेळ झाली आहे. तो येतांच तुला व मलाही, ठार मारून टाकील.

यास्तव, तूं आतां या गुहेंत शिरून येथेंच लपून रहा. रात्रीं तो दुष्ट निजला म्हणजे त्याला मारून आपण येथून निघून जाऊं.

त्या शठ–स्त्रीनें असें सांगितलें असतां, तो मूर्खही गुहेंत लपून राहिला. कामानें ज्याचें चित्त अंध झालें आहे, अशा पुरुषाच्या हृदयांत विवेकाला अवकाश कोठून मिळणार ?* असो; शेवटीं सायंकाळीं आपल्या पत्नीस परत आलेल्या भिल्लाला, त्या कुस्त्रीनें संकटामुळें घरांत येऊन राहिलेला आपला पति दाखविला. तेव्हां क्रूरकर्मी त्या भिल्लानें त्याला गुहेतून बाहेर ओढून काढलें; व सकाळीं देवीला बळी देण्याकरितां, त्याला एका झाडाशीं बांधून ठेविलें. नंतर भोजन करून व रात्रीं त्या मूर्खाच्या समक्ष त्याच्या भार्येशीं यथेच्छ सुरत–सुख भोगून, तो तिच्या सहवर्तमान निजला. त्या दुष्टाला झोंप लागली आहे असें पाहून, झाडाशीं बांधून ठेवलेला तो ईर्ष्यालु पुरुष, चंडीची स्तुतीनें पूजा करून तिलाच अनन्य भावानें शरण गेला. तेव्हां चंडीनें प्रकट होऊन त्याला खड्ग दिलें. त्याच्यायोगानें त्यानें आपलें बंधन, व भिल्लाचें मस्तकही तोडलें. नंतर आपल्या बायकोला उठवून तो म्हणाला,–' प्रिये, मी या पाप्याला मारलें आहे; यास्तव तूं आतां चल.' तें ऐकून तिला मोठें दुःख झालें; पण त्या वेळीं भीतीनें कांहीं एक न बोलतां, हळूच तुटलेलें मस्तक घेऊन ती पतीबरोबर निघाली. सकाळीं एका नगरांत पोंचतांच, नगररक्षकांना तें तुटलेलें शिर दाखवून, ' पहा हो, या नीचानें माझ्या नवऱ्याचें शिर तोडलें ' असें बोलून, ती मोठ्यानें आक्रोश करूं लागली. तेव्हां नगररक्षकांनीं तिच्यासहवर्तमान, त्या ईर्ष्यावानाला राजाकडे नेलें. राजसभेंत न्यायासनापुढें उभें करून त्याला प्रश्न केला असतां; त्यानें घडलेलें खरें खरें वृत्त सांगितलें. राजानें त्या स्त्रीचें म्हणणेंही ऐकून घेतलें, व त्यांतील तत्त्व काय आहे त्याचा निश्चय करून, त्या कु–स्त्रीचे कान व नाक कापविलें; आणि तिच्या पतीला सोडून दिलें. नंतर कु–स्त्रीरूपी महाच्या तडाक्यांतून सुटलेला; तो मूर्ख आपल्या घरीं परत गेला.

देव, पतीच्या ईर्ष्येनें नियंत्रित झालेली स्त्री असे अनर्थ करीत असते. ईर्ष्याच स्त्रीला परपुरुषाचा संग करावा, असें शिकविते. यास्तव मनांत

---

* कोऽवकाशो विवेकस्य हृदि कामान्धचेतसः ।

असलेल्याही ईर्ष्येला प्रकट न करितां अति बुद्धिमानानें स्त्रीच्या शीलाचें रक्षण करावें. * तसेंच कल्याण इच्छिणाऱ्या पुरुषानें स्त्रियांना आपलें रहस्य सांगूं नये. याविषयींही एक कथा सांगतों ती ऐका:—

## ११. गरुड व नाग यांची कथा.

'गरुडाच्या भीतीनें एक नाग भूलोकीं पळून आला व मानुषरूपानें एका वेश्येच्या येथें राहिला. ती त्याच्यापासून रोज पांचशें हत्ती खर्ची घेत असे. नागही ते तिला रोज देऊं लागला. तें पाहून विस्मित झालेली ती विलासिनी–' इतके हत्ती तुम्ही कोठून आणतां व तुम्ही खरोखरीच कोण आहां?'–असें मोठ्या आग्रहानें विचारूं लागली. तेव्हां काममोहित झालेला तो मूर्ख म्हणाला–'प्रिये, कोणाला सांगूं नकोस. मी नाग आहें, गरुडाच्या भीतीनें मी हें असें रूपान्तर करून येथें राहिलों आहें.'

तें ऐकून वेश्येनें तें रहस्य आपल्या कुंटिणीला सांगितलें. इतक्यांत गरुड त्या नागाला जगभर हुडकीत मनुष्यरूपानेंच तिच्या येथें आला, व कुंटिणीपाशीं जाऊन म्हणाला,–'मी आजचा एक दिवस तुझ्या मुलीच्या येथें रहाणार आहें, तर तिची काय खर्ची असेल ती मजपासून घे.' तें ऐकून कुंटीण म्हणाली,–'येथें एक नाग येऊन राहिला आहे, तो रोज माझ्या मुलीला पांचशें हत्ती देत असतो. तेव्हां तुझ्या एका दिवसाच्या खर्चीला घेऊन काय करावयाचें आहे?'

तिच्या या सहज बोलण्यावरून गरुडानें आपला वैरी येथेंच आहे, असें ताडलें, व अतिथिरूपानें त्या वेश्येच्या घरांत प्रवेश केला. आंत जातांच माडीवर बसलेला नाग त्याला दिसला. मग काय विचारतां! गरुडानें तत्काल आपलें स्वरूप धारण करून व त्याच्यावर उडी टाकून त्याला मारलें. यास्तव, सुज्ञानें आपलें रहस्य असल्या स्त्रियांना कधींही सांगूं नये.§ देव,–'आणखी एका मूर्खाची कथा मी सांगतों ती ऐका.'

---

* एवं हि कुरुते देव योषिदीर्ष्यानियन्त्रिता ।
शिक्षयत्यन्य पुरुषासङ्गमीर्ष्यैव हि स्त्रियः ॥
तदीर्ष्यामप्रकाश्यैव रक्ष्या नारी सुबुद्धिना ॥

§ अतो न कथयेत्प्राज्ञो रहस्यं स्त्रीष्वनर्गलम् ॥

## १२. मूर्ख टकल्याची कथा.

एक टकल पडलेला मनुष्य होता. त्याचें डोकेंही सर्व केंस निघून गेल्यामुळें तांब्याच्या घागरीप्रमाणें गुळगुळीत झालें होतें. तो मूर्ख धनवान् होता, पण डोक्याला केंस नसल्यामुळें त्याला चारचौघांत जाण्यायेण्याचीही लाज वाटत असे. एकदां एक, लबाड्या करूनच निर्वाह करणारा शठ त्याच्याजवळ आला व म्हणाला,–'एक वैद्य आहे, तो केंस येण्याचें औषध जाणतो'–तें ऐकतांच तो मूर्ख म्हणाला–'त्याला जर आणशील तर मी तुला व त्या वैद्यालाही धन देईन.' तें ऐकून बरेच दिवस तो धूर्त त्याच्या धनाचा उपभोग घेत राहिला. नंतर त्यानें एका धूर्त वैद्याला त्याच्यापाशीं आणलें, तोही पुष्कळ दिवस त्याच्या धनावर उपजीविका करीत राहिला. कांहीं दिवसांनीं वैद्यानें आपल्या मस्तकावरील पागोटें काढून त्याला आपलें केशरहित डोकें दाखविलें; पण तें पाहूनही तो मूर्ख कांहीं विचार न करितां केंस येण्याचें औषध त्याच्यापाशीं मागूं लागला, तेव्हां वैद्य हंसून म्हणाला–'मी स्वतःही जर खल्वाट (टकल पडलेला) आहें तर दुसऱ्याच्या डोक्यावर केंस कसा आणूं शकेन ! हें कळावें म्हणूनच तर मी आपलें डोकें उघडें करून त्याच्यावर एकही केंस नाहीं, हें तुला दाखविलें; तथापि तुज मूर्खाला एवढेंसुद्धां कळलें नाहीं. धिक्कार असो,' असें बोलून धूर्त वैद्य तेथून निघून गेला. हे देव, याप्रमाणें धूर्त लोक मतिमंदाशीं क्रीडा करीत असतात.* ही केशमुग्धाची कहाणी झाली. आतां तैलमुग्धाची कथा ऐका.

## १३. तैलमुग्धाची कथा.

कोणा एका शिष्टाचा एक मुग्ध ( मूर्ख ) पुरुष नोकर होता. त्याला त्याच्या स्वामीनें एका वाण्याच्या दुकानीं तेल आणावयास पाठविलें. तेव्हां बरोबर नेलेल्या पात्रांत तेल घेऊन तो परत येऊं लागला, पण पात्रांतील तेल डुचमळत असल्यामुळें मार्गांत कोणी एकानें–' अरे तेल खालीं गळतें आहे पहा, भांडें नीट धर.'–असें त्याला म्हटलें. तें ऐकून तेल खरोखरीच खालीं गळत आहे कीं काय, हें पहाण्यासाठीं त्यानें तें भांडें उपडें करून पाहिलें. त्याबरोबर त्यांतील सर्व तेल भूमीवर पडलें.

---

* एवं देव सदा धूर्ताः क्रीडन्ति जडबुद्धिभिः ।

तें पाहून लोक त्याला हसूं लागले; व त्याच्या स्वामीला जेव्हां हें कृत्य कळलें, तेव्हां त्यानें त्याला आपल्या येथून घालवून दिलें. तस्मात् मूर्खाला त्याचीच बुद्धि हितकर होते. दुसऱ्याचा उपदेश त्याच्या पथ्यावर पडत नाहीं.* आतां अस्थिमुग्धाची कथा सांगतों ती ऐका.—

## १४. अस्थिमुग्धाची कथा.

कोणी एक मूर्ख पुरुष होता. त्याची भार्या असाध्वी होती. एकदां पति कांहीं कामाकरितां देशांतरीं गेला असतां, ती घरांत आपल्या इमानी दासीला ठेवून व पति आल्यावर काय काय सांगावयाचें तें शिकवून, कोणत्याही प्रकारच्या प्रतिबंधावांचून यथेच्छ विषयोपभोग घेण्याकरितां उपपतीच्या घरीं गेली. कांहीं दिवसांनीं पति परत आला असतां, तिनें शिकवून ठेविल्याप्रमाणेंच, रडत, तिच्या दासीनें तुझी गृहिणी जळाली व मेली, असें खोटेंच सांगितलें; व त्या मूर्खाला स्मशानांत नेऊन दुसऱ्याच एका चितेंतील हाडें दाखविलीं. तीं पाहून व रडत रडत गोळा करून त्यानें तिचें क्रियाकर्मान्तर केलें. तीं हाडें तीर्थामध्यें टाकून तो जडमति श्राद्धविधि करूं लागला. नंतर त्या कर्मकरी ( दासी ) नें श्राद्धाकरितां एक चांगला ब्राह्मण आहे, असें सांगून त्याच्या भार्येच्या उपपतीलाच तिनें ब्राह्मण सांगितलें. प्रत्येक महिन्यास तो जार ब्राह्मण उत्तम वस्त्र नेसलेल्या व अमूल्य भूषणें घातलेल्या त्याच्याच स्त्रीसह त्या मूर्खाच्या येथें जाऊन मिष्टान्न भक्षण करीत असे. तें व्यभिचार करणारें जोडपें घरांत जेवावयास बसलें म्हणजे ती दासी बाहेर येऊन त्या मूर्खाला म्हणे,— धनिराज, घरांत येऊन पहा तर खरें ! तुमची भार्या सती–धर्माच्या प्रभावानें परलोकाहून शरीरासह येऊन ब्राह्मणाच्या पंक्तीस भोजन करीत आहे. तें ऐकून व पाहून तो मूर्खशिरोमणिही सर्व खरें मानीत असे. याप्रमाणें सरळ चित्ताच्या लोकांना कुटिलबुद्धि स्त्रिया सहज फसवितात.† ही अस्थिमुग्धाची कथा झाली. आतां चांडाल–कन्येची कथा ऐका.

---

* तस्मात्स्वबुद्धिर्मुग्धस्य वरं न त्वनुशासनम् ।

वञ्च्यन्ते हेलयैवैवं कुस्त्रिभिः सरलाशयाः ।

## १५. चांडाल-कन्येची कथा.

एक रूपवती चांडाल-कन्या होती. त्या खुळीनें सार्वभौम राजा आपल्याला पति मिळावा अशी इच्छा केली. एकदां नगरांत फिरावयास निघालेल्या सर्वोत्तम राजाला तिनें पाहिलें, व हाच आपला पति आहे, अशा बुद्धीनें ती त्याच्या मागून जाऊं लागली. इतक्यांत त्याच मार्गानें कोणी एक मुनि आला. त्याला पहातांच राजा गजावरून खालीं उतरला, व मुनिवर्याला प्रणाम करून व पुनः हत्तीवर बसून आपल्या वाड्यांत निघून गेला. तें पाहून हा मुनि राजापेक्षांही श्रेष्ठ आहे, यास्तव मी याचीच भार्या, असें म्हणून ती त्याच्या मागून जाऊं लागली. मुनीनें जातां जातां रस्त्यावर एक शून्य शिवमंदिर पाहिलें. तो आंत शिरला व भूमीवर गुडघे टेकून, शिवापुढें अनन्य भक्तीनें मस्तक नम्र करून बराच वेळ तसाच राहिला. नंतर तोंडानें शिव, शिव, हर, हर, असें म्हणत-तो तेथून निघून गेला. तें पाहून चांडाल-कन्येला शिवलिंगच श्रेष्ठ आहे, असें वाटलें, व ' हाच माझा पति, ' असें म्हणून ती तेथेंच धरणें धरून बसली. थोड्या वेळानें त्या शिव-मंदिरांत एक कुत्रा आला व मंदिरभर इतस्ततः हुंगीत तो सांबाच्या पिंडीवर चढला, आणि मागचा एक पाय उचलून त्या पशूनें आपल्या जातीला उचित असलेलें कर्म केलें. तें पाहून खुळ्या चांडाल-कन्येला देवापेक्षां कुत्रा श्रेष्ठ आहे, असा भ्रम झाला, व देवाला सोडून ती त्याच्या मागोमाग पतीच्या भावनेनें निघाली. तो कुत्रा एका परिचित तरुण चांडालाच्या घरीं गेला आणि प्रेमानें त्याच्या पायांवर लोळूं लागला. तें प्रत्यक्ष पाहून व कुत्र्यापेक्षां हा चांडाल-पुत्र उत्तम आहे असें समजून, चांडाल-कन्येनें स्वजातीच्या पुरुषालाच मोठ्या संतोषानें वरलें. याप्रमाणें जड कितीही दूरवर भटकत गेले, तरी पुनः आपल्या पूर्वस्थळींच येऊन पडतात.'* आतां एका मूर्ख राजाची कथा संक्षेपतः सांगतों ती ऐका.'

## १६. मूर्ख राजाची कथा.

कोणी एक मूर्ख राजा होता. तो पूर्ण कोशानें संपन्न असूनही कृपण होता. एकदां त्याचें हित इच्छिणारे मंत्री त्याला म्हणाले,–' हे देव,

---

* एवं कृतपदा दूरे पतन्ति स्वपदे जडाः ।

यालोकीं केलेलें दान परलोकसंबंधीं दुर्गतीचा क्षय करीत असतें. यास्तव दान, आयुष्य व धन क्षणिक आहे.*' तें ऐकून राजा म्हणाला–' मेल्यावर मी दुर्गतीला प्राप्त झालों आहें, असें प्रत्यक्ष पाहून नंतर दान देईन.' तेव्हां मनांतल्या मनांत हंसत ते मंत्री उगीच राहिले. याप्रमाणें धनानें आपण होऊन सोडल्यावांचून, मूढ स्वेच्छेनें त्याचा त्याग करीत नाहींत,†' देव, आतां दोघां मित्रांची कथा ऐका.'

## १७. दोघां मित्रांची कथा.

कान्यकुब्ज देशांत चंद्रापीड या नांवाचा एक राजा होता. त्याचा धवलमुख या नांवाचा कोणीएक सेवक असे. तो नेहमीं बाहेरच खाऊन पिऊन आपल्या घरीं जात असे. 'रोज खाऊन पिऊन तृप्त होऊन कोठून येतां?' असें भार्येनें विचारलें असतां धवलमुख तिला असें सांगूं लागला,–'प्रिये, मी आपल्या मित्रांच्या येथून प्रत्यहीं जेऊन येतों. माझे दोन मित्र आहेत, त्यांतील कल्याणवर्मा या नांवाचा एक असून तोच मजवर भोजनादि उपकार करणारा आहे. दुसरा वीरबाहु तो प्राणांनींही माझ्यावर उपकार करील, असा आहे.' तें ऐकून त्याची भार्या म्हणाली–'असें जर असेल तर मलाही ते दोघे मित्र दाखवा.'

तिचें हें म्हणणें मान्य करून तो तिला कल्याणवर्म्याच्या येथें घेऊन गेला. त्या मित्रानेंही उत्तम उपचारांनीं त्या दोघांची सेवा केली. दुसऱ्या-दिवशीं तो भार्येसह वीरबाहूच्या येथें गेला. त्यावेळीं वीरबाहु जुगार खेळत बसला होता. त्यानें त्याचें नुस्तें स्वागतच करून निरोप दिला. तेव्हां धवलमुखाची भार्या मोठ्या कौतुकानें त्याला म्हणाली,–'प्रिया, कल्याणवर्मानें तुमचें इतकें उत्तम आतिथ्य केलें, व वीरबाहूनें नुस्तें स्वागत करूनच निरोप दिला, तरी सुद्धां तुम्ही वीरबाहूलाच उत्तम मित्र समजतां याचें कारण काय?' तें ऐकून तो आपल्या भार्येला म्हणाला, "तूं जा, व क्रमानें त्या दोघांनांही 'राजा अकस्मात् मजवर रागावला आहे.' असें खोटेंच सांग. म्हणजे तुला आपोआपच कळेल."

---

* दानं हरति देवेह दुर्गतिं पारलौकिकीम् ।
तद्देहि दानमायूंषि भङ्गुराणि धनानि च ॥

† एवं नोज्झति मूढोऽर्थान्यावदर्थैः स नोज्झितः ॥

धवलमुखानें असें सांगितलें असतां ती प्रथम कल्याणवर्म्याकडे जाऊन तसेंच सांगूं लागली, तें सर्व ऐकून घेऊन तो म्हणाला.-'बाई, मी वैश्यपुत्र आहें, तेव्हां मी राजाला काय करूं शकणार ?' नंतर ती वीरबाहूकडे जाऊन तसेंच सांगूं लागली. तें कानीं पडतांच तो वीर ढाल-तरवार घेऊन राजाकडे धांवत चालला. पण मध्येंच धवलमुखानें त्याला भेटून 'मित्रा, मंत्र्यांनीं राजाचें कोपापासून निवारण केलें आहे, यास्तव तूं आतां आपल्या घरीं परत जा.' असें सांगितलें, व घरीं पाठविलें. नंतर तो भार्येला म्हणाला-'हे सुंदरि, माझ्या या दोन्ही मित्रांतील अंतर तुला आतां कळलें ना ?' धवलमुखाचें तें भाषण ऐकून ती संतुष्ट झाली. सारांश देव, याप्रमाणें एकादा मित्र उपचारानें व एकादा धैर्यानें मित्रावर उपकार करीत असतो. असल्या दोघांही मित्रांच्या ठायीं स्निग्धतायोग जरी समान असला तरी तेल तें तेल व तूप तें तूप.* (नुसत्या स्नेहानेंच त्यांची बरोबरी होत नाहीं.) असो; याप्रमाणें अनेक मूर्खांच्या कथा क्रमानें सांगून गोमुख सचिव नरवाहनदत्ताला आणखी एक कथा सांगूं लागला.

## १८. जलभीताची कथा.

कोणी एक खुळा वाटसरू मोठ्या संकटानें एका मोठ्या अरण्याचें उल्लंघन केल्यामुळें तहानेनें व्याकुळ झाला, व पाणी शोधूं लागला. तों त्याला एक नदी लागली; पण तिचें पाणी न पितां तो दुसरेंच जल हुडकूं लागला. इतक्यांत तेथल्या एका सज्जनानें,-' अरे भल्या माणसा, या नदींत इतकें पाणी वहात असतांना तूं तें न पीतां दुसरें कशाला हुडकतोस ?' असें म्हटलें. त्यावर तो मूर्ख म्हणाला,-'इतकें पाणी मी कसें पिऊं ! तें सगळें माझ्या पोटांत राहील तरी का ?' तें ऐकून सज्जन पुरुष म्हणाला,-'अरे वेड्या, तूं जर सगळें पाणी न प्यालेस तर तुला कोणी दंड करील कीं काय ? तुला हवें तितकें पी व मार्गानें निघून जा. त्यानें असें उपहासपूर्वक सांगितलें असूनही त्या मूर्खानें नदींतील मधुर पाण्यानें आपली तृषा शांत करून घेतली नाहीं. हे देव, याप्रमाणें अबुद्धिमान्

* इत्यन्यदुपचारेण मित्रमन्यत्तु सत्वतः ।
तुल्येऽपि स्निग्धतायोगे तैलं तैलं घृतं घृतम् ॥

ुरुष संपूर्णपणें जें जें करूं शकत नाहींत, त्याचा ते अंशही यथाशक्ति करीत नाहींत.* हे प्रभो, आतां एका पुत्रघातक्याची कथा ऐका.

### १९. पुत्रघातीची कथा.

कोणी एक मूर्ख व दरिद्री पुरुष होता. त्याला पुष्कळ पुत्र होते. त्यांतील एकदां एक मेला. तेव्हां 'हा माझा लाडका बाळ इतक्या दूर एकटाच कसा जाईल!' असें म्हणून त्यानें दुसऱ्या एका मुलाला आपल्या हातानें मारलें. तें कळतांच गावांतील सर्व लोक त्याला हसूं लागले व त्याची निंदा करूं लागले. त्यांनीं त्या पुत्रघातक्याला आपल्या गांवांतून घालवून दिलें. याप्रमाणें विवेकशून्य मतीचे पशू व मूर्ख सारखेच असतात.† आतां भाऊ होणाऱ्या एकाची कथा ऐका—

### २०. एका भाऊ होणाराची कथा.

कोणी एक मूर्ख मुग्धबुद्धि पुरुष एके जागीं पुष्कळ लोकांमध्यें गोष्टी सांगत होता. तो एका कल्याणस्वरूप पुरुषाला दुरून पाहून म्हणाला, 'हा माझा भ्राता आहे, यास्तव मी याचें धन घेऊन जातों. पण मी याचा कोणी नव्हे; म्हणून मी याचें ऋण घेणार नाहीं.' असें बोलून त्यानें तेथल्या पाषाणांनाही हंसविलें. याप्रमाणें स्वार्थान्धमूढाचें मूर्खत्व तर अति विचित्र‡ असतें. आतां एका ब्रह्मचाऱ्याच्या पुत्राची गोष्ट ऐका.—

### २१. पितृश्लाघी मूर्खाची कथा.

कोणी एकजण आपल्या मित्रांच्या संघामध्यें पित्याच्या गुणांचें वर्णन करण्यास प्रवृत्त झालेला मूर्ख पित्याच्या गुणवर्णनाच्या भरांत म्हणाला,— "माझा बाप बालपणापासून कडकडीत ब्रह्मचारी होता; त्याच्या सारखा निग्रही पुरुष दुसरा कोणी नाहीं,' तें ऐकून 'तर मग तूं कोठून झालास,'—असें मित्रांनीं विचारलें असतां 'मी त्याचा मानस पुत्र आहें,'

---

* एवं न शक्नुवन्तीह यद्यत्कर्तुमशेषतः ।
यथाशक्ति न तस्यांशमपि कुर्वन्त्यबुद्धयः ॥

† एवं पशुश्च मूर्खश्च निर्विवेकमती समौ ॥

‡ एवं मूढस्य मूढत्वं स्वार्थान्धस्याति चित्रता ॥

अस तो फिरून सांगूं लागला; तेव्हां त्या जडमतीला त्याचे मित्र हंसूं लागले. याप्रमाणें जडमति पुरुष असंबद्ध व भलतेच्या भलतेंच बोलत असतात.* आतां एका जोशाची गोष्ट सांगतों ती ऐका.

## २२. एका ज्योतिष्याची कथा.

एक नामधारक जोशी होता, त्याला ज्योतिषाचें ज्ञान मुळींच नव्हतें. आपल्या देशांत निर्वाह होत नाहीं असें पाहून, तो भार्या व पुत्र यांसह तेथून निघून परदेशांत गेला. तेथें आपली द्रव्यपूजा व्हावी, म्हणून तो मिथ्या ज्ञान प्रकट करूं लागला. सर्व लोकांसमक्ष आपल्या अल्प बालकाला आलिंगन देऊन तो रडूं लागला, व लोकांनीं रडण्याचें कारण विचारलें असतां, तो पापी सांगूं लागला कीं,–'मी भूत, भविष्य व वर्तमान जाणतों. हा माझा बालक सातव्या दिवशीं मरणार, हें मला कळलें आहे. म्हणून मी रडतों.' असें बोलून व सर्व लोकांना विस्मित करून, सातव्या दिवशीं पहांटेसच आपल्या, त्या निजलेल्या मुलाला त्यानें मारलें. मुलगा मेला आहे असें पाहून, लोकांना त्याच्या ज्ञानाचा प्रत्यय आला. त्यांनीं मोठ्या आदरानें त्याला आपल्याविषयीं पुष्कळ गोष्टी विचारून घेऊन, विपुल धनही दिलें. त्या मूर्खानें कोणाला कांहीं, कोणाला कांहीं असें सांगून व तें सर्व धन घेऊन स्वदेशीं प्रयाण केलें. याप्रमाणें द्रव्यलोभानें आपलें मिथ्या-ज्ञान प्रकट करण्याची इच्छा करणारे मूर्ख, आपल्या पुत्रालाही मारतात! बुद्धिमानानें अशल्या घातक्यांवर विश्वास ठेवूं नये.¶ प्रभो, आतां एका रागीट पुरुषाची कथा ऐका—

## २३. एका रागीटाची कथा.

कोणी एक पुरुष बाहेरून ऐकत असतांना, एके ठिकाणीं एकजण आंत त्याच्याच गुणांची प्रशंसा, आपल्या लोकांपुढें करूं लागला. तेव्हां दुसरा एकजण त्याला म्हणाला,–' मित्रा, तो मोठा गुणवान् आहे, हें खरें; पण त्याच्यामध्यें दोन मोठे दोष आहेत; एक साहस व दुसरा

---

* अत्यारूढं वदन्त्येवमसंबद्धं जडाशयाः।

¶ इत्यर्थलोभान्मिथ्यैव विज्ञानख्यापनेच्छवः।
मूर्खाः पुत्रमपि घ्नन्ति न रज्येत्तेषु बुद्धिमान्॥

क्रोध.' त्याच्या तोंडचे शब्द बाहेर असलेल्या त्या रागिटाच्या कानीं पडतांच तो एकाएकीं आंत आला, व ते बोलणाऱ्याच्या गळ्याला आपल्या धोतराचा फांस लावून,–' कायरे मूर्खा, मी कोणतें साहस केलें व क्रोध केव्हां केला ?' असें क्रोधानें लाल होऊन, त्याला विचारूं लागला. तेव्हां तेथले सर्वजण हंसून त्याला म्हणाले,–' अरे मित्रा, तुझें साहस व क्रोध तूं या वेळीं प्रत्यक्षच दाखवीत आहेस.' असो; देव, याप्रमाणें आपला उघड उघड दोषही, अज्ञांना कळत नाहीं. आतां कन्येला वाढविणाऱ्या एका मूर्खाची कथा ऐका.

## २४. कन्यावर्धक मूर्खाची कथा.

कोणी एक राजा होता; त्याला एक सुरूप कन्या झाली. अतिस्नेहानें तिला सत्वर वाढविण्याची इच्छा करणारा, तो वैद्यांना बोलावून प्रीतिपूर्वक असें म्हणाला,–' वैद्यराज, असा कांहीं उत्तम औषध-प्रयोग करा, कीं त्याच्या योगानें ही माझी कन्या शीघ्र मोठी होईल, व उत्तम भर्त्याला ती देतां येईल.' तें ऐकून त्या मूर्खाच्या द्रव्यावर उपजीविका करण्याची इच्छा करणारे वैद्य त्याला म्हणाले,–' देव, याला एक औषध आहे, पण तें येथून फार दूर आहे. तेथपर्यंत गेल्यावांचून हातीं येण्यासारखें नाहीं. यास्तव हे प्रभो, आम्ही तें जाऊन आणीपर्यंत आपण ही कन्या कोणाच्याही दृष्टीस न पडेल अशा जागीं ठेवा; कारण त्या औषधाचें हें असेंच पथ्य आहे.' याप्रमाणें सांगून त्यांनीं त्या राजकन्येला अगदीं गुप्त ठेविलें. ती राजाच्याही दृष्टीस न पडेल, अशी व्यवस्था त्यांनीं केली होती. दूरचें औषध आणण्याच्या आशेनें त्यांनीं पुष्कळ वर्षे जाऊं दिलीं व कालयोगानेंच ती कन्या तरुण झाली असतां ' पहा दुरून आणलेल्या औषधाच्या प्रभावानें ही तुमची लाडकी तनया आतां मोठी झाली आहे;' असें म्हणून त्यांनीं तिला राजाच्या समोर आणलें. तेव्हां ती खरोखरच विवाहाला योग्य झाली आहे, असें पाहून राजानें वैद्यांना विपुल धन दिलें. याप्रमाणें जडबुद्धि धनाढ्याच्या धनावर धूर्त कपटानें आपला निर्वाह[¶]क रितात. आतां एका पंडितंमन्याची गोष्ट ऐका—

---

* एवं स्वदोषः प्रकटोऽप्यज्ञैर्देव न बुध्यते ।

¶ इति व्याजाजडधियो धूर्तैर्भुज्यन्त ईश्वराः ।

## २५. पंडितंमन्याची कथा.

ज्याला आपल्या प्रज्ञेचा मोठा अभिमान वाटत असे, असा एक नगरवासी पुरुष होता. त्याच्यापाशीं एक गांवढळ मनुष्य एक वर्षभर नोकर असून पुरें वेतन मिळत नसल्यामुळें तो धन्याला विचारून आपल्या घरीं गेला. तो गेल्यावर नगरवासी पंडितंमन्य आपल्या भार्येला म्हणाला,-'प्रिये, तो नोकर जातांना तुझ्याजवळून कांहीं घेऊन तर गेला नाहीं ?' त्यावर ती म्हणाली,-'महाराज, मी त्याला अर्धा पण ( ४० कवड्या ) जातांना दिला.' तें ऐकून त्या शहाण्याला मोठा राग आला. हा माझा अर्धा पण फुकट गेला, असें त्याला वाटलें, व तो त्या चाळीस कवड्या परत आणण्याकरितां चारशें कवड्या खर्च करून त्या गरीबापाशीं गेला, आणि बायकोनें दिलेला अर्धा पण त्यानें त्याच्यापासून परत आणला. नंतर तें आपलें व्यवहारचातुर्य तो चार चौघांत सांगूं लागला. तेव्हां सर्व लोक हसूं लागले. याप्रमाणें ज्याची बुद्धि धनानें अंध झाली आहे, तो थोड्याशा धनाकरितां पुष्कळ घालवितो.† आतां पाण्यांत खण ठेवणाऱ्या एका मूर्खाची गोष्ट सांगतों ती ऐका.

## २६. पाण्यांत खण ठेवणाराची कथा.

कोणी एक खुळा नौकेंतून समुद्राच्या पार जात होता. तों इतक्यांत त्याच्या हातांतून रुप्याचें पात्र खालीं समुद्र-जलांत पडलें. तेव्हां भोंवरा व लाट यांची खूण ठेवून 'परत येतांनां मी तें भांडें येथून काढून घेईन' असें तो मनांत म्हणाला, व पुढें चालला. कांहीं वेळानें तो समुद्राच्या परतीरास जाऊन पोंचला. तेथेंही त्याला जलामध्यें भोंवरा, व लाट दिसली. त्याबरोबर 'अरे माझें पात्र तर येथेंच आहे; मीं ठेविलेली खूण ही येथेंच दिसत आहे.' असें म्हणून तो मूर्ख तेथें वारंवार बुड्या मारूं लागला. तें पाहून तेथल्या लोकांनीं विचारलें असतां, त्यानेंही समुद्र जलांत बुड्या मारण्याचें कारण त्यांनां सांगितलें. तें ऐकून ते सर्व हसूं लागले. आतां, एक प्रतिमांस देणाऱ्या राजाची कथा ऐका;—

---

† एवं बहु क्षपयति स्वल्पस्यार्थे धनान्धधीः ॥

## २७. मांस देणाऱ्या राजाची कथा.

एका मूर्ख राजानें आपल्या मंदिरांतून, खालीं असलेले दोन पुरुष पाहिले. त्यांतील एकानें स्वयंपाकगृहांतून थोडेसें मांस घेतलें होतें. तें पहा-तांच राजाला मोठा कोप आला, व त्यानें मांस हरण करणाऱ्या त्याच्या अंगाचें मांस कापून काढविलें. त्याबरोबर तो बिचारा, आक्रोश करीत भूमीवर पडला. तें पाहून ज्याला मोठी दया आली आहे, असा राजा प्रतीहारास म्हणाला,-' पांच तोळे मांस काढून घेतल्यामुळें याला हें दुःख होत आहे, यास्तव त्याहूनही अधिक मांस याला दे; म्हणजे याची पीडा दूर होईल.' तें ऐकून-' ज्याचें मस्तक तोडलें आहे; त्याला शंभर मस्तकें दिलीं तरी तो जिवंत होईल कीं काय ?* तथापि हे देव, आपल्या आज्ञेप्रमाणें याला मी मांस देतों.' असें म्हणून प्रतीहार बाहेर गेला व हसूं लागला. नंतर त्यानें वैद्यांकडून त्याची व्यथा शांत कर-विली व राजाज्ञेप्रमाणें मांसही दिलें. याप्रमाणें मूढ प्रभु, निग्रह व अनु-ग्रह कसा करावा तें जाणत नाहीं.†

## २८. एका मूर्ख स्त्रीची कथा.

एक मतिमंद स्त्री होती. तिला एक पुत्र होता, तरी दुसरा व्हावा अशी तिला इच्छा झाली. ती दुसऱ्या पुत्राची प्राप्ति कशी होईल, म्हणून एका धूर्त तापसीला विचारूं लागली, तेव्हां ती पाखंडी तापसी तिला म्हणाली, 'वत्से, हा जो तुझा बालक आहे त्याला मारून देवतांना बलि दे, म्हणजे खचित तुला दुसरा पुत्र होईल.' या तिच्या सांगण्याप्रमाणें त्या मूर्ख स्त्रीनें करण्याचा निश्चय केला, पण इतक्यांत दुसरी एक वृद्ध व हित-करणारी स्त्री तिला एकांतांत नेऊन म्हणाली,-' अग पापे, झालेल्या पुत्राला मारून तूं न झालेला पुत्र मिळविण्याची इच्छा करीत आहेस ! पण तोही झाला नाहीं तर काय करशील ?' असें बोलून व तिला आणखीं पुष्कळ बोध करून, त्या वृद्ध आर्येनें त्या पापापासून तिला परतविलें. याप्रमाणें शाकिनींशीं संगत झालेल्या स्त्रिया अकार्यांत प्रवृत्त होतात; पण वृद्धांच्या उपदेशानें ज्यांचें नियमन केलें आहे, अशा त्या मोठ्या

---

* किं जीवति शिरश्छिन्नो दत्तैश्च शिरःशतैः ।

† एवं मूढप्रभुर्वेत्ति निग्रहं नाप्यनुग्रहम् ॥

कष्टानें रक्षण केल्या जातात.‡ असो; हे देव, आतां या आवळे आणणाराची गोष्ट ऐका—

## २९. आवळे आणणाऱ्याची कथा.

एका गृहस्थाचा एक मूढबुद्धि सेवक होता. त्या गृहस्थाला आवळे फार आवडत असत. म्हणून त्यानें आपल्या त्या नोकराला 'बागेंत जाऊन गोड आवळे मजकरितां घेऊन ये.' असें सांगितलें. तेव्हां त्यानें प्रत्येक आवळा दातानें चावून व गोड आहे कीं नाहीं, तें पाहून आणलें. आणि धन्याजवळ येऊन, महाराज, हे सर्व आवळे मी स्वतः चावून पाहून आणले आहेत, घ्या; असें म्हणाला. तें ऐकून व सर्व आवळे त्यानें उष्टे केले आहेत असें पाहून, धन्यानें त्या आंवळ्यांबरोबरच मूर्ख सेवकालाही घराबाहेर घालविलें. याप्रमाणें प्रज्ञाशून्य पुरुष आपला व धन्याचाही स्वार्थ नष्ट करून सोडतो.*

## ३०. दोघां भावांची कथा.

पाटलीपुत्र नगरांत दोघे ब्राह्मण भ्राते होते. त्यांतील यज्ञसोम हा ज्येष्ठ व कीर्तिसोम हा कनिष्ठ होय. त्या ब्राह्मणपुत्रांचें पितृसंबंधीं (वडिलार्जित) धन फार होतें. कीर्तिसोमानें आपला भाग व्यवहारानें वाढविला, व यज्ञसोमानें आपल्या भागास आलेलें धन खाण्यापिण्यांत व इष्ट–मित्रांना देण्यांत खर्च करून सोडलें. त्यामुळें तो शेवटीं निर्धन होऊन आपल्या भार्येला म्हणाला, "प्रिये, मी धनाढ्य असून आतां निर्धन झालों. तेव्हां अशा अवस्थेंत मी आप्तांमध्यें कसा राहूं? आपण परदेशास जाऊं चल." त्यावर 'वाटखर्ची व इतर सामग्री यांवांचून कसें जावयाचें?' असें तिनें उलट म्हटलें असतांही यज्ञसोमानें पुष्कळच आग्रह धरिला. तेव्हां शेवटीं त्याची भार्या त्याला म्हणाली, 'आपल्याला अवश्य जावयाचेंच असेल, तर कीर्तिसोम नांवाच्या आपल्या धाकट्या बंधूपाशीं जाऊन वाटखर्चीकरितां थोडेसें धन मागून घ्या.' तें ऐकून तो आपल्या भावाकडे गेला व थोडेंसें धन मागूं लागला. पण त्याची

---

‡ एवं पतन्त्यकार्येषु शाकिनीसंगताः स्त्रियः ।
वृद्धोपदेशेन तु ता रक्ष्यन्ते कृतयन्त्रणाः ॥

* निष्प्रज्ञो नाशयत्येवं प्रभोरर्थमथात्मनः ।

भार्या त्याला ( कीर्तिसोमाला ) म्हणाली, ' ज्यानें आपलें सर्व धन खर्च करून सोडलें आहे, अशाला कसें व कोठचें धन द्यावें ! जो दरिद्री होतो, तो आपला आमच्या मागें लागतो, याला काय तरी करावें बाई ! ' बायकोचे हे शब्द कानीं पडतांच कीर्तिसोम भ्रातृप्रेमानें मनांत आर्द्र झाला होता, तरी त्याला कांहीं देऊं शकला नाहीं. खरोखर कुस्त्रियांच्या अधीन होणें अति कष्टकर आहे.* तेव्हां यज्ञसोम मुकाट्यानें तेथून निघून गेला. त्यानें घडलेलें वर्तमान भार्येला सांगितलें व केवळ देवावर विश्वास ठेवून तो आपल्या पत्नीसह स्वदेश सोडून विदेशास जावयास निघाला. जातां जातां त्यांनां एक अरण्य लागलें. दैववशात् यज्ञसोमाला एका अजगरानें गिळिलें. तें पाहून त्याची भार्या आक्रोश करीत भूमीवर पडली. तेव्हां ' भद्रे, तूं कां आक्रोश करतेस, ' असें अजगर तिला मनुष्यवाणीनें विचारूं लागला. तें ऐकून ब्राह्मणी त्याला म्हणाली,—' अरे महा बलाढ्या, मी कशी बरें नको रडूं ! हाय हाय, मज दुःखितेचें तूं आज या विदेशांत भिक्षापात्र हरण केलेंस.' तें ऐकून अजगराला तिची दया आली व त्यानें आपल्या तोंडांतून एक मोठें सोन्याचें पात्र काढून ' हें घे, ' असें म्हणून तिला दिलें. पण तरी सुद्धां ' अरे महाभागा, मज स्त्रीला या पात्रांत भिक्षा कोण देणार !' असें ती म्हणाली. सद्ब्राह्मणीचें तें म्हणणें ऐकून सर्प तिला बोलला,—' तूं याचना केल्यावर जो कोणी यांत तुला भिक्षा घालणार नाहीं, त्याचें मस्तक शतशः फुटेल. हें माझें खरें, खरें भाषण आहे, ' हे शब्द कानीं पडतांच ती साध्वी त्या अजगराला म्हणाली,—'हेंच जर खरें असेल तर मला तूंच या पात्रांत भर्त्याची भिक्षा घाल.' त्या पतिव्रता ब्राह्मणीनें असें म्हटलें असतां, अजगरानें तत्काल यज्ञसोमाला आपल्या तोंडातून ओकून बाहेर काढलें. तो क्षतरहित व जिवंत होता. याप्रमाणें त्या साध्वीला तत्काल तिचा पति देऊन तो दिव्य अजगर पुरुष स्वतः संतुष्ट होऊन त्या संतुष्ट झालेल्या दंपत्यास म्हणाला, " मी कांचनवेग नांवाचा विद्याधर राजा होतों, पण गौतमाच्या शापानें या अजगर योनीस प्राप्त झालों. साध्वीशीं संवाद होई तों, तो माझा शाप टिकणारा होता. आज या साध्वीशीं संवाद झाल्यामुळें मी

* कष्टा कुस्त्रीषु वश्यता ॥

आतां शापमुक्त झालों आहें." इतकें बोलून व तें सोन्याचें भिक्षापात्र रत्नांनीं भरून त्यांस दिलें, व हृष्ट झालेला तो विद्याधरेश हां हां म्हणतां आकाशांत उडून गेला. नंतर तें दांपत्य सोन्याच्या स्थालीसह मिळालेलीं तीं सर्व रत्नें घेऊन आपल्या घरीं परत आलें. व यज्ञसोम भार्येसह त्या अक्षय्य धनाचा उपभोग घेत तेथें सुखानें राहिला. तात्पर्य, विधाता प्रत्येकाला त्याच्या त्याच्या सत्त्वानुरूप फल* देतो. आतां नापिताची इच्छा करणाऱ्या एका खुळ्याची गोष्ट ऐका--

## ३१. नापिताची इच्छा करणाऱ्या खुळ्याची कथा.

कोणी एका कर्णाटकी पुरुषानें रणांत आपल्या शौर्यानें आपल्या राजाला संतुष्ट केलें. प्रसन्न झालेल्या राजानें त्याला इष्ट वर मागून घेण्याविषयीं सांगितलें, तेव्हां त्या नपुंसकासारख्या शूरानें त्याचाच न्हावी मागून घेतला. सारांश, काय कीं, प्रत्येकजण चित्त-प्रमाणानुरूप बऱ्या-वाईटाची आकांक्षा करितो.† आतां आणखी एका खुळ्याची गोष्ट सांगतों.

## ३२. मजुरी मागणाऱ्या खुळ्याची कथा.

कोणा एका मार्गानें जाणाऱ्या मूर्खाला एका गाडींत बसलेल्या पुरुषानें म्हटलें,--'अरे बा, ही माझी गाडी जराशी सारखी कर बरें' त्यावर तो मूर्ख म्हणाला,--'मी गाडी सारखी केली तर मला काय द्याल?' तें ऐकून गाडींतून जाणारा म्हणाला,--'न किंचित् ददामि' म्हणजे मी कांहीं देणार नाहीं. तें ऐकून मूर्खानें त्याची गाडी सारखी केली व बोलल्याप्रमाणें 'न किंचित् दे' असें म्हणून मागूं लागला; तेव्हां तो गाडीवान् हंसला. सारांश हे देव, याप्रमाणें मूढ पुरुष सदा लोकांच्या उपहासास, पराभवास व निंदेस पात्र होतात आणि सज्जन या लोकीं पूजनीय होतात.‡

याप्रमाणें गोमुख सचिवाच्या तोंडचा हा कथाविनोद रात्रीं इतर सचिवांसह ऐकून, नरवाहनदत्त देव सर्व जगत्रयाच्या विश्रांतीस कारण होणारी निद्रा घेऊं लागला.

---

* सत्वानुरूपं सर्वस्य धाता सर्वं प्रयच्छति ।

† सर्वश्चित्तप्रमाणेन सदसद्वाभिवाञ्छति ।

‡ इति देव सदैव हास्यभावं परिभावं च जनस्य निन्द्यतां च ।
विपदास्पदतां च यान्ति मूढा इह सन्तस्तु भवन्ति पूजनीयाः ॥

# तरंग ६ वा.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून नरवाहनदत्त वत्सेश्वर पित्याच्या दर्शनाकरितां त्याच्यापाशीं गेला. त्याच दिवशीं पद्मावतीचा भ्राता सिंहवर्मा ( म्हणजे मगधेश्वराचा पुत्र ) सर्वांना भेटण्याकरितां आला. त्याचें स्वागत करणें, गोष्टी सांगणें, नानाप्रकारचे प्रश्न करणें, इत्यादिकांमध्यें सर्व दिवस निघून गेल्यावर, नरवाहनदत्त भोजन करून आपल्या मंदिरांत आला; पण तेथें येतांच शक्तियशेविषयीं तो उत्कंठित झाला आहे असें जाणून, रात्रीं त्याचा चित्तविनोद करण्यासाठीं धीमान् गोमुख कथा सांगूं लागला.

## १. काकराज व उलूकराज यांची कथा.

ज्याची छाया अति हितकर व विपुल आहे, असा एक पिंपरीचा वृक्ष होता. तो आपल्यावरील पक्ष्यांच्या शब्दांनीं मार्गस्थांस आपल्या खालीं विश्रांति घेण्याकरितांच बोलावीत असे. त्या वृक्षावर मेघवर्ण या नांवाचा एक काकराज घर करून रहात होता. त्याचा अवमर्द नांवाचा उलूकाधिपति शत्रु होता. तो एकदां रात्रीं येऊन काकराजाच्या अनेक अनुयायांस मारून व त्याचा पराभव करून गेला. तेव्हां सकाळीं काकराज आपल्या उड्डीवि, आडीवि, संडीवि, प्रडीवि, चिरजीवी इत्यादि मंत्र्यांचा मोठा सत्कार करून म्हणाला,–'ज्याला शामचें हें मर्म सांपडलें आहे, असा तो बली शत्रु पुनः आम्हांवर चाल करून येईल, यास्तव त्याचा प्रतीकार करण्याचा कांहीं उपाय योजा.'

त्यावर उड्डीवि म्हणाला,–'प्रभो, शत्रु बलाढ्य असल्यास दुसऱ्या देशाचा आश्रय करावा अथवा त्याच्याशींच साम करावा, अशी नीति आहे.' तें ऐकून आडीवि म्हणाला,–'आतांच कांहीं इतकें भ्यावयास नको. शत्रूचा अभिप्राय व आपली शक्ति पाहून, जें योग्य दिसेल तें करूं.' संडीवि म्हणाला,–'देव, मरणही पतकरेल, पण शत्रूला प्रणाम करणें अथवा परदेशांत जाऊन जिवंत राहणें, हें कांहीं पतकरणार नाहीं. ज्यानें आपलें अशुभ केलें आहे, त्या शत्रूशीं युद्धच केलें पाहिजे. सहायवान्, शूर व उत्साही राजा शत्रूंना जिंकतो.' त्यानंतर प्रडीवी म्हणाला,–'पण तो

बलाढय असल्यामुळें, त्याला रणांत जिंकतां येणें शक्य नाहीं. यास्तव आतां त्याच्याशीं संधि करून अनुकूल अवसर येईल, तेव्हां त्याला मारावें.' तेव्हां चिरजीवी म्हणाला,–' पण त्याच्याशीं कोणत्या प्रकारचा संधि करणार ? व त्याच्याकडे दूत कोण जाणार ? कावळ्याचें घुबडाशीं सृष्टीच्या आरंभापासून अंतापर्यंत रहाणारें वैर आहे, तेव्हां त्याच्याकडे जाणार कोण, ही गोष्ट मंत्रसाध्य आहे. मंत्र राज्याचें मूळ आहे, असें सांगतात.'

हें ऐकून राजा मेघवर्ण चिरजीवीस म्हणाला,–'तूं वृद्ध आहेस. यास्तव तुला जर ठाऊक असेल, तर कावळे व घुबडें यांचें वैर कां पडलें, तें अगोदर सांग. नंतर मंत्र करूं.' तें ऐकून चिरजीवी काकराजाला म्हणाला,–'वाग्दोष हेंच याचें कारण आहे. गर्दभाची आख्यायिका तुम्ही ऐकली नाहीं का ?'

### २. गाढवाची उपकथा.

कोणा एका धोब्यानें आपल्या कृश गाढवाला, तो पुष्ट व्हावा म्हणून वाघाच्या चामड्यानें आच्छादित करून एकाच्या शेतांत सोडलें. तो शेत खात आहे, असें प्रत्यक्ष पाहूनही, हा व्याघ्र आहे, असें समजून त्याच्या वाटेस कोणी गेलें नाहीं. पण एकदां एका धनुष्यधारी शेतकऱ्यानें त्या व्याघ्राला मारण्याच्या इच्छेनें अंगावर कांबळें घेऊन व हळू हळू वांकून जाण्यास आरंभ केला. इतक्यांत गर्दभाची दृष्टि त्याच्याकडे गेली, व हा दुसरा गर्दभच आहे असें जाणून, धान्य खाऊन माजलेला तो आपल्या कर्कश आवाजानें मोठ्यानें ओरडूं लागला. त्याचा ध्वनि ऐकतांच त्या शेतकऱ्याला हा गाढव आहे असें कळलें, व तत्काल त्यानें तीक्ष्ण बाणानें त्याला मारून टाकलें.

या गाढवाच्या मरणाला जसा त्याचा वाग्दोष कारण झाला, तसाच आमचा वाग्दोष उलूकाशीं हाडवैर पाडण्यास निमित्त झाला आहे. पूर्वी एकदां सर्व पक्षी राजावांचून होते. म्हणून त्यांनीं सर्वांनीं मिळून उलूकास राज्याभिषेक करण्याचा निश्चय केला, व त्या (उलूका) वर छत्र–चामरादि धरून त्याला राजा करण्याचा प्रयत्न चालविला. पण इतक्यांत आकाशांतून आलेला एक कावळा म्हणाला, 'अरे मूर्खांनो, तुम्ही जे या क्रूरदृष्टि, पापी, अमंगळ व अप्रियदर्शन अशा उलूकाला राज्यावर

बसवीत आहां, ते हंस, कोकिल, इत्यादि चांगले पक्षी नाहींत म्हणून कीं काय ! या अमंगल उलूकाला धिक्कार असो. ज्याचें नांवच कार्यसिद्धि करणारें असेल, असा प्रभाववान् राजा करावा. याविषयीं एक कथा सांगतों ती ऐका.'

### ३. शिलीमुख सशाची उपकथा.

चंद्रसर या नांवाचें एक मोठें सरोवर असून त्यांत विपुल जल होतें. त्याच्या तीरीं शिलीमुख या नांवाचा एक सशांचा राजा असंख्य सशांसहवर्तमान रहात असे. दुसरीकडचीं सर्व लहान लहान सरोवरें अनावृष्टीच्या योगानें सुकून गेलीं असतां, चतुर्दंत या नांवाचा गजसमूहांचा एक नायक आपल्या कळपासह एकदां जल प्यावयास त्या चंद्रसरोवरावर आला. त्याच्या बरोबरच्या हत्तींनीं त्या सरोवराच्या तीरीं यथेच्छ विहार केला, त्यामुळें शिलीमुख शशराजाचे पुष्कळ ससे त्यांच्या पायांखालीं चुरडून मेले. पुढें तो गजपति निघून गेला असतां, अति दुःखित झालेला शशराज इतर सशांसमक्ष विजय नांवाच्या सशाला म्हणाला, 'या गजेंद्राला येथल्या पाण्याची गोडी आतां कळली आहे, तो वारंवार येथें येईल, व आम्हांला निःशेष करून सोडील. यास्तव कांहीं उपाय योजिला पाहिजे. तूं त्याच्यापाशीं जा, व कांहीं युक्ति सुचते कीं नाहीं ती पहा, तूंच वाटेल तो उपाय कर. कारण तूं मोठा युक्तिमान् आहेस, व प्रसंगीं कसें बोलावें तेंही जाणतोस. तूं आजपर्यंत जेथें जेथें गेला आहेस, तेथें तेथें शुभच झालें आहे.' असें म्हणून शशराजानें निरोप दिला असतां, विजय संतुष्ट मनानें हळू हळू गेला. मार्गांतच त्याला समोरून येत असलेला गजेंद्र दिसला. बलाढ्याशीं कोणत्याही उपायानें योग्य समागम झाला पाहिजे असें म्हणून, तो बुद्धिमान् ससा एका टेकडीच्या शिखरावर चढला व त्या गजेंद्राला म्हणाला,-' मी चंद्र-देवाचा दूत आहें. त्यानें तुला असे सांगितलें आहे कीं, चंद्रसर या नांवाचें एक शीतल सरोवर माझें निवासस्थान आहे, तेथें ससे आहेत. मी त्यांचा राजा असून ते मला अतिशय प्रिय आहेत. एवढ्यासाठींच मी शीतांशु व शशी या नांवानेंच प्रसिद्ध झालों आहें. काल त्या सरोवराचा नाश केलास व सशांना मारलेंस; पण पुनः जर असें केलेंस, तर त्याचें फल तुला तत्काल मिळेल.

दूताच्या तोंडचें हें भाषण ऐकून गजेंद्र भयभीत झाला, व विजयाला म्हणाला,–' मी पुनः असें करणार नाहीं. भगवान् शशी मला मान्य आहे.' तें ऐकतांच विजय म्हणाला–'असें जर असेल तर चल, मी तुला त्याचें दर्शन करवितों. मित्रा, त्याची तूं प्रार्थना कर.' असें सांगून शहाणा ससा हत्तीला त्या सरोवराच्या कांठीं घेऊन गेला. सरोवरांत पडलेलें चंद्र-बिंब त्यानें त्याला दाखविलें. तें पाहून व दुरूनच नमस्कार करून भयानें कांपणारा तो गजेंद्र वनांत गेला. तो पुनः त्या सरोवरावर आला नाहीं. विजयानें केलेलें हें महत्कर्म पाहून शिलीमुख शशराजानें त्याचा मोठा सन्मान केला, व सर्व सशांसहवर्तमान तो त्याच सरोवराच्या कांठीं मोठ्या सुखानें राहूं लागला.

## ४. चिमणा, ससा व बोका यांची उपकथा.

कांहीं दिवसांनी तेथें एक कपिंजल पक्षी आला. त्याचा व एका सशाचा घराविषयीं वाद उपस्थित झाला. कपिंजल म्हणूं लागला, हें माझें घर आहे व ससा म्हणूं लागला हें माझें आहे. शेवटीं ते दोघे या वादाचा निर्णय करणारा सभ्य हुडकूं लागले. मीही कौतुकानें त्यांची मौज पहाण्याच्या इच्छेनें त्या दोघांच्या मागोमाग, त्यांना न दिसतां निघालों. किंचित् दूर गेल्यावर सरोवराच्या कांठीं हिंसेसाठीं ढोंगानें व्रतस्थ होऊन राहिलेल्या एका मांजराला त्यांनीं पाहिलें. त्यानें ध्यानाच्या मिषानें आपले नेत्र अर्धे झांकले होते. 'या धार्मिकालाच आम्हीं आमचा न्याय कां विचारूं नये ?' असें म्हणून ते दोघेही त्या मांजरापाशीं आले व म्हणाले,–' भगवन्, तूं धार्मिक व तपस्वी आहेस, यास्तव आमचा हा एवढा न्याय कर.' तें ऐकून मांजर अगदीं हळू स्वरानें त्यास म्हणालें,–' छे, छे, छे ! मी तुमचा न्याय मुळींच ऐकणार नाहीं. कारण तप करितां करितां मी क्षीण झालों आहें, पण तुम्ही तर फार दुरून आलां आहां. धर्माचा निर्णय अयोग्य रीतीनें केल्यास तो दोन्ही लोकांचा घात करीत असतो; यास्तव तुमचें म्हणणें मी अगोदर ऐकून घेतों.' असें बोलून व थोडेंसें आश्वासन देऊन त्या बोक्यानें दोघांनाही आपल्या पुढें यावयास सांगितलें. ते जवळ जाऊन थोडथोडी आपली हकीकत सांगत आहेत, तोंच त्यानें

त्या दोघांनांही मारून खाल्लें. यास्तव क्षुद्रकर्में करणाऱ्या दुर्जनाचा मुळींच विश्वास नसतो.* म्हणून या अतिदुर्जन उलूकाला राजा करूं नका.

कावळ्यानें असें सांगितलें असतां सर्व पक्षी 'खरें आहे' असें म्हणून व उलूकाच्या अभिषेकाचें निवारण करून, इतस्ततः उडून गेले. तेव्हां 'आजपासून तुम्ही व आम्ही परस्परांचे शत्रु झालों आहों, हें चांगलें ध्यानांत धर, मी आतां जातों,' असें कावळ्याला सांगून उलूक क्रोधानें तेथून निघून गेला. कावळाही 'यानें सांगितलें तें कांहीं खोटें नव्हे, आम्ही आतां परस्परांचे हाडवैरी झालों.' असें समजून खिन्न झाला. सारांश, वाणीनें उत्पन्न केलेल्या वैरामुळें कोण संतप्त होणार नाहीं!§

याप्रमाणें आमच्याच वाग्दोषामुळें घुबडांशीं आमचें वैर उद्भवलें आहे. इतकें बोलून चिरजीवी मंत्री पुनः काकराजास म्हणाला,–" देव, आमचे शत्रु पुष्कळ व बलाढ्य आहेत, त्यामुळें आम्ही त्यांना जिंकूं शकणार नाहीं. पुष्कळांचाच नेहमीं विजय होत असतो. याविषयीं एक दृष्टान्त सांगतों, तो ऐका."—

५. धूर्तांची उपकथा.

एका गांवांत विकत घेतलेल्या एका लठ्ठ बकऱ्याला खांद्यावर घेऊन, एक ब्राह्मण तेथून जवळच्याच आपल्या गांवास जात होता. त्याला मार्गांत पुष्कळ धूर्तांनीं पाहिलें, व हा बकरा आपण याच्यापासून घ्यावा असें त्यांना वाटलें. तेव्हां त्यांतील एक लबाड मनुष्य गडबडीनें त्याच्यापाशीं येऊन म्हणाला,–'ब्राह्मणा, या कुत्र्याला तूं खांद्यावर कसें घेतलेंस? सोड, सोड त्याला.' पण तें ऐकून व त्याच्या म्हणण्याचा अनादर करून तो जेव्हां पुढें गेला, तेव्हां आणखी दोघे धूर्त त्याच्यापाशीं येऊन तसेंच बोलले. तें ऐकून त्या ब्राह्मणाला संशय आला. तो त्या बकऱ्याकडे चांगलें पहात हळू हळू जाऊं लागला. इतक्यांत आणखी तीन शठ त्याच्यापाशीं आले. ते म्हणाले,–'ब्राह्मणा, तूं यज्ञोपवीत व श्वान यांना एकाच वेळीं आपल्या खांद्यावर कसें वागवितोस? खचित तूं कोणी तरी व्याध आहेस, ब्राह्मण नव्हेस. तूं या कुत्र्याच्या सहायानें हरिणांस मारशील.' तें ऐकून ब्राह्मण मनांत विचार करूं लागला कीं, खचित माझी दृष्टि

* तदेवं नास्ति विश्वासः क्षुद्रकर्मणि दुर्जने ।

§ वाङ्मात्रोत्पादितासह्यवैरात्को नानुतप्यते ? ।

हरण करून कोणी भुतानें मला भ्रमांत पाडलें आहे; म्हणून मला हा बकरा दिसत असून, यांना मात्र कुत्रा दिसत आहे. असें आपल्यापाशींच बोलून व त्या मूल्य देऊन घेतलेल्याही बकऱ्याला टाकून, त्यानें सचैल स्नान केलें, व तो आपल्या घरीं गेला. इकडे त्या धूर्तांनीं त्या पुष्ट अजास नेलें, मारलें, शिजविलें व यथेच्छ भक्षण केलें.

अशी गोष्ट सांगून चिरजीवी काकराजाला पुढें म्हणाला,—'हे देव, याप्रमाणें अनेक व बलाढ्य शत्रु दुर्जय असतात. यास्तव या प्रसंगीं मी सांगतों तशी युक्ति करा. माझे पंख थोड थोडे उपटून व मला याच झाडाखालीं टाकून तुम्ही या पर्वतावर जा, म्हणजे मीही इष्ट कार्य करून येईन.' चिरजीवीच्या सांगण्याप्रमाणें जणुं काय रागानेंचसे त्याचे पंख उपटून व त्याला वृक्षाखालीं टाकून काकराज अनुगांसह पर्वतावर गेला. चिरजीवी तेथेंच वृक्षाखालीं पडून राहिला. रात्रीं उलूकराज आपल्या अनुगांसह तेथें आला. पण त्याला झाडावर एकही कावळा दिसला नाहीं. 'त्यांना कोणी मारलें असेल म्हणून म्हणावें तर येथें त्यांचेंही कांहीं चिन्ह दिसत नाहीं.' असें जों तो घुबडांचा राजा मनांत म्हणत आहे, तों त्याला झाडाच्या खालून चिरजीवीचा मंद मंद आक्रोश ऐकूं आला. म्हणून उलूकराज खालीं उतरून पाहूं लागला. तों त्याला हा कावळा दिसला, तेव्हां—'तूं कोण व येथें असा कां पडला आहेस?' असें त्यानें विस्मित होऊन विचारलें त्यावर तो चिरजीवी पीडा होत असल्याप्रमाणें दाखवून मंद स्वरानें म्हणाला,—'मी वायसराजाचा चिरजीवी नामक मंत्री आहें. इतर मंत्र्यांनीं सांगितल्याप्रमाणें तो तुझ्याशीं घोर युद्ध करण्याची इच्छा करीत होता; पण मी इतर मंत्र्यांची निर्भर्त्सना करून राजाला म्हटलें, "देव, मला जर विचाराल व मी जर तुम्हांस मान्य असेन तर बलाढ्य उलूकराजाशीं युद्ध करूं नये. उलट नीतीनें जर चालावयाचें असेल तर त्याच्याशीं तुम्ही साम करा."

माझ्या तोंडचे हे शब्द ऐकतांच त्या प्रभूला मोठा क्रोध आला व 'हा दुष्ट मंत्री शत्रुपक्षास मिळाला आहे' असें म्हणून आपल्या मित्रांसह त्यानें माझी अशी अवस्था केली, व मला या वृक्षाखालीं फेकून देऊन अनुचरांसह तो कोठेंसा निघून गेला. इतकें सांगून चिरजीवी खालीं तोंड घालून दीर्घ श्वास सोडीत राहिला. तेव्हां उलूकराजानें आपल्या

मंत्र्यांना–' आतां आपण या शत्रूच्या मंत्र्याचें काय करावें ? ' म्हणून विचारलें. तें ऐकून दीप्तनयन नांवाचा मंत्री म्हणाला,–' सज्जन, हा उपकारी आहे असें समजून रक्षणास अयोग्य असलेल्या चोराचेंही रक्षण करितात. या विषयीं एक कथा सांगतों ती ऐका.'

### ६. वृद्ध वैश्याची उपकथा.

पूर्वी कोणी एक वैश्य होता. तो वृद्ध होता तरी त्यानें एका तरुणीशीं विवाह केला. वनांतील पुष्परहित वृक्षापासून भ्रमरी जशी पराङ्मुख होते, त्याप्रमाणें ती तरुणी त्या वृद्धाच्या शय्येपासून पराङ्मुख होत असे. एकदां रात्रीं तीं दोघें शय्येवर असतांना एक चोर आंत शिरला. त्याला पहातांच भयानें ती आपल्या पतीला आलिंगन देऊन बसली. त्या वृद्धाला त्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें. तो सभोंवार पाहूं लागला. तो एका कोनांत उभा असलेला चोर त्याला दिसला. तेव्हां तो श्रीमान् वैश्य त्याला म्हणाला,-' अरे चोरा, तूं आज मजवर मोठे उपकार केले आहेस, यास्तव, मी तुला भृत्याकडून मारवीत नाहीं. इतकें बोलून वैश्यानें त्याला घालवून दिलें. यास्तव हा उपकारक चिरजीवी आम्हांलाही अवध्य आहे. आपल्याला त्याचें रक्षण केलें पाहिजे. असें सांगून दीप्तनयन मंत्री मुकाट्यानें बसला. त्यानंतर राजा वक्रनास नांवाच्या मंत्र्याला 'याचें काय करावें' म्हणून विचारूं लागला. तेव्हां तोही म्हणाला,–प्रभो, शत्रूचें मर्म जाणणारा हा आपल्याला रक्ष्य व संग्राह्य आहे. या स्वामि-मंत्र्यांचें वैर आम्हांला हितकरच आहे. याविषयीं मी एक दृष्टान्तभूत कथा सांगतों ती ऐका.

### ७. चोर व राक्षस यांची उपकथा.

कोणा एका उत्तम ब्राह्मणास दानामध्यें दोन गायी मिळाल्या; पण त्या पाहून एका चोराच्या मनांत त्यांना चोरून नेण्याचें आलें. त्याच वेळीं एका राक्षसालाही त्या ब्राह्मणास खाण्याची इच्छा झाली, नंतर रात्रीं ते दोघेही आपापलें इष्ट साधण्याकरितां चालले असतां, दैववशात् त्यांची गांठ पडली. त्यांनीं परस्परांस आपापला उद्देश सांगितला. व ते दोघे ( राक्षस व चोर ) बरोबरच ब्राह्मणाच्या घरापाशीं गेले; पण तेथें जाऊन पोंचल्यावर वाद सुरू झाला. चोर म्हणाला,–' राक्षसा, तूं अगोदर त्याला हात लावूं नको; कारण तूं त्याला धरलेंस म्हणजे तो जागा

होईल. मग मला त्याचें गोधन कसें नेतां येईल. यास्तव अगोदर मी त्याच्या गायी नेतों, नंतर तूं त्याला खा.' परंतु चोराचें हें म्हणणें राक्षसाला पटलें नाहीं. तो म्हणाला,-'असें नाहीं, मी अगोदर याला खाणार; कारण तूं गायींना नेऊं लागलास व त्यांच्या पायांच्या आवाजानें ब्राह्मण जागा झाला म्हणजे माझे श्रम व्यर्थ होणार कीं नाहीं ?'

पण राक्षसाचें म्हणणें चोराला मान्य होईना, त्या ब्राह्मणाच्या घरांत शिरल्यावरही ते तसेच भांडत राहिले. त्यामुळें ब्राह्मण जागा झाला, त्यानें तत्काळ हातांत खड्ग घेतलें व तोंडानें रक्षोघ्न मंत्राचा पाठ चालविला, त्यामुळें ते दोघेही दुष्ट पळून गेले. सारांश, त्या दोघांचा भेद ब्राह्मणाच्या पथ्यावर जसा पडला, तसाच काकराज व चिरजीवी यांचा हा भेद आम्हांस हितकर आहे.

वक्रनासाचें हें सर्व म्हणणें ऐकून घेऊन उलूकेंद्र आपल्या प्राकारकर्ण नांवाच्या मंत्र्यास विचारूं लागला. त्यानेंही-या मंत्र्यावर आपल्याला दयाच केली पाहिजे, कारण हा आपत्तींत असतांना आपल्या हातीं लागला आहे, हा आपल्याला शरण आला आहे, पूर्वीं शिबीनें शरणागताकरितां आपल्या अंगाचें मांसही दिलें, इत्यादि सांगितलें. तें ऐकून राजानें क्रूरलोचन मंत्र्याचें मत विचारिलें. त्यानेंही तसेंच सांगितलें, शेवटीं रक्ताक्ष नांवाच्या आपल्या सचिवाला राजानें प्रश्न केला असतां, तो म्हणाला,-'राजन्, या मंत्र्यांनीं अनीतीनें तुझा नाश करण्याचा विचार चालविला आहे, मूर्ख प्रत्यक्ष अपराध पाहूनही, कपटी सांत्वनवचनांनीं प्रसन्न होतो, याविषयीं एक गोष्ट सांगतों ती ऐक.

## ८. एका मूर्ख सुताराची उपकथा.

कोणी एक सुतार होता. त्याची एक भार्या होती. ती त्याला अतिशय प्रिय असे. दुसऱ्या लोकांकडून त्याला ती अन्यपुरुषासक्त आहे, असें कळलें. तेव्हां खरी गोष्ट काय आहे ती समजावी म्हणून तो तिला एकदां म्हणाला,-'प्रिये, राजाच्या आज्ञेनें मी आपल्या व्यापाराकरितां कोठें दूर जाणार आहें. यास्तव, मला फराळाचें करून दे' त्यावर 'बरें आहे.' असें म्हणून व फराळादिकांची तयारी तिनें करून दिली. तो सुतार शिष्यासह घरांतून निघून व गुप्तपणें परत येऊन घरांत शिरला. व खाटेखालीं जाऊन बसला.

त्याच्या भार्येनेंही आपल्या प्रिय पुरुषाला आणविलें; पण त्याच्याशीं रममाण होत असतांना खाटेखालीं बसलेल्या पतीला तिचा पाय लागला. त्याबरोबर त्या धूर्त स्त्रीनें तें कपट ओळखिलें. इतक्यांत कामानें व्याकुल झालेला तिचा उपपति म्हणाला,–' प्रिये, तुला मी अधिक आवडतों कीं तुझा पति ? ' त्याचें म्हणणें ऐकून कपटांत अतिकुशल असलेली ती सुतारीण म्हणाली,–'माझा पति मला अधिक प्रिय आहे. मी त्याच्या-साठीं प्राणही देईन. आतां तुजसारख्या जाराशीं रममाण होणें हें स्त्रियांचें स्वाभाविक चांचल्य आहे. त्याला मी तरी काय करणार ? त्यांना जर नाक नसतें तर अमंगल पदार्थही भक्ष्य झाले असते.'

त्या कुलटेचें हें कृत्रिम वचन ऐकून संतुष्ट झालेला सुतार खाटेखालून निघून शिष्याला म्हणाला,–' तूं पाहिलेंसना, ही माझी भार्या मजवर कशी अनुरक्त आहे व कशी भक्त आहे. याविषयीं तूंच साक्षी आहेस. यास्तव, या कांताचा आश्रय केलेल्या हिला मी आपल्या डोक्यावर वहातों.' असें बोलून व खाटेवर असलेल्या त्या दोघांनाही खाटेसह डोक्यानें उचलून तो मूर्ख सुतार नाचूं लागला. त्यानें व्यभिचारिणी स्त्री व तिचा जार यांना याप्रमाणें डोक्यावर वाहिलें. अशारीतीनें प्रत्यक्ष दोष दिसला तरी मूर्ख गोड गोड भाषणांनीं तृप्त होतो, व तो विवेक-शून्य पुरुष, लोकांच्या उपहासास पात्र होतो.* यास्तव हे राजन्, हा शत्रु-पक्षीय चिरजीवी तुला रक्ष्य नसून वध्य आहे. याची उपेक्षा केल्यास हे देव, एकदां क्षुद्र रोग जसा मोठ्या वृक्षाला मारतो, त्याप्रमाणें हा तुमचा घात करील.

रक्ताक्षाचें हें भाषण ऐकून कौशिकेंद्र म्हणाला,–'हा विचारा आमचें हित करित असतांना या अवस्थेस प्राप्त झाला आहे, तेव्हां याला आम्ही कसें बरें मारावें ? शिवाय हा एकटाच आमचें काय करणार ? असें बोलून राजानें त्या मंत्र्याच्या सदुपदेशाचें निराकरण केलें, व चिरजीवी काव-ळ्याला आश्वासन दिलें. तेव्हां तो कावळा उलूकेशास अशी प्रार्थना करूं लागला,–'प्रभो, अशा अवस्थेस पोंचलेल्या मला आतां जिवंत राहून काय

---

* इत्थं प्रत्यक्षदृष्टेऽपि दोषे कपटसांत्वतः ।
मूर्खस्तुष्यति हास्यत्वं निर्विवेकश्च गच्छति ॥

करावयाचें आहे ? यास्तव मला काष्ठें जमवून व तीं पेटवून देवीव, म्हणजे मी अग्निप्रवेश करीन. मरतांना अग्नीपाशीं मी त्या काकराजाचा सूड उगविण्यासाठीं उलूकयोनीच मागेन.'

असें बोलणाऱ्या त्याला रक्ताक्ष हंसून म्हणाला,—'आमच्या प्रभूच्या प्रसादानें तूं जर स्वस्थ आहेस, तर तुला अग्नि काय करावयाचा ? बाबारे, काकत्व असेपर्यंत तुला कौशिकत्व प्राप्त होणार नाहीं. कारण धात्यानें ज्याला जसें केलें आहे, तो तसाच रहाणार*. याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐक.

## ९. मुनि व उंदरी यांची उपकथा.

पूर्वी एकदां श्येनाच्या पंजांतून निसटून खालीं पडलेल्या लहानशा उंदरीला एका मुनीनें कृपेनें, आपलें तपःसामर्थ्य खर्चून, एक सुंदर कन्या केलें. आश्रमामध्यें वाढविलेली ती तरुण झाली आहे असें पाहून, बलवानाला ती द्यावी, या उद्देशानें त्या मुनीनें आदित्याला बोलाविलें, व 'ही बलवानाला द्यावी असा माझा उद्देश असल्यामुळें तूं हिच्याशीं विवाह कर,' असें म्हटलें. तें ऐकून सूर्य म्हणाला,—'भगवन्, माझ्याहून मेघ अधिक बलवान् आहे. कारण तो मला एका क्षणांत झांकून टाकतो.' सूर्याचें तें भाषण ऐकून व 'खरें आहे,' असें म्हणून मुनीनें त्याला जावयास सांगितलें आणि मेघाला बोलाविलें, त्यालाही तो तसेंच म्हणाला. तेव्हां मेघ म्हणाला—'भगवन्, माझ्यापेक्षां वायु बलाढ्य आहे. कारण तो एका क्षणांत मला कोठल्या कोठें उडवून नेतो.' त्यानंतर त्यानें वायूला बोलावूनही तसेंच सांगितलें. तेव्हां वायु म्हणाला,—'भगवन्, माझ्यापेक्षां पर्वत बळकट आहेत, कारण मी सर्वांना हालवीत असलों तरी त्यांना मुळींच चंचल करूं शकत नाहीं.' तें ऐकून मुनींद्रानें एका पर्वताला बोलाविलें, व 'हिच्याशीं विवाह कर' असें सांगितलें. तेव्हां पर्वत म्हणाला,—'प्रभो, मजपेक्षां उंदीर बलाढ्य आहेत, कारण ते माझ्या सर्व अंगभर भोकें पाडून आंत सुखानें रहात असतात.

याप्रमाणें ज्ञानी देवतांनीं त्या मुनीचा युक्तीनें निषेध केला असतां महर्षीनें वनांतील एका उंदराला बोलाविलें, व 'या माझ्या कन्येशीं

---

* यादृशो यः कृतो धात्रा भवेत्तादृश एव सः ।

विवाह कर,' असें सांगितलें. तेव्हां तो उंदीर म्हणाला,–'प्रभो, मी आपली आज्ञा मान्य करितों; पण ही माझ्या बिळांत प्रवेश करूं शकेल असा कांहीं उपाय असला तर पहा. तेव्हां 'तर मग ही पूर्वीसारखीच उंदरीण होवो,' असा वर मुनीनें उच्चारला. त्याबरोबर ती सुंदर तरुणी उंदरीण झाली. ऋषीनें उंदराला ती दिली व उंदीरही त्या नूतन भार्येला घेऊन बिळांत गेला. याप्रमाणें फार दूर जाऊनही जो जसा असतो तसाच रहातो.‡ यास्तव नांवाप्रमाणें फार दिवस जगणारा तूं, उलूक कधींही होणार नाहींस.'

रक्ताक्षानें असें सांगितलें असतां चिरजीवी मनांत असा विचार करूं लागला,–'एवढा मात्र यांच्यामध्यें नीतिज्ञ आहे, पण राजानें याचें म्हणणें अमान्य केलें आहे, बाकीचे हे सर्व मूर्ख आहेत. तेव्हां माझें कार्य सिद्ध होणार, यांत कांहीं संशय नाहीं.' इतकें तो चिंतन करीत आहे, तोंच बलानें गर्वित झालेला अवमर्द उलूकराज रक्ताक्षाच्या वाक्याचा विचार न करितां, चिरजीवीला घेऊन स्वस्थानीं गेला. तेथें पोंचल्यावर उलूकराज त्याला मांसादि इष्ट भोजन देऊं लागला. त्यामुळें तो कावळा थोड्याच दिवसांत चांगला पुष्ट होऊन त्याच्या पंखांतही चांगली पूर्ण शक्ति आली.

एकदां तो उलूकराजास म्हणाला,–' देव, मी काकराजापाशीं जातों, व विश्वास दाखवून त्याला त्याच्या पूर्वस्थानीं घेऊन येतों. म्हणजे रात्रीं त्याच्यावर हल्ला करून तुम्हांला त्याला सहज मारतां येईल, व मलाही तुमच्या या अनुग्रहाची थोडीशी निष्कृति केल्याचें श्रेय लागेल; पण आतां तुम्ही मात्र आपल्या घरांचीं दारें, गवत पानें इत्यादिकांच्या योगानें झांकून घेऊन रहा. कारण दिवसा कदाचित् त्याचा उलट हल्ला तुमच्यावर येण्याचा संभव आहे. म्हणून सुरक्षित रहाणें चांगलें.' असें सांगून व त्या सर्व घुबडांना जिचें तोंड गवत, पानें, इत्यादिकांनीं झांकून सोडलें आहे, अशा एका गुहेंत ठेवून तो धूर्त चिरजीवी आपल्या स्वामीकडे आला. त्यानें त्याला सर्व संकेत कळविला व ज्यांनीं आपल्या चोंचीत एकेक पेटतें कोलीत घेतलें आहे, अशा असंख्य कावळ्यांसहवर्तमान राजाला बरोबर घेऊन तो दिवान्धांच्या गुहेपाशीं गेला. तिचें

‡ एवं सुदूरं गत्वाऽपि यो यादृक्तादृगेव सः ।

तोंड गवतादिकांनीं बंद केलेलेंच होतें. तेथेंच राजाकडून आग लावविली. इतर कावळ्यांनीं चोंचींतून आणलेलीं जळतीं काष्ठेंही तेथेंच टाकविलीं. त्यामुळें भयंकर अग्नि पेटला व आंतील राजासह सर्व उलूक जळून मेले. याप्रमाणें शत्रूंचा सूड उगवून राजा मेघवर्ण चिरजीवीसह संतुष्ट झाला. नंतर काककुलासह तो विजयी राजा आपल्या वटवृक्षावर येऊन सुखानें राहूं लागला.

आपल्या घरीं पोंचल्यावर राजानें विचारिलें असतां, चिरजीवी शत्रूमधील आपल्या निवासाचें वृत्त सांगून मेघवर्ण काकेंद्रास म्हणाला,—' हे प्रभो, त्या तुझ्या शत्रूचा रक्ताक्ष या नांवाचा एकच उत्तम मंत्री होता. त्याच्या सांगण्याप्रमाणें न वागणाऱ्या मदान्ध उलूकराजानें माझी उपेक्षा केली. रक्ताक्षाचें म्हणणें निरर्थक आहे असें जाणून त्या शठराजानें स्वैर वर्तन केलें, म्हणून त्या मूर्खाला विश्वास दाखवून मला फसवितां आलें. एका सर्पानेंही एकदां अशाच कपटाचरणानें विश्वास दाखवून मंडूकांना मारलें होतें, त्याची हकीकत सांगतों ती ऐका.'

## १०. सर्पाची उपकथा.

कोणी एक वृद्ध सर्प स्वतः भक्ष्य मिळविण्यास असमर्थ झाला, म्हणून तो एकदां सरोवराच्या कांठीं बेडकांना न धरितां अगदीं शांत व निश्चल राहिला. त्याची ती अपूर्व अवस्था पाहून विस्मित झालेले बेडूक दूर उभे राहूनच त्याला म्हणतात,—'आज तूं आम्हांला धरीत नाहींस हें काय ?' हा त्यांचा प्रश्न ऐकून सर्प म्हणाला,—'काय सांगूं ? बाबांनों, आज माझ्या हातून मोठा प्रमाद घडला. बेडकांच्या मागें लागून धांवत असतांना मी भ्रांतीनें एका ब्राह्मणाच्या पुत्राच्या आंगठ्याला दंश केल्यामुळें तो मेला. तेव्हां त्याच्या शोकसंतप्त पित्यानें मला ' बेडकांचें वाहन हो ' असा शाप दिला. तेव्हां आतां मी बेडकांना खाऊं कसा, उलट तुम्हांला आपल्या पाठीवर वाहिलें पाहिजे. तें ऐकून वाहनाविषयीं अतिशय उत्सुक झालेला बेडकांचा राजा जलांतून निर्भयपणें व आनंदानें त्याच्या पाठीवर चढून बसला. तेव्हां सर्पानेंही त्याला व त्याच्या मंत्र्यांनां पाठीवरून फिरवून सुख दिलें, व आपल्याविषयीं त्यांचें मन अनुकूल झालें असें पाहून, तो कपटी सर्प आपण अगदीं थकून गेलों आहों, असें दाखवून त्यांना म्हणाला,—'देव, आहारावांचून मला आतां पाऊलभरही पुढें जाववत

नाहींसें झालें आहे. यास्तव कांहीं खावयास दे. कारण नोकर पगारावांचून जिवंत कसा राहील ?'

तें ऐकून वाहनप्रिय मंडूकराज त्याला म्हणाला–' असें जर असेल तर माझ्या अनुचरांतील कांहीं परिमित बेडकांस तूं खा.' राजाची अशी आज्ञा मिळतांच त्या सर्पानें हळूहळू बेडकांना यथेच्छ खाण्यास आरंभ केला. वाहनाभिमानानें अंध झालेल्या राजानेंहि तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. याप्रमाणें मूर्ख मनुष्य धूर्तांकडून सहज फसविला जातो. हे देव, मी सुद्धां अशाच रीतीनें शत्रूंमध्यें शिरून त्यांना मारलें. यास्तव नीतिवेत्त्या राजानें सदा सावधान रहावें. कारण भृत्य जड स्वामीला मन-सोक्त रीतीनें खात असतात,* व शत्रू त्याला मारितात. हे स्वामिन्, ही श्री द्यूतलीलेप्रमाणें सज्जनांनां छळणारी आहे. जलतरंगांप्रमाणें चंचळ आहे. मदिरेप्रमाणें मोह पाडणारी आहे. ती बुद्धिमान्, चांगल्या मंत्राचा स्वीकार करणाऱ्या व्यसनशून्य व विशेषज्ञ राजापाशीं पाशांनीं बांधून टाकल्याप्रमाणें मोठ्या उत्साहानें राहते.† यास्तव आतां तूं साव-धान मनानें, विद्वानांच्या वचनांत राहून, निष्कंटक राज्याचा उपभोग घे. सर्व शत्रु मारले गेले असल्यामुळें, तुला आतां सुखानें राहतां येईल.

चिरजीवी मंत्र्यानें केलेला हा सर्वोत्तम उपदेश ऐकून, संतुष्ट झालेल्या मेघवर्ण काकराजानें त्या महामंत्र्याचा मोठा सन्मान केला, व पुष्कळ दिवस सौराज्याचा उपभोग घेतला. अशी कथा सांगून, गोमुख वत्सेश-पुत्राला पुनः म्हणाला,–' प्रभो, याप्रमाणें प्रज्ञाबलानें तिर्यक्–प्राणीही राज्याचा उपभोग घेतात, व प्रज्ञा–शून्य मूढ क्लेश भोगतात. याविषयीं एक गोष्ट सांगतों ती ऐका.—

---

* तस्मान्नीतिविदा राज्ञा भवितव्यं कृतात्मना ।
यथेच्छं भुज्यते भृत्यैर्हन्यते च परैर्जडः ॥

† श्रीरियं च सदा देव द्यूतलीलेव सच्छला ।
वारिवीचीव चपला मदिरेव विमोहिनी ॥
सा धीरस्य सुमन्त्रस्य राज्ञो निर्व्यसनस्य च ।
विशेषज्ञस्य सोत्साहा पाशबद्धेव तिष्ठति ॥

## ११. धन्याची चामडी काढणाऱ्या भृत्याची कथा.

एका श्रीमानाचा एक जडबुद्धि भृत्य होता. तो जाणत नसतांनाही 'मी जाणतों,' अशा अभिमानानें व मूर्खपणानें त्या संपन्न धन्याच्या अंगावरील केंस वस्तऱ्यानें काढूं लागला; पण त्यानें केंसांबद्दल त्याच्या अंगाची चामडी काढली. तें पाहून रागावलेल्या स्वामीनें त्याला मारून घालवून दिलें; तेव्हां तो रडत बसला. आपल्याला ज्ञानी समजणारा मूर्ख असें कांहीं तरी हट्टानें करूं लागतो व नाश पावतो.‡ आणखी असाच एक दुसरा चमत्कार ऐका.—

## १२. वांटणी करणाऱ्या दोघां भावांची कथा.

मालवदेशांत दोघे ब्राह्मणभ्राते होते. त्यांच्या पित्याचें धन होतें; पण तें त्यांनीं वांटून घेतलेलें नसून एकत्र ठेविलें होतें. पुढें ते त्याची वांटणी करूं लागले; पण हें कमीच आहे, हें अधिक आहे, इत्यादि बोलून ते परस्पर विवाद करूं लागले. तेव्हां त्यांचा तंटा तोडण्याकरितां मध्यस्थ केलेला वेदाध्यायी उपाध्याय त्या दोघांना म्हणाला,—' बाबांनो ! असे भांडूं नका. प्रत्येक वस्तूचे सारखे दोन भाग करून घ्या; म्हणजे न्यूनाधिकतेविषयीं कलह होणार नाहीं.' तें ऐकून त्या मूर्खांनीं घर, शय्या, वस्त्र, पात्र, पशु इत्यादि सर्वांचे सारखे दोन दोन तुकडे करून घेतले. त्यांची एक वडिलार्जित दासी होती, तिचेही त्या दोघांनीं दोन तुकडे करून घेतले. तें ऐकून राजानें त्यांना दंड करून, त्यांचें सर्वस्व हरण केलें. सारांश, मूर्ख अशा रीतीनें मूर्खांच्या उपदेशानें दोन्ही लोकांचा नाश करून घेतात.* यास्तव मूर्खांचें सेवन करूं नये. प्राज्ञांचें सेवन करावें. असंतोषही मोठा दोष उत्पन्न करीत असतो, याविषयींही एक गोष्ट सांगतों ती ऐका.—

## १३. असंतुष्ट संन्याशांची कथा.

भिक्षान्नावर संतुष्ट राहिल्यामुळें, पुष्ट झालेले कांहीं संन्यासी होते. त्यांना पाहून कांहीं सुहृद् पुरुष आपसांत म्हणाले,—' काय चमत्कार आहे

---

‡ अजानानो हठात्कुर्वन्प्राज्ञमानी विनश्यति ।

* द्वौ लोकौ नाशयन्त्येवं मूर्खा मूर्खोपदेशतः ॥

पहा ! हे भिक्षा मागून खाणारे यतीही खुब पुष्ट आहेत.' तें ऐकून त्यांतीलच एकजण म्हणाला,—' पाहिजे असल्यास तुम्हांला मी एक चमत्कार दाखवितों. पूर्वीप्रमाणें भोजन करीत असतांनाही, मी यांना कृश करितों.' असें बोलून व त्यांची या कामास अनुज्ञा घेऊन, पुढें एके दिवशीं त्यानें त्या संन्याशांना आपल्या येथें भोजनास बोलाविलें व उत्तम षड्रसाचें भोजन घातलें. त्यामुळें त्या मूर्ख संन्याशांची जीभ लालचावली. त्या अन्नाच्या स्वादाचें स्मरण रोज होत असल्यामुळें, त्यांना भिक्षान्न रुचेनासें झालें. त्यामुळें कांहीं दिवसांनीं ते कृश झाले. तेव्हां तो चमत्कार आपल्या सुहृदांस दाखवून व त्यांच्या समक्ष संन्याशांस भेटून, तो उत्तम भोजन देणारा पुरुष म्हणाला,—' त्या वेळीं भैक्ष्यानें संतुष्ट होणारे हे हृष्ट—पुष्टांग होते; पण आतां यांना त्या भिक्षान्नापासून संतोष होईनासा झाला आहे; म्हणून हे असे दुर्बलतेस प्राप्त झाले आहेत.' यास्तव सुखाची इच्छा करणाऱ्या प्राज्ञानें, आपलें मन संतोषामध्यें स्थापावें. कारण असंतोषच दोन्ही लोकीं दुःसह व अश्रान्त दुःख देणारा आहे.† याप्रमाणें त्यानें ज्यांना उपदेश केला आहे, असे ते सुहृद् दुष्कृताचें आस्पद, अशा असंतोषाचा त्याग करून आनंदानें राहिले. ' सत्संग कोणाला सुखावह होणार नाहीं !* सर्वांना होईल. असो; हे देव, आतां सुवर्णमुग्धाची कथा ऐका.—

### १४. सोन्याचा भ्रम झालेल्या तरुणाची कथा.

कोणी एक पुरुष जल पिण्याकरितां एका सरोवरावर गेला. त्याच्या कांठच्या एका वृक्षावर बसलेल्या स्वर्णचूड पक्ष्याचें सुवर्णवर्ण प्रतिबिंब, त्याला पाण्यांत दिसलें. तेव्हां हें सोनेंच आहे असें समजून, तें घेण्याकरितां तो मूर्ख तडागांत शिरला. पण त्यामुळें पाणी हालूं लागलें व तें प्रतिबिंब दिसेनासें झालें. म्हणून तो पुनः पाण्यांतून वर आला, व कांठावर बसला. कांहीं वेळानें जल स्थिर होतांच तें पुनः दिसूं लागलें, तेव्हां तो बिचारा पुनः जलांत शिरला. पण त्यामुळें जल हालूं लागलें

---

† तस्मात्प्राज्ञः सुखं वाञ्छन्संतोषे स्थापयेन्मनः ।
लोकद्वयेऽप्यसंतोषो दुःसहाश्रान्तदःखदः ॥

* कस्य सत्संगो न भवेच्छुभः ॥

व प्रतिबिंब दिसेनासें झालें. याप्रमाणें त्यानें अनेक वेळां प्रयत्न केला, व अनेकदां त्याची निराशाही झाली. इतक्यांत त्याच्या बापानें हा सर्व प्रकार पाहिला व त्याला तसें करण्याचें कारण विचारिलें. तेव्हां त्यानें सांगितलें असतां बापानें जलांतील पक्ष्याची प्रतिच्छाया पाहून, व त्याला उडवून त्या खुळ्या मुलाचा भ्रम घालविला; आणि व्यर्थ श्रांत झालेल्या त्याला घरीं नेलें. याप्रमाणें विवेकशून्य अबुद्धिमान् पुरुष, मिथ्या ज्ञानानें मोहित होतात. ते दुसऱ्यांच्या उपहासास व आपल्या आप्तांच्या शोकास कारण होतात.* असाच आणखी एक मूर्ख-वृत्तान्त ऐका.—

## १५. आणखी एक मूर्खवृत्तान्त.

कोणा एका वैश्याचा उंट मार्गामध्यें भारानें थकला; तेव्हां तो आपल्या भृत्यांस म्हणाला,—'मी जाऊन दुसरा एक उंट विकत आणतों. म्हणजे याच्यावरील अर्धा भार तो घेईल; पण तुम्ही येथें राहून, पाऊस आल्यास या वस्त्रांच्या पेट्यांवरील चामड्यांस जल स्पर्श न करील असें करा.' असें सांगून व त्यांना उंटाच्या पाठीवर बसवून, तो निघून गेला. कांहीं वेळानें मोठा वर्षाव होऊं लागला; तेव्हां 'या पेट्यांवरील चामड्यांस जल स्पर्श न करील' असें करण्याविषयीं आमचा स्वामी सांगून गेला आहे; असें म्हणून त्या मूर्खांनीं त्या पेट्यांतील उंची उंची वस्त्रें भराभर बाहेर काढलीं व तीं पेट्यांस वरून झांकलीं, त्यामुळें आंतील प्रायः सर्व वस्त्रें भिजून निरुपयोगी झालीं. इतक्यांत तो वाणी परत आला. वस्त्रांची दुर्दशा पाहून,—'मूर्खांनो! तुम्हांला मी सांगितलें काय व तुम्ही केलेंत काय? पावसाच्या जलानें माझीं सर्व वस्त्रें तुम्ही नासून सोडलींत' असें तो अतिशय रागावून म्हणाला. तेव्हां 'शेटजी, उदकापासून पेट्यांच्या चामड्याचें संरक्षण करण्याविषयीं तुम्हीच आम्हांला सांगून गेलां होतां, त्याप्रमाणें आम्हीं केलें. त्यांत आमचा काय दोष आहे?' असें ते उलट बोलले. तेव्हां तो म्हणाला,—'महामूर्खांनो, वरील चामड्याला जल लागून तें भिजल्यास आंतील मूल्यवान् वस्त्रें नासतील, म्हणून मी तसें सांगिलें होतें. पण तुम्ही पशूंनीं माझें सर्वस्वीं नुक-

* निर्विमर्शा मृषाज्ञानैर्मुह्यन्त्येवमबुद्धयः ।
उपहास्याः परेषां च शोच्याः स्वेषां भवन्ति च ॥

स्नान केलें आहे,' असें बोलून नवीन विकत आणलेल्या दुसऱ्या उंटावर अर्धाभार लादून, तो दुःखी व क्रुद्ध वैश्य आपल्या घरीं गेला. त्यानें त्या मूर्ख भृत्यांचें सर्वस्व घेऊन, त्यांना घरांतून घालवून दिलें. याप्रमाणें बोलणाराचा आशय न जाणणारे मूर्ख कांहीं तरी भलतेंच करून स्वार्थाचा व परार्थाचाही घात करितात; आणि तसेंच मूर्खपणाचें उत्तर देतात.† आतां आणखी एका मूर्खाची कथा ऐका.—

## १६. एका अपूप-भक्षकाची कथा.

कोणा एका वाटसरूनें एका पणाला आठ अपूप विकत घेतले. त्यानें त्यांतले सहा खाल्ले, पण तोंवर त्याला तृप्ति झालीसें वाटलें नाहीं, म्हणून त्यानें सातवा अनरसा ( किंवा पुरी ) खाल्ला. त्यानें त्याला तृप्ति झालीसें वाटलें, तेव्हां तो मोठ्यानें ओरडून म्हणाला,–' हाय हाय; मी नागवलों, म्यां मूर्खानें प्रथमच हा अपूप कां नाहीं खाल्ला. म्हणजे त्यानेंच माझी तृप्ति झाली असती. पूर्वी खाल्लेले सहा अपूप मी व्यर्थ नासून सोडले! ठेवले असते तर! हाय हाय; घात झाला!' असें म्हणून आक्रोश करणाऱ्या त्याच्या रडण्याचें कारण ऐकून सर्व लोक हंसूं लागले.

## १७. एका वैश्य-भृत्याची कथा.

एक वाणी आपल्या भृत्यास–' अरे, मी घरीं जाऊन येतों, तों तूं या दुकानाचें दार संभाळ ' असें सांगून तो घरीं गेला. तों इतक्यांत रस्त्यावर नाच चालू झाला; म्हणून तो पहाण्याकरितां तो दास दुकानाचें दार खांद्यावर घेऊन, जेथें नाच चालला होता, तेथें गेला. कांहीं वेळानें दुकानदार परत आला व खांद्यावर दार घेऊन नाच पहात उभा असलेल्या आपल्या नोकराला रागें भरूं लागला. तेव्हां ' शेटजी, तुमच्या सांगण्याप्रमाणें मी दुकानाचें दार राखलें आहे.' असें तो उलट बोलला. सारांश, तात्पर्य न जाणणारा व केवल शब्दाकडे दृष्टि देणारा मूर्ख असा अनर्थ करीत असतो.* अशीच आणखी एक मुग्धाची कथा ऐका.–

---

† एवमज्ञातहृदया मूर्खाः कृत्वा विपर्ययम् ।
घ्नन्ति स्वार्थं परार्थं च तादृग्ददति चोत्तरम् ॥

* इत्यनर्थाय शब्दैकपरोऽतात्पर्यविज्जडः ॥

## १८. मूर्ख भिल्लाची कथा.

कांहीं ग्राम्य लोकांनीं एका रेड्याला एका गांवाच्या बाहेर नेऊन भिल्ल वाडींतील एका वडाखालीं मारलें व खाल्लें. तेव्हां रेड्याच्या स्वामीनें राजाकडे गाऱ्हाणें नेलें. राजानें रेड्याला खाणाऱ्या ग्राम्य लोकांना आणविलें. तेव्हां त्यांच्या समक्ष रेड्याचा धनी राजाला म्हणाला,–'देव, माझ्या समक्ष या मूर्खांनीं माझा रेडा तडागाच्या कांठावरील वट–वृक्षाखालीं मारून खाल्ला.' तें ऐकून त्या अनेकांतील एक वृद्ध मूर्ख म्हणाला, 'सरकार, या गांवांत तडाग नाहीं व वटही नाहीं. हा खोटें सांगत आहे. याचा रेडा कोणी मारला नाहीं व खाल्लाही नाहीं.' त्यावर तो स्वामी म्हणाला 'काय, या गांवाच्या पूर्वेस तडाग व वट नाहीं का आहे? त्यांच्या खालीं तुम्ही त्याला अष्टमीच्या दिवशीं मारून खाल्लेंत.' तें ऐकून राजा हंसत त्या मूर्खांना उत्साह देत म्हणाला,–' तूं खरें बोलणारा आहेस असत्य मुळींच बोलत नाहींस, मला खरें सांग. तुम्ही सर्वांनीं रेड्याला मारून खाल्लें कीं नाहीं?' राजाचा हा प्रश्न ऐकून तो जड भिल्ल म्हणाला, 'प्रभो, माझा पिता मेल्यावर मी तीन वर्षांनीं झालों, व त्यानेंच मला बोलण्याचें चातुर्य शिकविलें. यास्तव हे महाराज, मी असत्य कधीं बोलत नाहीं. आम्ही याचा रेडा मारून खाल्ला हें खरें; पण, हा खोटें बोलत आहे,' त्या मूर्खाचें हें चमत्कारिक भाषण ऐकून अनुगांसह राजा आपलें हंसें आवरूं शकला नाहीं. नंतर त्या धन्याला दुसरा रेडा देववून शिवाय राजानें त्या ग्राम्यांस दंड केला. सारांश, मूर्ख याप्रमाणें मूर्खत्वाच्या अभिमानानेंच दुसऱ्यांना आपला प्रत्यय आणून *देण्यासाठीं आपलें गुह्य प्रकट करितात, व जें खरोखर गुह्य नसतें तें गुप्त ठेवितात.

## १९. रागिट भार्येच्या पतीची कथा.

एक रागीट भार्या आपल्या मूर्ख व दरिद्री पतीला म्हणाली,–' उद्यां सकाळीं मी बापाच्या येथें जाईन. कारण मला उत्सवाकरितां बोलाविलें आहे. यास्तव तूं कोठूनही काय हवें तें करून मला जर कमलांची माळ आणून न दिलीस तर मी तुझी भार्या नव्हे, व तूं माझा पति नव्हेस.'

---

* इत्यगुह्यं निगूहन्ते गुह्यं प्रकटयन्ति च ।
मौर्ख्याभिमानेनादातुं मूर्खाः प्रत्ययमात्मनि ॥

भार्येची ही आज्ञा मान्य करून कमळें आणण्यासाठीं तो दरिद्री रात्रीं राजाच्या सरोवरावर गेला. आंत प्रवेश करितांच त्याला पाहून, रक्षकांनीं 'तूं कोण ?' असा प्रश्न केला. तेव्हां मी चक्राव्ह ( म्हणजे चक्रवाक पक्षी ) आहें असें त्यानें सांगितलें. तें ऐकून त्यांनीं त्याला बांधून उजाडत राजसभेंत नेलें. तेथें राजाच्या समोर विचारलें असतां तो चक्रवाकाचा शब्द करूं लागला, तेव्हां राजानें त्याला आपला खरा वृत्तांत सांगण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला असतां, त्यानें भार्येची आज्ञा त्याला सांगितली. त्या विषयासक्त दीन दरिद्र्याचा तो खरा वृत्तान्त ऐकून राजाला दया आली, व त्यानें त्याला कमलांसह सोडून दिलें.

## २०. एका वैद्याची कथा.

एका मूढबुद्धि वैद्याला कोणी एक ब्राह्मण म्हणाला,–' माझ्या कुबड्या मुलाचें कुबड आंत घालीव ' तें ऐकून वैद्य म्हणाला मला अगोदर दहा पण दे, मी जर तुझ्या पुत्राचें हें कुबड आंत न घालविलें तर त्यांच्या दसपट म्हणजे शंभर पण मी तुला परत देईन.' असा पण करून त्या मूर्खानें ब्राह्मणापासून दहा पण घेतले, व त्या कुबड्या मुलाच्या कुबडाला तेल लावून रगडणें, शेकणें, डागणें इत्यादि उपायांनीं वैद्यानें त्याला पीडा मात्र दिली. पण तो त्याला आंत घालवूं शकला नाहीं. शेवटीं त्याला बोलल्याप्रमाणें शंभर पण परत द्यावे लागले. कारण कुबड्या मनुष्याचें कुबड घालविण्यास कोण समर्थ होणार* ! अशक्य गोष्टीविषयीं प्रतिज्ञा करून तिच्या द्वारा आपली श्लाघा करणें, हें केवळ उपहासालाच कारण होत असतें. यास्तव बुद्धिमानानें असल्या मूढमार्गांनीं जाऊं नये.†

याप्रमाणें सुंदरमुख गोमुख–सचिवाच्या तोंडून रात्रीं मूर्खांच्या कथा ऐकून नरवाहनदत्त राजपुत्र त्याच्यावर फार प्रसन्न झाला, व त्या आनंदाच्या भरांतच शक्तियशेविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या त्याला त्याच्या मित्रासह शय्येवर पडल्या पडल्याच गाढ झोंप लागली.

---

* को हि कुब्जमृजूकर्तुं शक्नुयादिह मानुषम् ।

† हासायैवमशक्यार्थप्रतिज्ञानविकत्थनम् ।
तदीदृशैर्मूढमार्गैः संचरेत न बुद्धिमान् ॥

## तरंग ७ वा.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं जागा झालेला नरवाहनदत्त आपल्या शक्तियश प्रियेचें चिंतन करीत व्याकुल झाला. तिच्या विवाहाला राहिलेला एक महिन्याचा अवधि त्याला युगासारखा भासला. त्या नूतनविवाहित पत्नीविषयीं फार उत्कंठा लागल्याकारणानें त्याच्या मनाला समाधान कसें तें मुळींच वाटेना. गोमुखाच्या तोंडून तें वर्तमान कळतांच त्याचा पिता वत्सराज आपल्या वसंतकादि सचिवांस त्यांच्याकडे पाठविता झाला. त्या श्रेष्ठ व मान्य सचिवांच्या गौरवानें नरवाहनदत्तानें थोडेंसें धैर्य धरलें असतां, चतुर गोमुख वसंतकास म्हणाला,– 'आर्या वसंतका, युवराजाच्या मनाला संतोष देईल अशी एकादी विचित्र व नवी कथा सांग.' तें ऐकून धीमान् वसंतक कथा सांगूं लागला.–

### १. यशोधर व लक्ष्मीधर यांची कथा.

मालव देशांत श्रीधर नांवाचा एक उत्तम ब्राह्मण होता. त्याला एकसारखे दोन जुळे पुत्र झाले. त्यांतील वडिल मुलाचें नांव यशोधर व धाकट्याचें लक्ष्मीधर असें त्यानें ठेविलें. पुढें तरुण झालेले ते दोघे भ्राते विद्याप्राप्तीकरितां पित्याच्या आज्ञेनें देशान्तरास निघाले. मार्गानें जात असतांना त्यांना मध्यें एक मोठें अरण्य लागलें. त्यांत पाण्याचा कोठें गंधही नव्हता. छायेचें तर नांव सुद्धां नव्हतें. तापलेल्या वाळूचें मात्र तेथें प्राचुर्य होतें. त्यांतून चालतां चालतां ते दोघेही भाऊ थकून गेले. त्यांना तृषा लागली. शेवटीं त्यांना संध्याकाळीं एक उत्तम वृक्ष सांपडला. तो पुष्कळ फळें व दाट छाया यांनीं युक्त होता. त्या झाडाखालीं एक पृथक् विहीर होती. तींत शीतल व स्वच्छ जल असून, ती सर्व विहीर कमलांच्या सुवासानें सुवासित झाली होती. त्या विहिरींत स्नान करून त्या दोघांनींही फलाहार केला. शीतल जलपान करून ते सुखी झाले, आणि एका मोठ्या सपाट शिळेवर बसून त्यांनीं क्षणभर विश्रांति घेतली. इतक्यांत सूर्यास्त झाला, म्हणून संध्योपासना करून ती रात्र घालविण्याकरितां ते दोघे झाडावर चढले. कारण खालीं बसल्यास रात्रीं श्वापदें त्रास देतील, अशी त्यांना भीति वाटली. असो; रात्र पडली असतां

त्यांच्या समक्ष त्या खालच्या विहिरीच्या जलांतून पुष्कळ पुरुष वर निघाले. त्यांतील कोणा एकानें भूमि झाडून साफ केली, एकानें तिच्यावर सडा घातला, कोणी तेथें पांच रंगांचीं फुलें पसरलीं, कोणी तेथें सोन्याचा पर्यंक आणून घातला, कोणी त्यावर गादी घालून वर आच्छादन पसरून ठेवलें, आणि कित्येकांनीं पुष्पें, अंगराज, पेय पदार्थ, उत्तम आहार, इत्यादि आणून त्या वृक्षाखालीं एकीकडे व्यवस्थेनें ठेवले.

त्यानंतर त्या वापीच्या जलांतून एक रूपानें मदनास जणुं काय जिंकणारा पुरुष वर निघाला. त्याच्या हातांत खड्ग होतें. तो दिव्य भूषणांनीं भूषित होता. तो त्या आसनावर येऊन बसला असतां, त्याच्या गळ्यांत माळा घालणें, अंगास उट्या लावणें इत्यादि केल्यावर सर्व अनुचर त्या विहिरीच्या जलांत बुडाले. नंतर त्या जलांतूनच एक सुंदर स्त्री बाहेर निघाली. तिचा वेष नम्र असून सुंदर माला व आभरणें यांस ती धारण करीत होती. तशीच आणखी एक दुसरी त्यांतून निघाली. ती अतिशय रूपसंपन्न असून उत्तम वस्त्रें व आभरणें यांनीं उज्ज्वल झाली होती. त्या दोघीजणी त्या पर्यंकस्थ पुरुषाच्या भार्या होत्या. पण त्यांतील मागून आलेली त्याला फार प्रिय होती. यास्तव पहिलीनें रत्नपात्रें मांडून त्यांतील दोन पात्रांत आहार व पेय घालून तीं पति व सवत यांच्यापाशीं नेलीं. त्यांनीं भोजन केल्यावर त्या साध्वीनेंही भोजन आटोपून घेतलें. इतक्यांत तिचा पति तिच्या सवतीसहवर्तमान पर्यंकावर निजला. सुरतक्रीडेनंतर त्याला झोप लागली. त्याची पहिली भार्या त्याचे पाय चेपीत बसली होती तिची सवतही शय्येवर जागतच पडली होती. हा सर्व प्रकार पाहून वृक्षावर बसलेले ते दोघे भ्राते आपसांत म्हणाले,–' आपण या पाय चेपीत असलेल्या स्त्रीपाशीं जाऊन हा कोण आहे ? असा प्रश्न करूं या. हीं तिघेंही अगदीं सौम्य दिसत आहेत. तेव्हां त्यांना राग येईल अशी शंकाही मनांत आणणें व्यर्थ आहे.'

असा संकेत करून ते दोघेही खालीं उतरले व त्या पहिल्या स्त्रीकडे जों जात आहेत, तों शय्येवर पडलेल्या दुसरीनें यशोधरास पाहिलें. त्याबरोबर ती उद्दाम व चपळ स्त्री निजलेल्या पतीच्या शय्येवरून उठून व त्या सुरूप तरुणाजवळ येऊन, ' माझें सेवन कर ' असें म्हणाली. पण 'पापे, तूं परस्त्री व मी तुला परपुरुष असें असतांना हें काय भलतेंच बोलतेस ?'

असें त्यानें जरा तिरस्कारानें म्हटलें असतां ती पुनः म्हणाली–'तुझ्या-सारख्या शंभर पुरुषांशीं मी संगत झालें आहें. मग तुला 'परस्त्री' हें भय कशाला पाहिजे ! माझ्या या बोलण्यावर तुझा विश्वास बसत नसेल, तर या शंभर अंगठ्या पहा. संगत झालेल्या एकेका पुरुषापासून एकेक अंगठी घेऊन मी या इतक्या जमविल्या आहेत.' इतकें बोलून तिनं आपल्या पदरांत बांधलेल्या अंगठ्या सोडून दाखविल्या.

तेव्हां यशोधर म्हणाला,–' तूं शंभरांशीं संगत हो, कीं लक्षांशीं विलास कर. माझी तर तूं माता आहेस. मी कामपाशांत सांपडणार नाहीं.' याप्रमाणें त्यानें निराकरण केलें असतां, ती शठ स्त्री मोठ्यानें रडूं लागली, व क्रोधानें पतीला जागें करून यशोधरास दाखविलें, व आपल्याला झोंप लागली असतां यानें मला बलात्कारानें भ्रष्ट केलें; असें खोटेंच सांगितलें. त्याबरोबर तो पुरुष तरवार उपसून वर उठला. पण, त्याची ती साध्वी भार्या त्याच्या पायांवर डोकें ठेवून व ते आपल्या दोन्ही हातांनीं घट्ट धरून म्हणाली,–" स्वामिन्, असें पाप करूं नका. माझें म्हणणें ऐका. तुमच्या जवळून उठून या पापिणीनेंच आपण होऊन त्याची प्रार्थना केली; पण त्या सज्जनानें हिच्या म्हणण्यास मान दिला नाहीं. तूं माझी माता आहेस, असें बोलून या सत्पुरुषानें हिचें निराकरण केलें, त्यामुळें रागावून या पापिणीनें त्याला मारण्याकरितां आपल्याला जागें केलें आहे. प्रभो, हिनें माझ्या समक्ष आजपर्यंत प्रति रात्रीं या वृक्षावर येऊन राहि-लेल्या शंभर मार्गस्थांचा उपभोग घेतला आहे, व त्या सर्वांपासून एकेक अंगठी घेऊन ठेविली आहे. यापूर्वीच मी ही गोष्ट आपल्या कानावर घातली असती, पण मीं त्वेषानें कांहीं तरी सांगत आहें, असें समजाल, या भीतीनें मी बोललें नाहीं. आतां आपल्या हातून घडत असलेल्या या पापाला भिऊन मी हा सत्य वृत्तान्त सांगत आहें. माझें म्हणणें खोटें वाटत असेल, तर हिच्या पदरांत बांधलेल्या अंगठ्या आहेत, त्या पहा. पतीला खोटेंच कांहीं तरी सांगणें, हा मज सतीचा धर्म नव्हे. हे प्रभो, मी साध्वी आहें; असा विश्वास आपल्याला यावा म्हणून हा माझा प्रभाव पहा." असें बोलून व त्या वृक्षाकडे क्रोधानें पाहून तिनें त्याचें भस्म केलें. आणि प्रसन्न दृष्टीनें पाहून पुनः त्याला पहिल्यापेक्षां अधिक सुंदर बनविलें.

तें सर्व पाहून तिच्या भर्त्यानें संतुष्ट चित्तानें तिला प्रेमपूर्वक घट्ट आलिंगन दिलें. आणि तिच्या सांगण्याप्रमाणें दुसरीच्या वस्त्रांत बांधलेल्या शंभर अंगठ्या पाहून तिच्या पतीनें त्या दुष्ट स्त्रीचें नाक कापून तिला घालवून दिलें. वेदाध्ययन करणाऱ्या भावासह यशोधराला पाहून त्यानें क्षमा केली व मोठ्या खेदानें म्हटलें,–' मी ईर्ष्यावशात् या दोघी भार्यांना सतत आपल्या हृदयापाशीं ठेवून घेऊन त्यांचें रक्षण करीत होतों, तथापि या पापिणीचें रक्षण करण्यास मी समर्थ झालों नाहीं. विजेला स्थिर कोण करणार? चपल स्त्रीचें रक्षण कोण कसें करणार? पण स्त्री जर साध्वी असली, तर ती आपल्या एका शीलानेंच सुरक्षित असते. शीलानें सुरक्षित असलेली ती आपल्या पतीचें दोन्ही लोकीं रक्षण करते.* याविषयीं या माझ्या भार्येचेंच उदाहरण पहा. शाप व वर देण्यास समर्थ असलेल्या हिनें आज माझें उभय लोकीं रक्षण केलें आहे. हिच्या अनुग्रहानें आज माझा कुलटासंग सुटला, व उग्र ब्राह्मणवधाचें पातकही लागलें नाहीं.'

असें बोलून व त्या दोघांना बसवून, तो पुरुष यशोधराला, 'तुम्ही कोठून आलां व कोणत्या उद्देशानें कोठें जात आहां' असें विचारूं लागला. तेव्हां यशोधरानें त्याला आपला सर्व वृत्तांत सांगितला, आणि त्याच्यावर पूर्ण विश्वास बसल्यामुळें कौतुकानें त्याला असें विचारलें,–' हे महाभाग, मी आतां विचारतों तें सांगण्यासारखें असल्यास ' तूं कोण, अशा दिव्य भोगांची अनुकूलता असूनही जलनिवास कां करतोस?' तें मला सांग. तें ऐकून, सांगतों ऐक, असें बोलून तो जलवासी पुरुष त्याला आपला वृत्तांत सांगूं लागला.—

### जलवासी पुरुषाचा वृत्तान्त.

हिमालयाच्या दक्षिणेस काश्मीर या नांवाचा एक देश आहे. मनुष्यांना स्वर्गातील सुख घेण्याकरितांच जणुं काय ब्रह्मदेवानें तो निर्माण

---

* विद्युतं कः स्थिरीकुर्यात्को रक्षेच्चपलां स्त्रियम् ।
साध्वी यदि परं स्वेन शीलेनैकेन रक्ष्यते ॥
तद्रक्षिता सा भर्तारं रक्षत्युभयलोकयोः ॥

केला आहे. कैलास व श्वेतद्वीप यांतील सुखकर वसतीही विसरून हर व हरि त्या देशांतील शेकडों स्वयंभू स्थानांत निवास करितात. वितस्तानदीच्या जलानें तो पवित्र झालेला असून, शूर व विद्वज्जनांनीं भरलेला आहे. त्यामुळें छलादि दोष व बलाढ्य शत्रू यांनां तो देश अजिंक्य झाला आहे. पूर्वजन्मीं मी त्या देशांतील एका ग्रामांत सामान्य ब्राह्मणपुत्र होतों. माझ्या दोन भार्या होत्या. एकदां तेथील भिक्षूंशीं माझा परिचय झाला, व मी त्यांच्या शास्त्रांत सांगितलेलें उपोषणव्रत आरंभिलें. तें पुष्कळ दिवस निर्विघ्नपणें चाललें होतें. पण शेवटीं तें अगदीं संपावयास आलें असतां, एकदां माझ्या दोघी भार्यांतील एकजण, मी नको नको म्हणत असतांही हट्टानें माझ्यापाशीं येऊन निजली. चवथ्या प्रहरीं झोंपेच्या भरांत व्रतनियमाला विसरून मी तिच्याशीं संयोग केला. पण त्या व्रतानुष्ठानांत तेवढें वैगुण्य पडतांच मी हा येथें असा जलपुरुष होऊन पडलों व त्याच दोघी भार्या येथें मला प्राप्त झाल्या. एक ती कुलटा व दुसरी ही पतिव्रता. पण; माझ्या त्या खंडित झालेल्याही व्रताचा प्रभाव हा असा आहे. मला पूर्वजन्माचें चांगलें स्मरण आहे. रात्रीं मला इष्ट भोग प्राप्त होतात. माझें तें व्रत जर खंडित झालें नसतें, तर मला हा जन्म घ्यावा लागला नसता.

याप्रमाणें आपला वृत्तान्त सांगून त्या सज्जनानें मिष्ट भोजन व दिव्य वस्त्रें यांच्या योगानें त्या दोघां भावांचा सत्कार केला. तेव्हां ती त्याची सती भार्या पूर्ववृत्त ऐकून व भूमीवर गुडघे टेंकून चंद्राकडे पहात म्हणाली—'लोकपालांनो, मी जर खरी साध्वी व पतिव्रता असेन, तर हा माझा पति या जलवासापासून मुक्त होऊन स्वर्गास जावो.' तिच्या तोंडांतून इतके शब्द बाहेर पडत आहेत, तोंच आकाशांतून विमान उतरलें. तेव्हां तीं दोघेंही ( पत्नी व पति ) त्यांत बसून स्वर्गास गेलीं.

खऱ्या साध्वींना त्रिभुवनांत असाध्य काय आहे ! † हा सर्व चमत्कार पाहून त्या दोघां ब्राह्मणांना परम विस्मय वाटला. नंतर राहिलेली रात्र घालवून प्रभातकाळीं यशोधर व लक्ष्मीधर या नांवाचे ते दोघे भ्राते पुढें निघाले. सायंकाळीं एका निर्जन अरण्यांतील वृक्षाखालीं ते जाऊन पोंचले. तेथें जल मिळावें अशी ते इच्छा करूं लागले असतां वृक्षापासून

† असाध्यं सत्यसाध्वीनां किमस्ति हि जगत्त्रये ॥

निघालेली अशी वाणी त्यांच्या कानीं पडली.-' ब्राह्मणांनो, कांहीं वेळ स्वस्थ बसा. तुम्ही आज, माझ्या घरीं आलां आहां. यास्तव अन्न-पानादिकांनीं मी तुमचें आतिथ्य करतों.

असें बोलून ती वाणी गप झाली. लागलीच तेथें एक सुंदर जलाची वापी ( पायऱ्यांची विहीर ) उत्पन्न झाली. तिच्या कांठीं विचित्र पान व भोजन येऊन राहिलें. तें पाहून हा काय चमत्कार आहे, असें म्हणून मनांत विस्मित झालेल्या त्या दोघांनीं विहिरींत स्नान केलें; व यथेच्छ आहार केला; नंतर संध्योपासना करून ते दोघे वृक्षाच्या खालीं येऊन, जों बसत आहेत, तों एक सुंदर पुरुष वृक्षावरून निघाला; त्याला त्या दोघांनीं अभिनंदन केलें, त्यानेंही त्यांचें स्वागत केलें. नंतर तो खालीं बसला. तेव्हां ब्राह्मणपुत्रांनीं त्याला-' आपण कोण ? ' असा प्रश्न केला असतां तो म्हणाला.—

## ३. वृक्षांतून निघालेल्या पुरुषाचा वृत्तान्त.

' मी पूर्वीं एक दरिद्री ब्राह्मण होतों; पण दैवयोगानें माझी संन्याशाशीं संगति झाली. त्यानें सांगितलेलें उपोषणव्रत करीत असतांना, कोणा एका शठानें मला बलात्कारानें सायंकाळीं जेऊं घातलें. त्यामुळें माझें व्रत खंडित झालें, व मी गुह्यक बनलों. तें व्रत जर पूर्ण झालें असतें तर मी स्वर्गांत देव झालों असतों.' असो; हा मी आपला वृत्तान्त, तुम्हांला सांगितला आहे. आतां तुम्ही मला आपली वार्ता सांगा, तुम्ही कोठून आलां व या मरुस्थलींत कसे शिरलांत ?

तें ऐकून यशोधरानें आपला वृत्तान्त त्यास सांगितला, तेव्हां तो यक्ष या दोघां ब्राह्मणांस म्हणाला,-'असें जर असेल तर मी आपल्या प्रभावानें तुम्हांला विद्या देतों. त्यांच्या योगानें तुम्ही दोघेही विद्वान् होऊन घरीं जा; उगीच विदेशामध्यें भ्रमण करीत रहाण्यांत काय अर्थ आहे ?' असें बोलून यक्षानें त्या दोघांनाही विद्या दिल्या, व त्यांच्या प्रभावानें त्यांनींही त्यांचें पूर्णपणें ग्रहण केलें नंतर यक्ष त्या दोघांस म्हणाला,- आतां मी तुम्हां दोघांपासून एक गुरुदक्षिणा मागतों. माझ्यासाठीं तुम्ही उपोषणव्रत करा. सत्य भाषण करणें, ब्रह्मचर्य पाळणें, देवाला प्रदक्षिणा घालणें, संन्यासी जेव्हां जेवतात तेव्हां जेवणें, मनाचा संयम करणें

व क्षमा, या नियमांसह एक अहोरात्र व्रत करून त्याचें फल मला समर्पण करा. म्हणजे देवलोकीं जाणें हें पूर्णव्रताचें फल मला मिळल.'

सर्व विद्या एका क्षणांत देणाऱ्या त्या यक्षगुरूची ही प्रार्थना, त्या दोघांनीं शिरसामान्य केली व तो तेथेंच गुप्त झाला.

नंतर प्रयासावांचून ज्यांची इष्टसिद्धि झाली आहे, असे ते अति हृष्ट झालेले दोघे भ्राते ती रात्र तेथें घालवून व तेथूनच परतून स्वगृहीं गेले. आईबापांना घडलेला आपला वृत्तान्त सांगून व आनंदित करून यक्षाच्या पुण्याकरितां त्या दोघांनींही उपोषण व्रत केलें. तेव्हां विमानांत बसलेला तो त्यांचा यक्षगुरु त्यांच्यापाशीं येऊन म्हणाला,–'तुमच्या प्रसादानें मी यक्षतेचें उल्लंघन करून, देवत्वास प्राप्त झालों आहें. आतां तुम्हीही आपल्या उद्धाराकरितां हें व्रत करा; म्हणजे हें शरीर सोडल्यावर तुम्ही देव व्हाल; आजपासून माझ्या वरानें तुमच्याजवळची संपत्ति अक्षय्य राहील.' इतकें बोलून, विमानानें तो स्वर्गास गेला.

त्यानंतर यशोधर व लक्ष्मीधर या दोघां भ्रात्यांनींही तें व्रत केलें, आणि त्यामुळें ज्यांनां विद्यांप्रमाणेंच विपुल धनही मिळालें आहे, असे ते दोघे सुखानें राहिले. याप्रमाणें धर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या व संकटांमध्येंही शीलत्याग न करणाऱ्या साधूंचें संरक्षण देवताही करितात, व त्यांचा इष्ट मनोरथ पूर्ण होतो.*

वसंतकानें याप्रमाणें सांगितलेल्या या कथेच्या योगानें नरवाहनदत्ताचें बरेंच चित्तरंजन झालें, पण प्रिय शक्तियशेस प्राप्त करून घेण्याची इच्छा मुळींच शिथिल झाली नाहीं. आहारसमयीं वत्सराजानें बोलाविल्यामुळें, तो सचिवांसह त्याच्यापाशीं गेला. पित्याच्या पंक्तीला उचित भोजन करून, व राहिलेला दिवस तेथेंच घालवून, रात्रीं राजपुत्र सचिवांसह आपल्या मंदिरीं परत आला. तेथें पोंचल्यावर गोमुख पुनः त्याच्या चित्तविनोदाकरितां पुढील उत्तम कथा सांगूं लागला.—

---

* एवं धर्मप्रवृत्तानां शीलं कृच्छ्रेऽप्यमुञ्चताम्
देवता अपि रक्षन्ति कुर्वन्तीष्टार्थसाधनम् ॥

## ४. वानर व शिशुमार यांची कथा.

समुद्राच्या तीरावरील उदुंबरवनांत वलीमुख नांवाचा आपल्या कळपांतून चुकलेला, एक वानर रहात होता. एकदां तो फळें खात असतांना त्याच्या हातांतून एक उंबराचें फळ खालीं पडलें. तें समुद्रजलाचा आश्रय करून रहाणाऱ्या एका *शिशुमारानें खाल्लें व त्याच्या आस्वादानें आनंदित होऊन त्यानें अव्यक्त पण मधुर ध्वनि केला. तो ऐकून वानराला हर्ष झाला व शिशुमारानें पुनःपुनः तसाच ध्वनि करावा म्हणून तो ( वानर ) वारंवार उंबरें खालीं टाकूं लागला. त्यामुळें त्या दोघांची मैत्री जमली. वानर प्रत्यहीं उंबरें खालीं टाकीत असे व तो जलजंतु तीं खाऊन मधुर शब्द करीत असे. याप्रमाणें जलस्थ शिशुमार तीरावरील वृक्षावर बसणाऱ्या वानराच्या सहवासांत सर्व दिवस घालवून रात्रीं आपल्या घरीं जाऊं लागला. तेव्हां त्याच्या भार्येनें त्याला त्याचें कारण विचारलें. त्यानेंही तिला खरें कारण सांगितलें. पण सर्व दिवसभर पतीचा वियोग करविणारें तें वानराचें सख्य तिला आवडलें नाहीं. म्हणून तिनें अस्वस्थतेचें सोंग घेतलें. कांहीं तरी शरीरपीडा होत आहे असें तिनें दाखविलें. तेव्हां भार्येच्या त्या अस्वस्थतेमुळें व्याकूळ झालेला शिशुमार ' प्रिये, तुला काय होत आहे, तूं अशी अस्वस्थ कां, ही तुझी व्याधि कोणत्या उपायानें शांत होईल ? ' असें वारंवार विचारूं लागला. पण ती कांहींच सांगेना. म्हणून तिचें रहस्य जाणणारी तिची सखी म्हणाली, ' तूं करणार नाहींस व ही इच्छित नाहीं, हें जरी मी जाणतें, तरी माझा धर्म समजून मी सांगतें. कारण मुज्ञ मनुष्य जाणत असतांना लोकांच्या दुःखाचें कारण गुप्त कसें ठेवणार ? †तुझ्या ह्या भार्येला असा रोग झाला आहे, कीं तो वानराच्या हृदयकमळा ( काळजा ) च्या तुकड्यावांचून बरा होणार नाहीं. '

प्रियेच्या सखीचें हें भाषण ऐकून शिशुमार मनांत म्हणाला,—' हर हर ! मी आतां वानराचें हृदय कोठून आणूं ? वलीमुख वानर माझा मित्र

---

* शिशुमार म्हणून लहान लहान मुलांना गिळणारा एक जलजंतु आहे. सुसर असें येथें थोडक्यांत समजावें.

† ..................विबुधः खेदं जनानां निह्नुते कथम् ॥

आहे; पण त्याला मारून मित्रद्रोह करणें, मला उचित आहे का? अथवा मला मित्राला घेऊन काय करावयाचें आहे? माझी भार्या मला प्राणांहून प्रिय आहे' असा विचार करून शिशुमार आपल्या भार्येला म्हणाला,–'प्रिये, अशी भिऊं नकोस, मी तुझा व्याधि नाहींसा करण्याकरितां त्या आपल्या वानर मित्राला जिवंतच येथें आणतों.' इतकें सांगून तो समुद्र-तीरावरील आपल्या मित्राकडे आला, व गोष्टी बोलतां बोलतां म्हणाला,–'मित्रा, तूं अजून माझें घर पाहिलें नाहींस व माझ्या भार्येशींही तुझा परिचय झालेला नाहीं. यास्तव एक दिवस माझ्या येथें चल. एकमेकांच्या घरीं जाऊन निःशंकपणें भोजन केल्यावांचून व परस्परांच्या भार्यांना भेट-ल्यावांचून असलेलें जें सौहृद् तें शुद्ध कपट आहे.‡' असें बोलून व त्या वानराला फसवून शिशुमारानें समुद्रांत उतरविलें; आणि त्या कपीला आपल्या पाठीवर बसवून तो जाऊं लागला.

पण समुद्रजलांतून वेगानें जाणारा तो जलचर प्राणी आज मनांत चकित व खिन्न झालेला आहे असें ताडून, वानर म्हणाला,–'मित्रा, आज तूं असा खिन्न कां दिसतोस? नेहमींप्रमाणें तुझी मुद्रा प्रसन्न कां नाहीं?' हा त्याचा आग्रहाचा प्रश्न ऐकून व तो आतां आपल्या हातांत सांपडला आहे असें जाणून, मूर्ख शिशुमार म्हणाला,–'गड्या, माझी भार्या आज अस्वस्थ आहे. ती आपल्या पथ्याकरितां मजजवळ वानराचें हृदय-कमल मागत आहे, म्हणून मी आज असा खिन्न दिसतों.'

हे त्याचे शब्द कानीं पडतांच तो शहाणा वानर मनांत म्हणाला,–'तर मग या पाप्यानें आज मला फसवून एवढ्यासाठीं आपल्या येथें नेण्याचा घाट घातला आहे! काय चमत्कार आहे!! हा मूढ स्त्रीव्यस-नासक्त होऊन मित्रद्रोह करण्यास तयार झाला आहे! अथवा यांत आश्चर्य कसलें? ज्याला भूतबाधा झालेली असते तो आपल्याच दांतांनीं आपल्याच अंगाचे लचके तोडीत नाहीं का?*' असा विचार करून

---

‡ भुज्यते यत्र नान्योन्यं गृहमेत्य निरर्गलम्।
प्रदर्श्यन्ते न दाराश्च कैतवं तन्न सौहृदम्॥

* अहो स्त्रीव्यसनाक्रान्तो मित्रद्रोहेऽयमुद्यतः।
किंवा दन्तैः स्वमांसानि भूतग्रस्तो न खादति?॥

तो म्हणाला,–' अरे रे ! मित्रा, मग तूं हें मला अगोदरच का नाहीं सांगितलेंस ? म्हणजे मी तुझ्या प्रियेकरितां आपलें हृदयकमल घेऊन आलों असतों. तें आतां माझ्या रहावयाच्या उदुंबर वृक्षावर राहिलें आहे, येथें नाहीं. काय करावें !

तें ऐकून आर्त झालेला मूर्ख शिशुमार त्याला म्हणाला,–'मित्रा, तर मग आपण परत जाऊन तें आणुं या चल.' वानरानेंहा या त्याच्या म्हणण्यास आनंदानें रुकार दिला. तेव्हां तो मूर्ख प्राणी त्याच्या सहवर्तमान समुद्राच्या कांठीं आला. तेथें पोंचतांच जणुं काय यमाच्याच तोंडांतून सुटलेला वलीमुख, पटकन् उडी मारून आपल्या प्रिय झाडाच्या अग्रावर जाऊन बसला आणि पाण्यांत वाट पहात असलेल्या मूर्ख जलचराला म्हणाला,–'मूर्खा, तूं आतां येथून चालता हो. काळीज कधीं तरी शरीरापासून पृथक् होईल काय ? माझें काळीज वृक्षावर राहिलें आहे, असें खोटेंच काहीं तरी सांगून मी आपला प्राण वांचविला आहे. आतां पुनः मी तुजबरोबर यणार नाहीं. अरे मूर्खा, याविषयीं एका गर्दभाची कथा मी सांगतों ती ऐक.

### ५. गर्दभाची उपकथा.

एका वनांत एक सिंह रहात होता. त्याचा एक कोल्हा सचिव होता. एकदां मृगया करावयास आलेल्या राजानें त्या सिंहाला बाण मारला; पण दैववशात् तो मेला नाहीं. तर कसाबसा जिवंत राहून आपल्या गुहेंत जाऊन बसला. कांहीं वेळानें राजा त्या वनांतून निघून गेला असतां आहाराच्या अभावीं अतिशय व्याकुल होऊन राहिलेल्या मांसावर उपजीविका करणारा त्याचा सचिव म्हणाला,–' प्रभो, जाववेल तितकेंच बाहेर जाऊन कांहीं भक्ष्य कां मिळवीत नाहीं ? आपल्या शरीरासह सेवकवर्गही आहारावांचून क्लेश भोगीत आहे.'

तें ऐकून सिंह म्हणाला,–' मित्रा, राजाच्या बाणानें माझ्या शरीराला मोठा व्रण झाला आहे. त्यामुळें माझ्यानें कोठें फिरवत नाहीं. गाढवाचे कान व हृदय जर मला खावयास मिळेल तर माझा व्रण भरून येईल व मी बरा होईन. यास्तव तूं कोठून तरी सत्वर गाढवाला घेऊन ये. सिंहाचें हें भाषण ऐकून व बरें आहे असें म्हणून, कोल्हा तेथून निघाला.

गाढवाचा शोध करीत भटकत असलेल्या त्याला जलाशयापाशीं एक परटाचा गाढव भेटला. तेव्हां त्याच्याजवळ जाऊन कोल्हा मोठ्या प्रेमानें म्हणाला,–'गड्या, तूं असा कृश व दुर्बल कशानें झालास?' तें ऐकून गर्दभ उलट बोलला,–' मित्रा, काय सांगूं ! या धोब्याचा भार वाहतां वाहतां माझी अशी दुर्दशा झाली आहे.'

मोठया दुःखानें असें आपल्या कष्टाचें कारण सांगणाऱ्या त्या खराला शठ जंबूक म्हणाला,–असें जर आहे तर तूं येथें उगीच भार वाहण्याचे क्लेश भोगीत कां राहिला आहेस ? मज बरोबर चल; म्हणजे मी स्वर्गासारखें सुख देणाऱ्या वनांत तुला घेऊन जातों. तेथें गर्दभींसह विहार करण्यांत तुझा काल हां हां म्हणतां आनंदानें जाईल.' कोल्ह्याचें हें मधुर भाषण ऐकून, विषयलोलुप गाढव त्याच्याबरोबर जावयास तयार झाला. तेव्हां कोल्हाही त्याला घेऊन सिंहाच्या वनांत गेला. त्याला पहातांच प्राणवैक्लव्यामुळें दुर्बल झालेला सिंह हळूच येऊन गाढवाच्या पाठीवर पंजा मारूं लागला; पण इतक्यांत मूढ गर्दभाची दृष्टि त्याच्याकडे गेली; आणि तो तत्काल जीव घेऊन पळत सुटला. व्रणाच्या व्यथेनें पीडलेला सिंह त्याचा पाठलाग करूं शकला नाहीं, त्यामुळें गाढवाचे प्राण वांचले. आपलें कार्य सिद्ध झालें नाहीं, असें पाहून सिंहही गुहेंत येऊन पडला. तेव्हां जंबूक थोडीशी निंदा करून म्हणाला,–हे प्रभो ! 'या खरालाही जर तूं मारूं शकला नाहींस, तर हरणादिकांना कसें मारणार ?

तें ऐकून सिंह बोलला,–'मित्रा, तूं सुज्ञ आहेस. यास्तव कसेंही करून तूं त्याला पुनः येथें आण, म्हणजे मी अगोदर पासून सज्ज होऊन त्याला मारीन. असें सांगून सिंहानें पाठविलें असतां, जंबूक त्या खरापाशीं जाऊन म्हणाला,–' मित्रा, तूं अकस्मात् तेथून पळालास कां ? ' त्यावर गर्दभ म्हणाला,–' गड्या, माझ्या मागून येऊन सिंह मला आपला पंजा मारीत आहे असें मला दिसलें, त्यामुळें मी पळालों.' तेव्हां कोल्हा हंसून म्हणाला,–'वाः, तो तुला उगीच कांहीं तरी भ्रम झाला. तुला मारील असें एकही जनावर त्या अरण्यांत नाहीं. मी तुजपेक्षां दुर्बल असूनही तेथें सुखानें राहिलों आहें कीं नाहीं ? तर आतां चल, त्या वनांत तुला अबाधित सुख मिळेल.'

कोल्ह्याच्या या भाषणावर विश्वास ठेवून गर्दभ पुन: त्याच्याबरोबर वनांत आला. तो आला आहे, असें पाहून सिंहानेंही पहिल्यापेक्षां अधिक सावधानपणानें त्याच्यावर चाल करून आपल्या तीक्ष्ण नखांनीं त्याला फाडून मारिलें. नंतर त्या गर्दभाच्या शरीराचें रक्षण करावयास जंबूकाला ठेवून, सिंह स्नानाला गेला, पण तो रोगी स्नान करून परत येई तों त्या धूर्त सचिवानें गर्दभाचे दोन्ही कान व हृदय आपल्या तृप्तीकरितांच खाऊन टाकलें. सिंह मोठ्या आशेनें तें खावयास आला; पण मरून पडलेल्या गर्दभाला कान व हृदयही नाहीं, असें पाहून ' त्याचे कान व काळीज काय झालें ? म्हणून तो जंबूकास विचारूं लागला.' तेव्हां तो लबाड कोल्हा म्हणाला,–'प्रभो, याला कान व हृदय पूर्वीच नव्हतें. तें जर असतें तर तो मूर्ख तुम्हांला पाहून व पळून जाऊन पुन: कसा येता ? ' सिंहाला तें खरें वाटलें, व त्यानें कर्ण–हृदय–रहित गाढवाला खाऊनच आपला जठराग्नि शांत केला. सिंहाचें भोजन झाल्यावर अवशिष्ट मांसावर त्याच्या सचिवानेंही हात मारिला.

देव, अशी कथा सांगून वानर शिशुमाराला म्हणाला,–'यासाठीं गाढवासारखें आचरण करून मी तुजबरोबर पुन: येणार नाहीं.' वलीमुखाचें हें म्हणणें ऐकून शिशुमार–' भार्येचा मनोरथ पूर्ण झाला नाहीं व उत्तम मित्रही हातचा गेला ' असें म्हणत व रडत परत गेला. झालेलें वर्तमान ऐकून त्याच्या भार्येला बरें वाटलें. कारण वानराशीं सख्य असूं नये,' एवढाच तिचा खरा उद्देश होता. लागलीच ती बरी झाली. वानरही समुद्राच्या तीरावर आनंदानें संचार करीत राहिला. यास्तव हे प्रभो, बुद्धिमानानें दुर्जनावर कधींही विश्वास ठेवूं नये. दुर्जन व कृष्णसर्प यांवर विश्वास ठेवल्यावर सुख कोठून होणार !* असो; अशी कथा सांगून गोमुख मंत्री पुन: राजपुत्राच्या चित्तविनोदार्थ म्हणाला,– ' प्रभो, उपहासास पात्र असलेल्या मूर्खांची आणखी कथा ऐका.—

* तदेवं विश्वसेन्नैव बुद्धिमान् दुर्जने जने ।
दुर्जने कृष्णसर्पे च कुतो विश्वासतः सुखम् ॥

### ६. एका गवय्याची कथा.

एका गवय्यानें गीतवाद्यानें एका श्रीमानास प्रसन्न केलें. तेव्हां त्या धनिकानें आपल्या कारभाऱ्यास बोलावून 'याला दोन हजार पण दे,' असें सांगितलें. कोशाध्यक्ष कारभाऱ्यानेंही 'होय' असें म्हटलें. नंतर तो गवयी कोशगृहांत जाऊन त्याच्यापाशीं धन मागूं लागला. पण आपल्या धन्याशीं ज्याचा पूर्वीच संकेत झाला आहे, असा तो कोशाध्यक्ष त्याला एक कवडीही देईना. तेव्हां गवयी रागावून धनाढ्याकडे परत आला व कोशाध्यक्ष मला कांहीं देत नाहीं, असें सांगूं लागला. तेव्हां श्रीमान् म्हणाला,–'बाबा; तूं आम्हाला काय दिलें आहेस? म्हणून आम्हीं तुला त्याबद्दल कांहीं तरी द्यावें? आपल्या वीणावाद्यानें व गायनानें तूं जसें एक क्षणभर कर्णसुख दिलेंस, तसेंच दानवाक्यानें मीही तुला क्षणभर कर्णसुख दिलें.' तें ऐकून गवयाची निराशा झाली. पण त्याला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. कारण असल्या मूर्ख भाषणांनीं दगडही हंसतील, मग मनुष्यांची काय कथा!

### ७. मत्सरी शिष्यांची कथा.

कोणा एका गुरूचे दोन शिष्य होते, ते परस्परांशीं नेहमीं द्वेष करीत असत. त्यांतील एक शिष्य प्रत्यहीं गुरूचा उजवा पाय चेपात असे, व त्याला ऊन पाण्यानें धुवी. तसाच दुसरा शिष्य त्याच्या दुसऱ्या पायाची शुश्रूषा करीत असे एकदां गुरूनें उजव्या पायाची सेवा करणाऱ्या शिष्याला कोठें परगांवीं कांहीं कामासाठीं पाठविलें, दुसऱ्या शिष्यानें रोजच्याप्रमाणें डाव्या पायाला तेल लाविलें. ऊन पाण्यानें धुतलें पुसलें व रगडलें, तेव्हां गुरु त्याला म्हणाला,–'आज या माझ्या उजव्या पायालाही तूंच तेल लावून धू; कारण तो माझा शिष्य येथें नसून परगांवास गेला आहे.' गुरूचें हें भाषण कानीं पडतांच दुसरा शिष्य म्हणाला, गुरुराज, हा माझ्या प्रतिपक्ष्याचा पाय आहे. यास्तव मी त्याला हातही लावणार नाहीं.' पण तें ऐकूनही गुरूनें त्याला अतिशय आग्रह केला, तेव्हां शत्रूचा तो पाय आहे, या रोषानें त्या मूर्ख शिष्यानें त्याच्यावर दगड मारला. त्यामुळें गुरूचा उजवा पाय मोडला, व तो मोठ्यानें आक्रोश करूं लागला. तेव्हां बाहेरून पुष्कळ लोक धांवून आले, व त्या मूर्ख शिष्यास मारूं लागले. पण दयाळु गुरूनें त्याला

सोडविला. दुसऱ्या दिवशीं उजव्या पायाची शुश्रूषा करणारा तो पहिला शिष्य गांवाहून परत आला. तो गुरूचा उजवा पाय सुजला आहे व दुखत आहे, असें पाहून त्याचें कारण विचारलें. गुरूनें तें सांगितलें. तेव्हां त्यालाही अतिशय क्रोध आला. व 'त्यानें जर माझ्या पायाला अशी दुखापत केली आहे, तर मी त्या शत्रूच्या पायाला मोडल्यावांचून राहीन काय?' असें बोलून त्यानें गुरूचा दुसरा पाय ओढला व दगड घालून तो मोडला! तेव्हां त्या मूर्खालाही लोक मारूं लागले. पण गुरूनें कृपेनें त्या शिष्यालाही सोडविलें. त्यानंतर सर्वांच्या द्वेषास व उपहासास पात्र झालेले ते दोघे शिष्य तेथून निघून गेले, आणि आपल्या स्वाभाविक क्षमेनें श्लाघ्य झालेला गुरुही कांहीं दिवसांनीं पीडारहित झाला. याप्रमाणें एकमेकांशीं द्वेष करणारे सेवक स्वामीचें कार्य तर नासतातच; पण आपलेंही हित करून घेत नाहींत.* आतां दुतोंड्याची एक गोष्ट ऐका.—

८. दुतोंड्याची कथा.

एका सर्पाला शेपटीकडे एक व तोंडाकडे दुसरें, अशीं दोन शिरें होतीं. त्यांतील पुच्छाकडचें शिर आंधळें असून, स्वाभाविक शिर नेत्रयुक्त होतें. पण तीं दोन्ही शिरें 'मी मुख्य मी मुख्य' असें म्हणून आग्रहानें भांडत असत. सर्प तर आपल्या स्वाभाविक मस्तकानेंच सदा हिंडत असे. पण एकदां मार्गानें जात असतांना, पुच्छाकडच्या तोंडाला एक लांकुड सांपडलें. त्याला घट्ट धरून ठेवून, त्या शिरानें सापाची गति कुंठित केली. तेव्हां पुच्छाकडील तोंडच बळकट आहे, असें वाटून साप त्याच्या मागून जाऊं लागला. पण तें तोंड नेत्ररहित असल्यामुळें तो एका अग्नीनें युक्त असलेल्या खळग्यांत पडून भाजून मेला. याप्रमाणें जे पुष्कळसे लोक गुणांतील अंतर जाणत नाहींत किंवा ज्याना कोणामध्यें किती गुण आहेत हें कळत नाहीं, ते मूढ गुणहीन वस्तूच्या संगानें आपला नाश करून घेतात.‡ आतां एका खुळ्याची गोष्ट ऐका.

* एवमन्योन्यविद्विष्टो मूर्खः परिजनः प्रभो ।
स्वामिनोऽर्थं निहन्त्येव न चात्महितमश्नुते ॥

‡ एवं गुणस्य येऽल्पस्य बहवो नान्तरं विदुः ।
ते हीनगुणसंगेन मूढा यान्ति पराभवम् ॥

## ९. तांदुळ खाणाऱ्या जांवयाची कथा.

कोणी एक मूर्ख प्रथमच सासऱ्याच्या घरीं गेला. त्यानें तेथें सासूनें स्वयंपाकाकरितां घेऊन ठेवलेले शुभ्र तांदुळ पाहिले, व त्यांतील एक मूठ भरून घेऊन ती तोंडांत घातली. इतक्यांत त्याची सासू तेथें आली. तेव्हां लज्जेनें त्याला ते तोंडांतील तांदुळ थुंकतांही येईनात, व चावून गिळतांही येईनात. गाल मात्र फुगलले दिसू लागले. तेव्हां आपल्या जांवयाचे गाल सुजले आहेत, व त्यामुळेंच तो कांहीं बोलूं शकत नाहीं, असें समजून तिनें आपल्या पतीला बोलावून आणलें. त्याच्या सासऱ्यानेंही जावयाचे गाल सुजलेले असून तो कांहीं बोलत नाहीं, असें पाहून त्याला वैद्याकडे नेलें. वैद्यालाही तोंड सुजल्याचा भास झाला. पण आंत काय झालें आहे तें पहावें, म्हणून तो मस्तक घट्ट धरून, त्याचें तोंड जों जोरानें उघडीत आहे, तों लोकांच्या हास्यासह त्यांतून तांदुळ बाहेर पडले. सारांश, अज्ञ अकार्य करितो; पण तें गुप्त ठेवूं शकत नाहीं.

## १०. दूध काढणाऱ्या मुलांची कथा.

कांहीं मूर्ख मुलगे गाई, म्हशी इत्यादिकांचें लोक दूध काढितात असें पाहून एक गर्दभ भेटला असतां, त्याला अडवून, मोठ्या प्रेमानें त्याचें दूध काढूं लागले. कोणी त्याची धार पिळूं लागला, कोणी त्याच्या खालीं चरवी धरली, व बाकीचे सर्व मी प्रथम दूध पिणार, मी प्रथम पिणार इत्यादि बोलून आपसांत भांडूं लागले. पण पुष्कळ परिश्रम करणाऱ्याही त्यांना त्या जनावरापासून दुधाचा एक थेंबही लाधला नाहीं. याप्रमाणें मूर्ख अयोग्य स्थानीं प्रयास करून उपहासास पात्र होतो.‡

## ११. मूर्ख ब्राह्मणपुत्राची कथा.

प्रभो, एक मूर्ख ब्राह्मण-पुत्र होता; त्याला रात्रीं त्याचा बाप म्हणाला,– 'मुला, उद्यां सकाळींच तुला या शेजारच्या अमुक गांवाला गेलें पाहिजे.' तें ऐकून व बरें आहे, असें म्हणून काम काय करावयाचें तें विचारून न घेतांच, तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून त्या गांवास गेला व व्यर्थ श्रम करून सायंकाळीं परत आला; आणि बापाला, 'आज्ञेप्रमाणें मी त्या

‡ अवस्तुनि कृतक्लेशो मूर्खो यात्यवहास्यताम् ॥

गांवास जाऊन आलों ' असें सांगूं लागला; तें ऐकून बाप म्हणाला,–' मूर्खा, तेथें जाऊन काय काम करावयाचें तें विचारून न घेतां तूं नुस्ता हात हालवीत गेलास कशाला, व त्या तुझ्या जाण्याचा मला काय उपयोग ?' असो, याप्रमाणें बोलणाराचा अथवा कांहीं सांगणाराचा उद्देश न जाणतां जो मूर्ख व्यर्थ चेष्टा करूं लागतो, त्याला सर्व लोक हंसतात. स्वतः त्याला क्लेश अनुभवावे लागतात, पण त्यापासून कार्य होत नाहीं.*

असो; याप्रमाणें मुख्य सचिव जो गोमुख त्याच्यापासून उपदेश घेण्यासारख्या ह्या कथा ऐकून, मला शक्तियशेची प्राप्ति केव्हां होईल असें झालें आहे, असें त्याला सांगून पुष्कळ रात्र होऊन गेल्यामुळें तो वत्सेश्वर पुत्र आपल्या सचिवांसह स्वस्थ निजला.

## तरंग ८ वा.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं रात्रीं प्रियेच्या प्राप्तीविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या वत्सेश्वरपुत्र नरवाहनदत्ताला, त्याच्याच आज्ञेनें गोमुख सचिव चित्तरंजनार्थ पुढील कथा वर्णन करून सांगूं लागला—

### १. ब्राह्मण व मुंगुस यांची कथा.

कोणा एका नगरांत देवशर्मा ब्राह्मण होता. त्याची देवदत्ता या नांवाची सदृश कुलांत झालेली भार्या होती. ती एकदां गर्भवती होऊन योग्य समयीं पुत्र प्रसवली. तेव्हां ब्राह्मण दरिद्री होता, तरी तो आपल्याला निधिच लाधला आहे, असें समजूं लागला. सूतक ( जननाशौच, सुवेर ) संपल्यावर एकदां त्याची भार्या नदीवर स्नान करावयास गेली, व तो ब्राह्मण घरांत आपल्या अल्प बालकाचें संरक्षण करीत बसला. पण इतक्यांत त्या स्वस्तिवाचनावर निर्वाह करणाऱ्या भटास राजाच्या अंतःपुरांतील दासी येऊन सत्वर बोलावूं लागली. ' बाईसाहेब तुमची वाट पहात

* तदेति निरभिप्रायचेष्टितो लोकहास्यताम् ।
मूर्खोऽनुभवति क्लेशं न कार्यं कुरुते पुनः ॥

बसल्या आहेत, असेच माझ्याबरोबर चला,' असें बोलून तिनें अगदीं गडबड करून सोडली. तेव्हां तो दक्षिणेच्या लोभानें मुलाचें रक्षण करावयास पुष्कळ दिवस घरांत पाळलेल्या मुंगुसाला ठेवून त्या दासीबरोबर राजवाड्यांत गेला. कांहीं वेळानें एक साप त्या मुलापाशीं आला. पण त्याला पहातांच मुंगुसानें स्वामिभक्तीनें, त्याला मारून सोडलें.

नंतर देवशर्माही वेगानें परत येत आहे, असें दुरूनच पाहून मुंगुस मोठ्या हर्षानें त्याच्यापुढें गेलें. पण त्यावेळीं त्याचें तोंड सापाच्या रक्तानें माखलेलें होतें तें पहातांच 'खचित या दुष्ट पाप्यानें माझ्या बालकाला खाल्लें आहे' अशा भ्रमानें त्या ब्राह्मणानें मुंगुसाला दगडानें मारिलें. पुढें तो आंत येऊन जों पहातो, तों आपलें अर्भक जिवंत व सुखरूप असून त्याच्या जवळ एक साप मरून पडला आहे, असें त्याला आढळलें. त्याबरोबर त्याला अतिशय पश्चात्ताप व दुःखही झालें. 'कांहीं एक विचार न करितां, कालरूपी सर्पाला मारून पुत्राचे प्राण वांचविणाऱ्या उपकारी मुंगुसाला तूं व्यर्थ मारलेंस,' असें म्हणून त्याची बायकोही त्याला दोष देऊं लागली. यास्तव, हे देव, बुद्धिमान् पुरुषानें अविचारानें कोणतेंही कार्य करूं नये. कारण अविचारानें व्यवहार करणारा पुरुष दोन्ही लोकीं आपला घात करून घेतो† अयोग्य रीतीनें कर्म करणारास विरुद्ध फल भोगावें लागतें.* याविषयींही एक कथा सांगतो ती ऐका:—

## २. मूर्ख रोगी व वैद्य यांची कथा.

ज्याच्या देहांत वात शिरला आहे असा एक पुरुष होता. त्याला बस्ती देण्याच्या उद्देशानें औषध देऊन वैद्य म्हणाला,—'तूं आपल्या घरीं जाऊन हें पाण्यावर वाट, तों मी येतों.' असें सांगून व त्याला परत स्वगृहीं पाठवून वैद्य दुसऱ्या रोग्याकडे गेला. त्याला यावयास थोडासा वेळ लागला; म्हणून त्या वातग्रस्तानें औषध वाटून व तें

† तस्मान्न बुद्धिमान्कुर्यात्सहसा देव किंचन ।
सहसा चेष्टमानो हि हन्यते लोकयोर्द्वयोः ॥

* कुर्वंश्चाविधिना कर्म विरोधि फलमश्नुते ॥

पाण्याशीं मिळवून पिऊन सोडलें. पण त्यामुळें त्याला अधिक पीडा होऊं लागली. तें विषारी औषध पोटांत गेल्यामुळें त्याच्या सर्वांगांची लाही झाली. इतक्यांत वैद्य आला. तेव्हां त्या रोग्यानें आपलें अकृत्य त्याला सांगितलें. तें ऐकून सुज्ञ वैद्यानें त्याला उलटीचें औषध दिलें व मोठ्या कष्टानें पोटांत गेलेलें तें विष बाहेर काढून त्याचे प्राण वांचविले. नंतर तो मूर्ख आतां बरा झाला आहे, असें पाहून वैद्य म्हणाला, 'अरे खुळ्या, बस्तीचें औषध गुदद्वारांत घालावयाचें असतें; तें कोणी पीत नाहींत, एवढेंही तुला कळत नाहीं ना ? पण मी येईतोंपर्यंत तूं थांबला कां नाहींस ? एवढी गडबड कसली झाली होती ?' असो; देव, याप्रमाणें अयोग्य रीतीनें उपयोग केला असतां इष्टवस्तूपासूनही अनिष्ट होतें. यास्तव प्राज्ञानें प्रत्येक कृत्य यथाविधि करावें.* चांगला विचार न करितां भलतेंच कांहीं तरी करणारा पुरुष निंद्य होतो.‡ याविषयीं एक गोष्ट सांगतों ती ऐका.—

### ३. एका मूर्ख बापाची कथा.

एके ठिकाणीं एक जडबुद्धि पुरुष होता, तो एकदां देशान्तरास निघाला. त्याच्या मागून त्याचा पुत्रही जात होता. एकदां एका वनांत ते दोघे विश्रांति घेण्यासाठीं झाडाखालीं उतरले. मुलगा फिरतां फिरतां जवळच्या झाडींत शिरला, तेथें वानरांनीं त्याला ओरबडून सोडलें. तो बिचारा मोठ्या कष्टानें जिवंत राहून बापापाशीं आला व बाप विचारूं लागला असतां, वानरांस न जाणणारा तो मूढ 'या वनांत केसाळ व फळें खाणाऱ्या पशूंनीं मला आपल्या नखांनीं फाडून मोठ्या भाग्यानेंच जिवंत सोडलें.' असें सांगूं लागला. तेव्हां त्याच्या बापाला क्रोध आला. तो आपली तरवार उपसून त्या वनांत शिरला. तेथें फळें खात असलेल्या जटिल तापसांस पाहून आणि 'याच फळें खाणाऱ्या केसाळांनीं माझ्या पुत्राला नखांनीं फाडलें,' असें म्हणून, त्यास तो मारावयास धांवला. पण एका वाटसरूनें 'वानरांनीं तुझ्या मुलाला

---

* इतीष्टमप्यनिष्टाय जायतेऽविधिना कृतम् ।
तस्मान्न विधिमुत्सृज्य प्राज्ञः कुर्वीत किंचन ॥

‡ अप्रेक्षापूर्वकारी च निन्द्यतेऽवद्यकृत्क्षणात् ॥

ओरबाडलें; यांनीं नव्हे.' असें सांगून त्याचें तापसांच्या हिंसेपासून निवारण केलें. तेव्हां तो त्या महापातकापासून दैवयोगानेंच सुटलेला मूढ आपल्या उतरलेल्या झाडाखालीं परत आला. यास्तव शहाण्यानें केव्हांही चांगला विचार केल्यावांचून कोणतेंही काम आरंभूं नये. प्रत्येक मनुष्यानें सदा कृतबुद्धि असावें. कारण अबुद्धिमान् पुरुषांस लोक नेहमीं हंसतात, व त्या कारणानें त्यांना दुःख* होतें.

## ४. एका निर्धन मूर्खाची कथा.

एक निर्धन मनुष्य मार्गानें जात असतांना त्याला एका मोठ्या व्यापारी सार्थवाहाची पडलेली, सोन्यानें भरलेली, पिशवी सांपडली. तो मूर्ख ती घेऊन दुसऱ्या कोठें न जातां तेथेंच ती उघडून आंतील नाणीं मोजीत बसला. इतक्यांत पुढें जात असलेल्या सार्थवाहाला आपली द्रव्याची पिशवी कोठें गळून पडली आहे, असें वाटलें. म्हणून तो घोड्यावर बसून सत्वर गेलेल्या मार्गानेंच परत आला. तेव्हां रस्त्यांत बसून व पिशवीचें तोंड उघडून आंतील धन मोजीत असलेला व मोठा हृष्ट झालेला तो मूर्ख त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर त्या श्रीमानानें त्याच्या कानशिलांत दोन थपडा मारून थैलीसह आपलें धन परत घेतलें. तेव्हां हातांत येऊन स्वप्नाप्रमाणें नष्ट झालेल्या त्या धनाविषयीं अतिशय दुःखी होऊन व खालीं मान घालून तो स्वस्थानीं परत गेला. याप्रमाणें मंदबुद्धि पुरुष मिळालेला अर्थही क्षणांत घालवितो.‡

## ५. एका चंद्र पाहणाऱ्या खुळ्याची कथा.

कोणा एका मूर्खाला शुद्ध द्वितीयेचा चंद्र पहावा अशी इच्छा झाली, पण त्याला दिसेना. म्हणून त्या नव्या चंद्राला ज्यानें पाहिलें आहे, असा एकजण त्याला म्हणाला,–' अरे वेड्या, या माझ्या बोटासमोर पह.' तें ऐकून तो खुळा आकाशाकडे पहावयाचें सोडून त्याच्या बोटाकडेच

---

* तन्न जातुचिदप्रेक्षापूर्वकारी भवेद्बुधः ।
क्रिमन्यत्सर्वदा भाव्यं जन्तुना कृतबुद्धिना ॥
लोकोपहसिताः शश्वत्सीदन्त्येव ह्यबुद्धयः ।

‡ प्राप्तोऽप्यर्थः क्षणादेव हार्यते मन्दबुद्धिना ॥

पश्चात राहिला. तेव्हां चंद्राच्या जागीं त्याला हंसणारे लोक मात्र दिसले. असो; उत्तम प्रज्ञेनें असाध्यही सुसाध्य होतें * याविषयीं एक कथा ऐका–

६. एका चतुर स्त्रीची कथा.

कोणी एक स्त्री एकटीच एका गांवाला जावयास निघाली. मार्गानें जात असतांना एक मोठा हुपट तिच्या अंगावर आला. पण ती शहाणी बाई एका वृक्षाच्या आड होऊन त्याच्या सभोंवार त्याला चुकवीत फिरूं लागली. इतक्यांत त्या वानरानें तिला धरण्यासाठीं म्हणून दोन्ही हातांनीं त्या झाडाच्या खोडाला कवटाळलें, त्याबरोबर त्या धीट स्त्रीनेंही त्या दुष्ट वानराचे दोन्ही हात तसच घट्ट धरून ठेविले. त्या दोघांच्यामध्यें वृक्षाचा जाड बुंधा असल्यामुळें अतिशय चिडलेला वानरही तिला कांहीं करूं शकेना. तो अगदीं हतवीर्य व निश्चेष्ट झाला. इतक्यांत त्याच मार्गानें एक भिल्ल आला. त्याला ती म्हणाली–'महाभागा, मी आपलें वस्त्र व वेणी सांवरीपर्यंत एक क्षणभर या वानराचे हात असेच धरून ठेव.'– ' तें ऐकून तो दुष्ट म्हणाला,–' माझें जर सेवन करशील तर मी याला धरीन, नाहीं तर नाहीं. तेव्हां निरुपायास्तव तिनें ' बरें आहे ' असें म्हणून त्याचें तें पापी म्हणणें कबूल केलें. त्या मूर्खानेंही वानराचे हात तसच झाडाच्या आडून धरून ठेवले. नंतर त्या भिल्लाचीच सुरी उपसून तिनें त्या वानराचे दोन तुकडे उडविले. नंतर त्या भिल्लाला एकांतांत चल असें म्हणून, पुष्कळ दूर नेलें. इतक्यांत त्याच मार्गानें जाणारा एक भल्या लोकांचा समुदाय तिला भेटला. तेव्हां त्याचा आश्रय करून तिनें त्या भिल्लाला परत जावयास सांगतलें. लज्जेनें ताही कांहीं न बोलतां आल्या मार्गानें, खिन्नचित्तानें परत गेला. याप्रमाणें केवळ प्रज्ञेनें जिनें आपलें शील राखलें आहे, अशी ती साध्वी स्वस्थानीं जाऊन पोंचली. एवंच प्रज्ञा हेंच या लोकांत वागण्याचें उत्तम साधन† आहे. द्रव्यानें दरिद्री असलेला पुरुषही या लोकीं जिवंत रहातो; पण बुद्धीनें दरिद्री असलेला राहूं शकत नाहीं. हे देव, आतां एक विचित्र कथा ऐका.

---

* प्रज्ञया साध्यतेऽसाध्यं ।

† इत्थं प्रज्ञैव नामेह प्रधानं लोकवर्तनम्. ।
जीवत्यर्थदरिद्रोऽपि धीदरिद्रो न जीवति ॥

## ७. घट व कर्पर चोरांची कथा.

एका नगरांत घट व कर्पर या नांवाचे दोन चोर होते, त्यांतील कर्पर एके दिवशी रात्रीं घटाला बाहेर ठेवून संकेत करून राजकन्येच्या घरांत शिरला, व तेथें कोपऱ्यांत जाऊन उभा राहिला. तों निद्रा न आल्यामुळें, जागत असलेल्या राजकन्येनें पाहिलें. त्याच्याकडे दृष्टि जातांच ती तरुणी सकाम झाली. तिनें त्याला हळूच जवळ बोलाविलें, व त्याच्याशीं ती रममाण झाली, व द्रव्य देऊन, 'तूं जर पुनः आलास तर मी तुला आणखी पुष्कळ धन देईन,' असें त्याला ती म्हणाली,–तेव्हां 'बरें आहे' असें म्हणून तो बाहेर आला, व घडलेला वृत्तान्त सांगून व धन देऊन त्यानें घटाला राजधनासह घरीं पाठविलें आणि आपण स्वतः लागलाच अंतःपुरांत गेला. काम व लोभ यांच्या योगानें आकर्षण केला गेलेला कोणता पुरुष अपायांकडे पहाणार आहे!* सुरतानें श्रान्त व मद्यपानानें मत्त झालेला तो राजपुत्रीसह तेथेंच निजला. रात्र संपून चांगलें उजाडलें तरी तो जागा झाला नाहीं. सकाळीं अंतःपुररक्षकांनीं त्याला पाहिलें, व लगेच राजाला कळविलें. राजानेंही तत्काळ त्याला मारण्याची शिक्षा सांगितली. वधकांनीं त्याला वध्य भूमीकडे नेलें इतक्यांत त्याचा शोध करीत घट त्याच्यापाशीं आला. तेव्हां आपल्या खुणेनें कर्परानें 'राजकन्येचें हरण करून, तूं संरक्षण कर.' असें घटाला सांगितलें. घटानें त्याच्या इच्छेप्रमाणें करण्याचें खुणेनेंच मान्य केलें. नंतर वध करणाऱ्या चांडालांनीं कर्पराला झाडास टांगून मारलें. तें पाहून घटाला फार शोक झाला. घरीं जाऊन तो आपल्या मित्राकरितां सर्व दिवसभर रडत बसला. पण रात्र होतांच भिंत फोडून तो धीट घट कन्यान्तःपुरांत गेला, तेथें बांधून ठेवलेल्या एकट्याच राजकन्येला त्यानें पाहिलें, व तो जवळ जाऊन म्हणाला,–'तुझ्याकरितां आज सकाळीं मारल्या गेलेल्या कर्पराचा मी मित्र आहें. माझें नांव घट. त्याच्या स्नेहानें मी तुला येथून नेण्याकरितां आलों आहें, यास्तव, तुझ्या पित्यानें तुझें कांहीं अनिष्ट केलें नाहीं तोंच, तूं मजबरोबर चल.'

---

* आकृष्टः कामलोभाभ्यामपायं को हि पश्यति ॥

हें त्याचें इष्ट भाषण ऐकून ' ठीक आहे, मी तुजबरोबर येतें ' असें राजकन्या म्हणाली. तेव्हां त्या चोरानेंही तिचीं बंधनें तोडून तिला मोकळें केलें. नंतर जिनें आपलें शरीर अर्पण केलें आहे, अशा त्या सुंदरीसहवर्तमान पूर्वी पाडलेल्या भोंकांतूनच बाहेर पडून, घट आपल्या घरीं गेला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं भिंतीला भोंक पाडून कोणी साहसिकानें आपल्या कन्येला अंतःपुरांतून नेलें आहे, असें ऐकून राजा मनांत म्हणाला,–' खचित काल मी ज्याला मारविलें, त्या पाप्याचा कोणी तरी आप्त किंवा बांधव असून त्याच साहसिकानें आज माझ्या कन्येला अंतःपुरांतून काढून नेलें असावें.'

असा विचार करून राजानें कर्पराचें शरीर राखण्यासाठीं आपले भृत्य ठेवले व त्यांस सांगितलें, कीं त्या पाप्याच्या शरीराला जाळण्याकरितां जो कोणी रडत तेथें येईल, त्याला धरून ठेवा. त्याच्यापासून माझी पापिनी कुलदूषित कन्या मला परत मिळेल. राजाच्या या आज्ञेप्रमाणें राजभृत्य त्या शवापाशीं जाऊन त्याचें रक्षण करीत बसले. पण धूर्त घटाला ती सर्व वार्ता कळली व तो राजपुत्रीला म्हणाला,– ' प्रिये कर्पर हा माझा परम सखा होता. त्याच्याच कृपेनें मला तुझा व या उत्तम रत्नसंचयाचा लाभ झाला आहे. यास्तव त्याच्या स्नेहाच्या ऋणांतून मुक्त झाल्यावांचून माझ्या मनास शांति वाटणार नाहीं. यास्तव मी जाऊन आतां युक्तीनें त्या रक्षकांच्या समक्ष त्याला उद्देशून शोक करितों. नंतर क्रमानें त्याच्या शरीरास अग्निसंस्कार करून त्याचीं हाडें तीर्थांत नेऊन टाकीन. तूं कांहीं भिऊं नकोस. मी कर्परासारखा मूढ नाहीं.' असें सांगून तो लागलाच महाव्रती झाला. वेष बदलून आणि एका खापरांत दहीं–भात घालून एखाद्या वाटसरूप्रमाणें कर्पराचें शव जेथें पडलें होतें तेथें गेला. जवळ गेल्यावर तें दहींभाताचें कर्पर हातांतून पडलेंसें करून व तें फोडून ' हाय हाय कर्परा, तुझी अशी दशा झाली काय ! ' इत्यादि बोलून तो शोक करूं लागला. राजाच्या रक्षक भृत्यांना वाटलें, कीं हा हातांतून पडलेल्या कर्पराविषयींच शोक करीत आहे. नंतर आपल्या घरीं परत येऊन घटानें झालेलें वर्तमान राजकन्येला कळविलें.

दुसऱ्या दिवशीं सूर्यास्तानंतर घटानें आपल्या एका भृत्या (नोकरा)ला स्त्रीचा वेष दिला. दुसऱ्यापाशीं धोतऱ्याच्या बिया घातलेलें भक्ष्य एका

भांड्यांत घालून दिलें; आणि त्या दोघांसहवर्तमान तो स्वतः मत्त खेडवळाचा वेष घेऊन कर्पराचें रक्षण करीत बसलेल्या राजपुरुषांपाशीं अडखळत गेला. तेव्हां 'भाऊ, तूं कोण? ही स्त्री कोण? व तूं चाललास कोठें?' असें त्या रक्षकांनीं विचारलें असतां तो धूर्त अडखळत म्हणाला,–'मी खेडेगांवांत रहाणारा एक मनुष्य असून ही माझी भार्या आहे. मी श्वशुराच्या घरीं जात आहें, व त्याच्यासाठीं हें उत्तम भक्ष्य नेत आहें. पण या संभाषणावरून तुम्ही माझे मित्र झालां आहां. यास्तव यांतील अर्धें भक्ष्य मी तुम्हांला देतों व अर्धें सासऱ्याच्या येथें घेऊन जाईन. असलें भक्ष्य नगरवासी लोकांना दुर्लभच आहे, असें म्हटलें तरी चालेल.' इतकें बोलून घटानें सर्व शिपायांना तें अन्न वांटलें व त्या मूढांनीं तें हंसत खाल्लें. त्यांतील धोतऱ्याच्या बियांमुळें त्यांना कांहीं वेळानें कैफ चढला व ते सर्व बेशुद्ध होऊन पडले. तेव्हां घटानें लागलींच काष्ठें जमवून, चिता रचून, दोघां भृत्यांच्या साहाय्यानें कर्पराचें प्रेत त्यांत घालून त्यास अग्नि दिला, आणि भृत्यांसह तो लागलाच गुप्त झाला.

दुसऱ्या दिवशीं राजाला तें सर्व कळलें. तेव्हां त्यानें त्या मूढ रक्षकांना काढून तेथें दुसऱ्यांची योजना केली, आणि म्हटलें, आतां त्या चोराच्या अस्थींचें तरी चांगलें संरक्षण करा. जो कोणी तीं नेण्याची इच्छा करील त्याला लागलेंच तुम्हीं धरा, व आतां कोणाचें कांहीं घेऊन खाऊं नका. राजाच्या या आज्ञेप्रमाणें ते सर्व नवे रक्षक सावध राहून अहोरात्र कर्पराच्या अस्थींचें रक्षण करूं लागले. घटाला तें वृत्त कळलें. तेव्हां त्या धूर्तानें चंडिकेनें दिलेल्या मोहमंत्रास जाणणाऱ्या एका संन्याशाची मैत्री संपादिली. त्याला विश्वासपात्र करून घेतलें आणि एकदां रात्रीं त्याच्या सहवर्तमान राजरक्षकांपाशीं गेला; व संन्याशाच्या मंत्रसामर्थ्यानें त्या सर्वांना मोहित करून कर्पराचीं हाडें गोळा केलीं, आणि लागलींच तीं गंगेंत टाकलीं; नंतर परत येऊन त्यानें राजपुत्रीला सर्व वृत्तान्त कळविला.

रक्षकांना मोहित करून कर्पराच्या अस्थी नेल्याची वार्ता जेव्हां राजाला कळली, तेव्हां कन्येच्या हरणापासून या वेळपर्यंत घडलेलें सर्व कृत्य कोणा योग्याचें आहे, असें त्याला वाटलें. आणि 'ज्या योग्यानें माझ्या कन्येला हरण करून नेलें, तो जर मजपुढें येऊन प्रकट होईल, तर मी त्याला अर्धें राज्य देईन.' असा त्यानें डांगोरा पिटविला.

तो ऐकून घटानें राजापुढें जाण्याची इच्छा केली; पण राजकन्येनें त्याचें निवारण केलें. 'विश्वास देऊन फसविणाऱ्या राजापुढें गेल्यास आपल्या दोघांचाही घात होईल' असें सांगून तिनें त्या नगरांतून निघून देशांतरास जाण्याचाही आग्रह धरिला. तेव्हां संन्यासी व ती राजकन्या यांसह तो चोर परदेशीं जावयास निघाला. मार्गानें जात असतांना ती कुलटा संन्याशाला एकांतांत म्हणते–'एकानें माझा उत्तम पदापासून ध्वज केला, व या दुसऱ्यानें भ्रंश केला. पण तो पहिला रमण मेला व दुसरा घट खरोखरी माझा प्रिय नव्हे. तूंच मला अतिशय प्रिय आहेस.' इत्यादि बोलून व त्याच्याशीं संकेत करून त्या दुष्ट स्त्रीनें घटाला विष घालून मारलें. नंतर ती पापिनी त्या संन्याशाबरोबर जाऊं लागली. कांहीं दिवसांनीं मार्गामध्यें तिला धनदेव या नांवाचा एक वैश्य भेटला. तेव्हां 'या संन्याशाला घेऊन मला काय करावयाचें आहे, तूंच माझा प्रिय, आहेस' असें बोलून व त्या तिसऱ्या जारालाही सोडून, तो निजला असतां रातोरात, ती त्या चवथ्या जाराबरोबर निघून गेली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं संन्यासी जागा झाला असतां, ती पळून गेल्याचें त्याला कळलें. तेव्हां तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला–' काय सांगावें ! स्त्रियांचे ठायीं स्नेह नाहीं, दाक्षिण्य नाहीं, व एका चापलावांचून दुसरें कांहीं नाहीं. कारण ही पापिनी मला विश्वास दाखवून व माझें सर्वस्व घेऊन पळून गेली आहे. पण मी एवढेंच भाग्य अथवा लाभ समजतों, कीं तिनें मला घटाप्रमाणें मारलें नाहीं. असा पुष्कळ विचार करून तो परत आला.

## ८. धनदेवादिकांचा वृत्तान्त.

तिकडे राजकन्या वैश्यासह त्याच्या देशास जाऊन पोंचली. स्वदेशास जातांच, 'या कुलटेला आपल्या घरीं न्यावें कीं काय ?' अशा विचारांत तो पडला. शेवटीं तो धनदेव रात्र पडली असतां तेथील एका वृद्ध स्त्रीच्या येथें त्या राजपुत्रीसह शिरला. तेथें रात्रीं त्याला न ओळखणाऱ्या त्या वृद्धेला धनदेव आपल्या घरची वार्ता विचारूं लागला. तेव्हां ती म्हातारी म्हणाली–'बाबा त्या प्रख्यात धनदेव वैश्याच्या येथची वार्ता कांहीं विचारूं नकोस. त्याची भार्या जेथें तेथें नव्या नव्या पुरुषांशीं संगत होत असते. तिच्या माडीच्या खिडकींतून दोरी बांधून एक चामड्याची पिशवी खालीं सोडलेली असते. तिच्यामध्यें जो जाऊन बसतो तोच वर

ओढून घेतला जातो व त्याच्याशीं ती रत होते. पहाट झाली, कीं त्याला खिडकींतूनच बाहेर घालवितात. मद्य पिऊन मत्त झालेल्या तिला कांहीं कळत नाहीं. ती बेशुद्ध झालेली असते. धनदेवाच्या येथली असली ही वार्ता गांवभर पसरली आहे. पुष्कळ दिवस होऊन गेले, तरी तिचा पति अजून परत येत नाहीं. काय सांगावें !!'

त्या वृद्ध स्त्रीच्या तोंडचे हे शब्द कानीं पडतांच धनदेव युक्तीनें तेथून बाहेर पडला व मनांत अतिशय दुःखी आणि साशंक होऊन आपल्या घरापाशीं गेला. दासींनीं चामड्याचा पेटारा खिडकींतून खालीं सोडला आहे, असें पाहून तो आंत बसला. त्याबरोबर दासींनीं त्याला वर ओढून घेऊन आंत नेलें. मदिरेनें मत्त झालेल्या त्याच्या भार्येनेंही त्याला आंत जातांच आलिंगन दिलें, व आपल्या शय्येवर नेलें. पण त्यानें तिच्याशीं रत होण्याची इच्छा दर्शविली नाहीं. उलट तिची प्रबल इच्छा असतांही तो तिच्या अंगास स्पर्श करीना. शेवटीं त्या दासींनीं त्याला खिडकींतून खालीं सोडलें. तेव्हां तो वैश्य धनदेव मनांत अतिशय खिन्न होऊन असा विचार करूं लागला,–'माझा हा गृहमोह पुरे झाला. गृहामध्यें स्त्रिया हेंच मुख्य बंधन आहे, पण त्याची ही अशी वार्ता आहे. यास्तव वनच अतिशय श्रेयस्कर आहे.' असा निश्चय करून व त्या राजकन्येलाही सोडून तो वनास जावयास निघाला.

तो वनांत जात असतांना दूरचा प्रवास करून आलेला एक रुद्रसोम नांवाचा ब्राह्मण मार्गांत त्याला भेटला. त्याच्याशीं त्याची मैत्री जमली. तेव्हां बोलतां बोलतां त्यानें आपल्या भार्येची वार्ता सांगितली. ती ऐकून रुद्रसोमालाही आपल्या भार्येचा संशय आला. त्याच धनदेव मित्रासह सायंकाळीं तो आपल्या गांवीं जाऊन पोंचला. तेथें आपल्या घराजवळच्या नदीच्या तीरीं मत्ताप्रमाणें गात असलेल्या गोपाला पाहून तो ब्राह्मण थट्टेनें म्हणाला;–'कायरे गवळ्या, तूं असा अगदीं एकाद्या मदोन्मत्तासारखा सर्वांना तृणतुल्य समजून जो गात नाचत आहेस त्याचें कारण काय ? एकादी तरुणी तर तुजवर आसक्त झाली नाहीं ?'

तो त्याचा प्रश्न ऐकून गोप हंसूं लागला, व म्हणाला,–' मी आतां काय काय म्हणून किती दिवस लपवूं ? या गांवचा रुद्रसोम म्हणून एक

मुख्य आहे. त्याला प्रवासास जाऊन पुष्कळ दिवस झाले. त्याच्या तरुण भार्येशीं मी सदा रममाण होत असतों. तिची दासी येथें येते व मला स्त्रीवेषानें तिच्या घरीं नेते.'

गवळयाच्या तोंडचे हे शब्द कानीं पडतांच रुद्रसोमाला मोठा क्रोध आला; पण त्याचा निग्रह करून, यांत सत्य काय आहे, तें जाणण्याचा इच्छेनें त्याला म्हणाला,—' मित्रा, मी तुझा अतिथि आहें. यास्तव हा तुझा वेष मला दे, म्हणजे मी आज तेथें जातों. कारण मला या गोष्टीचें मोठें कौतुक वाटत आहे.'

रुद्रसोमाचें हें प्रार्थनावचन त्या गवळयानें मान्य केलें; व म्हटलें,—' तर हें माझें काळें कांबळें घे, व ही माझी काठी हातांत घेऊन येथें दासी येईतों, असा उभा रहा ती रात्रीं येईल व मीच आहें असें समजून तुला स्त्रीवेष देईल, आणि आपल्याबरोबर घेऊन जाईल. आजची रात्र तूंच तेथें जा. मी विश्रांति घेतों.'

गोपालाच्या या सांगण्याप्रमाणें त्याच्या पासून काळें कांबळें व काठी घेऊन रुद्रसोम त्याच्या वेषानें तेथे उभा राहिला. गोप धनदेव वैश्यासह तेथून कांहीं अंतरावर जाऊन बसला. रात्रीं काळोख पडतांच दासी आली. तिनें मुकाट्यानें घोंगडी व काठी घेऊन उभ्या असलेल्या रुद्र-सोमाला डोक्यावरून स्त्रीवेषाला साजेसा बुरखा दिला, व ये, असें म्हणून ती त्याला हा गोपच आहे असें समजून घेऊन गेली. रुद्रसोमाची भार्या जेथें होती तेथें ती दासी त्याला घेऊन जातांच त्या ब्राह्मणाच्या तरुण भार्येनें रोजच्याप्रमाणें हा आपला जारच आला आहे, असें समजून त्याला घट्ट आलिंगन दिलें. तेव्हां रुद्रसोम मनांत म्हणाला,—' हर हर! कुस्त्रिया, जवळ असलेल्या निकृष्ट पुरुषावरही आसक्त होतात, असें दिसतें. त्यामुळेंच ही पापिनी जवळ असलेल्या गोपावरही इतकी अनुरक्त झालेली आहे.' असा विचार करून व अस्पष्ट वाणीनें कांहीं निमित्त सांगून तो ब्राह्मण घरांतून बाहेर पडला, आणि धनदेव वैश्य गोपालासह जेथें होता तेथें विरक्त मनानें गेला. त्यानें आपल्या घरचा वृत्तांत त्याला सांगितला व म्हटलें,—' मीही तुझ्याबरोबर वनांत येतों. माझें घर जळूंदे. मला आतां त्याला घेऊन काय करावयाचें आहे!'

इतकें त्यांचें बोलणें झाल्यावर ते दोघेही तत्काल वनांत जावयास निघाले. कांहीं वेळानें त्यांना मार्गांत धनदेवाचा मित्र शशी भेटला. बोलतां बोलतां त्या दोघांनींही आपापला दुःखकर वृत्तान्त त्याला सांगितला. तो ऐकून फार दिवस प्रवासांत असलेल्या त्या ईर्ष्यावान् शशीलाही आपल्या भार्येविषयीं संशय आला. त्यानें जातांना तिला तळघरांत बंद करून ठेविलें होतें. तरी त्याला विश्वास येईना. तो त्या दोघां मित्रांसह सायंकाळीं आपल्या घरापाशीं आला. त्या दोघांचें उचित आतिथ्य करावें, अशी त्याची इच्छा होती. पण इतक्यांत घराजवळच एका कुष्ठरोगानें पीडलेल्या पुरुषास त्यानें पाहिलें. त्याच्या अंगास दुर्गंध येत असून हातापायांचीं बोटें सडलीं होतीं. तथापि तो तेथें शृंगाररसमय गाणें गात उभा होता. त्याचा तो अवतार पाहून विस्मित झालेला शशी ' तूं असा कोण आहेस बाबा,' म्हणून त्याला विचारूं लागला. तेव्हां कुष्ठी म्हणाला,– ' मी कामदेव आहे.' तें ऐकून शशी म्हणाला,–'तूं कामदेव आहेस, यांत शंकाच नाहीं; कारण तुझी रूपशोभाच तुझें कामदेवत्व व्यक्त करीत आहे.'

शशी हंसून त्याला असें म्हणाला असतां, तो पुनः म्हणतो–'मी तुला कांहीं सांगतों तें ऐक. येथें शशी या नांवाचा कोणी एक धूर्त आहे. एका परिचारिकेसह आपल्या भार्येला तळघरांत कोंडून ठेवून तो हल्लीं कोठें प्रवासास गेला आहे. त्याच्या भार्येनें दैववशात् येथें असलेल्या मला पाहिलें. त्याबरोबर तिच्या मनांत कामसंचार झाला आणि तिनें तत्काल आपलें शरीर मला अर्पिलें. मी तिच्याशीं प्रतिरात्रीं रममाण होतों. तिची दासी मला आपल्या पाठीवर घेऊन तेथें नेते. तेव्हां आतां तूं सांग बरें, मी कामदेव आहे कीं नाहीं ? दुसऱ्यांच्या स्त्रिया अशा उगीच मिळत नसतात. चित्रासारखा आकार धारण करणाऱ्या शशीच्या भार्येलाही ज्या अर्थी मी प्रिय झालों आहें, त्या अर्थी मी खराच कामदेव आहे.'

त्या कुष्ठी मनुष्याचें हें वज्रासारखें व्याकुल करणारें भाषण ऐकून शशी मनांत अतिशय कष्टी झाला. पण त्यानें आपलें दुःख आवरून धरलें व या गोष्टीचा पूर्ण निर्णय करण्यासाठीं तो त्याला म्हणाला–' मित्रा, तूं खराच काम आहेस. यास्तव मी तुझी कांहीं प्रार्थना करितों, तेवढी मान्य कर. तुला जी वस्तु रोज मिळण्यासारखी आहे, ती परोपकाराचें

पुण्य जोडीत असतांना एक दिवस न मिळाली म्हणून त्यांत हानि कोणती ? आज कृपा करून तूं मला तिच्याकडे पाठीव.'

शशीची ही प्रार्थना त्यानें मान्य केली. तो म्हणाला,–' तुझा वेष मला देऊन माझा तूं घे, व येथें मजप्रमाणें आपले हात–पाय वस्त्रानें झांकून उभा रहा. रात्र होऊन काळोख पडला म्हणजे तिची दासी येईल. ' तूं मीच आहेस ' अशा समजुतीनें ती तुला पाठीवर घेऊन शशीच्या घरीं नेईल. कारण माझे पाय सडलेले असल्यामुळें मी तिच्या पाठीवर बसूनच नेहमीं जात असतों.' इतकें सांगून कुष्ठयानें आपला वेष त्याला दिला. शशीनें तो मोठ्या कष्टानें घेतला व आपला त्याला दिला. नंतर कुष्ठी व शशीचे दोघे सोबती तेथून कांहीं दूर जाऊन बसले. शशी कुष्ठयाचें सोंग घेऊन तेथेंच बसला. रात्रीं दासी आली व तो कुष्ठीच आहे, असें जाणून व ' ये ' असें म्हणून पाठीवरून तिनें शशीला त्याच्याच भार्येपाशीं नेलें. कुष्ठ-जाराची वाट पहाणारी ती दुष्ट स्त्री तळघरांत होती, तेथें त्या दासीनें त्याला नेलें. अंधकारांत असलेल्याही तिच्या अंगास स्पर्श करितांच ही माझीच भार्या आहे, असा त्याचा निश्चय झाला, व अशा कष्टकर दशेंत असतांनाही ही कुलटा व्यभिचार केल्यावांचून रहात नाहीं, हें मनांत येतांच त्याला पूर्ण वैराग्य आलें. नंतर ती निजली असतां शशी कोणाच्या दृष्टीं न पडतां तेथून निघून आला व धनदेव आणि रुद्रसोम जेथें होते तेथें गेला. आपला वृत्तान्त त्यांस सांगून अतिशय खिन्न झालेला तो म्हणाला–'हर हर ! धिक्कार असो. ज्या अर्थी ही माझी भार्या तळघरांत अंधारांत खितपत पडलेली असतांनाही या कुष्ठरोग्याशीं संगत झाली, त्याअर्थी स्त्रिया डोंगरांतील नद्यां-प्रमाणेंच निचांकडे जाणाऱ्या, अतिचपल, दुरून मनोरम दिसणाऱ्या व सहज क्षुब्ध करतां येण्यासारख्या असतात. त्यामुळें त्यांचं संरक्षण अना-यासानें करितां येत नाहीं, असाच सिद्धान्त ठरतो. यास्तव तुम्हांप्रमाणें मलाही वनच श्रेयस्कर आहे. गृह व स्त्रीयांस धिक्कार असो.'

### ९. नागाचा वृत्तान्त.

प्रभो, याप्रमाणें पुष्कळ बोलत तसल्याच दुःखानें पोळलेल्या वैश्य व ब्राह्मण यांबरोबर त्यानें ती रात्र तेथेंच बसून घालविली. सकाळीं ते

तिघेही वनांत जावयास निघाले. सायंकाळीं एका झाडाखालीं उतरले. तेथें एक सुंदर विहीर होती. तींत स्नानें करून, फलाहारानंतर त्यांनीं जलप्राशन केलें, व रात्र सुखानें घालविण्याकरितां ते त्याच झाडावर चढून बसले. इतक्यांत एक वाटसरू आला, व त्याच झाडाखालीं निजला. कांहीं वेळानें त्या वापींतून वर आलेला दुसराही एक पुरुष त्यांच्या दृष्टीस पडला. त्यानें विहिरीच्या कांठावर येतांच आपल्या तोंडांतून स्त्रीसह शय्या बाहेर काढली, व ती त्या झाडाखालीं हांतरली. नंतर तिच्यावर त्यानें त्या स्त्रीशीं सुरतक्रीडा केली व तो तेथेंच निजला.

इतक्यांत त्या स्त्रीची दृष्टि झाडाखालीं निजलेल्या त्या पांथस्थाकडे गेली. तेव्हां ती चपल तरुणी पतीच्या शय्येवरून उठून त्याच्यापाशीं आली व त्या कामी मार्गस्थानेंही तिचा मनोभंग केला नाहीं. सुरत आटोपल्यावर त्यानें तुम्ही कोण, असें तिला विचारलें. तेव्हां ती म्हणाली,– 'हा नाग व मी त्याची भार्या नागकन्या आहे. मी परस्त्री आहे म्हणून तूं भिऊं नकोस. कारण आजपर्यंत मीं नव्याण्णव पुरुषांचा उपभोग घेतला होता. शंभराला एकच पुरुष कमी होता, पण ती संख्या आज तूं पुरी केली आहेस.'

ती कुलटा इतकें जों सांगत आहे, तोंच तिचा पति नाग दैववशात् जागा झाला व क्रोधानें तोंडांतून विषाग्नीची ज्वाला सोडून त्यानें त्या दोघांनाही भस्म करून टाकलें. नंतर तो नाग ती शय्या तेथेंच सोडून वापीमध्यें गेला असतां वृक्षावरून सर्व मौज पहाणारे शशीप्रभृति ते तिघे 'देहामध्यें घालून ठेवूनही जर स्त्रियांचें शील राखतां येत नाहीं, तर गृहामध्यें असलेल्या त्यांचें संरक्षण कसें करितां येणार! हर हर! अशा स्त्रियांना धिक्कार धिक्कार असो.' असें बोलून ते आनंदानें वनांत गेले.

तेथें योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षिता या चार भावनांचा अभ्यास केल्यामुळें ज्यांचीं चित्तें शांत झालीं आहेत, ज्यांनीं आपल्या मनाचें नियमन केलें आहे, व जे सर्व भूतांविषयीं सौम्य आहेत, असे ते तिघेही निरुपम परमानंदभूमिरूप समाधीस प्राप्त झाले सर्व सिद्धी त्यांच्या हातीं लागल्या व अज्ञानाचा नाश करून क्रमानें ते तिघेही मुक्त झाले. त्यांच्या दुष्ट व दोन्ही लोकांपासून

भ्रष्ट झालेल्या स्त्रिया आपापल्या पापकर्मांचें फलच अशा कष्टकर दशेस प्राप्त होऊन लवकरच नष्ट झाल्या. स्वामिन्, याप्रमाणें स्त्रियांचे ठायीं मोहजन्य आसक्ति ठेवणें, हें कोणाच्या दुःखास कारण होत नाहीं ? त्याचप्रमाणें त्यांच्याविषयीं विरक्त होणाऱ्या कोणत्या विवेकी पुरुषांस मोक्ष मिळत नाहीं ?*

शक्तियशेच्या समागमाविषयीं अतिशय उत्सुक झालेला वत्सराजपुत्र नरवाहनदत्त, गोमुख सचिवाच्या तोंडून कथा ऐकून झोंपीं गेला.

---

## तरंग ० वा.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं रात्रीं पूर्वीप्रमाणेंच राजपुत्राचा चित्तविनोद करण्यासाठीं गोमुख पुनः पुढील कथा सांगू लागला.

### १ एक रुंडपुरुष व व्यभिचारिणी स्त्री, यांची कथा.

कोणा एका नगरांत कोणा एका श्रीमान् वैश्याचा पुत्र होता. तो बोधिसत्त्वाच्या अंशापासून झालेला होता. त्याची माता लहानपणींच मेली, तेव्हां त्याच्या बापानें दुसरा विवाह केला, व तो वृद्ध त्या तरुणीचे ठायीं इतका आसक्त झाला, कीं त्यानें आपल्या तरुण पुत्राला भार्येसह घरांतून घालवून दिलें. तेव्हां तो वनवासास निघाला. त्याचा एक धाकटा भाऊ होता, त्यालाही बापानें घरांतून घालविलें, म्हणून तो त्याच्याबरोबर जाऊं लागला; पण तो अशान्तचित्त आहे असें पाहून, वैश्यपुत्रानें त्याला सोडलें व तो स्वतः दुसऱ्याच मार्गानें पुढें चालला. जातां जातां तो एका महा-अरण्यांत आला. त्यांमध्यें वृक्ष व जल यांचें नांवही नव्हतें. त्याच्यापाशीं फलाहारादिकांचेंही कांहीं साहित्य नव्हतें. तेथील माळ-भूमि प्रखर सूर्यकिरणांनीं तापली होती. तसल्या त्या अरण्यांतून तो सात दिवस चालला. त्याची भार्या क्षुधा व तृषा यांच्या योगानें अतिशय

---

* एवं मोहप्रभवो रागो न स्त्रीषु कस्य दुःखाय ।
तास्वेव विवेकभृतां भवति विरागस्तु मोक्षाय ॥

क्लान्त झाली म्हणजे तो साधु तिला आपल्या अंगाचें मांस व रक्त काढून देत असे, व तीही पापिनी स्त्री तें भर्त्याचें रक्त व मांस खात असे. आठव्या दिवशीं, ज्यांतील नदीच्या पाण्याचा खळखळ असा ध्वनि ऐकूं येत आहे, अशा डोंगरांतील अरण्यांत तो पोंचला. ज्याच्या-वर पुष्कळ फळें लागलीं असून उत्तम छायाही आहे, अशा एका हिरव्या पानांनीं फारच शोभणाऱ्या वृक्षाखालीं तो येऊन उतरला. गोड फळें व मधुर जल यांच्या योगानें त्या थकलेल्या भार्येचें समाधान करून तो स्वतः स्नान करण्याकरितां तरंगपंक्तीनें अतिशय शोभणाऱ्या व त्या पर्वतावरून वेगानें वहाणाऱ्या नदींत शिरला.

इतक्यांत त्या साधूला, नदीच्या प्रवाहाबरोबर वहात जात असलेला व रक्षणकर्त्याची आकांक्षा करणारा, एक पुरुष दिसला. त्याचे दोन्ही हात व दोन्ही पाय कोणीं तोडले होते. त्याची ती दीन अवस्था पाहून वैश्यपुत्राला दया आली. तो सात दिवसांचा उपाशीं होता तरी त्या कृपाळु महाधैर्यवानानें नदीच्या प्रवाहांत शिरून त्याला वर काढलें. नंतर त्याला नदीच्या कांठावरील भूमीवर बसवून 'भ्रात्या, तुझी अशी अवस्था कोणीं केली ?' असें त्या कारुणिकानें विचारलें. तेव्हां तो हस्तपाद-रहित पुरुष म्हणाला,—'माझे हाल हाल करून मारण्याकरितां शत्रूंनीं हात—पाय तोडून मला नदींत टाकलें, पण तूं मोठ्या दयेनें मला जल-प्रवाहांतून वर काढलेंस.'

त्या दुःखी पुरुषाचें हें भाषण ऐकून वैश्यपुत्रानें त्याच्या ताज्या व्रणावर पट्ट्या बांधल्या व त्याला फलाहार देऊन स्वतः स्नान केलें. नंतर कंद, मुळें व फळें खाऊन तो बोधिसत्त्वांश त्याच रम्य अरण्यांत नदीच्या तीरीं भार्येसह तप करीत राहिला. एकदां तो साधु फळें व मुळें आण-ण्याकरितां कोठें दूर गेला असतां, त्याची कामातुर झालेली भार्या ज्याचे व्रण भरून आले आहेत, अशा त्या थोट्या पुरुषाशीं रममाण झाली नंतर त्याच्या ठिकाणीं आसक्त झालेल्या तिनें त्याच्याशीं संकेत करून आपल्या पतीला मारण्याचा निश्चय केला. दुसऱ्या दिवशीं तिनें खोटेंच आजारी-पणाचें सोंग घेतलें. ती दुराचारिणी अगदीं व्याकुळ झाल्यासारखें दाखवूं लागली. कांहीं वेळानें जेथें जातां येणें शक्य नाहीं, अशा एका खळग्यांत असलेली औषधि पतीला सांगून ती म्हणाली,—'ही औषधि जर मला

आणून द्याल तर मी जगेन. मी सांगतें तेथें ती आहे, हें मला दवतेनें स्वप्नांत येऊन सांगितल्यावरून कळलें आहे.'

भार्येचें तें म्हणणें ऐकून घेऊन तो उपकारी वैश्य गवताची दोरी वळून व ती एका झाडाला बांधून तिच्यावरून त्या खळग्यांत शिरला. खालीं नदी वेगानें वहातच होती. पण त्यानें भार्येच्या वेदनेपुढें आपल्या शरीराचें काय होईल, याचा कांहीं विचार केला नाहीं. तो सत्पुरुष दोरीवरून खालीं उतरला आहे, असें पाहून त्याच्या भार्येनें सत्वर ती दोरी वरून सोडली. त्याबरोबर तो बिचारा नदींत पडून तिच्या असह्य वेगाबरोबर वाहून जाऊं लागला. नदीनें त्याला फारच दूर नेलें व केवळ पुण्यानेंच ज्याचें रक्षण झालें आहे, अशा त्याला एका नगराजवळच्या तीरावर सोडलें. त्यानंतर नदीच्या कांठावर चढून, स्त्रियांच्या चेष्टेचा विचार करीत, पाण्यांतून इतक्या दूरवर आल्यामुळें थकलेला तो झाडाखालीं कांहीं वेळ विश्रांति घेत बसला. त्याच वेळीं त्या नगराचा राजा मेला. त्या देशांत अनादिकालापासून अशी चाल होती, कीं एक राजा मेला असतां पौरजनांनीं मंगल गजाला देशभर फिरवावें, व तो हत्ती ज्याला आपल्या पाठीवर बसवील त्याला राज्यावर अभिषेक करावा. या चालीप्रमाणें राजा मरतांच नगरवासीजनांनीं दुसरा राजा करण्याकरितां हत्ती सोडला. तो ब्रह्मदेवाप्रमाणें धैर्यानें तुष्ट असलेला गज फिरतां फिरतां या वैश्यपुत्राजवळ आला. त्यानें त्याला आपल्या शुंडेनें उचलून पाठीवर बसविलें. त्याबरोबर हत्तीच्या मागून येत असलेल्या प्रधानादि पौरजनांनीं त्याला नगरांत नेऊन राज्याभिषेक केला. याप्रमाणें मोठ्या भाग्यानें राज्य मिळालें असतांहि तो वैश्यपुत्र बोधिसत्त्वांश, करुणा, मुदिता व शांति यांत निमग्न झाला. त्यानें पापी स्त्रियांशीं संग केला नाहीं.

इकडे ती त्याची भार्याही आपला पति नदींत पडून मेला आहे, असें जाणून निःशंकपणें त्या थोट्या मनुष्याला पाठीवर घेऊन इतस्ततः फिरूं लागली. 'वैऱ्यांनीं माझ्या या पतीचे हात–पाय तोडले, मी पतिव्रता आहें, भिक्षा मागून मी याला पोसतें, यास्तव मला भिक्षा घाला.' असें घरोघर सांगत व भिक्षा मिळवीत ती गांवोगांव व नगरोनगरीं हिंडतां हिंडतां, ज्या पुरांत तिचा पति राज्यावर बसला होता, तेथें आली. तेथेंही ती तसेंच खोटें सांगून भिक्षा मिळवूं लागली. कांहीं दिवसांनीं—ही साध्वी,

महा पतिव्रता आहे, असें म्हणून पौरजन तिची पूजा करूं लागले. एकदां ही वार्ता राजाच्या कानावर गेली. तेव्हां तो थोटा जार जिच्या पाठीवर बसला आहे, अशा त्या स्त्रीला राजानें आपल्या येथें आणविलें. तिला पहातांच, सिंहासनस्थ बोधिसत्त्वांशानें तिला ओळखलें, व 'तूंच का ती पतिव्रता ?' असें विचारिलें. राजतेजानें युक्त असलेल्या आपल्या स्वामीला न ओळखल्यामुळें ती स्त्री-'होय महाराज मीच सर्व लोकांस मान्य झालेली पतिव्रता,' असें बोलली. तें ऐकून बोधि- सत्त्वांश राजा हंसून म्हणाला, 'मींच तुझें हें पातिव्रत्य फळरूपानें पाहिलें आहे. ज्याचे हात-पाय कोणीही तोडले नव्हते, अशा विवाहित पतीनें आपल्या अंगाचें रक्तमांस दिलें, पण जिचें चित्तरंजन करतां आलें नाहीं, ती मनुष्यराक्षसी स्त्री, आपल्या भर्त्याचें रक्त-मांस सदां खाऊन आतां या विकल हस्तपादहीन जाराच्या इतकी अधीन झाली आहे, कीं, त्याला सदा आपल्या पाठीवर वहाते. विवाहित निष्पाप पतीला तूंच नदींत टाकलेंस ना ? मला वाटतें, कीं त्याच कर्मामुळें तूं या थोट्या रुंडाला आपल्या पाठीवर वाहून त्याचें पोषण करीत आहेस ?'

असें बोलून राजानें तिचें गुप्त कृत्य उघडकीस आणलें. तेव्हां 'हाच आपला पति आहे' असें ओळखून ती स्त्री भयानें मूर्च्छित झाली. ती चित्राप्रमाणें किंवा मेल्याप्रमाणें निश्चेष्ट झाली. तो चमत्कार पाहून 'प्रभो, हा काय प्रकार आहे ?' असें चकित झालेले सभासद विचारूं लागले. राजानें सर्व वृत्तान्त त्यांस सांगितला. तेव्हां ही पतिद्रोह करणारी स्त्री आहे, असें समजून मंत्र्यांनीं तिचे कान व नाक कापून तिला आपल्या देशांतून घालवून दिलें. जिचें नाक कापलें आहे, अशा कुलटेशीं रुंडाचा, व राजश्रीशीं बोधिसत्त्वाचा अनुरूप संयोग करवून विधीनें आपलें प्रभुत्व दाखविलें. तात्पर्य, दैवाप्रमाणेंच विचारशून्य व नीचाश्रय करणाऱ्या स्त्रियांच्या चित्ताची गति निश्चय न करितां येण्या- सारखी आहे. याचप्रमाणें ज्यांनीं आपलें शील सोडलेलें नाहीं, ज्यांनीं क्रोधाला जिंकलें आहे व जे धैर्यवान् आहेत, अशा पुरुषांकडे संपत्ति जणुं काय संतुष्ट होऊनच अकल्पित रीतीनें येतात. अशी कथा सांगून, गोमुख नरवाहनदत्ताला दुसरी कथा सांगूं लागला.

## २. स्त्री, सिंह, पक्षी व सर्प यांची कथा.

कोणा एका वनांत एक बोधिसत्त्वांश पर्णकुटी करून रहात असे. त्याचें मन सदा करुणापूर्ण असून तो महाधीर तेथें तप करीत राहिला होता. तो तेथील आपत्तींत पडलेल्या जंतूंना सुखी करीत असे. तो पिशाचांचा त्या योनींतून उद्धार करी, व स्वप्रभावानें संपादन केलेल्या अन्नजलानें तो दुसऱ्याही प्राण्यांस नेहमीं तृप्त करी.

एकदां परोपकारार्थ त्या अरण्यांत फिरत असतांना त्याला एक मोठा कूप दिसला. त्यानें त्यांत वांकून पाहिलें तो त्यांत असलेली एक दुःखी स्त्री त्याला दिसली. ती याला पहातांच मोठ्यानें ओरडून म्हणाली,– 'हे महात्म्या, मी स्त्री, सिंह, ज्याला सोन्याचीं (किंवा चांगली रंगीत) पंखें आहेत असा पक्षी व भुजंग अशीं आम्हीं चौघेंजणें रात्रीं या विहिरींत पडलों. यास्तव तूं आम्हांवर कृपा करून आमचा उद्धार कर.'

तें ऐकून बोधिसत्त्वांश तापस म्हणला,–'काळोखांत न दिसल्यामुळें भूमीवरून जात असतांना तुम्हीं तिघेंजणें विहिरींत पडलांत, हें खरें आहे; पण आकाशचर पक्षी यांत कसा पडला?' तेव्हां ती म्हणाली,– 'व्याधाच्या जाळ्यांत अडकलेला हा पक्षीही आम्हांप्रमाणेंच भूमीवरून जात असतांनां यांत पडला.' तें ऐकून आपल्या तपःशक्तीनें तो जों त्यांना वर काढण्याची इच्छा करीत आहे, तों त्याची सिद्धि नष्ट झाल्यामुळें तो त्यांचा उद्धार करूं शकला नाहीं. तेव्हां खचित ही स्त्री कोणी पापिणी आहे, म्हणून हिच्याशीं संभाषण केल्यानें माझी सिद्धि नष्ट झाली, असें त्यास वाटलें. पण 'आतां आणखी कांहीं युक्ति करूं,' असा विचार करून त्या प्राज्ञ पुरुषानें गवताची दोरी वळली व तिच्या योगानें त्या चौघांनाही वर काढलें. त्या महासत्ववानाच्या या उपकाराबद्दल तीं चौघेंही त्याची स्तुति करूं लागलीं. त्यांचें भाषण ऐकून अतिशय विस्मित झालेला तो म्हणाला,–' तुम्हांला ही व्यक्त वाणी कशी प्राप्त झाली, व तुमचा काय वृत्तान्त आहे तो सांगा.' सिंह, पक्षी व भुजंग

† एवं चात्यक्तशीलानां ससत्त्वानां जितक्रुधाम् ।
तुष्ट्वेवाचिन्तिता एव स्वयमायान्ति संपदः ॥

यांस असें विचारतांच, त्यांपैकीं सिंह म्हणाला,–' आम्हाला मनुष्यासारखी ही व्यक्त वाणी तर प्राप्त झालीच आहे, पण आम्ही सर्व जातिस्मरही आहों. आम्ही एकमेकांस बाधा करीत असतों. आमचा वृत्तान्त क्रमानें ऐक.' असें बोलून तो आपला वृत्तान्त सांगू लागला.—

## ३. सिंहाचा वृत्तांत.

हिमालयावर वैदूर्यश्रृंग या नांवाचें एक उत्तम पुर आहे. तेथें पद्मवेग नांवाचा एक विद्याधरेश्वर आहे. त्याला वज्रवेग नांवाचा पुत्र होता. तो मोठा अहंकारी असून विद्याधरपुरांत राहून शौर्याच्या मदानें ज्याच्या त्याच्याशीं विरोध करीत असे. त्याच्या पित्यानें त्याचा पुष्कळ निषेध केला. पण त्यानें त्याच्याही उपदेशपर भाषणास मान दिला नाहीं. तेव्हां रागावलेल्या पद्मवेगानें ' मर्त्यलोकीं पड ' असा त्याला शाप दिला. पण त्या बरोबर ज्याचा मद नष्ट झाला आहे, जो विद्येपासून भ्रष्ट झाला आहे, व ज्याच्यावर शापाचा आघात झाला आहे, असा वज्रवेग रडत पित्याशीं येऊन शापान्त (उःशाप ) मागूं लागला. तेव्हां त्याचा पिता पद्मवेग क्षणभर ध्यान करून म्हणाला,–' तूं भूलोकीं ब्राह्मणपुत्र होऊन व तेथेंही असाच पुनः मद करून बापाच्या शापानें सिंह होशील, आणि कूपांत पडशील. कोणी महाधीर पुरुष तुला कृपेनें तेथून वर काढील, नंतर तूं त्याच्यावर प्रत्युपकार केलेस म्हणजे शापापासून मुक्त होशील. '

याप्रमाणें पद्मवेगानें शापाचा अंत सांगितला असतां वज्रवेग, मालवदेशांत हरघोष नांवाच्या ब्राह्मणापासून देवघोष नांवाचा पुत्र झाला. तेथेंही शौर्यानें गर्वित झालेला तो अनेकांशीं वैर करूं लागला. पुष्कळांशीं वैर करणें चांगलें नव्हे, असें म्हणून हरघोषानें त्याला पुष्कळ बोध केला, पण देवघोषानें त्याच्या म्हणण्यास मान दिला नाहीं. त्यामुळें त्याच्या पित्याला क्रोध आला व त्यानें ' अरे दुर्बुद्धे, शौर्याच्या अभिमानानें तूं असा उन्मत्त झाला आहेस काय ? बरें तर आतां असाच शौर्याभिमानी सिंह हो, ' असा शाप दिला. त्या प्रमाणें मी या अरण्यांत सिंह झालों. येथें भ्रमण करीत असतांनां काळोखांत न दिसल्यामुळें काल रात्रीं या विहिरींत पडलों; पण तूं महा धैर्यवानानें मला आज तींतून वर काढलें आहेस. मी आतां जातों, तुजवर जेव्हां कांहीं

आपत्ति येईल तेव्हां माझें स्मरण कर, म्हणजे मी येईन व प्रत्युपकार करून शापापासून मुक्त होईन.

असें सांगून सिंह निघून गेला असतां, बोधिसत्त्वांश तापसी सुवर्णचूडावान् पक्ष्यास त्याचा वृत्तान्त विचारूं लागला. तेव्हां पक्षी म्हणालाः—

### ४. पक्ष्याचा वृत्तान्त.

हिमाचलावर वज्रदंष्ट्र या नांवाचा विद्याधरेश आहे. त्याच्या राणीस एकीमागून एक अशा पांच कन्या झाल्या. तेव्हां त्यांनीं हराची आराधना करून पुत्राविषयीं वर मिळविला. कांहीं दिवसांनीं त्याला पुत्र झाला. त्याचें त्या राजानें रजतदंष्ट्र असें नांव ठेवलें. तो त्याला प्राणांहूनही प्रिय वाटत असे. तो लहान असतांनाच पित्यानें प्रेमानें त्याला सर्व विद्या दिल्या. आप्तांच्या नेत्रांचा साक्षात् महोत्सवच, असा तो रजतदंष्ट्र प्रत्यहीं वाढतां वाढतां मोठा झाला. एकदां त्यानें सोमप्रभा नांवाच्या आपल्या वडील बहिणीस गौरीपुढें पिंजरक ( खंजिरीसारखें ) वाद्य वाजवीत असतांना पाहिलें, व मला पिंजरक दे; मी वाजवितों; असें म्हणून तो बालक तिच्यापाशीं आग्रहानें मागूं लागला. पण ती कांहीं त्याला तें वाद्य देईना. म्हणून चपल स्वभावामुळें त्यानें स्वतःच तें तिच्या हातांतून ओढून घेतलें व पक्ष्याप्रमाणें तो आकाशांत उडून गेला. तेव्हा रागावलेली त्याची बहीण म्हणाली;–' ज्याअर्थीं तूं माझ्या हातांतील वाद्य बलात्कारानें घेऊन पक्ष्याप्रमाणें आकाशांत उडून गेला आहेस, त्याअर्थीं तूं स्वर्णचूड पक्षी होशील. ' बहिणीचे ते शब्द ऐकतांच रजतदंष्ट्र तिच्या पायांवर येऊन पडला, व उःशाप मागूं लागला. तेव्हां ती ममताळु बहीण,–' तूं स्वर्णचूड पक्षी होऊन अंधकूपांत जेव्हां पडशील व कोणी दयाळु पुरुष जेव्हां तुला त्यांतून वर काढील, तेव्हां त्याच्यावर कांहीं प्रत्युपकार करून तूं शापमुक्त होशील. '–असें त्याला म्हणाली. तोच मी रजतदंष्ट्र पक्षी होऊन कालरात्रीं या विहिरींत पडलों, व आज त्वां कृपाळु महात्म्यानें मला त्यांतून वर काढिलें आहेस. आतां मी जातों; पण तुजवर जेव्हां कांहीं आपत्ति येईल, तेव्हां माझें तूं स्मरण कर, म्हणजे मी प्रत्युपकार करून शापापासून मुक्त होईन.'

असें बोलून पक्षी निघून गेला असतां बोधिसत्त्वानें भुजंगास त्याचा वृत्तांत विचारला. तेव्हां तो म्हणालाः—

## ५. भुजंगाचा वृत्तांत.

पूर्वी मी कश्यपाच्या आश्रमांत मुनिकुमार होतों. तेथें माझा एक मुनिपुत्र मित्र होता एकदां तो माझा समवयस्क मित्र स्नान करण्याकरितां सरोवरांत उतरला असतां, तीरावर असलेल्या मीं तीन फणांचा सर्प येत आहे असें पाहिलें; व त्याच्या योगानें आपल्या मित्राला भिववावें, या उद्देशानें मीं यत्नेनें त्याच्यासमोर तीरापाशींच त्या सर्पाला मंत्रबलानें बांधून ठेविलें. इतक्यांत माझा मित्र स्नान करून वर आला, व त्या महासर्पाला समोर पहातांच भिऊन मूर्च्छित झाला. तेव्हां मीं त्याला पुष्कळ प्रयत्न करून सावध केलें. नंतर ध्यानाच्या योगानें मींच त्याला भिवविलें आहे, असें जाणून कोपाविष्ट झालेल्या त्या माझ्या मित्रानेंही मला शाप दिला. 'जा याच्या सारखाच तूंही तीन फणांचा मोठा साप हो.' हें त्याचें कोपानें उच्चारलेलें शापवचन ऐकून मी भ्यालों, व त्याच्या पायां पडून सांत्वन करूं लागलों. तेव्हां तो ऋषिपुत्र मला म्हणाला,—'सर्प होऊन कूपांत पडलेल्या तुला जो वर काढील, त्याच्यावर उपकार केलेस म्हणजे तूं तत्काल मुक्त होशील' असा उःशाप देऊन तो ऋषिपुत्र निघून गेला असतां, तोच हा मी सर्प झालों. तूं आज मला या कुपांतून वर काढलें आहेस. आतां मी जातों. तूं संकटसमयीं माझें स्मरण केलेंस म्हणजे मी येऊन व तुझे उपकार फेडून स्वधामीं जाईन. इतकें बोलून सर्प निघून गेला असतां, ती स्त्री आपला वृत्तान्त सांगूं लागली.

## ६. स्त्रीचा वृत्तान्त.

मी एका शूर, दानशील, सुंदर, तरुण, मानी व राजाची सेवा करणाऱ्या क्षत्रिय-पुत्राची भार्या आहें. दैववशात् मला इतकी अनुकूलता असतांनाही म्यां पापिणीनें परपुरुषसंग केला. तो वार्ता माझ्या स्वामीला कळली व त्यानें मला मारून टाकण्याचा निश्चय केला. माझ्या सखीच्या तोंडून तो ऐकतांच मी तेथून जीव घेऊन पळालें, ती या वनांत येऊन पोंचलें. रात्रीं काळोखांत पायांखालीं कांहीं न दिसल्यामुळें या विहिरींत पडलें, पण तूं दया करून मला त्यांतून वर काढलेंस. आतां तुझ्या या अनुग्रहामुळें मी कोठें तरी जाऊन जिवंत राहीन. मलाही तुजवर प्रत्युपकार करितां येईल असा एकादा दिवस उगवेल.

बोधिसत्त्वाला असें सांगून ती कुलटा त्याच्या जवळून निघून गोत्रवर्धन राजाच्या नगरास गेली. त्याच्या परिवारजनांशीं संगति करून व त्यांचा स्नेह संपादून ती स्त्री राजाच्या महाराणीची दासी होऊन राहिली. त्या स्त्रीशीं संभाषणादिक केल्यामुळें बोधिसत्त्वाची सिद्धि नष्ट झाली. त्यामुळें त्याला त्या वनांत कंद–मूल–फलादि मिळेनासें झालें. तेव्हां क्षुधेनें व्याकुळ झाला असतां त्यानें सिंहाचें स्मरण केलें. त्याबरोबर तो त्याच्यापाशीं आला व हरिणांच्या मांसानें त्यानें त्याचे प्राण वांचविले. नंतर कांहीं दिवस तो तसाच त्याला मांस देत व त्याचें पोषण करीत तेथें राहिला. नंतर एके दिवशीं बोधिसत्त्वाला आतां चांगली शक्ति आली आहे, असें पाहून केसरी त्याला म्हणाला,–' मित्रा, माझा शाप आतां क्षीण झाला आहे तेव्हां मी जातों.'

इतकें सांगून व सिंहत्वाचा त्याग करून तो विद्याधर झाला आणि बोधिसत्त्वाला विचारून व त्याची आज्ञा घेऊन स्वस्थानीं गेला. त्यानंतर बोधिसत्त्व पुनः अन्नाभावीं क्षीण झाला, तेव्हां त्यानें पक्ष्याचें स्मरण केलें. त्याबरोबर स्वर्णचूड त्याच्यापाशीं आला. तापसानें आपलें दुःख त्याला सांगितलें. तें ऐकून तो पक्षी वेगानें दूर कोठें उडून गेला, व थोड्याच अवकाशांत रत्नांनीं भरलेली एक करंडी घेऊन परत आला. ती त्या बोधिसत्त्वाला देऊन पक्षी म्हणाला,–'यांतील अमूल्य रत्नांच्या योगानें तुझी वृत्ति सतत चालेल. आतां माझा शाप संपलेला असल्यामुळें मी जातों. तुझें कल्याण होवो.'

असें बोलून व विद्याधरकुमार होऊन तोही आकाशमार्गानें आपल्या लोकास गेला. तेथें पोंचतांच त्याच्या पित्यानें त्याचें अभिनंदन करून त्यास आपलें राज्य दिलें. इकडे बोधिसत्त्व तीं रत्नें विकण्याकरितां नगरो-नगरीं फिरत असतां, ज्या नगरांत ती विहिरींतून वर काढलेली स्त्री येऊन राणीची दासी होऊन राहिली होती, तेथें आला. त्या राजधानीच्या नगरांतील एका वृद्ध ब्राह्मणीच्या येथें एकान्तांत तीं रत्नें ठेवून तो जों बाजारांत जात आहे, तोंच समोरून येत असलेल्या त्या स्त्रीला त्यानें पाहिलें. आपण जिला विहिरींतून वर काढलें होतें, तीच ही असें बोधि-सत्त्वानें तिला पहातांच ओळखिलें. तिनेंही त्याला ओळखिलें. दोघांचें संभाषण झालें. परस्परांनीं परस्परांची विचारपूस केली. तेव्हां त्या स्त्रीनें

मी राजाच्या राणीपाशीं दासी होऊन राहिलें आहें, असें त्याला सांगितलें. नंतर तिनें त्याचा वृत्तान्त विचारिला असतां, त्या सरळ स्वभावाच्या पुरुषानें स्वर्णचूड पक्ष्यापासून मिळालेल्या रत्नाभरणांची वार्ता तिला सांगितली, व वृद्ध ब्राह्मणीच्या येथें नेऊन तिला तीं दाखविलीं. तेव्हां ती शठ स्त्री आपल्या स्वामिनीकडे जाऊन लागलीच तें गुप्त वर्तमान सांगूं लागली. कारण स्वर्णचूड पक्ष्यानें राणीच्या समक्ष तिच्या अंतःपुरांतून ती रत्नाभरणांची करंडी झडप घालून नेली होती. त्या दासीच्या तोंडून आपली अमूल्य रत्नांची पेटी या नगरांत आहे, असें कळतांच राणीला परम आनंद झाला. तिनें राजाची प्रार्थना केली. तेव्हां राजानेंही त्या कुस्त्रीनें दाखविलेल्या बोधिसत्त्वाला भृत्यांकडून बांधवून आभरणांसह आपल्या पुढें आणविलें. त्याला खरा वृत्तान्त विचारला. तो त्यानें जशाचा तसाच सांगितला. राजालाही तो खरा आहे, असें वाटलें. तथापि आभरणें घेऊनही त्या गरीबाला त्यानें बंदिशाळेंत टाकलें.

तेव्हां बंधांत पडलेल्या बोधिसत्त्वानें सर्पाचें स्मरण केलें. तो ऋषिपुत्राचा अवतार होता. स्मरण करितांच तो त्याच्यापाशीं आला. त्याची ती दशा पाहून सर्पानें त्याचें कारण विचारलें. त्यानें तें सांगितलें. तेव्हां सर्प त्या साधु पुरुषास म्हणाला,-'मी आतां जाऊन, पायांपासून डोक्यापर्यंत, त्या राजाला आवळून सोडतों. तूं येऊन मला जेव्हां सांगशील तेव्हांच मी त्याला सोडीन, त्यावांचून सोडणार नाहीं. मी राजाला सर्पापासून सोडवीन, असें तूं येथें लोकांना सांग. तूं आलास, म्हणजे मी तुझ्या सांगण्यावरून त्याला सोडीन. नंतर तो तुला आपलें अर्धें राज्य देईल.'

इतकें सांगून तो सर्प गेला, व त्यानें राजाला नखशिखान्त वेढून सोडलें, व त्याच्या डोक्यावर तीन फणा करून तो बसला. त्याबरोबरच सर्व राजकुलांत हाहाःकार उडाला. राजाला सर्प चावला; असा एकच आक्रोश तेथें झाला. तेव्हां बोधिसत्त्व म्हणाला,-' मी राजाला सापापासून वांचवीन.' तें त्याचें म्हणणें राजभृत्यांनीं राजाला जाऊन सांगितलें, व त्याच्या आज्ञेनें त्याला राजापाशीं नेलें. तेव्हां सर्पानें ज्याला सर्वतः वेढलें आहे, असा राजा म्हणाला;-' तूं जर मला या सर्पापासून सोडविलेंस तर मी तुला आपल्या राज्यांतील अर्धें राज्य देईन. याविषयीं हे सर्व मंत्री जामीन आहेत.' तेव्हां सर्व मंत्रीही ' ठीक आहे ' असें म्हणाले. नंतर बोधि-

सत्त्व म्हणाला 'सर्पा, या राजाला तूं सत्वर सोड.' त्याबरोबर सर्पानें त्याला कालपाशासारख्या आपल्या वेढ्यांतून मुक्त केलें. राजानें बोधिसत्त्वाला अर्धें राज्य दिलें. राजाचें शरीर क्षणांत स्वस्थ झालें. सर्पही शापक्षीण झाल्यामुळें मुनिपुत्र बनला, व आपला सर्व वृत्तान्त सर्व सभासदांना सांगून आपल्या आश्रमास गेला. याप्रमाणें शुभात्म्यांकडे शुभच निश्चयानें चालून येतें. त्याचप्रमाणें मर्यादेचा अतिक्रम मोठ्या लोकांच्याही क्लेशास कारण होतो स्त्रियांच्या–विश्वासास पात्र नसलल्या–हृदयास, प्राणदानासारखे उपकारही स्पर्श करीत नाहींत; मग दुसरें आणखी काय सांगावें !* असो; अशी ही सुंदर कथा सांगून गोमुख वत्सराजपुत्रास पुनः म्हणाला,–'आतां मी तुम्हांला आणखी मूर्खांच्या कथा सांगतों त्या ऐका.'—

### ७. मूढ संन्याशाची कथा.

एका मठांत एक मूढबुद्धि संन्यासी होता. तो एकदां मार्गानें जात असतांना त्याला कुत्रा चावला. तेव्हां कुत्र्याचा ज्याला दंश झाला आहे, असा गुडघा वांकडा करून तो मठांत आला, आणि मनांत म्हणाला,–' आतां प्रत्येकजण येऊन मला तुझ्या गुडघ्याला काय झालें, म्हणून विचारूं लागेल. तेव्हां त्या सर्वांना पुनःपुनः मी तेंच तें किती वेळ सांगत बसूं ? यास्तव सर्वांना एकदम सांगतां येईल, असा कांहीं उपाय योजावा.' असा विचार करून तो मठावर चढला, आणि तेथील मोठी घंटा वाजवूं लागला. तेव्हां कांहीं कारण नसतांना अकालीं ही घंटा कां व कोण वाजवीत आहे, तें पहाण्याच्या इच्छेनें मठांतील सर्व भिक्षू एकत्र जमले; व 'यावेळीं तूं घंटा कां वाजवीत आहस ?' असें त्याला आश्चर्यानें विचारूं लागले. तेव्हां तो म्हणाला,–' कुत्र्यानें माझ्या पायाला दंश केला आहे; पण तें आतां मी तुमच्यापैकीं प्रत्येकाला कोठवर सांगत बसूं ? असा विचार करून, तुम्हां सर्वांना एकदांच सांगण्याकरितां मी घंटा वाजवून एकत्र जमविलें. आतां सगळेजण ऐका–

---

* एवं निश्चितमभ्येति शुभमेव शुभात्मनाम् ।
एवं चातिक्रमो नाम क्लेशाय महतामपि ॥
अविश्वासास्पदं चैव स्त्रीणां स्पृशति नाशयम् ।
प्राणदानोपकारोऽपि किं तामा[illegible] ॥

'माझ्या पायाला कुत्रा चावला आहे हो, हा माझा पाय पहा.'—असें मोठ्यानें ओरडून सांगून तो आपला पाय दाखवूं लागला. तो त्याचा मूर्खपणा पाहून तेथें जमलेले सर्व भिक्षू पोट धरधरून हंसूं लागले, व एवढ्याशा गोष्टीकरितां यानें केवढा खटाटोप केला पहा! असें म्हणाले. असो; ही मूर्ख संन्याशाची गोष्ट झाली. आतां मूर्ख ठकाची गोष्ट ऐका.

## ८. मूर्ख ठकाची गोष्ट.

एक श्रीमान् ठक होता. तो अतिशय कंजूष असे. तो आपल्या भार्येसह सदा, मीठ सुद्धां न घालतां, सातु शिजवून खात असे. दुसऱ्या मिष्ट पदार्थांचा व षड्रसांचा त्याला कधीं स्वादच कळला नव्हता. एकदां विधात्यानेंच ज्याला प्रेरणा केली आहे, असा तो आपल्या भार्येस म्हणाला; 'खीर खावी अशी मला वांछा झाली आहे, यास्तव आज खीर कर.' तेव्हां—बरें आहे, असें म्हणून तिनें खीर केली. पण आजच आपल्या घरीं कोणी पाहुणा येऊं नये म्हणून तो घरांत गुप्तपणें अंथरुणावर निजून राहिला. पण एक धूर्त ठक† त्याच्या येथें आला. तो त्याचा मित्र होता. 'तुझा भर्ता कोठें आहे?' असें त्यानें त्याच्या भार्येला विचारिलें. पण ती कांहीं उत्तर न देतांच घरांत आपल्या पतीपाशीं गेली, आणि तुमचा अमुक अमुक मित्र आला आहे, असें सांगूं लागली. तेव्हां तो तिला म्हणाला,—'येथें बसून व माझे पाय धरून तूं रडत रहा. आणि तो येऊन विचारूं लागल्यास माझा भर्ता मेला, असें त्याला सांग, म्हणजे तो निघून जाईल. नंतर आपण दोघेच आनंदानें खीर खावूं.'

भर्त्याच्या आज्ञेप्रमाणें ती रडूं लागली. तेव्हां तो मित्र आंत आला, व 'हें काय? वहिनी, अशा रडता कां?' असें विचारूं लागला. पण त्यावर ती म्हणाली,—'माझा भर्ता मेला आहे, पाहिजे तर जवळ येऊन पहा.' हें तिचें भाषण ऐकून तो धूर्त ठक मनांत म्हणाला,—'मी आतां एका घटकेपूर्वी हिला खीर करतांना व आनंदांत असतांना पाहिलें, आणि इतक्यांत हिचा पति कांहीं रोगावांचून मेला कसा? खचित मी पाहुणा आलों आहें, असें पाहून त्यांनीं हा बहाणा केला असावा. यास्तव मीही

† ठक, हें एका जातीचें नांव आहे.

येथून जात नाहीं. असा विचार करून ' हाय हाय मित्रा, तुझी काय दशा झाली ही; तूं आम्हांला सोडून कोठें गेलास ! ' इत्यादि बोलून तो मोठमोठ्यानें रडूं लागला. त्याचा आक्रोश ऐकून शेजारी–पाजारी धांवून आले. त्यांनीं मेल्याप्रमाणें पडून राहिलेल्या त्याला पाहून स्मशानांत नेण्याची तयारी चालविली. तेव्हां–' ऊठ, नाहीं तर हे सर्व आप्तबांधव तुला स्मशानांत नेऊन जाळतील ' असें त्याची भार्या त्याच्या कानांत सांगूं लागली. पण तो कृपण ठक तिला म्हणाला,–'छेः, मी कधीं उठणार नाहीं. कारण हा शठ ठक माझी खीर खाण्याची इच्छा करीत आहे, यास्तव हा गेल्यावांचून मी उठणार नाहीं; मग माझे प्राण गेले तरी चालेल. माझ्यासारख्यांना अन्नाची मुष्टी प्राणांहूनही अधिक वाटते.' तें त्याचें भाषण मान्य करून त्याची भार्याही तशीच रडत बसली.

नंतर त्या शठमित्रानें अन्य बांधवांच्या सहायानें त्याला स्मशानांत नेलें व चितेवर ठेवून जाळलेंही. मरेपर्यंत निश्चेष्ट राहून त्यानें तें सर्व सहन केलें, पण तोंडांतून एक अक्षरही बाहेर काढलें नाहीं. याप्रमाणें त्या मूढानें प्राण सोडले, पण खिरीचा लोभ सोडला नाहीं. त्यानंतर त्यानें क्लेशानें जमवून ठेविलेलें धन दुसऱ्यांनींच यथेच्छ खाल्लें. आतां आणखी एका खुळ्याची गोष्ट ऐका.

## ९. मूर्ख उपाध्यायाची कथा.

उज्जयिनीमध्यें कोणी एक मूर्ख उपाध्याय एका मठांत रहात होता. रात्री उंदरांचा अतिशय उपसर्ग झाल्यामुळें त्याला झोंप येईना. तें दुःख त्यानें आपल्या एका मित्राला सांगितलें. तेव्हां तो त्याचा सुहृद् ' आपल्या मठांत मांजर आणून ठेव, म्हणजे तें उंदरास खाऊन टाकील, ' असें त्यास म्हणाला. पण ' मांजर कोठें असतें ? कसें असतें; मीं त्याला पूर्वीं कधीं पाहिलेलें नाहीं. ' असें तो उपाध्याय आपल्या मित्राला सांगूं लागला. तेव्हां तो सुहृद् म्हणाला,–'मित्रा, मांजराचे डोळे पिंगळे असतात, रंग वानराच्या रंगासारखा करडा व मळकट असतो, पाठीवर केंसाळ चामडें असतें आणि तें रस्त्यांतून फिरत असतें. या चिन्हांवरून तूं त्याला ओळखून आपल्या येथें आण.' असें सांगून तो मित्र आपल्या घरीं गेला.

नंतर उपाध्याय आपल्या शिष्यांस म्हणाला,–'या माझ्या मित्रानें सांगितलेलीं मांजराचीं चिन्हें तुम्ही ऐकलींच आहेत. यास्तव मार्गामध्यें एकादें मांजर आढळल्यास त्याला आणा.' त्यावर 'बरें आहे,' असें म्हणून शिष्य मोठ्या मार्गावर गेले, व मांजराला शोधीत इतस्ततः हिंडू लागले. पण त्यांना मांजर कांहीं केल्या सांपडेना. शेवटीं एका गल्लींतून बाहेर पडलेला एक बटु त्यांना दिसला. त्याचे दोन्ही डोळे पिंगळे होते. व त्याच्या पाठीवर करड्या रंगाचें केसाळ कृष्णाजिन होतें. त्याला पहातांच 'हें आम्हांला मांजर सांपडलें. कारण त्याच्या ठिकाणीं आम्ही ऐकलेलीं सर्व चिन्हें आहेत' असें म्हणून व त्याला धरून ते मूर्ख बलात्कारानें उपाध्यायाकडे घेऊन गेले. उपाध्यायानेंही मित्रानें सांगितलेलीं चिन्हें त्याच्या ठिकाणीं आहेत, असें पाहून रात्रीं त्याला आपल्या मठांत बांधून ठेविलें. आपणास मार्जार हें नांव दिलेलें ऐकून त्या खुळ्या बटूलाही मी मार्जारच आहें, असें वाटूं लागलें. पण तो बटु, उपाध्यायाला मांजराचें लक्षण ज्यानें सांगितलें होतें, त्या ब्राह्मणाचाच शिष्य होता. दुसऱ्या दिवशीं तो ब्राह्मण उपाध्यायाकडे आला, व आपल्या शिष्याला तेथें पहातांच 'याला येथें कोणी आणलें ?' असें विचारूं लागला. तेव्हां ते सर्व मूर्ख–' तुमच्यापासून मांजराचीं लक्षणें ऐकून तसल्याच लक्षणांनीं युक्त असलेल्या या मांजराला आम्हीं काल मोठ्या प्रयासानें आणलें आहे, '–असें सांगूं लागले. मूर्ख उपाध्यायही आनंदानें तसेंच सांगूं लागला. तें ऐकून ब्राह्मण पोट धर–धरून हंसला व म्हणाला, 'अरे मूढांनो, हा मनुष्य कोठें व तें चार पायांचें मार्जार कोठें ?'

तें ऐकून त्या मूढांनीं त्या बटूला सोडलें व म्हटलें,–' आम्ही आतां पुनः तसल्या लक्षणांनीं युक्त असलेलें मांजर शोधून आणतों.' पण तें त्यांचें भाषण ऐकून तेथले सर्व सुज्ञ लोक हसूं लागले. सारांश, अज्ञता कोणाच्या उपहासाला कारण होत नाहीं ?* असो; ही मांजराला न जाणणाऱ्या मूर्खांची कथा झाली. आतां आणखी दुसऱ्या मूर्खांची कथा ऐका.

---

* अज्ञता नाम कस्येह नोपहासाय जायते ।

## १०. आणखी कांहीं मूर्खांची कथा.

एका मठांत कोणी एक अनेक मूर्खांचा मूर्ख–नायक होता. त्यानें धर्मशास्त्र वाचीत असलेल्या कोणाच्या तोंडून ' तडाग करणाराला परलोकीं फार मोठें फल मिळतें. ' असें ऐकलें आणि आपल्या मठाच्या अगदीं समीपच त्या धनवानानें एक मोठा विपुल जलानें भरलेला तडाग करविला. नंतर एकदां तो मूर्खांचा अग्रणी तें आपलें सरोवर पहावयास गेला. तेव्हां जलाजवळचाच थोडासा प्रदेश कोणी खोदला आहे असें त्याला आढळलें. दुसऱ्या दिवशींही त्याला तट कोणी खोदला आहे असें दिसलें. त्यामुळें त्याच्या मनाला मोठा उद्वेग वाटला. तेव्हां त्यानें—' मी उद्यां अगदीं उजाडल्यापासून सर्व दिवसभर येथें राहून सरोवराचें तीर कोण खोदतो तें पाहतों '—असा निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं तो तेथें येऊन जों बसतो आहे, तों एक बैल आकाशांतून उतरून आपल्या शिंगांनीं त्या सरोवराचा कांठ खोदीत आहे, असें त्याला दिसलें. तेव्हां ' हा दिव्य वृषभ आहे, यास्तव मी आतांच याच्याबरोबर स्वर्गाला जातों. ' असें मनांत म्हणून तो मूर्ख त्याच्यापाशीं गेला, व दोन्ही हातांनीं त्यानें त्याचें पुच्छ धरलें. नंतर पुच्छास धरून लोंबकळत असलेल्या त्या खुळ्याला घेऊन तो भगवान् नंदी एका क्षणांत कैलासावर गेला. कारण तेंच त्याचें धाम होतें. नंतर तेथें प्राप्त झालेलीं दिव्य मिष्ट भोजनें खात तो कांहीं दिवस सुखानें राहिला. पण दैवानें मोह पाडल्यामुळें तो महावृषभ प्रत्यहीं जात--येत असतो—' असें पाहून तो• मूर्खांचा राजा मनांत म्हणाला,—' मी आतां या वृषभाचें पुच्छ धरून पुनः स्वस्थानीं जातों, आपल्या बांधवांना पहातों, आणि त्यांना हा अद्भुत वृत्तान्त सांगून तसाच पुनः परत येतों ' असा विचार करून व त्या बैलाच्या पुच्छाचें अग्र हातांत धरून तो भूतळीं आला. सरोवराच्या कांठावर येऊन उतरतांच तो आपल्या मठांत गेला. तेथल्या दुसऱ्या खुळ्यांनीं त्याला आलिंगन देऊन, तूं इतके दिवस कोठें होतास, म्हणून विचारलें. तेव्हां त्यानेंही आपला वृत्तान्त त्या सर्वांना निवेदन केला. तो ऐकून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें, आणि ते सर्व खुळे ' आम्हांवर कृपा कर, आम्हांलाही तेथें नेऊन दिव्य मोदक खाऊं घाल.' असें म्हणून त्याची प्रार्थना करूं लागले. तेव्हां बरें आहे, असें त्यांस उत्तर

देऊन, कैलासीं जाण्याची युक्ति सांगितली; व दुसऱ्या दिवशीं तडागाच्या कांठीं त्यास घेऊन गेला. तों वृषभही तेथें आला. त्याबरोबर मुख्य खुळ्यानें त्याच्याशीं जाऊन त्याचें पुच्छाग्र धरलें, दुसऱ्यानें त्या मुख्याचे पाय आपल्या दोन्हीं हातांनीं धरले. तिसऱ्यानें त्याचे पाय धरले, याप्रमाणें त्यांनीं एक लांबच पायांची सांखळी केली. इतक्यांत तो बैल वेगानें आकाशांत उडून नभोवेगानें जाऊं लागला. ज्याच्या पुच्छास अनेक मूर्खांची पंक्ति लटकली आहे, असा तो नंदी कैलासाकडे जावयास निघाला असतां दैववशात् एक मूर्ख मुख्य मूर्खास म्हणाला,-'मित्रा, स्वर्गलोकीं इच्छेप्रमाणें सुलभ असलल्या मोदकांतील तूं किती खाशील ? तें आम्हांला नुसतें सांग तर खरें !' तेव्हां, बैलाचें पुच्छ हातांनीं धरिलें आहे, या गोष्टीचें भान न राहिल्यामुळें त्या खुळ्यानें 'इतके' असें म्हणून आपल्या कमलाकार हातांनीं त्यांचें प्रमाण दाखविण्याचा प्रयत्न केला. पण पुच्छाग्राचे दोन्ही हात सुटतांच तो स्वतः व त्याच्याबरोबर दुसरे सर्वही फार उंचावरून खालीं पडले व लगेच मेले. शंकराचा नंदी तसाच पुढें गेला व तो चमत्कार पहाणारे लोक हंसूं लागले. सारांश, मूर्खांचें विवेकशून्य प्रश्नोत्तर असा मोठा अनर्थ करीत असतें.* असो; ही आकाशगामी मूर्खांची कथा झाली. आतां एका खुळ्याची वार्ता सांगतों, ती ऐका:—

## ११. एका मूर्ख वाटसरूची कथा.

एक मूर्ख मार्गानें जात असतांना मध्येंच वाट विसरला. म्हणून तो लोकांना विचारूं लागला. तेव्हां कृपाळु जनांनीं 'हा जो समोर नदीच्या तीरावर वृक्ष दिसत आहे, त्याच्यावरून जा,' असें त्याला सांगितलें; तें ऐकून तो मूढ त्या वृक्षापाशीं गेला, व लोकांनीं 'मला याच्यावरून जावयास सांगितलें आहे' असें म्हणून वर चढला, आणि त्यावरून चालूं लागला. पण त्या वृक्षाच्या एका अग्रशाखेवर पाय पडतांच ती एकाएकीं नमली, पण त्या मूर्खानें मोठ्या यत्नानें तिलाच धरलें; त्यामुळें तो खालीं पडून तत्काल मेला नाहीं. कांहीं वेळ तो तसाच त्या शाखेला धरून लोंबत राहिला. इतक्यांत ज्याच्यावर माहात बसला आहे, असा एक हत्ती खालच्या नदींत पाणी पिऊन त्याच मार्गानें वर आला. तेव्हां त्याला पाहून तो

* दोषाय निर्विमर्शैवं मौतप्रश्नोत्तरक्रिया ॥

मूढ भिऊन दीन वाणीनें म्हणाला,–'महात्मन्, मला येथून उतरून घे म्हणजे जीवदान दिल्याचें पुण्य लागेल.'

त्या मूढाचें तें दीन भाषण ऐकून हस्त्यारोहाला दया आली. त्यानें त्याला झाडावरून उतरण्याकरितां अंकुश हत्तीवर ठेवून आपल्या दोन्ही हातांनीं त्याच्या पायांस मिठी मारली. पण तो त्याला खालीं उतरून घेणार इतक्यांत खालचा हत्ती पुढें निघून गेला. त्यामुळें तो माहातही अगोदर वृक्षाग्रावरून लोंबत असलेल्या त्या मूढाच्या पायांस धरून लटकत राहिला. नंतर वरचा मूर्ख खालच्या हस्त्यारोहास म्हणाला,–' मित्रा, तुला गाणें येत असलें तर तूं तें सत्वर मोठ्यानें म्हणूं लाग, म्हणजे तें ऐकून कोणी तरी येथें येईल व आमचे प्राण वांचवील. नाहींतर आपण दोघेही खालीं पडूं व खालची नदी आम्हांला वाहून नेईल.'

वरून लोंबणाऱ्या मित्राचें हे भाषण ऐकून माहातही असें मंजुळ गाऊं लागला, कीं वरचा मूर्ख अतिशय संतुष्ट झाला. तो त्या खालच्या गाणाराला ' शाबास, शाबास, खाशी, जीते रहो ' असें म्हणून साधुवाद देऊं लागला. मी वृक्षाची अग्रशाखा आपल्या हातांनीं धरली आहे, हे तो दुर्दैवी पुरुष विसरला, आणि गाण्यांत तल्लीन होऊन, शाखा सोडून, तो दोन्ही हातांनीं चिटक्या वाजवूं लागला. पण त्यामुळें तत्काल हस्त्यारोहासकट खालीं पडून तो नदींत बुडून मेला. मूर्खांशीं संग झाल्यावर सुख कोणाला कसें होणार ?* असो, वत्सेश्वरपुत्राला अशी कथा सांगून गोमुख पुनः पुढील हिरण्याक्षाची कथा सांगूं लागला.—

## १२. हिरण्याक्षाची कथा.

या लोकीं हिमालयाच्या कुक्षीमध्यें कश्मीर या नांवाचा पृथ्वीचा जणुं काय शिरोमणीच, असा एक देश आहे. तो विद्या व धर्म यांचें गृहच आहे. त्या देशात हिरण्यपुर या नांवाचें एक नगर असून त्यांत कनकाक्ष या नांवाचा एक अति प्रख्यात राजा होता. त्याला शंकराच्या आराधनेमुळें, रत्नप्रभादेवीच्या ठायीं एक पुत्र झाला. राजानें त्याचें नांव हिरण्याक्ष असें ठेविलें. तो राजपुत्र एकदां गोट्यांनीं खेळत होता. इतक्यांत त्याच मार्गानें एक तापसी आली. खेळण्याच्या मिषानें त्यानें हातांतील गोटी

* मूर्खैर्हि संगः कस्यास्ति शर्मणे ।

त्या तापसीला मारली. तेव्हां जिनें क्रोध जिंकला आहे, अशी ती योगेश्वरी हंसून त्याला म्हणाली,–' केवल आपल्या तारुण्यादिकांच्या योगानेंच जर तूं इतका दर्पयुक्त झाला आहेस, तर मृगाङ्कलेखा भार्या मिळाल्यास तूं किती दृप्त होशील?'

त्या शांत तापसीचें तें भाषण ऐकून राजपुत्राला आपल्या दुर्लीले-विषयीं पश्चात्ताप झाला. त्यानें तिची क्षमा मागितली; व 'भगवति, ती मृगाङ्कलेखा कोण?' असा प्रश्न केला. तेव्हां ती तापसी म्हणाली,– 'हिमालयपर्वतावर शशितेज या नावानें प्रख्यात असलेला एक महायशस्वी विद्याधरेश्वर आहे. मृगाङ्कलेखा ही त्याची कन्या असून ती एक सर्वोत्तम विद्याधरी आहे. म्हणूनच ती आपल्या रूपानें आकाशचरांना रात्रीं निद्रारहित करीत असते. ती तुला अनुरूप भार्या असून तूं तिला अनुरूप पति आहेस.'

त्या सिद्ध तापसीनें असें सांगितलें असतां हिरण्याक्ष तिला पुनः म्हणाला,–' भगवति, असें जर असेल तर ती मला कशी मिळेल तें सांग.' त्यावर योगेश्वरी म्हणाली,–'पुत्रा, मी आतां अगोदर तिच्या जवळ जातें, तुझा वृत्तान्त तिला सांगते व तिचा आशय काय आहे, तें पहातें. नंतर मीच तेथें येऊन तुला तिच्याकडे घेऊन जाईन. येथें जो अमरेश नांवाचा देव आहे, त्याच्या मंदिरांत मी रोज सकाळीं पूजा करावयास येत असतें.'

इतकें सांगून ती तापसी आपल्या सिद्धींच्या सामर्थ्यानें, आकाश-मार्गानें, हिमालयावर असलेल्या मृगांकलेखेजवळ गेली. तेथें तिच्या समोर युक्तीनें ती हिरण्याक्षाच्या गुणांचें वर्णन करूं लागली. तेव्हां तें सर्व ऐकून ती दिव्य कन्या तापसी म्हणाली,–' भगवति, मला जर तशा-प्रकारचा भर्ता न मिळाला तर हें निष्फल जीवित घेऊन काय करावयाचें आहे?' असें बोलून जिच्या मनांत कामसंचार झाला आहे, अशी मृगांक-लेखा राहिलेला दिवस त्याच्याच गोष्टी बोलण्यांत घालवून रात्रींही त्या तापसीच्याच बरोबर राहिली. तिकडे काश्मीर देशांत हिरण्याक्षानेंही तिच्याच विषयीं विचार करीत तो दिवस घालविला. रात्रीं तो मोठ्या कष्टानें निजला असतां पहांटे गौरी त्याला स्वप्नांत येऊन म्हणाली,–' तूं विद्याधर होतास पण मुनींच्या शापानें मर्त्य झाला आहेस. पण तुला जी

तापसी काल भेटली आहे, तिच्याच हातचा स्पर्श झाला असतां तूं शापमुक्त होशील. त्यानंतर सत्वरच मृगांकलेखेशीं तुझा विवाह होईल. तूं कांहीं चिंता करूं नकोस. ती तुझी पूर्वीची भार्याच आहे.'

इतकें सांगून देवी गुप्त झाली. हिरण्याक्षही जागा झाला. त्यानें स्नानादि नित्य मंगलक्रिया केल्या. नंतर त्या तापसीनें जेथें भेटण्याचा संकेत केला होता, त्या अमरेश्वराच्या मंदिरांत जाऊन व देवाला प्रणाम करून तो तसाच डोकें टेंकून राहिला. तिकडे आपल्या मंदिरांत मोठ्या कष्टानें जिला झोंप लागली आहे, अशा मृगांकलेखेलाही देवीनें स्वप्नांत अशी आज्ञा केली:—'वत्से, उगीच कष्टी होऊं नकोस. तापसीच्या हाताचा स्पर्श होतांच ज्याचा शाप क्षीण झाला आहे असा हिरण्याक्ष पुनः विद्याधर बनून तुझा पति होईल.' इतकें बोलून देवी गुप्त झाली असतां मृगांकलेखा उठली, व तिनें आपलें स्वप्न तापसीला सांगितलें. तें ऐकतांच सिद्ध तापसी भूलोकीं आली आणि अमरेशाच्या मंदिरांत असलेल्या नम्र हिरण्याक्षाला 'पुत्रा, विद्याधरांच्या लोकांस चल,' असें म्हणून, हस्तस्पर्श केला, व त्याला दोन्हीं हातांनीं उचलून आकाशमार्गानें ती निघाली.

पण तापसीचा हस्तस्पर्श होतांच हिरण्याक्षाचा शाप क्षीण झाला. तो तत्काल विद्याधर झाला. त्याला पूर्व जन्माचें स्मरण झालें. नंतर तो तापसीला म्हणाला,—'भगवति, मी हिमालयावरील वज्रकूटाख्य नगरांत अमृततेज नांवाचा विद्याधरांचा राजा होतों. मागें एकदां माझ्या हातून एका मुनीचें उल्लंघन झालें, त्यामुळें त्यानें क्रोधानें शाप देऊन मला मर्त्य केलें. तुझ्या हाताचा स्पर्श होईतों तो शाप टिकणारा होता. मला शाप झालेला ऐकतांच ज्या माझ्या भार्येनें प्राणत्याग केला, तीच ही मृगांकलेखा झाली आहे. ही माझी पूर्वीचीच भार्या आहे. आतां तुझ्याबरोबर जाऊन मी तिला मिळेन. तुझ्या हस्तस्पर्शानें आज तो माझा शाप निवृत्त झाला आहे.'

असें बोलत तो विद्याधरेश अमृततेज आकाशमार्गानें हिमाद्रीवर गेला. तेथें उद्यानांत असलेल्या मृगांकलेखेला त्यानें पाहिलें. तापसीनें ज्याच्याविषयीं पूर्वीच सांगितलें आहे, अशा त्याला तिनेंही पाहिलें. खरोखर मोठें आश्चर्य आहे, कीं पूर्वी कर्णमार्गानें एकमेकांच्या हृदयांत

शिरून आतां दोघेंही पुनः दृष्टिमार्गानें परस्परांच्या मानसांत प्रविष्ट झालीं. नंतर प्रौढ तापसीनें 'विवाहाच्या सिद्धीकरितां पित्याची प्रार्थना कर' असें त्या विद्याधरकन्येला सांगितलें. तेव्हां लज्जेनें जिचें मुख नम्र झालें आहे, अशी ती तरुणी आपल्या पित्यापाशीं जाऊन सखीच्या द्वारा तत्काल तें सर्व कळविती झाली. त्या विद्याधराधिपालाही देवीनें स्वप्नांत सांगितलेंच होतें. म्हणून त्यानें अमृततेजाचा मोठा सन्मान केला. त्याला आपल्या घरीं नेऊन यथाशास्त्र मृगांकलेखेचें दान केलें. आणि याप्रमाणें विवाह झाल्यावर तो आपल्या वज्रकूट नगरास गेला. तेथें त्याला त्याचें राज्य मिळालें. पूर्वींची भार्या तर अगोदरच मिळाली होती. नंतर त्यानें सिद्ध तापसीच्या द्वारा आपल्या कनकाक्ष नांवाच्या मर्त्य पित्यास आणविलें. त्याला नानाप्रकारच्या दिव्य भोगांनीं तृप्त करून, मर्त्यलोकीं परत पाठविलें आणि त्यानंतर तो विद्याधरेंद्र मृगांकलेखेसह त्या समृद्धीचा दीर्घकाल उपभोग घेत राहिला.

तात्पर्य, याप्रमाणें या जगांत पूर्व कर्मामुळें प्राप्त होणारें ज्या प्राण्याचें जें भवितव्य असतें तें असाध्य असलें, तरी पुढें आणून ठेवल्याप्रमाणें त्याला मिळतें.* गोमुखानें सांगितलेली ही कथा ऐकून शक्तियशेविषयीं अतिशय उत्सुक झालेला नरवाहनदत्त संतुष्ट झाला.

## तरंग १० वा.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं पुनः गोमुख राजसुताच्या चित्तरंजनाकरितां कथा सांगूं लागला पूर्वीं धारेश्वर नांवाच्या सिद्धशैवक्षेत्रांत अनेक शिष्यांकडून सेवा केला जाणारा एक महामुनि रहात असे. तो एकदां आपल्या शिष्यांस म्हणाला,–'तुमच्यापैकीं जर कोणी कांहीं अपूर्व पाहिलें किंवा ऐकलें असलें तर तें मला सांगा.' महामुनीन असें विचारिलें असतां, एक शिष्य म्हणाला,–'मीं जें एक अपूर्व ऐकलें आहे तें तुम्हांला सांगतों.'—

* इति पूर्वकर्मविहितं भवितव्यं जगति यस्य जन्तोर्यत् ।
तदयत्नेन स पुरतः पतितं प्राप्नोत्यसाध्यमपि ।

## १. वादी संन्याशाची कथा.

काश्मिरांत विजय या नांवाचें एक शंभूचें क्षेत्र आहे. तेथें विद्येचा मोठा अभिमान वाहणारा एक संन्यासी होता. 'मीं सर्वत्र विजयी व्हावें' अशी इच्छा करणारा तो शंभूला प्रणाम करून वाद करण्याच्या उद्देशानें पाटलीपुत्र नगरास निघाला. जातां जातां मार्गांत वनें, नद्या, पर्वत इत्यादिकांस ओलांडून एका मोठ्या अरण्यांत येऊन पोंचला. पण चालून चालून अतिशय श्रम झालेले असल्यामुळें तो एका झाडाखालीं विश्रांति घ्यावयास बसला. इतक्यांत विहिरीच्या योगानें शीतल झालेल्या त्याच वृक्षाखालीं एक धार्मिक आला. तो फार दुरून चालून आलेला असल्यामुळें, त्याचें शरीर धुळीनें मलीन झालें होतें, व हातांत दंड कमंडलु होता.

तो धार्मिक जवळ येऊन बसला असतां, वावदूक संन्यासी 'तूं कोठून आलास व कोठें जात आहेस?' असें विचारूं लागला. तेव्हां धार्मिक म्हणाला,—'मित्रा, विद्यांचें जणुं काय क्षेत्रच अशा पाटलीपुत्र नगराहून मी आलों. काश्मिरांतील पंडितांस जिंकण्याकरितां मी तिकडे जात आहें.' तें ऐकून संन्यासी मनांत म्हणाला,—'मी येथेंच या एका पाटलिपुत्रस्थ विद्वानाला जर जिंकूं शकलों नाहीं, तर तेथें जाऊन दुसऱ्या अनेकांना कसें जिंकणार?' असा विचार करून त्यानें त्या धार्मिकास प्रश्न केला. 'धार्मिका, हें तर तुझें विपरीत आचरण दिसतें. कारण तूं धार्मिक व मुमुक्षु आहेस. तेव्हां धार्मिकत्व व मुमुक्षुत्व कोठें आणि व्यसनानें आतुर होणारा वादी कोठें! वादाच्या अभिमानानें तूं मोक्षाची इच्छा करीत आहेस. म्हणजे अग्नीनें अग्नीला शांत करण्याचा व शीतानें शीताचें निवारण करण्याचाच तूं प्रयत्न करीत आहेस. हे मूढा, तूं पाषाणाच्या नौकेनें महासागरांतून पार जाण्याची इच्छा करीत आहेस. प्रदीप्त अग्नीला वायूनें विझवूं पहात आहेस. क्षमा हें ब्राह्मणाचें शील आहे, आपत्तींत पडलेल्या प्राण्यांचें रक्षण करणें, हें क्षत्रियांचें शील आहे, शम हें मुमुक्षूचें शील आहे आणि कलह हें राक्षसाचें शील आहे. यास्तव संसारांतील क्लेशांस भ्यालेल्या मुमुक्षूनें शान्त व दान्त व्हावें, आणि शीतोष्णादि द्वंद्वदुःखाचें निवारण करावें. मित्रा, तूंही शमरूपी कुऱ्हाडीनें संसारवृक्षास तोड.

हेतुवादाच्या अभिमानानें त्याला पुष्ट करूं नकोस. कारण अभिमान हेंच त्याला पुष्ट करणारें जल आहे।'

संन्याशानें असा उपदेश केला असतां, धार्मिक अतिशय संतुष्ट झाला. त्याला प्रणाम करून व तूं माझा गुरु आहेस, असें म्हणून तो आल्या मार्गानें परत गेला. संन्यासी तेथेंच हंसत बसला. पण इतक्यांत त्या वृक्षामध्यें भार्येसह क्रीडा करीत असलेल्या यक्षाचे अस्पष्ट आलाप त्याच्या कानीं आले. म्हणून तो अधिक लक्ष देऊन ऐकूं लागला. तों यक्षानें आपल्या भार्येला थट्टेनें पुष्पाच्या मालेनें ताडन केलें. त्याबरोबर त्या शठ स्त्रीनें मेल्याचें सोंग घेतलें. तेव्हां तिचा परिवार लागलाच मोठ्यानें आक्रोश करूं लागला. नंतर बऱ्याच वेळानें जीवित परत आलें आहे, असें दाखवून तिनें आपले गरगरीत डोळे उघडले. तेव्हां तो यक्ष—' प्रिये, तूं या मूर्च्छावस्थेंत काय पाहिलेंस ? '—असें विचारू लागला. तें ऐकून ती खोटेंच असें सांगू लागली,—' तूं जेव्हां मला मालेनें मारलेंस तेव्हा मी एक काळा पुरुष आला आहे, असें पाहिलें. त्याच्या हातांत पाश होते; नेत्र दीप्त होते; तो उंच असून त्याचे केंस वर भरलेले होते; ह्यामुळें तो भयानक दिसत होता. त्यानें आपल्या छायेनें दिशांना मलिन करून सोडलें होतें. त्या दुष्टानें मला यमाच्या मंदिरांत नेलें, पण तेथल्या अधिकाऱ्यांनीं त्याचें निवारण करून मला सोडविलें.'

त्या यक्षिणीनें असें सांगितलें असतां यक्ष हंसून तिला म्हणाला—' काय सांगावें, इंद्रजालावांचून स्त्रियांची एकही चेष्टा नसते. सर्व कपट.

† वादाभिमानबन्धेन संसारान्मोक्षमिच्छसि ।
शमयस्यग्निनोष्माणं शीतं हंसि हिमेन च ॥
उत्तितीर्षसि पाषाणनावा मूढ महोदधिम् ।
वातेन ज्वलितं वन्हिं निवारयितुमीहसे ॥
ब्राह्मं शीलं क्षमा नाम क्षात्रमापत्परक्षणम् ।
मुमुक्षुशीलं च शमः कलहो रक्षसां स्मृतम् ॥
तस्माच्छान्तेन दान्तेन भवितव्यं मुमुक्षुणा ।
निरस्तद्वन्द्वदुःखेन संसारक्लेशभीरुणा ॥
अतः शमकुठारेण च्छिन्धीमं भवपादपम् ।
हेतुवादाभिमानाम्बुसेकं तस्य तु मास्म दाः ॥

पुष्पांच्या आघातानें मृत्यु कसा येणार व यमाच्या घरून परत कसें कोण येणार? मूढे, पाटलीपुत्र नगरांतील एका स्त्रीच्या वृत्तान्ताचें तूं अनुकरण केलेस त्या नगरांत सिंहाक्ष नांवाचा जो एक राजा आहे त्याची भार्या, मंत्री, सेनापति, पुरोहित व वैद्य यांच्या भार्यांना बरोबर घेऊन, शुक्लपक्षांतील त्रयोदशीस त्या देशाला सनाथ केलेल्या सरस्वतीचें दर्शन घ्यावयास गेली. मार्गानें जात असतांना त्यांना कुबडीं, आंधळीं, पांगळीं व व्याधीनें पीडलेलीं दीन माणसें भेटलीं, व त्यांनीं 'आम्हां दीनांना औषध देऊन रोगांतून सोडवा, आम्हीं आर्त झालों आहों, आर्तांवर दया करा' अशी त्या श्रीमान् व अधिकारसंपन्न स्त्रियांची प्रार्थना केली. त्यांतील कांहीं चतुर रोगी आणखी असें बोलले-' बाईसाहब, हा मर्त्यलोक समुद्रलहरीप्रमाणें चंचल व विजेच्या चमकण्याप्रमाणें भंगुर असून यात्रादि उत्सवप्रसंगानें सुंदर झाला आहे.† या असार-संसारांत दीनांवर दया करणें, व दरिद्री लोकांना दान करणें, हेंच सार आहे. गुणवान् पुरुष कोठेंही गेला, तरी आपल्या गुणांच्या बलावरच जिवंत रहातो.* धनसंपन्न असलेल्या पुरुषांना दान देऊन काय करावयाचें आहे? जो अगोदरच तृप्त झालेला आहे, त्याला अन्न दिल्यास त्याचा काय उपयोग? ज्याला शीत झालें आहे, त्याच्या अंगास चंदनाचा लेप करून काय करावयाचें आहे? थंडीच्या दिवसांत मेघांचा काय उपयोग?¶ यास्तव तुम्ही आम्हां सर्वांना व्याधींतून सोडवा.

हें त्यांचें आर्त वचन ऐकून राजाधिकाऱ्यांच्या भार्या म्हणाल्या,-' हे व्याधित कृपण ठीक बोलत आहेत. यास्तव सर्वस्व खर्च करूनही आपण यांची चिकित्सा करूं या.' याप्रमाणें आपसांत संकेत करून, देवीचें पूजन केल्यावर, त्या स्त्रियांनीं त्या रोग्यांस वांटून घेऊन पृथक् पृथक् आपल्या

---

† समुद्रलहरीलोलो विद्युत्स्फुरितभंगुरः ।
जीवलोको ह्ययं यात्राद्युत्सवक्षणसुंदरः ॥

* तदसारेऽत्र संसारे सारं दीनेषु या दया ।
कृपणेषु च यद्दानं गुणवान्क न जीवति ॥

¶ आढ्यस्य किं च दानेन सुखितस्याशनेन किम् ।
किं चन्दनेन शीतालोः किं घनेन हिमागमे ॥

येथें आणलें. आपल्या भर्त्यांना प्रेरणा करून त्यांनीं त्या महाधैर्यवानां-कडून रोग्यांची चिकित्सा करविली. त्या त्यांच्यापासून हालल्याही नाहींत. सदा त्यांच्यापाशीं बसून त्यांची शुश्रूषा स्वतः करीत असत. पण सह-वासामुळें त्या त्यांच्यावर इतक्या आसक्त झाल्या, कीं त्यांना सर्व संसार तन्मय दिसूं लागला. त्यांच्या मनांत कामोद्भव झाला व त्या रोग्यांशींही त्यांचा पापी संसर्ग झाला. हर हर ! हे कृपण रोगी कोठें ? व राजा, मंत्री, सेनापति, पुरोहित व वैद्य हे आपले विवाहित पति कोठें ? याचा विचार अंध झालेल्या त्यांच्या मनानें मुळींच केला नाहीं !

असो; त्यानंतर असंभाव्य अशा रोग्यांच्या संभोगामुळें झालेल्या व्रणांनीं त्यांचीं शरीरें चिन्हित झालीं आहेत, असें पाहून त्यांचे पति साशंक झाले. त्यांनीं आपापला संशय परस्परांस सांगितला. तेव्हां राजा इतरांस म्हणाला, ‘ तुम्ही आतां आधीं मुकाट्यानें बसा. मी आज आपल्या भार्येला युक्तीनें विचारतों. ’ असें बोलून व त्यांचें विसर्जन करून तो अंतःपुरांत गेला. थोडेंसें भय व थोडासा स्नेह दाखवून तो राजा आपल्या राणीला विचारूं लागला,—‘कीं तुझ्या अधरोष्ठाला हा दंश कोणी केला ? व तुझ्या स्तनांवर हे नखांचे ओरखडे कोणी काढले ? तें मला खरें सांग.’

राजाचा तो अकल्पित प्रश्न ऐकून राणी खोटेंच असें सांगूं लागली, ‘प्राणनाथ, मी सांगूं नये, पण मी अधन्य असल्यामुळें, हें आश्चर्य सांग-ण्याचा प्रसंग मजवर आला आहे. यास्तव ऐका:—या चित्रांच्या भिंतींतून रात्रीं एक चक्र—गदाधर पुरुष निघून माझा उपभोग घेतो व प्रातःकाळीं या भिंतींतच गुप्त होतो. चंद्र—सूर्यांच्याही दृष्टीस न पडलेलें जें माझें अंग त्याची तो कोणसा येऊन, आपण स्थित असतांना, अशी अवस्था करितो.’

अतिशय दुःखी झाल्याचा बाहणा करणाऱ्या तिचें हें भाषण ऐकून तो मूर्ख राजा, कदाचित् ही वैष्णवी माया असेल, असें वाटल्यामुळें, तें सर्व खरेंच मानूं लागला. त्यानें आपल्या मंत्र्यादिकांना तो वृत्तान्त सांगितला. त्या मूर्खांनाही आपल्या भार्यांचा उपभोग स्वतः भगवान् घेत आहे, असें वाटलें. त्याकारणानें ते सर्व मुकाट्यानें बसले.

याप्रमाणें कुस्त्रिया केवळ असत्य गोष्टी रचण्यांत मोठ्या कुशल असतात. त्या जडमती पुरुषांना फसवितात; पण मी तसा मूर्ख नाहीं,

समजलीस ! असें बोलणाऱ्या यक्षानें तिला लज्जित करून सोडलें. वृक्षाच्या खालीं शीतल छायेंत बसलेल्या संन्याशानें हें सर्व बोलणें ऐकलें. नंतर तो हात जोडून यक्षास म्हणाला,–'भगवन्, मी तुमच्या आश्रयास आलों आहें, मी आपल्याला शरण आहें; यास्तव मी हें तुमचें सर्व भाषण ऐकलें, या अपराधाची मला क्षमा करा.'

संन्याशाच्या या सत्य भाषणामुळें यक्ष प्रसन्न झाला, व म्हणाला,– 'मी सर्वस्थानगत या नांवाचा यक्ष आहें. मी तुजवर प्रसन्न झालों आहें. तुला हवा तो वर मजपासून मागून घे.' तेव्हां संन्यासी म्हणाला,– 'तूं या आपल्या भार्येवर रागावूं नकोस. हाच मला वर पाहिजे आहे.' तें ऐकून यक्ष पुनः म्हणाला,–' वा ! या वरामुळें तर मी तुजवर अधिकच प्रसन्न झालों आहें. हा वर मी तुला दिला आहे. तूं आणखी एक वर मागून घे.' यक्षाचें तें भाषण ऐकून संन्यासी म्हणाला,–'तर मग तुम्ही दोघेंही आजपासून मला आपला पुत्र समजा. हाच माझा दुसरा वर आहे. संन्याशाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच तो यक्ष आपल्या भार्येसह प्रकट झाला व त्यास–' ठीक आहे, तूं आम्हां उभयतांचा पुत्र आहेस, आमच्या प्रसादानें तुला कधींही व कोठेंही कोणतीही विपत्ति प्राप्त होणार नाहीं. वाद, कलह, द्यूत यांमध्यें सदा विजयी होशील.' इतकें बोलून यक्ष गुप्त झाला. तेव्हां संन्याशानेंही त्याला प्रणाम करून रात्र तेथेंच घालविली व दुसऱ्या दिवशीं तो पाटलीपुत्र नगरास येऊन पोंचला.

त्यांतील राजमंदिरापर्यंत जाऊन द्वारपालाच्या मुखानें, त्यानें सभेंत बसलेल्या सिंहाक्षराजाला आपण आल्याचें कळविलें. काश्मीराहून हा कोणी एक मोठा वादी आला आहे, असें जाणून राजानें त्याला सभेंत आणावयास सांगितलें. आंत जातांच त्यानें तेथील पंडितांना वाद करावयास बोलाविलें. वाद करून यक्षांच्या वर–प्रभावानें त्यानें सर्व विद्वानांना जिंकलें. नंतर राजासमोर त्यानें त्या पंडितांना असा प्रश्न केला,–'चित्रांच्या भिंतींतून निघून एक चक्र-गदाधर पुरुष दांतांनीं ओष्ठांस दंश करून व नखांनीं स्तनांस ओरबडून माझा उपभोग घेतो, आणि प्रातःकाळीं त्याच भिंतींत पुनः गुप्त होतो; हें काय आहे ? याचें उत्तर मला द्या.'

हा त्याच्या अद्भुत प्रश्नाचें उत्तर कोणीही दिलें नाहीं. त्यांतील तत्त्व न जाणणारे ते सर्व पंडित एकमेकांच्या तोंडाकडे बघत राहिले.

तेव्हां राजा सिंहाक्ष स्वतः त्याला म्हणाला,-' या प्रश्नाचें उत्तर तूंच आम्हांला दे.' तेव्हां त्या संन्याशानें, यक्षापासून ऐकलेलें त्याच्या भार्येचें सर्व कपटाचरण राजाला कळविलें; व तो म्हणाला केवल पापालाच कारण होणाऱ्या अशा स्त्रियांवर कोणीही अत्यासक्त होऊं नये,' तें ऐकून राजा त्याच्यावर अतिशय संतुष्ट झाला. त्याला आपलें राज्य द्यावयासही तो तयार होता; पण आपल्या देशांत जाऊन रहावयाची त्याला अति उत्कट इच्छा असल्यामुळें त्यानें तें घेतलें नाहीं. म्हणून सिंहाक्षानें विपुल रत्नांच्या योगानें त्याचा उचित सन्मान केला. नंतर तो संन्यासी राजानें दिलेलीं रत्नें घेऊन काश्मीर देशास परत आला आणि यक्षाच्या अनुग्रहानें दैन्यरहित होऊन सुखानें राहिला.

असें ऐकलेलें आश्चर्य सांगून तो शिष्य महामुनीस म्हणाला,-' गुरुवर्य, मी हें सर्व त्या संन्याशाच्या तोंडून ऐकलें आहे.' शिष्यानें सांगितलेलें हें अद्‍भुत वृत्त ऐकून इतर शिष्यांसह तो महामुनि विस्मित झाला. गोमुखही नरवाहनदत्ताला इतकें सांगून पुनः म्हणाला,-' स्वामिन्, कुस्त्रिया व वेधा (ब्रह्मा) यांचीं हीं अशीं कृत्यें असतात. लोकांचीं चरित्रेंही सदा अशींच विचित्र असतात. आतां आणखी एक अशाच प्रकारची एकादशमारिका नांवाच्या कन्येची कथा ऐका.'

२. एकादशमारिकेची कथा.

मांळव देशांत कोणी एक ग्रामवासी कुटुंबी होता. त्याला दोन तीन मुलांच्या पाठीवर एक मुलगी झाली. पण ती जन्मास येतांच त्याची भार्या मेली. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं त्याचा एक पुत्र मेला. त्याच्या मागून बैलानें शिंग मारल्यामुळें त्याचा एक भाऊ मेला. म्हणून त्या कुटुंबी पुरुषानें बाराव्या दिवशीं त्या कन्येचें नांव त्रिमारिका असें ठेविलें. कांहीं दिवसांनीं ती कन्या तरुण झाली, तेव्हां त्याच गांवांतील एका पुत्रसंपन्न पुरुषानें तिची मागणी केली. तिच्या पित्यानेंही ती त्याला दिली. विवाह झाला, व ती पतीच्या घरीं गेली, तेथें कांहीं दिवस त्याच्याशीं रममाण झाली. पण थोड्याच अवकाशांत तो तिचा भर्ता मेला. कांहीं दिवसांनीं त्या चपलेनें दुसऱ्या पतीचा अंगीकार केला. पण तो तिचा दुसरा नवराही लवकरच मेला. पण यौवनानें मत्त झालेल्या तिनें तिसरा पति केला. कांहीं दिवसांनीं तोही परलोकवासी झाला. याप्रमाणें एका

मागून एक असे लागोपाठ तिचे दहा पति मेले! म्हणून लोक तिला थट्टेनें दशमारिका असें म्हणूं लागले. आणखी पति करावा, असें तिच्या मनांत होतें, पण लज्जित झालेल्या तिच्या बापानें तिचें निवारण केलें, गांवांतील व सर्व सासरच्या लोकांनीं तिला वर्ज्य केलें, ती बापाच्या येथें येऊन राहिली. एकदां एक सुंदर तरुण तिच्या बापाच्या घरीं आला व एकरात्रभर रहावयास जागा मागूं लागला. तिच्या उपकारी पित्यानेंही त्याला एकच रात्र जागा दिली. त्याला पहातांच दशमारिकेचें मन त्याच्यावर गेलें. तो पांथस्थही त्या तिला पाहून साभिलाष झाला. नंतर मदनानें जिची लज्जा घालविली आहे, अशी ती—' बाबा, मी या एकाच वाटसरूला आतां आपला पति करितें आणि हाही जर मेला तर मात्र मी व्रतस्थ होऊन राहीन '—असें पित्याला म्हणाली; पण पांथस्थाच्या समक्ष असें बोलणाऱ्या तिला तिचा पिता म्हणाला—'वत्से, नको. आतां पतीचा लोभ पुरे झाला. तुझे दहा पति मेले, या विषयीं मला मोठी लज्जा वाटत आहे. आणि हाही अकरावा मेल्यास लोक अतिशय हंसतील.'

तिच्या बापाचें हें भाषण ऐकून तो पांथस्थही लज्जा सोडून त्याला म्हणाला, ' मामा, तुम्हीं कांहीं चिंता करूं नका. मी मरणार नाहीं. आजपर्यंत माझ्या दहा बायका मेल्या आहेत. यास्तव आम्ही दोघेंही एकसारखींच आहों. माझें म्हणणें खरें वाटत नसेल तर मी शंकराच्या पिंडीवर हात ठेवून हें सांगण्यास तयार आहें.' त्यानें असें सांगितलें असतां तेथें कोणाला विस्मय वाटला नसेल! असो; तो वृत्तांत ऐकून सर्व ग्रामस्थ तेथें जमले, आणि त्यांच्या अनुमतीनेंच त्या दशमारिकेनें त्या पान्थस्थाला आपला अकरावा पति केलें. त्याच्या सहवासांत ती जों कांहीं दिवस रहात आहे तोंच त्याला हिंव–ताप लागला व शेवटीं तो त्यानेंच मेला. तेव्हां दगडांनांही हंसविणारी ती एकादशमारिका उद्विग्न होऊन गंगातीरीं गेली व तिनें संन्याशाचा आश्रय केला.

ही कथा ऐकून हंसूं लागलेल्या नरवाहनदत्ताला गोमुख पुनः म्हणाला, प्रभो, आतां दान्तजीवी पुरुषाची एक कथा सांगतों ती ऐका'—

### ३. बैलावर निर्वाह करणाराची कथा.

एका ग्रामामध्यें एक कुटुंबी पण दरिद्री पुरुष होता. एक बैल, हेंच काय तें त्याच्या घरांत धन होतें. अन्न न मिळाल्यामुळें त्याचें सर्व कुटुंब

क्लेश भोगीत होतें व तो स्वतः उपवास करीत होता. तरी लोभानें त्यानें त्या बैलाला विकलें नाहीं. विंध्यवासिनी देवीपुढें जाऊन तो दर्भाच्या आसनावर पडून, द्रव्य मिळावें या हेतूनें, निराहार तप करूं लागला. तेव्हां देवी म्हणाली—'ऊठ, एक बैल हेंच तुझें नित्य धन आहे. यास्तव त्याला वीक, म्हणजे तूं दीर्घकाल सुखानें रहाशील.' देवीनें स्वप्नांत येऊन अशी आज्ञा केली असतां सकाळीं तो जागा झाला. उठून त्यानें थोडेंसें पारणें केलें. नंतर तो आपल्या घरीं परत आला.

पण घरीं येऊन सुद्धां त्याला बैलाला विकण्याचें धैर्य होईना. 'याला विकल्यावर मी निर्धन होईन, आणि त्यामुळें फार दिवस जगणारही नाहीं.' असें मनांत आणून तो तसाच क्लेश भोगीत राहिला. एकदां सहज बोलतां बोलतां त्यानें देवीची आज्ञा एका बुद्धिमानाला सांगितली. तेव्हां उपवासानें कृश झालेल्या त्याला तो हितकर्ता म्हणाला, 'मूढा, एक दान्त (खची केलेला बैल)च तुझें धन आहे. यास्तव त्याला विकून तूं सर्वदा सुखानें नांदशील, असें देवीनें तुला सांगितलें. पण तें तुला कळलें नाहीं. यास्तव आतां तरी बैलाला विकून कुटुंबपोषण कर. याला विकलेंस म्हणजे तुला दुसरा बैल मिळेल. त्यालाही विकलेंस म्हणजे तिसरा मिळेल, आणि अशाच क्रमानें तुझ्याजवळचा बैल केव्हांही नाहींसा होणार नाहीं.' हितकर्त्याचे सूचनेवरून त्या मूढ ग्रामस्थानें दान्ताला विकलें. तेव्हां त्याला दुसरा बैल मिळाला. त्यालाही विकल्यावर तिसरा मिळाला. याप्रमाणें वारंवार मिळत गेलेल्या बैलांना विकून तो सतत सुखानें राहिला. तात्पर्य, प्रत्येक पुरुषाच्या धैर्याप्रमाणें दैव फल देत असतें. यास्तव सर्वांनी धैर्यशाली व्हावें. सत्त्वहीन पुरुषास लक्ष्मी वरीत नाहीं.† प्रभो, आतां आणखी एका धूर्त मिथ्या-मंत्र्याची कथा ऐका.

## ४. मिथ्या मंत्र्याची कथा.

दक्षिण देशांतील एका नगरांत पृथ्वीपति या नांवाचा एक राजा होता. त्याच्या राष्ट्रांत दुसऱ्यांना ठकवून निर्वाह करणारा एक धूर्त रहात असे. त्याची इच्छा उत्तरोत्तर वाढत गेल्यामुळें सदा असंतुष्ट अस-

† एवं फलति सर्वस्य विधिः सत्त्वानुसारतः ।
तत्सुसत्त्वो भवेत्सत्त्वहीनं न वृणुते श्रियः ॥

लेल्या त्यानें एकदां असा विचार केला कीं, ज्याच्या योगानें केवळ आहार मात्र मिळतो, तसल्या या माझ्या धूर्तत्वाचा काय उपयोग! ज्याच्या योगानें मोठी संपत्ति मिळेल असा धूर्तपणा मी कां करूं नये? असा संकेत करून त्यानें अतिउत्तम वैश्याचा वेष घेतला, आणि राजगृहाच्या द्वारांत जाऊन प्रतीहाराची भेट घेतली. त्याच्या द्वारा राजापाशीं जाऊन त्यानें मोठी भेट ठेविली, आणि 'प्रभो, मला एकान्तांत कांहीं विज्ञप्ति करावयाची आहे,' असें राजाला म्हटलें. त्याच्या वेषाकडे पाहूनच भ्रांत झालेल्या व मोठ्या भेटीनें प्रसन्न झालेल्या राजानें लागलीच एकान्ताची व्यवस्था करविली. नंतर तो धूर्त राजाची प्रार्थना करून म्हणाला, 'प्रभो, प्रत्यहीं एक क्षणभर आपण सर्वांसमक्ष सभेमध्येंच माझ्या-पाशीं गुप्त कथालाप करावा. तेवढ्या अनुग्रहाकरितां मी आपल्याला प्रति-दिवशीं पांचशें दीनारांची भेट देत जाईन. मला आपल्यापासून कांहीं परत मिळविण्याची इच्छा नाहीं.' तें ऐकून राजा मनांत म्हणाला,— 'काय हरकत आहे? याच्याशीं एक क्षणभर एकान्तांत बोलल्यानें अशी कोणती हानि होणार आहे? उलट माझ्यापासून कांहीं न घेतां हा मलाच रोज पांचशें दीनार देणार आहे. असल्या मोठ्या व्यापाऱ्याशीं कथालाप करण्यांत लज्जा कसली? त्यांत वस्तुतः भूषणच आहे.' असा बराच विचार करून राजानें त्याचें म्हणणें मान्य केलें.

दुसऱ्या दिवसापासून तो धूर्त प्रत्यहीं पांचशें दीनार राजापुढें ठेवून त्याच्याशीं कांहीं वेळ कानगोष्टी करूं लागला. त्यामुळें, लोक त्यालाच महामंत्र्याचें पद मिळालें आहे, असें समजूं लागले. एके दिवशीं तो धूर्त सभेंतील एका मोठ्या अधिकारी राजसेवकाच्या तोंडाकडे वारं-वार साभिप्राय पाहून राजाशीं कांहीं बोलला, आणि सभेंतून बाहेर पडला. तेव्हां तो अधिकारीही मागोमाग त्याच्याजवळ गेला, व आपल्या तोंडाकडे पहाण्याचें कारण विचारूं लागला. तेव्हां तो ठग हळूच त्याला असें खोटेंच म्हणाला,—'यानें माझा सगळा देश लुटला' असें म्हणून राजा तुजवर अतिशय रागावला आहे, म्हणून मीं तुझ्या तोंडाकडे वारंवार पाहिलें. पण तूं भिऊं नकोस, मी त्याला शांत करीन.'

याप्रमाणें त्या मिथ्यामंत्र्यानें त्याला सांगितलें असतां, तो अधिकारी भयभीत होऊन आपल्या घरीं गेला. त्यानें त्याच रात्रीं त्या धूर्ताकडे

जाऊन त्याला सहस्र सुवर्णमुद्रा दिल्या, व आपल्यावर दया करण्या-विषयीं प्रार्थना केली. दुसऱ्या दिवशीं राजाजवळ पुनः तशाच कानगोष्टी करून, तो शठ बाहेर पडतांच जवळ आलेल्या त्या राजसेवकास म्हणाला,–' युक्तियुक्त वाक्यांनीं मीं राजाला प्रसन्न केलें आहे, आतां तो तुजवर कधींही रागावणार नाहीं. आजपासून तूं धीट होऊन रहा, निर्भयपणें कार्यें कर, मी सर्व छिद्रांमध्यें तुझें रक्षण करीन.' असें सांगून व त्याला युक्तीनें आपलासा करून घेऊन घरीं पाठविलें. त्या दिवसापासून तो लांच-खाऊ अधिकारीही त्याची सेवा करूं लागला.

याच क्रमानें त्या बुद्धिमानानें सर्व राजसेवक, मांडलिक राजे, राज-पुत्र, इतर ( सामान्य ) सेवक, पौरजनांतील गरजू लोक, इत्यादि सर्वां-पासून अनेक युक्तींनीं द्रव्य मिळविलें. राजाशीं नुसत्या कानगोष्टी कर-णाऱ्या त्याच्यापाशीं पांच कोटी सुवर्णमुद्रा झाल्या, तेव्हां एकदां तो धूर्त एकांतांत राजाला म्हणाला,–' प्रभो, आपल्याला प्रत्यहीं पांचशें दीनारांची भेट देऊनही आपल्याच प्रसादानें मला पांच कोटी सुवर्ण मिळालें आहे. यास्तव कृपा करून तेंही सर्व आपण घ्या. कारण त्याचा मालक मी कोण ?' असें राजाला उघड उघड सांगून त्यानें तें सुवर्णही त्याला दाखविलें. राजानें मोठ्या संकटानें त्यांतील अर्धें धन घेतलें, आणि अतिशय संतुष्ट होऊन त्याला महामंत्र्याच्या पदावर स्थापिलें. त्यामुळें तो धूर्त विपुल धन मिळवून दान व भोग यांच्या योगानें मोठ्या मान्यतेस चढला. त्यानें राजाचाही मोठा मान ठेविला. तात्पर्य, हे देव ! असला प्राज्ञ पुरुष फार मोठें पाप न करितां, असंख्य धन मिळवितो व विहीर खणणाऱ्याप्रमाणें फळ मिळालें म्हणजे दोष धुवून टाकतो. असो; असें सांगून गोमुख राजपुत्रास पुनः म्हणाला,–आतां एकच कथा ऐका.

## ५. हेमप्रभा-राजकन्येची कथा.

रत्नाकर नांवाच्या नगरांत, मत्त शत्रुरूपी गजेंद्रांचीं गंडस्थळें फोड-णारा बुद्धिप्रभ या नांवाचा राजा होता. त्याच्या रत्नरेखानामक राणीच्या उदरीं, त्याला हेमप्रभा नांवाची लोकैकसुंदरी कन्या झाली. ती विद्याधरी शापामुळें च्युत होऊन राजाच्या येथें जन्मास आली होती. एकदां ती झोपाळ्याशीं खेळूं लागली; झोपाळ्याशीं अशी खेळूं नकोस, म्हणून तिच्या वाडिलांनीं तिला सांगितलें. पण ती कांहीं केल्या ऐकेना. म्हणून राजाला

राग आला व त्यानें तिला एक चापट मारली. तेवढ्यावरून आपला अपमान झाला आहे, असें समजून ती राजपुत्री वनास जाण्याच्या इच्छेनें, विहाराचा बाहणा करून उपवनांत गेली. नंतर सर्व भृत्य मद्यपानानें मत्त झाले असें पाहून ती राजकन्या झाडींत शिरली, व त्यांच्या दृष्टि-आड झाली. मागून कोणी आल्यास त्यालाही लवकर सांपडूं नये, म्हणून ती मोठ्या वेगानें फार दूर गेली. पुष्कळ अंतरावर व गहन वनांत गेल्यावर तिनें तेथें एक पर्णकुटी बांधिली, व शंकराच्या आराधनेंत निमग्न होऊन ती एकटीच तेथें कंद-मूलें-फलांचा आहार करीत राहिली.

इकडे तिच्या पित्यानेंही ती कोठें गेली आहे, असें जाणून पुष्कळ शोध केला; पण ती त्याला सांपडली नाहीं. त्यामुळें राजाला फार दुःख झालें. कांहीं दिवसांनीं, तें असह्य दुःखही किंचित् न्यून झालें असतां, तो बुद्धि-प्रभ आपल्या चित्ताची करमणूक करण्याकरितां मृगयेस निघाला. वनांत पशूंच्या मागून भ्रमण करितां करितां जेथें त्याची हेमप्रभा कन्या तप करीत होती, तेथेंच दैवयोगानें आला. त्याला ती पर्णशाला दिसली, म्हणून तो निःशंकपणें तींत शिरला. तों तपाच्या योगानें कृश झालेली हेमप्रभा त्याच्या दृष्टीस पडली. त्याला पहातांच तिनेंही उठून अकस्मात् त्याचे दोन्ही पाय धरले. तेव्हां आलिंगन देऊन ज्याच्या नेत्रांत अश्रु आले आहेत, अशा राजानें तिला आपल्या मांडीवर बसविलें. एकमेकांस फार दिवसांनीं पाहून तीं दोघें इतकीं रडलीं, कीं त्या वनांतील पशूंच्याही नेत्रांतून पाणी आलें. नंतर हळू हळू दुःख आवरून, राजा कन्येला म्हणाला,-' बाळे, राज्यश्रीचा त्याग करून तूं हें काय आरंभिलें आहेस ? तर आतां हा वनवास सोड व आईपाशीं चल.'

पण असें बोलणाऱ्या त्या आपल्या पित्याला हेमप्रभा म्हणाली,-'बाबा, दैवानेंच मला या कामांत योजिलें आहे. नाहीं तर माझी काय शक्ति होती ?* मी आतां घरीं भोग भोगावयास येणार नाहीं, व हें तपःसुख सोडणार नाहीं.' असें बोलून ती आपल्या निश्चयापासून ढळली नाहीं. तेंव्हां राजानें त्या वनांतच तिजकरितां मंदिर बांधविलें, व राजधानीस गेल्यानंतर तिच्या अतिथींच्या पूजेसाठीं प्रत्यहीं पक्वान्नें व धन तो पाठवूं

* दैवेनैव नियुक्तास्मि शक्तिस्तात ममात्र का ॥

लागला. त्या धनानें व अन्नानें तेथें येणाऱ्या अतिथींस तृप्त करीत, हेम-प्रभा स्वतः फळें व मूळें खातच आनंदानें राहिली.

एकदां त्या राजपुत्रीच्या आश्रमास एक कौमारब्रह्मचारिणी संन्याशीण फिरत फिरत आली. हेमप्रभेनें तिचें उचित आतिथ्य केलें, व आपली कथा सांगत असतांनाच त्या बालब्रह्मचारिणीला संन्यास घेण्याचें कारण विचारिलें. तेव्हां ती म्हणाली,–' मी एकदां कन्या असतांना आपल्या बापाचे पाय चेपीत होतें. पण बराच वेळ ते चेपल्यावर माझे दोन्ही हात मोडून आले व डोळे झोंपेनें मिटूं लागले. तेव्हां मी पेंगत आहें व पाय चेपीत नाहीं, असें पाहून माझ्या पित्यानें ' कारटे, निजतेस की काय ? ' असें म्हणून मला लाथ मारली. त्या रागानें मीं त्याच्या घरांतून निघून संन्यास घेतला. '

हा तिचा वृत्तान्त ऐकून समानशीलानें सुप्रसन्न झालेल्या हेमप्रभेनें तिला आपली वनवाससखी केली. एके दिवशीं प्रातःकाळीं राजकन्या त्या संन्याशीण-सखीला म्हणाली,–' गडे, मी आज स्वप्नांत एका विपुल नदीचें उल्लंघन करून गेलें. त्यानंतर शुभ्र गजावर आरूढ झालें. नंतर एका पर्वतावर चढलें व त्यावरील आश्रमांत अंबिकापतीला पाहिलें. त्याच्या अग्रभागीं जाऊन मी वीणा वाजवीत गाऊं लागलें. कांहीं वेळानें तेथें एक दिव्य आकाराचा पुरुष आलेला मला दिसला. त्याला पहातांच तुझ्यासहवर्तमान मी आकाशांत उडालें. पण इतकें पहात आहें, तों मीं जागी झालें, व रात्र संपली.'

हेमप्रभेचें हें स्वप्न ऐकतांच ती सखी म्हणाली,–' गडे, तूं शापापासून मुक्त झाली आहेस. कल्याणि, खचित तूं कोणी दिव्य स्त्री आहेस. तुझा शापनिवृत्त होण्याचा काल अगदीं समीप आला आहे, असें हें स्वप्न सांगतें.' तापसी सखीचें हें भाषण ऐकून राजकन्या अतिशय प्रसन्न झाली. त्यानंतर जगास प्रकाशित करणारा सूर्य उगवून बराच वर आला असतां तेथें घोड्यावर बसून कोणी एक राजपुत्र आला. तापसीचा वेष धारण करणाऱ्या हेमप्रभेला पाहून त्याच्या मनांत प्रीति उत्पन्न झाली, आणि घोड्यावरून उतरून तो तिच्या जवळ गेला, व त्यानें तिला वंदन केलें. तिनेंही आतिथ्य करून त्यास आसनावर बसविलें आणि सप्रेम मनानें, ' तूं कोण ' असें विचारलें. तेव्हां राजपुत्र

म्हणाला, ' महाभागे, ज्याच्या नांवाचा उच्चार करणेंही अतिशुभ आहे असा प्रतापसेन म्हणून राजा आहे; तो पुत्रासाठीं शंकराची आराधना करून उग्र तप करीत असतां, प्रसादशील देवानें प्रकट होऊन त्याला म्हटलें,–' तुला विद्याधरांचा अवतार, असा एक पुत्र होईल. पण तो शापाचा अंत झाला, कीं आपल्या लोकास जाईल. तुझा वंश व राज्य यांचें धारण करणारा असा तुला दुसराच एक पुत्र होईल. '

शंभूनें अशी आज्ञा केली असतां राजा आनंदित होऊन उठला. त्यानें सकाळीं पारणा करून व्रत संपविलें. तो आपल्या घरीं आला, कांहीं दिवसांनीं त्याला लक्ष्मीसेन नांवाचा पुत्र झाला. त्याच्या पाठीवर शूरसेन म्हणून दुसरा पुत्र झाला. हे वरानने, त्यांतील लक्ष्मीसेन मी आहें, असें तूं जाण. आज मी मृगया करण्याकरितां वनांत आलों. पण माझा घोडा अकस्मात् भडकला व त्यानें मला येथें आणलें.

त्या राजपुत्रानें असें सांगितलें. नंतर त्याच्याच आग्रहावरून, हेमप्रभेनेंही आपला वृत्तान्त त्याला कळविला. त्याबरोबर तिला पूर्वजन्माचें स्मरण झालें. त्यामुळें फारच हृष्ट झालेली ती म्हणाली, ' राजपुत्रा, तुला पहातांच मला आपल्या विद्यांसह पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे. या माझ्या सखीसह, शापामुळें च्युत झालेली मी विद्याधरी आहें. तूं ही आपल्या सचिवासह शापामुळेंच च्युत झालेला विद्याधर आहेस. तूं माझा भर्ता व तुझा सचिव या माझ्या सखीचा भर्ता आहे. सखीसह माझा शाप आतां क्षीण झाला आहे. विद्याधरांच्या लोकांमध्यें आम्हां सर्वांचा पुनः समागम होईल.'

इतकें सांगून दिव्य रूपास प्राप्त झालेली ती हेमप्रभा सखीसह आकाशांतून स्वलोकास गेली. तेव्हां लक्ष्मीसेन आश्चर्यचकित होऊन जों एक क्षणभर तेथेंच बसत आहे, तों त्याचा सचिवहि घोड्याचे पाय पहात त्याच्या मागोमाग तेथें आला. राजपुत्र त्या आपल्या मित्राला घडलेला वृत्तान्त जों सांगत आहे, तों आपल्या कन्येला पहाण्याविषयीं अतिशय उत्सुक झालेला राजा बुद्धिप्रभही तेथें आला. पण आपली प्रिय कन्या तेथें नसून हा कोणी राजपुत्र मात्र आहे, असें पाहून त्यानें त्याला तिची वार्ता विचारिली. तेव्हां लक्ष्मीसेनानें जसें प्रत्यक्ष पाहिलें होतें तसें सर्व त्याला सांगितलें. तें ऐकून राजा बुद्धिप्रभ खिन्न झाला असतां मंत्र्यासह लक्ष्मीसेनाला आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें; व शापाचा क्षय

झाल्याकारणानें तोही आकाशमार्गानें स्वर्लोकास गेला. तेथें हेमप्रभा भार्येची व त्याची गांठ पडली. तेव्हां तिला घेऊन तो त्याच पूर्वस्थानीं आला. त्यानें दुःखानें व्याकुल झालेल्या बुद्धिप्रभाचें सांत्वन केलें; व त्याला आपल्या राजधानीस परत पाठविलें. नंतर भार्या व मित्र यांसह-वर्तमान तो आपल्या मर्त्य पित्याकडे गेला. त्यालाही त्यानें आपला वृत्तान्त सांगितला. तेव्हां त्याच्या प्रतापसेन पित्यानें त्या ज्येष्ठ पुत्राला आपलें वंशपरंपरेनें प्राप्त झालेलें राज्य अर्पण केलें. पण त्या उदार लक्ष्मीसेनानें तें शूरसेनाला दिलें, आणि तो स्वतः भार्या व मित्र यांसह आपल्या विद्याधर पुरास गेला. व हेमप्रभेसह तो दीर्घकाल ऐश्वर्यसुख भोगीत राहिला.

### ६. नरवाहनदत्त व शक्तियशा यांचा विवाह.

याप्रमाणें गोमुखानें सांगितलेल्या कथा ऐकत, नरवाहनदत्त देव अगदीं समीप आलेल्या शक्तियशेच्या नूतन विवाहाविषयीं अतिशय उत्सुक असतांनाही, ती रात्र क्षणाप्रमाणें घालविता झाला. नंतर विवाहावधीचे दिवस याप्रमाणें घालवून साक्षात् तो शुभ दिवस उगवला. सूर्या-प्रमाणें ज्याची कांति आहे, असे आकाशांतून उतरणारें विद्याधरांचें सैन्य पाहिलें. त्यांच्यामध्यें स्फटिकयश विद्याधरेंद्र होता. तो आपल्या कन्येला घेऊन, आला होता. तेव्हां त्याला पाहून हाच आपला श्वशुर आहे, असें मनांत समजून नरवाहनदत्त, त्याच्या सन्मुख गेला. तेव्हां हाच खरोखर आकाशचरांचा अधीश होणार आहे असें जाणून स्फटिक-यशानें आपल्या सिद्धींच्या प्रभावानें एका क्षणांत सर्व उचित दिव्य-विवाह-सामग्री सज्ज केली. नंतर रत्नांच्या ओघानें भरून सोडलेल्या वत्सेशपुत्राला, संकल्पानें पूर्वींच दिलेली, आपली शक्तियशा कन्या यथाशास्त्र दिली. त्या वेळीं—पद्म सूर्यप्रभेला प्राप्त होऊन जसें शोभतें—त्या-प्रमाणें नरवाहनदत्त शोभूं लागला. विवाहोत्सव संपल्यावर स्फटिकयश स्वधामास गेला व वत्सराजाचा पुत्र शक्तियशेच्या मुखकमलावर ज्याचे नेत्ररूपी भ्रमर आसक्त झाले आहेत असा होऊन राहिला.



# ११. वेलालंबक.

## तरंग १ ला.

### १. रुचिरदेव व पोतक यांची कथा.

याप्रमाणें नुकतीच प्राप्त झालेली शक्तियशा, रत्नप्रभादि दुसऱ्या भार्या व मुख्य देवी मदनमञ्चुका यांसह विहार करीत नरवाहनदत्त युवराज कौशांबींत पित्याच्या आश्रयानें रहात होता. एकदां तो उद्यानांत फिरत असतां त्याच्यापार्शी देशान्तराहून आलेले दोन भ्राते राजपुत्र आले. युवराजानें स्वागतानें त्यांचें आतिथ्य केलें. त्या दोघां भावांनींही त्याला प्रणाम केला; व त्यांतील एक म्हणाला, 'वैशाख नगरांतील राजाचे आम्ही दोघे निरनिराळ्या आयांपासून झालेले पुत्र आहों. माझें नांव रुचिरदेव व याचें नांव पोतक. माझी एक वेगवाळी हत्तीण आहे व याचे दोन घोडे आहेत. त्यांकरितां आम्हां उभयतांमध्यें मोठा वाद लागला आहे. मी माझी हत्तीण अधिक वेगवाळी आहे असें म्हणतों; व हा 'माझे घोडे अधिक चपळ आहेत,' असें म्हणतो. या वादांत मी जर हरलों तर मी ती हत्तीणच पणाला लावतों, व माझें म्हणणें खरें होऊन याचा जर पराभव झाला, तर त्याचे दोन घोडे हाच पण त्यानें लावावा, असें ठरलें आहे. पण त्यांच्या वेगांतील अंतर जाणण्यास तुजवांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं. यास्तव हे प्रभो, आमच्या घरीं येऊन त्यांची परीक्षा कर. आम्हांवर कृपा कर. तूं सर्वांचे मनोरथ पूर्ण करणारा कल्पवृक्षच आहेस. तुझी प्रार्थना करण्यासाठींच आम्ही आलों आहों.

रुचिरदेवानें याप्रमाणें प्रार्थना केली असतां घोडे व हत्तीण यांना पहाण्याच्या इच्छेनें व त्यांच्या अतिशय आग्रहामुळें वत्सेशपुत्रानें 'बरें आहे' असें म्हटलें. नंतर त्यानेंच आणलेल्या व वायूसारख्या वेगवान् घोड्यांनीं युक्त असलेल्या रथांत बसून तो त्या दोघांसहवर्तन, तसाच तेथून वैशाखपुरास निघाला. थोड्याच अवकाशांत तो इष्टस्थलीं पोंचला. तो जेव्हां त्या भव्य नगरींत जाऊं लागला, तेव्हां 'ज्याला रति सांपडली

नाहीं, असा हा तिला हुडकणारा काम आहे, की नुकाच उग
निष्कलंक चंद्र आहे, की स्वतः सूर्यच आहे, की विधात्यानें तरु
हृदयांत अकस्मात् समूल उपटण्याकरितां हा पुरुषाकार बाण नि
आहे, की हा आहे तरी कोण ?' असें म्हणून पौरस्त्रिया उन्मत्त
व आकुल पक्ष्मयुक्त नेत्रांनीं त्याच्याकडे पाहूं लागल्या. त्या
नगरांत शिरल्यावर युवराजानें तेथें पूर्वींच्या लोकांनीं ज्याची प्रतिष्ठा
आहे, असें कामदेवाचें केवळ शृंगारमय मंदिर पाहिलें. रति व प्रीति
णाऱ्या त्या गृहांत प्रवेश करून, व क्षणभर तेथें विश्रांति घेऊन त्यानें म
तील श्रम थोडेसे कमी केले. नंतर त्या मंदिराजवळच असलेल्या रु
देवाच्या मंदिरांत, तो गेला. तेथें नानाप्रकारच्या सत्कारांनीं रुचिरदे
त्याचें उत्तम आतिथ्य केलें. इतक्यांत अद्भुत आकारानें युक्त असं
त्याच्या अविवाहित भगिनीस राजपुत्रानें पाहिलें. तिला पहातांच प्रवा
स्वजनविरह यांचें त्याला भानही राहिलें नाहीं. तिनेंही जणुं काय प्रे
घातलेल्या प्रफुल्लित नीलकमलांच्या मालेसारख्याच आपल्या दृष्टीनें त्य
स्वयं वरलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं अश्वविद्येचें रहस्य जाणणाऱ्या त्या
राजासमोर पोतकानें आपले वायूसारखे वेगवान् व उत्कृष्ट दोन घोडे आ
तेव्हां नरवाहनदत्तानें स्वतः रुचिरदेवाच्या हत्तिणीवर बसून व ति
स्वाभाविक वेगांत आपलें बल व वेग यांचा निवेश करून त्या उ
घोड्यांसही पराभूत करविलें. याप्रमाणें रुचिरदेवानें अश्वांची जोडी जिंक
नंतर तो युवराज पुनः जों आंत जात आहे, तों त्याच्या पित्याक
आलेला दूत त्याच्यापाशीं आला, व त्याच्या पायांवर मस्तक ठे
म्हणाला, "तूं येथें आला आहेस असें परिवाराच्या तोंडून ऐकून तु
पित्यानें मला मुद्दाम पाठविलें आहे, त्याची तुला अशी आज्ञा झाली
कीं, 'उद्यानांतून आम्हांला न सांगतां तूं इतका दूर कसा गेलास ? त्या
आम्हांला मोठी चिंता लागली आहे. यास्तव सर्व आसक्ति सो
सत्वर परत ये.' दूतानें सांगितलेला हा पित्याचा निरोप ऐकून नरवाह
दत्ताचें चित्त अतिशय चंचल झालें. काय करावें, हें त्याला सुचे
इतक्यांत एक अतिहृष्ट झालेला सार्थवाह आला, व नमस्कार क
युवराजास म्हणाला, 'हे वीरा, तुझा जयजयकार असो. हे पुष्पधनु
विरहित कामदेवा, तुझा विजय असो. हे प्रभो, हे भावि विद्याधरार्च

चक्रवर्तिन्, तूं विजयी हो. तूं बालक होतास तेव्हां मनोहारी दिसलास. जस-जसा वाढूं लागलास तस-तसा शत्रूंना भय देऊं लागलास. आतां हे देव, थोड्याच अवकाशांत आकाशचर, क्रमानें अंतरिक्षाचें आक्रमण करणाऱ्या व बलाढ्यांस जिंकणाऱ्या तुज अच्युतगुणवानास पहातील.'

## २. चंद्रसार वैश्याची कथा.

याप्रमाणें तो महावणिक् स्तुति करूं लागला असतां युवराजानें त्याचा सत्कार केला, व त्याला त्याच्या वृत्तान्ताविषयीं प्रश्न केला. तेव्हां तो पुन: म्हणाला, 'देव, पृथ्वीच्या मस्तकावरील जणुं काय मालाच अशी लम्या या नांवाची एक नगरी आहे. तिच्यामध्यें कुसुमसार या नांवाचा एक मोठा श्रीमान् वैश्य होता. तो जणुं काय धर्माचें मुख्य वसतिस्थानच असून हे वत्सेशनंदना! शंकराच्या आराधनेनें त्याला झालेला मी एकटाच त्याचा पुत्र आहें. माझें नांव चंद्रसार. मी एकदां मित्रांसह देवयात्रा पहावयास गेलों. तेव्हां दुसरे श्रीमान् लोक तेथें अनेक याचकांना धन देत आहेत, असें मला आढळलें. तें पाहून विपुल दान करण्याच्या श्रद्धेनें मलाही अगोदर धन मिळविण्याची इच्छा झाली. कारण पित्यानें मिळविलेल्या विपुल संपत्तीनेंही माझ्या मनाचें समाधान होत नसे. म्हणून मी जलमार्गानें दुसऱ्या द्वीपास जाण्याकरितां, नाना रत्नांनीं भरलेल्या नौकेवर आरूढ झालों. दैवाप्रमाणेंच अनुकूल वायूनेंही ज्याला प्रेरणा केली आहे, असें तें माझें जलयान थोडक्याच दिवसांनीं त्या द्वीपास पोंचलें. मी तेथें उतरून रत्नांचा व्यापार चालविला; पण मजजवळ विपुल आणि अमूल्य रत्नें आहेत, असें समजतांच तेथल्या राजानें धनलोभानें मला बांधून कारागारांत टाकलें. त्या नरकतुल्य गृहामध्यें क्षुधा व तृषा यांनीं व्याकुल झालेल्या व आक्रोश करणाऱ्या प्रेतांसारख्या पाप्यांच्या सहवासांत मी राहिलों. पण इतक्यांत आमच्या मोठ्या कुलाला जाणणारा व तेथें राहणारा एक मोठा महीधरसंज्ञक वैश्य माझ्याकरितां राजाची प्रार्थना करून म्हणाला–' देव, लिम्यानगरींत रहाणाऱ्या एका मोठ्या सावकाराचा हा पुत्र आहे. यास्तव या थोर पुरुषाला बांधून ठेवणें अयशस्कर आहे.

या व अशाच दुसऱ्याही पुष्कळ प्रकारें त्यानें बोध केल्यावर राजानें मला कैदेंतून सोडवून आपल्यापाशीं नेऊन आदरपूर्वक मोठा सन्मान

केला. त्यानंतर राजाच्या प्रसादानें व त्या मित्राच्या आश्रयानें मी तेथें मोठा व्यापार करीत सुखानें राहिलों. एकदां तेथें मधूद्यान यात्रेमध्यें मी शिखर नामक वैश्याची श्रेष्ठ कन्या पाहिली. त्या कंदर्पदर्पसागराच्या लहरीनें माझें चित्त हरण केलें, म्हणून मी तिच्या पित्यापाशीं जाऊन तिची याचना करूं लागलों. पण तो क्षणभर मनांतल्या मनांत विचार करून मला म्हणाला, ' ही साक्षात् मला देतां येण्यासारखी नाहीं. त्याचें कांहीं कारण आहे. यास्तव मी हिला सिंहलद्वीपास हिच्या मातामहाकडे पाठवितों. तूं तेथें जा, व त्याच्यापाशीं याचना करून हिच्याशीं विवाह कर. तुझा मनोरथ पूर्ण होईल, असा निरोपही मी त्यांस पाठवितों.' असें सांगून शिखरानें मला घरीं रवाना केलें. दुसऱ्या दिवशीं त्यानें सर्व परिवारासह आपल्या कन्येला जलयानांत बसवून समुद्र–मार्गानें सिंहलद्वीपास पाठविलें. नंतर उत्सुक झालेला मी तेथें जावयास निघण्याची जों इच्छा करीत आहें, तों विजेच्या पातासारखी अशी उग्र वार्ता गांवभर पसरली, कीं शिखर वैश्याची कन्या ज्या नौकेंतून गेली होती, ती नौका समुद्रांत बुडाली व तिच्यांतील एकही प्राणी जिवंत हातीं लागला नाहीं. या वार्तारूपी वावटळीनें माझें सर्व धैर्य नाहींसें करून सोडलें. मी आकुल झालों, व तत्काळ निराधार शोकसागरांत पडलों. वृद्धांनीं माझें पुष्कळ सांत्वन केलें, मीही चित्ताला आशा लावून स्थिर केलें, व खरा प्रकार काय आहे त्याचा निश्चय करण्याकरितां सिंहलद्वीपास जाण्याचा संकेत केला. मी राजाला प्रिय व नानाप्रकारच्या द्रव्यांनीं संपन्न होतों, तरी समुद्रांत नौका घालून, तिच्यावरून त्या इष्ट स्थानीं जावयास निघालों. पण मी जात असतांना अकस्मात् महाशब्दयुक्त धारारूपी बाणपंक्ति सोडणारा घोर मेघतस्कर उठला. बलाढ्य दैवाप्रमाणें बलाढ्य व प्रतिकूल वायूनें माझ्या वाहनाला वारंवार हालवून, वर उचलून व खडकावर आदळून फोडून सोडलें. दुर्दैवामुळें माझें धन व परिजन सागरांत बुडालें. मीही अगाध जलांत पडलों; पण इतक्यांत मला एक मोठें काष्ठ सांपडलें. लगलाच विधात्यानें पसरलेला जणुं काय हातच, अशा त्या काष्ठाच्या साहाय्यानें व अनुकूलतेनें मी समुद्रतीरावर येऊन पोंचलों. नंतर त्या तटावर आरूढ होऊन दैवाची निंदा करीत मी दुःखार्त झालों. पण इतक्यांत समुद्राच्या

कांठीं पडून राहिलेला एक लहानसा सोन्याचा तुकडा मला सांपडला. तो घेऊन जवळच्याच एका गावांत विकला आणि अन्नसामग्री व दोन वस्त्रें घेतलीं. नंतर भोजन केलें, नव्या वस्त्रांनीं शरीर आच्छादित केलें, पण प्रियेचा विरह असह्य झाल्यामुळें मला दिशांचेंही भान नाहींसें झालें. नंतर तशाच अवस्थेंत अरण्यांत फिरत असतां वाळूच्या शिवलिंगांस धारण करणारी एक भूमि मीं पाहिली तिच्यामध्यें एक मुनिकन्या असून तिच्या एका बाजूस बसलेली व शिवलिंगार्चनामध्यें तल्लीन झालेली अशी आणखी एक कन्या माझ्या दृष्टीस पडली. तिनें वनांतील वेष घेतला होता, तरी ती फार सुंदर दिसत असे. तिला पहातांच–मला माझ्या प्रियेची आठवण झाली. व ही तीच तर नसेल, पण तसें कसें होणार ? माझें एवढें मोठें भाग्य कोठें आहे ? ' असें मनांत म्हणून मी जों विचार करीत आहें, तों वारंवार स्फुरण पावणारा माझा उजवा नेत्र ' तीच ही ' असें मोठ्या आल्हादानें सांगूं लागला. तेव्हां मी पुढें सरलों, आणि म्हणालों,– हे सुंदरि, तूं कोण आहेस ? प्रासादांत रहाण्यास योग्य असतांना तूं येथें अरण्यांत कां राहिली आहेस ? ' पण तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां मी मुनिशापाच्या भयानें वेली व झुडपें यांच्या आड जाऊन उभा राहिलों, अतृप्त नेत्रांनीं तिच्याकडे पाहूं लागलों. इतक्यांत तिची पूजा संपली, व ती सुंदरी स्नेहानें मजकडे परतून पहात, आणि कांहीं विचार करीत, हळू हळू तेथून निघून गेली.

ती माझ्या दृष्टि–आड होतांच सर्व दिशा अंधकारमय झाल्या आहेत, असें मला वाटलें. रात्रीं चक्रवाकाची जशी अवस्था होते तशीच माझी झाली; पण इतक्यांत अकस्मात् मतंगमुनीची कन्या तेथें आली, ती बालपणापासून ब्रह्मचारिणी व तेजानें सूर्यप्रभेसारखी होती. यमुना असें तिचें नांव होतें. तपाच्या योगानें तिचें शरीर क्षीण झालें होतें. तिला दिव्य दृष्टि प्राप्त झाली होती. जिचें दर्शनही अत्यंत कल्याणकर आहे, अशा तिला मी साक्षात् संतोषाप्रमाणें पाहिलें. असो; मजजवळ येऊन ती म्हणाली, ' चंद्रसारा, धैर्य धरून मी काय सांगतें तें ऐक. शिखर या नांवाचा जो हा मोठा वैश्य द्वीपान्तरीं आहे, त्याला रूपवती कन्या झाली असतां त्याच्या जिनरक्षितसंज्ञक अशा संन्याशी मित्रानें म्हटलें, ' तूं स्वतः

या कन्येचें दान करूं नकोस; कारण हिची पालन करणारी दुसरीच आहे. तूं स्वतः कन्यादान करशील तर तुला मोठा लागेल.' असें बोलून भिक्षूनें त्याचें हित केलें; त्याच्या सांगण्या शिखरानेंही, तूं तिची जेव्हां मागणी केलीस, तेव्हां तिला माताम येथें धाडण्याचा निश्चय केला. दुसऱ्याच दिवशीं समुद्रमार्गानें तिची रवानगी केली; पण सिंहलद्वीपास आजोळीं जात असतांना नौका फुटून ती समुद्रांत पडली. तथापि आयुर्बलानें व दैवानें सहाय केल्यामुळे, महातरंगाच्या योगानें भयंकर झालेल्या समुद्रानेंच तीरावर आणून टाकलें. त्याच वेळीं माझा पिता भगवान् मतंग शिष्यांसह समुद्रावर स्नान करावयास गेला होता; त्यानें तेथें मृत होऊन पडलेल्या हिला पाहिलें. नंतर त्या दयालु मुनीनें तिला स करून आपल्या आश्रमास आणलें. परत आल्यावर माझे ते पूज्य ब मला म्हणाले,–' यमुने, तूं हिचें उत्तम प्रकारें पालन कर.' ती वे तटावर सांपडल्यामुळें, त्या महामुनीनें वेला असेंच तिचें नांव ठेविलें. बाला आपल्या गुणांनीं सर्व मुनिजनांस प्रिय झाली. तिच्या स्नेह माझें चित्त उद्विग्न होतें; मी ब्रह्मचर्य स्वीकारून संसाराचा जरी वस्तु निरास केला होता, तरी हिच्या सहवासानें, अपत्यांवरील स्नेह व कृ यांनीं युक्त व त्यामुळेंच असह्य झालेला तो ( संसार ) आज मला पी देत आहे. चंद्रसारा, नवयौवनानें अतिशय शोभणाऱ्या हिचें विवा मंगल होईतों हिच्याकडे जेव्हां जेव्हां मी पाहतें, तेव्हां तेव्हां माझें म दुःखित होतें. ही तुझी पूर्व जन्मींची भार्या आहे. तूं येथें आला आहे असें ध्यानानें जाणून, बा पुत्रा, मी तुजकडे आलें आहें. यास्तव चल ये, मी अर्पण करीत असलेल्या तिचें तूं पाणिग्रहण कर. तुम्ही दोघा नींही मोठे क्लेश सहन केले आहेत. त्यांचें गोड फल तुम्हांला मिळूंदे."

प्रभो, अभ्रावांचून अकस्मात् झालेल्या वृष्टीसारख्या अशा या उदा वाणीनें मला आनंद देऊन त्या भगवती यमुनेनें मला आपल्या मतं पित्याच्या आश्रमास नेलें. तेथें पोंचतांच तिनें बाबांची प्रार्थना केली. त्याबरोबर त्या श्रेष्ठ मुनीनें मला साक्षात् माझ्या मनोराज्य संपत्तीप्रमाणेंच तिचें दान केलें. नंतर त्या बेलेसह मी तेथें सुखानें राहूं लागलों. एकदां सरोवर–जलांत आम्ही दोघे जलक्रीडा करीत होतों. मी जरी त्या वेळीं

वेलेसह होतों, तरी आसपास न पहातां अवेळीं जल उडवूं लागलों; त्यामुळें स्नान करीत असलेल्या मतंग मुनींच्या अंगावर पाणी पडलें. तेव्हां त्या मुनीला कोप आला, व 'पाप्यांनो, तुम्हां दोघांचा वियोग होईल.' असा त्यांनीं आम्हां उभयतांस शाप दिला. तेव्हां पायांवर मस्तक ठेवून वेलेनें दीनवाणीनें प्रार्थना केली. तेव्हां त्या मुनीनें ध्यान करून मला असा शापान्त सांगितला, कीं—' चंद्रसारा, जो बली हस्तिणीच्या वेगानें उत्तम घोड्यांच्या जोडीस जिंकील, त्या भावि विद्याधरेश्वर चक्रवर्ती नरवाहन-दत्ताला जेव्हां तूं दुरूनच, जाऊन पहाशील, तेव्हां शापाची शांति होऊन या भार्येशीं तुझा समागम होईल.'

असें सांगून व स्नानादि क्रिया करून मतंगमुनि हरीच्या दर्शनाकरितां आकाशमार्गानें श्वेतद्वीपास गेला. पूर्वीं शंकराच्या पादाग्रापासून विद्याधरानें मिळविलेला व बालपणीं मी त्याच्यापासून घेतलेला हा उत्तम रत्नांनीं भर-लेला आम्रवृक्ष आज तुम्हांला देत आहें, असें मला व वेलेला सांगून यमु-नाही श्वेतद्वीपालाच गेली. तेव्हां ज्याला प्रिय भार्या प्राप्त झाली आहे असा मी वनवासास कंटाळलों आणि वियोग होण्याचीही भीति वाटत असल्या-मुळें आपल्या देशास परत यावयास उत्सुक झालों. नंतर समुद्राच्या तीरीं येऊन भार्येसह मी कांठाकांठानेंच जाऊं लागलों. कांहीं वेळानें आम्हांला एका व्यापाऱ्याची नौका आढळली. तिच्यावर पूर्वीं भार्येला बस-वून, मागून मीही चढणार होतों; पण इतक्यांत मुनिशापाचा जणुं काय मित्रच अशा वायूनें त्या नौकेला माझ्यापासून दूर नेलें. नौकेनें ज्याच्या प्रिय भार्येला दूर नेलें आहे, व त्यामुळें ज्याचा आत्मा व्याकुल झाला आहे, अशा माझ्या चेतनेलाही मोहानें, जणुं काय छिद्रच मिळाल्या-मुळें, हरण केलें. इतक्यांत तेथें एक दयाळु तापस आला. मी मूर्च्छित होऊन पडलों आहें असें पाहून, त्यानें मला सावध केलें, व हळूहळू आपल्या आश्रमास नेलें. तेथें पोंचल्यावर माझें सर्व वृत्त विचारून व तें शांतपणें ऐकून, शाप कसा झाला तें कळल्यामुळें त्यालाही थोडेंसें वाईट वाटलें; पण त्यालाही कांहीं अवधि आहे, असें जाणून त्यानें माझें सांत्वन केलें. मला पुष्कळ धैर्य दिलें. त्यानंतर वाहन फुटल्या-मुळें समुद्रांत पडून वांचलेल्या एका उत्तम वैश्याची व माझी गांठ पडली. तेव्हां त्या मित्रासह मी पुनः आपल्या भार्येला शोधीत

फिरूं लागलों. शापक्षय होईल या आशेनें आधार दिल्यामुळें मी दुर्गम देशांचें व दिवसांचेंही उल्लंघन केलें. क्रमानें वैशाखपुरास तो वत्सेश्वराच्या सद्वंशांतील जणुंकाय रत्नच असा तूं येथें आला असें मी ऐकलें. दुरूनच हत्तिणीवर बसून दोघां घोड्यांस जिंक तुला पहातांच माझा शापभार गेला, आणि माझा अंतरात्मा झाला. इतक्यांत त्याच नौकेवरून सज्जन वैश्यांनीं आणलेल्या व रून येत असलेल्या माझ्या प्रिय वेलेला मीं पाहिलें. नंतर दिलेलीं रत्नें जिच्या हातांत आहेत अशा त्या प्राणप्रियेला तुझ्या प्रसादानें शापरूपी महासागराचें उल्लंघन करून, मी जाऊन यास्तव हे वत्सराजपुत्र, मी तुला प्रणाम करावयास आलों आहें. मी आपल्या भार्येसह अतिशय सुखी होऊन स्वदेशास जातों.

असा आपला वृत्तान्त सांगून, कृतार्थ झालेला चंद्रसार वैश्य करून निघून गेला असतां, प्रत्यक्ष पाहिलेल्या माहात्म्यामुळें हृष्ट रुचिरदेव वत्सराजपुत्रापुढें अधिकच नम्र झाला, प्रेमानेंच हरण त्याला, सेवावृत्तिरूप युक्तीचाच आश्रय करून, रुचिरदेवानें बहीण दिली. ती नरवाहनदत्तालाच द्यावी अशी त्याला पूर्वी झाली होती. कारण ती त्याला अगदीं अनुरूप होती. असो, वानें आपली उत्तम हत्तीण व सुंदर दोन घोडे यांसह तत्काल त्याला मोठ्या थाटानें अर्पण केली.

नंतर त्याला विचारून व दोन घोडे, एक हत्तीण व त्या जयेंद्रसेना अशा चार रत्नांना घेऊन, नरवाहनदत्त आपल्या आला. त्या सुंदर नगरींत त्या नूतन भार्येशीं विहार करीत व आनंद देत; आणि मदनमञ्चुकाप्रभृति देवींसह सुख भोगीत तो




भाग दुसरा सम

सिटी स्कूल नागपुर, यांचे मार्फत आम्हांस प्राप्त झाली. ती आम्हीं परमार्थप्रवण, धार्मिक, मुमुक्षु, भक्तजन व प्रेमळ वाचकांचे हितासाठीं छापून प्रसिद्ध केली आहे. सर्व कविता प्रसाद गुणानें ओथंबलेली असून, पदांची रचना नवीन चालींवर असल्यामुळें हीं पदें साधारण लोकांसही प्रिय झाल्यावांचून रहाणार नाहींत. श्रीहरिहरमहाराज हे श्रीअनसूयामाता व श्रीदत्त ह्यांचे भक्त असल्यामुळें त्यांनीं सर्व कविता श्रीअनसूया व श्रीदत्त ह्यांसच उद्देशून त्यांची सेवा म्हणून लिहिली आहे. अभंगांची संख्या ८००० असून, पदें सरासरी २०० आहेत. शेवटीं त्यांचा एक भक्तिज्ञान-पर गद्य लेखही छापला आहे. पृष्ठसंख्या ४०० वर असून, बांधणी कापडी पुठ्याची केली आहे, व किं. फक्त १ रुपया ठेविली आहे.

---

# म्युनिसिपालिटी व कामें.

म्युनिसिपालिटी म्हणजे आरोग्य संरक्षणाची व शहरसुधारणेची मुख्य संस्था होय. अशा संस्थेशीं प्रत्येक मनुष्याचा व प्रत्येक कुटुंबाचा संबंध येतो. तेव्हां म्युनिसिपालिट्या म्हणजे काय, व त्यासंबंधानें लोकनियुक्त सभासदांची कामें कोणतीं, आरोग्यास नुकसान करणाऱ्या कोणत्या गोष्टी व त्या निवारण करण्याचे मार्ग, सरकारचे कायदेकानू आणि लोकांचे कर्तव्य, इत्यादि गोष्टींचें ज्ञान प्रत्येक मनुष्यमात्रास निदान गृहस्थाश्रमी लोकांस जरूर असल्यानें हैद्राबाद संस्थानांतील सिव्हिल इंजिनि[illegible] श्रीयुत माधवराव व्यंकटेश लेले, एल. सी. ई, यांनीं हें पुस्तक तय[illegible] केलें आहे. या पुस्तकाचे एकंदर पंधरा भाग केले आहेत. १ वस्तुस्थि[illegible] वर्णन, २ म्युनिसिपल डिस्ट्रिक्ट व कमेट्या, ३ म्युनिसिपालट्यांचें उत्प[illegible] ४ मलेरिया व साथींचे रोग, ५ सार्वजनिक बाग, झाडें, फार्म वगै[illegible] ६ म्युनिसिपल हद्दींतील घरें, ७ इमारती सामान, ८ पाण्याचा पुरव[illegible] ९ शहरांतील सफाई, १० गटारे, मोऱ्या, पायखाने, वगैरे, ११ शहरांत[illegible] मल व घाण, १२ धोक्याचे व त्रासदायक कारखाने, १३ म्युनिसिप[illegible] हद्दींतील रस्ते, १४ म्युनिसिपल इमारती, १५ म्युनिसिपल नोक[illegible] विभागणी, याप्रमाणें वेगवेगळ्या मुद्यांचें विवेचन केलें आहे. किं. १